( श्रीमंत होळकर सरकार यांच्या ग्रंथमालेच्या उदार आश्रयानें
प्रसिद्ध झालेला ग्रंथ. )

# राजतरंगिणी

किंवा

# काश्मीरचा इतिहास.

लेखकः—

रा. रा. माधवराव व्यंकटेश लेले

बी. ए. व एल. सी. ई.

किंमत ३ रुपये.

श्रीसाब प्रसन्न.

(श्रीमंत होळकर सरकार ग्रंथमालेच्या उदार आश्रयानें प्रसिद्ध झालेला ग्रंथ.)

# राजतरंगिणी.



श्री महाकवि कल्हणकृत

संस्कृत–राजतरंगिणी–किंवा काश्मीरचा इतिहास.

या सुप्रसिद्ध व अप्रतिम ग्रंथाचें

मात्र मराठी भाषांतर.

हें भाषांतर मूळ संस्कृत ग्रंथ व त्याचें डॉक्टर ' स्टीन ' कृत

इंग्रजी भाषांतर, यांवरून

## रा. रा. माधवराव व्यंकटेश लेले

बी. ए. व एल्. सी. ई.

यांनीं केलें.

---

ई० स० १९२९.

---

किंमत ३ रुपये.

॥ नादौ किंचिद्भवति नियतं यच्च पश्चान्न किंचित् ॥
मध्येऽकस्मात्सपदि घटयन् सौस्थ्यदौस्थ्यानुरोधम् ॥
निःशीर्षांत्रिर्नट इव मुहुः कोऽपि जंतुर्नटित्वा ॥
नो जानीमो भवजवनिकान्तर्हितः क्व प्रयाति ॥

श्लोक १७३१, तरंग ७.



मुद्रक व प्रकाशक
शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस; १०२६
सदाशिव पेठ, पुणें शहर.



A Marathi Translation of the

# RAJTARANGINI

( from the original Sanskrit )

**By Kalhana Pandit.**

Edited & Translated by

**Dr. A. Stein**

& published under the patronage of

**H. H.** the late **Maharaja Sir Pratapsing.**
G. C. S. I.

of Kashmere & Jammoo.

Translated by **Mr. Madhav Rao V. Lele.**

Printed and Published by

Shankar Narhar Joshi, at the Chitrashala Press, 1026
Sadashiv Poona.

Price Rs. 3.

**1929.**



सर प्रतापसिंग इंद्र महिंद्र बहादूर
काश्मीरचे माजी महाराज.



महाराजा सर हरिसिंग बहादुर जी. सी.
एस्. आय्. काश्मीरचे हल्लींचे महाराज.

# मराठी भाषांतरकाराची प्रस्तावना



सर्व संस्कृत वाङ्मयांत ज्याला इतिहास हे नांव बऱ्याच अंशानें लागूं करतां येईल असा राजतरंगिणी हा एकच सर्वमान्य व सुप्रसिद्ध ग्रंथ आहे, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. निरनिराळ्या बऱ्याच प्राचीन राजे महाराजांची गद्य-पद्यात्मक चरित्रें व प्रशस्त्या अनेक उपलब्ध आहेत. पण त्यांच्यांत इतिहासापेक्षा काव्यनिर्मितीकडे अधिक लक्ष दिलेलें असल्यामुळें त्यांचा ऐतिहासिकदृष्ट्या विशेषसा उपयोग होण्याजोगा नाहीं. अशा ग्रंथांची उदाहरणें बिल्हणकृत विक्रमांकदेव चरित, बाणकृत हर्षचरित. हम्मीरमर्दन, गौडवध, वगैरे सुप्रसिद्ध आहेत. त्यांच्यांत थोडा बहुत इतिहास आहे. पण तो काव्यालंकाराच्या भाराखालीं बहुतेक दडपून गेलेला आहे.

पण राजतरंगिणीचा तसा प्रकार नाहीं. तिच्यांत कवीनें काश्मीर देशाच्या अनेक वंशीय राजांच्या कारकिर्दीचा फार प्राचीन म्हणजे, कौरव पांडव यांच्या काळापासून तो ग्रंथकाराच्या काळापर्यंतचा, म्हणजे ई. स. ११४० पर्यंतचा संकलित इतिहास देण्याचा प्रयत्न केलेला असून तो देण्यांत ग्रंथकर्त्यानें आपल्या कालापर्यंत त्याला उपलब्ध असलेल्या व त्यानें दीर्घ प्रयत्नानें नवीन संपादन केलेल्या आधुनिक इतिहास रचनेला अवश्य मानल्या गेलेल्या पुष्कळशा साधनांचा शोधक बुद्धीनें उपयोग केलेला आहे व यामुळेंच या ग्रंथाचें इतर एतत्सदृश ग्रंथांच्या मानानें विशेष महत्त्व आहे. या इतिहासाचा प्राचीन पौराणिक व दंतकथात्मक भाग, अर्थातच संकलित व कमी विश्वसनीय आहे. मधील कालाचा भाग त्याच्याहून जास्त विस्तृत व विश्वसनीय आणि ग्रंथकर्त्याच्या कालापूर्वीच्या ५००।६०० वर्षांचा चांगलाच तपशीलवार, विश्वसनीय आणि राजकीय व सामाजिक स्थितीच्या वांचनीय वर्णनानें भरलेला आहे.

काव्य या नात्यानेहि हा ग्रंथ अगदीं पहिल्या प्रतीचा आहे असें म्हणणें अतिशयोक्तीचें असलें तरी, त्याची गणना दुसऱ्या प्रतीच्या काव्यग्रंथांत पुष्कळच श्रेष्ठ प्रतीची धरतां येण्याजोगी आहे. राजकीय संबंधाचें कथानुसंधान योग्य रीतीनें चालू ठेवलेलें असतांना कवीनें, जागजागीं सामान्य उद्बोधक सुभाषितें आणि चाललेल्या प्रकारासंबंधानें आपले विचार स्पष्ट व जोरदार भाषेनें व्यक्त केले आहेत. व ते विचार मार्मिक आहेत.

असा हा अद्वितीय ग्रंथ माझ्या वाचनांत सुमारें ४५ वर्षांपूर्वी प्रथम आला व त्याचें मराठींत भाषांतर झालें तर बरें असें मला वाटलें. त्याप्रमाणें मी तें भाषांतर करण्यास सुरवातहि केली. पण पुढें अनेक अडचणी आल्यामुळें तें काम तसेंच पडून राहिलें. तें मला सुमारें ५ वर्षांपूर्वी पुनः हातीं घेतां आलें. तें संपविण्याला सुमारें

ोन वर्षे लागलीं. त्यानंतर हें भाषांतर छापवून प्रसिद्ध करण्याचें काम आणखी २ र्षे पडून राहिल्यानंतर, श्रीमंत सरदार माधवरावसाहेब किबे एम. ए. यांच्या ोत्साहनानें व श्रीमंत होळकर सरकार ग्रंथमालेच्या सहाय्यानें, तसेंच चित्रशाळा प्रेसचे ालक व माझे जुने स्नेही, रा. रा. वासुकाका जोशी व रा. रा. शंकरराव जोशी ांच्या उत्साही स्वभावामुळें आज इतके वर्षांनंतर माझ्या मनांत सतत जागृत अस- लेली इच्छा, हल्लीं सफल होत आहे.

या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर डॉक्टर--हल्लीं सर आरियल--स्टीन यांनीं मोठ्या ारिश्रमानें तयार करून, विस्तृत व विद्वत्तापूर्ण टिपण्या व प्रस्तावना, यांच्यासह छापवून प्रसिद्ध केल्याला वीसांवर वर्षे होऊन गेलीं. त्यापूर्वी बरीच वर्षे त्यांनीं या ंथाची संस्कृत प्रतहि मोठ्या परिश्रमानें छापवून प्रसिद्ध केली होती. त्या दोहोंचाहि मला अतिशय उपयोग झाला. याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. संस्कृत व इंग्रजी राजतरंगिणी ग्रंथ छापविण्याच्या कामीं सर आरियल स्टीन यांना इंग्रज- सरकाराकडून आणि काश्मीरच्या दरबाराकडून भरपूर द्रव्य सहाय्य आणि इतर सर्व प्रकारची मदत मिळत गेली. ती वास्तविकपणें त्यांच्या गाढ विद्वत्तेला, अश्रांत परिश्रमाला, विलक्षण एकाग्रतेला व अभिनंदनीय चिकाटीला अनुरूपच होती. अशी मदत करण्यांत इंग्रज सरकार व काश्मीर दरबार यांनीं सर आरियल स्टीन यांच्यावर मोठेसे उपकार केले, असें नसून, तिच्यामुळें त्यांच्याच नांवाला उज्ज्वलपणा आलेला आहे.

या महनीय ग्रंथप्रकाशनानंतर सर आरियल स्टीनसाहेब यांनीं आपलें पुढील आयुष्य, मध्य व उत्तरपूर्व एशिया खंडांतील मोठ्याशा भागांत पुराणवस्तुसंशोधन- विषयक विपुल व विस्तीर्ण शोध लावून शेंकडों लुप्तप्राय बौद्ध ग्रंथ व इतर महत्वाचे लेख व वस्तू यांचा अप्रतिम संग्रह करण्यांत घालविलें आहे व तद्विषयक, या राजतरं- गिणीच्या मानानें कितीतरी पट मोठे, लेख व ग्रंथ यांच्या प्रकाशनाचें काम केलें आहे.

ते हल्लीं काश्मीरांत श्रीनगरापासून सुमारें ३० मैलांवर ७००० फूट उंच अशा पहाडीवर, आपल्याकडील प्राचीन ऋषी व महात्म्यांप्रमाणें आश्रम बांधून राहात आहेत. तेथे मी दीड वर्षाखालीं काश्मीरास गेल्यावेळीं त्यांना जाऊन भेटण्याचा प्रयत्न केला. पण तो माझ्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें दुर्दैवानें सफल झाला नाहीं. त्यांनीं या भाषांतराविषयीं सहानुभूति प्रदर्शित केली आहे.

हे भाषांतर कसें काय झालें आहे तें ठरविणें सुज्ञ व सहृदय वाचकांचें काम आहे. तें ते यथावकाश करतीलच-त्याच्यांतील दोषाकडे काणाडोळा करून, जे थोडे बहुत गुण असतील त्यांचें त्यांनीं कृपा करून ग्रहण करावे अशी त्यांना माझी सविनय प्रार्थना आहे.

हें पुस्तक एकाद्या आधुनिक दुसऱ्या प्रतीच्या कादंबरी इतपतहि वाचकांना आवडलें तरी, माझे दीर्घकालिक परिश्रम सफल झाले, असें मी समजेन.

शेवटीं या ग्रंथाच्या संबंधाने मला असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं कीं, अशा तऱ्हेचे तपशीलवार ग्रंथ आपल्याकडील इतर राज्यांविषयीं व त्यांच्यावर राज्य करून गेलेलीं राजकुले व राजे महाराजे यांच्याविषयीं हिंदुस्थानी कवींनीं व इतिहासकारांनीं लिहून ठेवलेले नाहींत हा त्यांनीं आम्हां हिंदुस्थानी लोकांवर एका प्रकारें मोठा उपकारच केला. कारण या ग्रंथांत वर्णन केल्यासारखीच घाणेरडी परिस्थिती इकडील बहुतेक राज्यांत राजे महाराजे व राण्या महाराण्या यांची राहात आली आहे. त्या संबंधीं वर्णनें वाचून घृणा वाटतें व लज्जेनें मान खालीं घालावी लागतें. असे राजे व राण्या आपल्या या आर्य म्हणविणाऱ्या देशांत पैदा तरी कशा झाल्या याबद्दल आश्चर्य वाटूं लागतें. वर लिहिल्याप्रमाणें अशा तऱ्हेच्या राज्याचीं व राजांची यथार्थ वर्णनें लिहून ठेवलीं गेलीं असती तर तीं आपल्या लोकांच्या तोंडांला तितकीं अधिक काजळाचीं पुटें बसलीं असतीं, असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं.

वरील लिहिण्याला अपवादात्मक अशीं कांहीं थोडीं अनंतदेवासारखीं थोर व उदार आणि आपल्या अलीकडील पुण्यश्लोक शिवाजी महाराजांसारखीं चांगलीं राजरत्ने झालेलीं नाहींत, असें नाहीं. तरी पण नांवें घेण्याजोग्या राजांच्या मानानें नांवें ठेवण्याजोग्या कुलांगार राजांचीच संख्या जास्त आहे. हाच प्रकार अलीकडेहि आपल्याला दिसून येत नाहीं असें नाहीं.

याविषयीं आणखीहि बरेच लिहितां येण्यासारखें आहे. पण तसें करण्याचें हें स्थळ नव्हे. असो.

भाषांतरकार,
**माधवराव लेले.**

---

श्रीसांब प्रसन्न.

महाकवि श्रीकल्हणकृत राजतरंगिणी.

# डाक्तर स्टीनकृत प्रस्तावनेच्या आधारें उपोद्धात.

पाश्चिमात्य लोकांच्या दृष्टीनें इतिहास समजण्याजोग्या ग्रंथांचा या हिंदुस्थान देशांत पूर्वीपासून अभावच आहे. तसले ग्रंथ तयार होण्याला शिलालेख, ताम्रपट, जुनीं नाणीं व पुराण वस्तूंचे आवशेष, यांखेरीज दुसरी सामग्री इकडे मुळींच नाहीं, असें मात्र नव्हे. इकडील जुन्या पद्धतीच्या विद्वानाच्या संस्कृतीला एक चमत्कारिक वळण लागलेलें असतें. त्याच्यामुळें पाश्चिमात्य पद्धतीप्रमाणें इतिहासाचें समालोचन करून तद्वारां सत्याचा निर्णय करण्याचे महत्व त्यांच्या लक्षात येत नाहीं. व तिकडे ते लक्ष देत नाहींत.

महाभारत, रामायण व पुराणें यांच्यामध्यें अनेक तऱ्हेच्या धार्मिक व औपदेशिक कथानकांमध्यें मिसळून दिली असलेली पुष्कळशी ऐतिहासिक माहिती निवडून काढतां येते. पण ती तेथें इतिहास रूपाने दिलेली नसते.

ऐतिहासिक गोष्टींच्या आधारानें रचलेलीं काव्यें संस्कृत वाङ्मयांत पुष्कळ आहेत. इतिहासाच्या दृष्टीने त्या गोष्टींची योग्यता विशेष असत नाहीं. आपली विद्वता, कल्पकता व काव्यरचना चातुर्य प्रदर्शन करण्यापुरताच, कवी त्यांचा उपयोग करतात. अशा चरित्रात्मक काव्यांत आढळणारे, राजे महाराजे यांचें वर्णन, कवीला आपल्या आश्रदात्यांकडून आर्थिक लाभ होण्याची जी लालसा असते, तिचेंच बहुधा फल असतें. पौराणिक कथेचा आधार न घेता स्वतंत्र काव्य बहुतेक आर्थिक लाभाच्या इच्छेनेंच करावें लागत असल्यानें, त्याच्यांत श्रीमान व थोर लोकांच्या यशोवर्णनावाचून दुसरें कांहीं क्वचितच असणार.

यामुळें साहजिकच अशा काव्य ग्रंथाचा ऐतिहासिक दृष्ट्या उपयोग व त्याचें महत्व कमी होतें. त्यांच्यामध्यें तत्कालीन परिस्थितीचें थोडें बहुत वर्णन असतें. तेंही प्रशस्तीपरच, असल्यानें मर्यादित व कमी योग्यतेचें होतें. अशा काव्यांतील वर्ण्य विषय परिचित व पाठांतला असल्याने तत्संबंधीं तात्विक विवेचन करण्यापेक्षा निव्वळ अलंकारप्रचुर वर्णन करण्यालाच कवी विशेषतः प्रवृत्त होत असतास. त्यांच्यामध्यें विश्वसनीय तपशील कमी असल्यानें, त्याला ऐतिहासिक योग्यता व महत्व येत नाहीं. त्यांचे महत्व तात्पुरतें व वैयक्तिक असते, यामुळें असले ग्रंथ क्वचितच फार दिवस टिकतात. सामान्य विद्वान व पंडित लोक त्यांच्या नव्या प्रती करविण्याच्या भरीस सहसा पडत नाहींत व जुन्या प्रती कालगतीनें कटिकमुळीं पडतात.

अशा चरित्रग्रंथांच्या मानानें पाहातां या राजतरंगिणी ग्रंथाची योग्यता, मध्यम युगीन पाश्चात्य ऐतिहासिक ग्रंथ आणि मुसलमानी तवारीखी, यांच्यापेक्षां कमी नाहीं. ग्रंथाचा उत्तर भाग दुसऱ्या कवींनीं पूर्ता केला आहे. त्याच्यासह साऱ्या संस्कृत वाङ्मयांत ऐतिहासिक म्हणण्यायोग्य असा ग्रंथ हाच होय. तो काव्यग्रंथ असला तरी, त्याची विवेचन व वर्णनपद्धति, स्वतंत्र व महत्वाची आहे. या ग्रंथांत कल्हण कवीनें काश्मीर मंडळांत पौराणिक काळापासून, आपल्या वेळेपर्यंत झालेल्या राजघराण्यांसंबंधीं सरळ व संगतवार हकीकत देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांतील फार प्राचीन काळासंबंधीं हकीकत पौराणिक दंतकथांच्या आधारानें आणि पुढील हकीकत पूर्वीच्या ग्रंथकारांच्या लेखांच्या आधारानें सालवार, अशी दिली असून, शेवटच्या भागांतील माहिती, कल्हणानें प्रत्यक्ष पाहिलेली, किंवा प्रत्यक्ष पाहिलेल्यां-कडून ऐकिलेली, अशी वर्णिली आहे. ती जास्त तपशीलवार व महत्वाची आहे. हें वर्णन निव्वळ स्तुतिपाठकाच्या तऱ्हेचें केलेले नसून त्रयस्थपणाचे व इतिहासलेख-काच्या धर्तीचें आहे.

कल्हणानें या काव्यांत स्वतःची कृती व कर्तृत्व यांच्याविषयीं प्रौढी मार-लेली नाहीं किंवा कांहीं नवीन तऱ्हेचा काव्यरचनेचा प्रकार प्रदर्शित केलेला नाहीं. त्यानें जाग जागी, पूर्वीच्या इतिहासकारांच्या लेखांचें सहाय्य घेतल्याचा उल्लेख प्रांजल-पणानें केला आहे. पण त्याला उपलब्ध असलेल्या ग्रंथांपैकीं किंवा तत्सदृश, असे ग्रंथ हल्लीं आढळत नसल्यानें पडताळा पाहण्याला मार्ग उरला नाहीं. या ग्रंथाची खरी ऐतिहासिक योग्यता याच ग्रंथांवरून ठरविली पाहिजे.

त्याच्यांत मधून मधून आढळणाऱ्या कांहीं तुटक उल्लेखांवरूनच कल्हण व तत्समकालीन परिस्थिति, यांविषयी कांहीं माहिती मिळते. कल्हणाला उपलब्ध अस-लेलीं साधनें व त्याची काव्यरचना, यांचा विचार केल्यानें त्याचा उद्देश व त्याचे तत्वविचार कांहींसे स्पष्ट होतील. त्यानें दिलेली माहिती व त्याची सालवारी, यांची चिकित्सक पद्धतीनें विचार केल्यानें या ग्रंथाच्या निरनिराळ्या भागाची कमी जास्ती योग्यता कळून येणार आहे.

## कल्हण व त्याचें कुलवृत्त.

राजतरंगिणी ग्रंथाचे आठ तरंग—भाग—आहेत. प्रत्येक तरंगाच्या शेवटीं, ' महाअमात्य चंपकपुत्र कल्हणकृत राजतरंगिणीचा हा अमका तरंग' असें लिहि-लेले आहे. कल्हणानंतर सुमारे तीनशें वर्षांनी जोनराज यानें, ही राजतरंगिणी पुढें आपल्यावेळेपर्यंत आणून पोचविली आहे. त्यानें कल्हणाविषयीं थोडीशी माहिती दिली आहे. लौकिक वर्ष ४२२४ किंवा ई. स. ११४८–४९ मध्यें कल्हणानें हा ग्रंथ सुरू करून तो पुढील वर्षी संपविला. ( तरंग १ श्लोक ५२ व तरंग ८ श्लोक ३४०० पहा ).

ई. स. १०८९ पासून ११०१ पर्यंत हर्षराजाच्या पदरीं चंपक नांवाचा सुप्रसिद्ध महामंत्री होता. तोच कल्हणाचा पिता असावा. हर्षाच्या कारकीर्दीच्या उत्तर भागांत द्वारपती असताना चंपकानें 'दुग्धघात' दुर्गाला वेढा घातला होता. त्यावेळच्या त्याच्या कर्तबगारीची कल्हणानें चांगलीच प्रशंसा केली आहे. हर्षाच्या शेवटच्या झगड्यांत त्याला तो चिकटून राहिला होता, असेंही त्याचें आदरपूर्वक वर्णन आलेलें आहे. हर्षाच्या मंत्र्यांनीं त्याला निर्भीडपणानें केलेल्या उपदेशाचें कल्हणानें तपशीलवार वर्णन केलें आहे. तें, तो उपदेश करणाऱ्यांकडून कळलेल्या माहितीवरूनच कल्हणानें केल्यासारखें दिसतें. तो उपदेश चंपकाने केला व त्याच्या तोंडूनच तो कल्हणाला कळला असल्याशिवाय, त्याला तो इतका तपशीलवार देतां आला नसता.

हर्षराजा पळून गेला व पुढें त्याला फारच शोचनीय मरण आलें. याविषयींचा तपशील, त्या बिकट प्रसंगातून एकटाच वांचलेला, चंपकाचा सेवक मुक्त यानेच कल्हणाला कळविला असला पाहिजे.

चंपक हा नंदिक्षेत्रांतील तीर्थें व देवता यांचा निस्सीम भक्त असल्यामुळेंच, कल्हणाला तें क्षेत्र व त्याच्या आसपासचा भाग, यांची कचीं माहिती आहे. चंपक हा ई. सं. ११३६–३७ सालीं जिवंत असल्याचें तरंग ८ श्लोक २३६५ वरून दिसतें.

चंपकाचा कनिष्ट बंधू कनक याचाहि या ग्रंथांत उल्लेख आहे. हर्ष राजा त्याच्या जवळ गायन शिकला व त्यानें त्याला एक लक्ष दीनार दिले. ( तरंग ७ श्लोक ११२७ ) हर्षाच्या मरणानंतर त्याने आमरण काशीवास केला. याबद्दल आदरपूर्वक उल्लेख आहे. ( तरंग ८ श्लोक १२ ) त्याची जन्मभूमी परिहासपूर होती. त्यानें तेथील प्रचंड बुद्धाची मूर्ती हर्षाच्या तावडींतून वांचविली होती. (तरंग ७ श्लोक ११२७ ) दुसरी बुद्धाची मूर्ती, बौद्धश्रमण कुशलश्री यानें वाचविली होती. यावरून कनक व कल्हण यांच्या मनात बौद्धधर्माविषयीं सहानुभूति होती, हें उघड आहे.

कल्हणाचे घर परिहासपुर येथें असल्यामुळेच त्याला त्या गांवाविषयीं इतकी तपशीलवार माहिती देतां आली आहे. तो ब्राह्मण असल्यामुळेच या राजतरंगिणी ग्रंथामध्यें त्याची संस्कृत भाषेवरील इतकी प्रभुता दिसून येते. त्याच्या लेखात भूदेवाविषयींचें महत्व व अभिमान जागजागीं बुद्ध्यां व्यक्त केलेला आढळतो.

प्रत्येक तरंगाच्या मंगलाचरणांत अर्धनारी नटेश्वराची स्तुती आहे. तेव्हा काश्मीर मंडलांत फार प्राचीन काळापासून प्रवृत्त असलेल्या शैव सांप्रदायाचाच तो अनुयायी होता, हे स्पष्ट आहे. तसेंच चंपकाला मान्य असलेलीं सर्व क्षेत्रें व देवस्थानें शैव होतीं. यावरूनही या म्हणण्याला पुष्टी मिळते.

एका काश्मिरी शैव आगमाचा प्रमुख आचार्य भट्ट कल्लट, याच्याविषयीं कल्हणानें सादर उल्लेख केलेला आहे. त्या आगमाचें रहस्य, तसेंच शैव मतानुसारी तांत्रिक मत, याचें कल्हणाला चांगलें ज्ञान असावें. तरी या मतांतील बऱ्याचशा आचार्य म्हणविणाऱ्यांचा त्यानें उपहासप्रचुर उल्लेख केला आहे. तेव्हां त्यांचा तो अंधश्रद्धेनें आदर करीत नव्हता, हें खास आहे.

पिता व पुत्र दोघेही पक्के शैव असूनसुद्धां, कल्हणानें या ग्रंथांत बौद्धमताविषयीं दाखविलेली सहानुभूती चमत्कारिक वाटते. अशोकापासून स्वतःच्या समकालीन राजांपैकीं जे राजे व इतर संपन्न लोक यांनीं बौद्धधर्मी विहार व स्तूप बांधविले, त्याच्याबद्दल त्यानें त्यांची, तसेंच मेघवाहनादिक राजांनीं जैन मताप्रमाणें जीवहिंसा बंद करविली, त्यांची, प्रशंसा व स्तुती केली आहे. 'भूतदया व थोरपणा यांचे अवतार बुद्ध व बोधिसत्व हे सर्वांना शांति देतात. ते आत्यंतिक चांगुलपणाचे अवतार, पाप्यांवरसुद्धां न रागावतां प्रेम करतात,' असेंही त्यानें मुक्तकंठानें प्रशंसायुक्त वर्णन केलें आहे. प्रथम तरंगांतील १३३ पासून १४७ पर्यंत श्लोकांतील कृत्याश्रम विहारांच्या वर्णनावरून तर त्याच्या बौद्धमत व त्यांतील दंतकथा या विषयींच्या सहानुभूतीबद्दल मुळींच शंका रहात नाहीं. त्यानें केलेल्या बुद्धाच्या मूर्तीच्या वर्णनावरूनहि हेंच स्पष्ट होतें. हर्ष राजानें धर्मद्वेष्टेपणानें मठ व मंदिरें लुटलीं आणि मूर्ती फोडविल्या. त्याचें वर्णन करतांना कल्हणाने बौद्ध व हिंदु देवतांच्या मूर्तीसंबंधानें सारखें व कळकळीनें लिहिलें आहे.

त्याला बौद्धधर्मातील परिभाषा व दंतकथा यांचें चांगलें ज्ञान होतें यात नवल नाहीं. त्याच्या वेळेपर्यंत बौद्ध धर्माची प्रारंभीची तीव्रता कमी होऊन, चालू हिंदू धर्माशीं त्यांचा विशेष विरोध न राहण्याइतकी, त्याला क्षीणता आलेली होती. त्यावेळीं जैन धर्म जास्ती जोरांत होता. ऐतिहासिक काळा अलीकडील कथांमध्यें बहुतेक गृहस्थ लोक, एकमेकांशीं मिळून मिसळून वागत असल्याचे दिसतें. राजे, सरदार, सावकार, व त्यांचे आप्तइष्ट हे बौद्ध विहार व स्तूप, आणि शैव व वैष्णव मंदिरें, यांची स्थापना सारख्याच श्रद्धेनें करीत असत. तत्कालीन हिंदु समाजाची धार्मिक परिस्थिती, काश्मीर मंडलांतल्या प्रमाणेंच, हिंदुस्थानांतील इतर प्रांतांतही सारखीच सळमिसळीची होती व पुढेंही तशीच राहिली. याचें उत्कृष्ट उदाहरण कनोजच्या हर्षवर्धनाचें आहे. त्याच्या दरबारांत बौद्ध व जैन यांना ब्राह्मणांबरोबरच मान मिळत होता, असें चीनी प्रवासी ह्वेनत्संग, यानें प्रत्यक्ष पाहून लिहिलें आहे. खुद्द कल्हणाच्या वेळीं गुजराथेतही तोच प्रकार होता. जैनाचार्य हेमचंद्र सूरी यानें चालुक्य राजा कुमारपाल हा आपला पट्ट शिष्य होता असें लिहिलें आहे. तरी कुमारपालानें आपला पूर्वीचा शैव धर्म व सांप्रदाय सोडलेला नव्हता, असें डाक्टर बुल्हर यांच्या हेमचंद्राच्या चरित्राच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. त्यावेळीं काश्मीरांत बौद्धमत व शैवमत

यांचा जितका मेळ होता, तितका तो गुजराथेंतील चालूं जैनमत व शैवमत यांच्यामध्यें नव्हता, हें निर्विवाद आहे. तेव्हांची काश्मीरांतील धर्ममतांची स्थिति हल्लींच्या नेपाळांतील दोन्ही धर्ममतांच्या स्थितीशीं अधिक मिळते. कल्हणाच्या पूर्वींपासून काश्मीरांत विवाहित बौद्धभिक्षू होते. तसेंच त्याच्या पूर्वी शेकडों वर्षें गौतमबुद्ध हा श्रीविष्णूचा अवतार मानला गेला होता. काश्मीरांतील प्रमुख आचार ग्रंथ नीलमत पुराण याच्यामध्यें, बुद्ध जयंतीचा उत्सव, थाटानें करावा, त्याच्यांत त्याच्या मूर्तींची पूजा अर्चा शाक्य किंवा बौद्ध भिक्षूंच्या परिपाठाप्रमाणें करावी, त्या भिक्षूंचा सन्मान करावा आणि चैत्यें उत्तम श्रृंगारावीं, असें सांगितलें आहे.

कल्हणाचें साहित्यशिक्षण कितपत झालें होतें याचा स्पष्ट उल्लेख कोठें आलेला नाहीं. पण खऱ्या श्रेष्ठ प्रतिभावान कवीला कोणकोणच्या विषयांचें ज्ञान लागतें आणि त्याच्या द्वारें तो प्रतिसृष्टी कशी निर्माण करूं शकतो, याचें त्यानें वर्णन केलें आहे, त्यावरून याविषयीं अनुमान करता येतें.

खरा कवी अलंकार–साहित्य–शास्त्रांत प्रवीण कसला पाहिजे, तसा तो होता, हें त्याच्या या काव्यावरून उघड आहे. ऐतिहासिक प्रसंगाच्या वर्णनांत विशेष अलंकारप्रचुर भाषा वापरतां येत नाहीं, हें खरें तरी चमत्कृतिजनक अलंकारांचे नमूने त्यानें बऱ्याच जागीं दिलेले आहेत. रघुवंश व मेघदूत या काव्यांचें त्यानें चांगलेंच परिशीलन केलेलें असावें. इतर काव्येंहि त्याला अवगत होतीं. बिल्हणाचें विक्रमांक देव चरितही त्याला चांगलें माहित होतें. त्याच्यांतील दोन ऐतिहासिक प्रसंगाचा त्यानें या काव्यांत दोन स्थळीं उल्लेख केलेला आहे. बाणाचें हर्षचरित आणि राजतरंगिणी, या दोहोंमध्यें, अपरिचित असे सामान्य शब्द व वाक्यें बरींच आढळतात. हर्षचरित दीर्घसमास घटीत गद्यांत आहे. या पद्यकाव्यांत कल्हणाला त्या गद्याचें अनुकरण करतां आलें नाहीं, तरी ऐतिहासिक विषयावरील मुख्य व प्रसिद्ध काव्य, या नात्यानें कल्हणानें त्याचें परिशीलन अवश्य केलें असावें.

प्रचंड असें श्रीमन्महाभारत आणि आदि काव्य श्रीवाल्मीकिरामायण, या दोन्ही ग्रंथांतील अनेक अप्रसिद्ध व बारीक गोष्टींचें या काव्यांत उल्लेख आढळतात. त्यावरून त्यानें त्यांचें बारकाईनें परिशीलन केलेलें दिसतें. रामायणांतील कथांचा उल्लेख कांहींसा कमी आढळतो.

आधुनिक संस्कृतज्ञ पंडितांच्या प्रमाणेंच त्याला भारत रामायणांतील अतिशयोक्ती व अलंकारप्रचुर कथा, अक्षरशः खऱ्या व ऐतिहासिक वाटत होत्या आणि ते ग्रंथ प्राचीन ऋषिप्रणीत म्हणून तो त्यांना भाविकपणानें पूज्य व विश्वसनीय समजत होता. आपल्या काव्यांतील मुद्याच्या गोष्टींच्या समर्थनासाठीं त्यानें महाभारतांतील कांहीं बऱ्याच अप्रसिद्ध कथा पुष्कळ परिश्रमानें शोधून काढून त्या दाखल्यासाठीं दिल्या आहेत. संस्कृतज्ञ पंडितांना ते ग्रंथ अलीकडील इतिहास ग्रंथापेक्षां अधिक

श्रेष्ठ व एकप्रकारचें वैशिष्ट्ययुक्त वाटतात, याचें कारण त्यांच्यांत दैवी व्यक्ती व विभूतिविषयीं वर्णन केलेलें आहे, हें होय. त्यांचें अनुकरण करण्याच्या उत्कट इच्छे-मुळेंच कल्हणाची हें काव्य रचण्याकडे प्रवृत्ती झाली असावी.

त्यानें निरनिराळ्या राजांच्या कारकिर्दीत विद्वान लोक व कवी यांना मान व आश्रय मिळत असे, त्याचें जागजागीं बरेंच वर्णन केलेलें आहे. त्याच्यावरून, त्याच्या स्वत:चें शिक्षण व विद्वत्ता यांच्या योग्यतेचें दिग्दर्शन होतें. संस्कृत साहित्याच्या इति-हासाच्या दृष्टीने हीं वर्णनें पुष्कळ महत्वाचीं आहेत.

या उल्लेखांपैकीं स्वत: कल्हणकृत कोणचे व त्याला उपलब्ध असलेल्या जुन्या-ग्रंथांतील कोणचे, याची फोड आता करतां येत नाहीं. यशोवर्मा राजाच्या पदरीं कनोजच्या दरबारात असलेले कवी व विद्वान, यांच्या विषयीचा उल्लेख, आणि तस-लेच थोडेसे दुसरे उलेख, त्यानें त्याच्या वेळीं चालू असलेल्या दंतकथांवरूनच घेतले असावेत. तसेंच जागजागीं आलेली अन्वर्थक व व्याजोक्तिपूर्ण सुभाषितें पूर्वीच्या काव्यग्रंथांतून उधृत केलेलीं असावींत. वराह मिहिराच्या बृहत्संहितेचा त्यानें कांहीं जागीं उल्लेख केला आहे. त्यावरून त्याला ज्योतिषाचें बरेंच ज्ञान होतें असें दिसते. या उलेखावरून कल्हणाचा समकालीन काश्मीरी कवी मंख कृत श्रीकंठ चरित. काव्यात त्याच्याविषयीं आलेल्या उल्लेखाचा संबंध आतां जुळवितां येतो. तो आज-वर लक्षांत येत नव्हता. श्रीकंठचरित हें काव्य प्रथम प्रोफेसर बुल्हर साहेबाना सांप-डलें. त्याच्या पंचविसाव्या सर्गांत मंख कवीचा बंधू मंत्री अलंकार याच्या येथें विद्व-त्सभा भरत असे, तिचे तपशीलवार वर्णन दिलेलें आहे. त्याच्यामुळें त्या सर्गाला साऱ्या संस्कृत वाङ्मयामध्यें अप्रतिम योग्यता आलेली आहे. त्याच सभेत मंखानें आपलें काव्य परीक्षणासाठीं दिलें होतें. त्या सर्गांत मंखानें त्या सभेंतील तीस विद्व-द्रत्नें व त्यांचें नानाशास्त्रांतील प्रावीण्य, यांच्याविषयीं थोडक्यांत, तरी चांगलें वर्णन केलेलें आहे.

मंखानें आपलें काव्य ई. स. ११२८ पासून ११४४ या वर्षामध्यें म्हणजे कल्ह-णानें राजतरंगिणी लिहिण्यापूर्वी कांहीं थोडींच वर्षे रचिल्याचे, प्रो. बुल्हर साहेबांनीं सिद्ध केलें आहे. त्या सभेतील इतक्या विद्वानामध्यें कल्हणासारख्या विद्वान संस्कृतज्ञ कवीचें नांव कां नसावें, अशी शंका येणें साहजिक आहे. मंखानें कल्याण नांवाच्या एका कवीचें वर्णन तीन श्लोकांत केलें आहे. त्यांत तो अप्रतिम कविकुलगुरू होता, त्याला सुप्रसिद्ध मंत्री अलकदत्त–हा अलंकार काव्यरचनेच्या कामाला सर्वथैव योग्य व पात्र समजत होता, त्याची काव्यरचनेची शैली आदर्शवत् व स्वच्छ असून तिच्यांत बिल्हणाच्या काव्यरचना-चातुरीचें पूर्ण प्रतिबिंब उमटलेलें होतें, त्याला नाना कथा, आख्यानें व आख्यायिका यांचें अध्ययन करण्याचा भारी नाद होता, असें म्हटलें आहे.

या श्रीकंठ चरित्रावरील टीकेंत जोनराजानें म्हटलें आहे कीं, हा अलकदत्त, कल्याण कवीचा आश्रयदाता, संधिविग्रहक, मंत्री होता व कल्याण ज्या कथा आवडीनें वाची व ऐके त्या महाभारतादिकांतील पौराणिक कथा होत. त्यानें कल्हणाचा नामनिर्देश केलेला नाहीं. पण कल्याण या संस्कृत पदाचा कल्हण हा अपभ्रंश होय, असें खात्रीनें सिद्ध करतां येते. कल्याण हे नांव स्वतः कल्हणानें कल्लण या अपभ्रष्ट रूपांत कांहीं स्थळीं घातलेलें असून अशीं अपभ्रष्ट नांवें आपल्या काव्यांत त्यानें बिन दिक्कत दिलेलीं आहेत, पण मंखानें सर्व नांवें मूळच्या शुद्ध संस्कृत रूपांतच दिलीं आहेत.

जोनराज कल्हणामागून समारें ३०० वर्षांनीं झाला. त्यानें कल्याण व कल्हण दोन्ही एकच असें म्हटलेलें नाहीं, हें चमत्कारिक आहे. त्यानें कल्हणाची राजतरंगिणीपुढें चालवून, तिच्यांतील इतिहास स्वतःच्या वेळेपर्यंत आणला आहे. कालांतरामुळें कदाचित कल्याण व कल्हण याची एकरूपतानिदर्शक ऐतिह्य नष्ट होऊन गेलें असेल !

स्वतः कल्हणानें, मंत्री अलकदत्त, त्याचा आश्रयदाता–याचा आपल्या काव्यांत सादर उल्लेख केलेला आढळत नाहीं. पुढें राजकारणामुळें कदाचित् त्यांच्यामध्यें बिघाड झाला असेल, किंवा कल्हणाला त्याचा विसर पडला असेल.

हें कल्हणाचें काव्य केवळ कल्पित कथानक असतें तर आपणाला त्याच्या चरित्रांतील इतक्याच त्रोटक माहितीवर स्वस्थ बसावें लागतें. पण त्यानें हा ग्रंथ आपल्या देशाचा पूर्वकालीन इतिहास म्हणून लिहिला आहे व त्याच्या बऱ्याच भागांत त्याने स्वतःच्या वेळीं किंवा थोडींशी वर्षे पूर्वी घडलेल्या गोष्टींचें तपशीलवार वर्णन दिलें असल्यामुळें त्यांच्यांत त्याच्या चरित्राविषयीं बरीच माहिती मिळते आणि तत्समकालीन परिस्थितीहि पुष्कळशी कळून येते. हा प्रकार इकडील प्राचीन ग्रंथकाराच्या कृतींत क्वचितच आढळून येतो.

कल्हणानें हा ग्रंथ ई. स. ११४८–४९ या वर्षी लिहिला. त्याच्या वर्णनशैलीवरून त्या वेळीं तो पोक्त असावा, असें दिसतें. ई. सं. ११२१ सालीं भिक्षाचराला त्याच्या सैनिकांनीं दगा दिला, त्याविषयींच्या त्याच्या वर्णनावरून त्याने त्या गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्या असाव्या असें दिसतें. हें वर्णन आणि ई. सं. १११२ ते ११२० पर्यंतच्या सुस्सल राजाच्या पहिल्या कारकीर्दीचें वर्णन, यांच्यामध्यें कल्हणाचे प्रौढ व पोक्त विचार पुष्कळसे प्रगट झालेले आहेत. तेव्हां त्यावेळी तो पोर वयाचा नव्हता, हे खास आहे. त्याचा जन्म ई. स. ११०० च्या सुमारास झाला असावा. त्याचा पिता चंपक हा ई. स. १०९८ त एक प्रतिष्ठित सेनाध्यक्ष होता. याच्याशीं ही जन्माची मित्ती विसंगत वाटत नाहीं.

ईसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या प्रारंभीं काश्मीरांत राज्यक्रांती झाली, राज्यकारभारांत पुष्कळ घालमेल झाली व एक नवें राजघराणें स्थापन झालें. हर्ष राजानें ई. स. १०८९ ते ११०१ पर्यंत राज्य केलें. त्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या कांहीं वर्षांत बरीच सुव्यवस्था राहिली व संघटण झालें आणि देशांत स्वस्थता व अबादानी राहिली. पण पुढें तो भारी क्रूर व उच्छृंखळ झाला, यामुळें तो नाश पावला. तो अतिशय ऐषआरामी व उधळ्या निघाला. द्रव्य उकळण्याच्या कामीं त्यानें लोकांवर अनन्वित जुलूम जबरदस्ती केली. भूमिये असलेल्या प्रबल डामरांना फारच त्रास सोसावा लागला. तेव्हां त्यांचे आप्त लोहर येथें राहणारे, शूर वीर उच्चल व सुस्सल, या दोघां बंधूंनीं बंड केलें. शेवटीं हर्ष राज्यभ्रष्ट होऊन मारला गेला. अपसांतील तंटा तोडण्यासाठीं त्या दोघांनीं राज्याची वाटणी केली. वडील बंधू उच्चल काश्मीर मंडळाचा राजा झाला व सुस्सलाकडे त्यांचें वाडिलार्जित लोहरचें राज्य राहिलें.

प्रबल भूमिगे डामर यांच्या अभ्युदयामुळेंच हर्षाचा नाश झाला होता. खुद्द राजा व सारें राज्य यांची शांतता व सुस्थिति यांना हे डामर शल्यासारखे झाले होते. त्याच्यांतील प्रमुख गर्गचंद्र याला उच्चलानें हाताशीं घेतलें व त्यांच्यामध्यें आपसांत वैर व मत्सर पैदा करवून आणि कलागती लावून त्यांना हाणून पाडलें. मोठ्या चतुराईनें व कारस्थानानें त्यानें आपला जम बसविला. त्यानें दहा वर्षे राज्य केलें. त्या अवकाशांत बरेच तोतये आणि खुद्द सुस्सल यांनी उठावण्या करकरून त्याला पुष्कळ त्रास दिला. शेवटीं त्याच्या विश्वासांतील अंमलदारांनींच कट करून त्याचा खून केला. प्रमुख कटवाला रड्ड एकच दिवस गादीवर राहिला. त्या कटवाल्यांचा गर्गचंद्रानें तात्काल पराभव केला व तो स्वतः हवा त्याला राजा करण्याइतका प्रबल झाला. त्यानें उच्चलाचा सावत्र बंधू सल्हण याला गादीवर बसविलें. त्याच्या चार महिन्याच्या कारकिर्दीत सर्वत्र अंदाधुंदी माजली. डामर सरदार सारखे आपसात झगडत होते. सुस्सलानेंही चढाई केली. त्या अवकाशांत सुल्हणानें भयंकर छल व रक्तपात चालविला होता. यामुळे ती लहानशीच कारकीर्द एखाद्या दीर्घ अशा घोर रात्रीं पडलेल्या दुष्ट स्वप्नाप्रमाणें सर्व प्रजेला तापद झाली.

शेवटीं सुस्सलानें गर्गाशीं समेट करून गादी मिळविली. तो शूर पण भारी अविचारी होता. तो फारच दुष्ट व उत्सृंखल निघाला. त्यानेंहि ई. स. १११२ ते ११२८ पर्यंत राज्य केलें. हीं त्याचीं सारीं वर्षे डामरांशी भयंकर भांडणें व युद्धें आणि तोतयांशीं तोंड देण्यांत गेलीं. अनेक घातपात व झटापटी करून त्यानें गर्गाचा पाडाव केला. हें पाहून सारेच डामर बिथरले व व त्यांनीं हर्षाचा देशांतरांत वाढलेला नातू भिक्षाचर, याला तोतया तयार करून बंड उभारलें. सुस्सलाच्या क्रौर्यामुळें बेदिल झालेले पुष्कळच लोक त्यांना मिळाले. शेवटीं त्यांनीं सुस्सलाला राजधानींतच वेढा घातला. तेव्हां तो लोहरकोटांला पळून गेला. या झटापटींत व वेढ्यांत नग-

राचा सत्यानास झाला. भिक्षाचराला काश्मीरचें राज्य मिळालें. पण सहा महिन्यांतच त्याचें उच्चाटन झालें. तो डामर सरदारांच्या हातांतील नुसतें बाहुलें बनला होता. त्याचा अधिकार इतका संपुष्टांत आला होता कीं पुढें पुढें त्याला अन्नवस्त्राची सुद्धां अडचण पडूं लागली. डामर व सरकारी अंमलदार यांच्या जुलूम जबरदस्तीला सारी प्रजा फारच त्रासली. ब्राह्मणांनीं जागजागीं प्रायोपवेशनें चालविलीं. लोकांचे डोळे पुनः सुस्सलाकडे लागले. त्याच्यावर धाडलेल्या काश्मीरी फौजेचा त्यानें पराभव केला. डामर मंडळींत मेळ नसल्यामुळें त्यानें ई. स. ११२१ त पुनः गादी बळकावली.

पुढील सात सालें सारखीं अपसांतलि झटापटींत गेलीं. शत्रू व त्यांनी सांवरलेले तोतये यांना सुस्सलाला तोंड देतां येईना. त्यांची पुष्कळदां भारी रेधा उडाली होती. श्रीनगराला तीन वेळ वेढा पडला. शिवाय प्रखर दुष्काळ व अश्रुतपूर्व भयकर अग्निप्रळय यांचाहि उपसर्ग त्या नगराला सोसावा लागला. त्या दिवसांत सुस्सलानें इमानी अशा पदरच्या पहाडी व पंजाबी सैनिकांच्या सहाय्यानेंच कसा तरी टिकाव धरला होता. डामरांना ही गडबडीची स्थिति सोईची होती म्हणून त्यांनीं भिक्षाचराला कायमचा विजय मिळूं दिला नाहीं.

पुढें ई. स. ११२८ त सुस्सलानें आपल्या प्रतिस्पर्ध्यांना मारण्यासाठीं तयार केलेल्या एका कटांतील लोकांनीच सुस्सलाचा खून केला. नंतर त्याचा पुत्र जयसिंह गादीवर बसला. पण त्यावेळीं डामर पूर्वीप्रमाणचें प्रबल असून भिक्षाचरहि स्वारी करण्याला तयार होता. जयसिंहानें मोठ्या चतुराईनें कुटिल चाणक्य नीतीचा अवलंब करून, डामरांशीं समेट केला व हळूं हळूं आपला अधिकार जमविला. त्याला भिक्षाचराची भीती दोन वर्षें कायम होती. शेवटीं भिक्षाचर एका सरहद्दीवरील पहाडी गढींत विश्वासघातानें कोंडला गेला. तेथें त्यानें वीरोचित मरण मिळविलें. या जुन्या शत्रूची वाट लागते न लागते तोंच, वडिलार्जित लोहरकोटच्या गादीवर कल्हणाचा भाऊ लोठण यांला बसविण्यांत आलें. त्याला हाणून पाडण्याचा जयसिंहानें प्रयत्न केला. पण त्यांत त्याची फजीती झाली. अखेर तो किल्ला विश्वासघातानें पाडाव झाला. तरी लोठण व मल्लार्जुन हे पुढें बरीच वर्षे काश्मीरच्या राज्याला सारखे त्रास देतच होते. त्यांना उद्दाम व शिरजोर डामरांकडून वरचेवर सहाय मिळालें. ई. स. ११३६ त ते दोघेहि पकडले गेले. तोंवर सर्व प्रजेला त्राहि त्राहि झालें होतें. पुढें तरी कांहीं स्वास्थ्य मिळेल असें वाटलें होतें पण व्यर्थ. सल्हणाचा पुत्र भोज हा नवा तोतया पैदा झाला. त्याच्याशीं जयसिंह ई. स. ११४३ पर्यंत झगडतच होता.

भोजानें काश्मीरच्या उत्तर सरहद्दीवरील प्रबल दरद लोकांचें सहाय्य मिळविलें होतें. शिवाय बहुतेक उच्छृंखळ डामरहि बंड करण्याला उत्सुक होते. भोजाच्या सहायकर्त्यांमध्यें आपसांत कलागती लागल्यामुळेंच जयसिंहाचा बचाव चालला होता. शेवटीं

त्यानें ई. स. ११४६ त समेट केला. तरी ज्यांच्यामुळें हतभागी काश्मीर मंडळाला इतकीं वर्षें दुस्सह त्रास झाला होता ते अपसांतील घातक झगडे कल्हणानें आपला हा ग्रंथ लिहिला त्यावेळीं देखील समूळ नष्ट झालेले नव्हते.

काश्मीर मंडळांत भयंकर यादवी चालली असतांनाच कल्हणाचें बहुतेक आयुष्य गेलें असल्यानें त्याचा परिणाम या ग्रंथाची रचना, त्याचें वर्तन आणि समकालीन मंडळींशी त्याचा असलेला संबंध, यांच्यावरहि पडलेला आहे. हर्ष राजाला सर्वस्वी भोंवणारी राज्यक्रांती कल्हणाच्या घराण्यालाही कायमची बांधली. आठव्या तरंगांत पुष्कळशा मंत्र्यांची नांवें आलेलीं आहेत पण त्यांत चंपकाचें नांव नाहीं. त्याचे नांव भूतेश्वर तीर्थासंबंधाने २३६४व्या श्लोकांत आले आहे. त्यावरून तो ई. स. ११३५ नंतरहि कांहीं वर्षें हयात होता, असें दिसतें. तो हर्षाच्या वेळीं प्रमुख मंत्री होता. पण पुढील कारकीर्दींत तो कामावर नव्हता. तो स्वतःच घरी बसला होता, किंवा तसें होण्याला दुसरे कांहीं कारण होतें. तें कळत नाहीं. कदाचित त्यानें हर्षाविषयी अखेरपर्यंत दाखविलेल्या स्वामिभक्तीचाही हा परिणाम असेल.

पुढील कारकिर्दीत कल्हणानें कोणचीही सरकारी नोकरी केली असती तर, कविसंप्रदायाप्रमाणें तो त्या राजाची फाजील स्तुती केल्यावाचून राहतांना. हा ग्रंथ त्यानें जयसिंह राजाच्या आज्ञेनें लिहिलेला दिसत नाहीं. त्यानें त्याच्या गुणदोषांची चर्चा निर्भीडपणानें केलेली आहे. तिच्यावरून त्याला त्या राजाकडून पारितोषिकप्राप्तीची इच्छा नव्हती, हें उघड आहे. इतर राजाश्रित कवींनी केलेल्या राजे लोकांच्या प्रशंसेच्या मानानें त्यानें केलेली जयसिंहाची प्रशंसा बेताची, औपचारिक व पुढें मागें त्रास न होय, एव्हढ्या पुर्तीच केलेली दिसते. त्यानें केलेली सुस्सलाची—जयसिंहाच्या पित्याची—कडक पण खरी टीकाही, अशातलीच होय. त्याच्या वर्तनातील अक्षम्य दोष, त्याचे भयंकर क्रौर्य व लोभ, वगैरे बद्दल कल्हणाने स्पष्टपणें नावे ठेवलीं आहेत. त्याला पिशाच्च बाधा होती हा लोकप्रवादसुद्धां त्यानें मोकळेपणी दिला आहे. उलट सुस्सल व जयसिंह दोघांना ही भारी त्रासदायक झालेल्या भिक्षाचराचें शौर्य व वीर्य यांच्याविषयीं प्रशंसा करण्यांत त्यानें कसर केलेली नाही. भिक्षाचराच्या या औटघटकी कारकीर्दीपासून चंपकाला व त्याच्या कुटुंबांतील कोणालाहि काडीइतका फायदा झाला नाहीं, ही गोष्टही त्याच्या वर्णनावरून उघड होते. सर्व तोतयामध्यें शूर व विचारी अशा भोजाविषयींच काय ती कल्हणाला कळकळ वाटत होती. त्याच्या संबंधीं बहुतेक माहिती त्याला खुद्द भोजाकडून किंवा कोणाच्या मार्फतीनें मिळाली असावी. लोठण व मल्लार्जुन या दोघां जयसिंगाकडेच रहात असलेल्या तोतयांविषयीं कल्हणाला तिरस्कार वाटत होता.

या राजक्रांतीच्या काळांत कल्हणाला आपल्या देशबांधवांच्या चारित्र्याचें सर्व बाजूनें निरीक्षण करण्याला सांपडलें होतें. त्या विषयींचे त्यानें केलेलें वर्णन योग्य, कांटे-

तोल व मार्मिक आहे, यांत नवल नाहीं. बहुतेक सर्वच पण विशेषतः कनिष्ट प्रतीच्या काश्मीरी लोकांचें प्राकृतिक व नैतिक धैर्य अगदींच बेताचे असतें. ही गोष्ट त्याच्या लक्षांत आलेली होती. काश्मीरी सैनिकांच्या बढाईखोरपणाची उदाहरणें देऊन त्यानें त्याची चांगली टर उडविली आहे. शत्रू नेटानें चालून येत आहे अशी नुसती अफवा ऐकतांच त्या सैनिकांनीं पळ काढला, तसेंच एकमेकांच्या भयानें दोन्ही विरोधी दळांची गाळण उडाली, अशीं असल्या प्रसंगाचीं त्याने उदाहरणें दिलीं आहेत. मूठभर मस्त मारेकऱ्यांनीं महाराजाला मुख्य महलांत ठार मारतांच पाहारेवाले, अंमलदार, मंत्री, दरबारी व सैनिक धूम पळून गेले. याचें कल्हणानें केलेंले वर्णन वाचून त्या प्रसंगाचें डोळ्यापुढे जसें चित्र उभें राहतें. त्यानें आपल्या देशबांधवाचें शौर्य व वीर्य यांची खरी परीक्षा केलेली होती. याच्याउलट काश्मीरच्या राजाचे जणों खरे विश्वासू आधारस्तंभ असे रजपुत परदेशी पगारी सैनिक, यांची इमानदारी, धैर्य व शौर्य, याचें त्यानें जागजागीं प्राजलपणें प्रशंसापूर्ण वर्णन केलें आहे. तरी त्या लोकांची आत्मप्रशंसा व प्रौढी मिरविणें त्याला खपत नव्हतें.

आपल्या देशबांधवांच्या हातून घडलेले नानाप्रकारचे विश्वासघात व कृतघ्नपणा हे कल्हणानें प्रत्यक्ष पाहिलेले होते. मोठ मोठे अधिकारी मंत्री मालकाच्या पक्ष सोडण्याला किंवा त्याला शत्रूला विकण्याला निःशंक तयार झालेले पाहून त्याला भारी घृणा वाटे. ती त्यानें स्पष्टपणें व्यक्त केली आहे. तसेंच आपल्या देशाच्या व राजाच्या शत्रूंनीं व प्रतिस्पर्ध्योंनीं सुद्धां दाखविलेलीं स्वामिभक्तीचीं व इमानदारीचीं उदाहरणे त्याने आदर व प्रशंसापूर्वक दिलीं आहेत.

राजदरबार व फौजेच्या छावण्या, यांच्यामध्यें नेहमीं लबाडी व कृतघ्नपणा नजरेस पडे, त्याबरोबरच काश्मिरी जनता चाललेल्या गडबडीसंबंधाने अगदीं तटस्थ व उदासीन रहात असे. या गोष्टी त्याच्या चांगल्या लक्षांत आलेल्या आहेत. नगरातील लोक निरुत्साह व निरुद्योगी असलेले व त्यांच्या क्षूद्र मनोवृत्ती, यांचें त्यानें जें वर्णन केलें आहे त्याच्यावरून त्याच्या देशबांधवांच्या स्वभावाचें त्याला असलेले मार्मिक ज्ञान व्यक्त होतें. या वर्णनांत त्याच्या स्वाभिमानाचीहि बरीच झांक दिसून येते. काश्मीरी लोकांच्या अंगी असलेल्या दुसऱ्याहि बऱ्याच दोषाचे त्यानें चांगलें आविष्करण केलें आहे.

त्याच्या डामर लोकांच्या वर्णनावरून त्या वर्गाविषयींचा त्याचा तिरस्कार व्यक्त होतो. त्यांचा अतोनात उद्दामपणा व त्यांचें प्राबल्य, यामुळेंच हर्षाचा घात झाला आणि पुढें कल्हणाच्या दृष्टीं पडलेली साऱ्या राज्यावरील अनन्वित आपत्ति ओढविली. त्यानें त्यांना दस्यू, चोर, डाकू म्हटलें आहे. ते मूळचे भूमिये किंवा जमीनदार—पुढें सधन व प्रबळ झाले तरी त्यांचा गांवढळपणा व दांडगेपणा कमी झाला नाहीं. कल्हणानें त्यांचे दोष दाखविण्यांत मुळींच कसर केलेली नाहीं. यावरून त्यांच्या

झाल्यानें त्याचे व त्याच्या घराण्याचें चांगलेंच नुकसान झालें असावें असें वाटतें. असल्या उच्छृंखल सरदारांमुळें नगरांतील सर्व लोक, राज्यांतील सारी प्रजा, सारे ब्राह्मण आणि अधिकारीवर्ग, सर्वांनाच भारी त्रास सोसावा लागला असावा, यांत शंका नाहीं. ब्राह्मणांची उपजीविका अग्रहारांतील शेतीभातीवर होती. अंतस्थ गडबडी व राज्यक्रांतीच्या प्रसंगीं डामरांच्या जुलुमामुळें तिच्यावर नेहमीं धाड येत असे.

पूर्वापार संबंधामुळें कल्हणाच्या घराण्याला सरकारी अंमलदारांविषयीं साहजिकच सहानुभूति वाटत असावी. तरी त्यांच्या विषयीं त्याच्या मनांत पक्षपात नव्हता. त्यानें जागजागीं कायस्थ कामगारांविषयीं वर्णन करतांना त्यांचें वर्तन व चारित्र्य, यांच्यावर मर्मभेदी टीका करून कोरडे ओढले आहेत. त्यावरून त्याला त्याच्या दुष्कृत्यांचा चांगलाच अनुभव आलेला असावा. कांहीं राजांनीं त्या लोकांची भारी विटंबना केली, त्याविषयीं त्यानें मोठ्या आवडीनें वर्णन केलें आहे. त्यांत त्याचा तिरस्कार पूर्णपणे व्यक्त झाला आहे.

जुन्या पुरोहित वर्गाविषयींहि त्याला तिरस्कारच वाटत होता. प्रमुख क्षेत्रें व देवस्थानें यांमध्यें त्यांच्या · परिषदा–किंवा–धर्मसभा–असत. त्यांच्या हातून कधीं कधीं राज्यकारभारांत बरीच महत्त्वाची कामगिरी घडलेली आहे. त्यांनीं निर्वाणीच्या प्रसंगीं केलेल्या प्रायोपवेशनाचा, कोमल मनाच्या राजावर बराच दाब पडे. ते लोक अशिक्षित व गर्विष्ठ असत. ते राजकारभारांत ढवळाढवळ करीत तेव्हा अनिष्ट परिणाम घडे. म्हणून या बाबतींत कल्हणानें त्यांचा तीव्रपणें निषेध केला आहे. असल्या कांहीं परिषदांच्या प्रायोपवेशनांचें त्यानें वर्णन केलें आहे. त्यांच्यांत त्यांचा सामुदायिक भित्रेपणा व मूर्खपणा, यांचें चांगलें चित्र रेखाटलें असून, त्यांच्या धार्मिक स्तोमाची खूप फजिती केली आहे. त्या लोकांविषयीं वरिष्ठ वर्गाच्या ब्राह्मणांच्या मनांत हल्लीं सुद्धां जो आदर आढळतो, त्या· मानानें हा कल्हणानें व्यक्त केलेला तिरस्कार अस्थानीं नाहीं. चालू रूढीअन्वयें या भूदेवाविषयीं धर्मसंबंधांत जी पूज्यबुद्धि तत्त्वतः असावी, ती तो ठेवी. पण त्यांच्या राजकीय चळवळींसंबंधानें ती तो मुळींच ठेवीत किंवा दाखवीत नसे.

उच्चल राजाच्या कारकीर्दीच्या वर्णनांत त्यानें एका लबाड सावकाराच्या वर्तनाचें गमतीचें, चटकदार व तपशीलवार वर्णन दिलें आहे. तें बहुतेक त्याच्या स्वतःच्या अनुभवाचेंच फल असावें.

आपल्या वेळच्या काश्मीर मंडळाच्या स्थितीचें कल्हणानें जें वर्णन केलेलें आहे, त्याच्यावरून तत्कालीन बऱ्याच प्रमुख माणसांशीं त्याचा प्रत्यक्ष परिचय असलेला दिसतो. तो त्याच्या थोर कुलावरून संभवनीय आहे. निरनिराळ्या व्यक्तींचे गुणदोष त्यानें निःपक्षपातानें व मोकळेपणानें वर्णिले आहेत. मंत्री रिल्हण हा सुस्सलानें केलेल्या अनेक युद्धांमध्यें प्रमुख असून, पुढें जयसिंहाच्या कारकीर्दींत तो मोठ्या अधिकारावर

होता.त्याच्याशीं कल्हणाचा चांगला स्नेह असावा. जयसिंहाच्या मुख्य मंत्र्यांमध्यें रिल्हण हाच विद्वानांचा चाहाता व सहाय्यकर्ता होता, असें कल्हणानें म्हटलें आहे. शिवाय त्याचा भाऊ, पत्नी व खुद्द रिल्हण, यांच्या धार्मिक कृत्यांचें त्यानें तपशीलवार वर्णन करून, त्याचें धैर्य, शौर्य व युद्धकला नैपुण्य, यांची पुष्कळच तारीफ केली आहे. रिल्हणाने सुरेश्वरी येथील एका मंदिराला बहुमोल अलंकार अर्पण केले होते. त्याचे कल्हणानें केलेलें वर्णन प्रशस्तीसारखें व लक्षात ठेवण्याजोगे आहे. तरी त्याची तऱ्हा चांगली व निराळी आहे. रिल्हणाशीं दाट स्नेह असल्याशिवाय कल्हणाच्या हातून हें प्रशस्तीरूपी विषयांतर झालें नसतें.

जयसिंह राजाच्या कारकीर्दीच्या उत्तर भागांत अलंकारमंत्र्याकडे मोठीं अधिकाराचीं कामें होतीं. त्याचाही कल्हणानें सादर उल्लेख केला आहे. त्या अलंकाराचा बंधु श्रीकंठचरिताचा कर्ता मंख याच्या वर्णनावरून तो स्वतः चांगला विद्वान असून विद्वानांचा आश्रयदाता होता. मंख हा संधिविग्रहक मंत्री होता. असा एकाच स्थळीं उल्लेख आलेला आहे. तोही आपल्याप्रमाणे कवि होता, असें कल्हणाने लिहिलेले नाहीं. द्वारपति उदय याच्याविषयींही कल्हणाच्या मनांत आदर वसत होता. राजवदन यानें थोड्या वर्षांखालीं जयसिंह राजाविरुद्ध बरेंच मोठे बंड केले होते तरी त्याचें कल्हणानें केलेलें वर्णन आदरपूर्ण आहे. तें कां, हे कळत नाहीं. पण त्याच्यावरून त्याचा त्याच्याशीं असलेला स्नेह व्यक्त होतो.

या ग्रंथांत कल्हणानें स्वतःविषयीं मौन धरलेलें असल्यानें खुद्द त्याच्या विषयींची माहिती मिळत नाहीं, यामुळें ऐतिहासिक दृष्ट्या बरेंच नुकसान झालेले आहे. तरी त्याच्या लेखावरून तो चतुर व चाणाक्ष असून, तो भोवतालच्या हालचाली व परिस्थितीकडे सूक्ष्म दृष्टीनें व विवेचकपणानें पहात असे, हें उघड दिसते. त्याला मनुष्यस्वभावाचें ज्ञान चांगलें होतें. आपल्या देशाची भौतिक व सापत्तिक स्थिति त्याला ठाऊक होती. पुराणवस्तुसंशोधन बारकाईने करण्याची त्याला आवड होती. नित्य व्यवहारहि तो लक्षपूर्वक अवलोकन करित असे. या गोष्टीवरून इकडील इतर कवींच्या मानानें त्याच्या अंगी असलेलें वैशिष्टय व्यक्त होतें. त्याचे शिक्षण पूर्वपरंपरेनुरूपच झालेलें होतें आणि त्याला अनुसरूनच त्यानें ठरीव.पद्धतीची काव्यरचना केलेली आहे. तरी तो निवळ शास्त्रीय पद्धतीला चिकटून राहाणारा, पोटभरू पंडित मात्र नव्हता. ही गोष्ट त्याला भूषणास्पद आहे.

वाङ्मयात्मक ग्रंथ व काव्यें यांना ग्राहक असतील त्यामानानेंच तीं प्रत्येक देशांत निर्माण होत असतात, हें खरें. पण ही गोष्ट या राजतरंगिणी काव्याला लागू नाहीं. कारण कल्हणाच्या वेळीं कवि व विद्वान् लोक यांची योग्य कदर व बहुमान होऊन, त्यांना भरपूर पारितोषिकें मिळण्यासारखी राजदरबाराची स्थितीच नव्हती. त्यानें हा ग्रंथ राजाश्रयाने किंवा तो मिळविण्यासाठीं मुळींच रचलेला नाहीं, हें स्पष्ट आहे.

या ग्रंथांत जागजागीं कर्त्याचे वैशिष्टयद्योतक उल्लेख व विचार आढळतात. त्यांच्यावरून तो एका अधिकारी बनण्यायोग्य कुलांत उत्पन्न झाला असूनहि, तत्कालीन परिस्थिति किंवा कांही विशेष कारणें, यामुळें कल्हणाला राजकारभार किंवा लष्करी काम, यांच्यांत अंशभाक होता आले नाही, म्हणूनच त्याने आपली विद्वत्ता व शिक्षण याचा उपयोग आपल्या वेळच्या राजकीय स्थितीचा आमूलाग्र इतिहास लिहिण्याकडे केला या ग्रंथाला जे वैशिष्टय आले आहे त्याचा या योगाने उलगडा होतो आणि त्यामुळेंच त्याला आपली विद्वत्ता, मिळविलेली माहिती, लष्करी गोष्टीचें ज्ञान व माहिती मिळविण्यासाठीं केलेले प्रवास व घडलेल्या गोष्टीविषयींचे विचार निःपक्षपाताने जोरानें आपल्या मनाप्रमाणे जनापुढे मांडण्याला संधि सापडली व साधन झालें.

## राजतरंगिणींतील विषय

## आणि

## त्याची प्रतिपादनाची तऱ्हा.

हा ग्रंथ कल्हणानें काव्य म्हणून लिहिला आहे, इतिहास म्हणून नव्हे. पाश्चिमात्य देशांतसुद्धा पूर्वी फार वर्षेपर्यंत असे ग्रंथ, काव्ये किंवा नैतिक प्रबंध म्हणूनच लिहिले जात होते. निवळ इतिहासग्रंथसुद्धां काव्यप्रथातच अंतर्भूत होत असत. कल्हणानें हा ग्रंथ काव्याच्याच दृष्टीने लिहिला असल्यानें तो काव्यालंकारप्रचुर करण्याकडेच त्याची विशेष प्रवृत्ति आहे, ऐतिहासिक गोष्टी व्यवस्थेशीर मांडण्याकडे नव्हे. प्रास्ताविक श्लोकांत त्यानें कवींना सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या योग्यतेला बसविले आहे, तें याच दृष्टीनें, हें लक्षात ठेवण्यासारखे आहे. त्यावरून देखील त्याची दृष्टि मुख्यतः काव्य रचण्याची असून त्याला ऐतिहासिक वर्णन त्याच्या अनुषंगानें, बेतापुरतं घ्यावयाचें होते हें स्पष्ट आहे. हे एक सर्वांगसुंदर महाकाव्य तयार करण्याच्या दृष्टीने कल्हणाने या ग्रंथांतील विषयांचे निरीक्षण व प्रतिपादन केले आहे. महाकाव्यांत वैचित्र्य आणण्यासाठीं अलंकारशास्त्राच्या नियमानुसार ठराविक दृष्टांत. उपमा, उत्प्रेक्षा, वगैरे अलंकार आणि निरनिराळे ऋतु व नैसर्गिक देखावे, इत्यादिकांची लांबलचक वर्णनें मधून मधून घालावी लागतात. दुसऱ्या महाकाव्याच्या मानाने या राजतरंगिणीमध्यें हा प्रकार बराच कमी आहे. तिच्यांतील वर्णनें सोपी. सरळ व उचित अशी आहेत. पण या गोष्टी कल्हणानें काव्यालंकारात्मक दृष्टीचा त्याग करून किंवा त्याला तसली अलंकारिक वर्णने करतां येत नव्हतीं म्हणून. केलेल्या नव्हत्या. या ग्रंथांत महाकाव्याला शोभणारी रचना पुष्कळ प्रसंगीं व स्थळीं आढळते. तसेच उत्तम अलंकारिक वर्णन करतां येण्यासाठीं अनेक जागा बरेच विषयांतरहि केलेलें आहे. तरी हर्षचरित व विक्रमांकदेवचरित वगैरेंच्या मानानें असले प्रकार या काव्यांत पुष्कळ कमी आहेत.

हें काव्य लांबलचक झालें असल्याचा कल्हणानें स्वतःच उल्लेख केलेला आहे.

अलंकारशास्त्राच्या नियमाअन्वयें सर्व काव्यांत किंवा त्याच्या मुख्य मुख्य भागांत कोणचा तरी एकादा रस प्रधान असावा लागतो. या काव्यात शांतरस प्रधान आहे. याचे कारण सर्व मानवी कृति व व्यवहार यांची अनित्यता होय, असें कल्हणानें लिहिले आहे. त्याच रसाचें व विषयाचें सर्व ग्रंथांत अनेक रीतीने विवरण केलें आहे. या रसाच्या परिपोषासाठींच कल्हणानें धार्मिक व सन्यासवृत्तीनें अखेरी साधणाऱ्या किंवा ज्याचा शेवट करुणरसपूर्ण झाला, अशा राजाच्या कारकीर्दीचें वर्णन विशेष विस्तृत केले आहे. या काव्याचे आठ तरंग आहेत. त्यांपैकीं चार तरंगांमध्ये हा प्रकार दिसून येतो, तो केवळ सहजासहजीं असेल, असे म्हणता येत नाहीं. तो त्याने बुद्ध्या केलेला असावा.

या ग्रथातील नीतिपर व बोधपर भागांकडे तरी याच शांतरस परिपोषाच्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे. जगांतील सर्व वैभवाची अस्थिरता, प्रताप व राज्यवैभव, यांची अनित्यता, आणि नैतिक नियमांचा अतिक्रम झाला तर अवश्य भोगावे लागणारे दुष्परिणाम, यांचा वाचकांच्या मनाकर योग्य ठसा उमटविण्याची योग्य संधि, शक्य-तेथवर कल्हणानें, वाया दवडलेली नाहीं. काश्मीरच्या इतिहासांतील समकालीन किंवा थोड्या वर्षांच्या पूर्वीच्या इतिहासांतील आढळून आलेली पुष्कळशी उदाहरणे, त्याने या कामी उपयोगांत आणलीं आहेत. तसेंच त्याने राजनीति व कारस्थाने या विष-यींच्या गोष्टी व निरनिराळ्या व्यक्तींच्या विविध कृति, त्यांच्या संबंधानें धर्मशास्त्र व नीतिशास्त्र, यांच्या अनुरोधानें विचार व चर्चा केली आहे, ती तरी याच हेतूनें.

## कल्हणाचे आधारभूत ग्रंथ.

इतिहासाचे खरें महत्व कल्हणाला कळलेले होते. इतिहासकाराच्या अंगीं न्यायाधीशाप्रमाणें निःपक्षपात दृष्टि असली पाहिजे व त्यानें गत गोष्टींसंबंधीं आवड नावड दाखवितां कामा नये, असे त्यानें स्वतःच म्हटलें आहे, शिवाय त्याने आपल्या काव्याला ज्या ज्या ग्रंथांचा आधार घेतला आहे, त्याचा नामनिर्देश त्याने प्राजल-पणें केलेला आहे. यावरूनहि त्याच्या निःपक्षपातीपणाची साक्ष पटते.

त्याच्या लेखावरून, त्याच्या वेळी पूर्वीच्या ग्रंथकारांनी काश्मीरच्या इतिहासा-वर लिहिलेले पुष्कळसे विस्तृत ग्रंथ उपलब्ध होते, असे दिसते. अशा स्थितींत त्याला हा नवीन ग्रंथ लिहिण्याची अवश्यकता काय होती, हे स्पष्ट करण्यासाठीं त्याने त्या ग्रंथांचें त्रोटक गुणदोषविवेचन केलें आहे. ते महत्वाचें आहे. त्यावरून ते ग्रंथ पुरे व संपूर्ण नसून त्यांच्यावरून सुव्रत नांवाच्या ग्रंथकारानें संक्षिप्त इतिहास तयार केला होता.

कल्हणाने विशिष्ट प्रसंगांना अनुसरून महाभारत व रामायण यांच्यांतील दाखले देऊन, आपले विचार प्रगट करतांना योग्य सुभाषिते व वचने किती तरी दिलीं

आहेत ! हा तरी त्यानें या दोन्ही प्रचंड ग्रंथांचें सूक्ष्म परिशीलन केलें होतें त्याचाच परिणाम असावा, किंवा त्यानें ज्या प्राचीन ग्रंथांच्या आधारानें आपलें हें काव्य रचिलें त्यांतूनच त्यानें हे उतारे घेतले, हें निश्चयानें सांगतां येणें कठिण आहे. कारण, ते प्राचीन ग्रंथ हल्लीं उपलब्ध नाहींत. यामुळें तें नष्ट झालें, असें तो म्हणतो. संकलित रूप दिलें गेल्यानें मूळ विस्तृत ग्रंथाचा लोप झालेला इकडे नेहमीं आढळतो सुव्रताचा हा ग्रंथ ठराविक काव्यपद्धतीचा व अस्थळीं विद्वत्ताप्रचुर असल्यानें, तो कंटाळवाणा झाला होता, असेंहि कल्हणानें म्हटलें आहे.

काश्मीरच्या राजांच्या इतिहासाचे अकरा ग्रंथ, व शिवाय नीलमत पुराण, कल्हणाने लक्ष्यपूर्वक पाहिलें होतें. नीलमतपुराण उपलब्ध आहे. त्यांतून त्यानें कांहीं राजाचीं नावे घेतलीं आहेत. बाकीच्या पैकी फक्त तीन ग्रंथकारांचीं नांवें उपलब्ध आहेत. त्यांतून क्षेमेंद्राची नृपावली बरीच प्रसिद्ध व लोकप्रिय होती असें दिसतें. कारण येथपर्यंत सुव्रताच्या ग्रंथानंतर कल्हणानें तिचाच उल्लेख केला आहे. पण ती बऱ्यांतली असली तरी, तिच्यांत, शक्य तितकी काळजी कवीनें घेतली नाहीं, यामुळे तिच्या प्रत्येक भागांत चुका झाल्या आहेत, असें कल्हणानें म्हटलें आहे. क्षेमेंद्र हा काश्मीरी कवि व पंडित कल्हणापूर्वी सुमारें शें सव्वाशें वर्षें होऊन गेला. त्याचे पुष्कळ ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांच्यावरून तो स्वतंत्र ग्रंथलेखक किंवा चतुर व विद्वान होता, असेंच कांहीं म्हणतां येत नाहीं. त्यानें इतर ग्रंथातून संग्रह केलेले आहेत, तेव्हां त्याच्या ग्रंथाविषयींचें कल्हणाचें मत गैर नव्हते, असें म्हणतां येईल. तरी ही नृपावली नष्ट झाली, ही एकतऱ्हेनें हानीच झाली आहे. पद्ममिहिर व छविल्लाकर या आणखी दोन पूर्वीच्या ग्रंथकारांचाहि कल्हणानें उल्लेख केला आहे. पद्ममिहिराच्या ग्रंथावरून त्यानें लव वगैरे आठ राजांचीं नावें घेतली आहेत. ती पद्ममिहिरानें पाशुपत यती हेलाराजकृत पार्थिवावलीवरून घेतली होती. या ग्रंथात बारा हजार श्लोक होते. पण तो कल्हणानें पाहिल्याचें दिसत नाहीं. छविल्लाकराच्या ग्रंथांतून त्यानें अशोक वगैरे कांहीं राजांची नांवें घेतलीं आहेत त्या ग्रंथांतून त्याने एक उताराहि दिला आहे. तेव्हां तो त्यानें पाहिला होता, हें सिद्ध आहे.

यापूर्वीच्या ग्रंथांचीं नांवें व ते ज्या गोष्टींसाठीं आधाराला घेतले होते, त्यावरून त्यांच्यांत, काश्मीरचा आमूल इतिहास देण्याचा यत्न केला होता, असें स्पष्ट दिसतें. तीच स्थिति कल्हणानें पाहिलेल्या अकराहि ग्रंथांची होती, असें मानतां येईल. त्या त्या ग्रंथकारांनी आपापल्या समकालीन राजांचा वृत्तांत लिहिला होता. तीच हकीकत पुढें चालवून तिची पूर्तता करणें कल्हणाला प्रशस्त वाटलें नाही. यावरून त्या ग्रंथकारांनी साग्र इतिहास लिहिलेला नसून. नुसती स्वतःपर्यंतची पूर्तता केली होती. हाच प्रकार जोनराज, श्रीवर व प्राज्यभट, यांच्या उपलब्ध ग्रंथांचा आहे. तशा ग्रंथांविषयीं कल्हणानें कांहींसा तिरस्कारच दाखविलेला आहे. तरी त्या

लोकांनीं आपल्या वेळच्या परिस्थितीचें यथावत वर्णन केलेलें जशाचें तसें आज उपलब्ध असतें तर, त्यांची काव्यदृष्ट्या योग्यता कशीहि असली तरी, त्यांचा कितीतरी उपयोग झाला असता.

वरील ग्रंथांच्या मानानें आपण त्याच्यांत खंड पडलेले भरून काढून साग्र इतिहास देत आहों, असे कल्हणानें म्हटलें आहे. याच्यासाठीं कल्हणानें पूर्वीच्या ग्रंथाशिवाय मंदिरादिकांतील शिलालेख, ताम्रपट, सनदा, वगैरेचाहि उपयोग केला आहे. यावरून तो विद्वान, कवि व पंडित असून शिवाय, पुराणवस्तुसंशोधकहि होता, हे उघड आहे. या तऱ्हेचें हें एकच याचे अभिनंदनीय उदाहरण आहे. या साधनांचा कल्हणानें उपयोग केल्याचे दाखले या ग्रंथांत जागजागीं स्पष्ट आढळतात. निरनिराळ्या लोकांनीं मंदिरें बांधविणें, मूर्ति स्थापविणे व दुसरीं धार्मिक कृत्यें करणे, यांच्या तारखा व तपशील त्यानें दिला आहे. तो निःसंशय अशाच साधनांवरून होय. अग्रहारादिकांची माहिती तद्विषयक ताम्रपट व शासनपत्रे पाहूनच दिलेली दिसते. प्राचीन प्रशस्त्या व निरनिराळ्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती आणि जुनीं नाणीं, यांच्यावरून मिळणाऱ्या माहितीचाहि त्याने उपयोग केला आहे. दुसऱ्याहि अनेक प्राचीन वस्तु पाहून त्यानें त्यांच्याबद्दल चौकशीपूर्वक माहिती मिळविलेली दिसते. सरकारी कचेऱ्या, कारखाने व कामें याचाहि त्याने परिश्रमपूर्वक तपास करून माहिती दिली आहे.

त्याने आपल्या वेळच्या चालू दंतकथा दिल्या आहेत, त्यांना कांहीं पूर्वीचा लेखी आधार होता किंवा त्या आधाराचा त्याने उपयोग केला, असे दिसत नाहीं. ऐतिहासिकदृष्ट्या त्या दंतकथांचे विशेष महत्त्व नाहीं. पण हल्लीं देखील काश्मीरात प्रचलित असलेल्या दंतकथांचे प्राचीनरूप कळण्याला त्यांचा उपयोग होतो. त्यानें स्वतः किंवा ज्या ग्रंथांचा आधार घेतला त्यांच्या कर्त्यांनीं मान्य केलेल्या अशा कांहीं दंतकथांचाहि त्याने उल्लेख केलेला आहे.

स्वतःच्या वेळच्या काश्मीरच्या इतिहासासंबंधे कल्हणाने जी तपशीलवार माहिती दिलेली आहे, ती स्वतःच मिळविलेली किंवा बरोबरीच्या लोकांनीं सांगितलेली असल्यामुळेच, आठव्या तरंगांतील पाल्हाळिक वर्णनाचे महत्त्व आहे. सं. ११२१ त सुस्सल पुनः राजा झाला त्या संबंधीं एका प्रसंगाचे वर्णन त्यानें समक्ष पाहून दिलेले आहे. तत्पूर्वीच्या काळांतील कांहीं माहितीहि त्यानें तशीच दिली आहे. सं. १०८९ ते ११०१ पर्यंतच्या हर्ष राजाच्या कारकीर्दीत कल्हणाचा पिता चंपक हा एक प्रमुख मंत्री असून त्याचे बऱ्याच राजकारणात अंग होते. त्याच्या कडूनच कल्हणाला हर्षाची कारकीर्द व त्याचा हृदयद्रावक मृत्यु, यांविषयीं माहिती मिळाली असावी. सं. १०९५ त तन्वंगाच्या नातवाचा वध झाला, तो प्रत्यक्ष पाहिलेले लोक कल्हणानें हा ग्रंथ लिहिला त्यावेळीं जिवत असल्याचा व त्यांनीं कळविलेल्या हकीकतांचा उल्लेख केलेला आहे. इतरत्रहि त्याने हर्षाच्या वेळचे लोक जिवंत असल्याचे

लिहिलें आहे. तत्पूर्वीची माहिती त्याला कुलपरंपरागत कथांवरूनहि मिळाली असावी. तरंग ६ श्लोक १३५ मध्यें अशा एका कल्हणाच्या पूर्वी दोनशें वर्षे घडलेल्या, प्रसंगाचें वर्णन आहे.

## कल्हणाच्या चौकसपणाच्या मर्यादा.

येथवर वर्णिलेल्या व विचार केलेल्या साधनांचा कल्हणानें कसा काय उपयोग केला ते पाहून, त्याच्यावरून त्याची इतिहासकार या नात्यानें योग्यता ठरविण्यांत प्रथमच अशी अडचण येते कीं, त्यानें त्या साधनांची सापेक्ष योग्यता व महत्त्व, याचा विचार व विवेचन मुळींच केलेलें नाहीं. किंवा कोणच्या साधनाचा काय, कशासाठीं व कितपत, उपयोग केला, याचें त्यानें दिग्दर्शन केलेलें नाहीं. पूर्वीचे लेख व ग्रंथ यांच्यातील दोषांमुळें पडलेल्या त्रासाचा त्यानें उल्लेख केला आहे. तसेंच उपलब्ध दंतकथा, मधून मधून खंडित असल्याचें आणि राजे लोकांचा काळ व स्थळविषयक गडबडीचा निर्णय करण्याला आपला ग्रंथ चांगला उपयोगी होईल, असेंही त्यानें लिहिलें आहे. पण एक दोन स्थळांशिवाय त्यानें आपल्या या म्हण-ण्याला स्पष्ट आधार दिलेला नाहीं. त्यानें जे प्राचीन ग्रंथ उपयोगांत आणले, त्यांपैकीं एकहि हल्लीं उपलब्ध नाहीं. यामुळें आपणाला त्यांच्याशीं तुलना करण्याला मार्ग नाहीं. जे शिलालेख, जुनीं नाणी व परस्थ फिरस्त्यांचे लेख, त्यानें उपयोगांत आणले असावेत, तेहि आता दुर्मीळ आहेत. सबब कल्हणाची इतिहासकार या नात्यानें योग्यता, त्याच्या ग्रंथांतील अंतस्थ प्रमाणावरूनच ठरविली पाहिजे.

त्यानें आधारभूत मानलेल्या ग्रंथांपैकीं एकहि ग्रंथ त्याच्यापूर्वी ३०० वर्षांपेक्षां अधिक प्राचीन नाहीं. बहुतेक तर याहूनही अलीकडचेच आहेत. पांचव्या तरंगांत वर्णिलेला कथाभाग इ. स. नवव्या शतकाच्या मध्यभागात घडलेला असून, तद्वि-षयक समकालीन लेख मिळण्याला प्रारंभ होतो. तत्पूर्वीचा बहुतेक कथाभाग, पौरा-णिक दंतकथात्मक आहे. तरी या दोन भागांमध्यें, ऐतिहासिक दृष्ट्या असलेल्या ठळक फरकांची कल्हणाला मुळींच जागीव नव्हती. पहिल्या तीन तरंगांतील राजांचे वंश व नांवें, यांच्या यादी आणि अलीकडलि बऱ्याच विश्वसनीय मानतां येण्या-जोग्या कारकीर्दीतील तपशीलवार कथा, या त्यानें सारख्याच विश्वासानें व खात्री-पूर्वक वर्णिल्या आहेत. पूर्वीच्या ग्रंथातील दोष व खंड, याचें दिग्दर्शन कोठेंच नसून त्याचें निरसन व पूर्तता, कोणच्या आधारावर केली, याचा कांहीच खुलासा केलेला नाहीं. कथातील पाठभेद क्वचितच दिलेले आहेत, तेहि लौकिक प्रचलित दंतकथाच्या स्वरूपाचे. त्यांतून खऱ्या खोट्याचा निर्णय करण्याचा त्यानें यत्न केलेला नाहीं. मत-भेद देऊन, ते खोडून काढल्याचीं दोनच उदाहरणें, तरंग २ श्लोक ६ आणि तरंग ६ श्लोक १०८ मध्यें आहेत. त्यानें दिलेल्या दंतकथा व अद्भुत गोष्टी, यांच्या खरे-पणाविषयीं त्याचा पूर्ण विश्वास होता, असें स्पष्ट दिसतें. असंभाव्यपणा, अतिशयोक्ति व अंधश्रद्धेचे प्रकार, याचें परंपराप्राप्त दंतकथांमध्यें नेहमीं प्राचुर्य असावयाचेंच. पण

त्याच्या विषयीं किंचितही विवेचकपणा किंवा शंका मनांत न आणतां, त्यानें त्या जशाच्या तशा दिल्या आहेत. आपल्या वेळीं अशा कथांवर विश्वास न ठेवणारे लोक असून, ते मेघवाहन वगैरे प्राचीन राजांच्या अलौकिक कृत्यांच्या उपलब्ध वर्णनावर भरंवसा ठेवीत नाहींत, असें त्यानें तरंग ७ श्लोक ११३७ मध्यें म्हटलें आहे. त्यावरून त्याचा स्वतःचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास होता, हें उघड आहे. हर्ष राजाच्या वेडगळ कृत्यांचें त्यानें केलेलें वर्णन, कांहीं श्रद्धाहीन लोकांना, प्राचीन राजांच्या अलौकिक वर्णनाप्रमाणेंच अविश्वसनीय वाटेल, असें त्यानें म्हटलें आहे. त्यावरून त्याला ती दोन्हीं सारखींच खरीं वाटत होतीं, हें स्पष्ट आहे.

तेव्हां कल्हणाच्या अंगीं ऐतिहासिक दृष्टीला अवश्यक असा विवेचकपणा नव्हता, हें सिद्ध होतें. तो स्वतः इतका श्रद्धाळू असल्यामुळें मिळालेले आधार त्यानें चौकसपणाने उपयोगांत आणले असणें संभवत नाहीं. यामुळें त्याच्या ग्रंथाला येणारा दोष व त्यांतील उणीवी त्याच्याच माथीं मात्र मारतां येत नाहींत. अलीकडील विवेचकपद्धतीचें इतिहासलेखन, पाश्चिमात्य देशांतसुद्धां नवीनच प्रचारांत आलें आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ती पद्धत त्याच्या पूर्वींच्या लेखकांच्या स्वप्नांत सुद्धां आली नसावी. उलट, पूर्वींच्या ग्रंथांच्या असमाधानकारक स्थितीचे, अशा तऱ्हेनें नांवें ठेवण्याजोगे भाग व त्यांच्यांतलि ऐतिहासिक महत्त्वाचा अभाव, हेंच निदर्शक होत.

सहाव्या शतकाच्या पूर्वींच्या दिलेल्या हकीगतीवरून, फक्त पूर्वींच्या राजघराण्यांतील राजाच्या नांवनिशा, आणि त्यांतील कांहीं राजांविषयीं नुसती दंतकथात्मक माहिती, तेव्हढी मिळते. ती अधिक विश्वसनीय नाहीं, याचा दोष कांहीं कल्हणाकडे नाहीं. त्याला हे तुटपुंजे लेख व आधारच मिळाले होते. त्यांतील खऱ्या ऐतिहासिक महत्त्वाचा भाग परंपरागत ग्रंथकारांच्या हातून पुढें न निघतां लुप्त झाला होता. प्रत्येक ग्रंथकार अनवश्यक वाटलेला ऐतिहासिक तपशीलवार खरा मजकूर गाळून, प्रचलित व लोकांना रुचणाऱ्या दंतकथांचा मात्र संग्रह करीत गेला. त्याच्यात त्याने शक्यतितकी अधिक भर टाकली. कल्हणापूर्वींच्या ग्रंथांमध्यें हें कसें होत गेलें तें शोधून काढण्याचा मार्ग नाहीं, पण तो काश्मीरच्या इतिहासाच्या पुढील पुरवणीच्या कल्हणाच्या ग्रंथाला धरूनच लिहिलेल्या भागांमध्यें स्पष्टपणें दाखवितां येतो. फारसी तवारिखी व अबुल फजलकृत राजतरंगिणीचा गोषवारा, यांच्यांत, कल्हणानें दिलेल्या राजघराणी व राजे याच्या यादी, बहुतेक तशाच दिल्या आहेत, हें खरें. पण तपशीलवार हकीकतीपैकीं अद्भुत व अलौकिक गोष्टींचाच उल्लेख केलेला आहे. अबुल फजल याला राजतरंगिणीच्या शेवटच्या तीन तरंगांतील म्हणजे सुमारें दोन तृतीयांश ग्रंथांतील कारकीर्दीच्या वर्णनांपैकीं, फक्त ती यशस्कर राजाच्या न्यायनिर्णयचातुर्याची गोष्ट तेव्हडीच संग्राह्य वाटली आहे. हैदर मलिक यानें प्राचीन राजांच्या संबंधांतील अद्भुत कथा तेव्हढ्या दिल्या आहेत व त्यांच्यांत पुष्कळशा

तसलीच भरहि टाकली आहे. पण कल्हणानें लोहर येथलि राजघराण्याचा दिलेला तपशीलवार इतिहास त्यानें कसाबसा थोडक्याशा पानात आटपला आहे.

कल्हणाच्या कथेला अधिकाधिक महत्व येतें तसतसें पुढील ग्रंथकारांनीं घेत-लेले उतारे संकुचित, मर्यादित व त्रोटक होत जातात. पण स्वतःच्या जवळच्या किंवा समकालीन ऐतिहासिक विषय व गोष्टी मोठ्या उत्साहानें मुसलमानी तवारीखींचा उपयोग करून आणि कथासंदर्भ जास्त विश्वासनीय व तपशीलवार देऊं लागतात. अशा तऱ्हेनें या पुढील कैफियतींचे शेवटचे भाग ऐतिहासिक माहितीच्या संबंधानें अधिक उपयोगी होतात.

हाच प्रकार कल्हणापूर्वींच्या संस्कृत ग्रंथांच्या संबंधांत पूर्वी अनेक वेळ झाला असला पाहिजे. त्यानें स्वत: हा प्रकार केलेला, त्यांच्यांतील प्रारंभींच्या व पुढील भागाच्या विस्तारावरूनहि, स्पष्ट दिसतो. त्या दोन्हींमध्यें विस्ताराच्या मानानें किती तरी फरक आहे. यासंबंधीं कल्हणाच्या मनाचा कल कसा होता तें कळण्याला हिंदी ग्रंथकर्त्यांची विचारसरणी थोडी तरी लक्षात आणणें अवश्य आहे.

या लोकांना पौराणिक दंतकथा व खऱ्या इतिहासातील कथा, यांतील भेदाची स्पष्ट कल्पनाच नसते. अलीकडील पंडित व त्याचेच प्राचीन पूर्वज, दोघेही पौराणिक कथानकें आणि अलीकडे प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींचा इतिहास, दोन्ही सारखेच खरें मानतात. त्यांना पौराणिक दंतकथाच अधिक अवगत असून आवडतात. त्यांतच त्याचें मन जास्त रमलेलें असतें. त्यांच्यांतील असंभवनीयता व अतिशयोक्ती, यांवि-षयीं त्यांना कधींच शंका येत नाहीं. उलट हा प्रकार त्यांच्यांत जितका जास्त तितक्या त्या त्यांना अधिक विश्वसनीय वाटतात व पटतात. कारण त्यांच्यावरून त्याच्या पूर्वकालीन जास्त सुखाच्या व चांगल्या युगाच्या त्यांच्या मनांतील कल्पनेला पुष्टी मिळते. धार्मिक कल्पनातरंगानी भरलेलीं व वीररसपोषक कादंबरीवजा कथा-नकें या विद्वान मंडळीला यथार्थ व खरा घडल्यासारखी वाटतात.

घडलेल्या गोष्टी व त्यांचे सामान्य जनतेच्या मनावर उमटले ठसें, याच्यामध्ये निवड करण्याला व दंतकथा आणि ऐतिहासिक गोष्टी यांची छान करण्याला, मनाची वृत्ती संशयात्मक असावी लागते. तशी वृत्ती या लोकांची क्वचितच असते. तसेंच या ग्रंथाकडे ऐतिहासिक दृष्टीनें पाहिल्यानें जो फरक पडतो, तो त्यांना कळण्याचा संभव याहून कमी आहे. कथानक जितकें जास्त जुनें तितकें तें पौराणिक काळाशीं जास्ती मिळते, अशी त्यांची समजूत असते.

या विवेचनावरून कल्हणाच्या कथेंतील बऱ्याच विशेष तऱ्हाचा उमज पडून त्यानें पूर्वींच्या कांहीं कारकीर्दीतील पहिल्या गोनंद राजाचा भारतीं युद्धाशीं संबंध आणि ललितादित्य व जयापीड वगैरे त्या मानानें बऱ्याच अलीक-डील राजांसंबंधीं प्रचलित दंतकथा वगैरे अद्भुत गोष्टींवर जी अंधश्रद्धा ठेवली

आहे, तिचा खुलासा होतो. हाच प्रकार पुढील ऐतिहासिक गोष्टींच्या वर्णनांतहि दिसून आला तर फारसें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

यांमुळे झालेली अडचण इकडील बहुतेक ऐतिहासिक लेखांना लागू आहे. शिवाय कल्हणाची जन्मभूमी काश्मीर मंडळ यालाच लागू असणाऱ्या दुसऱ्याहि अडचणी आहेत. काश्मीराभोंवतालीं उंच पर्वत असल्यानें तेथील लोकांचा अगदीं अलीकडील काळापर्यंत हिंदुस्थानांतील लोकांशी बहुतेक संबंध नव्हता म्हटलें तरी चालेल. त्यामुळें होणारा परिणाम कल्हणाच्या काव्यांतहि स्पष्ट दिसतो आहे. काश्मीर किंवा शारदामंडळ यांच्याभोंवती जो भक्कम पहाडाचा कोट आहे त्याच्यामुळें त्याला फार वर्षे परचक्राची भीती नसून, एक तऱ्हेचा ऐतिहासिक विशिष्टपणा प्राप्त झाला होता. हें मंडळ प्रबल व सुप्रसिद्ध परकी सार्वभौमांच्या सत्ते-खालीं असताना देखील त्या विशिष्टपणावर कांहीं चिरकालीन परिणाम घडला नाहीं. म्हणून त्याच्या इतिहासाला स्वतंत्र व स्थिर असे स्थानिक स्वरूप येऊन ऐति-हासिक दंतकथा कायम राहाण्याला जागा झाली. कल्हणाच्या कथेंत जी खरी व विश्वसनीय माहिती आढळते तिचें कारण तरी हेंच. एका मर्यादित व लहानशा पहाडी प्रदेशाचा त्यानें इतिहास लिहिला. त्याला त्या प्रदेशाची तपशील-वार माहिती मिळविणें सोपें होतें. त्यावरूनच. कल्हणानें तेथील लोक, त्याच्या चालीरीती व हवापाणी, इत्यादिकांसंबंधीं तपशीलवार व यथास्थित माहिती दिलेली इतकी महत्वाची झाली आहे. पण या बरोबरच त्या ग्रंथांत तदनुषंगिक थोडेसे दोषहि घुसलेले आहेत.

काश्मीरमंडळ इतर देशविभागापासून तुटक व मर्यादित आहे. यामुळें तेथील लोकांची भूगोलविषयक दृष्टी व विचारहि तसेच कूपमण्डूकवत झालेले आहेत. पूर्वी सरहद्दीवर कडक नाकेबंदी असे. त्या वेळच्या हिंदी अमलांत हा संकुचितपणा अधि-कच असल्याने, त्या लोकांना काश्मीराबाहेरच्या हिंदुस्थानाशी असलेल्या त्यांच्या संबंधाचें महत्त्व योग्य प्रमाणांत लक्षांत येणे कठिण पडत असे व यामुळेंच मोंगल बादशाहीचा अंमल हिंदुस्थानांत सर्वत्र झाला त्याचें कारण त्यांचा काश्मीरावर अंमल होता यामुळेंच, अशी त्या लोकांची उलटी समजूत झालेली होती. त्याचें बाह्य सृष्टीचें व परिस्थितीचें ज्ञानच तितकें मर्यादित होतें. याचा परिणाम कल्ह-णाच्या कथेवर झालेला आहे. पूर्वी काश्मीरांत अनेक वेळां परकी अंमल झाला होता, त्याचें फारसें महत्त्व वाटून त्याचें वर्णन त्यानें केलेलें नाहीं. काश्मीरच्या राजांनीं ई० सनाच्या आठव्या शतकापर्यंत बाहेर मोठमोठे दिग्विजय खरेच केले, असे समजून कल्हणानें त्या दिग्विजयाचें रसभरित वर्णन केलें आहे. वास्तविकपणें कल्हणाच्या ऐतिहासिक दृष्टीची पोंच काश्मीराभोंवतालच्या पर्वतांच्या कड्याबाहेरील लहान सहान संस्थानांनीं मर्यादित व संकुचित आहे. त्यांतहि उत्तरेकडील अशा संस्थांना-विषयींची त्याची व त्याने आधारभूत धरलेल्या ग्रंथांची माहिती त्रोटक व कच्ची

होती. काश्मीराशेजारीं ब्र्याच क्रांत्या घडून आल्या, त्यांच्या संबंधानें कल्हणानें कोठें विशेष उल्लेख केलेला नाहीं याबद्दल या विषयावर पूर्वी अनेक आधुनिक लेखकांनी लेख लिहिले आहेत, त्याच्यांत आश्चर्य प्रदर्शित केलें आहे. पण वरील विवेचनावरून याचें कारण उघड होतें.

याशिवाय कल्हणाच्या कथेंत ऐतिहासिक गोष्टींमध्यें अद्भुत प्रकार व जादु-टोणा इत्यादिकांचा संबंध आलेला आहे, तो तरी यामुळेंच होय. हिंदुस्थानांतील इतर लोकांच्या मानानें काश्मीरांतील लोक अधिक धर्मभोळे आहेत व त्यांच्या मनावर नाना तऱ्हेच्या धर्मभोळ्या कल्पनांचा फारच पगडा असतो, अशाविषयीं ब्र्याच प्राचीन काळापासून उल्लेख आढळून येतात. जादूटोण्याचे प्रकार तेंथें पुष्क-ळच मोठ्या प्रमाणात जारी होते, असें कल्हणाच्या कथेवरून स्पष्ट आहे. अनेक राजे जादूटोण्याच्या प्रयोगानें मारले गेले, असें त्यानें वर्णन केले आहे, तें त्याचा स्वतःचा जादूटोण्यावर विश्वास होता म्हणूनच. शिवाय त्यानें वर्णन केलेल्या ऐतिहासिक भागांत अद्भुत प्रकाराचेही त्यानें विश्वासपूर्वकच उल्लेख केलेले आहेत.

राजतरंगिणीची खरी ऐतिहासिक योग्यता ठरविण्याला तिच्यांतील कालगण-नेचाही विचार केला पाहिजे. त्याविषयीं ब्र्याच अडचणीचे प्रश्न पुढें येतात. पहिल्या तीन तरंगातील म्हणजे ईसवी सनाच्या सातव्या शतकाच्या प्रारंभापर्यंतची त्याची काल-गणना अगदींच कृत्रिम आहे. तिला विश्वसनीय स्वरूप देण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला आहे. हा प्रकार मूळ कसा घडला व त्याच्यांत कल्हणाचें कर्तृत्व व जबाबदारी कितपत आहे, हें कळण्याला आता मार्ग नाहीं. युधिष्ठिराच्या राज्याभिषेकाचा मानीव व कृत्रिम काल, त्यानें खरा धरला आहे व एका राजानें—रणादित्यानें—तीनशें वर्षें राज्य केलें, असेंही मानलें आहे. तेव्हां अशा ग्रंथकारानें या कामात योग्य विचिकित्सा केली आहे, असें क्वचितच म्हणतां येईल. त्याच्या या चुकीचें कारण केवळ त्याचा स्वतःचाच स्वभावदोष मानतां येत नाहीं. तें कारण अधिक व्यापक तऱ्हेचें आहे. हिंदू लोकांचा स्वभाव ज्याला सूक्ष्म रीतीनें अवगत होता अशा अल्बिरुनीच्याहि लक्षात तें कारण येऊन चुकलें होतें. तो म्हणतो कीं, ' हिंदू लोक ऐतिहासिक परं-परेकडे लक्ष देत नाहींत, ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. राजे लोकांची खरी विश्वसनीय परंपरा देण्याकडे त्यांची प्रवृत्तीच असत नाहीं. शिवाय याविषयीं त्यांची कसून तपासणी करूं लागतांच ते निवळ थापा मारीत सुटतात. ' हें त्याचें म्हणणें राजतरंगिणीतील प्रारंभाच्या भागांत दिलेल्या कालगणनेच्या बाबतींत पुष्कळ अंशानें खरें आहे, असें निदर्शनास येतें. पण मूळच्या त्रोटक व अविश्वसनीय दंतकथांतील कालगणनेला कल्हणानेंच असें हें बाह्यतः विश्वसनीय रूप दिले, असें मात्र नव्हे.

### कल्हणाची कथा सांगण्याची तऱ्हा व योग्यता,

कल्हणाच्या ग्रंथांतील उणीवी अशा तऱ्हेच्या होत्या. पण त्याच्या ग्रंथाचे

मुख्य व विशेष गुण म्हणजे त्याच्यांत दिसून येणारी सत्यनिष्ठा व निःपक्षपात, हे होत. ते गुण चांगले वाखाणण्यासारखेहि आहेत.

स्वसमकालीन व्यक्ती व त्याच्या संबंधाच्या गोष्टी, याच्याबद्दलचे कल्हणानें स्वतंत्रपणे दिलेले विचार व मतें याविषयीं मागे थोडे बहुत लिहिलेच आहे. आपल्या वेळच्या राजाच्या अंगचे गुणदोष व त्यानीं केलेल्या चुका, यांचे वर्णन व विवेचन करण्यांत त्याने डोळेझाक मुळीच केलेली नाहीं. तसेच त्यावेळीं जबाबदारीच्या कामावर असलेल्या मन्त्र्यांच्या वर्तनावर त्याने जे कोरडे ओढले आहेत, त्यावरून पाहता, आपला ग्रंथ आपल्या हयातींतच प्रसिद्ध करण्याची त्याची इच्छा होती किंवा कसें, याबद्दल शंकाच वाटते. त्याच्यापासून विशेष पूर्वीचा नव्हे, अशा काळाबद्दल लिहिता-नाहि त्याने तितकाच निःपक्षपात दाखविला आहे. जयसिंह राजाचा पिता व चुलता आणि त्यांना विशेष भीती वाटण्याजोगा त्याचा प्रतिस्पर्धी भिक्षाचर याची त्याने जी शब्द चित्रें काढली आहेत, त्याच्यांत त्यांच्या बऱ्या वाईट गुणांचे प्रदर्शन स्पष्टपणे व यथोचित अशा रंगांत केलेलें आहे.

हर्ष राजाच्या कारकिर्दीचे त्यानें तपशीलवार वर्णन दिलें आहे त्याच्यावरून तरी हेंच स्पष्ट होतें. त्या राजाची कृपा व आश्रय यामुळें कल्हणाच्या कुलाची वृद्धी झालेली. यामुळे त्याला तो राजा आवडणें व त्याच्याविषयीं त्याला आदर वाटणे योग्यच होते. तरी त्या राजाच्या त्याच्या राज्याच्या पुरत्या नाशाला कारण झालेले त्याच्या अंगचे दुर्गुण व दुर्वर्तन ह्याच्याविषयीं कल्हणानें मोकळेपणी व तपशीलवार टीका करण्यात मुळीच बाकी ठेवलेली नाहीं. हर्षाच्या शोचनीय व हृदयद्रावक अंताचें त्यानें जें कळकळीचें व चटकदार वर्णन केलें आहे, त्यांच्यांत त्याच्या करुण मनोवृत्तींना ऊत आलेला दिसतो. तरीसुद्धा त्याने या काश्मीरच्या वेनसदृश राजाला भोगावे लागलेले दुर्भाग्य अगदीं योग्य व न्याय्य होते, असें आपल्या वर्णनाने वाचकाच्या मनावर ठसविण्यांत अगदीं कसर ठेवली नाहीं.

इतिहासकाराच्या अंगच्या सत्यवादितेवरून त्याच्या योग्य विवेचकपणाची साक्ष पटते. आपल्या वेळच्या इतिहाससंबंधानें कल्हणानें योग्य निःपक्षपात दाखविण्याचा उघड उघड यत्न केला आहे. त्यावरून पूर्वीच्या इतिहासाच्या बाबतींतहि त्यानें तसेंच केलें असावें, असें मानण्याला हरकत नाहीं.

ऐतिहासिक गोष्टींचे आधार चांगले व विपुल मिळाले तेथे कल्हणानें त्याचा नीट उपयोग करून त्याच्यावरुन विशिष्ट व्यक्तींची वर्णनात्मक, विश्वसनीय व वाचनीय कथानकें दिली आहेत. तुंग, अनंत, हर्ष, सुस्सल इत्यादि राजांचीं त्यानें दिलेलीं वर्णनें, यांची त्याच नमून्याच्या इतर काव्यांतील व ऐतिहासिक चरित्रांतील सामान्य वर्णनाशीं तुलना करून पाहतां ही गोष्ट स्पष्ट दिसून

येते. बाण व बिल्हण यांच्या कथाहि ऐतिहासिक गोष्टींच्या वर्णनपर आहेत. पण त्याच्यांत त्यांनीं आपल्या कथेतील नायक धुवट-परीट-घडीसारखे शुद्ध, शुभ्र व त्यांचे प्रतिपक्षी, अगदी काळे कुट्ट, असल्याचें वर्णिलें आहे. तसें कल्हणानें केलेलें नाहीं.

त्यानेंहि कांहीं जागीं एखाद्या राजाचे चारित्र विवेचकपणें वर्णन करतांना, काव्याची ठराविक पद्धती स्वीकारली आहे. कारण त्याला परंपराप्राप्त रूढीचा पाश तोडतां आला नाही. त्याच्यामुळें तेथें बराच विसंगतपणा व विरोधहि आलेला आहे. त्याला समकालीन माहिती मिळविण्याचीं साधनें विपुल उपलब्ध होती. कोणा-विशिष्ट व्यक्तीचें वर्तन व स्वभाव, याचें त्यानें केलेलें वर्णन व त्यांच्या कृतीवर त्यानें केलेली टीका वाचतांना, त्या व्यक्ती जशा अंतःचक्षुपुढें प्रत्यक्ष उभ्या राहतात. पण त्या व्यक्ति जितक्या जास्त प्राक्कालीन असतील तितके त्यांचे वर्णन ढोबळ व अस्पष्टसें आढळून येतें. पहिल्या तीन तरंगातील थोर व प्रतापी मेघवाहन, तुंजीन, प्रवरसेन. वगैरे राजांचे वर्णन पौराणिक, किंवा दंतकथांमधील वीराच्या वर्णनाइतकेंच सामान्य व ढोबळ आहे.

अलीकडील पुष्कळशा सामान्य व्यक्तींचे वर्णनहि अगदीं यथार्थ व त्यांच्या मूर्ती डोळ्यापुढे उभ्या राहतील, असें केले आहे. सभ्यपणानें निंदा व तिरस्कार-द्योतक वर्णन करण्याच्या कामात कल्हणाचा हातखंडा आहे. उपटसुंभ्या भद्रेश्वर, कृपणशिरोमणि चंद्रमुख, दुष्ट काविराज व बंडखोर सखु, इत्यादिकाचीं वर्णनें फारच सुरेख साधलीं असून, त्याच्यावरून कल्हणाचें मानवी स्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण व ज्ञान स्पष्ट होतें.

हलकट व आडदांड माणसाचे वर्णन करण्यामध्ये दाखविलेले त्याचें कौशल्य वर्णनीय आहे. आपल्या निंद्य गुणाच्या द्वारे उन्नती पावलेल्या तशा लोकांच्या वर्णनातील काहीं तपशील अक्षरशः खरा व ऐतिहासिक नसला तरी, तीं वर्णनें खऱ्या व उपलब्ध नमून्याला सोडून नाहीत. या वर्णनातसुद्धा कल्हणानें न्याय व समतोलपणा सोडलेला नाहीं. याचे सुरेख उदाहरण कुलराजाच्या वर्णनाचें आहे. त्याच्या शस्त्रधारीपणाला भुलून राजानें त्याला नगराधिपति-कोतवाल-नेमलें होतें.

विशिष्ट व्यक्तीच्या वर्णनाप्रमाणेंच कल्हणानें आपल्या ग्रंथाच्या उत्तर भागांत, घडलेल्या गोष्टींचीं वर्णनें दिलीं आहेत. तींही अशींच उत्तम असल्याचें दिसून येते. आधुनिक इतिसकाराच्या दृष्टीनें तीं पुष्कळशीं फाजील पाल्हाळाचीं झालीं आहेत, असा त्याना दोष देतां येईल. तरी तीं यथार्थ, ऐतिहासिक दृष्ट्या महत्वाचीं व वाच-नीय आहेत, हें प्रांजलपणे कबूल केलें पाहिजे. हर्ष राजाचा शेवटच्या प्रसंगाचा झगडा, त्याचे पलायन व मरण, भिक्षाचराचा करुण वध, व लोहर दुर्गाचा पाडाव इत्यादिकांचीं वर्णनें अगदीं यथार्थ वाटतात, याचें कारण, त्यांच्यांतील भरपूर तपशील, हेंच नसून, त्या गोष्टींचें सरळ व ठसकदार वर्णन केलेलें आहे, हें, व शिवाय

त्याच्यांत इतर काव्यांत काव्यपद्धतीला अनुसरून आढळणाऱ्या अलंकारिक तऱ्हेच्या प्राचुर्याचा अभाव, हेहि कारण आहे.

शेवटच्या दोनी तरंगांतील वर्णनें फार तपशीलवार व हृदयंगम आहेत, तीं निष्कारण नव्हेत. कल्हणानें त्यांतील बऱ्याच गोष्टी प्रत्यक्ष पाहिलेल्या होत्या व कांहीं मध्यें प्रत्यक्ष संबंध असलेल्या लोकांच्या तोंडून त्या ऐकल्या होत्या आणि त्या लोकांशीं त्याचा निकट संबंध व सहवासहि होता. कलशराजाचें मरण, सूर्यमती राणीची सती, सुस्सल राजाचा खून, अशा करुण प्रसंगाच्या त्याच्या वर्णनावरून, या गोष्टींची चांगली साक्ष पटते. अनेक स्थळीं कल्हणाने कांहीं व्यक्तींच्या तोंडीं जे वेचक, योग्य व अर्थगर्भ शब्द घातले आहेत, ते शब्द व तीं वर्णनें, काल्पनिक म्हणण्याला मुळींच जागा नाहीं.

जागजागीं बऱ्याच गमतीच्या गोष्टी, वाक्यें व शब्द आढळतात. त्याच्यावरून तद्नुरूप लोकप्रवाद त्यावेळीं जारी होते, असें स्पष्ट दिसतें. यामुळेंच त्यांना महत्व होतें हें निराळें सांगणें नकोच. लोकप्रवाद यथार्थ प्रदर्शित होतील, असें ठीक वर्णन करण्याची शैली कल्हणाला उत्तम अवगत होती. शाही राजघराणें बुडालें व त्याचें वैभव नामशेष झालें, त्यासंबंधीं कल्हणानें केलेल्या वर्णनावरून, त्यावेळीं अशा महत्वाच्या घडलेल्या गोष्टींचा लोकांच्या मनावर जो कायमचा परिणाम झाला होता, त्याचें उत्कृष्ट निदर्शन झालें आहे.

कोणा इतिहासकाराच्या कृतीच्या बऱ्या वाईटपणाचा विचार करताना, त्यानें तपशीलवार माहिती देण्यांत बारकाईकडे कितपत लक्ष दिलें आहे, हेंही लक्षात आणणें अवश्य असतें. या कसोटीनें पाहतां त्याच्यांतील कालगणनेबद्दलची उणीव तेव्हांच लक्षात येते. पहिल्या तीन तरंगातील कालनिर्देश कृत्रिम असल्याबद्दल पूर्वी उल्लेख केलाच आहे. त्या भागांत प्रत्येक कारकिर्द किती वर्षांची होती एव्हढेच सांगितलें आहे. खरे शक, संमत वगैरे दिलेले नाहीत. यापैकीं कांहीं कारकीर्दींच्या वर्षांबरोबरच महिने व दिवसही दिले आहेत, म्हणून त्याला अधिक महत्व येते असें नाहीं.

चिप्पट जयापीड राजाच्या मरणापुढील काळापासून ( ई. स. ८१३ ) कल्हणानें लौकिक मतानें वर्षें, महिने व तिथि दिल्या आहेत. हे लौकिक वर्षमान काश्मीरांत प्राचीन काळापासून चालू आहे. पांचव्या तरंगांत वर्णन केल्याप्रमाणे उत्पल वंशाकडे राज्य गेल्यानंतर प्रत्येक कारकिर्दीचे प्रारंभ व अंत, यांचें वर्ष, महिना व तिथीहि दिलेल्या आहेत. त्या बहुतेक बरोबर आहेत. त्या तत्कालीन लेखी आधारावरूनच घेतल्या असाव्या. त्याचा पडताळा पाहण्याला मात्र दुसरें कांहीं स्वतंत्र साधन नाहीं. प्रत्येक कारकिर्दीच्या आदि अंताव्यतिरिक्त इतर गोष्टी कधीं घडल्या याबद्दलची संगतवार माहिती ई. सनाच्या अकराव्या शतकानंतरच मिळूं लागते.

कल्हणानें समकालीन हकीकत देतांना त्याच्याहि नक्की तारखा क्वचितच दिल्या आहेत. यामुळें त्यानें महत्वाच्या म्हणून ज्या गोष्टी विस्तारानें वर्णिल्या आहेत, त्यांच्या पक्क्या कालाविषयीं वादच राहतो. इतिहासांत पक्क्या तारखा देण्याच्या महत्त्वाची कल्हणाला जाणीव नव्हती, हेंच खरें. कारण त्यानें कांहीं जागीं एखादी गोष्ट घडल्याचा महिना व तारीख दिली असून वर्ष दिलें नाहीं. त्यानें हर्ष राजाची जन्मतिथी दिली आहे ती त्यानेच दिलेल्या त्याच्या जन्मपत्रिकेशीं जुळत नाहीं. ही गोष्ट कदाचित क्षम्य मानतां येईल, कारण त्यानें हा ग्रंथ लिहिला तेव्हां हर्षाला मरून पन्नास वर्षे झालीं होतीं. तरी त्या संबंधाचा महिना व तिथी देण्यांत त्याने चांगली काळजी घेतली असून तो अधिकच मास असल्याचें स्पष्ट लिहिलें आहे. यावरून त्यानें तारखा देण्यामध्ये चौकसपणा दाखविला आहे, हे कबूल केलें पाहिजे.

इतिहासलेखकाला वंशावळीकडे लक्ष द्यावें लागतें, ही महत्वाची गोष्ट कल्हणाला ठाऊक होती. विश्वसनीय आधार मिळाले तेथें त्याने प्रत्येक नव्या व्यक्तीच्या वंशाची व कुलाची माहिती काळजीपूर्वक दिली आहे. तसें नरुते तर, शेवटच्या दोन्ही तरंगांत दिलेली तपशीलवार माहिती चांगली लक्षांत येण्याला पचाईत पडली असती. प्रमुख व्यक्तींच्यासंबंधांत तर त्याने पुरती वंशावळीच दिलेली आहे. यामुळे त्यांच्या कुलाचा इतिहास व ऐतिहासिक माहितीचे पुष्टीकरण होण्याला चांगले साधन झालें आहे.

त्याला आपल्या देशाची स्थळविषयक माहिती चांगली होती, याविषयीं पूर्वी लिहिलेंच आहे. त्याच्यामुळें या इतिहासांतील गोष्टींची संगती जुळविण्याला पुष्कळच मदत होते व काश्मीरांतील प्राचीन ऐतिहासिक महत्वाच्या स्थळांची माहिती पडताळून घेण्याला चांगली सवड झाली आहे. हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणाच्याहि भागाविषयीं असें क्वचितच म्हणता येतें. शिवाय यामुळें त्याने वर्णन केलेल्या गोष्टींचा पत्ताहि ठीक लागतो आणि त्याच्या लेखाचा विश्वसनीयपणाहि चांगला सिद्ध होतो.

इतिहासाचें अध्ययन व त्याच्यावर विचार करणे, यांच्यापासून इतिहासशास्त्राची पद्धति तयार करण्याची तऱ्हा, कल्हणापूर्वीच्या किंबहुना बहुतेक हिंदू ग्रंथकारांना ठाऊक नव्हती. तेव्हा ती या कल्हणाच्या ग्रंथात आढळत नाही याच्यांत काही आश्चर्य नाहीं. प्रत्येक ऐतिहासिक गोष्ट विविक्षित धर्मतत्वाची निदर्शक असते, असें इतर बहुतेक ग्रंथकारांप्रमाणें कल्हणहि समजत होता. अशांपैकीं काहीं प्रमुख समजुतींचा परिचय झाल्याने गतगोष्टींकडे कल्हण व त्याच्या पूर्वीचे ग्रंथकार, यांची दृष्टी कशा तऱ्हेची होती ते कळून येईल.

प्रत्येक व्यक्ती व समष्टि किंवा राष्ट्र यांचे सुदैव दुर्दैव, त्यांच्या त्यांच्या जन्मांतरींच्या सुकृत दुष्कृतांचा परिणाम, म्हणून प्राप्त होत असतें, ही त्यापैकीं एक प्रमुख

समजूत, केवळ हिंदु लोकांतच रूढ आहे. तिच्या अनुरोधानेच अनेक जागीं घडलेल्या चमत्कारिक गोष्टींची कल्हणानें कारणपरंपरा जोडून दिली आहे. ती हिंदुमात्रांना खात्रीची वाटतें व पटते. ही समजूत खरी धरली तर प्रत्येक व्यक्तीच्या निरनिराळ्या कृत्याचें खरे हेतु व कारणें आणि राष्ट्राच्या चारित्र्याची निर्णायक तत्वे, यांच्याकडे दुर्लक्ष होण्याचा साहजिक संभव असतो, हें तेव्हाच लक्षांत येईल. त्याचप्रमाणें युगाच्या संबंधाच्या समजुतीचा या ग्रंथकाराच्या मनावर विशेष पगडा बसलेला होता. ती समजूत अशी कीं, या चालू कलियुगात सर्व भौतिक व पारमार्थिक गोष्टींची सारखी अवनति व ऱ्हास होत चालला आहे व तो तसाच चालत राहणार. या समजुतीमुळे अर्थातच कोणताहि काल जितका जास्त प्राचीन असेल, तितका तो अधिक वैभवाचा व उन्नतीचा आणि श्रेष्ठ होता, असे मानण्याची हिंदू लोकांची प्रवृत्ती झालेली आहे. कल्हणाने प्राचीन राजाच्या वैभवादिकांविषयीं अतिशयोक्तिची व असंभाव्य वर्णने कां व कशीं खरीं मानलीं आहेत याचा या प्रवृत्तीवरून उलगडा होतो. काश्मीरच्या राजांच्या प्रतापाचा ऱ्हास झाला तो मुख्यतः याच युगधर्मामुळे, असें कल्हणाने स्पष्ट म्हटले आहे. या दृष्टीने पाहातां त्याच्या वेळचे काश्मीरचे राज्य लहानसें व तेथील उत्पन्न बेताचे होते तरी ललितादित्य वगैरे प्राचीन पराक्रमी राजानीं केलेल्या महत्कृत्यांची उपलब्ध वर्णनें खोटी मानण्याला सबळ कारणें नाहींत, असेंच त्याला वाटत होतें.

त्याची विधिविलसितावरील निस्सीम श्रद्धा ही अशीच आणखी एक समजूत होय. या विलक्षण व सर्वातिशायी कारणाविषयीं कल्हणाने किती तरी प्रसंगीं अज्ञातपणे, विवेचन व उल्लेख केलेले आहेत. त्याचा प्रभाव व कर्तृत्व, त्याने सर्व प्रसंगीं मोकळेपणीं कबूल केले आहे. हर्ष राजाने आपल्या कारकिर्दीच्या शेवटीं सर्व मनोधैर्य, दृढ निश्चय व शहाणपणा सोडून दिला. तो सारा दैवाचा खेळ होता, असे कल्हणानें म्हटलें आहे; पण बहुतेक पक्के वेडे झालेल्या अशा राजाच्या अंगी हे गुण कसे आढळणार! व तो विचार तरी कसा व काय करणार? ही गोष्ट अगदी अशक्य होय, असें त्यानेच केलेल्या वर्णनावरून सिद्ध आहे. राजाकडून वैभव मिळून उच्चपदावर पोहोंचलेले लोकच आपल्या आप्तांशीं वाईट वागतात, तसेंच नैतिक निर्बंध झुगारून देऊन हवेतसे गर्ह्य वर्तन करतात, ते हतविधीच्याचा प्रभावामुळे, असेंहि त्यानें म्हटले आहे.

राज्यकारभार वाईट असला म्हणजे त्याचा परिणाम वाईट होणारच. याविषयींचे कल्हणाचे विचार आणि तद्विषयक अलीकडील कार्यकारणपरंपरेचे विचार बरेच मिळतात. पुढील परकी राजांच्या अमलांतल्याप्रमाणेच प्राचीन काळीं, इकडील देशी राजांच्या अमलांत देखील, रयतेवर कराचा बोजा अति व निर्मर्याद असे. म्हणूनच राजेलोक अतिशय लोभी झाले म्हणजे, उलट त्याचे नुकसान होते,

असें कल्हणाचें म्हणणें आहे. त्याचा खरेपणा आपणाला पटतो. त्यानें काश्मीरच्या इतिहासांतून क्रमशः उदाहरणें देऊन हा मुद्दा विशद केला आहे. त्याबरोबरच दुष्ट पणानें संपादन केलेला द्रव्यसंचय, धार्मिक कामांत—विशेषतः ब्राह्मण लोकांना दानधर्म करण्यांत—खर्च होत गेल्यानें पावन होतो, असेंहि त्यानें प्रतिपादन केले आहे !

काश्मीरी अंधश्रद्धेच्या जादूटोणा वगैरे प्रकारचीं उदाहरणें त्याच्या ग्रंथांत किती तरी आहेत, याविषयीं पूर्वी उल्लेख आलाच आहे. त्याला अनुसरूनच हर्ष व सुस्सल या राजांनी आपल्या कारकिर्दीच्या उत्तर भागांत जीं अनन्वित क्रूर कृत्यें केलीं, तीं त्यांना पिशाच्चांनी पछाडले होतें म्हणून, असा त्या वेळीं लोकांचा समज होता, असें कल्हणानें म्हटले होते. त्याचाहि या गोष्टीवर विश्वास होता, हें उघड आहे. त्याच्यावेळीं एक खून झाला. तो जादूटोण्यामुळे झाला, असें त्यानें म्हटले आहे. पण त्याचें खरें कारण व तऱ्हा त्याच्या लक्षांत आलेली होती, असें त्यानें केलेल्या वर्णनावरून दिसत आहे. त्याचप्रमाणें ब्राह्मण लोक प्रायोपवेशनें व उपवासादिक करून त्यांच्या-द्वारें भयंकर परिणाम घडवून आणूं शकतात, अशी त्याची स्वतःची समजूत होती. यात नवल नाहीं. प्रायोपवेशनासंबंधी अशी ही कांहीशी धार्मिकपणाची समजूत सार्व-लौकिक असल्यामुळेच इकडील देशी राज्यांत त्रस्त व पीडित प्रजेपाशीं असलेलें हें प्रायोपवेशनाचें शस्त्र चांगलें उपयोगी, भयंकर व खात्रीनें परिणामकारक समजलें गेले होतें. कल्हणाचा त्याच्यावर असा विश्वास होता तरी, अशा मोठ्या प्रमाणांत झालेल्या प्रायोपवेशनामध्यें सामिल असलेल्या पुजारी व पुरोहित मंडळीसंबंधानें आपला तिरस्कार व्यक्त करीत, उपरोधिक तऱ्हेचे लेख लिहिण्यांत त्यानें कसर केलेली नाहीं.

पवित्र तीर्थ, क्षेत्रें व देवस्थानें अशा स्थळीं अत्याचार केले गेले तर ईश्वरी-क्षोभ होतो, असा सर्वसामान्य समज आहे. असे प्रकार हर्ष व त्याचा नातू भिक्षाचर यांच्यावेळीं घडले. तेथूनच त्यांचें दैव प्रतिकूल झालें व ऱ्हास सुरू झाला, असें समजत असत. तसेंच नाग किंवा झऱ्याच्या अधिष्ठात्या देवतां यांच्याविषयीं काश्मीरी लोकांच्या मनात वसत असलेला विलक्षण भीतिमिश्रित आदर या ग्रंथांत जागजागी व्यक्त झालेला आढळतो. सुश्रवस नागानें नरपुराचा नाश केल्याविषयींची पौराणिक दंतकथा, तसेंच अनंत राजाच्या वेळीं पिंडारक येथील झऱ्यावर घडून आलेला अर्धवट ऐतिहासिक प्रसंग, यांच्यावरून या स्थानदेवतांच्या कोपापासून होणाऱ्या महत्वाच्या मानले गेलेल्या परिणामाचें निदर्शन होतें. तसेंच, कल्हणानें शुभाशुभ शकुन व उत्पात वगैरेंनाही बरेंच महत्वाचें स्थान देऊन, त्यांचें वर्णन केलें आहे. तें तरी तत्कालीन प्रचलित लोकमताचेंच निदर्शक होय.

कल्हणानें घडून आलेल्या ऐतिहासिक गोष्टींवरून काय बोध घेतां येतो, या-विषयीं विशेष व स्वतंत्रपणें विवेचन केलेलें नाहीं. तरी त्यानें त्यांच्यापासून राजनीतीच्या

तत्वांचें प्रकाशन होण्याजोगीं चर्चा अनेक जागीं केली आहे व राजकारणाच्या तत्वाविरुद्ध आचरण घडलेल्या प्रसंगांविषयीं त्यानें चांगली मार्मिक टीका केलेली आढळते. याचें एक उदाहरण जयसिंहराजानें किशनगंगानदीच्या खोऱ्याच्या वरच्या भागावर स्वारी केली होती तद्विषयक आहे. शत्रूकडील पुरी माहिती मिळवि-ल्याशिवाय, केलेली मोहीम व शत्रू छातीवर उभा असतांना व्यर्थ वाटाघाटींत विलंब लावणें, यामुळें पराभव होतो व अपयश प्राप्त होतें, याचें त्याने स्पष्ट निदर्शन केलें आहे. तसेंच कमलवर्धनाला जबरदस्तीने तत्काल राजगादी प्राप्त करून घेतां येण्यासारखी असतांना, त्याने ती राजकारस्थानानें मिळविण्याचा प्रयत्न केला, याविषयीं लिहितांना कल्हणाने राजकारणांत योग्य संधी आलेली ओळखून, तिचा ताब-डतोब फायदा घेणें अवश्य असतें, या महत्वाच्या तत्वाचें उद्घाटण केलें आहे. इतर स्थळींही त्यानें राजकारस्थानांत व्यर्थ उशीर लावल्यामुळें कशा अडचणी येतात, याचें दिग्दर्शन केलें आहे. जयसिंह राजाच्या शत्रूंनी केलेल्या चुकाविषयींही त्याने टीका करून, त्या चुकामुळेच जयसिंहाला जय मिळाला, असें लिहिलें आहे.

आपल्या देशाला कशा तऱ्हेची राज्यव्यवस्थेची पद्धती सोईची आहे, याविषयीं कल्हणानें केलेलें विवेचन लक्षांत ठेवण्याजोगें आहे. याविष-याची तत्वें त्याने ललितादित्य राजाच्या तोंडची म्हणून दिली असली तरी, त्यांतील विचार त्याने स्वतःच्या वेळच्या परिस्थितीला व अनुभवाला अनसरून दिलेले आहेत. त्या अन्वये पुढील राज्यकर्त्यांनी चालावें, अशी ललिता-दित्याची आशा आहे, हे म्हणणें अर्थातच त्याच्या स्वतःच्या तद्विषयक विधानाचेंच प्रदर्शन, आहे. त्यांतील कुटिल नीति इकडील नीति शास्त्रावरील प्रमुख व आधारभूत ग्रंथांतल्या सारखीच आहे, हें खरें. तरी पण तिच्यामध्ये जी एक तऱ्हेची विशिष्ट काश्मीरी तऱ्हा दिसून येते, तिचें ऐतिहासिक दृष्ट्या पुष्कळ महत्व आहे.

त्यांपैकीं पहिलेंच नीतितत्व, काश्मिरालाच लागू आहे. तें तत्व असें कीं, काश्मिराला भोंवताली उंच पर्वत असल्याने परचक्राचें भय बाळगण्याचें कारण नाहीं. म्हणून तेथील राज्याधिकाऱ्यांनीं अंतस्थ झगडे व कटकटी न होऊं देण्याचा बंदोबस्त करावा आणि भोंवतालीं राहणाऱ्या पहाडी लोकाचे अपराध असोत नसोत त्याना नेहमी शासन करीत असावें, कारण त्याना सुसंपन्न होऊं दिले तर, त्याच्याकडे दुर्गम व अभग्र दुर्ग व गढ्या असल्याने, ते भीतिप्रद होण्याचा संभव असतो. हे लिहितांना त्याच्या मनात काश्मीरा सभोंवारच्या खोऱ्यांत राहणाऱ्या खश वगैरे दांडग्या पहाडी लोकांविषयीं विचार आलेला असावा. त्या लोकांचा चंचल व बद-माष स्वभाव व त्यांची लूटमार करण्याची जन्माची संवय, यांच्यामुळें, मुख्य राज्य-

कारभार शिथिल असतांना, सर्व काश्मीरी प्रजेला भारी त्रास होत असे. तसेच खेडेगांवांतल्या लोकांजवळ, एक वर्षाच्या बेगमीहून जास्त धान्य आणि जमीनीची मशागत करण्याला अवश्य असल्यापेक्षा अधिक बैल, ठेऊं नयेत, असेही राज्यकारभाराचे एक तत्व त्याने सांगितलेले आहे. या व या पुढे दिलेल्या कांहीं तत्वांवरून कल्हणाच्या मतें, जमीन महसूलासंबंधी करडा अंमल ठेवून जमीनदार डोईजड न होऊं देणे, हे तिकडील राजनीतीचे महत्वाचे तत्व होतें, असे उघड आहे. हे जमीनदारच सातव्या व आठव्या तरंगांत प्रमुखतेनें पुढे आलेले डामर होत. ते कल्हणाच्या वेळीं काश्मीरांत भारी डोईजड व प्रबल झाले होते. कल्हणाच्या हयातींत व त्याच्या पूर्वी बऱ्याच पिढ्यापर्यंत काश्मीराला झालेल्या त्रासाची मुख्य कारणें या डामर मंडळींचीं आपसातील चाललेलीं सतत भांडणे व राजाविरुद्ध बंडें, हींच होतीं. दुर्गरक्षण व निरनिराळ्या प्रमुख कुलांतील लोकांमध्ये राज्याधिकारातील प्रमुख कामे शहाणपणाने वाटून देऊन, परस्परांवर दाब राहण्याची व्यवस्था करणे, अशा अनेक गोष्टीबद्दल अशाच तऱ्हेचे उपदेशपर नियम घालून दिलेले आहेत.

आपल्या देशबांधवांचे राजकीय विचार अतिशय चंचल व अस्थिर असल्याची कल्हणाला चांगली जाणिव होती. लहानथोर लोक हवे तेव्हा, हवे तसें, स्वतःची राजनिष्ठा बदलीत. याविषयीं कल्हणानें अनेक प्रसंगीं उल्लेख व विवेचन केलेले आहे. सार्वजनिक राजनिष्ठा व प्रेम, या गोष्टींविषयीं फारसा विचार करावयाला नको, असे त्याचे मत आहे. तसेच आपल्या समक्ष घडलेल्या गोष्टींविषयीं एकदां झालेलें मत कायम न राहातां, सारखे बदलत असतें. सबब त्यांचा फारसा विश्वास धरणे योग्य नाही, असेंहि त्याचे म्हणणे आहे.

## कल्हणाची लेखनशैली.

कल्हणाने आपल्या ग्रंथाला काव्याचेंच स्वरूप का दिलें याचा विचार मागे झालाच आहे. त्या स्वरूपाला अनुसरूनच त्याची[1] लेखनशैली कायम झाली आहे. काव्य म्हटले म्हणजे संस्कृत अलंकारशास्त्रानुरूप सर्व प्रकारच्या शब्दार्थालंकारांनी ओतप्रोत भरलेला ग्रंथ, असे सामान्यतः ठरून गेले आहे. उपमा, उत्प्रेक्षा, श्लेष, वगैरे अलंकाराच्या अगणित तऱ्हा, शक्य तितक्या अधिक असणें, हींच प्रत्येक काव्यकर्त्या कवीच्या कल्पकतेची कसोटी मानली जाते. हें सर्व कल्हणाच्या या काव्यांत यथास्थित भरलेले आहेच. तरी पण तो प्रकार काही कांही विशिष्ट वर्णनात्मक भागांतच अलीकडील संस्कृत काव्याच्या पद्धतीला अनुसरून अधिकतेनें आलेला आढळतो. प्रचलित पद्धतीत हा जो फरक पडला आहे तो कल्हणाने हातीं घेतलेल्या कथानकाच्या दीर्घपणामुळे व त्याच्यांत असलीं अलंकारिक वर्णनें अधिक दिल्यानें आणखी ग्रंथविस्तार होणार, तो करण्याची सवड नसल्यामुळें, त्यानें तसें केले नाहीं, असे त्यानें प्रस्तावनेंत लिहिले आहे.

१

या ग्रंथांतलि अलंकारप्रचुर काव्याची उदाहरणें, अंध युधिष्ठिराचे वनवासाला प्रयाण, चक्रवर्मा व सुस्सल राजा यांच्या विजयप्राप्तिनंतरचा नगरप्रवेशाचा थाट व भिक्षाचराचे शेवटचें पलायन, वगैरे प्रसंगांचीं अत्युत्तम वर्णनें, हीं होत. तीं कोणच्या प्राचीन सर्वमान्य नमून्याला धरून केलेलीं आहेत हें सांगता येत नाहीं. तरी तीं केवळ ठराविक अलंकारपद्धतीचीं आहेत, हे खास. कारण त्यांच्यांत विशिष्ट स्थलाचें वर्णन किंवा कोणत्याही ऐतिहासिक प्रकारचा तपशील नाहीं. एकंदरींत कल्हणानें असलें वर्णनात्मक प्रसंग अधिक आणले नाहींत, हें ऐतिहासिक वर्णनाच्या दृष्टीनें बरेंच चांगलें झालें आहे म्हणावयाचें.

काहीं करुणप्रसंग कल्हणानें अत्यंत हृदयद्रावक रीतीनें व ते जसे डोळ्यासमोर घडत असल्याप्रमाणे वाटण्याजोगे व नाटकाच्या धर्तीवर वर्णिलेले आहेत. त्यांची काव्य या नात्यानें स्वतंत्र व मोठी योग्यता आहे. जयापीड राजाचा ब्राह्मण मंडळींशी कडाक्याचा वाद झाला व त्याच्या शेवटीं त्यांतील एका ब्राह्मणाच्या शापानेंच जणों आल्यासारखें त्याचें मरण, याविषयींचें वर्णन वरील प्रकाराचें एक उत्कृष्ट उदाहरण होय. तीच योग्यता अनंत राजाच्या अंत्यसंस्काराच्या व सूर्यमती राणीच्या सतीच्या वर्णनाची आहे. हर्ष राजाच्या शेवटचे अत्यंत हृदयद्रावक मृत्यूचें वर्णनहि अप्रतिम केलेलें आहे. त्याच्यावरून तो ऐतिहासिक प्रसंगाचे पहिल्या प्रतीचें वर्णन करणारा होता, असें सिद्ध होतें. तो हतभागी हर्ष राजा हळूंहळूं आपल्या अत्यंत करुणरसपूर्ण अंतिम प्रसंगाकडे चालला होता, त्याचें वर्णन कल्हणानें साधे, सरळ, व ठसकदार शब्दांनीं केलें आहे. दुर्धर संकटपरंपरेपुढें त्याचा झालेला निरुपाय, अनुयायांनीं दगा देऊन त्याचा साथ सोडणें, शेवटीं हलकट व नीच माणसांचा आश्रय करणें भाग पडणें, इतकें होऊन अखेरीस तो आपल्या चारित्र्यावर आलेला डाग काहींसा धुतला जाण्याजोगें शौर्य दाखवितो. इत्यादि गोष्टींच्या वर्णनावरून, त्या जणों आपल्यासमोर घडताहेत, अशा वाटतात, तें वर्णन अलंकारप्रचुर नसून साधें व सरळ आहे. यायोगानें त्याचा मनावर झालेला परिणाम अधिक उठावदार व टिकाऊ झाल्यावाचून राहात नाहीं.

कल्हणानें वर्णन करण्यासाठीं घेतलेल्या ऐतिहासिक भागांचा विस्तार फार मोठा असल्यामुळें त्याला असें पहिल्या प्रतीचें वर्णन सर्वच प्रसंगीं करतां येणें शक्य नव्हतें. यामुळे या ग्रंथांतलि बराच मोठा भाग केवळ पद्यरूपांतरित गद्य वर्णनात्मकच झालेला आहे. हें त्याच्याहि लक्षांत येऊन, त्याचा कंटाळवाणेपणा कमी करण्यासाठीं त्यानें त्याच्यांत ठळक ठळक उपमा, उत्प्रेक्षा, श्लेष, विरोधाभास, वगैरे अलंकार जागजागीं घालून. त्या सामान्य व्यावहारिक गोष्टीच्या वर्णनांतहि वैचित्र्य आणण्याचा शक्य तितका प्रयत्न केला आहे.

पुष्कळशा जागीं या अलंकारिक वर्णनामुळें ते ते ऐतिहासिक प्रसंग अधिक विशद होऊन होऊन त्यांना मनोरंजकपणा आलेला आहे, असें नाहीं. तरी ते अलं-

कार चांगले योग्य व मनोहर असून, त्यांच्यांत पुष्कळसे नाविन्य आहे, ही गोष्ट कबूल करणें भाग आहे. त्यानें मधून मधून अनेक सन्मान्य बोध वचनें, सुभाषितें व म्हणी यासारखे श्लोक, याच उद्देशाने घातलेले असावेत. अशा बहुतेक श्लोकांची वृत्तें दीर्घ असून, त्यांची रचनाहि अधिक कृत्रिम असल्यामुळें, ते इतर साध्या व सरळ वर्णनात्मक श्लोकांमधून स्पष्ट व ठळकपणें नजरेंत भरण्याला अडचण पडत नाहीं. त्यांतील बहुतेक श्लोकांतील तत्वें प्राचीनच असली तरी वर्णनशैली विशेष तऱ्हेची असून, त्यांना बराच नवीनपणा आणलेला आहे आणि त्याच्यात दिसून येणारी कविकल्पनाहि चांगली व उदात्त आहे. ही पद्यरचना कृत्रिम व क्लिष्ट, तरी बहुतेक स्थळीं सुरेख व ढबदार असल्यामुळेंच कल्हणाची कविता, प्राचीन व अर्वाचीन सुभाषित संग्रहकाराकडून इतकी आदराला पात्र झालेली आहे.

जागजागीं वक्तृत्वपूर्ण व चटकदार लहान लहान वर्णनें व भाषणाचें चुटके आढळतात, ते तरी बहुधा वैचित्र्यसाधनासाठींच घातलेले असावेत. त्यांच्या द्वारें कल्हणानें प्रमुख पात्रांच्या तोंडूनच, त्यांच्या त्यांच्या वर्णनाचे हेतू अधिक विशद करण्याचा यत्न केला आहे. दुसऱ्या कांहीं चटकदार संवादात्मक प्रकारावरून आपणाला एखाद्या गुंतागुंतीच्या प्रकरणांत पडत गेलेला फरक किंवा त्रयस्थ तमासगीरांच्या मनावर होत गेलेले निरनिराळे मनोविकार स्पष्ट होतात. त्याच्यांतच हल्लींसुद्धा काश्मीरमंडळांत सामान्य लोकांच्या तोंडीं असलेल्या पुष्कळशा म्हणी गुंफल्या गेल्या आहेत. हें तरी विलक्षणच होय. यावरून समकालीन ऐतिहासिक कथांचें वर्णन कल्हणानें अशा संवादरूपानें त्या त्या पात्राच्या तोंडीं देण्यांत, त्या वेळच्या नित्य प्रचारांतील भाषाच वापरली आहे, असें म्हणता येतें, हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

कांहीं स्थळीं कल्हणाचें वर्णन, त्याच्या कथेचा खरा मतलब लक्षांत येण्याला कठिण पडेल अशा तऱ्हेचें आहे. तें त्या कथेच्या पूर्वभागांत केवळ पाठभेदमूलक नसून त्याच्या या वर वर्णन केलेल्या प्रवृत्तीचें परिणामक होय. अर्थाविपर्याचीहि भानगड, क्वचित अप्रसिद्ध शब्द, दूरान्वित रचना व कविसंप्रदायानुरूप द्व्यर्थी व श्लेषात्मक पद्यबंध, याच्यामुळेंहि आलेली आहे, हें खरें. पण त्याचीं दुसरी कांहीं कारणें बरींच गूढ आहेत. त्याच्या कथेच्या उत्तर भागांत नाजुक व महत्वाचीं राजकारणें, गुंतागुंतीच्या उलाढाली, व दरबारांतील सामान्य नित्क्रम व राजकारभारासंबंधीं गोष्टी, यांचें वर्णन करण्याच्या बाबतींत हा प्रकार अधिक आढळतो. त्या गोष्टींचें वर्णन जितकें जास्त तपशीलवार देण्याचा यत्न केला आहे, तितकें तें अधिक अलंकारिक होऊन, त्याचा वास्तविक अर्थ लक्षांत येण्याला अधिक कठिण झालें आहे.

कल्हणानें आपला ग्रंथ जणों समकालीन वाचक व श्रोते यांच्यासाठीं लिहिलेला

दिसतो. अशा लोकांना तत्कालीन काश्मीरांतील परिस्थितीची माहिती कल्हणाच्या इतकीच असली पाहिजे. अशा लोकांसाठीं लिहिलेल्या ग्रंथांत अर्थातच त्यानें त्यावेळीं सर्वविश्रुत गोष्टींची माहिती त्रोटकच दिलेली असणार. हें कल्हणाच्या हातून घडणें ठीकच होतें. पण तीं वर्णनें पुढील वाचकांना दुर्बोधच होणार. तशा गोष्टींचे तपशीलवार वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं, त्या सर्वविश्रुतच आहेत, असें कल्हणाला वाटणें ठीकच होतें. तसेंच त्यानें अनेक जागीं स्थानिक अर्थाचे व महत्त्वाचे, शब्द योजले आहेत. त्यांचा अर्थ हल्लीं दुर्बोध झाला आहे. त्यांचा वास्तविक अर्थ कळण्याला अडचण पडते. कंपन, द्वार, पादाग्र, पार्षद, वगैरे महत्वाच्या शब्दांचा खरा अर्थ, या ग्रंथात ते शब्द उपयोगांत आलेले निरानिराळे भाग व त्यानें आधारास घेतलेले प्राचीन त्रुटित आधारग्रंथ, यांची तुलना करूनच ठरवावे लागतात.

या काव्याचा आठवा तरंग वाचतांना आजकालच्या वाचकांना या अडचणी जास्त नडतात. आपल्या समकालीन लहान मोठ्या व्यक्तींचा वाचकांना चांगला परिचय आहे असें त्यांच्याविषयीं लिहिताना कल्हणानें गृहीत केले आहे. यामुळें या कल्हण समकालीन काश्मीरच्या विलक्षण कथानकाचें खरें ज्ञान होण्याला जी अडचण पडते, तितकी ती दुसऱ्या कशामध्येंहि पडत नाहीं.

आठव्या तरंगाचे ३४५० श्लोक आहेत. इतक्या विस्तृत वर्णनात तीच तीं माणसें पुष्कळशा अंतरानें निरनिराळ्या नांवाखालीं पुढे आलीं आहेत. यामुळे बराच त्रास पडतो. निरानिराळ्या नांवाच्या व्यक्तीसंबंधाच्या कथा एकाच व्यक्तीला धरून आहेत, अशाविषयीं पूर्वीचा सुगावा कांहींच लागत नाहीं. गर्गचंद्र, गर्ग, गग्गचंद व गग्गलांछक, लोठक, लोठण, राजवदन व बलहर वगैरे दोन दोन तीन तीन नावें एकाच व्यक्तीला लावलेलीं आहेत, हें ध्यानांत येण्याला बराच प्रयास पडतो. छंदशास्त्राप्रमाणे पदें जुळविण्यासाठींहि अशा तऱ्हेनें नावामध्यें फरक करावा लागला असेल.

आणखी कांहीं प्रसंगीं कल्हणाने केलेलें वर्णन कोणच्या व्यक्तीला उद्देशून आहे, तें कळण्याला फारच कठीण पडते. पुष्कळ जागीं त्याने कांहीं व्यक्तींचा निर्देश केवळ अधिकारद्योतक पदाच्या द्वारेंच केला आहे. कोठे तर वर्णन केलेल्या प्रसंगीं ते लोक त्या त्या पदावरून निघालेलेसुद्धा होते. कल्हणाच्यावेळीं दरबारांत अधिकारपदाच्या घालमेली क्षणोक्षणीं होत असत. तेव्हा या व्यक्तींची खरी ओळख पटण्याला त्याची अवतरणमालिका व स्वतंत्र यादी बनवून तिच्याकडे सारखें पहात राहाणें अवश्य होते. अशा व्यक्तींची पूर्वपीठिका क्वचित आलेल्या त्रोटक अवतरणा-वरून किंवा उल्लेखातील संबंधावरून शोधून काढावी लागते.

या ग्रंथाच्या शेवटच्या आठव्या तरंगांतील माहिती विशेष तपशीलवार व विश्वसनीय आहे. तरी पण ती नीट कळून येण्याला वाचकांना ज्या अडचणी

अडतात, त्याची कल्हणाला जाणीव असून, त्या अडचणी दूर करण्याचा त्यानें कांहीं प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं.

## राजतरंगिणीची विश्वसनीय प्रत.

या ग्रंथासंबंधानें विस्तारानें विचार करण्यापूर्वी आजकाल उपलब्ध असलेली या ग्रंथाची प्रत व कल्हणाच्या हातची अस्सल प्रत यांच्यामध्यें तत्वतः फरक नाहीं हें सांगणे अवश्य आहे. कल्हणानें ग्रंथांच्या आरंभीं व शेवटीं स्पष्टपणें कालनिर्देश केलेला आहे. त्यावरून हा ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे त्याहून अधिक विस्तृत असण्याचा संभव नाहीं. तसेंच त्याच्यात कल्हणाच्या मागूनहि कोणी कांहीं फेरफार केल्याचें दिसत नाहीं. कल्हणानें या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत कालगणना दिली आहे. तेथें त्यानें शके १०७० च्या अखेरीचा, लौकिक वर्ष ४२ २४ किंवा ई. स. ११४८–४९ चा उल्लेख केला आहे. ( तरंग १ श्लोक ५२ ) ग्रंथाच्या शेवटींहि त्यानें लौकिक वर्ष ४२ २५ किंवा ई. स. ११४९–५०, चालू असल्याचें लिहून त्याच्या बरोबरच मेळाला त्यानें जयसिंह राजाच्या कारकीर्दीचें वर्षही दिलें आहे. ( तरंग ८ श्लोक ३४०५ ) तेव्हां प्रस्तावना लिहिणारा व ग्रंथ पूर्ता करणारा एकच कवी याविषयीं शंका नको. सुमारें ८००० श्लोकात्मक ग्रंथ लिहिण्याला कमींत कमी इतका अवधी पाहिजेच.

शेवटचे दोन्ही तरंग दुसऱ्या कोणी तरी लिहिलें असावेत, अशी ‘ ट्रोयर ’ नावाच्या फ्रेंच प्राच्यविद्या विशारद विद्वानानें शंका काढली होती. पण डाक्तर बुल्हरसाहेबांनीं तिचे पूर्णपणे निरसन व समाधान केलेले आहे. कल्हणानंतर दोनशें वर्षांनीं राजतरंगिणींत आलेल्या इतिहासापुढचा, इतिहासलेखक, जोनराज यानें स्पष्ट लिहिले आहे कीं, ‘कल्हणाच्या ग्रंथाच्या शेवटच्या भागांत, जयसिंह राजाच्या कारकिर्दीच्या शेवटापर्यंतचे वर्णन आलेलें आहे,’ हें वर्णन आठव्या तरंगांत फारच सविस्तर आलेले आहे. यावरून या प्रश्नाचा कायमचा निकाल लागतो.

हल्लींचा उपलब्ध ग्रंथ एकाच कर्त्याचा आहे. यामुळे त्याच्यांत--विशेषतः उत्तरार्धांत–बरेच दोष आहेत, हें तेव्हांच लक्षात येते. हा भाग कल्हणानें आपल्या वेळचे वाचक व श्रोते यांना, तें वृत्त चांगले अवगत आहे, असें धरून लिहिलेला असल्यामुळें, बऱ्याच अडचणी येतात. हे पूर्वी सांगितलेंच आहे. दुसरी अडचण मूळ ग्रंथांच्या एकीवरून दुसरी अशा प्रती करण्यांत शब्द, पदे, अक्षरें, श्लोकार्ध, किंवा श्लोक, याच्यात झालेल्या चुकांमुळे उद्भवलेली आहे. अशा चुका वगळल्या तरी, ज्याच्याविषयीं खुद्द कल्हणाला जिम्मेदार धरतां येईल अशाहि बऱ्याच चुका बाकी राहतात. त्याचें कारण कल्हणाला त्याच्याकडे हवें तितकें लक्ष देण्याला सवड झाली नसावी, हेंच दिसतें. उदाहरणार्थ ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या राजांच्या नांवाच्या गोषवाऱ्यांत, दोन जागीं त्याचसंबंधानें कल्हणानें पाहिल्या व चौथ्या तरंगांत दिलेल्या

वर्णनाच्या दृष्टीनें किरकोळ चुका केलेल्या आहेत. पहिल्या तरंगांत नर नांवाच्या राजाविषयीं विस्तृत दंतकथा दिलेल्या आहेत. पण त्यांचें नाव या गोषवाऱ्यात नाहीं. त्यानें पूर्वीच्या तरंगाची तपासणी जितकी काळजीपूर्वक केली, तितकी ती या उत्तर तरंगाची केलेली नाहीं, किंवा त्याला ती करण्याला सवड झाली नाहीं, हेंच या चुकांचें कारण असावें.

आंठव्या तरंगांत त्यानें दुसरें एक सिंहावलोकन केलें आहे. त्यासंबंधानेंहि हाच आक्षेप घेता येतो. तेथें त्यानें, सातव्या तरंगांत त्याच प्रसंगांचा तपशील दिला आहे तो सोडला आहे. अशा कारणामुळे या शेवटच्या भागांत जागजागीं पूर्वीच्या तरंगांत न आढळणारा, काहीसा तुटकपणा आढळतो. राजपुत्र घटोत्कच यानें केलेल्या स्वाऱ्या व मिळविलेले विजय, याविषयींचे वर्णन, तरंग ८ श्लोक २८४२ च्या पुढें एकदम केलेल्या वर्णनातील विषयांतर आणि जयसिंह राजा व बंडखोर राजवदन यांच्यामधील संबंध, एकदम बदलल्याविषयींचे वर्णन वगैरे, ही याची ठळक उदाहरणें होत.

याच दृष्टीनें कल्हणाकडून शेवटच्या भागात अपपाठ व अपप्रयोग, अशुद्ध भाषा व छंदोभग, वगैरेंची अनेक उदाहरणें आढळतात. त्याचेही एक तऱ्हेनें महत्व आहे. हे श्लोक किंवा ते असलेला ग्रंथाचा भाग, कल्हणाच्या इतर कृतीला विसंगत किंवा विशोभितहि नाहीं. तेव्हां ते श्लोक दुसऱ्या कोणी क्षेपक घुसडले असतील. असेंहि म्हणता येत नाहीं. सर्व ग्रंथाच्या प्रतीची शेवटची दुरुस्ती करण्याकडे कल्हणाचें दुर्लक्ष झाल्यामुळेच हे दोष राहिले, असें मानलें पाहिजे. त्याच त्या उपमा किंवा दृष्टांत त्याच शब्दांत आल्याचीहि उदाहरणें तरी, याचेच निदर्शक होत. अलंकारशास्त्राप्रमाणें अशी पुनरुक्ति दोषांत गणली जाते. ती तरी आठव्या तरंगाच्या शेवटीं शेवटींच विशेषत: आली आहे.

तसेंच पुष्कळसे अपपाठही यांच शेवटच्या शुद्धीकरणाच्या अभावाचें फल होय. उपलब्ध असलेल्या सातव्या व आठव्या तरंगाच्या दोन्ही प्रतींमध्ये अपपाठ व सुटलेले शब्द व पदे बरीच आढळतात. तीही त्या ८व्या तरंगाच्या सहाशे श्लोकात.

आपल्या समग्रंथाचे शेवटचें शुद्धीकरण कल्हणानें केलेलें नाहीं. शेवटच्या भागाची शुद्ध प्रत तयार नसणें, हेंच या सर्व अडचणींचें व उणीवींचें कारण मानावें लागतें. कल्हणाच्या हातच्या कच्चा खरड्यावरून या तरंगाच्या इतरांनीं प्रती केल्या. तेव्हां त्यांच्यात वर लिहिलेले दोष सहजच असणार. हल्लींच्या उपलब्ध प्रती कल्हणाच्या मागून चारशें वर्षांनंतर केलेल्या असल्याने, या दोषांची आणखीहि कांहीं काल्पनिक कारणें देता येणार नाहींत असें नाहीं.

या ग्रंथाची छापील प्रत तयार करण्याला व तिच्यावरून भाषांतर करण्याला डाक्तर स्टीनसाहेबाना जी लेखी प्रत मिळाली ती मूळची डाक्तर बुल्हरसाहेब

काश्मीरांत सन १८७५ सालीं प्राचीन संस्कृत ग्रंथांचा तपास करण्यासाठीं गेले होते, त्या वेळीं त्यांना पंडित शिवराम यांचे नातू पंडित केशवराम यांच्यापाशीं असल्याचें कळलें होतें, तीच होय. तिच्यावरूनच पूर्वी पंडित शिवराम यांच्यावेळा मिस्तर मूरक्राफ्टसाहेब यांनी सं. १८२३ साली श्रीनगर येथून बंगालच्या एशियाटिक सोसायटीकरितां एक प्रत तिच्या शारदा लिपीवरून देवनागरी लिपींत तयार करविली होती. त्या प्रतीवरूनच बंगाल्यांत सं. १८३५ सालीं मूळ संस्कृतांतील राजतरंगिणी ग्रंथ छापविला गेला होता. शारदा लिपींतून देवनागरी लिपींत नक्कल करतांना पुष्कळशा चुका होत असतात. त्या मानाने या प्रतींत पुष्कळ अशुद्धें राहिलीं आहेत. पंडित केशवराम मूळ प्रतीला अतोनात जपत होते. डाक्तर बुल्हरसाहेबांना ती त्याच्याकडून फक्त एकदां मोठ्या मुष्कीलीनें पहावयास मिळाली होती. पुढे डाक्तर स्टीनसाहेब सं. १८८८ सालीं काश्मीरांत गेल्यावेळीं त्यांनी ती प्रत पाहण्यासाठीं मिळविण्याची खटपट केली. तोवर तिच्यासंबंधांत आणखीहि अडचणी उपस्थित झाल्या होत्या. पंडित केशवरामाच्या पश्चात् त्या पुस्तकाचे तीन हिस्से होऊन ते त्याच्या तिघा वारसांकडे वाटले गेले होते. ती पोथी मिळविण्याचा त्यांचा प्रथम प्रयत्न व्यर्थ गेला. तिघांहि हिस्सेदाराना त्या पुस्तकाच्या भागाचें महत्त्व विशेष माहीत नव्हतें. तरी ते त्यांना जीवापाड जपत होते. पण पुढें ते भाग काश्मीर कौन्सिलचे मेंबर नामदार पंडित सूरज कौल, सी. आय. ई. व त्याचे चिरंजीव त्यावेळी डाक्तर स्टीन यांचे शिष्य व पुढें पंजाबच्या स्टाट्यूटरी सिव्हिल सर्व्हिसमध्यें भरती झालेले, पंडित हरकिशनकौल यांच्या खटपटीने डाक्तर स्टीनसाहेबांना तपासून घेण्यापुरतें तिन्ही भाग पुनः त्यांच्या हातीं एकत्र जुळून उसने मिळाले. तो ग्रंथ जुन्या काश्मिरी कागदाच्या ३२८ पानावर लिहिलेला आहे. त्यापैकीं वाटणीच्यावेळीं मधले एक पान व शिवाय शेवटचें पान अशी दोन पाने गहाळ झालीं आहेत. त्याचा साचा इतर काश्मीरी पुस्तकाप्रमाणेंच अलीकडील किताबीसारखा आहे.

निरनिराळ्या तरंगांच्या शेवटीं सालसंमत दिलेले नाहीं. पण लेखक राजानक रत्नकंठ असल्याचें लिहिलें आहे. त्यावरून सालसंमत काढतां आलें आहेत. कारण याच लेखकाच्या हातच्या दुसऱ्या कांहीं पोथ्या डाक्तरसाहेबांनी पाहिल्या व विकत घेतल्या. त्यांच्यात शके १५७०—इसवी सन १६४९—५० ते शके १६०३—इसवी सन १६८५—८६ सालसंमत दिलेले होतें. त्या पोथ्यांतच राजानक रत्नकंठकृत हरविजय काव्यावरील टीकेचीहि एक पोथी होती. तिच्यांत मिळालेल्या तपशिलावरून राजानक रत्नकंठाच्या पित्याचें नांव शंकरकंठ होते व त्याने अनेक काश्मीरी काव्यांवर सुरेख टीका तशीच कांहीं स्वतंत्र काव्यें केलीं असल्याचें कळून आलें आहे. त्यानेंच ही राजतरंगिणीची प्रत लिहिली हें निर्विवाद सिद्ध झालें आहे.

राजानक रत्नकंठ हा केवळ नक्कल करणारा नसून चांगला चाणाक्ष विद्वान होता. त्यानें नक्कल समजून व फार काळजीपूर्वक केली आहे. पहिल्या सहा सात

तरंगांतील प्रतींत म्हणण्यासारखीं अशुद्धें नाहींत. त्यांतील कांहीं खंड पडलेले काळजी-पुरस्सर भरलेले आहेत व उरलेले पुढें कल्हणाच्या मूळच्या दुसऱ्या एका प्रतीच्या प्रत्यंतरानें दुरुस्त केले गेले आहेत.

या प्रतीमध्यें आठव्या तरंगांत फार अशुद्धें व खंड आढळतात. राजानक रत्नकंठानें ज्या प्रतीवरून नक्कल केली, तिच्यांतच ते दोष होते असें म्हटलें पाहिजे. त्याच्यांतील सुटलेल्या भागाची दुरुस्ती दुसऱ्या प्रतीवरूनहि क्वचित केलेली आहे. अपपाठ, चुका, लेखक प्रमाद, याचा भरणा शेवटीं शेवटीं अधिकच होत जातो. त्या भागाच्या नकलाहि फारशा झाल्या नसाव्या कारण त्यांतील सर्वविश्रुत व कांहींसा नीरस भाग वाचण्याची लोकांमध्ये तितकी आतुरता उरलेली नसावी. यामुळें ताडून तपासून पाहण्याला अधिक प्रतीही मिळाल्या नसतील. भूर्जपत्रावरील प्रतींची शेवटची पुष्कळशीं पानें लौकरच खराब व त्रुटित होण्याचा संभव असल्यानें, जुन्या प्रतींतून तीं पानें पूर्ती मिळालींही नसतील.

डाक्तर स्टीनसाहेबांनीं छापील प्रतीला याच प्रतीचा आधार घेतला आहे. तिच्यांत राजानक रत्नकंठ व दुसरेही कांहीं वाचक यांनीं जागजागीं टीपा, टीका, पाठभेद व दुरुस्त्या दिल्या आहेत व ती एका विद्वान लेखकानें लिहिली असल्या-मुळें तिचें विशेष महत्त्व आहे.

हिच्याशिवाय आणखीही एक प्रत तरुडे भट्ट हरक, याच्या हातची त्यांनीं उपयोगांत आणली आहे. ती राजानक रत्नकंठाच्या प्रतीची नक्कल असून तिच्यांत भट्ट हरक यानें काळजीपूर्वक पुष्कळशा दुरुस्त्या करून बऱ्याच टिपण्या व टीका दिल्या आहेत. तो राजानक रत्नकंठाचा सोबती किंवा शिष्य असावा. त्यानें, राजानकानें लिहिलेल्या दुसऱ्याही बऱ्याच पोथ्या शुद्ध करून, जागजागीं अर्थ विशद केला आहे-

महाभारताच्या एका प्रतीचें ४०००० दीनारांचें एक खरेदीपत्र त्याच्या हातचें लिहिलेलें सांपडलें आहे. त्या खरेदीपत्राची मिति अश्वयुज शुद्ध अष्टमी लौकिक वर्ष ५८ किंवा गुरुवार तारीख १० जुलाई सन १६८२, ही दिलेली आहे. त्यावरून तो राजानक रत्नकंठ याचा समकालीन होता, हे सिद्ध आहे.

याशिवाय डाक्तर स्टीन यांना आणखीहि एक स्वतंत्र पण त्रुटित प्रत लाहोर येथून मिळाली. ती सुमारं १५० वर्षांची जुनी आहे. ती राजानक रत्नकंठ यानें ज्या मूळ प्रतीवरून नक्कल केली त्या प्रतीपेक्षां निराळ्या प्रतीची नक्कल आहे. तिच्यांत अपपाठ कमी असून टीपा दिलेल्या आहेत. त्या चांगल्या उपयोगी आहेत. ती मूळची काश्मीरांतच लिहिलेली एका काश्मीरी पंडित घराण्यांतली आहे. तें घराणें दिल्लीस राहाण्यास आलें, तेव्हां त्यांनीं ती बरोबर आणली होती.

अशा या तीनचार प्रतींचा काळजीपूर्वक उपयोग करून डाक्तर स्टीनसाहेबानीं आपली उत्कृष्ट संस्कृत आवृत्ति छापविली आहे.

## कल्हणाची कालगणना.

या काव्यांतील कालगणनेंत दोन ठळक भाग पडतात. पहिल्यांत पहिले तीन व दुसऱ्यात पुढील पांच तरंगातला काळ येतो. पहिल्यांत प्राचीन गोनंदादि घराण्यांतील राजांचा सुमारे कल्हणाच्या मतें ३०५० वर्षांचा काल येतो. त्यांच्यांत मुख्यत: राजघराण्यां, त्यातील राजांच्या नावाची यादी आणि थोड्याशा राजाविषयी पौराणिक व इतर कथा आहेत. त्याच्यासंबधाने पडताळा, इतर समकालीन आधारावरून पाहाता येत नाही. म्हणून त्याच्या खरंखोटेपणाविषयी निर्णय, त्यातील अतस्थ पुराव्याची चिकित्सा करूनच करावा लागतो.

चौऱ्या तरंगापासून कल्हणाने घडलेल्या विस्तृत व तपशीलवार गोष्टींचे वर्णन केलेलें आहे. त्यांतील अनेक मुख्य मुख्य प्रसगाचा पडताळा पाहाण्याला, नाणीं, शिलालेख, ताम्रपट, हिंदी व परस्थ ग्रंथकाराचे लेख, वगैरे बरीच साधनें आहेत.

कल्हणाची कालगणना ठराविक पद्धतीची व तपशीलवार असल्यानें, तिची छान व चिकित्सा सहज करता येते. ती जितकी चोख व विश्वसनीय होईल त्या मानानें या ग्रंथाचा विश्वसनीयपणा वाढेल, आणि त्यांच्यात दिलेल्या कालाचा तपशील खात्रीचा व समाधानकारक होईल. म्हणून या विशिष्ट कालगणना पद्धतीचें नीट परिक्षण होणें अवश्य आहे.

कल्हणाच्या या ग्रंथांकडे पाश्चात्य संस्कृतज्ञ लोक आदरानें पाहूं लागले, ते त्याच्यांतील विषयाची योग्यता किंवा यथार्थत्व यांच्यापेक्षा, त्या गोष्टी बाह्यतः सयुक्तिक व खऱ्या कालगणनेला धरून दिलेल्या आहेत, यामुळे होय. साऱ्या संस्कृत वाङ्मयात बहुतेक ऐतिहासिक वर्ण्य गोष्टींच्या खऱ्या व तपशीलवार मित्या आणि वर्षे देण्याच्या संबंधांत हा राजतरंगिणी ग्रंथ अद्वितीय आहे. म्हणून हिंदुस्थानाच्या ज्या इतर भागाविषयीं असा तपशीलवार इतिहास मिळत नाही, त्याच्या इतिहासातील ठळक ठळक गोष्टींचा कालनिर्णय करण्याला, हें एक चागले व विश्वसनीय साधन आहे, अशी कांहीं काळ समजूत झालेली होती आणि त्यामुळे त्याच्याविषयी विचार करणाऱ्यानी या मित्यांच्या खरेखोटेपणाचा निर्णय करण्याचा पुष्कळ प्रयत्न केलेला आहे. पण त्या साऱ्या परिश्रमाचा व विचाराचा परिणाम घोटाळ्याचा व असमाधानकारकच दिसून येतो. तरी याची जबाबदारी कल्हणावर टाकता येत नाही. पाश्चिमात्य विद्वानांच्या हातून असा प्रकार झाला तो त्यांना मिळालेल्या राजतरंगिणी ग्रंथाच्या अशुद्ध व त्रुटित प्रती आणि त्यांनी गैरसमजुतीने त्यांच्यांतील कालगणना पद्धती खरी मानली

यामुळेंच झाला होता. त्याचप्रमाणें त्यांनी पुढें प्राचीन इतिहाससंबंधानें राजतरंगिणी ग्रंथाव्यतिरिक्त ग्रंथावरून अनुमानें काढली तींहि भ्रममूलक निघालीं.

या ग्रंथांतील कालगणनेसंबंधाची अडचण मुख्यतः प्रो. बुल्हर यांच्या परिश्रमानें निघाली आहे. त्यांनीं एतद्विषयक आपल्या रिपोर्टांत राजतरंगिणीचा शुद्धपाठ व तिच्यात उपयोगांत आणलेला सप्तर्षि किंवा लौकिक शक याच्याविषयीं उत्तम खुलासा केला आहे. पूर्वीच्या पाश्चात्य विद्वानांनीं या बाबतींत काय काय तर्क केले होते, त्यांच्याविषयीं आतां निरुपयोगी असें विवेचन करण्यापेक्षां, कल्हणानें आपल्या ग्रंथांत दिलेल्या कालगणनेसंबंधानें कोणची पद्धत स्वीकारली आहे व तिच्यात काय दोष आहेत आणि त्यानें दिलेल्या मित्या कितपत विश्वसनीय आहेत, याविषयींच विचार करणें बरें.

पहिले तीन व चौथ्या तरंगाचा बराचसा भाग, यांच्यांत ढोबळ मानानें प्रत्येक कारकिर्द किती वर्षांची झाली, इतकीच माहिती दिलेली असून, पुढील भागांत बहुतेक प्रमुख गोष्टींच्या मित्या, लौकिक शकाचे वर्ष व बऱ्याच जागीं तिथी व महिनेही दिलेले आहेत. त्या मित्या लौकिक शकाचें वर्ष ३८८९ पासून, म्हणजे ता. ७ मार्च ई. स. ८१३ पासून-लौकिक शक ४२२५ म्हणजे ई. स. ११४९–५० पर्यंत दिलेल्या आहेत. यातील पहिल्या मितीला चिप्पट जयापीड राजा वारला व दुसऱ्या वर्षी राजतरंगिणी ग्रंथ समाप्त झालेला आहे. हे लौकिक शक देताना कल्हणानें पूर्वीपासून काश्मीरांत चालत आलेल्या पद्धतीप्रमाणे शेकड्याचे अंक दिलेले नाहींत. तरी यामुळें त्या मित्याच्या ई. सनाच्या तारखा काढण्याला कांहीं हरकत पडत नाहीं. कारण कल्हणानें आपला ग्रंथ रचण्याचा काल लौकिक व चालू शक संमतांतही दिलेला आहे. हा लौकिक शक काश्मीर व आसपासचीं जंबा, मंडी, कांगडा, वगैरे पहाडी संस्थानें, यांच्यात हल्लींसुद्धां चालू आहे.

तो शक कलि संवत २५ संपून २६ व्या वर्षाचा चैत्र शुद्ध प्रतिपदेला, म्हणजे ई. सनाच्या पूर्वी ३०७५–७६ या वर्षी सुरू झाला, असें प्रो. बुल्हर यांनीं, काश्मीरी ब्राह्मणांमधील चालू दंतकथा व इतर पुरावा, यांवरून ठरविलें आहे. ( अल्बिरुनीनें आपल्या कैफियतींत काश्मीरांतील कालगणनेसंबंधीं केलेल्या वर्णनावरून, त्यालाहि तेथील चालू पद्धति माहित असल्याचें दिसतें. )

हा शोध लागल्यापासून हिंदी कालगणनांविषयक ग्रंथांमध्यें लौकिक शकासंबंधीं खरी माहिती देण्यांत येऊं लागली आहे. त्या शकांतील वर्षारंभ चांद्रसौर संमिश्र मानाच्या चैत्र शुद्ध प्रतिपदेला होतो व महिने पौर्णिमांत असतात. हीच पद्धत कल्हणानें स्वीकारलेली आहे.

यामुळें कल्हणानें शेवटच्या चार तरंगांत दिलेल्या मित्या आतां पक्क्या

ठरवितां येतात. त्या अगदी खऱ्या आहेत असें मानण्याला प्रत्यवाय नाहीं. त्या कालासंबंधीं उपलब्ध बाह्य पुराव्यावरूनहि याला पुष्टि मिळते.

कल्हणानें चिप्पट जयापीड राजाच्या मरणाची दिलेली मिती काश्मीरच्या इतिहासांत एक प्रमुख मुद्यांची गोष्ट झाली आहे. त्या नंतरच्या दिलेल्या मित्या तपशीलवार आहेत. त्या परस्परावर अवलंबून नाहीत. यामुळे एखाद्या मितींत चूक असली तर तिचा परिणाम पुढील मित्यांवर होत नाहीं.

पण पूर्वीच्या कालासंबंधीं प्रकार अगदीं निराळा आहे. त्याच्यांत मित्या न देतां फक्त प्रत्येक कारकिर्दीची मानीव मुदत दिलेली आहे. त्यावरून चिप्पट जयापीडाच्या मरणाच्या मितीमागें, किंवा कल्हणानें धरलेल्या लौकिक शकाच्या निवळ काल्पनिक दंतकथामूलक, आधारावरून धरलेल्या शकारंभापासून पुढे, मोजीत आले पाहिजे.

यापूर्वीच्या कालगणनेंसंबंधानें कल्हणानें वास्तविक वर्णनाच्या शेवटीं खुलासा केलेला आहे.

वराह मिहिरानें आपल्या बृहत्संहितेंत दिलेल्या युधिष्ठिराच्या राज्यभिषेक कालापासून, म्हणजे कलियुगाच्या ६५३ व्या वर्षापासूनच, त्यानें आपल्या कालगणनेंचा प्रारंभ धरला आहे व काश्मीरांतील विस्मृति सागरांत मग्न झालेल्या अशा राजांपैकीं पहिला गोनंद राजा, त्याच दिवशीं गादीवर बसला, असें त्यानें गृहीत केले असून, याला नीलमत पुराणाचा आधार आहे, असे त्यानें म्हटलें आहे. ( हल्लीं हें नीलमत पुराण त्रुटित उपलब्ध आहे. त्याच्यात गोनंदाविषयीं स्पष्ट उल्लेख नाहीं. तरी त्याच्या प्रारंभीच्या कांहीं श्लोकांत गोनंदानंतरच्या तींघा राजांविषयींच्या उल्लेखावरून कल्हणानें गोनंदाविषयींची माहिती त्या पुराणाच्या वरूनच घेतली होती, असें स्पष्ट होतें. )

दोन्ही राज्याभिषेक एकाच दिवशीं झाले, हे कशावरून, हें कोठें स्पष्ट झालेले नाहीं. पण कल्हणाला उपलब्ध असलेल्या नीलमत पुराणाच्या प्रतींतील पाठाअन्वयें, पहिला गोनंद, हा कौरव पांडवाचा समकालीन मानला जात होता, असें दिसतें.

पुढें कल्हणानें पहिल्या तरंगात गोनंदापासून झालेल्या राजाचें वर्णन केले आहे. त्या सर्वांच्या कारकिर्दी मिळून २२६८ वर्षे होतात, असेंहि त्यानें धरलें आहे. पण तसें करण्याला त्यानें कांहींच खात्रीजोगीं प्रमाणे दिलेलीं नाहीत. ही गोष्ट त्याच्या पुढील कालगणनेला मुख्य आधारभूत आहे. ती खरी असें सिद्ध करण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे. त्यावरून त्याला त्याचें महत्व माहित होतें, असें दिसतें. ती वर्षसंख्या खरी आहे, असें सिद्ध करण्यासाठीं, तो या वर्षसंख्येंत ६५३ वर्षे—कलियुगाच्या आरंभापासूनचीं—व त्या नंतरच्या सर्व राजाच्या कारकिर्दींची गोळा बेरीज १३२८ वर्षे, मिळून ठीक ४२४९ वर्षे होतात, किंवा शके १०७०, म्हणजे आपल्या ग्रंथांच्या प्रस्तावनालेखनाचा काल येतो, असें त्यानें दाखविलें आहे.

ण हा २२६८ वर्षांचा काल बरोबर नाहीं, असें कांहीं ग्रंथकारांचें म्हणणें आहे, असेंही त्यानें म्हटले आहे आणि याचें कारण भारतीयुद्ध द्वापरयुगाच्या शेवटीं किंवा कलियुगाच्या प्रारंभीं झालें होतें, असें त्याचें म्हणणें आहे, ही गोष्टहि त्यानें लेहिली आहे. यावरूनहि गोनंदाच्या राज्यारोहणाची मिती व एकंदर कारकिर्दीचा २२६८ वर्षांचा काल, हे दोन्ही कल्हणानेंच गृहीत केलेले नसून, ते पूर्वीपासून मान्य करण्यात आले होते, हे उघड आहे. पण त्याला आधार काय होते, ते उपलब्ध नाहींत. ते लोक आपल्या म्हणण्याला काय प्रमाणे देत होते, ते व कल्हणाच्या मतं ते आधार कसे खोडून काढता येत होते, ते याविषयीं कल्हण हा मुग्ध असल्याने, अधिक विवेचन करण्याला मार्ग नाहीं.

या कालगणनेसंबंधाने कल्हणाच्या प्रस्तावनेत• वरच्याशिवाय आणखीही दोन विधानें आढळतात. कल्हणाने हा ग्रंथ लिहिला त्या वेळेसंबंधाने, म्हणजे शक संवत १०७० पर्यंत तिसऱ्या गोनंदापासून, एकंदर २३३० वर्षे गत झाली होती. हे एक आणि विस्मृतिसागरात मग्न झालेल्या ५२ राजाच्या कारकिर्दीची वर्षे १२६६ झाली होती, हे दुसरें.

कल्हणाने तिसऱ्या गोनंदाच्या कारकिर्दीपासूनच, प्रत्येक कारकिर्दीची एकंदर वर्षसंख्या देण्याला प्रारंभ केला आहे. त्याला पूर्वीच्या राजांच्या यादी, पूर्वीच्या ग्रंथकारांपासूनच उपलब्ध झाल्या, त्या या राजापासूनच. त्या कारकिर्दीच्या एकंदर वर्षांची बेरीज १२६६ येते खरी, पण प्रत्येक कारकिर्दीची वर्षेही त्याने त्या पूर्वीच्या ग्रंथकारांच्या लेखावरूनच घेतली किंवा कसें, तें त्यानें स्पष्ट केलेलें नाही. म्हणून त्या ग्रंथकारांनाहि कल्हणाच्या गणनेप्रमाणे तिसऱ्या गोनदाच्या राज्यारोहणाचें वर्ष इ. स. पूर्वी ११८२ येतें, ही गोष्ट माहित व मान्य होती किंवा कसें, ते कळण्याला मार्ग नाहीं.

नष्टस्मृति झालेल्या ५२ राजांनीं १२६६ वर्षें राज्य केले, ही गणना कल्हणानें स्वतःच केलेली आहे, असे त्याच्या लिहिण्याच्या रोखावरून दिसते.

यावरून असे दिसून येते कीं:—

१ कल्हणाने आपली कालगणना पहिल्या गोनंद राजाच्या काल्पनिक मितीपासून सुरूं केली आहे व या पौराणिक राजाचा काल भारतातील एका सुप्रसिद्ध घटीशीं कसा तरी जोडून दिला आहे.

२ विशेष आधाराशिवाय एकाच घराण्यातील राजांनीं सारखें २२६८ वर्षें राज्य केले व त्या घराण्यांत ५२ राजे, प्राचीन ग्रंथकारांच्या मतानें विस्मृतिसागरात बुडप झाले होते, ही गोष्टहि खरी धरावी लागते.

३ तसेच काहींही आधार न पाहतां तिसऱ्या गोनंदापासून कल्हणाच्या काळापर्यंतच्या राजांच्या कारकिर्दीच्या वर्षांची ठोकळ बेरीज २३३० वर्षे, असेंही मानावे लागतें.

कल्हणानें पहिल्या तीन तरंगांतील कांही राजाच्या कारकिर्दीची तपशीलवार वर्षे दिली आहेत. यावरून वरील तीनी गोष्टीमुळे, कल्हणाच्या कालगणना पद्धती-संबंधाने येणारा आक्षेप व संशय कमी होतो, असे नाही. हा तपशील देण्याला तिसऱ्या गोनंदाच्या कारकिर्दीपासूनच सुरवात आहे. पूर्वीच्या ग्रंथकाराकडून कल्हणाला याच राजाचें नाव पहिले म्हणून उपलब्ध झालें आहे. त्याच्या पूर्वीच्या नष्ट स्मृति ५२ राजाच्या संबंधांत कलियुग वर्ष ६५३ आणि पहिल्या गोनंदाच्या राज्या-रोहणाचे वर्ष, कलियुग वर्ष १९१९, याच्याशिवाय त्याने एकहि मिती दिलेली नाही. त्या बावन्न राजापैकी सत्रा राजाचीं नांवे त्याने तीन निरनिराळ्या आधारा-वरून घेतली आहेत. तेव्हा त्यांच्या कारकिर्दीवरून या ५२ राजांच्या कारकिर्दीची सरासरी वर्षे काढण्याचे कांही पाश्चिमात्य विद्वानांनी प्रयत्न केले, ते अर्थातच निरुपयोगी झाले आहेत. तीं नांवें कल्हणाने तीन निरनिराळ्या श्लोकांत व क्रमात ज्या जागी घुसडली आहेत, त्याला त्याच्याच लेखावांचून दुसरा आधार नाही. तिसऱ्या गोनंदापुढील राजांच्या कारकिर्दीची हकीकत दिसण्यांत तपशीलवार व खरीशी दिली आहे. पण बारकाईने जाच करता, या तपशीलामुळेच शंका घेण्याला जागा होते. पहिल्या तीन राजघरा-ण्यांतील ३७ राजाच्या कारकिर्दीची वर्षे १७८४ होतात. म्हणजे एकेक कारकिर्द सरासरी ४८ वर्षांहून अधिक पडते, ती असंभवनीय आहे, असें डॉ. विल्सन, यांनी फार वर्षांपूर्वी लिहिलें आहे. या सरासरीमुळें विवक्षित कारकिर्दीची वर्षे दिलेली आहेत, त्यांच्यावर विश्वास ठेवता येत नाही. या सरासरीच्या असंभवनीय-तेचें प्रत्यंतर, शेवटच्या चार तरंगांतील राजघराण्यातील राजांच्या कारकिर्दीच्या सरासरीवरूनहि मिळते. या सर्व ५० कारकिर्दींमिळून ५४७ वर्षे होतात. म्हणजे एकेक कारकिर्द ११ वर्षांची पडते. आणि त्यांच्यातील एका घराण्यांतील—सात या तरगांतील लोहरच्या राजघराण्याची—कारकिर्दीची जास्तीत जास्ती सरासरी १६ वर्षां-पेक्षा थोडीशी अधिक बसते.

विवक्षित कारकिर्दीच्या वर्षांविषयी विचार केला तर कल्हणाच्या या काल-गणनेच्या यथार्थ स्वरूपाविषयींची शंका अधिकच दृढ होते.

पहिल्या तरंगातील पिता व पुत्र अशा परंपरेने गादीवर बसलेल्या—हिरण्यकुल, वसुकुल, मिहिरकुल व बक या—चार राजाच्या कारकिर्दी, प्रत्येकी साठसाठ वर्षांवरच्या दिलेल्या आहेत. पहिल्या गोनंदाच्या कुलापैकी २१ राजांतून ८ राजांनी प्रत्येकी ६० पासून ७० वर्षे राज्य केले असें लिहिले आहे. त्यापैकी एक राजा बक, याची कारकिर्द ६३ वर्षे व कांही दिवसांची होती, असेंही कल्हणानं लिहिलें आहे. पण यावरून एतद्विषयक शंका कमी होते असें नाही.

या सर्वांत विलक्षण गोष्ट म्हटली म्हणजे, कल्हणानें तिसऱ्या तरंगांत रणादित्य राजाची कारकिर्द ३०० वर्षांची दिली आहे, ही होय. ही कारकिर्द इतकी मोठी

ती किंवा असावी, याविषयीं अनेकांनीं अनेक कल्पना लढविल्या आहेत, नाहीं सें नाहीं, पण त्यांत कांहीं अर्थ नाही. खरोखर पाहातां या दीर्घ अवधींत श्मीरच्या इतिहासामध्यें एक मोठा खंड पडलेला आहे. त्याचें विवेचक दृष्टीने सणारें महत्व आजवर कोणाच्या लक्षात नीटसें आलेले नाही.

कल्हणाच्या दृष्टीनें रणादित्य आणि कर्कोटक कुलातील पहिला राजा दुर्लभ-र्धन याच्यामध्यें ७९ वर्षें गेलीं. पण याविषयीं मिळालेल्या स्वतंत्र पुराव्याअन्वये र्लभवर्धनाच्या कारकिर्दीचा ( सं ६०० ते ६३६ ) राजतरंगिणींतील कालगणने-माणें येणारा काल यांच्यात २५ वर्षांपेक्षा जास्त फरक नाहीं. तेव्हां कल्हणाने ढलेल्या खऱ्या काळाच्या सुरुवातपासून रणादित्याचा काळ फारसा प्राचीन नसता-हि तो ही कारकीर्द ३०० वर्षांची मोठी होती असे लिहितो व तिच्या विलक्षण-णाबद्दल तो संशयाचें किंवा आक्षेपाचें एक अक्षर लिहीत नाहीं, हेच त्याच्या चिकित्सक विवेचनपद्धतीचें उत्कृष्ट उदाहरण होय व यावरून त्यानें पूर्वींच्या थांवरून वगैरे उपलब्ध झालेल्या कालगणनाविषयक उल्लेखाची फारशी छान केली हीं, असें स्पष्ट म्हणावें लागते. म्हणूनच त्याच्या इतिहासकार या दृष्टीनें योग्यते-षयीं, पूर्वींचें विवेचन गैर नाहीं, असें दिसून येईल. ही गोष्ट त्याच्या भोंवतालच्या त्याच्या मानासिक परिस्थितीला अनुसरून व अनुरूपच असल्यामुळे त्याला त्याबद्दल रशी नांवें ठेवतां येत नाहीत.

पहिल्या तरंगात ५४ राजांचे वर्णन आलेले आहे. त्यांपैकीं फक्त सहा जांचा थोडाबहुत उल्लेख इतर ऐतिहासिक वगैरे लेखांमध्ये आढळतो. त्यांच्या-षयीं कल्हणानें केलेल्या अनुक्रमाच्या अनुरोधाने विचार करून पाहता, त्यांच्या-ल पहिला राजा अशोक याचे व त्याच्यानंतरच्या चार राजांचीं नांवें कल्हणानें छिल्लाकराच्या ग्रंथातून घेतली आहेत. खुद्द छविल्लाकरानेंच 'हीं नांवें प्राचीन थकारांनी विस्मृति सागरांत मग्न झालेल्या ५२ राजांच्या नांवांमधून उधृत केलीं तीं,' असे लिहिलें आहे. तेव्हां अशोक हा ज्यांच्या कारकिर्दीचीं नांवें कल्हणानें लीं आहेत, त्या राजाच्या यादीबाहेरचा ठरतो. त्याच्या व तिसऱ्या गोनंदाच्या ध्यें किती पिढ्या गेल्या, तेंहि कल्हणाने कोठें स्पष्ट केलेले नाही. तरी या ग्रंथाल लेल्या राजपरंपरेअन्वयें कल्हणाच्या मते अशोक राजा गतकालि ११९१–इ. स. र्वी ११८२–वर्षांच्या पुष्कळ पूर्वी होऊन गेला, असे दिसते. पण हिंदुस्थानांतील चीन कालगणनेमध्यें अशोकाचा काल ही एक ठाम निश्चित झालेली अशी गोष्ट आहे. च्याविषयींचा अत्यंत विश्वसनीय पुरावा म्हणजे त्यानें जागजागीं उभे करविलेले, चीं शासनें कोरलेले स्तंभ हे होत. त्याच्यावरून तो इ. स. पूर्वी तिसऱ्या शत-च्या मध्याच्या सुमारास राज्य करीत होता, तो बौद्ध धर्माचा मोठा पुरस्कर्ता

होता व त्याचे नांव सर्व बौद्धवाङ्मयांत प्रसिद्ध होते, या गोष्टी निश्चित आहेत. कल्हणाच्या वर्णनावरून त्यानें वर्णिलेला व हे स्तंभ उभे करणारा बौद्ध, अशोक एकच यांत शंका नाही. त्याअर्थी कल्हणाचें वर्णन खरें धरलें तर, तो या निश्चित कालापूर्वी १००० वर्षें होऊन गेला, असे मानावें लागते.

त्याचप्रमाणें हुष्क, जुष्क व कनिष्क या तीन तुरुष्क राजांचीं नांवेंहि कल्हणानें छविल्लाकराच्या यादींतूनच घेतलेलीं आहेत. त्या तिघांनी बरोबरच राज्य केलें असेंहि त्याने वर्णन केलें आहे. त्यांतील कनिष्क व हुविष्क हे दोघेहि थोर व प्रसिद्ध अशा 'कुशन' कुलांतील राजे होते, असे त्यांचे शिलालेख व नाणीं यांच्यावरून सर्वमान्य व निश्चित झालेले आहे. कनिष्क व त्याच्या मागून गादीवर बसलेला हुविष्क, याचा नक्की काल अद्यापि निश्चित झालेला नाहीं. कनिष्क हा शालिवाहन शकाच्या प्रारंभीं ई. स. ७८ च्या सुमारास झाला, असें कांहीं दिवस समजलें जात होतें. पण चीनी ग्रंथांतील नवीन उपलब्ध पुराव्यावरून. तो ई. सनाच्या प्रारंभीं झाला, असें आतां मानतात. पुढें याविषयीं कांहीं नवीन पुरावा मिळो न मिळो, पण हल्लींच्या स्थितीत तो इ. सनाच्या प्रारंभाच्या पुढे मागे शंभर वर्षांपेक्षां अधिक वर्षे झाला नाहीं, असे खात्रीने म्हणतां येते. पण कल्हणाने तो तिसरा गोनंद याच्या पूर्वीचा अभिमन्यू, याच्याहि पूर्वी म्हणजे ई. सनापूर्वी ११८२ वर्षे झाल्याचें लिहिले आहे, यांत ११०० वर्षांचा फरक येतो.

याच्यानंतर कल्हणाच्या वर्णनांतील पहिल्या गोनंद कुलांतील राजा मिहिरकुल, याच्यासंबंधांतहि असाच चमत्कारिक प्रकार दिसून येतो. त्याच्याविषयींही इतर ऐतिहासिक प्रमाणांवरून माहिती उपलब्ध आहे. कल्हणाने वर्णन केलेला हा अतिशय दुष्ट व क्रूर काश्मीरी मिहिरकुल राजा आणि त्याच नांवाचा श्वेतहुणांचा राजा, हे निःसंशय एकच होत. त्याच्याविषयींचे चीनी लेख, शिलालेख व नाणीं यांच्यावरून, त्यानें पश्चिम पंजाब व काश्मीर वगैरे भागांवर ई. सनाच्या सहाव्या शतकाच्या पूर्वार्धांत राज्य केले, असे फ्लीटसाहेबांनी ठरविलें आहे. पण तिसऱ्या गोनंदाच्या मागून झालेल्या राजांच्या कारकिर्दींचीं कल्हणाने दिलेलीं वर्षें पाहता, मिहिरकुलाचा काल ईसवी सनापूर्वी ७०४ ते ६३४ वर्षे हा येतो. म्हणजे सुमारें १२०० वर्षांचें अंतर पडते.

पहिल्या तरंगांतील आणखी एका राजाविषयीं—तिसऱ्या गोनंदानंतरच्या एकोणिसाव्या गोकर्ण राजाचा पुत्र पहिला नरेंद्रादित्य—या राजाविषयींहि नाण्यावरून पुरावा मिळतो. त्याचेच 'खिंगिल' असे निराळे नाव असलेलें एक श्वेतहूणीय जुने चादीचें नाणे मिळालेलें आहे. ते ईसवी सनाच्या पांचव्या सहाव्या शतकांतलें असावे. पण कल्हणानें त्याचा काल ईसवी सनापूर्वी २५० ते २१४ दिला आहे.

कल्हणानें दुसऱ्या तरंगांत दिलेल्या राजाच्या कालाचा पडताळा पाहाण्याला साधन नाहीं. कारण त्याच्यातून कोणाचेंहि उल्लेख इतर ऐतिहासिक ग्रंथात अद्यापि मिळाले नाहीत.

तिसऱ्या तरंगांतील राजाच्या नावामध्यें स्वतंत्र ऐतिहासिक पुरावा उपलब्ध असलेलीं कांहीं नांवें आहेत. पण कल्हणानें जो काल दिला आहे त्याच्यातहि असाच फरक व घोटाळा असल्याचें आढळतें. तेव्हा कल्हणाने आपल्या काळाच्या अवळच कर्कोटक राजवंशीयांच्या नुकतेंच पूर्वी होऊन गेलेल्या राजाचे काल ठरविण्यांतसुद्धा इतका हलगर्जीपणा केलेला पाहून, त्याच्या चिकित्सक व विवेचकपणाबद्दल संशय घेण्याला जागा होते. कल्हणानें तोरमाण हा हिरण्य राजाचा भाऊ व त्याच्या बरोबरच राज्य करीत होता, असें वर्णन केले आहे. तो ऐतिहासिक आहे यांत शंका नाहीं. एका तोरमाणाचीं ताम्याचीं नाणीं, काश्मीरात पुष्कळशीं सापडतात. तो व कल्हणाचा तोरमाण एकच असावा. कल्हणाच्या हिशेबीं त्याची कारकिर्द ई. सनाच्या पहिल्या शतकात येते. हा तोरमाण मिहिरकुलाचा पिता किंवा दुसरा कोणी असो, त्याच्या नाण्यावरून त्याचा काल इसवी सनाच्या अलीकडे चार पाचशे वर्षे येतो.

सुप्रसिद्ध व थोर हर्षविक्रमाचा कल्हणानें उल्लेख त्याच्या पुढील मातृगुप्ताच्या कारकिर्दीसंबंधाने केलेला आहे. त्यावरून त्याच्या कालातहि अशीच चुकी झालेली आढळून येते. कल्हणानें पूर्वीच्या ग्रंथकारांना अनुसरून तो व शककारि विक्रमादि एकच, असें धरले आहे व त्याचा काल इसवी सन ७८ दिला आहे. पण पुढे त्यानेच तो हर्ष प्रतापशील शिलादित्याचा पिता होता असेंहि लिहिले आहे. हा शिलादित्य सुमारें ई. स. ५८० मध्ये माळव्याचा—उज्जनीचा—राजा होता. असें चीनी प्रवासी व्हेनत्संग याच्या लेखावरून ठरले आहे. कारण त्याने तो आपल्या पूर्वी सुमारें ६० वर्षे होऊन गेला व त्याने ५० वर्षे राज्य केले, असे वर्णन केलेले आहे. त्याचा पिता हर्षविक्रम, याची कारकिर्द, ई. सनाचा ६ व्या शतकाच्या पूर्वार्धात. म्हणजे कल्हणानें दिलेल्या काळाच्या अलीकडे ५०० वर्षे येतें.

दुसऱ्या प्रवरसेन राजाच्या कारकीर्दीच्या संबंधांतहि हाच प्रकार आढळतो. तो तोरमाणाचा पुत्र होता, तो मातृगुप्ताच्या मागून गादीवर आला असें कल्हणानें लिहिले आहे. त्याचे ऐतिहासिक अस्तित्व व त्याचा काळ, त्याची नाणीं व त्याने केलेली श्रीनगराची स्थापना, यांच्यावरून निश्चित आहे. त्याच्या नाण्यावर गुप्तकालीन अक्षरें आहेत, आणि त्यांची बनावट बहुतेक तोरमाणाच्या नाण्यासारखी आहे. यावरून तो ई.सनाच्या सहाव्या शतकांत पाडला गेल्याचे ठरते. हीच गोष्ट व्हेनत्संगाच्या वर्णनावरूनहि सिद्ध होते. व्हेनत्संग ६३१त प्रवरसेनानें स्थापलेल्या या नव्या राजधानींत गेला होता. त्याने त्याला नवें नगर आणि पूर्वीच्या राजधानीला पुराणाधिष्ठान म्हटले आहे.

चौ-या तरंगाच्या शेवटी कल्हणाने चिप्पट जयापीढ राजाच्या मृत्यूचें वर्ष क शकांत दिले आहे व त्याच्या पुढील राजाविषयी त्याच शकानील वर्ष व मित्या ला आरंभ केला आहे. त्या मित्याचा पडताळा पाहाण्याला आपणाला चीनी ऐतिहासिक लेखाचे साधन आहे. त्यापैकी विशेष महत्वाचा उल्लेख, चंद्रापिड राजानें चिनी दरबाराकडून ई. स. ७१३ साली अरबीफौजेविरुद्ध सैन्याची मदत मागण्या त्या दरबारात वकील धाडले होते, त्या विषयीचा होय. त्यातच असेंही ले आहे कीं, पुढे ई. स ७२० मध्ये चंद्रापीडाच्या विनंतीवरून त्याला चीन दरबाराच्या गादीत राजा ही पदवी दिली गेली. तेव्हा चंद्रापीडराजा ई. स. ०वर्षी जिवंत असावा, असे दिसते. कल्हणाच्या हिशेबानें त्यानें ई. स. ६८६ ते ६९५ पर्यंत राज्य केलें. यात २५ वर्षांचा फरक येतो व तितकी कल्हणाच्या गणनेंत दुरुस्ती करावी लागते. पूर्वीच्या अवाढव्य चुका व फरक याच्या मानानें २५ वर्षांची चुकी विशेष नाहीं. असाच एक उल्लेख मुक्तापीडानें, चीनी दरबाराकडे ई. स. ७३६ते ७४७ च्या दरम्यान वकील पाठविले होते, तत्संबंधी आहे. त्याहि या २५ वर्षांच्या दुरुस्तीनें मेळ बसतो. इतकाच फरक पुढील राजांच्या कारकिर्दीच्या वर्षसंबंधींहि आढळतो.

अवंतिवर्मा राजा गादीवर बसल्यापासून पुढे सर्व कारकिर्दीच्या तारखा अचूक या आहेत. प्रत्येक कारकिर्द कधींपासून कधीं पर्यंत झाली, ते तपशीलवार लिहिले . ही माहिती कल्हणानें समकालीन लेखी आधारावरूनच घेतलेली असावी. या विरुद्ध अद्यापि कांहीं पुरावा मिळालेला नाहीं. या सर्व विवेचनावरून असे दिसते कीं,

१ पहिल्या तरंगातील कल्हणाची कालगणना विश्वसनीय नाहीं, कारण ती पौराणिक दंतकथा व काल्पनिक अनुमानावरून दिलेली आहे. दुसऱ्या व या तरंगातील कालगणनेचाहि बहुतेक तोच प्रकार आहे.

२ चौ-या तरंगातील कर्कोटक राजवंशीक राजांच्या कारकिर्दीच्या कालगणनेंत २५ वर्षांचा फरक आहे, पण तो विशेष विचार करण्यासारखा नाहीं.

३ शेवटच्या भागांतील, म्हणजे तरंग ५ ते ८ मधील, राजाच्या कारकिर्दीची गणना तपशीलवार व विश्वसनीय आहे.

पुढे नवीन जुनी नाणीं, शिलालेख, ताम्रपट वगैरें सांपडून, पहिल्या तीन तरंगांतील ांच्या कारकिर्दीच्या कालावर कदाचित जास्त प्रकाश पडला तरी, त्याकामी या ाच्या ग्रंथाचा उपयोग होण्याची मात्र मुळींच आशा धरतां येत नाहीं.

*

॥ श्रीसांब प्रसन्न ॥

महाकवि कल्हणकृत.

# राजतरंगिणी.



## तरंग पहिला.



### मंगलाचरण

आभरणभूत सर्प, फणामणिरत्नाच्या किरणजालाने शोभिवंत दिसणाऱ्या, व अगणित मुक्तजनानी आश्रित, अशा शंकरस्वरूपी कल्पवृक्षाला नमस्कार असो.

तृतीय नेत्ररूपी वन्हिशिखा किंवा केशर तिलकयुक्त भाल, क्रीडा करणाऱ्या सर्पांचीं आरक्त व चंचल मुखें किंवा हलणारी कुंडले, यानी शोभणारे कर्ण, जलधिज कालकूट, किंवा शंख, यांच्या कांतीमुळें नील व उज्वल भासणारा कंठभाग, आणि उत्तम कंचुक व अहिईन वासुकी यांनीं परिवेष्टित उरस्थळ, अशा त्या वृषाक अर्धनारीनटेश्वराचा, उजवा अथवा डावा, स्त्री किंवा पुरुषरूपी भाग सर्वांना कल्याणप्रद होवो.

**कविगुणवर्णनः**—श्रेष्ठ अशा कवींचे अवर्णनीय प्रतिभादि सुधाद्रवालाही मागे टाकणारे उत्तम गुण, अमृताहूनही श्रेष्ठ होत. कारण, अमृत प्राशनाने ते प्राशन करणाऱ्यांचें शरीर तेवढे अमर होतें. पण कविगुणद्योतक काव्यामृताच्या प्राशनानें, त्याच्या स्वतःच्या शरीराबरोबरच इतरांचीं शरीरं व मने प्रसन्न होतात. नानाविध रमणीय कल्पना सृष्टि रचण्याला समर्थ अशा कविरूपी विधात्यावाचून गतकालाला प्रत्यक्ष स्वरूप कोण देऊं शकतो? वाचकांना या सर्व वस्तूंचे सुलभ रीतीने ज्ञान करून देणारे, प्रतिभायुक्त व यथार्थ ज्ञान कवींना प्रथम अंतश्चक्षूपुढे उभे करावे लागते. तरच त्याच्या दिव्य दृष्टीचा दुसऱ्याच्या मनावर परिणाम होतो. याशिवाय तिचे दुसरें निदर्शन काय असणार?

**विषयनिर्देशः**--ग्रंथातील कथाभाग अतिशय विस्तृत असला तर, त्याच्यांत सारखे चमत्कृतिजनक प्रसंग येऊं शकणार नाहींत हें खरें, तरी, सहृदय वाचकाना त्याच्या वाचनानें आनंद वाटल्यावांचून राहणार नाही. अनुराग व द्वेष यांनीं अलिप्त, खरे गुणी, व भूतार्थांचें यथार्थ वर्णन करणारे, कवीच धन्य व श्रेष्ठ होत.

प्राचीन लेखकानीं संग्रहीत केलेल्या नानातऱ्हेच्या कथांचेंच या ग्रंथांत मी पुनः वर्णन करीत आहे. तरी यांतील खरा उद्देश लक्षात घेतल्याशिवाय, सज्जनांनीं त्याच्याविषयीं नाकें मुरडूं नयेत. पूर्वीच्या ग्रंथकारानीं आपल्या जवळच्या राजे लोकांच्या कारकीर्दीविषयीं विस्तृत वर्णन केलें आहे. त्याच्या खरें-खोटेंपणाविषयीं पूर्ण चौकशी करून, त्याची योग्य

खुळबाजुळंव करणें, हें कामहि कमी चतुराईचें आहे असें नाहीं. तसें करून, या ग्रंथांत त्या तुटक आधारांवरून यथार्थ वर्णन करण्याचा माझा हा प्रयत्न आहे. ( १० )

प्राचीन ग्रंथ फार विस्तृत होते. त्यांच्यावरून सुव्रत कवीनें आपला संकलित व सहज लक्षांत येणारा प्रबंध रचिला. तेव्हां ते ग्रंथ मागें पडले. तो प्रबंध चांगला प्रसिद्धीस आला. तरी तो क्लिष्ट व विद्वत्ताप्रचुर असल्यानें, त्याच्यावरून यथार्थ वस्तुप्रकाशन होत नाहीं.

महाकवि क्षेमेंद्र, याची नृपावलि सुंदर आहे. तरी तिच्यांत अनवधान हा दोष आहे. यामुळें ग्राह्यांश फार कमी आहे. ( क्षेमेंद्र, किंवा व्यासदास, हा अनंतदेव व कलश, या राजांच्या वेळीं इ० स०१०२९–६४ मध्यें होता. त्यानें पुष्कळसे ग्रंथ लिहिले. नृपावलि ग्रंथ हल्लीं उपलब्ध नाहीं. )

याशिवाय प्राचीन विद्वानांनीं रचिलेले ऐतिहासिक अकरा ग्रंथ व नीलमत पुराणही माझ्या साग्र वाचनात आलेलें आहे. ( नीलमत पुराणात काश्मिरांतील प्रसिद्ध क्षेत्रें व बरेच राजलोक, याची वर्णनें आहेत. तें हल्लीं उपलब्ध असून, त्याचा कल्हणानें जागजागीं उपयोग केलेला आहे. )

पूर्वीच्या राजांनीं केलेल्या नाना देव व नगरप्रतिष्ठा याविषयींचे शिलालेख, ताम्रपट, व प्रशस्तिपत्रें आणि तत्संबंधीं काव्यादिग्रंथहि पाहून, मी आपलें शंकासमाधान करून घेतलें आहे.

पूर्वीच्या ग्रंथकारांना पहिल्या बावन्न राजांसंबंधीं काहीं दाखले न मिळाल्याने ते सारे राजे विस्मृतिसागरात बुडाले. त्याच्यापैकीं–गोनंद, पहिला दामोदर, यशोवती व दुसरा गोनंद–हे चार राजे, नीलमत पुराणावरून उद्धृत केलेले आहेत.

हेलाराज या पाशुपत ब्राह्मण कवीचा बारा हजार श्लोकात्मक पार्थिवावलि ग्रंथ उपलब्ध आहे. ( या नांवाचा एक काश्मीरी कवि ई. स. च्या ९ व्या १० व्या शतकांत झाला. त्यानें लिहिलेल्या वाक्पदीय ग्रंथावरील टीकेचा कांहीं भाग उपलब्ध आहे. ) या पार्थिवावलीच्या आधारानें पद्ममिहीर कवीनें अशोकापूर्वीचे लव वगैरे आठ राजे, आपल्या ग्रंथात घेतले आहेत. त्याचप्रमाणे सुप्रसिद्ध छविल्लाकर कवीनें आपल्या ग्रंथांत त्या बावन्न राजामधून अशोका पुढील अभिमन्यू पर्यंत झालेल्या पांच राजांचा उल्लेख केला आहे. त्यावरूनच 'अशोकादभिमन्योर्यत्' हे श्लोक प्रसिद्ध आहेत. राजे लोकांच देश, राजे लोकांचा काल, उत्कर्ष व अपकर्ष याविषयी केलेलें माझें पुढील वर्णन, पूर्वीच्या वर्णनांतील बरेच दोष काढून टाकण्याला चांगले साधन होईल. नाना व्यवहारांनी युक्त असलेला कथासंदर्भ कोणत्या सहृदय सज्जनाला मनोहर वाटल्यावांचून राहील ? जीवन-मात्र क्षणभंगुर, हें लक्षात ठेवणाऱ्या सर्व सहृदय सज्जनांना, साहजिकच शांत रस आवडतो. तोच, या प्राचीन गोष्टींच्या वर्णनानें भरलेल्या ग्रंथांत प्रधान असणार. अशा या श्रेष्ठ अमृत-द्रवानें व इतर रसाच्या प्रवाहानें परम रमणीय व श्रेष्ठ झालेल्या या राजतरंगिणीचें सहृदय श्रोत्यांनीं आपल्या श्रोत्रशुक्तींनीं आकंठ प्राशन करावे.

**काश्मीर मंडळाचें वर्णनः**—कल्पारंभापासून सहा मन्वंतरें, हिमगिरीच्या अंतर्भागांत अथांगजलपूर्ण **सतिसर** नांवाचें महासरोवर होतें. ( हें **सतिसर**, तेथे राहाणारा असुर **जलोद्भव**, त्याचा नाश करून तें सरोवर ओसरवून तें वस्तीयोग्य करणारा **कश्यप**, यांचें सविस्तर वर्णन, **नीलमत** पुराणांत दिलेलें आहे. ) पुढे **वैवस्वत** मन्वंतरांत—**कश्यप** प्रजापतीनें द्रुहिण, उपेंद्र व रुद्र या देवतांच्या हातून त्या सरोवराचा भेद करविला. व त्याच्यांत असलेल्या **जलोद्भव** असुराचा नाश करवून, त्यातून निघालेल्या भूमींत हें सुप्रसिद्ध **काश्मीर** मंडल बसविलें. **वितस्ता** नदीचा प्रवाहरूपी दंड, व नील सरोवर ऱ्या सर्वश्रेष्ठ नील नागाचें छत्र होऊन त्याला होणारी उष्णतेची बाधा जणों टाळीत असे. तो नाग त्या सरोवरांत राहून त्या मंडलाचें पालन करीत असें. कार्तिकेय, गुह व गणेश यांच्यावर प्रसन्न राहाणाऱ्या गौरीप्रमाणें त्या काश्मीर-मंडळांत अनेक गुंफा गुहा व नाग सर्प यांना आश्रय देणारी **वितस्ता** नदी आपल्या प्रौढीला अनुरूप विहार करते. शंख पद्ममुखादि नाना जातीचे, नानाविध रत्नांनीं शोभणारे नागराज, राहात असल्याने, शंख पद्म व हीरकादि नवरत्ननिधि कुबेर, याच्या नगरीप्रमाणें ते मंडल शोभते. (३०) ( काश्मिरातील बहुतेक सरोवरें व झरे याच्या अधिष्ठात्री देवतांना नाग असें म्हणतात. त्यांच्या विषयीं **नीलमत** पुराणांत तपशीलवार वर्णन आहे. ही नागाविषयींची समजूत, काश्मिरांतील मुसलमानांमध्येंही आज मितीस कायम आहे. **पद्म** किंवा **महापद्म** नाग हा **वूलर** सरोवराची अधिष्ठात्री देवता होय. )

गरुडाच्या भीतीनें आश्रयासाठीं आलेल्या नागाचे रक्षण करण्यासाठीच जणों, तें मंडल सहज लीलेने सभोंवार अनेक प्राकाररूपी पर्वत हेच दीर्घ हस्ताप्रमाणें पसरून उभें आहे. तेथील **पापसूदन** तीर्थांत, काष्ठमयी उमापतीची मूर्ति होती. ( **पापसूदन** हें **कुठार** परगण्यांत **कोठेर-कपटेश्वर**-गांवाजवळ होतें. तेथें एक बरेंच मोठे दगडी कुंड आहे. ते **मालवराज भोज** यानें बांधविलें म्हणतात. याचा **नीलमत** पुराणात उल्लेख आहे. **अल्बिरूनी**नेंही, याचा **कुंडे** शहर या नावानें उल्लेख केला असून, तेथं दर वैशाखांत **श्रीमहादेवांनी** धाडलेले काष्ठाचे तुकडे प्रगट होतात, असें लिहिलें आहे. या **कोटिहार** कुंडांतील पाणी उतरतें तेव्हा त्याच्यांतून एक महादेवाची चंदनाची प्रतिमा निघते; असें **अबुलफजल**नें लिहिले आहे. ) तिच्या स्पर्शमात्रानें भक्ताना भोग व मुक्ति प्राप्त होत असत. तेथें रुक्ष पर्वताच्या कडांतून संध्यादेवी जल रूपानें पापपुण्याचा निर्णय करीत असते. ( **त्रिसंध्या** हे तीर्थ **ब्रिंग** परगण्यांतील **देवलगोम** गांवाजवळ आहे. तेथील झऱ्यांतून ज्येष्ठ व आषाढ महिन्यात राहून राहून तीन अहोरात्र पाणी वाहतें, म्हणून त्याला **त्रिसंध्या** गायत्री नांव पडले आहे. तेथें फार प्राचीन काळापासून यात्रा भरत आली आहे. त्याचा **नीलमत** पुराणांत श्लोक १२८८ मध्ये उल्लेख आहे. ) तेथें स्वयंभू अग्नि प्रगट होऊन ज्वालारूपी भुजानी याजकांनीं अर्पण केलेल्या आहुती स्वतः ग्रहण करीत असतो. (**स्वयंभू सुसुयम** हे स्थान **मचपुर** परगण्यांत **निचोम** गावाजवळ आहे. तेथें मधून मधून

ज्वालामुखीप्रमाणें उष्ण वाफा निघतात. त्या वाफेत श्राद्धांतलें पिंड टाकतात. अलीकडे हा प्रकार कमी आढळतो. या तीर्थाच्या महात्म्यांत येथें रुद्रानें देवांच्या प्रार्थनेवरून असुरांच्या नाशास्तव कालाग्निरुद्राचा अवतार घेतला असें वर्णन आहे.) त्या मंडलांतील गंगोद्भेदानें पावन झालेल्या भेडगिरीवरील सरोवरामध्यें सरस्वतीचें हंसरूपानें प्रत्यक्ष दर्शन होतें. ( हल्लींचें सूपियानच्या पश्चिमेकडील पर्वतामधील बुडभार किंवा भेडादेवी नांवाचें स्थळ ) नंदिक्षेत्रांतील मंदिरामध्यें देवतानी पूजनकाळीं अर्पण केलेले चंदनतिलक बिंदू अद्यापिही दिसून येतात. ( नंदिक्षेत्र हरमुख पर्वतशिखर. यांच्यावर कालोदक किंवा नंदकोल नांवाचें सरोबर समुद्रसपाटीपासून १३००० फूट उंचीबर आहे. गंगा किंवा उत्तर मानस सरोवर, याच्या यात्रेला जातांना तेथें एक मुक्काम पडतो. या ठिकाणी शिलादाचा पुत्र नंदी यानें उग्र तप केलें. त्याच्यावर प्रसन्न होऊन श्रीशिवांनी तेथें कायम निवास केला. ) शारदादेवीच्या दर्शनास गेलें असतांना कविजनाना मधुरवाणी आणि मधुमती व सरस्वती या नद्यांची एकदमच दर्शन प्राप्ती होते. ( शारदातीर्थ–हें किशन गंगेच्या खोऱ्याच्या उत्तर भागात शारदी नांवाच्या खेड्याजवळ होतें. त्या खेडयांजवळच्या लहानशा पहाडावर शारदा देवीचें मंदिर होते. त्याच्या खाली किशन गंगा–सिंधु–मधुमति सरस्वती यांचा त्रिवेणी संगम आहे. या स्थळांचा उल्लेख पुढें त. श्लो. २५५६ व २७०६ मध्यें जयसिंहाच्या कारकीर्दीत शिराशिलागडाच्या वेढ्याच्या संबंधानें आलेला आहे. पूर्वी येथील यात्रा बरीच मोठी व प्रसिद्ध असे. पण अलीकडे तिचे लोकांना विस्मरण पडले आहे. अलिबरुनीनें या यात्रेचा उल्लेख केलेला आहे. शारदा मंदिर व कुंड हें काश्मीरच्या अगदीं उत्तर सरहद्दीवर आहे, असें तिकडील देशव्यवस्थेमध्यें वर्णन केलेले आहे. ) चक्रभृत, विजयेश, आदिकेशव, व ईशान, वगैरे देवताच्या योगाने तें मंडल भूषित व पावन झालेले आहे. त्याच्यात तीर्थांनी पावन नसलेली अशी जागा तिळभर सुद्धां आढळत नाही. ( चक्रधराचे मंदिर विजभोर गावाच्या खाली अर्ध कोसावर वितस्तेच्या डाव्या कांठावरील त्सकदुर नांवाच्या उदरावर किंवा सुपीक माळावर होतें. त्याच्या सभोंवार भक्कम कोटहि होता.

शिव विजयेश—विजयेश्वर–( हल्लींचें विजभोर गांवीं हें मंदिर होते. ) त्याचा जीर्णोद्धार अशोकाच्या वेळी झाल्याचें पुढे वर्णन आलें आहे. हे मंदिर साऱ्या काश्मीर मंडलांत फार प्राचीन काळापासून प्रासिद्ध आहे. त्या काश्मीर मंडळाचें आक्रमण केवळ पुण्यबळानेंच शक्य होतें, शूर वीरांच्या शस्त्रबलानें नव्हे. यामुळें तेथील लोकाना मुख्य काळजी परलोकसाधनाची असे, परशत्रूची नव्हे. तेथील नदीतीरावर शीत कालात उष्णजलयुक्त स्नानगृहें आणि ग्रीष्म व वर्षाकालांत सुखकर घाट, याची स्नानासाठी व्यवस्था असते. त्यांच्या जलामध्यें हिंस्र जलजंतूचा उपद्रव मुळींच नसतो. (४०) तें मंडल आपला पिता कश्यप यानें निर्माण केलेलें आहे, हें जाणूनच जणों भगवान भास्कर ग्रीष्मांत देखील तेथें सौम्यरूपच धरीत असतो. मोठमोठीं व प्रसिद्ध विद्यापीठें, महाल, हिमोदक, द्राक्षारस आणि केशर, अशा त्रैलोक्य दुर्लभ वस्तू तेथें सहजप्राप्त आहेत. त्रिभुवनांत भूलोक श्रेष्ठ;

त्याच्यांत कुबेराधिष्ठित उत्तर दिशा अवर्णनीय, तिकडेही हिमाचल अप्रतिम प्रचंड व रमणीय: तसल्या त्या पर्वतांतही हे काश्मीर मंडळ श्रेष्ठ आणि अत्यंत मनोरम आहे.

**काश्मीरांतील राजवंशाचें वर्णन**—कलियुगांत या मंडलांतील कौरव-पांडवांच्या समकालीन राजांपासून—तिसऱ्या गोनर्द राजापर्यंत ५२ बावन्न राजे होऊन गेले. पण त्यांच्याविषयीं कांहींच माहिती मिळत नाही. सुकविरूपी प्रजापती, राजे लोकांच्या कीर्तिरूपी कायेला उज्वल व चिरस्थायी करीत असतात. पण तसे कोणी कवी न जाणों त्या कश्यपाच्या काश्मीरमंडळाच्या राजांच्या अदृष्ट पापामुळे, त्यांच्यावेळीं पैदा झाले नाहीत. श्रेष्ठ कवींच्या महत्कृतींच्या अनुग्रहाच्या अभावीं, ज्या थोर व प्रतापी राजांच्या मोठ्या व तेजस्वी भुजरूपी वृक्षांच्या छायेखाली समुद्र वलयांकित पृथ्वी निर्भय रहात असे, अशा राजांचेंही स्मरण रहात नाहीं, अशा त्या थोर कवींच्या महत्कृतीला नमस्कार असो. प्रचंड गजेंद्राच्या गंडस्थळावर पाय देणारे, अखंड साम्राज्यलक्ष्मी उपभोगणारे, ज्यांच्या प्रशस्त प्रासादांतून दिवसाहि चंद्रिकेप्रमाणे चमकणाऱ्या राजस्त्रिया आनंदानें व स्वेच्छ वावरत होत्या. ते सारे लोकतिलक, थोर थोर, राजे, कविकृतींच्या उणीवीमुळें, जणों स्वप्नांतसुद्धां उत्पन्न झाले नाहींतसे झाले. तेव्हां हे सुकविबंधो, तुझ्या कृतीवांचून सर्व जगत् केवळ अंध होय. अशा तुझी शेकडों लोकानीं सुद्धा केलेली स्तुति कोठवर पोचणार ?

कलियुगाच्या २२६८ व्या वर्षापर्यंत काश्मीर मंडलांत 'गोनर्दा'दिक बावन्न राजांनीं राज्य केले. भारतीय युद्ध द्वापर युगाच्या अंतीं झाले, अशी भलतीच समजूत करून घेऊन कांही लोक ही कालगणना चुकीची मानतात.परंतु काश्मीरच्या गादीवर बसलेल्या राजांच्या कारकीर्दीचा एकंदर वर्षांचा काळ, व भुक्त कलिकाल, यांच्यामध्ये फरक नाही. (५०) कलियुगाच्या ६२३ व्या वर्षी कौरव-पांडव विद्यमान होते. लौकिक किंवा सप्तर्षि शकाचें १०७० वें वर्ष चालू असून, गत कलि ४२२४ वर्षें आहे. ( काश्मीर व आसपासचे पहाडी प्रांत, यांच्यांत चालू असलेलें वर्ष कलियुगाच्या २५ व्या वर्षाच्या चैत्र शुद्ध प्रतिपदेला सुरू झाले. कल्हणानें हा ग्रंथ लिहिला त्या वेळी लौकिक ४२२५ वे वर्ष चालू होते हे वर्ष लिहितांना शेकडे गाळण्याची वहिवाट आहे. ) पहिल्या गोनर्दा पासून झालेल्या राजांच्या कारकीर्दीचीं २२६८ वर्षें व पुढील कारकीर्दीचीं उपलब्ध १२६६ वर्षें याच्यांत कलियुगाच्या आरंभीचीं वर्षें मिळविलीं तर, एकंदर वर्षसंख्या बहुतेक बरोबर येते. नष्ट झालेल्या ५२ राजांच्या कारकीर्दीची वर्षें १२६६ मानली जातात. ज्योतिष-संहिताग्रंथकारानी, चित्रा, शिखंडी वगैरे सप्तर्षि, शंभर शंभर वर्षानीं, एकावरून दुसऱ्या नक्षत्रावर जातात, असे लिहिलें आहे. त्यावरून याला पुष्टी मिळते. युधिष्ठिर राज्य करीत असतांना,सप्तर्षि मघा नक्षत्रावर होते, असें बृहत्संहिताकार-वराह मिहिर यांनीं लिहिलें आहे. युधिष्ठिराचा शक २५२६वर्षें चालला. नंतर शालिवाहन शक सुरू झाला. युधिष्ठिर शकाच्या आरंभीं गत कलि ६५३ वर्षें होता. ( या कालानिर्णयाविषयीं पुढे परिशिष्टांत खुलासा मिळेल. )

**पहिला गोनर्द राजा**:—हा काश्मीर मंडलाचा राजा मोठा प्रतापी होता. चंचल गंगाप्रवाहरूपी वस्त्रानें कैलासाचा उपहास करीत असलेला सारा उत्तर दिग्भाग

त्याच्या अंकित व त्याच्या सेवेत निमग्न होता. त्याचे भुज, गारुत्मत रत्नांच्या आभरणांनीं विभूषित होते. भयभीत झालेली पृथ्वी, शेषमस्तक सोडून निःशंकपणें त्याच्या त्या भुजांचा आश्रय करीत होती. मगधराज जरासंध यानें, बंधुभावानें कंसारि कृष्णाशीं युद्ध करीत असताना, या गोनर्द राजाला सहाय्यासाठी बोलावले होतें. म्हणून त्याने आपल्या प्रबल सैन्यासह जाऊन, कालिंदीच्या बाजूनें मथुरेला वेढा घातला. त्या योगानें यादव स्त्रियांचें हास्य, व शूर वीर योद्धयाचें यश, एकदमच नष्ट झालें. (६०) हलधर बलीदेवाचें सैन्य भटकले होतें. तें सांवरीत असतांना त्याची गोनर्दाशीं गांठ पडली. त्या तुल्यबली योद्धयांचें फार वेळ तुमुल युद्ध झालें त्यावेळीं, विजयमाला कोणाच्या कंठांत घालावी, याविषयीं संदेहित होऊन, जयश्रीला दीर्घकाल वाट पाहावी लागून, तिच्या हातातील ती मालासुद्धां म्लान झाली. शेवटीं कार्श्मीरनरेश आणि बलदेव, दोघेहि जखमी झाले; आणि त्यांतून पहिल्यानें समरभूमीला व दुसऱ्यानें जयश्रीला, आलिंगन दिले.

**श्रीमान् दामोदर राजा**:—याप्रमाणें तो क्षत्रियश्रेष्ठ कार्श्मीर नरेंद्र गोनर्द राजा वीरोचित गतीला गेल्यावर, त्याचा पुत्र श्रीमान् दामोदर राज्य करूं लागला. त्याला र्दुदैवानें राज्यप्राप्तीबरोबरच, त्याच्या मानी स्वभावानुरूप, पितृवधाचे स्मरणही प्राप्त होऊन तिचे सुख वाटले नाहीं. गांधार राजानें आपल्या कन्येच्या स्वयंवरासाठी यादवांनाहि बोलावले होते. तेथें मानी दामोदर राजाही सैन्यासह गेला होता. यादवांचा सूड उगविण्याच्या प्रबल इच्छेनें त्याचे बाहू स्फुरण पावत होते. त्याची व यादवाची गांठ पडून, झालेल्या घोर युद्धात, अगणित अश्वखुरानी उठलेल्या धुळीनें गगनमंडळ भरून गेलें, आणि राजकन्येच्या इच्छित वराशीं स्वयंवराबरोबरच, त्या समरभूमीवर असंख्य अप्सरानीं मृत गांधारादि वीराशीं स्वयंवर केले. तो धराचक्रवर्ती वीर दामोदर राजा चक्रधर श्रीकृष्णाशी लढत असतांना, त्याला श्रीकृष्णानें आपल्या सुदर्शन चक्राच्या धारेच्या मार्गानें स्वर्गाला पोचाविले.

त्याची राणी यशोवती, गर्भवती होती. तिलाच श्रीकृष्णाने सर्व द्विजाच्या हातीं राज्याभिषेक कराविला.

**राणी यशोवती**:—हा राज्याभिषेक श्रीकृष्णाच्या कांहीं मत्सरी व क्रुद्ध मंत्र्यांना आवडला नाहीं. तेव्हां त्याने कार्श्मीरांतील राजा-राणी हर व पार्वती यांचे अंश. ते दुष्ट असले तरी स्वतःचे हित इच्छिणारानीं त्यांची अवज्ञा करूं नये, असे पुराणवचन सांगून, त्यांचें समाधान केले. त्यावरून त्या राणीला पूर्वी य कश्चित स्त्री म्हणून अवज्ञा करीत असलेले सर्व लोक, मातृदैवत मानूं लागले.

पुढें योग्य मासानी ती राणी दिवस भरतांच, दग्ध झालेल्या वंशवृक्षाचा जणों नवा अंकुरच, अशा दिव्य राजपुत्राला प्रसवली.

**दुसरा गोनर्द राजा**:--त्याचें नांव गोनर्द ठेवले गेलें. त्या दुसऱ्या गोनर्दाचे जातकर्मादि संस्कार व राज्याभिषेकसमारंभ, श्रेष्ठ व विद्वान् ब्राह्मणांच्या हातून

यथासाग झाले. त्याला त्याच्या आजाची हैमवत राज्यलक्ष्मी, आणि **गोनर्द हें** नांव बरोबरच मिळाले. त्याचे योग्य पालनपोषण करण्याला, पयोदा **वितस्ता व सर्व** संपत्प्रसूपृथ्वी, या दोघीहि धात्री बनल्या होत्या. त्या बालराजाची प्रसादाचिन्हें, **परंपरा** प्राप्त मंत्री उत्तम ओळखीत असत. त्याने मागें उभे असलेल्या लोकांकडे सहज हंसत **पाहिलें** की, ते त्यांना इनामें देत. त्याचे बोबडे बोल नीट न उमगल्यामुळे त्याचे मंत्री व्यग्र **होत,** आणि याच्यांत स्वतःचाच दोष आहे असें मानीत. तो सिंहासनावर बसला **असतांना** त्याचे पाय पादपीठाला लागत नसत, यामुळे, त्या पादपीठाची जणो नाउमेद होत **असे!** (८०) चामरांच्या मंद वाताने त्याचे सुंदर काकपक्ष चंचल होत असत. अशा त्या **बाल-**राजाला सिंहासनावर बसवून, मंत्री सर्व राजकार्य करीत. तो बाल असल्यामुळे त्याला **कौरव** व पांडव यांनी घोर भारतीयुद्धामध्यें मदतीसाठीं पाचारण केलें नाही.

त्याच्यानंतर झालेल्या ५२ बावन्नापैकीं ३५ पस्तीस राजांविषयीचे सर्व दाखले **लुप्त** झाल्यामुळे त्यांनीं केलेली कृत्येच काय, पण त्यांचीं नांवेसुद्धां विस्मृत झाली आहेत.

**लव राजाः**—नंतर भूमातेला भूषणभुत **लव** नांवाच्या राजावर, **यशरूपी** धवल वस्त्र धारण करणाऱ्या जयश्रीचें प्रेम जडलें. त्याच्या सेनेच्या भयंकर **शब्दानेंच** त्रैलोक्याचा निद्राभंग होत असून त्याचे सर्व शत्रू दीर्घ निद्रावश होत असत. **त्यानें** चौऱ्यांशी लक्ष दगडी देवालयें बांधविली. **लोलेर** नांवाचें नगर वसविलें, आणि **लेदरी** नदीवरील लेवार नांवाचा अग्रहार द्विजांना दान दिला. (लेदरी–हल्लीची **लिदर** नांवाची नदी. ती **अनंतनाग** व **ब्रिजब्रार** याच्यांमध्यें विस्ततेला मिळते. **लेवार** हल्लीच्या **दचुनपोर** परगण्यांतील **लिदर** नदीवरचें **लिवर** नांवाचे खेडें.) पुढें **कांहीं** कालाने तो महाभुज व निष्कलंक वीरश्रीयुक्त राजा मरण पावला.

**राजा कुशेशयः**—नंतर त्याचा महाप्रतापी पुत्र **कुशेशय** गादीवर **बसला.** त्यानें **कुरुहार** नावाचा अग्रहार दान दिला. (कुरुहार हल्लींच्या **लिवरपासून दोन** कोसांवर असलेले **कुलर** नांवाचें खेडें असावें.).

**राजा खगेंद्रः**—पुढे त्याचा पुत्र **खगेंद्र** हा राजा झाला. तो मोठा **धीरवीर** होता. त्याचें नागकुलाशीं बद्धवैर असल्यामुळें त्यानें त्याचा नाश केला. त्यानें **खगी** व खोनमुष नांवाचे दोन अग्रहार दिले. (**खगीं** हल्लींचें बिरु परगण्यांतलि **खाग** नावाचें गाव. **खोनमुष** हल्ली **पांपर**पासून दीड कोसावर असलेलें **खुनमोह नांवाचें** खेडें.) नंतर तो श्री शंकराच्या हास्याच्या वेळीं दिसणाऱ्या उज्वल दंतपंक्तीप्रमाणें **उज्वल** पुण्यकृत्याच्या द्वारें मिळविलेल्या पुण्यलोकाला गेला. (९०)

**राजा सुरेंद्रः**—नंतर त्याचा पुत्र **सुरेंद्र** राज्यपदारूढ झाला. त्याचें **वर्तन** आश्चर्यकारक, पुण्यशील व श्रेष्ठ होतें. त्याच्या द्वारें त्याने चिरकालिक महत्व **मिळविलें.** प्रत्यक्ष **सुरेंद्रालाही** त्याची बरोबरी करतां येत नव्हती. कारण तो शतमन्यू **तर हा** नरेंद्र शांतमन्यू, व तो गोत्रभिद, तर हा गोत्ररक्षी होता. त्यानें **दरद** देशाच्या **हद्दीवर** **सोरक** नगर वसविलें. (**सोरक** हे बहुधा, हल्लींचें **संगसफेद** नदीवरील **नागोम**

परगण्यांतील सुरस हें ल्हानसें गांव असावें.) तसेंच त्यानें नरेंद्रभुवन, नांवाचा विहार व सौरस नांवाचा विहार; हे स्थापन केले. त्या योगानें त्याची कीर्ति अखंड प्रतिष्ठित झालेली होती.

**राजा गोधरः**—तो सुरेंद्र राजा निपुत्रिक होता. म्हणून परगोत्री गोधर हा त्या भूधर व्याप्त भूमीचें पालन करूं लागला. त्या उदार व धर्मात्मा गोधर राजानें ब्राह्मणांना गोधर व हस्तिशाला नावाचे अग्रहार दिले. ( हल्लींची दिवसर परगण्यांतील गुदर व अॅस्टेल नांवांचीं गावें.) त्यानें आपल्या अनेक पुण्यकर्मांच्या द्वारें स्वर्ग प्राप्ती करून घेतली.

**राजा सुवर्णः**—गोधराचा पुत्र सुवर्ण राजा, हा अर्थिजनांना सुवर्णदान देण्यामध्यें अत्यंत उत्सुक व तत्पर असे. तो गोधरामागून गादीवर आला. त्यानें सुवर्ण मणिकुल्या नांवाचा पाण्याचा पाट काढविला तो कराल प्रांतात होता. ( हा पाट विशोका नदीतून काढलेला व बराच मोठा आहे. त्याचा आरंभ लारगु नावाच्या गांवापासून होतो. कराल प्रांत. हल्लींचा अंदविन परगण्यांतील जैनपुर नावाचा महाल.)

**राजा जनक**—त्याचा पुत्र जनक जणों सर्व प्रजेचा जनक-पिता. हा सुवर्ण राजामागून गादीवर बसला. त्यानें जालोर नगर व अग्रहार कायम केले. ( हल्लींचें जैनगीर परगण्यांतील झोहलुर किंवा झोलूर गांव.)

**राजा शचीनरः**—त्याचा पुत्र शचीनर प्रत्यक्ष भूलोकींचा शचिपति गादीवर बसला. तो मोठा प्रतापी, भाग्यशाली व धार्मिक होता. त्याच्या आज्ञा कधीं कोठे अवमानित होत नसत. त्यानें शमांगासा व शनार हे अग्रहार दिले ( शमांगासा—हल्लींचें अरपध नदीवरील खांगम नावाचे खेडें.) तो राजा अनपत्य होता. त्यानें इंद्राचें अर्धे सिंहासन मिळविले. ( १०० ) नंतर त्याचा चुलतभाऊ व शकुनीचा पणतु धर्मात्मा—अशोक राजा—राज्यारूढ झाला. तो फारच सत्वशील व पुण्यात्मा होता. त्याला पापाचा स्पर्शसुद्धां नव्हता. त्याने जैन-बुद्ध-धर्माचा स्वीकार केला होता. शुष्कलेत्र व वितस्तात्र मध्यें त्याने अनेक स्तूप बांधविले. ( हल्लींच्या दून्त्स परगण्यातील हुकलित्र व नकाशांत दिलेले हकलित्री गांव असावें. वितस्रात्र—हल्लींचे वीरनाग तीर्थापासून अर्ध कोसावर असलेले विध-वेतुर नांवाचे खेडे.) त्याने वितस्तात्रं नगरांत बांधलेल्या धर्मारण्य नावाच्या विहारात एक चैत्य इतका उंच होता कीं, त्याच्या उंचीचा नुसत्या नेत्रानी अंदाज होत नसे. ( वितस्तात्र पुराचा पुढे अनंत देवाच्या कारकीर्दींत उल्लेख आलेला आहे. अशोकाच्या या अनेक स्तूपाचा व चैत्यांचा मुळींच मागमूस उरलेला नाही.)

त्याच थोर व श्रीमान् राजाने, अत्यंत उज्वल, प्रशस्त, विशाल, व श्रीलक्ष्मीचें निवासस्थान, असे श्रीनगर वसविलें. ( हल्लींच्या श्रीनगरापासून दीड कोसावर, वितस्तेच्या उजव्या तीरावरील ' पांडेठाण—पुराणाधिष्ठान-असावे. कारण तेथेंच जलोक

राजानें ज्येष्ठ रुद्राचें मंदिर बांधविल्याचा पुढे उल्लेख आहे.–( श्लो. १२४ ) तेच मंदिर हल्लीचे **तख्त–ई–सुलेमान** पहाडावरील मंदिर असावें, असे जनरल **क**निंगह्याम यांचे मत आहे. पण मुसलमानी ग्रंथकारांच्या मतें, ते **खावरपूर** परगण्यांतील **लिडर** नदीच्या डाव्या तिरावरील **स्विर** गांव असावे. ) त्या नगरांत शाण्णव लक्ष घरें होती. तीं फार संपन्न होतीं. श्री विजयेश्वराच्या मंदिराभोंवताली जुना कोट होता. त्याला गिलावा केला होता. त्या कोटाच्या जागीं, त्यानें पक्का व भव्य दगडी कोट बांधविला आणि त्या मंदिराच्या आवारांतच त्या निरलस राजाने अशोकेश्वराचीं दोन नवीं मंदिरेहि बांधविली. पुढे त्याच्या राजाला म्लेच्छ लोकांनीं उपद्रव दिला असताना, त्यानें त्यांच्या उच्छेदासाठीं घोर तपश्चर्या करून, श्रीभूनेश शंकराला प्रसन्न केले. ( **विजयेश्वराच्या** सुप्रसिद्ध व प्रचंड मंदिरावरूनच भोवतालच्या वस्तीला हल्लीचें **वि**जब्रोर हे नांव पडलें होते. तें मंदिर, **अनंत** देवाच्या कारकीर्दींत जळाले होते. तें **कलश** राजाने पुनः बांधविले. श्रीभूतेश्वर शिवाचें काश्मीरांत प्राचीन काळापासून पुष्कळच महात्म्य मानले जात होतें. त्याचें मुख्यस्थान **हरमुकुट** शिखराच्या आसपासच्या भागांत होतें. त्याच्याविषयीं **न**लिमत पुराणाच्या ५५ अध्यायांत, श्लोक १०९० मध्यें वर्णन आहे **हरमुकुट** शिखराच्या आग्नेयीस पसरलेल्या पहाडाच्या रांगेला, हल्लीं **बूतशेर–भूतेश्वर** हें नांव आहे. या रांगेच्या दक्षिण टोंकाजवळून, **काकनाइ–कनकवाहिनीं** नदी वाहते. तिच्या खोल खोऱ्यांत **वां**गध किंवा **व**सिष्ठाश्रम या खेड्याजवळ, दीड कोसावर १७।१८ जीर्ण मंदिरांचे अवशेष आढळतात. तेच काश्मीरच्या राजानी बांधविलेल्या भूतेशाजवळच्या मंदिराचें अवशेष असावेत या **भू**तेशाच्या मंदिराविषयीं काश्मीरच्या अनेक राजांच्या कारकीर्दींत उल्लेख आलेले आहेत. हल्ली या स्थळाजवळचा **ना**राननाग नांवाचा प्रसिद्ध झराच **सो**दरतीर्थ होय. अलीकडे या **भू**तेश्वराचें नांवनिशाणसुद्धां लोकाना माहीत नाहीं. ) तेव्हा त्याच्या प्रसादानें त्याला मोठा पुण्यवान्, प्रतापी, व गुणवान् असा **ज**लोकनांवाचा पुत्र प्राप्त झाला.

**राजा जलोकः**—अशोकामागून या भूलोकीचा इंद्रच असा **ज**लोकराजा गादीवर आला. त्याने आपली धर्मश्रद्धा व आपले धवलयश, यांच्या द्वारें जणों साऱ्या ब्रह्मांडमंडलाला शुभ्रता आणली होती. त्याच्या पुण्यकथा ऐकून, देवसुद्धां आश्चर्यचकित होत. त्यानें अनेक सुवर्णपुटांच्याद्वारे कोटिवेधि पारद, किंवा परिसमणि मिळवून त्याच्या द्वारें तो कोट्यवधि हीन धातूचें सुवर्ण बनवून, ब्रह्मांडाला जणों अनेक सुवर्णपुटे देण्याला समर्थ झाला होता. ( ११० ) त्याने **ना**ग सरोवराच्या उदकाचें स्तंभन करून, नागकन्यांशी नानाविध जलक्रीडा केल्या व आपलें यौवन सफल केले. त्याचा बुद्धिमान व तेजस्वी गुरु अवधूत यानें अनेक सिद्ध व बौद्धवाद्यांना वादांत जिंकून टाकले. त्या सत्यव्रत राजाचा प्रत्यही श्रीनंदीश क्षेत्रांतील स्वयंभू ज्येष्ठेश शंकराचें अर्चन करण्याचा नेम होता. त्यासाठीं त्याला त्या दूरच्या शिवालयांत रोज नेऊन पोंचविण्याचें काम एक नाग मोठ्या भक्तीनें करीत असे. यामुळे त्याला

जागजागीं घोड्याचे टप्पे ठेवावे लागत नव्हते. त्या काळीं सर्वव्यापी म्लेच्छ लोकांचा त्या थोर, धीर, वीर, राजानें चोहींकडे पूर्ण पाडाव केला व आपली विजयी सेना साऱ्या पृथ्वीवर–साता समुद्रापर्यंत दवडली. त्यानें म्लेच्छांना उधळून लावलें तेव्हांपासून त्या स्थळाला उज्जुट डिंब नांव पडलेलें अद्यापि कायम आहे. त्यानें कान्यकुब्ज देशांसुद्धां सारी पृथ्वी जिंकून घेतली व त्या देशांतील चारी वर्णांचे लोक–विशेषतः विद्वान् व धर्म-शास्त्रवेत्ते चांगले चांगले ब्राह्मण आणून आपल्या देशांत वसविले. तोंवर काश्मीर देशांतील राज्य व समाजव्यवस्था इतर राज्यांतल्याप्रमाणें म्हणण्यासारखी सुधारलेली नव्हती. त्या-वेळीं राज्यकारभारांत १ कोशाध्यक्ष, २ धर्माध्यक्ष, ३ खजानजी, ४ सेनाध्यक्ष, ५ परराष्ट्र-वकील, ६ पुरोहित व ७ दैवज्ञ, अशीं सातच कर्मस्थानें असत. पण त्याच्या ऐवजीं त्यानें अठरा कर्मस्थानें कायम करून युधिष्ठिरासारखी राज्यकारभाराची व्यवस्था कायम केली. ( १२० ): स्वपराक्रमानें मिळविलेल्या उमाप संपत्तीच्या द्वारें त्यानें वाखाल वगैरे भाग, अग्रहार दिले. ( हल्लींचें काकनाई नदीच्या उजव्या काठांवर तिच्या व सिंधुनदीच्या संगमापासून अर्ध कोसावर असलेलें, वाखुल नांवाचें खेडें. ) त्याची पट्टराणी ईशानदेवी, इनें काश्मीर मंडळाच्या द्वारावर व इतर जागींही, स्वतःच्या खर्चानें पुष्कळशीं मोठालीं व जागृत मातृचक्रें स्थापन केलीं होतीं.

त्या राजानें एका व्यास शिष्याच्या मुखानें नंदिपुराण ऐकलें. तो नंदीश तीर्थाच्या तोडीचीं सोदर वगैरे तीर्थें अधिक पसंत करूं लागला. श्रीनगरांत ज्येष्ठरुद्राचें मंदिर बांधवीत असतांना एकदां कार्यव्यग्रतेमुळें त्याला दूर असलेल्या सोदर तीर्थांत स्नान घडलें नाहीं, म्हणून तो फार उदास झाला होता. तितक्यांत, त्या निर्जल प्रदेशांत एक सुरेखसा झरा निघालेला दिसला. त्याच्या जलाचा वर्ण व स्वाद, सोदर तीर्थाच्या जलाप्रमाणें होता, म्हणून त्या अवचित निघालेल्या तीर्थजलांतच त्यानें स्नान उरकलें. त्यामुळें त्या निग्रही राजाला मूळच्या नंदिक्षेत्राजवळच्या सोदरतीर्थांत स्नान केल्या-प्रमाणेंच कृतकृत्यता वाटली. पुढें तीं दोन्हीं जलें एकच आहेत किंवा कसें, तें पाहण्या साठीं त्यानें एकदां आपला सोन्याचा गडू, झांकण बंद करून सोदरतीर्थांत टाकला. तो अडीच दिवसांनीं श्रीनगराजवळच्या त्या नव्या झऱ्यांत निघाला. तेव्हां त्याविषयीं त्याची खात्री झाली.

तो राजा जणों स्वतः नंदीशच सर्व विषयभोग भोगण्याच्या इच्छेनें अवतरलेला होता. नाहींतर सर्व लोकासमक्ष त्याच्या हातून असे अलौकिक प्रकार कसे घडले असते ? ( १३० )

तो एकदां विजयेश्वराच्या दर्शनाला जात असतांना अर्ध्या वाटेंत त्याला एका स्त्रीनें अन्न मागितलें. त्यानें तें यथेष्ट देण्याचें वचन दिलें. तसें तिनें एकदम विक्राळ रूप धारण करून नरमांसाची इच्छा केली. राजा ' अहिंसा परमोधर्मः ' या मताचा होता, म्हणून त्यानें तिला स्वतःचेंच मांस ग्रहण करण्याला विनंति केली. तेव्हां ती म्हणाली, " हे राजा, तूं खराच मोठा सत्वशील व श्रेष्ठ बोधिसत्व आहेस. म्हणूनच तुझी भूतदया अशी अलौ-

किक व अढळ आहे. "तो राजा शैव असल्यानें त्याला बौद्ध, जैनमत व तत्संबंधी परिभाषा अवगत नव्हती. म्हणून त्यानें तिला म्हटले, "तूं मला बोधिसत्व म्हणतेस ते कोण?" तिनें उत्तर दिले. "हे राजा, माझी कथा ऐक: तूं उच्छेद केलेल्या बौद्धांनीं मला उठविलें आहे. आम्ही लोकालोक पर्वतापलीकडे राहतो. तिकडे घोर तामस रात्री असतात. आम्ही बोधिसत्वांवर पूर्ण विश्वास ठेवून, त्यांच्या मार्फतच स्वतःला गति मिळविण्याची इच्छा करीत असतो. त्या तामस रात्रींतील अंधकाराचा क्षय सर्व लोकांमध्ये श्रेष्ठ असा भगवान् लोकनाथ बुद्धच करीत असतो. तोच त्या सर्व बोधिसत्वामध्ये प्रमुख होय. त्याच्या द्वारें, ज्याचे पंचक्लेश नाहींसे झालेले असतात तेच बोधिसत्व होत. ते पाप्यावर सुद्धां रागावत नाहींत. उलट त्यांच्यावर प्रेम करतात आणि अशा रीतीनें ते बोधिसत्वपणा मिळवितात. ते नेहमी याच कामांत निमग्न असतात. ( पंचक्लेश १ अविद्या, २ अस्मिता, ३ राग, ४ द्वेष आणि ५ अभिनिवेश. )

" कांही दिवसांमागे एका विहारांतील वाद्यगजरानें तुझा निद्राभंग झाला; म्हणून तूं दुष्ट व द्वेषी लोकाच्या प्रेरणेनें रागाच्या सपाट्यांत तो विहार उध्वस्त करविलास (१४०); तेव्हां तेथील संतापलेल्या बौद्धांनी माझें स्मरण करून. मला तुझा वध करण्यासाठी पाठविलें. पण बोधिसत्वानी मला बोलावून म्हटले, "तो राजा महाशाश्वय आहे. तुझ्यानें त्याला कांही बाधा करवणार नाहीं. उलट त्याच्या पुण्यदर्शनानें तुझ्या पापाचा नाश होईल. तूं आमच्या तर्फेनें त्या दुष्टजनांनीं पाप करण्याविषयी प्रवृत्त करविलेल्या त्या राजाच्या मनांत त्याने संचित केलेलें उमाप द्रव्य खर्च करून तो उच्छिन्न झालेला विहार पुनः नवा बांधविण्याची प्रेरणा कर. म्हणजे विहार उध्वस्त करण्याचे त्याचे पाप शिल्लक उरणार नाहीं. व त्याच्या त्या दुष्ट सल्लागाराच्या पापाचे प्रायश्चित्त घडेल त्याप्रमाणें मी माझ्या पूर्वीच्या रूपाने तुझ्या विपुल थोरवीची व चांगुलपणाची परीक्षा केली. आज माझें पाप नष्ट झाले आहे. आता मी निरोप घेतें ' हे ऐकून त्या राजाने तो विहार पुनः बांधवून देण्याचें वचन दिलें. त्याबरोबर ती कृत्या हर्षोत्फुल्ल नयन होत्साती अंतर्धान पावली.

पुढें राजानें त्या जागी कृत्याकाम नांवाचा विहार बांधविला, आणि त्याच्यांत तो त्या क्षीणपापकृत्या देवीची आराधना करूं लागला ( कृत्याश्रम हल्लींचे वितस्तेच्या डाव्या कांठावरील वराहमूलापासून अडीच कोसावर असलेले किटशोम नांवाचे खेडें. ऊकोंग या चिनी प्रवाशाने इ. स. ७५० मध्यें पाहिलेला किटचे नावाचा विहार हाच होय. )

त्यानें नंदिक्षेत्रांत एक पाषाणाचें भूतेश्वराचें प्रचंड मंदिर बांधविलें व त्या देवाला पुष्कळसें द्रव्य आणि सुवर्णरत्नमय पूजासामग्री अर्पण केली. त्यानें चीरमोचन तीर्थामध्यें अनेक रात्रीं ब्रह्मासन घालून निश्चलमनानें ध्यान करीत तप केलें. त्या योगानें त्याला हळूं हळूं परमानंद प्राप्ती झाली. आणि कनकवाहिनी नदीवरील नंदीशाच्या सामीप्यतेची त्याची इच्छा नाहींशीं झाली. ( १५० ); पूजासमयीं नृत्यगायनकुशल अशा त्याच्या अंतः-

पुरांतील शंभर स्त्रिया त्यानें ज्येष्ठेश्वराला अर्पण केल्या. ( कनकवाहिनीः हल्लीची भूतेश्वराजवळची काकनाइ नदी. ती सिंधुनदीला मिळालेली आहे. चीरमोचन हें तीर्थ सिंधुनदीच्या उजव्या कांठावर प्रंग नांवाच्या खेड्याच्या खालीं कनक वाहिनीची एक लहानशी शाखा व सिंधु नदी यांच्या संगमावर असावें. ) परम पवित्र अशा चीरमोचन तीर्थावर, साम्राज्यऐश्वर्याचा उपभोग करीत राहून, तो राजा शेवटीं तेथेंच सहकुटुंब श्रीगिरिजापतीच्या सायुज्यतेला पावला. त्याच्या पश्चात्—

**दुसरा दामोदर राजाः**—गादीवर बसला. तो अशोकाच्या वंशांतलाच होता किंवा कसें, हें माहीत नाही. तो वीरशैव मौलिमणि मोठा भाग्यवान होता. त्याच्याविषयीं अनेक अद्‌भुत कथा अद्यापि ऐकण्यात येतात. तो फार सुशील व साधुजनप्रिय होता. श्रीशंकराच्या प्रसादामुळे वैश्रवण–कुबेरही त्याच्याशीं सख्य ठेवीत असे. कुबेराच्या प्रमाणेंच गुह्यकही त्याच्या आज्ञांकित होते त्याच्या साहाय्यानें त्यानें मोठा थोरला व लांबच लांब असा गुड्डनावाचा सेतु बांधविला व तेथून त्यानेच वसविलेल्या नवीन दामोदरसूदाला पाणी पुरविण्याचा त्याचा विचार होता. (गुड्डसेतू व दामोदरसूद श्रीनगराच्या दक्षिणेस एक रुक्षसा माळ आहे त्याचें नांव दामोदरउदर किंवा दामोदरसूद. तो माळ सुमारें तीन कोस व पावणेदोन कोस लांब रुंद आहे. जवळच वाहरोर नावाचें खेडें आहे. त्याच्यावर पाणी नाही. त्याच्या दक्षिण टोकाखाली गुडसूद नांवाचे लहानसे खेडें आहे दामोदरसूद त्याच्यापेक्षां सुमारें १०० फूट उंच व उभ्या भिंतीसारखे दिसतें. त्याच्यावर बांधाचें निशाण नाहीं. त्याच्यावर कोठूनही पाणी आणतां येण्यासारखें नाहीं. ) उदार लोक एखादे मोठेंसे काम तयार करविण्याला प्रवृत्त होतात तेव्हां न जाणो त्याच्या पूर्वपुण्याईच्या कमतरतेमुळे, त्याना अनेक अडचणी येत असतात. पुराच्या पाण्यापासून उपद्रव होऊं नये म्हणून, त्याने यक्षांच्या साहाय्यानें जागजागीं अनेक मोठाले दगडी बंधारे व सेतू बांधाविण्याचीं कामें सारखीं चालू ठेविलीं होती.

तेजस्वी व उग्र तपोनिष्ठ अशा ब्राह्मण विभूतींविषयीं विशेष जपावे लागतें. कारण ते आपल्या प्रभावानें अशा मोठमोठ्या व थोर राजांच्या प्रभावावरही ताण करीत असतात. (१६०) प्रतिपक्षाच्या दुष्टाव्यामुळें गेलेली राज्यसंपदा क्वचित परत मिळेल, पण अवमानित व क्रुद्ध विप्राची अवज्ञा व शाप यांच्यामुळें नष्ट झालेली कधींही पुनः प्राप्त होत नाहीं, हे लक्षात ठेवले पाहिजे.

एकदा तो राजा श्राद्धाच्या निमित्तानें वितस्तेवर स्नानाला चालला असतांना कांहीं उपाशी ब्राह्मणांनीं स्नानापूर्वी भोजन मागितले. राजानें त्यांची अवहेलना करीत म्हटलें, मी वितस्तेवर स्नानाला चाललों आहें. स्नान करून येईपर्यंत तुम्हांला काहीं मिळणार नाही. त्यावर त्या विप्रांनी तेथेंच तपोबलाने वितस्ता उत्पन्न केली व पुनः भोजन मागितले. ती त्यांची जादू समजून राजानें त्याना तिरस्कारानें "ऑ ! मागे सरा; चालते व्हा ! मी स्नान करून येईपर्यंत भोजनबिजन साफ मिळणार नाही." असे दरडावून सांगितलें.

त्यावर त्या ब्राह्मणांनीं संतापानें त्याला "सर्प हो!" असा शाप दिला. राजानें त्यांना दया करण्याविषयीं विनाविलें. तेव्हां त्यांनी, एका दिवसांत साग्र रामायणश्रवणाने मुक्ति होईल,' असा उश्शाप दिला. तेव्हांपासून तो **दामोदर** राजा **दामोदरसूद** तीर्थामध्यें अत्यंत तृषार्त अशा सर्पाच्या रूपानें रहात असलेला अद्यापि दृष्टीस पडतो. आणि त्याच्या उष्ण श्वासामुळें गरम भासणाऱ्या **दामोदरसूदावर** तो कधीं कधीं आढळतो असेहि सांगतात. त्या राजाच्या मागून—

**हुष्क, जुष्क व कनिष्कः**—या नांवांचे तीघे राजे झाले. (हे तीघे तुर्कराजे बरोबरच राज्य करीत होते. त्याच्या संबंधानें बरीच माहिती मिळालेली आहे त्यांनीं स्थापन केलेलीं नगरें व पाडलेली नाणी याचाही शोध लागलेला आहे. **कनिष्काचा** बौद्धधर्माशीं चांगला संबंध होता. हुष्कपुर हे हल्लींच्या **वराहमूलापासून** एक कोसावर **वितस्तेच्या** डाव्या तीरावर असलेले एक ल्हानसे **उस्कूर** नांवाचे खेडें. **जुष्कपुर** हे हल्लींच्या **श्रीनगरच्या** उत्तरेस दोन कोसावर हरपर्वतापासून असलेले **झुकुर** नांवाचे मोठेसे खेडें. **कनिष्कपुर** हे **वराहमूलापासून श्रीनगरास** जाणाऱ्या रस्त्यावर असलेले **कानिसपोर** नांवाचे गांव होय.) त्या तिघाहीं राजानी आपापल्या नांवाचीं नगरें वसविलीं. शिवाय **जुष्क** राजानें **जयस्वामिपुरही** वसवून तेथें एक विहार बांधविला तो राजा फार शहाणा व विद्वान् होता. ते तिघे तुरुष्क असूनही मोठे पुण्यशील होते. त्यानीं **शुष्कलेत्र** वगैरे ठिकाणीं बरेचसे मठ, चैत्य वगैरे बांधविले. (१७०) त्याच्या प्रबल व वैभवशाली कारकीर्दीत बहुतेक **काश्मीरमंडलांत** बौद्धाचें प्राबल्य होतें. त्यांच्या यतींनीं प्रव्रज्या मार्गाचें अवलंबन करून मोठें यश संपादन केलें होतें.

त्या वेळीं सर्व लोकहितसाधक व पुरंजनाला सुखदायक अशा **शाक्यसिंहाचें** निर्याण होऊन दीडशें वर्षे झालीं होतीं; आणि श्रेष्ठ व महाभाग **बोधिसत्व नागार्जुन** या मंडलांत सर्वेश्वरपणे रहात होता. षडर्हद नावाच्या वनामध्यें (**नागार्जुन** हा तेरावा बौद्ध अर्हत **कनिष्काच्या** वेळीं झाला. ह्वेनत्संग यानें आपल्या **सी यू की** ग्रंथामध्यें **कनिष्काची** कारकीर्द **बुद्धाच्या** निर्वाणानंतर ४०० वर्षांनी झाली, असें लिहिलें आहे. तेव्हा वरील कल्हणाचे विधान चमत्कारिक दिसतें.

या तिघा राजाच्या मागून.—

**अभिमन्यु राजाः**—झाला. तो शतमन्यु इंद्राप्रमाणें मोठा शूर व धीर होता. त्यानें **कंटकोत्सगांव** अग्रहार दिले (**षडहृदवन श्रीनगराजवळील शालीमार** बागेपासून वायव्येस पाऊण कोसावर असलेले **हारवन** नावाचें खेडें. **कंटकोत्स**,– वीरू परगण्यांतील **कंद्दर** नावाचें गाव.) त्यानें आपल्या नांवानें सुप्रसिद्ध असे अभिमन्युपुर वसवून, तेथें शेखरीभूत असें शशांकशेखर **श्रीशंकराचें** मंदिर बांधविलें. त्याच्याच आज्ञेने **चंद्राचार्यादिकांनीं** आपलें व्याकरण तयार केले आणि दुर्मिळ व दुर्बोध झालेलें व्याकरण–महाभाष्य, या मंडळात आणलें. (अभिमन्युपुर हल्लींचें **श्रीनगरापासून** दोन कोसांवरील दलदलीलगत असलेलें **विम्यून** नांवाचे खेडें असावें.)

त्या काळीं बुद्धिमान बोधिसत्व नागार्जुन याच्या आश्रयाखालीं बौद्धलोक विशेष प्रबल झालेले होते. त्यांनी धर्मविषयक वादविवादांत शैवमतवादी पंडिताना जिंकून आगम मार्ग आणि नीलमत पुराणोक्त धर्मकर्मांचा उच्छेद चालविला होता. वैदिक बलिकर्मांचा लोप झाल्यामुळे त्या मंडळांतील नागदेवतानीं घोर हिमवृष्टि करून प्रजेचा संहार चालविला. प्रतिवर्षी हिमवृष्टीमुळें पीडा होऊं लागली. तेव्हा तो राजा हिवाळ्यात सहा महिने दार्वाभिसार प्रांतांत राहूं लागला. (१८०) ( दार्वाभिसार वितस्ता व चंद्रभागा नद्यामधील पहाडी प्रांत. त्यांतच राजपुरीचें पहाडी संस्थान होतें. ) तिकडेही बौद्ध लोकांचा नाश झाला; पण बलिदान व होम वगैरे करणाऱ्या ब्राह्मण मंडळींना त्या कर्मांच्या प्रभावामुळें तितका त्रास झाला नाहीं. असा दैवी चमत्कार घडला.

चंद्रदेव नांवाच्या काश्यपगोत्री ब्राह्मणानें उग्र तप करून त्या प्रदेशांतील प्रमुख नील देवता प्रसन्न करून घेतली. तिनें हिमवृष्टीचा उपद्रव दूर केला. आणि स्वतःच्या नीलपुराणोक्त आगमविधींची पुनः सुरुवात करविली. पूर्वीच्या चंद्रदेवाने यक्षांचा उपद्रव मिटविला होता. तसा या चंद्रदेवानें बौद्धभिक्षूंचा दुःसह त्रास व रोग नाहींसा केला. यानंतर,

**तिसरा गोनर्द राजा**—राजपदारूढ झाला. त्याने नागरूपी ग्रामदेवतांची यात्रा व उत्सव, आणि यज्ञयागादि कर्मे वगैरे पूर्ववत् चालू केल्यावर, सर्व ठिकाणचा दुष्ट बौद्धभिक्षूंचा व हिमवृष्टीचाही त्रास पार नष्ट झाला. प्रजेच्या पूर्व पुण्याईने. अधोगतीला पोंचलेल्या राज्याचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं, वेळोवेळीं चांगले राजे पैदा होत असतात. केवळ प्रजापीडक अशा राजाचा व त्यांच्या कुलाचा नायनाट होत असतो. नष्ट झालेल्या राज्यव्यवस्थेची पुनः सुसंस्थापना करणाऱ्या राजांना राज्यलक्ष्मीचा लाभ होत असतो. या काश्मीर मंडलांत पूर्वी होऊन गेलेल्या राजांची विशेष लक्षणे नीटपणे निरीक्षण करणाऱ्या सूज्ञ लोकांच्या लक्षात, त्या त्या राजाचें दुर्दैव, किंवा सुदैव, तेव्हाच लक्षांत येण्याजोगे आहे. या अन्वये या राज्याचें पुनरुज्जीवन करणाऱ्या या गोनर्दाच्या पहिल्या प्रवरसेनादि सिद्ध व सत्कर्मी वंशजानीं या पृथ्वीवर दीर्घ काल राज्याचा उपभोग घेतला. (१९०) हा गोनर्द वंशातील पहिला राजा, रघुकुलतिलक रघुराजाप्रमाणे प्रथम व सुप्रसिद्ध होता. त्यानें पस्तीस वर्षे राज्य केले. त्याच्यानंतर त्याचा पुत्र—

**राजा बिभीषणः**—याने साडेत्रेपन्न वर्षे राज्य केले. त्याच्या मागून—

**राजा इंद्रजितः**—व त्याचा पुत्र—

**राजा रावणः**—हे गादीवर बसले. त्यांनी पसतीस व साडेतीस वर्षे राज्य केलें. राजा रावण हा वटेश्वर नांवाच्या शिवलिंगाची नित्य पूजा करीत असे. ते शिवलिंग अद्यापि प्रसिद्ध आहे. त्याच्यावरील प्रभेच्या रेखा व बिंदू यांच्यावरून भविष्यकथन करतां येत असे. त्या लिंगाची त्याने एका चौसोपी मठांत स्थापना केली, व त्याला सारे काश्मीर मंडळ अर्पण केले होते.

त्याचा पुत्र दृढभुज असा--

**दुसरा बिभीषण राजा:**—याने साडेपस्तीस वर्षे राज्य केलें. त्याच्यानंतर त्याचा पुत्र—

**राजा नर किंवा किन्नर**—हा गादीवर बसला. त्यानें मिळविलेल्या अनेक विजयांचें, किन्नर लोक गायन करीत असत. तो राजा प्रारंभी फारच सदाचरणी होता. पण पुढें प्रजेच्या दुर्भाग्यामुळें तो विषयांध होऊन, अतिशय अनर्थ करूं लागला. किन्नर ग्रामांतील एका विहारांत एक श्रमण रहात होता. त्याने जादू करून, त्या राजाच्या राणीला हरण केलें. त्या रागावर, त्यानें शेकडों विहार जाळून टाकविले. व लावून दिलेले गांव जप्त केले. (२००) ( किन्नर ग्राम- हल्लींचें नागोम परगण्यांतील कानीर नांवाचें गांव असावें. ) त्यानें वितस्ता नदीच्या रेताड तीरावर एक फार सुंदर व विस्तीर्ण असे, नवे नगर वसाविलें. ( किन्नरपुर हे विजब्रोरच्या जवळच होतें. तसेंच चक्रधराचे मंदिरही त्याच्याजवळच असल्याचा उल्लेख आढळतो, तें मंदिर ःसकदर येथें असल्याचे मागें लिहिलेंच आहे. त्याच्याजवळचे उदर किंवा माळ याच्या आग्नेय कोपऱ्यावर एक खोलगट जागा आहे. तीच सुश्रवस नागाचे वसतिस्थान होतें म्हणतात त्या नागानें उध्वस्त केलेले हें नगर त्या उदरावरच होते. तेथे हल्लीं सुद्धा पुष्कळशी जुनीं नाणी सांपडतात. सुश्रवस नागाची कथा पुढे आली आहे. ) त्या नगरांत अनेक रुंद व प्रशस्त राजमार्ग व बाजार होते. त्याच्य जवळच्या वितस्तेच्या विस्तीर्ण पात्रात, चोहींकडून जाणाऱ्या येणाऱ्या, नाना तऱ्हेच्या, सुरेख नावाची, मोठी शोभा दिसत असे. आसपास उत्तमोत्तम फलपुष्पांनी लादलेले वृक्ष व रम्य उपवने होती. अनेक दिग्विजयांच्या द्वारें संपादन झालेल्या उमाप संपत्तीमुळें, तें नगर कुबेराच्या नगरीलाही लाजवीत असे.

त्याच्या शेजारीच सुश्रवस नागराज रहात असलेले, स्वच्छ व स्वादु जलाने तुडुंब भरलेलें एक सरोवर होतें. ( सुश्रवस नागाचा उल्लेख हरचरित व नीलमत पुराण यांच्यांत आहे. पण त्याच्यामध्यें, यापुढें दिलेल्या दंतकथेचा उल्लेख नाहीं. )

एके दिवशीं भर दुपारीं विशाख नांवाचा ब्राह्मण दीर्घ प्रवासामुळे थकून, छाये-साठीं त्या सरोवराच्या कांठीं पोंचला. व तेथील एका वृक्षाच्या दाट छायेखालीं बसला. मंद व शीतळ वायूच्या झुळकांनीं त्याला आराम वाटला. नंतर तो थोडेसे सत्तु काढून फराळ करूं लागणार तोंच, त्याला मंजुळ नूपुरध्वनि ऐकूं आला ! त्या सरोवराच्या पुलिनावर नाचत असलेल्या हंसानींही तो ध्वनि ऐकला असावा. लौकरच जवळच्या लताकुंजातून दोन सुंदर नागकन्या बाहेर आल्या. त्यांच्या अंगावर सुरेखसें नीलवर्ण कंचुक होते. त्यांचे नेत्रप्रांत फारच मोहक असून, कज्जल रेखांमुळें, त्यांच्या नेत्रांना भारी शोभा आलेली होती. त्यामुळें त्यांचे नेत्रकटाक्ष त्यांच्या माणकासारख्या आरक्त व सुंदर कर्णा-भरणांना सुरेखशा कमलनालासारखे दिसत होते. त्यांच्या स्कंधदंडावर त्यांची शिर-

कमळें पताकासारखीं असून त्यांच्या चंचल पापण्या, मंदवायूनें आंदोलन पावणाऱ्या त्या पताकांच्या फडकणाऱ्या टोकासारख्या वाटत होत्या.

त्यांना पाहून तो तरुण ब्राह्मण मोहित झाला व त्याने खाणें बंद केलें. तो कांहीसा गोंधळून गेला. (२१०); त्या नागकन्या कच्छगुच्छ किंवा कचदान गवताच्या शेंग्या खाऊं लागल्या. तें पाहून त्याला त्यांचें अप्रतिम लावण्य आणि हे भिकार खाणें;-छे ! मोठेंच विलक्षण आहे ! असें वाटलें. नंतर त्यांची कींव वाटून त्यानें त्यांना आदरानें बोलावून थोडासा सत्तु खावयास दिला व एका चतसांतून—पानाच्या द्रोणांतून-स्वच्छ व गार पाणी आणून दिलें. तो सत्तु खाऊन पाणी पिऊन व तोंड धुवून त्या त्याच्याजवळ बसल्यावर त्यांना कमळपत्राने वारा घालीत त्यानें म्हटले, " तुमचें दर्शन घडलें हे या तुमच्या दासाच्या पूर्व जन्मींच्या सुकृताचेंच फल. आम्हा ब्राह्मणांच्या अंगीं उपजत चापल्य व कौतुक असतें त्यामुळें मी विचारतों, की, तुम्हीं सुंदरींनी जन्म घेऊन कोणचे कुल अलंकृत केलें आहे ? आणि या भिकार शेंग्या खाण्याइतक्या निकृष्टावस्थेला कां पोचलां आहा ? " त्यावर एकीनें उत्तर दिलें, " आम्ही सुश्रवस नागाच्या कन्या. चांगलें अन्न न मिळाले तर असलेंही खाऊं नये का ? पित्यानें मला विद्याधरेंद्राला देऊं केलें आहे. माझें नांव इरावती. ही माझी धाकटी बहीण चंद्रलेखा," तो ब्राह्मण पुनःम्हणाला,"तुम्ही अशा गरीब कां ?" त्यांनीं उत्तर दिलें, "ते आमचा पिता जाणें ! त्याला विचारा. तो ज्येष्ठ वद्य द्वादशीला' तक्षक नागाच्या यात्रेसाठीं येईल. त्याच्या चुडेतून जल वाहात असते. त्याच्यावरून तुम्ही त्याला सहज ओळखाल. त्या वेळीं आम्हीही दोघी जवळच उदकांत उभ्या असूं."( तक्षक-विही परगण्यांतील' झेवन अथवा जयवन गांवाजवळच्या तीर्थांत तक्षक नागाची अद्यापिही पुजा होत असते. बिल्हण कवीचा जन्म त्या तीर्थाजवळच असलेल्या खानेमुष नांवाच्या गावीं झाला. त्याने या तीर्थाचें वर्णन केले आहे. याच्या लगतच केशराची लागवड आढळते तिची सुरवात या तक्षकापासूनच झाली आहे असें मानतात. ) इतके बोलून त्या नागकन्या अंतर्धान पावल्या. ( २२० )

पुढें ती यात्रा भरली. तिला तो ब्राह्मण कौतुकाने गेला होता. नाना नट, नर्तक, चारण व अगणित प्रेक्षक तेथे आलेले होते. नागकन्यानी सांगितलेल्या खुणेवरून त्या ब्राह्मणाने तो नाग ओळखला. त्याच्या बरोबर त्या नागकन्याही होत्या. त्यांनीं सुश्रवसाला त्याची हकीकत कळविली होती. नागानें त्याचे स्वागत केलें. बरेच बोलणे झाल्यावर, ब्राह्मणाने त्याला, त्याची आपत्ती व तिचें कारण, याविषयीं प्रश्न केला. तो ऐकून, नाग राजानें दीर्घ उसासा टाकून. मोठ्या खेदाने उत्तर दिलें. हे भल्या गृहस्था, मानी व विवेकी पुरुषाना कोणापुढेही अपरिहार्य भोक्तृत्वाची कहाणी सांगणे आवडत नाहीं. कारण ऐकणारा सज्जन पण त्या दु:खाचें निरसन करण्याला असमर्थ असला तर, त्याला व्यर्थ दुःख होतें व सामान्य जन, ते ऐकून आत्मश्लाघा करीत, समाधान करण्याच्या इच्छेनें त्याचें दुःख जणों दुणावतात. आणि सांगणाराचा अपमान करतात, किंवा त्याला त्याच्या प्रतिकाराचे निंद्य उपाय सुचावितात, अथवा ती आपत्ती दुर्निवार्य आहे, असें सांगून, होत असलेले दुःख वाढ-

वितात. म्हणून शाहणे लोक आपल्या आपत्ती आमरण पोटांतच ठेवतात. त्यांचें चिताग्नीनें त्यांच्या देहाबरोबरच भस्म होतें. उदात्त व निसर्गगंभीर लोकांच्या विपत्तीचें उद्घाटण, त्यांची मुलें किंवा सेवक, यांच्या तोंडूनच सहजगत्या होत असतें. खुद्द त्यांच्या चेहऱ्यावरून तें क्वचितच कोणाच्या नजरेस येत असतें (२३०) या दोघींनीं पोरपणाने माझी थोडीशी हकीकत प्रगट केली आहे. ती आतां तुम्हांपासून चोरून ठेवणें ठीक नाहीं. तुम्ही भले व सरळ मनाचे दिसतां. माझें हित करण्याचें अंगी सामर्थ्य असलेच तर तुम्हांला त्याच्यासाठीं थोडे परिश्रमही पडतील. तो पहा, त्या वृक्षाखालीं एक शिर मुंडून थोडीशी शेंडी राखलेला जती बसला आहे. तो शेती करतो. तो या शेताचा राखणदार आहे. त्याने या क्षेत्रांतील सारे नवान्न भारलेलें आहे. त्याला, त्याच्यापूर्वी आम्ही स्पर्श करूं शकत नाही. यामुळें आमचा सत्यानाश झाला आहें. या क्षेत्रांतील उत्तम पीक तो राखतो आहे तोंवर, ते आमच्या डोळ्यांसमोर असूनही, पिशाच्चांना पुढे असलेलें पाणी पितां येत नाहीं तद्वत्, ते आम्हांला मिळत नाही. अशी आमची प्रेतवत् स्थिति आहे. तेव्हां कांहीतरी युक्ति योजून त्या नैष्ठिक यतीचा नवान्न न खाण्याचा हा नियम भंग करतां आला तर पहा. आम्हीही योग्य प्रत्युपकार करूं जाणतो."

यावर 'ठीक आहे,' असे म्हणून त्या ब्राह्मणानें संधि साधून, तो यती बाहेर भातांचें भांडें शिजत ठेवून गेला असतांना हळूंच त्या भाड्यात थोडेसे नवान्न टाकलें. तें शिजल्यावर त्या यतीच्या नकळत खाण्यात आले. त्याबरोबर त्या नागराज सुश्रवसाने, एकदम खूप जोराच्या पर्जन्याची व गारांची वृष्टी करून, ते सारे उत्तम पीक नष्ट केलें.

याप्रमाणें संकटांतून सुटल्यावर, दुसरे दिवशीं त्या नागराजानें त्या ब्राह्मणाला, त्या सरोवरावरून आपल्या घरीं नेले ( २४० ) आणि आपल्या मुलीच्या हातीं त्याचे योग्य आदरातिथ्य व पूजन करविलें. तेथे तो दिव्य सुखोपभोग भोगीत कांहीं दिवस राहिला. नंतर त्याला घरी परत जाण्याची इच्छा झाली. त्याने चित्रलेखेला मागणी घातली. आणि परत जाण्याला परवानगी मागितली. त्याच्याशीं शरीर संबंध होणें इष्ट नाही, हे जाणत असूनही, नागराजानें त्याचे उपकार स्मरून, त्याला आपली कन्या, तसेच पुष्कळशी धनदौलत दिली. पुढें तो ब्राह्मण नरपुराला परत येऊन नागाच्या प्रसादाने आनंदमहोत्सव उपभोगीत पुष्कळ दिवस राहिला.

ती नागकन्या सुस्वरूप, तशीच फार सुशील होती. आपल्या प्रेमळ व चोख वर्तनानें व अनेक सद्गुणाने, ती त्या ब्राह्मणाला संतोषवीत असे. पुढे एकदा ती नागकन्या गच्चीवर असतांना, अंगणांत साळी वाळत टाकलेल्या होत्या. त्या एक मोकळा सुटलेला अश्व येऊन खाऊं लागला. त्याला हांकून लावण्याला कोणी सेवक घरी नव्हते. म्हणून ती स्वतःच पायांतील नूपुराचा मंजुळ ध्वनी करीत खालीं आली. त्या घाईत पदर सरकलेला हातानें सांवरीत, तिनें आपल्या करकमलाने त्या अश्वाला चापट मारली. तसा त्याच्या अंगावर तिचा सुवर्णमय पंजा उमटला, व तो अश्व पळून गेला. तो अश्व, नर राजाचा होता. दूतांच्या मुखानें त्यानें तिच्या रूपाची प्रशंसा ऐकली होती (२५०) त्यामुळे त्याच्या

मनांत अनावर काम उत्पन्न होऊन, एकाद्या अंकुशाला न जुमानणाऱ्या मदोन्मत्त गजा प्रमाणें जनापवादाला न डगमगतां, तो त्या कामाग्नीमुळें विवश झाला होता. त्याच्य भडकलेल्या कामाग्नीला, या अश्वविषयक प्रसंगानें अधिकच प्रज्वलित केलें. नागकन्येच्य कोमल व सरळ अंगुलींनां शोभणाऱ्या तिच्या करकमलाच्या चिन्हानें त्याच्या अनतिच्यि इच्छेला शशांकदर्शी सागराप्रमाणें अमर्याद भरती आली ! त्यानें निर्लज्जपणानें दूतां हार्त निरोप पाठवून तिला वश करून घेण्याचा उद्योग चालविला, पण व्यर्थ ! सारे उपाय थक लेले पाहून, राजानें त्या ब्राह्मणाजवळच तिची याचना केली. कामांधाना लज्जा कोठची ! ब्राह्मणानें त्याची अनेकवार निर्भत्सना केली. तेव्हा राजानें तिला जबरीनें नेण्यासाठ सैनिक धाडले. त्यांनी घराचें पुढलें दार घेरलेलें पाहून, निरुपायानें तो ब्राह्मण पत्नीसह मागील दारानें निसटून नाग राजाकडे पोंचला.

त्या दोघांना आलेले पाहून व त्यांची हकीकत ऐकून, तो नागराज क्रोधावेशानें त्या सरोवरांतून बाहेर पडला, व त्यानें घनदाट विषारी फुत्कारांनीं, व वज्रप्राय बर्फाच्या शिलांची वृष्टी करून, त्या नर राजाचा व त्याच्या नगराचा फडशा पाडला. तेव्हां अर्ध दग्ध प्रेतांपासून निघालेली वसा व रक्त, यांचा वितस्तेच्या पाण्यावर जाडसा थर झाला व ती नदी मोराच्या पंखांनीं आच्छादित झाल्यासारखी दिसूं लागली. ( २६० ) हजारो लोक, भयानें गर्भगळित होऊन, चक्रधराच्या मंदिरांत आश्रयाला गेले. ते तेथेंच ठार झाले! पूर्वी चक्रधरविष्णूनें मारलेल्या मधुकैटभ राक्षसाच्या अस्थी व वसा यांनी चक्रधराच्या मांड्या भरल्या होत्या, तसें यावेळी, त्या अर्धदग्ध प्रेतांच्या वसेनें चक्रधराची सर्व मूर्ति माखली गेली. रमण्या नांवाची नागीण पहाडांतून प्रचंड शिलासमूह घेऊन, आपल्या भावाच्या सहाय्याला आली. तिला सुश्रवस नाग, कृतकार्य होऊन परतलेला, नगरापासून एका योजनावर भेटला. तसा तिनें तो आपला शिलासमूह तेथेंच टाकला. त्याच्यामुळें नगराच्या भोंवतालीं पांच योजनें, सर्वत्र शिलामय झालें, व ह्या भूमीला रमण्याटवि हे नांव पडलें. ( नागराजाची बहीण रमण्या इच्याविषयींची दंतकथा रेंब्यार या नावांच्या नदीविषयीं हल्लीं सांगतात. ही नदी पीरपंत्साल व रूप्री घाटाकडील प्रदेशांतून येऊन, चक्रधरापासून दीड कोसांवर गंभीर संगमापाशीं वितस्तेला मिळते. तिचें पात्र सुमारें कोसभर रुंद आहे, व त्याच्यांत सुमारें चार कोसपर्यंत सारखे दगडधोंडे पसरलेले आहेत. या स्थळालाच रमण्याटवि म्हणतात. ) आपण व्यर्थ अशा घोर अनर्थाला कारण झालों असें पाहून, व लोकांच्या शिव्याशापाला कंटाळून व उद्विग्न होऊन, तो नाग ते स्थळ सोडून निघून गेला. व त्यानें स्वतःसाठीं एका दूरच्या पर्वतावर दुग्धसागरासारखें एक सुंदर सरोवर निर्माण केले ते अद्यापि अमरेश्वराच्या वाटेवर लागतें. ( हें सरोवर लिदर नदीच्या एका उगमाजवळ आहे. त्याला शेषनाग म्हणतात. अमरनाथाच्या यात्रेत तेथें एक मुक्काम पडतो. त्यालाच सुश्रवस नागही म्हणतात. त्याचें पाणी पांढरें सफेत दिसतें. त्याच्या दक्षिणेकडे एक पाणी जाण्याचा मार्ग आहे. त्याच्यापुढें झामातुर–जामातृनाग सुरु झालेला आहे. अमरेश्वराची यात्रा अलीकडे बरीच महत्त्वाची झालेली आहे.)

अद्यापिसुद्धां तें नष्ट झालेले नगर व चक्रधराच्या मंदिराजवळचें तें सरोवर पाहून, लोकांना या दंतकथेचें स्मरण होतें. (२७०) ' त्या विप्र पत्नीवर त्या राजाचे प्रेम बसणें कांही विशेष होते असें नाही, ' असे कांही कोत्या बुद्धीचे लोक समजतात. पण त्याच्या पायीं, त्या नागराजाच्या हातून, त्या नगराला मात्र अदृष्टपूर्व नाश सोसावा लागला. वस्तुतः, एखाद्या सती दैवत किंवा ब्राह्मण, याच्या प्रखर कोपानलानें त्रैलोक्याचेंही भस्म होऊं शकतें, असे आपणांला असल्या प्रत्येक गोष्टीवरून अनुभवास येते.

त्या राजानें एकुणचाळीस वर्षे, नऊ महिने राज्य केले. नंतर तो स्वतःच्या दुर्वर्तनानें नष्ट झाला. त्या किन्नरपुरांतील वाडे, मंदिरे व प्राकार वगैरे लवकरच उजाड व उध्वस्थ होऊन, तें नगर गंधर्व नगरासारखे क्षणदृष्ट नष्ट झाले.

या अनर्थाच्या वेळीं नर राजाचा एक पुत्र सुदैवाने त्याच्या दायीसह विजयेश्वर क्षेत्रांत गेला असल्यामुळे वांचला होता. त्याचे नांव सिद्ध.

**राजा सिद्धराजः**—दावानल दग्ध पर्वतप्रदेशांत पर्जन्य वृष्टीने नवी पालवी फुटावी, तद्वत्. त्या सर्वथैव हतप्रभ झालेल्या राज्याचे त्या सिद्ध राजाने गादीवर बसल्या-नंतर पुनरुज्जीवन केले. तो थोर व बुद्धिवान् होता. पित्याच्या विलक्षण वृत्तांतावरून हा संसार निस्सार असल्याचे निदर्शनास येऊन त्याला सद्वर्तनी होण्याला साधन झाले. गढूळ पाण्यांत पडलेले चंद्रप्रतिबिंब मलिन होत नाही. त्याप्रमाणें तो शुद्ध मनाचा राजा या संसारसागरांतील भोवऱ्यांत पडूनही त्यांत गर्क झाला नाही. बहुतेक राजेलोक आपल्या पराक्रमाच्या उन्मादामुळे संतप्त होत असतात. पण तो रात्रंदिवस, श्रीचंद्रमौलीश्वराच्या ध्यानांत निमग्न होत्साता, शिवपदीं लीन होता. अनर्घ्यरत्ने तृणप्राय लेखून, ती तो मुक्त-हस्तानें याचकाना देऊन टाकीत असे तो शिवपूजेंत मग्न असतांना त्यानें दाखविलेल्या औदार्यानें तो शशिखंड मंडन शंकराच्या आराधनेच्या कामीं शैवाग्रणि झाला होता. ( २८१ ) त्याची राज्यलक्ष्मी, सद्धर्मानें व सन्मार्गानें मिळविलेली होती. ती त्याच्या बरो-बरच स्वर्गलोकी गेली. त्यानें साठ वर्षे राज्य केलें. शेवटीं तो स्वतःच्या सर्व सेवकांसह सदेह कैलासाला गेला. त्याच्यामागून त्याच्या सेवकांनी तीव्र शोक, व त्याचा पुत्र यानें राज्याधिकार, एकदम ग्रहण केले. आपल्या बऱ्या वाईट स्वामिसेवेनुरूपच भृत्यवर्ग स्वतःला इहपर लोकीं वंद्य किंवा निंद्य गति प्राप्त करून घेत असतो. तृणरज्जु घट संग-तीनें अधोगतीला–कूपांत–पडते. पण तोच पुष्पाच्या आश्रयानें, ईश्वराच्या मस्तकावर चढतो. तो राजा स्वर्गात गेला तेव्हा, हा सिद्धराज सदेह स्वर्गात येतो आहे, असा सारखा जय-घोष करीत, व दुंदुभी वाजवीत, देवांनीं सात दिवस महोत्सव केला. त्याच्यामागून त्याचा उत्पलाप्रमाणें नेत्र असलेला पुत्र उत्पलाक्ष गादीवर बसला.

**राजा उत्पलाक्षः**—त्यानें तीस वर्षे व सहा महिनें राज्य केलें. नंतर त्याचा पुत्र.—

**राजा हिरण्याक्षः**—हा राजा झाला. त्याची कारकीर्द सदतीस वर्षे व सात महि-न्याची झाली. त्यानें हिरण्याक्ष वसविले, (२८५) (हे नगर सिंधु नदीच्या खोऱ्यांत श्रीनगरा-

हून गंद्रबालकडे जाणाऱ्या राजमार्गावर रानयिल येथे होतें. तेथेच हिरण्याक्ष गंगा नांवाच नाग किंवा तीर्थ होतें. याचा पुढें तरंग ८ श्लोक ७२९ मध्यें उल्लेख आलेला आहे या हिरण्याक्षाचा कथासरित्सागराच्या ६५ व्या अध्यायाच्या व पुढील श्लोकांत संबंध आला आहे. तेथें त्याचा पिता कनकाक्ष हा काश्मीरचा राजा, हिरण्यपु नांवाच्या राजधानीत रहात असल्याचें लिहिलें आहे. ) तो मरण पावल्यावर त्याचा पु हिरण्यकुल व नंतर त्याचा नातू वसुकुल या दोघांनींही साठ साठ वर्षे राज्य केलें. वसुकुला नंतर त्याचा पुत्र

**मिहिरकुल राजा**:—गादीवर बसला. ( हा श्वेतहूणांचा राजा आणि गोल्ला याही नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचीं नाणीं मध्य हिंदुस्थानांत एरण व मंदसोर येथें सांपडलं आहेत. त्याचा पिता तोरमान. त्याच्या मागून हा इ स. ५१५ त गादीवर बसला त्याचा राज्याधिकार काबुलापासून मध्य हिंदुस्थानापर्यंत चालत होता. त्याच्या मगध राज बालादित्य यांच्याशीं अनेक झटापटी झाल्यावर त्याला बालादित्य व कनोजचा राज यशोवर्मा, यांनीं पराजित करून इ. स. ५३० च्या सुमारास काश्मीरच्या भोंवतालच्य प्रदेशाकडे पिटाळून लावलें. पुढे तो इ स. ५४४ ते ५५० पर्यंत, सिंधु नदीच्या खोऱ्याच्य खालच्या भागांत आपली सत्ता पुनः स्थापन करण्याच्या खटपटींत होता. कल्हणानें याचं दिलेली हकीकत पुष्कळशी दंतकथात्मक आहे. तरी त्यानें त्याच्या स्वभावाचें केलेलें वर्ण ह्वेनत्संग यानें सी. यू. की मध्ये दिलेल्या वर्णनाशीं बरेच जुळतें. त्याला ऐतिहासिक आधारह आहे. इ. स. ५२० त सुंगयुन यानें त्या राजाची, त्याच्या छावणीत भेट घेतली होती त्या भेटीचें सुंगयुन यानें वर्णन केलेलें आहे. त्याच्याशीं ही गोष्ट बरीच जुळते. त्याच्य नाण्यावर, जयतुवृष जयतुवृषध्वज, हीं अक्षरें आढळतात. त्याच्यावरून त्याचा शैव धर्मा विषयीचा आदरही दिसून येतो. ) तो कृतांताप्रमाणें प्रखर प्रतापी व दुष्ट होता. त्याच्य कारकीर्दीत या मंडळांत उत्तरदिशा, म्लेच्छाच्या धुमाकुळामुळें, यमदेवताक दक्षिण दिशेचं बरोबरी करूं लागली होती. (२९०) त्याच्या सैनिकांनीं मारलेल्या शत्रूंच्या प्रेतांवर ता मारीत, उत्सुकतेनें पुढें पुढें धावत असलेले काकगृध्रादि पक्षी पाहूनच, त्याच्या समीपते लोकांना ज्ञान होत असे. अंतःपुरांतील विलासभुवनांत सुद्धां त्याचा तो जणों वेताला सारखा जनसंहार चालूच असें. त्याच्या क्रूर हृदयाला बालांसंबंधीं करुणा, स्त्रियांविषय घृणा, किंवा वृद्धाविषयीं गौरव, यांचा कधीं स्पर्श सुद्धां होत नसे. एकदां त्याच्य राणीनें सिंहलद्वीपांत तयार होणाऱ्या सुवर्णपदलांछित वस्त्राची कांचोळी घातलेलं त्याच्या दृष्टीस पडली. त्याबद्दल चौकशी करतां ती सिंहल देशाच्या राजाची पद चिन्हें असल्याचे प्रतिहारीनें कळविलें. याचा त्याला भारी राग आला. व यांत त्य राजानें आपला अक्षम्य अपमान केला, असे समजून त्याने तत्काल भल्या मोठ्या सैन्यानिशी सिंहलेश्वरावर स्वारी केली. त्याच्या सैन्यांतील सहस्रशः मदोन्मत्त हत्तींच्या मदजलान भरती आलेला दक्षिण महासागर जणों कालिंदीच्या आलिंगनानें उच्छृंखल झालासे दिसलें. त्यानें अगणित सैन्यासह चढाई करून लंकेंतील उत्तुंग प्रासादांवर चढलेल्या राक्षसांनीं पाहिलें.

त्यानें लंकेश्वराचें त्याच्या सिंहासनावरून, आणि आलेल्या क्रोधाचें आपल्या मनांतून, एकदमच उच्चाटण केलेलें, तेव्हां त्यांना, राजा रामचंद्राचीच वानर सेनेसह पुनः स्वारी आली कीं काय, असें वाटून थरकांप सुटला. या प्रचंड पराक्रमी राजानें, तेथें नवा राजा गादीवर बसविला. तेथून त्यानें सूर्याची प्रतिमा असलेलें यमुष देव नांवाचें वस्त्र हरण करून आणलें. मदगज आपल्या मदगंधानें इतर हत्तींना पळवून लावतो, त्याप्रमाणें त्यानें चोल-तंजावर-कर्नाट व लाट-मध्य-गुजरात-वगैरे देशांच्या राजांना उधळून लावले. (३००) तो गेल्यावर हे राजे परत आले तेव्हां त्यांना, आपल्या नगराच्या भग्न प्राकारावरून त्यांची झालेली वाताहत दिसून आली. तो काश्मीरांत परत येत असतांना-हारावर-मुख्य घाटीच्या नाक्यावर-एक हत्ती कडयावरून पडलेला, भयंकर दुःखानें ओरडूं लागला होता. त्याचा तो करुण शब्द मिहिरकुलाच्या कानी पडला. तेव्हां त्या विक्षिप्त व क्रूर राजाला त्याची विलक्षण मजा वाटली. तिच्या भरात त्यानें तो तमाशा जास्त वेळ पाहण्यासाठीं, बुद्धया आणखीही शंभर मोठमोठे हत्ती कडयावरून लोटून देवविले ! असा तो नष्ट व पापी होता. पापी पुरुषाच्या स्पर्शानें देह विटाळतो, तद्वतच त्याच्या दुष्कृत्यांच्या वर्णनानें जिव्हा विटाळते. म्हणून त्या अधमाधमाच्या इतर दुष्कृत्यांचें वर्णन केलें नाही.

मनसोक्त मर्कटचेष्टा करणाऱ्या मूर्ख व हलकट माणसाच्या विक्षिप्त कृतीचे इंगित कोणाला कळणार ? ( हा हत्ती मारविण्याचा प्रकार घडला तेव्हांपासून त्या घाटीला हस्तिवंज असें नांव पडलें. असें एका टीकाकारानें म्हटलें आहे. ती घाटी पूर्वीच्या पीरपंतसालच्या राजमार्गावरच होती. अकबर बादशहानें नवा मार्ग काढलेला हल्ली चालू आहे. त्याच्यावर ती घाटी लागत नाहीं. पूर्वीचा राजमार्ग हस्तिवंज कडा असलेल्या पठारीवरून, नदी डावी टाकून जात होता.)

सुंगयुन व कासमास दोघांनींहि या श्वेतहूणाधिपतीजवळ पुष्कळसे लढाऊ हत्ती असल्याचे वर्णन केलें आहे.

अशा या दुष्ट व्यक्तींनेंही परलोकसाधनाच्या इच्छेनें कांहीं पुण्यकर्में केली. त्यानें श्रीनगरामध्ये मिहिरेश्वराची स्थापना करविली. व होलडा-हल्लींचा वूलर परगणा-या प्रांतांत मिहिरपूर नांवाचें नगर वसविलें. त्याच्याच सारखे दुष्ट व पापी गांधार देशी ब्रह्म-बंधूनीं त्याच्यापासून अग्रहार व दुसरीं दानें घेतलीं !

त्याच्या राज्यांत भगिनीगामी व स्नुषागामी असे म्लेच्छवंशीय, दुष्ट दार्द जातीचे लोक व भाट याचाच भरणा फार होता. त्यांच्या स्त्रिया परोपभुक्त व निर्लज्ज असत.

घनांधकार करणारा वर्षाकाल आणि हंसांना सोज्वळ शरत्काल हे अनुक्रमें आनंद-दायक होतात. त्याचप्रमाणें दाता व याचक यांचा संबंध परस्पर यथोचितच होत असतो. सर्वत्र समानशीलताच सख्याला कारण होत असते.

त्या घोर व भयंकर राक्षसानें सत्तर वर्षें राज्य केलें. शेवटीं त्याचें शरीर भयंकर रोगांनीं ग्रासलें. तेव्हां त्यानें अग्निप्रवेश केला. त्या वेळीं तीन कोटी जीवहिंसक अशा या

राजानें, स्वतःच्या देहावरही दया दाखविली नाही. सबब तो स्वर्गाला गेला ( ३१० ): अशी आकाशवाणी झाली, अग्रहार दानादिक अनेक पुण्यकर्मांच्या द्वारें त्यानें, आपल्या सर्व क्रूर कर्मोत्पन्न पापाचें क्षालन केलें. शिवाय दार्द, भाट वगैरेंच्या संपर्कानें भ्रष्ट व पापमय झालेल्या लोकांचा संहार करून या प्रति नरसिंह राजानें, शेवटीं स्वतःच्या देहाचीहि आहुती देण्याचा संकल्प करून, आपल्या पापाचें प्रखर प्रायश्चित्त केलें, असें कांहीं तत्पक्षीय लोकांनीं वर्णन केलें आहे. तसेंच जयेश्वर तीर्थांत गांधार ब्राह्मणांना हजारो गांव अग्रहार दिले, ते यासाठींच, व नंतर त्यानें अनेक तीक्ष्ण शस्त्रांनीं भरलेल्या लोखंडी पत्र्याच्या शय्येवर पडून, प्रदीप्त अग्नींत प्रवेश केला. असा तो पुरुषसिंह क्रूराग्रणी असूनही निंद्य नव्हता, असेंही तत्पक्षीय लोकाचें म्हणणें आहे. ( गांधार देशांतील लोक अनाचारी सबब धर्मबाह्य असल्याबद्दल महाभारतांत कर्णपर्वांत उल्लेख आहे. तो देश मिहिरकुलानें पादाक्रांत केल्याबद्दल ह्वेनत्संग यानें सीयूकीच्या प्रथम भागांत म्हटलें आह.)

सुश्रवस नागानें नरराजाचें नगर जाळल्यानंतर त्या प्रदेशांत खष जातीचे लोक प्रबल झाले होते. त्यांच्या उच्छेदासाठीं या राजाला असा क्रूरपणा करावा लागला होता असेंही कांहींचें म्हणणें आहे. ( खष देश पीरपंत्साल घाटीच्या दक्षिण व पश्चिम या बाजूस वितस्ता नदीच्या आसपास आहे. )

तो राजा चंद्रकुल्या नदी अडवून ती वळवून आणीत असताना मध्ये एक भली मोठी शिला आडवी आली. ती कांहीं केल्या निघेना. तेव्हा त्याला मोठी चिंता पडली व त्यानें तप आरंभिले. त्याला स्वप्नांत दृष्टांत झाला कीं, त्या शिळेवर कोणी प्रबल ब्रह्मचारी यक्ष बसला असून कोणी खरी पतिव्रता स्त्री त्या शिळेला स्पर्श करील तर तो पुढे आड येणार नाही. ( ३२० ) या दृष्टांताप्रमाणे दुसरे दिवशीं राजाने पुष्कळशा कुलस्त्रियांकडून त्या शिळेला स्पर्श करविला पण व्यर्थ. शेवटीं चंद्रवती नांवाच्या एका कुंभारणीने स्पर्श करतांच, ती शिला हलली. राजाला स्त्रियांच्या या असतीत्वाचा भारी राग आला, व त्यानें त्या सपाटयांत, तीन कोटी कुलस्त्रियांना त्यांचे पती, पुत्र, व बंधू, यांच्यासह ठार मारविले, अशीही एक दंतकथा प्रचलित आहे.

वस्तुतः घोर हिंसा कोणच्याही निमित्तानें झाली तरी अत्यंत निंद्य व गर्ह्यच. त्या क्रूर व दुष्ट राजाइतक्या गर्ह्य माणसाला, त्याच्या गांजलेल्या प्रजेनें ठार मारलें नाहीं, हे तरी बहुधां त्या देशांतील उग्रदेवता, त्याचें रक्षण करीत होत्या, हेंच असावें.

त्या अत्यंत गांजलेल्या प्रजेचें पुण्य एकदांचे उदयास येऊन, शेवटी राजा मिहिरकुल मरण पावल्यावर, प्रजेनें त्याचा सद्गुणी पुत्र बक याला गादीवर बसविलें.

**राजा बकः**—स्मशानांत बांधलेल्या आनंदभुवनाप्रमाणे त्या दुष्ट पित्यापासून पैदा झालेल्या त्या चांगल्या राजपुत्राच्या सिंहासनापुढेंही, प्रजेचा थरकांप होत असे. घनदाट मेघघटेमुळें, दुर्दिन वाटणाऱ्या वर्षाकाळच्या दिवसांतही पुढें आनंददायक जलवृष्टी व्हावी, त्याप्रमाणें त्या अत्यंत तापद मिहिरकुलापासून झालेल्या त्या राजानें प्रजेला आनंद

दिला. त्याच्या रूपानें जणों मूर्तिमंत धर्म अवतरला व प्रजेचें भय नष्ट झालें व लुप्तप्राय झालेली शांतता देशांत पुन्हां नांदू लागली. त्यानें बकश्वभ्र प्रांतांत सुसंपन्न, शोभिवंत व प्रशस्त असें लवणोत्स नांवाचें नगर वसविलें व तेथें बकेशाचें मंदिर बांधविलें आणि बकवती नांवाचा कालवा काढला. (लवणोत्स हा गांव श्रीनगरापासून एका मजलीवर होता.) त्या बकराजानें त्रेसष्ट वर्षें व तेरा दिवस राज्य केलें ( ३२० ).

एके दिवशीं प्रदोषकाळीं एका सुंदर स्त्रीच्या रूपानें भद्रा नांवाची एक योगिनी त्या राजाकडे आली. तिच्या मोहक व प्रेमळ भाषणानें भुलून व देहभान विसरून तो राजा तिच्या बरोबर तिनें केलेला योगोत्सव पाहण्यासाठीं, आपल्या अनेक पुत्रपौत्रांसह गेला असतांना, तिने त्या सर्वांना मातृचक्रापुढें बली दिलें आणि त्या योगानें स्वतःला सिद्धि मिळविली. त्या वेळीं तिच्या गुडघ्याचें दगडावर उमटलेले खड्डे अद्यापि, या गोष्टीची साक्ष म्हणून लोक दाखवितात. तें मातृचक्र व तीं जानुमुद्रांकित शिला अद्यापि खेडीमधील मठांत कायम असून, तद्विषयक दंतकथाही तेथे प्रचलित आहेत. (खेडी म्हणजे खुरनारवाव परगणा.) त्याच्या मागून

**राजा क्षितिनंदः**—गादीवर बसला. तो सुदैवानें व देवीच्या कृपेनें त्या योगिनीच्या सपाट्यांतून वांचलेला, जणो त्या राजकुलरूपी वृक्षाचा कोंब होता. त्याने तीस वर्षें राज्य केलें. त्याच्या मागून त्याचा पुत्र

**राजा वसुनंदः**—हा राजा झाला. त्याने कामशास्त्रावर एक सुप्रसिद्ध ग्रंथ रचिला. तो बावन्न वर्षें व दोन महिने गादीवर होता. नंतर

**राजा अक्षः**—यानें अक्षवाल नांवाचें नगर वसविलें. त्यानेंही साठ वर्षें राज्य केलें. ( अक्षवाल हल्लींचें कुठार परगण्यांतील अचबल नांवाचें गांव. त्याच्या शेजारींच अक्षिपाल नाग हे तीर्थ आहे. ) नंतर त्याचा पुत्र गोपादित्य राज्याधिकारी झाला.

**राजा गोपादित्यः**—तो या सर्व द्वीपांनीं युक्त पृथ्वीचें राज्य करीत असतांना, सर्व वर्णाश्रमधर्मकृत्यें शास्त्रोक्त व अबाधित चालत असल्यामुळें, प्रजेला जणों कृतयुगाचा अनुभव येत होता. त्यानें खोल खागिक, हादिग्राम, स्कंदपुर, शमांजासा वगैरे अनेक प्रसिद्ध अग्रहार कायम केले. ( ३४० ) त्यानें गोपाद्रीवर ज्येष्ठेश्वरांची स्थापना केली. आणि आर्यदेशी ब्राह्मणांना गोप अग्रहार दान दिले. तसेंच त्यानें लसूण खाणाऱ्यांना भूक्षीरवाटिका या गांवीं नेऊन ठेवलें. अभक्षभक्षी ब्राह्मणांना खासटा येथें घालवून देऊन, आर्यावर्तांतून धार्मिक व आचारसंपन्न ब्राह्मण आणवून त्यानें त्यांना वाश्विका वगैरे अग्रहार दिले. ( खोलबूलर परगण्यांतील खूली गांव, खागिक हल्लींचें खागि किंवा खाग नांवाचें गांव. हादिग्राम नागाम परगण्यांतील आरिगोम हा गांव. स्कंदपुर कुठाहार परगण्यांतील खोडूर गांव. गोपाद्रि यालाच हल्लीं तक्त ई सुलेमान म्हणतात. त्याच्या खालच्या सुपीक पठारावर हल्लींच्या गूपकार नांवाच्या गांवांजवळच गोप अग्रहार असावेत. भूक्षीरवाट गोपाद्री जवळच्या सुपीक जमिनीचा एक भाग. वाश्विका रेंब्यार नदीवरील वची किंवा वुचों गांव. )

त्याच्या संबंधानें रचल्या गेलेल्या प्रशस्तीमध्यें त्याला भुवनैकपाल असे म्हटलें आहे. तो यज्ञयागादिकांतल्या शिवाय पशुहिंसा होऊं देत नसे. असें, या भूलोकांचें राज्य-वैभव साठ वर्षे व सहा दिवस भोगून, त्यानें आपल्या सुकृताचें पुण्यफलच अशी स्वर्ग-प्राप्ति करून घेतली. त्याच्या मागून त्याचा पुत्र

**राजा गोकर्णः**—हा राजा झाला. त्यानें गोकर्णेश्वराची स्थापना केली. त्यानें सत्तावन्न वर्षे व अकरा महिने राज्य केलें. त्याच्यानंतर

**राजा खिंखिलाख्यः**—हा त्याचा पुत्र, जणों प्रति सूर्यच, असा गादीवर बसला. त्याला नरेंद्रादित्य असेंही म्हणत. त्यानें भूतेश्वराचीं मंदिरें बांधविलीं व अनेक कायमचीं अन्नछत्रें घातलीं. त्याचा गुरु उग्र. त्याच्यावर दैवी कृपा होती. तो उदग्र विग्रह होता. त्यानें उग्रेशाचें मंदिर व एक मातृचक्र यांची स्थापना केली. त्यानें छत्तीस वर्षे, तीन महिने, दहा दिवस राज्य केलें, आणि आपल्या अगणित पुण्यकृत्यांच्या द्वारें उत्तम गति प्राप्त करून घेतली. नंतर त्याचा पुत्र

**अंध युधिष्ठिरः**—राजा झाला. तो गजनेत्री असल्यामुळें त्याला हें नाव पडलें होतें. ( ३५० ) त्यानें कांहीं काळ वडिलोपार्जित राज्याचा कारभार चांगला चालविला. पण पुढें दुर्दैवानें तो राज्यमदामुळें उन्मत्त व दुर्वर्तनी झाला. तो थोर, विद्वान, मान्य, अनुभवी, अशा लोकांची कदर, किंवा त्यांचें नुसतें सादर स्वागत सुद्धां, करीनासा झाला. त्याच्या दरबारांत धुरंधर अजिंक्य पत्र घेणारे पंडित, आणि क्षुद्र सेवकजन, यांची सारखीच गणना होऊं लागली. तेव्हां भले लोक त्याचा संपर्क टाकूं लागले. सर्वत्र समदृष्टी ठेवणें योग्यांनाच योग्य. पण त्यामुळें राजाला दोष लागतो, व त्याची अपकीर्ति होते,

लबाड लोक दोषांना गुण व गुणांना दोष करून दाखवीत असतात. अशा लोकांनी त्याच्या बुद्धीला भ्रंश केला व शिवाय त्याला भीजित करून टाकलें. त्याचें भाषण नेहमी मर्मभेदक व थट्टामस्करीचें कुत्सित व दीर्घकालिक होत असे. तो नेहमी हांजी हांजी कर-णाऱ्या लोकांशींच गप्पा गोष्टी करण्यांत दंग असे. त्याच्या करमणुकीसुद्धां राजाला न शोभणाऱ्या व घातक असत. तो कपटाने तोंडावर गोड बोलून मागे भारी निंदा करी. त्याची मैत्री अस्थिर होती. यामुळें त्याचे सारे सेवक त्याचा द्वेष करूं लागले. तो यःकश्चित् व दुष्ट गोष्टीमध्यें निमग्न रहात असल्यामुळें त्याचें राज्य लौकरच डबघाईस आलें. त्याला वरवर नमून व गोड बोलून राहणारे लबाड सल्लागार लोक, बेफाम व प्रबल झाले, व चांगल्या लोकांनीं त्याग केलेल्या त्या राजाचा ते द्वेष व द्रोह करूं लागले. (३६०) त्यांनीं राजाची सत्ता संपुष्टांत आणली व ते स्वतः निरंकुश बनले. त्यांनी शेजारच्या राजांना चिथवून आपल्या राजाचें राज्य घेण्याला फूस दिली. असें उत्तेजन मिळाल्यावर त्यांनीं ससाण्यासारखी झडप घालण्याची तयारी चालविली.

यंत्रांतून सुटलेला दगड कारागिराला मागें परतवितां येत नाहीं. तद्वत् राज्याची बिघडलेली घडी त्या भयभीत राजाला सुधारतां येईना. राज्यव्यवस्था क्षणमात्रांत बदलली.

ती ताळ्यावर आणण्याचा कांहींच उपाय त्याला सुचेना. राजा आपले दोष जाणतो, तो स्वास्थ्य मिळतांच आपणाला मारील, या भीतीनें त्याच्या वृद्ध आश्रितांनीं त्याच्या तड-जोडीच्या भाषणाकडे लक्ष दिलें नाहीं. पुढे परकी राजांनीं त्या मंत्र्यांच्या सल्ल्यानें चढाई करून राजधानी व राजवाडा हस्तगत केला. त्यांच्या रणदुंदुभी व भेरीच्या घोर शब्दांत लोकांनीं केलेला हलकल्लोळ दबून गेला. त्यांच्या मोठमोठ्या गजावरील ध्वज व पताका यांनीं सूर्य प्रकाश लोपला जाऊन भर दिवसां राजवाड्यावर कृष्णपक्षीय रात्रीप्रमाणें अंधः-कार पसरला. राजाला पळून जाण्याची शत्रूनें बुद्ध्या सवड दिली. ती साधून तो हतभागी अंध युधिष्ठिर राजा, राजवाडा व नगर सोडून पळून गेला. त्याच्या अंतःपुरांतील पडद्यात राहणाऱ्या राजस्त्रिया, अश्वखुरानीं उडविलेल्या धुरळ्यातून सैरावैरा धांवत चाललेल्या पाहून, पौर जनांनीं विवश होऊन, राजमार्गावर अश्रुबिंदुरूपी जणों लाजावृष्टि केली.

पुढें तो पदच्युत राजा रानावनांतून व पहाडी प्रदेशांतून, थकून भागून, जात अस-तांना शत्रूंनीं त्याचा खजिना व अंतःपुरांतील कांहीं तरुण राजस्त्रिया, धरून नेल्या.(३७०) उंच पर्वतांच्या कडयांवरून उन्मळून पडलेल्या वृक्षावरील लता, पुष्पें व फळे, मार्गांतील दगड धोंडे तेव्हांच लुबाडतात, तशी त्याची स्थिति झाली. तो दमून भागून, मार्गांत जाग-जागीं वृक्षछायेंत बसे. तेव्हां थोडा वेळ त्याला आपल्या दुःखाचा विसर पडे. पण तित-क्यांत हलकट पहाडी लोकांच्या आरोळ्या ऐकून तो शुद्धीवर येई व पहाडी नद्यांच्या पाण्याप्रमाणें शोकरूपी खोल गर्तेत पडे. नाना प्रकारचीं तृणधान्ये व परिमल द्रव्ये यांनीं व्याप्त व गंधयुक्त झालेली वनभूमी आणि पात्रांत खडक व शिला आल्यानें प्रवाह दुर्गम झालेल्या घोर गिरिनद्या, यांचें उल्लंघन करून आल्यानें, राजस्त्रिया बेशुद्ध होऊन पडत. त्या श्रांत व दीन झालेल्या मुग्ध राजस्त्रियांना, बिसतंतु व कोमल किसलय, यांच्यावर निर्वाह करावा लागे. तो राजा व त्या राजस्त्रिया, राज्याच्या सीमेवरील पर्वताच्या पठारावर पोंचल्या, तेव्हां त्याना कोठें धीर आला व त्यांनी किंचित् समाधानानें, देवतांना पुष्पांजली अर्पण केल्या. त्याबरोबरच जणों त्या पर्वताच्या दऱ्यातून घरट्यांत बसलेल्या अगणित पक्ष्यांनीं चोंची पंखांत खुपसून आपल्या केविलवाण्या शब्दाने तो प्रदेश निनादित करून सोडला.

आपला देश फार दूर राहिला असें पाहून त्या राजस्त्रियांनी पदर स्तनावर व हात कपाळावर ठेवून, मागें दूर सोडून आलेल्या आपापल्या गृहांकडे पहात फार शोक केला. त्यांच्या अश्रुपातानें त्या मार्गांत जणों पाट वाहूं लागले. त्यांना धडपणे चालतां येईना. अशा विपन्न स्थितींत तो राजा परराज्याच्या हद्दींत पोंचलेला होता. त्याची ती दीन स्थिति व नम्र आणि विनीत भाषणें पाहून व ऐकून, तिकडील राजांना दया आली. ते निष्कपटपणें व प्रेमानें त्याच्या सेवेंत हजर झाले व त्यांनीं अनेक रीतीनें व स्नेहपूर्वक, त्याला दुर्दैवानें प्राप्त झालेल्या राज्यभ्रंश निमित्तक दुःखाचा प्रतिकार करण्याचा यत्न चाल-विला. (३८०) (याप्रमाणे अडतीस राजांनीं एक हजार चौदा वर्षे व नऊ दिवस राज्य केलें )

काश्मीरक महाअमात्य चंपकप्रभुपुत्र कल्हणकृत राजतरंगिणीचा पहिला तरंग समाप्त झाला.

———

# तरंग दुसरा.



अज व गौ यांच्या शृंगांचीं बनविलेलीं धनुष्यें, धारण करीत आणि गणेश व गजचर्म यांनीं युक्त श्रीशंकराचीं एकाच देहांत नर व नारी अशीं रूपे दाखविणाऱ्या त्या अर्धनारी-नटेश्वराचा विजय असो.

पुढें त्या अंध युधिष्ठिरानें वार्धक्यामुळे शमप्रधान होऊन मुनिजनांच्या उपदेशाप्रमाणे गेलेलें राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न करणे सोडून दिले. मध्यंतरी तो पुनः खटपटी करीत फिरत होता तेव्हां त्याला त्याच्या मंत्र्यांनीं दुर्गागलिका येथें कैद करून ठेवले होतें असेही कोणी लिहिलें आहे. दुर्गा गलिका-हा एक श्रीनगरचा पुरा होता. त्याचें नांव ड्रुगजन होतें तो तख्त ई सुलेमान पहाडीच्या पश्चिम पायथ्यापासून दल सरोवराच्या द्वारापर्यंत पसरलेला होता. त्या ठिंकाणीं एका राजाला कैदेत ठेवले असल्याबद्दची दंतकथा अद्यापि तेथें चालू आहे. त्याच्या मागून मंत्र्यांनी

**राजाप्रताप**·—याला गादीवर बसविलें. तों विक्रमादित्यांचा कोणी आप्त होता व त्याला मंत्र्यांनी बुद्धया बोलावून आणविले होते. हा व शकारि विक्रमादित्य एकच मानून, त्याच्या संबंधानें, कांहीं ग्रंथकारांनीं चुकीचे लेख लिहिले आहेत. ते निराधार असल्यानें, जमेस धरतां येत नाहीत. या प्रताप राजापर्यंत काश्मिरांत आपसांत तंटे व बेबंदशाही चालू होती, ती पुढें बंद झाली व हा देश हर्ष वगैरे परकी राजांच्या अमलाखालीं, कांही काळ राहिला. (हा हर्ष राजा कोणचा, हे नक्की सांगतां येत नाहीं. उज्जनीचा हर्षविक्रम आणि कनोजचा हर्षवर्धन हे दोघेही कल्हणानें धरलेल्या कालानंतर पांचसहाशें वर्षांनीं झालेले आहेत.) त्या प्रतापादित्य राजाला तें राज्य परंपराप्राप्त नसूनही, त्यानें, मनोज्ञ पति नव वधूचें प्रेमानें लालन करतो, त्याप्रमाणें, त्याचें परिपालन केले. त्यानें बत्तीस वर्षे राज्याधिकार चालविला. नंतर त्याचा पुत्र

**राजा जलौकः**—गादीवर बसला. सूर्यापासून पूर्णचंद्राला प्रभा प्राप्त होते. तद्वत या राजानेंही आपल्या पित्याप्रमाणेच प्रजेचे कल्याण करीत त्या राज्याचा उपभोग घेतला. (१०) त्याच्या मागून त्याचा पुत्र

**राजा तुंजीनः**—आणि त्याची भाग्यशाली राणी वाक्पुष्टा, यांनी राज्य केलें. त्याच्या कारकीर्दीत प्रजा फार प्रसन्न राहिली. चंद्रकला आणि गंगा यांनी शंकराच्या जटा-जूटाला शोभा येते. त्याप्रमाणें तुंजीन राजा व वाक्पुष्टा राणी यांच्या योगाने सर्व काश्मीर मंडळ विभूषित झालें होतें. शतह्रदा विद्युत् व पयोवाह मेघ चित्रवर्ण माहेंद्र धनुष्य धारण करतात, तसें त्या दोघांनींही नाना वर्णाच्या वस्तीमुळें मनोहर झालेल्या या काश्मीर मंडळाचें उत्तम प्रकारें धारण व पोषण केलें. त्या भाग्यशाली दंपत्याने त्या भूमीला भूषण-

भूत असे तुंगेश्वर शंकराचें मंदिर बांधविले आणि कतिका नांवाचें नगर वसविलें. (कतिका हल्लीचें वूलर परगण्यांतील वितस्ता नदीच्या उजव्या तरिवरील छचपुराजवळचें कै नांवाचें गांव.) प्रखरविकिरणप्रतप्त मरुदेशतुल्य मडव राज्यांतील एका भागांत नुकतेच लावलेल्या वृक्षांना त्यांच्या प्रभावाने तात्काळ फुलें व फळे आलीं. ( मडव राज्य प्राचीन कालापासून काश्मीर मंडलाचे क्रमराज्य–कमराझ व मडवराज्य–मराझ असे दोन विभाग मानण्यांत आलेले आहेत. पहिल्या भागांत श्रीनगरच्या वरच्या बाजूस असलेला वितस्तेच्या उभयकांठचा भाग व दुसऱ्यांत तसाच खालचा भाग यांचा समावेश होतो. हे विभाग कल्हणाच्या वेळेपासून अकबराच्या कालापर्यंत असेच अढळून येतात.)या राजाच्या कारकीर्दीत जणों द्वैपायन व्यासाचा वंशज किंवा अवतार असा चंद्रक नांवाचा कवि झाला. त्यानें एक नाटक रचले तें सर्व मान्य झालें. (चंद्रक–चंद्रक–कवि व त्याचे ग्रंथ याविषयी तपशील आफ्रेटकृत संस्कृत ग्रंथ व ग्रंथकार यांच्या विस्तृत यादींत दिलेला आहे.)

तसेंच या राजदांपत्याचें सत्त्व पाहण्यासाठीच जणो, साऱ्या प्रजेला अत्यंत दुस्सह, व तापद, असा घोर उपद्रव सुरू झाला. भाद्रपदांत ऐन दाण्यावर आलेलीं साळीचीं शेतें. प्रखर हिमवृष्टि होऊन करपून गेलीं. ते भयंकर हिम, महा प्रलयकालच्या घोर मृत्यूच्या अट्टहासा-सारखे भिषण भासत होतें. उभ्या साळीच्या लोंब्याबरोबरच, सर्व लोकांची वित्ताशा गळून गेली. त्यामुळें भयंकर दुष्काळ पडला, आणि चोहींकडे क्षुतक्षाम व प्रेतप्राय प्रजाजनांचे थवे, पिशाचाप्रमाणें वावरूं लागले. (२०) दुस्सह दुर्भिक्ष पडलें. सारे लोक तीव्र क्षुधाग्नीनें दग्ध, व कसेतरी, केवळ उदर पूरणोध्यत झाले. पतिपत्नीप्रेम, मातृपितृअनुराग, अपत्य-वात्सल्य, वृद्ध मातापित्यांविषयीं आदर व दाक्षिण्य, इत्यादि लौकिक मर्यादा पार नष्ट झाल्या. कसे तरी पोटाला मिळवूं पाहाणाऱ्या व सौभाग्याच्या कटाक्षांतून वगळलेल्या, बुभुक्षित लोकांना लज्जा, अभिमान, कुलीनपणा, या सर्वांचा विसर पडला होता. क्षुत्क्षाम व कंठगतप्राण होऊन, दीनपेण, गोळाभर अन्नाची याचना करणारे, पितापुत्र, निर्दयपणें परस्परांना सोडून स्वतःच्या पोटापुरतीच काळजी करूं लागले होते. केवळ अस्थी व स्नायू याचा दुर्दर्शनीय सांगाडा उरलेल्या तुच्छ देहाविषयीं आस्था ठेवून, अन्नार्थी माणसे पिशाच्यां-प्रमाणें लढूं लागलीं. प्रत्येक भुकेनें व्याकूळ झालेला मनुष्य, कठोर व ग्राम्य भाषण करीत व डोळे गरगर फिरवींत, सर्वांचा नाश होऊन स्वतःचें रक्षण व्हावें, म्हणून झटत होता. अशा त्या सर्वांनाच घोर व तापद प्रसंगीं प्रजेविषयी खरी दया व कळकळ कायर्ता तो प्रजावत्सल राजाच दाखवीत होता. जवळचे द्वारपाल दूर करून, तो आपल्या मणिमंत्रौ-षधितुल्य दृष्टिपातानें सर्व प्रजेला होत असलेल्या, दारिद्र्य, निराशा व क्लेश यांचें नि रण करीत होता. त्यानें स्वतःची व मंत्र्यांची सर्व संचित संपत्ति खर्च करून, अन्न–धान्य–विकत घेतलें व त्याच्याद्वारें तो व त्याची राणी दररोज लोकाना, जणो नवें प्राणदान करीत होते. सर्व राज्यांतील अरण्यें, स्मशानें, राजमार्ग, राहतीं घरें, यात कोठें कोणाकडे त्यांनीं दुर्लक्ष होऊं दिले नाहीं. शेवटीं त्यांची सारी संपत्ति संपली व त्या मंडलांत अन्नाचा कण उरला नाहीं असें पाहून, एका रात्रीं राजानें राणीला म्हटलें,(३०) आपल्या कांही तरी घोर पापा-

मुळेंच या दीन प्रजेला ही भयंकर व अप्रतिकार्य आपत्ति आली असावी. ही माझी अगदीं असहाय्य स्थिति मला अत्यंत लाजिरवाणी आहे. सारी प्रजा दुःखानें विव्हळत, अनन्यगतिक होत्साती, माझ्या डोळ्यांदेखत मरत असतांना, मला कांहीच व्यवस्था करतां येत नाहीं. तिला कोणी त्राता उरला नाही. सर्व लोक एकमेकाचा त्याग करताहेत. अशा या आपत्तींत मी जगून तरी काय फायदा ? मोठ्या सायासानें मी यांचें रक्षण करीत राहून, शक्य तथवर कोणालाही भुकेने मरूं दिले नाहीं. ही सारी भूमि दुर्दैवानें जणों निस्सत्व, निरुपयोगी व, हतभागी झाली आहे. या दुःखार्णवमग्न प्रजेला आता तरणोपाय कोणचा ? दुर्दिनामुळें सूर्य-बिंब दिसेनासें होऊन, निबिड अंधकारानें व्याप्त झाल्यासारखा हा सारा लोक दिसत असून, सर्वत्र जशी घोर कालरात्र पसरली आहे. सर्व दुर्ग–घाट्या–हिमवृष्टीमुळें अनुल्लंघनीय व सारे मार्ग बंद झाल्यामुळे सारी प्रजा, घरट्याचीं दारें बंद झालेल्या पक्ष्यांप्रमाणें विवश झाली आहे. शूर, विद्वान् व बुद्धिमान्, लोक या दुर्धर कालगतीमुळें गुण व कलाहीन झाले आहेत. या भूतलावर सुवर्ण पुष्पांच्या उमाप कळ्यांनीं भरलेला सत्पात्र व संसेवनीय व स्वतःच्या उपकृतिरूपी अमृत वृष्टीनें शोभा आणणाऱ्या, सत्पुरुषाच्या अधिवासानें सुशोभित झालेला, असा कोणचा भाग आहे ? स्वतःच्या दीर्घ व योग्य सेवेनें ख्याति पावलेले, अशा कोणच्या लोकांना स्वतःच्या उन्नतीचा मार्ग आढळत नाही ? पण या देशांत मात्र गुणी लोक दुर्दैवहत व निष्प्रभ होऊन दडून राहिले आहेत. (४०) माझे सर्व उपाय हरले. प्रजेचा चाललेला हा भयंकर नाश माझ्यानें पाहवत नाहीं. म्हणून मी अग्निप्रवेश करणार. पुत्रवत् पालन केलेल्या सुखी प्रजेचीं प्रसन्न मुखें, सर्वत्र स्वस्थ चित्तानें पहात, रात्रीं समाधानानें शयन करतां येत असलेले राजे धन्य होत. हे भाषण करीत असतांना तो जणों करुणरसाची मूर्तीच दिसत होता. तो वस्त्रानें तोंड झाकून घेऊन पलंगावर पडल्या पडल्या सारखा रडत होता.

त्याला राणीनें म्हटले, 'महाराज आपण प्रजेच्या पापामुळेच कीं काय सामान्य व अधीर जनासारखें काय होतां आहां ? दुःखाचा प्रतिकार करता न आला तर मग, मोठ्या लोकांचा मोठेपणा तो काय ? सत्यसंध राजाची आज्ञा इंद्र ब्रह्मदेव, किंवा, यमही उल्लंघन करूं शकत नाही. स्त्रिया, मंत्री व प्रभु यांची पतिनिष्ठा, अद्रोह, व प्रजापालनाविषयीं निस्सीम दक्षता, हीं मुख्य व्रते होत. आपण व्रतीजनांमध्यें अग्रणी आहां. उठा. माझें वचन कधीं अन्यथा होईल काय ? खरोखर इतःपर आपल्या प्रजेला क्षुधेची पीडा राहणार नाहीं.'

हे तिचें ईश्वरावरील निष्ठेचें, कळकळीचे व भक्तिपूर्ण भाषण, तेथील दीपशिखा जणों निश्चल व स्तब्ध होऊन ऐकत होत्या. ते भाषण संपते तोंच घरोघर मेलेले कपोत येऊन पडलें. ( ५० ) हा अद्भुत प्रकार पाहून राजानें प्राणत्यागाचा विचार रहित केला. दररोज येऊन पडणाऱ्या त्या कपोतावर लोक निर्वाह करूं लागले. ही तरी हिंसाच झाली. ते खरे कपोत नसून त्या साध्वीनें लोकांचे प्राण वांचविण्यासाठी दुसराच कांहीं पदार्थ कपोताच्या रूपानें, आपल्या अद्भुत सामर्थ्यानें पैदा केला होता. ( काश्मीरांत कपोत खाणें निषिद्ध मानलेलें असल्यानें, त्याच्यासंबंधानें ही उपपत्ति

येथें दिलेली दिसते ) निष्कपट भूतदयेने प्रेरित महात्मे, आपल्या आचरणावर हिंसेचा कलंक लागूं देत नाहीत. पुढे लौकरच त्या देवीच्या चारित्र्याप्रमाणें, नभोमंडळ स्वच्छ झालें, आणि त्याबरोबरच राजाचा खेद व प्रजेचे दुर्भिक्ष दोन्ही शांत झालीं.

त्या निष्पाप व पतिव्रता राणीनें रामुष व कतिमुष हे सुसंपन्न अग्रहार द्विजांना दान-दिले. ( कतिमुष, कैमुह व रामुष, रामुह नांवाचें गांव विशोकेच्या डाव्या कांठावर व आद्विन परगण्यांत आणि श्रीनगराहून शुपियानकडे जाणाऱ्या राजमार्गावर आहेत. ) पुढें छत्तीस वर्षे राज्य केल्यावर तो राजा मरण पावला व त्याच्या बरोबर ती राणी सती गेली. तिनें आपला पतिविरहाग्नि त्या कमलनाल तुल्य शय्येसारख्या चिताग्नीमध्ये शमविला. ती साध्वी सती गेली तें स्थळ अद्यापिही वाकृष्टाटवी या नावाने प्रसिद्ध आहे. ( या वाकृष्टा-टवीचा पत्ता लागत नाहीं. याचा उल्लेख पुढें जोन राजाने आपल्या राजतरंगिणीच्या उत्तर भागांत, ( ३४३ ) व्या श्लोकांत, केलेला आहे. ) तेथे राणीने एक कायमचे अन्नछत्र स्थापन केलें. त्याच्यांत अद्यापिही चोहीकडून येणाऱ्या पांथस्थाना भोजन मिळतें. त्या दंपत्याच्या जोडीचें भाग्यवान जोडपे क्वचितच पैदा होत असते, असें जाणूनच जणों, विलक्षण विधात्यानें त्यांच्या पोटी संतती दिली नव्हती. इक्षुदंड स्वतःच अमृततुल्य मधुर, त्याला अधिक गोड फल येणें अशक्य, जाणूनच, ब्रह्मदेवाने त्याला निराळें फल ठेवलेले नाहीं. म्हणूनच विधात्याला खराच श्रेष्ठ परीक्षक म्हणतात. (६०) आपल्या कांही अदृष्टपूर्व पापापायीच ही भयंकर हिमवृष्टी व घोर दुष्काळरूपी आपत्ती आली, असें वाटूनच त्या राणीनें अग्निप्रवेश केला असेंही कोणी वर्णन केले आहे. त्याच्या मागून.

**राजा विजय**—गादीवर बसला. तो परगोत्री होता. त्याने विजयेश्वराच्या मंदि-राभोवती विजयनगर वसविलें. त्याने आठ वर्षे राज्य केले नंतर त्याचा पुत्र,

**राजा जयेंद्र**—राज्याधिकारी झाला. तो आजानुबाहु व जणो भूतलावरील इंद्र, असा होता. अत्यंत निर्मल व स्थिर यशरूपी पट आणि उज्वल जयश्री, याना त्याचा भक्कम भुजदंड उत्तम आधारस्तंभ झाला होता.

त्याचा संधिमान नावाचा मंत्री हा फारच सज्जन व विद्वज्जनाग्रणी होता.

या भूतलावर भूपाल व मत्त मातंग, यांचे चापल व कर्णताडन रोकण्याला कांही उपाय आढळत नाही. त्याअन्वयें, तो राजा बुद्धिमान व हुशार असूनही लबाड चुगलखोरांनी, संधिमानासारख्या हुशार माणसाविषयी नेहमीं सावध असले पाहिजे, वगैरे मतलबी भाषणाच्या द्वारे, त्याच्या मनात त्या मंत्र्याविषयीं अविश्वास व वैर पैदा केलें. त्याव-रून राजानें प्रथम संधिमानाला वाडा बंद केला व पुढें त्याचें सर्वस्व हरण करून, त्याला जन्माचा दरिद्री केलें. राजाच्या प्रखर कोपरूपी ग्रीष्म तापानें दग्ध झालेल्या त्या मंत्र्याशी, कोणी राजसेवक, सुखाचे चार शब्द सुद्धा बोलेनांत, किंवा राजाकडील कांही बातमीही कळवीनात. गहन विचार करणारे राजेच ऐकलेल्या गोष्टीचा नीट विचार करतात. पण इतर ( ७० ) क्ष्माभृत-पर्वत व राजे केवळ उक्तानुवादक-हांजी हांजी करणाऱ्या सेवकांचे व

त्याच्या प्रतिशब्दाचेंच पोषण करीत असतात. त्या संधिमानाला राजाची अवकृपा व दारिद्र्य, यांची मुळींच क्षिती नव्हती. त्याच्या योगानें आपल्याला आवडणाऱ्या श्रीशंकराच्या आराधनेला येणारी अडचण अनायासें दूर झाली, असें मानून तो नेहमी आनंदानें शिवपूजनात निमग्न रहात असे.

पुढे कांहीं दिवसांनी गावात, संधिमान राजा होणार, अशी, त्याची भावी भाग्योदयसूचक भूमिका पसरली. मूळांत कांहीं तरी आधार असल्याशिवाय अशी बातमी पसरणार नाहीं, असें मतलबी लोकांनी राजाला भासविलें. त्यावरून राजा अधिकच संतापला व भ्याला, आणि त्याने संधिमानाला कैदेत टाकलें. त्याच्या पायात भारी जड शृंखला घातल्या होत्या. त्यामुळे त्याचें पाय झिजून गेले. अशा त्या दहा वर्षांच्या कैदेनें तो अगदीं अशक्त व कृश झाला होता. तोंवर राजाचेंहि आयुष्य आटपत आले होते. त्याला पुत्र नव्हता. तो अनेक रोगांनी पीडित व दुःखी होता. तसेच, त्या प्रधानासंबंधीं विचारानें त्याचा सारखा दाह होत होता. या द्वेषरूपी अग्नीने होरपळत असतांना, त्या मंत्र्याच्या संबंधीं भूमिकेचें जणो विधिलिखित—त्याला ठार मारविल्यावाचून टळणार नाहीं. असें त्याच्या मनाने घेतलें.

वेडे लोक भावी अनर्थ टाळण्यासाठीं जे जे उपाय करतात, तेंच विधी, त्या अनर्थांना जणों पोषक करीत असतो. अर्धदग्ध कोळशाच्या ढिगात किंचित धुमसत असणाऱ्या अग्निकणाला, अतुल शक्ती आणण्याचें विधीनें मनात आणलें तर, ती आग विजविण्याचा यत्न करणाऱ्याच्या मनात, तो, जवळ असलेल्या घृतकुंभाविषयीं, जलकुंभाचा भ्रम उत्पन्न करीत असतो.

पुढें राजाच्या आज्ञेनें संधिमानाला रात्री क्रूर वध करणारानी नेऊन सुळीं दिले. तेव्हां विव्हळत पडलेल्या राजाच्या मनातील शोकशंकु आणि नंतर त्याचें प्राण नष्ट झाले. ( ८० ) त्या राजानें सत्तीस वर्षे राज्य केलें. तो निपुत्रिक असल्यामुळे कांही दिवस, ती राजगादी रिकामी राहिली.

संधिमानाचा गुरु ईशान नावाचा होता. तो महा योगी व निग्रही होता. त्याला संधिमान सुळावर दिला गेल्याचें ऐकून भारी दुःख झाले. या नश्वर जगांत शिरीष कुसुमप्राय कोमल व भक्तिमान पुरुष, त्या पुष्पाप्रमाणे चुरून गेल्यावर, त्याची दया व कीर्ति, हीच त्या पुष्पाच्या दांड्याप्रमाणें मागें उरते, असा विचार करून, तो संधिमानाचें और्ध्वदेहिक करण्यासाठीं त्या वध्यस्थानांत गेला. त्याने त्या अनाथाचें प्रेत सुळावरून खाली काढले. तोंवर तें प्रेत लांडग्यांनी कुरतडून त्याचा नुसता सांपळा, घट्ट स्नायूमुळें जमून राहिलेला, बाकी उरला होता. त्याच्या मस्तकाच्या कवटींतून वाऱ्यामुळें शब्द होत असलेला त्याचा शोकशब्दासारखा भासत होता. ईशानाने ' हाय हाय, मी तुला अशा या स्थितींत पाहतों आहे ना. ' असे म्हणून शोक केला. नंतर तो अस्थिपंजर उचलून घेऊन निघाला. यावेळीं त्या प्रेताचें धुळीमुळे करडे झालेलें केस त्याच्या पायावर लोळत होतें.

नंतर तो त्यांच्या दहनाच्या तयारींत असताना, त्यानें त्याच्या ललाटांवर असलेलें विधिलिखित वाचलें. त्याच्यांत यावज्जीवं दरिद्रत्वं, दशवर्षाणि बंधनम् । शूलस्य पृष्टे मरणम् पुनर्राज्यंभविष्यति ।। १ ।। किंवा आजन्म दारिद्र्य; दहा वर्षें कारागृहवास सुळावर मरण व पुनः राज्य. ( ९० ) असें लिहिलेलें होतें. ते पाहून त्याला आश्चर्य वाटलें. पहिल्या तीन गोष्टींचा अनुभव आलेलाच होता. चौथींचा कसा काय येतो तें पहावे, विधिलिखित अचिंत्य आहे, त्याला कोणी खोटें पाहूं शकत नाहीं, असे पुष्कळ वेळ विचार केल्याबर, त्याला वाटलें. तसेंच प्रत्येक जण निरनिराळ्या कार्यांत नियम असतांना, दैवघटित ह्मणून पाडण्याला मनापासून झटत असतो अशा प्रसंगींच विधींची अघटित लीला दिसून येतें, व तिच्या अचिंत्य प्रभावाचें निदर्शन होतें. सर्व अद्भूत गोष्टींचें शिखर अशा विधिनेंच, मणिपुरास नागकन्येच्या हातीं मृत झालेल्या पार्थाचे पुनरुज्जीवन करविलें. त्या सर्वातिशायी सार्वभौमानेंच, अश्वत्थाम्याच्या अस्त्राने दग्ध झालेल्या परीक्षितीचें, महात्म्या श्रीकृष्णाच्या हातून रक्षण करविले. दैत्यानीं जाळून टाकलेल्या कचाला व तार्क्ष्य–गरुडाने गिळलेल्या नागांना, पुनः जिवंत करण्याला सर्वाश्चर्यमय व समर्थ अशा विधिवाचून कोणाला सामर्थ्य असणार ? असा विचार करून भावी अर्थसिद्धीची प्रचीती पाहण्यासाठीं तो त्या अस्थिपंजराची राखण करीत राहिला.

तो जागत व विचारमग्न असतांना कांहीं वेळानें मध्यरात्रीं, तेथे दिव्य सुगंध सुटला. पुढे टाळ, मृदंग, घंटा, डमरू, वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. तेव्हां तो न्याहाळून पाहूं लागला, तों त्या स्मशानांत एका तऱ्हेच्या दिव्य तेजाने व्याप्त अशा योगिनी दिसल्या. ( १०० ) त्यानीं तो अस्थिपंजर उचलून नेला होता. तसा तोही, नागवी तरवार हातीं घेऊन, त्या स्मशानांत पुढें सरसावला. त्यावेळीं त्याला थरकाप सुटला होता. तो एका वृक्षाआड उभा राहून चाललेला प्रकार पाहूं लागला.

त्या योगिनींनीं तो अस्थिपंजर आपल्या चक्रांत नेऊन ठेवला, व त्याचे सर्व अवयव नीट जुळविलें. त्या मध्य प्यालेल्या होत्या. त्यांना उत्तम वराची प्रबल इच्छा झाली होती. हवातसा जिवंत वीर न मिळाल्यानें त्यांनीं तो अस्थिपंजर उचलून आणला होता. प्रत्येक योगिनीनें त्या पंजराला आपला एकेक अवयव जोडला, व योगबलानें त्याचें मोकळे फिरत असलेलें व दुसऱ्या शरीरांत न शिरलेलें लिंगशरीर धुंडून आणून, तें शरीर पूर्ते केलें. तेव्हां तो संधिमान निजलेला जागा व्हावा तसा उठून बसला. त्यांनीं त्याला दिव्य विलेपनें लाविलीं. त्याला चक्रनायक केलें, आणि त्याचा यथेच्छ उपभोग घेतला.

उजाडत आलें तसे, त्या त्याला पूर्ववत् करून सोडून जातील, या विचारानें ईशान साशंक झाला आणि त्याचे रक्षण करण्यासाठीं मोठ्यानें ओरडत, तो त्या योगिनी चक्राकडे धांवला. तोंच ते चक्र गुप्त झालें, जातां जातां त्या योगिनी म्हणाल्या, 'ईशाना भिऊं नको. याचे सर्व अवयव शाबूत आहेत. आम्ही याला प्रिय वर पसंत केला. त्याला आम्ही फसविणार नाहीं. त्याला कांहीं अपाय होणार नाहीं. आम्ही त्याला दिव्यदेही केलें

आहे. आमच्या वरानें हा संधिमान आपल्या श्रेष्ठ गुणांनीं आर्यराज म्हणून पृथ्वीव प्रख्यात होईल. ( ११० )

संधिमानाच्या शरीरावर दिव्य वस्त्राभरणें व गळ्यांत वैजयंती माला होती. त्याला पूर्वीचें स्मरण आलें आणि त्यानें आपल्या गुरुला ओळखून नम्रपणे प्रणाम केला. ईशानानें त्याला प्रेमानें आलिंगन दिलें. तो पुन्हां जिवंत होऊन भेटेल, अशी कल्पना करणे सुद्धा असंभवनीय होतें. तेव्हां या वेळच्या त्यांच्या मनाच्या स्थितीचें वर्णन कोण करूं शकणार? ते दोघेही या अद्भुत प्रकारासंबंधानें, व संसाराच्या विलक्षण प्रकाराबद्दल, आनंदाने बोलत असतांना, ही विलक्षण गोष्ट कशी तरी लोकांच्या कानीं गेली. तसे, आबालवृद्ध नागरिक तेथें जमा झाले, मंत्रि मंडळीही तेथे पोंचली. तो पूर्वीचाच संधिमान आहे किंवा कसें, याबद्दल त्यांना आलेली शंका, त्यानें पूर्ववृत्त कळवून व प्रतिप्रश्नांच्या द्वारे दूर केली. ईशानगुरु निरिच्छ होता. त्याने त्या अराजक पौरांचा प्रतिपाळ करण्याला आज्ञा केली. ती संधिमानानें कष्टानेंच कबूल केली. नंतर त्या दिव्यदेही संधिमानाला द्विजांनी जवळच्या उपवनांत नेऊन राज्याभिषेक संबंधी मंगल स्नान घातले.

त्याला राज्यकारभाराचा अनुभव होताच, नवीन शिक्षणाची अपेक्षा नव्हती. त्यानें मोठ्या थाटाने पौरजन व सैनिक, याच्यासह नगरांत प्रवेश केला. वाटेत आशीर्वाद व धन्यवाद देत, पौरजनांनी त्याच्यावर लाह्या व फुलें उधळलीं. त्याने सर्व राज्यकार-भाराची सुधारणा केली. त्या निष्काम राजाच्या कारकीर्दींत प्रजेला कोणचीही दैवी किंवा लौकिक आपत्ती आली नाही. ( १२० )

तो स्वभावाने शांत व दात होता. उत्तुंग पर्वत शिखरें, त्यांच्या उतारावरील हिरवी-गार वनश्री व त्याच्या भोवती स्वच्छंद उडत राहाणारे पक्षी, वगैरेंची अप्रतिम शोभा पाहून तो मोहून जात असे. शृंगारविभ्रमयुक्त राजस्त्रिया त्याला मोहूं शकत नव्हत्या. त्याला कर्पूरगंध विशेष आवडे, तसेच वन्यपुष्पमालांच्या परिमळामुळे वासित झालेल्या साधु जनांच्या स्पर्शाने त्याला भारी आनंद वाटे. तो भूतेश, वर्धमानेश व विजयेश यांच्या दर्शनांत गुंतलेला नसेल तेव्हां, प्रत्यहीं तो राज्यकार्यांत सर्व काळ घालवी. ( वर्धमाने-शांचे मंदिर वितस्तेच्या उजव्या कांठावर, श्रीनगरांत हल्लीच्या गणपत्यार-गणेशघाट मोहल्ल्यांत होते, अशी दंतकथा आहे व तिला वितस्ता-महात्म्यात आधारही आहे. अलीकडे इ. स. १८८८ साली या मोहल्ल्यांतील पुरोहितांनी मल्यार घाटावर एक मध्यम आकाराचें मंदिर बाधवून, त्याच्यांत एका मशीदींत दीपमाळेसारखे कामीं आणीत असलेले मूळचें शिवलिंग आणून, बसविलें आहे.त्या मशीदींच्या भिंतींत जुन्या वर्धमानेशांच्या मंदिराचे बरेचसे जुने कोरलेले दगड लागलेले आहेत. ) तो महा शिवोपासक होता. शिवा-लयाच्या पायऱ्या धुतलेल्या पाण्याच्या तुषारांनी युक्त वायूच्या लहरी अंगास लागतांच, तो आनंदाने स्तब्ध व स्तिमित होत असे. विजयेश्वराची महापूजा उतरल्यावर त्या शुद्ध शिवलिंगाचें दर्शन त्याला विशेष प्रिय वाटे. मृदंग, वीणा, वगैरे वाद्यांच्या आवाजापेक्षां

शिवलिंगाच्या पीठावर, जलकुंभांतून पडणाऱ्या अभिषेकजलाचा रव, त्याला झोंपेतसुद्धां प्रिय वाटे. मोठाल्या रुद्राक्षमाला घातलेले, भस्म लावलेले, व जटाजूटांनी शोभणारे तापस, त्याच्या राजसभेला शोभवीत असत. यामुळें ती शिवसभेसारखी भासे.

दररोज सहस्र लिंगें करविण्याचा त्याचा नेम कधी टळला नाहीं. एकदां तीं निरनिराळी बनविण्याऐवजी एकाच शिळेवर कारागिरांनी कोरून तयार केलीं. ती शिला अद्यापि पाहण्यांत येते.

( सहस्र शिवलिंगे बनविण्याचा प्रघात अद्यापीहि, कांहीं काश्मीरी ब्राह्मणांमध्ये आहे. तीं ते शुद्ध प्रतिपदा व पौर्णिमा या दिवशीं बनवितात. त्याच्यासाठीं ' तक्त ई सुलैमान ' पहाडाच्या पायथ्याशीं सांपडणारी मृत्तिका पसंत करतात. त्याचे त्याच दिवशी वितस्तेत विसर्जन केले जातें. )

त्याने पुष्कळशा पुष्करण्यांमध्यें कमलबीज रुजवून. लिंगांच्या आकृती साधविल्या व त्याद्वारे पुण्यप्राप्ति करून घेतली होती. ( १३० ) ( कमलाचे बीज शिवलिंगाच्या आकाराचे असते. त्याचा उपयोग काश्मीरांत होमहवनात व स्मरण्या बनविण्याकडे करतात. ) तसेच अनेक नद्यांच्या पात्रांत हजारों शिवलिंगें स्थापन करून, त्याने त्यांना प्रति नर्मदा बनविल्या. ( नर्मदा-पवित्र नर्मदा नदीत जागजागी सांपडणाऱ्या बाणांचे, हिंदुस्थानांतील बहुतेक भागांप्रमाणे काश्मीरांतहि शिवलिंगे म्हणून पूजन होत असतें. तिकडे बहुतेक नद्यांच्या घाटांवर व अनेक पुष्करण्या व झरे याच्यामध्यें बसविलेले अनेक बाण जागजागीं आढळतात. ) या बहुतेक शिवलिंगांच्या पूजेअर्चेसाठीं त्याने पुष्कळसे व मोठाले गांव लावून दिले होते. त्याचे उत्पन्न हल्ली पुष्कळ काळ लोटल्यामुळे, त्यांची वहिवाट करणारे परिषदांतील ब्राह्मणच खाताहेत. ( ब्राह्मणपरिषदा, तीर्थे व मंदिरें यांची व्यवस्था स्थानिक ब्राह्मणपुरोहितमंडळाच्या स्वाधीन असे, त्या मंडळ्यांना परिषदा व त्या ब्राह्मणांना पारिषद्य म्हणत. अशा परिषदा हल्लीसुद्धा बहुतेक मोठ्या तीर्थांत व मंदिरांत कायम आहेत. तीर्थांत व मंदिरांत होणारें उत्पन्न हे पारिषद्य एकत्र करून आपसांत वांटून घेत. राज्यकारभारांतहि या परिषदांचें बरेच अंग व महत्त्व असे. )

त्या महाशैवाग्रणीने मोठमोठ्या मंदिरांत भव्य शिवलिंगें, मोठाले नंदी आणि अजस्र त्रिशूलादिक शैव चिन्हे उभीं केलीं, व ते सारे मंडळ पूजनीय व अलंकृत केले. पितृवनांत ज्या जागीं त्याचें शरीर सांधले गेले होतें तेथे त्यानें संधीश्वर आणि आपल्या गुरूच्या नावानें ईशानेश्वर यांची मंदिरे बाधविली. ( संधीश्वर व ईशानेश्वर-संधीश्वराच्या मंदिराचा पत्ता लागत नाही पण ईशानेश्वर तीर्थ निशातबागेच्या उत्तरेस पाव कोसांवर दल सरोवराच्या ईशान्य कोपऱ्यावरील ईशब्रोर ईशबार ईशहद हेच असावें. हे तीर्थकुंड दगडी असून तें गांवाच्या मध्यभागी आहे. ) तसेच त्याने खेडापती, भीमदेवी वगैरे ठिकाणीं मठ, मूर्ती व शिवलिंगें स्थापन करवून व प्रासाद बांधवून त्या स्थळांना त्यानें उज्वल व पावन केलें. त्या परम माहेश्वर, शहाण्या व भक्तिमान् राजालाच खरोखर या स्वयंभू लिंगें

व तीर्थें यांनी पावन झालेल्या काश्मीर मंडलाचा कसा उपभोग घ्यावा, हें कळलें होतें. वसंतऋतूंत तो वनभूमींत राहून, पर्वतांतून वाहणाऱ्या निर्झरोदकानें स्नान करून, सहस्रशः लिंगाच्या पूजेंत वाहिलेल्या पुष्पमय शिवलिंगाचें पूजनअर्चन करीत असे आणि काश्मीराशिवाय इतरत्र कोठेंहि अनुभवास न येणारे सुखकर ग्रीष्माचे दिवस, तो पहाडी वनप्रदेशाच्या वरील भागांत बनणाऱ्या बर्फाच्या लिंगांच्या सेवेंत घालवी.

( **सहस्र व स्वयंभू लिंगें**:—लहान लहान नैसर्गिक लिंगाकृति फुगवटे असलेली एक शिळा **खोबरपुर** परगण्यांत **लिदर** नदीच्या कांठावरील **सिलगाम** या गांवीं आहे. ती शिला सहस्रलिंगात्मक मानतात. पण तिचा **संधिमानाच्या** सहस्रलिंगें कोरलेल्या दगडाशीं कांहीं संबंध आहे किंवा कसें तें माहित नाहीं. खेडा व **भीमदेवी**:—हल्लीं **दल** सरोवराच्या पूर्वतीरावरील **थिड खिड** व **ज्ञान** नांवाचें गांव. **थिड** ज्येष्ठेश्वराच्या उत्तरेस असून, त्याच्यासभोंवार द्राक्षाचे मोठाले मळे आहेत **या** आल्हादकारक स्थळाजवळ सात नाग-नाले किंवा झरे-येऊन मिळाले असून, त्याच्या सभोंवार प्राचीन इमारती आहेत, असें अबुल फजल यानें, त्यांचें वर्णन केलें आहे हा नागांचा संगम सप्त पुष्करणीतीर्थ म्हणून वर्णिला गेला आहे. ब्रान व **भीमादेवी** एकच असल्याचें **नीलमत** पुराणावरून दिसते. तेथें पार्वतीनें प्रखर तप केलें होतें, पण त्या तीर्थाचा हल्ली पत्ता नाही.) अगणित प्रफुल्ल सरोजांनी व्याप्त सरोवराच्या काठीं पोंचतांच, तो भाग्यशाली राजा, सारखा श्रीशंकरांचें ध्यान व अराधन करण्यांत गढून जात असे. पावसाळ्याच्या अखेरीस अगस्त्योदयानंतर विशुद्धजल झालेल्या पुष्करण्यांमध्यें बुड्या मारून तो शिवपूजन करी. (१४०) माघ मासांत प्रतिरात्री, तो तापसांबरोबर, जागर व महोत्सव करी याप्रमाणे त्यानें अद्भुत रीतीनें मिळालेल्या राज्याधिकाराचा सत्तेचाळीस वर्षे उपभोग केला. तो सारखा तपाचरण व ध्यान धारण, यांच्यांत निमग्न राहूं लागला. राज्यकारभाराकडे त्यानें अगदी दुर्लक्ष केलें. हे पाहून, प्रजा नाराज झाली. तिनें राज्यकारभार नीट चालावा म्हणून, कोणा योग्य पुरुषाचा तपास चालविला. तेव्हां अंध युधिष्ठिराच्या वंशजांपैकी, एक हुषार व महत्त्वाकांक्षी गोपादित्य नांवाचा राजपुत्र असल्याचें कळलें. त्याला **गांधार** देशच्या राजानें **काश्मीरांवर** कबजा करण्याच्या हेतूनें जवळ बाळगलें होते. त्या गोपादित्याला तिकडेच **मेघवाहन** नांवाचा पुत्र झाला होता. त्याच्या अंगीं दैवी तेज दिसत होतें. पित्याच्या अनुज्ञेनें **मेघवाहन** हा विष्णुवंशीय **प्राग्ज्योतिष** देशाच्या राजाच्या कन्येच्या स्वयंवराला गेला होता. तेथें स्वयंवर मंडपात तो **श्वेत** वारुणछत्र लावून बसला असतांना, राजकन्येनें त्याच्याच गळ्यांत माळ घातली.(प्राग्ज्योतिषपुरः-हें पौराणिक नगर **कामरूप** किंवा हल्लीचा **आसाम** प्रांत, याची राजधानी होतें. तें **नरकासुरानें** स्थापन केल्याविषयींची कथा विष्णु पुराणाच्या पांचव्या अंशांत आहे. )

पश्चिमेच्या वाऱ्यावरून मेघोदय आणि जलवृष्टि, यांचें सूचन होतें. त्याप्रमाणें या स्वयंवरावरून, सर्वांना मेघवाहनाच्या भावी भाग्योदयाचें अनुमान झालें. कारण तें

श्वेतवारुणछत्र चक्रवर्ती राजावरच धरावयाचें असते. ( १५० ) तो भाग्यवान् राजपुत्र, आपल्या नवोढा पत्नीला घेऊन पित्याकडे परत आला असतांना, त्याला काश्मीरच्या मंत्र्यांनी गौरवपूर्वक काश्मीरचें राज्य देऊं केले.

अंतस्थ भेदामुळे आपला राज्यकारभार शिथिल झालेला आहे, त्याचा प्रतिकार करण्यास आपण समर्थ आहों, पण आपणाला त्याचा वीट आला आहे. म्हणून आपण त्याचा परित्याग करावा हे उत्तम, असा संधिमान राजानें निश्चय ठरविला. विधाता मजवर प्रसन्न होऊनच जणो, माझ्या मुक्तिमार्गांतील या अडचणी दूर करीत आहे. इतके दिवस राज्यलक्ष्मीचा उपभोग घेऊन सुदैवाने मी योग्य वेळीच स्वतः तिचा त्याग करतो आहे. कोणाच्या जबरदस्तीमुळे नव्हे. आज इतकी वर्षे आपण एकाद्या कुशल नटाप्रमाणे या राजरूपी रंगभूमीवर राज्याधिकार चालविला आणि अखेरीस प्रेक्षक जन कंटाळण्यापूर्वीच मी जवनिकेच्या आड चाललो आहे, याबद्दल परमेश्वराला धन्यवाद द्यावे तितके थोडे आहेत, असेंच त्याला वाटत होते. शेवटी दुसरे दिवशीं त्याने सर्व प्रजाजन व मंत्रिमंडळ, याच्या समक्ष, राजसभेत, आपला राजत्याग करण्याचा निश्चय प्रगट केला. त्यावर त्याला त्यांनीं तसे न करण्याविषयी आग्रहपूर्वक विनंति केली. पण ती त्यानें मान्य केली नाही. आपण नेहमीं भाग्य व वैभव याच्याविषयी तिरस्कार दाखवीत आलों. आता त्याचा त्याग करताना, युद्धाविषयी बढाई मारणाराने ऐन लढाईंत भिऊन जावें, तशी आपली स्थिति कधीं होणार नाहीं. टाकलेली कांत साप पुनः परत अंगावर घेत नाही. ( १६० ) असें त्याला मनापासून वाटत होते. यामुळें त्या सर्वस्वाचा त्याग करण्यास तयार झालेल्याला, मनोराज्यांत मग्न होणाऱ्या दरिद्र्याप्रमाणें, मोठा आनंद होत होता. शेवटी त्याने सर्व राजचिन्हे व आभरणें यांचा त्याग केला आणि नित्य पूजेचें शिवलिंग हातीं घेऊन, तो धौत वस्त्रे परिधान केलेला, मस्तक उघडे, मौनी व अधोदृष्टी, असा उत्तरापथाला निघाला. त्याच्या मागें सर्व प्रजाजन मुकाट्याने दुःखाश्रु ढाळीत निघाले. सुमारें दोन कोस गेल्यावर तो एका वृक्षाखाली बसला व त्यानें अश्रुपूर्ण नेत्रांनी प्रत्येकाचें सांत्वन करून, त्यांना मागे परतावलें. पुढे जागजागीं, पर्वताच्या पायथ्याशी विश्रांति घेत, तो पर्वतावर चढूं लागला. नदीचें पाणी वाहतांना पात्रांतील शुष्क डोह भरीत कमी कमी प्रमाणानें वाहतें व वाढते, तद्वत् त्याची स्थिति झाली होती. पुढें तो दिव्यवनांत पोंचला व तेथून उरलेल्या लोकांनाहि विनंति करून त्याने मागें परतविलें. तेव्हां त्याच्या नेत्रांतून दुःखाश्रु वहात होते व तोंडांतून शब्द स्पष्ट निघत नव्हता. पुढें तो गिरिगुहांमध्यें राहणाऱ्या सिद्धांच्या दर्शनासाठीं स्वर्गांतून येणाऱ्या देवतादिकांच्या किरीटांतील रत्न मण्यांचा प्रकाश पडत असलेल्या निबिड अरण्यांत पोंचला. ( १७० )

सायंकाळी तो एका तडागतीरावरील वृक्षाखालीं वस्तीला राहिला. तेथें पर्णपुटानें जलपान करून, त्याने मृदुपर्णपल्लव शय्येवर शयन केले. त्यावेळी अस्तोन्मुख सूर्यनारायणाचे किरण त्या वनभूमी भोंवतालच्या पर्वतशिखरांवर पडून, त्यांना जणों सुवर्णाचें विलेपन देत होते. खालच्या वनभूमीवर हळूहळू छाया पसरत होती. तेथील फुललेल्या

जाईच्या वेलीखालीं गोपस्त्रिया विश्रांति घेत होत्या. झुळझुळ वाहणाऱ्या झऱ्यांच्या पाण्याचा व गोपांनीं वाजविलेल्या वेणूंचा कर्णमधुर शब्द, त्या थकून भागून, प्रफुल्लित व निर्मल वल्लींनी व्याप्त अशा कुंजांत, सुखानें शयन करणाऱ्या त्या गोपस्त्रियांना निद्रावश करीत होता. हें सर्व पाहातां पाहातां त्या राजालाहि निद्रा आली.

पुढें भेरी शब्दांची बरोबरी करणारी वनगजांची गर्जना, आणि क्रौंच-सारस-पक्ष्यांचा शब्द ऐकूं येऊं लागला. तेव्हां रात्र सरत आली असे जाणून, तो पुढें जाण्याला उत्सुक होत्साता उठला व त्यानें जवळच्या कमलिनींनी व्याप्त सरोवरांत विधिपूर्वक स्नान व नित्यकर्मे उरकलीं. तेथून तो नंदीश क्षेत्राजवळच्या सोदर तीर्थावरील भूतभर्तृ तीर्थाला गेला. तेथें कैलासपति श्रीशंकराच्या सन्मुख भक्तिपूर्वक उभा असतांना, त्याला पूर्वीपासून मनांत योजलेली मनाची स्थिति प्राप्त झाली. सर्वांगाला भस्म लावलेलें, जटा बांधलेल्या, हातीं स्मरणी घेतलेली व रुद्राक्षमालांनीं अलंकृत, अशा त्याच्या मूर्तीकडे, प्राचीन ऋषि मुनीहि स्नेहदृष्टीनें पहात होते. तो त्यांच्या आश्रमांत भिक्षेसाठी फिरे तेव्हा, तापस स्त्रिया त्याला मोठ्या आदरानें व उत्सुकतेनें भिक्षा घालीत. तसेंच लतावृक्षही सुरेख व स्वादु फलांनीं त्याचें भिक्षापात्र स्वतःच भरून टाकीत, यामुळें त्या भाग्यशाली राजर्षीला, वैराग्य योगांतहि, सर्वांकडून पूजित, मानित व प्रार्थित होत्साता, कोणापुढे भिक्षा मागण्याची क्वचितच पाळी येई. असा तो त्या दिव्य वनांत कायमचें वास्तव्य करता झाला.

( या दुसऱ्या तरंगांत सुप्रसिद्ध अशा सहा राजांनीं १९२ वर्षें राज्य केलें, त्याचें वर्णन आहे. )

काश्मीरक महा अमात्य कल्हणकृत राजतरंगिणीचा दुसरा तरंग संपूर्ण.

---

# तरंग तिसरा.



गजचर्म व भालस्थ तृतीय नेत्र याचा उपयोग काय ? या पार्वतीच्या प्रश्नाला श्री शंकरांनी उत्तर दिलें कीं, या गजाच्या गंडस्थळातून तुझ्या कुचाग्रीं शोभणारीं मौक्तिके असतात व या तृतीय नेत्रांतील वन्हिशिखेपासून तुझ्या नेत्रात घालण्याला काजळ-अंजन-निघतें. असेंच त्यांनीं सर्पासंबंधी प्रश्नालाहि उत्तर दिलें असतें. असे ते अर्धनारीनटेश्वर आपले रक्षण करोत.

**राजा मेघवाहनः**—आर्य राजा उत्तरापथाला गेल्यावर, मंत्री व प्रजा यांनीं गांधार देशांत जाऊन प्रथितयश मेघवाहनाला आणून गादीवर बसविलें. त्याचें प्रजा-वात्सल्य दिसून आलें तसें, हळूहळू प्रजा त्याच्यावर अनुरक्त झाली. वस्त्र धुतल्यावरच त्याचा खरा स्वच्छपणा व्यक्त होतो. त्या महात्म्या राजानें आपल्या सत्कृत्यांनीं सर्वांना सुख समाधान देण्यांत बोधिसत्वांवरहि ताण केली. गादीवर बसतांच त्या भाग्यवानानें मंत्र्यां-

मार्फत भेरी व पटह वाजवीत दवंडी पिटवून सर्व राज्यांत प्राणिहिंसा बंद केली. त्यानंतर खाटिकादिक पापी जीवहिंसकांना सुद्धां द्रव्य देऊन, त्यानें दुसरी निष्पाप आजीविका लावून दिली. जिनदेवाप्रमाणें त्याला जीव हिंसेची फार घृणा होती. यज्ञांमध्यें पिष्ट व घृतपशू केले जात व बलिदानहि त्यांचेंच दिलें जात असे. त्याने मयुष्टग्राम वसविलें, मेघवन नांवाचा अग्रहार दिला, आणि पुण्यप्रद मेघमठ स्थापन केला. ( यांचा पुनःकोठें पुढें उल्लेख आलेला नाहीं. )

त्याची राणी अमृतप्रभा हिने परदेशीय भिक्षूंच्या साठीं अमृतभवन नांवाचा भव्य विहार बांधविला. ( हा विहार किंवा या नांवाचे खेडे श्रीनगराच्या उत्तरेस दीड कोसांवर विचारनाग मोहल्लयाजवळ आहे. त्याच्या व लछमकुल कालव्याच्या मधील मैदानांत, जुन्या इमारतींचे अवशेष आहेत. ते याच प्राचीन विहाराचे असावेत. ) तेथें एकदां तिच्या पित्याचा गुरु लोह हा आला होता. त्याला तद्देशीभाषेंत स्तुनपा म्हणत. त्याने लोस्तोनपा नावाचा स्तूप बांधविला. ( लोह, लदक प्रांताचें मुख्य शहर लेह. स्तोनपा हा तिबेटी शब्द आहे. त्याचा अर्थ शिक्षक किंवा गुरु. )

त्या राजाची दुसरी राणी यूकदेवी इनें ईर्षेनें नडवन येथें दुसरा एक भव्य विहार बांधविला, त्याच्या अर्ध्या भागात शुद्धाचरणी भिक्षू व दुसऱ्या भागांत कमी दर्जाचे गार्हस्थ्य-गर्ह्य–गृहस्थाश्रमी, स्त्रिया, व पशू यांच्या राहण्याची व्यवस्था केलेली होती. ( नडवन-श्रीनगरातलि हल्लींचा संगीन दरवाजा आणि ईदगा यांच्यामधील वस्तीच्या वायव्ये-कडलि नरवोर मोहल्ला. )

तिसरी राणी इंद्रदेवी इनेहि इंद्रदेवीभवन नांवाचा विस्तर्णि व चौसोपी विहार बांधविला, व त्याच्याजवळच एक स्तूपही उठाविला होता. ( इंद्रदेवी भवन विहार याचा पुढें तरंग ८ श्लोक ११७२ त उल्लेख आहे. तो हल्लीच्या श्रीनगराच्या वस्तीतील काठूल-काष्टील–मोहल्लयाजवळच बहुधा असावा.) त्या राजाच्या इतर कांहीं राण्यांनींही आपापल्या नांवाचें खादना व सम्मा वगैरे विहार बांधविले होते.

तो राजा अलीकडील-कलि-युगांतला असूनहि, प्रौढी, राज्य, वैभव, वगैरेमध्ये त्याची पूर्वयुगीन थोर थोर राजांवरहि ताण होती.

तो राजा एकदा राजवाड्यांत उघड्यावर विश्रांति घेत असतांना, बाहेर कांहीं ग्रामस्थानी, 'चोर चोर' अशी ओरड केली. ती ऐकून राजानें एकदम, 'कोण आहे, धरा, बांधा', अशी आज्ञा केली. त्यानंतर लौकरच सामसुम झाली. पण चोर कोणी आढळले नाहींत. पुढें दोन दिवसांनीं राजा बाहेर निघाला असतांना, दोन तीन दिव्यांगना मस्तकावर हात जोडून, अभय मागत त्याच्यापुढें उभ्या राहिल्या. राजानें घोडा थांबवून विचारपूस केली. तेव्हां त्यांनीं विनंति केली कीं, 'महाराज, आपल्या दयेचा दिव्य प्रभाव त्रैलोक्यांत गाजत असतांना, हे करुणानिधे, कोणाकडून कोणाला भय प्राप्त होणार ? (२०)आमचे पति नाग निर्भयपणें मेघरूपानें अंतरिक्षांत असतांना कांहीं साळीच्या शेतांची राखण करणाऱ्या शेत-

यांनीं, गाराच्या वृष्टीच्या भीतीने, लबाडीनें, या नागांनींच गारा पाडल्या, असें आप-
ला वाटवून, त्या नागावर आपला कोप होण्यासाठीं 'चोर, चोर' अशी ओरड केली. ती
ऊन आपण रागानें 'धरा, बांधा', अशी आज्ञा केली. त्याअन्वये ते सारे नाग बद्ध होऊन
ले आहेत. 'आमच्यावर दया करा व त्यांना क्षमा करून सोडून द्या.' ही त्यांची दीन
नवणी ऐकून, राजा हसला व त्याने त्या नागांना बंधमुक्त केले व जाण्याची आज्ञा दिली. तसे
नाग बंधमुक्त झाले व राजाच्या पायांपुढें प्रणाम करून आपल्या पत्न्यांसह निघून गेले

हिंसानिवृत्तीविषयींची आपली आज्ञा इतर राजांकडून पाळविण्याकरितां, तो राजा
ग्विजय करण्यास निघाला. त्याचा प्रभाव, निष्कपट धर्माचरण, शौर्य, दिग्विजय करण्याचा
, आणि लोकांना अभयदान, यासंबंधांत जिनदेवाला सुद्धां हेवा वाटला असता. त्याने
। राजांना जिंकलें व त्यांच्याकडून अहिंसा व्रताची दीक्षा घेवविली. पुढें तो वरुणालय
ा सागरतीरावर पोंचला. तेथील ताली वनांतील ताल वृक्षांच्या गर्द छायेत त्याचें सैन्य
्रांति घेत असतांना, त्याच्या मनांत द्वीपांतराला जाण्याचा विचार आला. (३०)
एकदां वेलावनांत फिरत असतांना 'या मेघवाहनाच्याही राज्यांत 'मी हा असा निष्का-
मारला जात आहे.' असे आर्त भाषण त्याच्या कानीं आले. तेव्हां त्याचे अंतःकरण
ळवळले आणि त्याला मर्मस्थानी शल्य टोचल्यासारखें झाले. तो तसाच श्वेतवारुण छत्र
रण केलेला, त्वरेनें त्या शब्दाच्या अनुरोधाने वनांत शिरला. तेथे त्याला एक वनचरांचा
यक, एका पुरुषाला खालीं पाडून, चंडिकेला बलि देण्याच्या तयारींत असलेला दृष्टी
ला. त्याला राजाने धिःकारांत म्हटले, 'मूर्खा, तुला या तुझ्या दुष्टपणाची लाज वाटली
हिजे.' यावर त्या नायकाने हात जोडून विनंति केली, 'महाराज, माझा हा लहान मुलगा
ग्रस्त व मरणोन्मुख आहे. त्याला गुण येण्यासाठीं हा बलि देण्याची मला देवतांनीच
ज्ञा केलेली आहे. हें बलिदान आपण बंद केलेत तर माझा पुत्र मरणार. त्याच्या जिवा-
च माझ्या सर्व आप्तइष्टांचें प्राण अवलंबून आहेत. हा मनुष्य या गहन वनांत निराश्रित
ला होता. त्याला मी बलि देण्यासाठीं आणले आहे. आपण त्याच्यावर दया करतां
ा ती माझ्या मरणोन्मुख मुलांवर कां करूं नये?' हे ऐकून व त्याबरोबरच त्या वध्य
षाची दीन भयभीत व चंचल चर्या पाहून, त्या धीर व उदार राजाचें मन फार कळवळले
तो त्या वनचर नायकाला म्हणाला, 'अरे, भिऊं नको. मी स्वतःचा चंडिकेला बलि
ऊन तुझ्या या मुलांचा आणि आप्तांचा, तसेच या दीन व आप्तबंधुहीन पुरुषाचाही प्राण
चवितों. (४०) माझ्या मानेवर तरवार चालीव आणि त्या योगानें हे दोघेहि वाचूं देत.'

ही विलक्षण भूतदया व औदार्य पाहून त्या वनचर नायकाला सानंदाश्चर्य वाटले व
नें म्हटलें, 'हे पृथ्वीनाथ, भूतदयेच्या अतिरेकानें आपल्या बुद्धीला कांहींसा भ्रम पडलासे
तें. त्रिभुवनांतील सर्व जीवांच्या दानानेंही रक्षण करण्यायोग्य व सर्व पृथ्वीचा उपभोग-
, अशा स्वतःच्या देहाची आपण उपेक्षा करतां, हें काय? प्रायः राजे लोक स्वतःच्या
गांपुढें यश, मान, द्रव्य, स्त्रिया, पुत्र, बंधुवर्ग, किंवा धर्म, कशाचीहि पर्वा करीत नसतात.
हां, हे प्रजापालका, या वध्य पुरुषावर दया करूं नका. आपण जिवंत रहा, आणि माझा

मुलगा व माझे सारे आप्तबंधूहि जिवंत राहोत. आम्ही आपली प्रजा आहोंत'. यावर त्या धीरोदात्त राजाने विमलदंत पंक्तीच्या रूपानें जणो अर्घ्यप्रदान करीत, आणि चंडिकेला स्वतःचा बलि देण्याच्या उत्कट इच्छेनें हंसत म्हटले, 'हे वनचरा, मरु देशांतील माणूस जान्हवी जलाचा स्वाद काय जाणें. तसें सदाचरणरूपी अमृताची गोडी, तुजसारख्या वनचराला कशी कळणार ? या नश्वर देहाच्या दानाने मी शाश्वत यश संपादन करीत असतांना, तूं हट्टानें आड येत आहेस. यांत तूं मर्यादातिक्रम करतो आहेस. आतां एक शब्द सुद्धां न उच्चारतां, मी सागतो तसे कर. तसे न करण्याइतपत तूं मृदु मनाचा असलास तर, माझी तरवार, हें काम करण्याला असमर्थ आहे की काय ?' (५०) असे बोलून तो स्वतःच्या हातानेच स्वतःचे बलिदान करणार, इतक्यांत त्याच्या मस्तकावर दिव्य पुष्पवृष्टि झाली व एका दिव्याकृतीने त्याचा हात धरला. त्या दिव्य पुरुषाला पाहून राजाला आश्चर्य वाटले. चंडिका, वनचरनायक, त्याचा पुत्र, वध्य पुरुष, कोणीच तेथे दिसेनात. तो दिव्य पुरुष राजाला म्हणाला, 'हे सत्वधीर करुणानिधे, भुवनचंद्रा, राजा, तुझ्या अतुल धैर्याने व निष्ठेने कुंठित झालेला मी वरुण. मी तुजवर प्रसन्न आहे. तुजजवळचे हे वारुण छत्र मूळचे माझें. तें तुझा श्वशुर, भीम पराक्रमी, भौमराजा नरक याने हरण केलें. ते रसातलतिलक व महा प्रभाववान असे अद्वितीय रत्न आहे. त्याच्याविना माझ्या नगरांत नाना उत्पात व उपद्रव होत आहेत. ते छत्र तुजकडून परत मिळवून त्याची शांति करवावी म्हणूनच, हे दयाघना, मी ही सारी माया रचली. स्वतःच्या अद्‌भुत भूतदयेने तूं आपल्या पूर्वीच्या वसुकुलपुत्र मिहिरकुलाच्या घोर हिंसारूपी पातकाचे जणों प्रायश्चित्तच घेतले आहेस. दश दिशांच्या उदरांमध्यें प्रखर सूर्यप्रकाश व गाढतम, भूभारधारणसमर्थ शेषाच्या फणेत जालिम विष व अमोल फणामणि, सर्वत्र पसरणाऱ्या अग्नींत धूमजाल व ज्वालापल्लव, आणि वर्षाकाळांतील घनदाट अभ्रपटलांत, दृष्टिआड झालेलें सूर्यमंडल, आणि अमृततुल्य जलवृष्टि, अशा विरोधी गोष्टी एकदमच आढळून येतात. (६०) तद्वत् तुझ्या थोर कुलांत तीन कोटी जीवहिंसक राजा मिहिरकुल आणि तुजसारखा अद्वितीय अहिंसादैवत राजाहि पैदा होतो, हें अलौकिक व अत्यंत आश्चर्यकारक होय.

नंतर राजानें नम्रपणें वरुणाची प्रार्थना व पूजा करून, त्याला तें श्वेत छत्र परत दिलें. तें त्यानें गृहण केल्यावर राजा म्हणाला, 'वरुणराज, प्रार्थनेनंतर प्रसन्न होणारा कल्पवृक्ष, आणि तिची वाट न पाहतां प्रसाद करणारे सज्जन, यांची बरोबरी कशी होईल. वृक्ष स्वतःच आश्रिताना छायेच्या द्वारें थंडगार करतो व फलही देतो. तद्वत् उदार सज्जनांनीं याचकांवर अनुग्रह केला पाहिजे. आपल्या मनांत, मला कृपा करून दर्शन देण्याचें नसतें तर, हें छत्र त्याला थोडेंच कारण झालें असतें. आपला उदारपणा पाहून मला आपल्याला आणखीहि एक विनंति करावीशी वाटते. आपल्या कृपेंकरून ही सारी पृथ्वी मी आक्रमण केली आहे. मला आतां समुद्रपारचीं द्विपांतरें जिंकावी असें वाटतें. त्यासाठीं कृपा करून समुद्रतरणाची तजवीज सांगावीं.' वरुणानें उत्तर दिलें, 'तूं इच्छा करशील तेव्हां मी त्याचें

स्तंभन करीत जाईन'. राजानें, 'ही आपली मोठीच कृपा झाली,' असें म्हणून त्याचे आभार मानले. नंतर वरुण त्या श्वेत छत्रासह अंतर्धान पावला. ( ७० )

दुसरे दिवशीं दैवी शक्तींनें सागराचें जलस्तंभन करवून राजानें सैन्यासह सागराचें उल्लंघन केलें. याचें त्याला भारी समाधान वाटलें. त्या गुणरत्नाकरानें सैन्यासह रत्नाकर चूडारत्न व नानारत्नाकरमय अशा रोहण पर्वतावर आरोहण केलें (त्यालाच आडाम्स पीक केंवा सुवेलाद्री म्हणतात.) आणि तेथील तालवनाच्या छायेंत सैनिकांना विश्रांति दिली. येथें त्याला लंकेश्वर बिभीषण प्रेमानें येऊन भेटला. त्या नर व राक्षस राजांच्या भेटीचा तो योग अपूर्व व अवर्णनीय झाला. वैतालिकानीं मोठमोठयानें केलेल्या प्रशस्तीच्या आवाजांत या उभयतांच्या भाषणाचा पूर्वभाग नीटसा ऐकूं आला नाहीं. त्या भूमंडनाला बिभीषणानें लंकेंत बोलावून नेऊन, त्याचे केवळ देवतांनाच सुलभ अशा दिव्योपचारानीं स्वागत केलें. राक्षस उपजत मांसाहारी, पण राजानें त्यांच्याकडूनहि अहिंसाविषयक आज्ञा मान्य करविल्या. नंतर त्यांचें पिशिताशन हें नाव निवळ रूढीतच राहिलें. त्या राक्षस राजाने त्याला शिखर भागीं राक्षसांचीं मस्तकें असलेले पुष्कळसे मोठाले ध्वज अर्पण करून, जणों त्याची कायमची ताबेदारी कबूल केली. त्या ध्वजांना पारध्वज म्हणतात. ते हल्लीं सुद्धां काश्मीरच्या राजांच्या समारंभाच्या स्वाऱ्यांमध्यें अग्रभागी चालविले जातात. ( या पारध्वजांचा इतरत्र कोठेंहि उल्लेख आढळत नाही. )

पुढें कांहीं दिवसांनीं एक ब्राह्मण आपल्या रोगग्रस्त पुत्राला घेऊन राजद्वारी आला. आणि शोकाक्रोश करीत राजाला म्हणाला, ' हे राजा, दुर्गेला मागून घेतलेला पशु बलि न दिला तर, हा माझा पुत्र आज ज्वरानें मरणार आहे. आपण अहिंसेविषयींचा आग्रह सोडणार नाहींतर माझ्या पुत्राचा प्राण वाचत नाही. तेव्हां, हे पृथ्वीनाथा, याच्या मृत्यूचें कारण मी दुसऱ्या कोणाला समजावें ? ब्राह्मण बालकाचा प्राण आणि पशूचें बलिदान यांतील तारतम्य ओळखून, वर्णाश्रमधर्मपालक आपणच न्याय करावा. हरहर, ब्राह्मणाचा प्राण राखण्यासाठीं—शूद्र—तापसालाहि मारणारे ते—रामचंद्रासारखे प्रजापालक राजे—हे भूमि-वरते, नामशेषच झाले ना !'

हे त्याचें कळवळ्याचें व टोचणारें भाषण ऐकून, तो परार्तिहर राजा कांहीं वेळ विचार करीत राहिला. आजवर प्राणिहिंसा बंद करण्याची प्रतिज्ञा सक्त रीतीनें चालविली, ती या ब्राह्मणासाठीं तरी कां मोडावी. पण ती न मोडावी तर ब्राह्मणपुत्र मरतो व त्याला कारण आपण होणार. यांतहि, बुद्ध्या दुःखाला कारण झाल्याचें पाप लागणार, असे दोही-कडून संकट येऊन, दोन प्रवाहाच्या संगमानें झालेल्या भोंवऱ्यांत पडलेल्या पुष्पाप्रमाणें माझें मन भ्रांत झाले आहे. ( ९० ) तेव्हां दुर्गेला आपलेच बलिदान देऊन संतुष्ट करावे, आणि दोन प्राण वांचवून सत्यप्रतिज्ञता कायम ठेवावी' असे ठरवून त्यानें त्या ब्राह्मणाला, 'उद्यां तुझ्या इच्छेप्रमाणे करतो, असें सांगून निरोप दिला.

रात्रीं तो देवीपुढें स्वतःला बलि देण्याला तयार झाला. तेव्हां देवीनें प्रसन्न होऊन, त्या ब्राह्मण बालकाला बरें केलें. आणि राजावर, स्वतःला बलि देण्याचा प्रसंग येऊं दिला नाहीं.

अशा त्या अलीकडील राजाच्या अनेक अद्‌भुत कृत्यांचें, सामान्य लोकांना अविश्वसनीय वाटणारें वर्णन करण्यांत, आम्हालाहि अडचणच पडते. तरी प्राचीन ऋषींच्या पूज्य मार्गाचें अवलंबन करणाऱ्या आमच्या काव्यरचनेंत, आम्ही, वाचक व श्रोते, यांच्या विचाराकडे लक्ष दिलेंच पाहिजे, असें नाहीं.

त्या राजानें चौतीस वर्षे राज्य केलें. त्याच्या मरणानें या जगताला, जणों एक नृपश्रेष्ठरूपी सूर्य व त्याचा प्रकाश, यांना मुकावे लागले. त्याच्या मागून त्याचा पुत्र—

**राजा श्रेष्ठसेन**—गादीवर बसला. तोच पुढें पहिला **प्रवरसेन** व दुसरा **तुंजीन** या नावांनीहि प्रसिद्ध झाला. त्याच्या नग्न खड्गरूपी मणिदर्पणांत प्रतिबिंबित झालेली, व त्याच्या हाताचा दृढ आधार धरून राहिलेली, त्रैलोक्य राजलक्ष्मी, त्याच्यापुढें जणों हात जोडून उभी असल्यासारखी शोभते, असें कोणालाही वाटें. त्याने **पुराणाधिष्ठानांत** प्रथम **प्रवरेश्वराची** प्रतिष्ठा करवून, **मातृचक्रहि** निर्माण केले. तसेंच त्यानें दुसरींहि कित्येक देवालयें बांधविलीं. ( **पुराणाधिष्ठान** हल्लींचे **पांड्रेठान** हे नव्या नगराच्या आग्नेयीस, पांच कोसांवर आहे, असें **व्हेनत्संग** यानें **सी. यू.** की च्या पहिल्या भागांत लिहिलें आहे. याचा पुनः एकदां उल्लेख पुढें तरंग ५ श्लोक २६५मध्यें, **पार्थ** राजाच्या कारकीर्दीत आला आहे. )

सर्व पृथ्वी त्याला गृहांगणाप्रमाणे झालेली होती. त्याने **प्रवरेश्वराला** अनेक गांव व **त्रिगर्त** प्रांतहि अर्पण केला होता. (१००) ( त्रिगर्तः–हल्लीचा पहाडी **कांगडा** नांवाचा प्रांत तो **चंबाचे** पहाड, आणि **बियास** नदीच्या खोऱ्याचा वरील भाग, यांच्यामध्यें आहे. तो प्राचीन काळीं **जालंधरचा** राजा **इंदुचंद्र** याच्या ताब्यांत होता. हा **इंदुचंद्र** व **कांगड्याच्या** **कटोच** राजांच्या वंशावळींतील **इंद्रचंद्र** हे एकच होत. )

भूतलावरील सर्व प्रदेश आपली वडिलोपार्जित मिळकत समजणाऱ्या राजेलोकांप्रमाणें, पण स्वभावानें सौम्य, असा तो राजा तीस वर्षे अग्रणी राहिला. त्याच्या मागून त्याचे पुत्र––

राजा **हिरण्य** आणि युवराज **तोरमाण**, हे जोडीनें राज्य करीत, त्या भूमीला आनंद देवूं लागले. **तोरमणानें** **बालाहत** नावाच्या जुन्या नाण्याऐवजीं आपल्या नांवाचे दीनार पाडले. ( हें नाणें प्रथम कोणी पाडलें याविषयीं मतभेद आहे. इ. सनाच्या पांचव्या शतकाच्या आरंभांत होऊन गेलेल्या, **मिहिर** कुलांच्या **तोरणमाण** नांवाच्या पित्यानेंच ते प्रथम पाडले असणें अधिक संभवतें. कारण त्यावेळीं सारा **पंजाब** व **काश्मीर**, या प्रांतावर त्या तुर्की राजांचा अंमल होता. हा दुसरा **तोरणमाण** त्या मानानें प्रसिद्ध किंवा प्रबलहि नव्हता. ही जुनीं तुर्की तांब्यांचीं नाणीं, **काश्मीरांत** पुष्कळशीं सांपडतात. त्यांची किंमत सुमारें १०० कवड्या इतकी असे. अशा तऱ्हेची चूक **कल्हणाच्या** हातून कशी घडली कळत नाहीं.) हें राजा **हिरण्य** याला आवडलें नाहीं. यांत तोरमाणानें

स्वतःच राजा असल्याप्रमाणें वागून, आपली अवज्ञा केली, असें त्याला वाटलें. त्याला राग आला व त्यानें तोरमाणाला कैदेंत टाकलें. तोरमाण फार दिवस कैदेंत राहिल्यामुळें त्याला त्या आपल्या दुःखद स्थितीचा विसर पडला. त्याची राणी अंजना इक्ष्वाकु कुलांतली होती, ती त्याच्या जवळच रहात होती. ती गर्भवती होऊन, पुढें आसन्नप्रसव झाली. तेव्हां ती पतीच्या संमतीनें कोठेंशी एका कुंभाराच्या घरीं जाऊन तेथें प्रसूत झाली. काकपत्नी कोकिळेचे पोर स्वतःचें समजून वाढवितें, तद्वत् त्या मुलाला पोटच्या मुलाप्रमाणें वाढविले. त्याची खरी स्थिति राणी अंजना व ती कुंभारीण यांनाच माहित होती. गुप्त रत्ननिधि, रत्नसू पृथ्वी व त्या रत्नाचें रक्षण करणारी नागीण, यांनाच माहित असतो. राणीच्या इच्छेप्रमाणें त्या मुलाला त्याचा आजा प्रवरसेन याचेंच नाव ठेवलें होते. जलज असूनहि कमल, त्याला सोडून सूर्याची मैत्री जोडते, तसें त्या मुलाने स्वतःला जवळच्या हलक्या मुलांचा संपर्क होऊं दिला नाही. (११०) थोर, कुलीन, तेजस्वी, मुलेंच नेहमी त्याच्या भोंवती असत. याचे लोकांना मोठें कौतुक व आश्चर्य वाटे. बरोबरीच्या सर्व मुलाशीं तो मोठ्या प्रौढपणानें वागे. त्याचें विलक्षण बल पाहून ते त्याला आपला नायक मानीत. सिंहाच्या छाव्याला तरुण वनपशू सहजच राजा समजतात. मिळालेल्या वस्तू, उदारपणें सोबत्यांना वांटून देऊन तो त्यांना नेहमी आपल्या ताबेदारींत व प्रसन्न ठेवी. राजपुत्राला अनुचित असें वर्तन त्याच्या हातून कधीं घडत नसे. कुंभाराकडून मडक्यासाठीं मिळालेल्या मातीची तो शिवलिंगे बनवी.

असा तो खेळतांना पाहून त्याचा मामा जयेंद्र यानें एकदां, त्याच्याशीं प्रेमाने भाषण करीत त्याचें अभिनंदन केलें. जवळच्या मुलांनीं तो राजा जयेंद्र असल्याचे कळविताच त्याने जयेंद्राकडे राजोचित प्रौढपणानें पाहिले. तेव्हा तो कोणी श्रेष्ठ कुलांतला असावा असें वाटून, जयेंद्रानें पुनः त्याच्याकडे निरखून पाहिलें. तेव्हां त्याचा चेहरा त्याला आपल्या मेव्हण्याच्या सारखा वाटला, त्यावर त्यानें बारकाईने चौकशी चालविली. तो दडबडीनें त्याच्या मागोमाग घरांत गेला. तेथें त्याला त्याची बहीण दिसली. तिला त्यानें तेव्हांच ओळखिले. दोघेही बराच वेळ एकमेकाकडे पहात दीर्घ उसासे टाकीत व अश्रु गाळीत राहिले. पुढें त्या मुलाने त्या कुंभारणिला, ' ही दोघे कोण? ' असे विचारिलें. तेव्हा तिनें उत्तर दिलें, ' बाळा, ही तुझी आई व हे तुझे मामा. (१२०) तुझा पिता बंदिवासांत आहे. ' हे ऐकून त्या मुलाला फार राग आला पण तो लहान असल्यानें स्वस्थ राहिला!

पुढे जयेंद्र राजानें त्याला योग्य संधीची वाट पाहण्यास सुचविलें व तो आपल्या कामाला निघून गेला. कांहीं कालानंतर प्रवरसेनानें बंड उभारण्याची सिद्धता केली. त्याच सुमारास तोरमणाला त्याच्या भावानें, आपण होऊन, बंधमुक्त केलें होते. त्यानंतर तो सूर्य लौकरच अस्तंगत झाला. प्रवरसेन निराश व त्रस्तसा झाला होता. कारण आपल्या मातेचें दुःख आपल्या हातून दुर्निवार्य आहे, असें त्याला वाटूं लागलें होतें. त्याची माता दुःखामुळें जीव देण्यास तयार झाली होती. तिचें कसें तरी समाधान करून तो तीर्थयात्रेला

निघून गेला. तितक्यांत राजा हिरण्य मरण पावल्याचें कळले. तो निपुत्रिक होता. त्यानें तीस वर्षें दोन महिने राज्य केलें.

त्यावेळीं उज्जनी येथे श्री विक्रमादित्य-हर्ष-नांवाचा मोठा प्रतापी राजा राज्य करींत होता. (विक्रमादित्य-हर्ष-शकांवर विजय मिळवून त्याच्या स्मरणार्थ इ. स. ७८ त नवीन शक चालू करणारा उज्जनींचा राजा विक्रम हाच असल्याचे कल्हण मानीत होता. हें स्पष्ट आहे. हा काल कल्हणाने हिरण्य राजाच्या मरणाचा काल इ. स. १०६ दिला आहे. त्याच्या बराच समीप येतो. यावरून होणारी कालनिर्णयविषयक मोठी चुकी दुरुस्त करण्याला कल्हणाने पुढे ३३० व्या श्लोकांत हा विक्रमादित्य-हर्ष-शिलादित्य प्रतापशीलाचा पिता असल्याचे लिहून अडचण आणली आहे. ह्वेनत्संगाने जो विक्रमादित्य उज्जनीस इ. स. ५८०च्या सुमारास माळव्यात राज्य करीत असल्याचें लिहिलें आहे, तोच हा शिलादित्य असला पाहिजे. त्याचा पिता विक्रमादित्य हर्ष साहाव्या शतकाच्या पूर्वार्धांत राज्य करीत असावा. ) श्रीलक्ष्मीनें चतुःसमुद्र व शिवाचे चार भुज सोडून, त्या अद्भुत भाग्यशाली सार्वभौमाच्या हस्ताचा मोठ्या प्रेमानें आश्रय केला होता. त्याने सद्गुणांची अभिवृद्धि करण्याकडेच लक्ष्मीचा उपयोग केल्यामुळेच थोर गुणिजनांना धनाढ्यांपुढें मान उंच करून वागतां येत होतें. प्रबल शक व म्लेच्छ लोकाचा नाश करून त्यानें श्रीशंकराला याच्यासाठीं पुनः अवतार घेऊन भूभार हरण करण्याचे परिश्रम पडूं दिले नाहीत. तो दिगंतविख्यात होता. गुणिजनाना त्याच्याकडे मुक्तद्वार होते. त्याच्या राजसभेंत कोणालाहि हवे तेव्हा जातां येत असे.

मातृगुप्त नावाच्या एका गुणी व विद्वान् कवीला त्याने पदरीं बाळगलें होते. तो पूर्वी अनेक राजाच्या पदरी राहून आला होता. त्याच्या मनांत या थोर राजाविषयीं मोठा आदर वसत होता. ( १३० ) (मातृगुप्त हाच कालिदास असावा, याविषयी कै. डॉक्टर भाऊ दाजी यानी बरीच चर्चा केलेली आहे. राजतरंगिणींत कालिदासाचा उल्लेख आलेला नाही. मातृगुप्त व कालिदास हे दोन्ही समानार्थक शब्द आहेत. एका प्रवरसेन राजाच्या आज्ञेनें तयार झालेले सेतुबंध नांवाचे काव्य कालिदासकृत मानले जातें आणि हा प्रवरसेन मातृगुप्तानंतरचा राजा दुसरा प्रवरसेन असावा, असे त्याचें म्हणणें होते. पण याच्याविरुद्ध अनेक आक्षेप असल्याने, हे म्हणणें खरें समजलें जात नाही. मातृगुप्ताचे म्हणून कांही श्लोक क्षेमेंद्राच्या औचित्यविचारचर्चा आणि वल्लभदेवाच्या सुभाषितावली, या ग्रंथांत दिलेले आहेत. एका मातृगुप्ताने अलंकार व नाट्यशास्त्र यांच्यावर ग्रंथ लिहिल्याचाहि उल्लेख आढळतो. ) त्या मातृगुप्तानें विचार केला कीं, 'हा राजा मोठा पुण्यवान् व गुणिजनप्रिय आहे. पूर्वीच्या राजाविषयीं विचार केला म्हणजेच त्याची खरी योग्यता कळते. त्याच्याकडे विद्वान् व गुणिजनांना मान व धन मिळविण्यासाठीं हात जोडून प्रार्थना करीत उभें रहावें लागत नाहीं, किंवा त्याच्यापुढें आपले विचार बुद्धया अलंकारिक भाषेंत प्रगट करावे लागत नाहीत, किंवा त्यासाठी आपल्या बुद्धीला पुढें आणून एखाद्या कुलवधूप्रमाणें

व्यर्थ शिणवावें लागत नाहीं. त्याच्यापुढें खलजनांचे आलाप व्यर्थ होतात. तो युक्तायुक्ताचा विवेक जाणत असल्यानें त्याच्या सेवेंत कोणाचेहि गुण निष्फल होत नाहींत. त्याच्याकडे केव्हांहि विद्वान व मूर्ख एकाच मापानें मोजले जाऊन विद्वानांना मेल्यासारखें वाटत नाहीं. योग्य संभावनेच्या आशेनें आलेल्या थोरथोर विद्वानांची त्याच्याकडून कधीहि निराशा होत नाहीं. कारण तो प्रत्येकाची योग्यता ओळखून त्याचा यथायोग्य परामर्ष घेत असतो. तो मोठा चतुर आहे. तो गुणिजनांच्या खऱ्या गुणांचें चीज करून त्यांना सूचक व उत्साह जनक सूचना करून, सर्वांच्या प्रयत्नांना साहाय्य करीत असतो. आपली मर्जी संपादन करण्यांत सेवकांना पडलेले कष्ट पाहून त्याला जितकें वाईट वाटतें तितकें त्यांना वाईट वाटत नाहीं. ते कष्ट करतांना त्यांना आपले कष्ट हिमालयांत बर्फ वाहून नेण्याच्या कष्टांसारखें निष्फल झालें, असें वाटत नाहीं.

त्याच्या दरबारांत नसते गुण प्रगट करणारे नर्मसचिव, परस्वापहारी, वचनावर कायम न राहणारे व कलहप्रिय असे मंत्री नाहीत. सेवक उद्दाम भाषणें करणारे व थट्टेथट्टेनें एकमेकांचीं मनें दुखविणारीं मर्मभेदक भाषणें करणारे, किंवा संगनमत करून राजाजवळ दुसऱ्याचा प्रवेश होण्याला आड येणारे लोक त्याच्याजवळ नाहीत. ( १४० ) हांजी हांजी करणारे, बढाईखोर, व सर्वज्ञतेचा आव घालणारे, स्वयंमन्य, असे लोक त्याला मुळीं खपत नाहींत. त्याच्याशीं संभाषण किंवा चर्चा चाललेली असतांना मूर्ख दुर्जनाना मध्येंच तोंड घालून विरस करण्याला सवड सापडत नाहीं. माझ्या पूर्व पुण्याईमुळेंच मला अशा या थोर विशुद्ध व सेवनार्ह राजाच्या सेवेंत व सान्निध्यांत राहतां येत आहे. त्यापासून योग्य फलप्राप्ति झाल्यावाचून राहणार नाहीं. अशा स्थितींत या गंभीर, गुणज्ञ व स्थिरबुद्धि राजाची निःशंकपणें सेवा करीत राहण्याची मला मुळीच दिक्कत वाटत नाही. त्याची मर्जी संपादन करून व त्याच्याकडून इनामें मिळवून, मी आतां दुसऱ्या कोणाची सेवा करीत फिरावे, हें योग्य नाहीं, असा पुर्ता विचार करून त्याने राजसभेला खुष करण्यासाठीं नवख्या माणसाप्रमाणें बुद्धया प्रयत्न करणें आणि मोठ्या लोकांमध्यें पुढें पुढें करणें सोडून दिलें. आपली खरी व थोर योग्यता तो बेतानेंच प्रकट करी.

तो आपला श्रेष्ठपणा प्रमुखपणे प्रकट करण्याची योग्य संधि पहातो आहे, ही गोष्ट राजाच्या लक्षांत आली होती. तसेंच, तो खरा गुणी व थोर मनाचा असून, त्याचा विवेक व त्याचें धोरण, यांवरून तो अत्युच्च पदाला पोंचविण्या योग्य आहे, हेंहि राजा जाणत होता. तरी, त्याची परीक्षा करण्यासाठीं, राजानें त्याच्यावर कधीं त्याच्या योग्यतेला अनुरूप अशी कृपा बुध्दया दाखविली नव्हती. राजाची खरी योग्यता व उदारपणा ओळखून मातृगुप्त त्याची एकनिष्ठपणानें सेवा करीत राहिला होता.( १५० )

**मा**तृगुप्त राजाच्या सेवेमध्यें निरलस हजर असे. तो त्याचा क्रम सारखा वाढतच गेला. तरी त्याला त्याच्या स्वतःच्या शरीराच्या सेवेप्रमाणें कधी कंटाळा आला नाहीं. तो राजापुढें अगदीं थोडा वेळ किंवा पुष्कळ वेळ रहात नसे. यामुळें शारदीय रात्री चंद्राला

प्रिय होतात, तसा तो राजाला आवडूं लागला. वाड्यांतील सेवकांची कुचेष्टा, द्वारपालांचें चंचल व चमत्कारिक वर्तन, विटांची मिथ्या स्तुति, इत्यादिकांनीं तो गोंधळून जात नसे. राजाचें प्रसन्नपणाचें भाषण ऐकून, छायेंतील खडकाप्रमाणें तो स्वस्थ व शांत असे व त्यानें त्याची उपेक्षा केली तरी त्याला इतर प्रतिस्पर्ध्यांप्रमाणें मत्सर व विषाद वाटत नसे. तो समयज्ञ असे. त्यानें कधी राजदासींवर सकाम दृष्टि ठेवली नाही. राजाच्या शत्रूंशीं नुसतें भाषण किंवा राजासमक्ष नीच समागम कधी केला नाहीं. राजाचे कामगार बहुधा त्याची निंदा करीत. तो हाताखालच्या लोकांसह जणो तिच्यावरच भर देत असतात. अशांना मातृगुप्ताच्या तोंडून राजाविरुद्ध कधीं अक्षर निघालेलें ऐकूं येत नसे. तो दृढनिश्चयी होता. दुसरे राजसेवक नेहमीं त्याला 'राजसेवेत काही अर्थ नाही, तिच्यासाठी इतकें झटण्याला नको, असें म्हणत. तरी त्यांना त्याची सेवातत्परता कमी करतां आली नाही. प्रसंगोपात्त परप्रशंसा, दुराग्रहाचा त्याग आणि स्वतःचे गुण व विद्वत्ता, याचें योग्य प्रदर्शन करून, त्याने दरबारी मंडळी प्रसन्न ठेवली होती. अशी त्याने निरलस व दक्षतेनें सहा महिने सेवा केली.

पुढें एकदां राजा बाहेर जात असताना त्यानें मातृगुप्ताला पाहिलें. (१६०) तेव्हां तो मलिन व कृश झालेला असून त्याची वस्त्रे जीर्ण झालेलीं होतीं. त्याला पाहून राजानें मनांत म्हटले, ' हा बिचारा परकी, निराश्रित व गरीब मातृगुप्त याच्या चारित्र्याची परीक्षा करण्यासाठीं मी त्याला फार कडकपणाने वागविलें आहे. तो कोठें राहतो, निर्वाह कसा करतो, वगैरेबद्दल मी आजवर मुळीच चौकशी केली नाही, व त्याला काही दिलें घेतले नाहीं. शीत, वात, आतप यांनीं ताप दिलेल्या वृक्षाला वसंत पुनः शोभा देतो, त्याप्रमाणें आपल्या अधिकाराच्या धुंदीत मी याचा काहीच परामर्ष घेतला नाहीं. त्याचे कष्ट व थकवा कोण घालविणार. त्याची ही जी मी वेड्यासारखी परीक्षा केली, त्याच्या निरलस सेवेच्या मोबदल्यांत मी त्याला असा कोणता चिंतामणी किंवा अमृत देणार, त्याची खरी योग्यता व त्याने माझ्या सेवेत केलेले विलक्षण परिश्रम यांचा मी कोणच्या रीतीने उतराई होऊं, असा पुष्कळ वेळ त्याचा विचार चालला होता. पण त्याला त्याच्या योग्य बहुमान सुचला नाही.

पुढें शिशिर ऋतु प्राप्त झाला. त्याच्यात शीतामुळें शुभ्र व अतिशय थंड हिमकण व दाट धुकें आणणारा थंडगार वारा सुटून सर्वांगाचा दाह होतो. बर्फाच्छादनामुळें आधार पाडणारे पांघरुणसे पडतें. शीताला त्रासूनच जणों सूर्य त्वरेनें वडवानळाचा आश्रय पाहूं लागतो. यामुळें दिवस लहान होतात. ( १७० ) अशा त्या दिवसांत तो राजा एकदा आपल्या उज्वल शयनमंदिरांत निजला होता. तेथील दीपशिखासुद्धां मंद व शीत वायूनें चंचल व बारीक होत असून तेथें शेगड्या धगधगीत जळत असतांना, एकदां राजा जागा झाला. तेव्हां जोरानें सूं सूं करीत आंत शिरणाऱ्या शीत वायूमुळें दिव्यांच्या ज्योति चंचल होत होत्या. विझलेले दिवे लावण्यासाठीं त्यानें 'पाहाऱ्यावर कोण आहे,' असें विचारलें.

त्याला मातृगुप्तानें 'मी मातृगुप्त, आहे,' असें उत्तर दिलें. इतर सर्व सेवक थंडीमुळें गाढ झोंपी गेले होते. राजानें बोलावल्यावरून तो त्या सुंदर व ऊबदार शयन मंदिरांत गेला. राजानें त्याला दिवे लावण्याला सांगितलें. तें काम करून तो तत्काल परत फिरला, राजानें त्याला थोडा वेळ थांबविलें. ते वेळीं कडक थंडी पडलेली व राजा काय म्हणतो या विषयींची भीति, या मुळें त्याच्या अंगांत हुडहुडी भरली होती. तो बेतानेंच पुढे गेला. राजानें त्याला 'अद्यापि किती रात्र आहे' असें पुसलें. दीडप्रहर, असें त्याचे उत्तर ऐकून, राजा पुनः म्हणाला, 'इतकीच बाकी आहे, हें कशावरून? तुला निद्रा नाहीं कां येत, यावर आपल्या दीन व दरिद्री स्थितीचें ज्ञान करून देण्याला ही बरी संधि आहे, असें पाहून त्यानें तत्क्षणीं पुढील अर्थाचा श्लोक रचून म्हटला. (१८०) तापदर्शीतानें कुडकुडणाऱ्या, क्षुत्क्षामकंठ व चिंतार्णवांत बुडत असतांना व विझलेली शेगडी आपल्या फुटलेल्या ओठांनीं फुंकून पुनः चेतविणाऱ्या, अशा माझी निद्रा, अवमानित पत्नीसारखी रुसून, कोठेंशी दूर निघून गेली आहे, पण सत्पात्रीं दान झालेल्या भूमीप्रमाणें ही रात्र कांहीं सपत नाहीं.'

हा श्लोक ऐकून त्या राजानें त्या कविराजाची प्रशंसा केली व त्याला निरोप दिला. नंतर राजानें विचार केला, 'या भल्या गृहस्थाच्या तोंडून निघालेले हे दुःखाचे व खेदाचे उद्गार ऐकून सुद्धां मी स्वस्थ बसणें लाजिरवाणें आहे. तो असा बाहेर बसलेला, त्याची माझ्याकडून कांहींच कदर झालेली नाहीं, तेव्हां मी केलेली प्रशंसा तो सामान्य जनाच्या भाषेप्रमाणे फोल समजत असेल. पुष्कळ विचार करूनहि त्याच्या योग्य देणगी लक्षातच येत नाहीं. तरी पण त्याच्या त्या प्रौढ व मार्मिक उत्तरावरून आताच मला बरें आठवलें. सुंदर व सुप्रसिद्ध काश्मीर मंडलाची गादी रिकामी आहे. पुष्कळशा मोठमोठ्या राजांची तिच्याविषयीं मागणी आहे. तीच या योग्य पुरुषाला देऊन टाकावी.'

असा निश्चय ठरवून त्यानें तात्काळ रातोरात काश्मीरच्या अधिकाऱ्यांकडे गुप्त आज्ञापत्र पाठविलें कीं, 'माझें आज्ञापत्र घेऊन मातृगुप्त तुमच्याकडे येईल. त्यालाच तुम्हीं निश्शंक गादीवर बसवावें.' तें आज्ञापत्र घेऊन दूत रवाना झाल्यावर, त्यानें त्याबद्दलचें दुसरें आज्ञापत्र स्वतःच लिहून तयार केलें व उरलेली रात्र समाधानानें काढली. (१९०)

'राजाशी समक्ष भाषणाचा प्रसंग येऊनहि निष्फल झाला. आपण आपलें कर्तव्य केलें. आज सर्व संशय फिटला. आशारूपी डाकिणीपासून एकदांचा सुटलों. बरें झालें. यथेच्छ संचार करण्याला मोकळीक झाली. आतां आपणाला स्वस्थ समाधानानें राहतां येईल. इतरांप्रमाणेंच मीही फसून हा राजा फार योग्य व संसेव्य आहे, असें समजत होतों.' असें मातृगुप्ताला वाटलें 'सर्प निवळ वायुभक्षी ते योगी म्हटलें जातात. कर्णप्रांतीं गुंजारव करणाऱ्या भृंगांना कर्णताडनानें निवारण करणारे गज, हे शूर्पकर्ण म्हणवितात. तसेंच, पोटीं अग्नीचा दाह बाळगणाऱ्या वृक्षाला सत्-द्रुम-शर्मी म्हणतात! असे हे सारेच प्रकार लोकांनी उलटे व फसविणारे करून टाकले आहेत. तरीपण या राजानें आपल्या कृपेंतल्या पुष्कळ मंडळींची घरें सभाग्य केलीं आहेत. तो कोणालाहि भेटत नाहीं, असें नाहीं. तेव्हां

त्या उदार व थोर राजाकडे काय दोष ? माझेंच कांही अदृष्ट पाप माझ्या भाग्योदयाच्या आड येत असेल. सागर हा रत्नाकर खरा, पण उलट्या वाऱ्यानें याचकाला अटकाव झाला तर, त्याच्यापासून त्याला रत्नप्राप्ति न होण्यांत, सागराच्या दातृत्वापेक्षां याचकाच्या हीन भाग्याकडेच दोष असला पाहिजे. लौकर फलप्राप्तीच्या कामीं, मालकापेक्षां सेवकाचाच अधिक उपयोग होतो. कारण मालकाला प्रसन्न करून घेण्याला दीर्घ प्रयत्न करावा लागतो. स्वतः पशुपतीचें पादसेवन करणाऱ्यांना भस्माशिवाय कांही लाभत नाहीं. पण नंदिकेश्वराच्या पायाशीं राहणाऱ्यांना सुवर्णाची कधीच वाण पडत नाहीं. पुष्कळ विचार केला पण राजानें माझ्या सेवेची कदर न करण्याजोगे माझ्या हातून कांही घडले असल्याचें मला स्मरत नाहीं.' ( २०० )

' राजे लोक नेहमी गतानुगतिक असतात. एकाद्याची पूर्वी कोणी कदर केल्याचें दिसल्याशिवाय ते क्वचितच त्याची कदर करतात. समुद्राच्या प्रचंड व भयंकर लाटांनीं व दुसऱ्या कोणी लक्षांत न घेतलेले जलबिंदू, मेघ शोषून घेऊन, पुनः पर्जन्याच्या रूपानें खालीं टाकतात, तेव्हां सागर आपल्या विचीतरंगाने त्याचें स्वागत करून, त्याची मोत्ये बनवितो. त्याचप्रमाणे कोणा यःकश्चित माणसाचा दुसऱ्या कोणी सन्मान केला असला म्हणजे, तो थोर राजेलोकानाहि मान्य व प्रिय होतो.' अशा विचारांनीं तो त्या संसेव्य राजाविषयी किंचित् अनादर प्रकट करीत होता. दुर्दैवाच्या व हताश स्थितीत शहाण्याच्या बुद्धीला सुद्धां भ्रम पडतो.

सकाळी राजानें द्वारपालाच्या हातीं मातृगुप्ताला बोलावणे पाठविलें त्याला अनेक द्वारपालांनीं राजांकडे पोंचविल्यावर, राजाच्या भूसंकेतान्वये लेखनाधिकाऱ्यानें त्याच्या हातीं आज्ञापत्र दिले. राजानें त्याला म्हटले, ' तुला काश्मीर देशाची माहिती आहे कां ? तेथें जाऊन तेथील अधिकाऱ्यांना हें बंद आज्ञापत्र नेऊन दे. तें मध्येच फोडून वाचील त्याला माझ्या देहाची शपथ आहे, हे विसरूं नको. '

मातृगुप्ताला राजाचा हेतु माहीत नव्हता. वाटेंत फार क्लेश होतील, अशी त्याला भीति होती. यामुळे ती राजाज्ञा, वास्तविक रत्नकिरण असूनहि, त्याला ती प्रदीप्त अग्निकणांसारखी तापद वाटली. तरी ' जशी महाराजांची आज्ञा, ' असें म्हणून तो निरुपायानें रवाना झाल्यावर, राजा नेहमींप्रमाणें विश्वासांतल्या मंत्र्यांबरोबर बोलत राहिला. त्यानें आपल्या औदार्याबद्दल मुळींच अभिमान व्यक्त केला नाहीं.

एकाकी, खिन्न, पाथेयाची कांहींसुद्धां व्यवस्था नसलेला व मार्गांतील परिश्रम सोसण्याची संवय नसलेला, असा मातृगुप्त मार्गाला लागलेला पाहून, लोक राजाला दूषण देत म्हणूं लागलें, ' हा राजा किती अविचारी आहे, हें दूताचें काम एकाद्या सामान्य सेवकाचे, तें त्यानें या भल्या गृहस्थाला सोपवलें आहे. या एकनिष्ठ व अहर्निश कांहीं उमेदीवर सेवा करणाऱ्याला असल्या हलक्या कामाला योग्य ठरविलें! कोणी सेवक धन्याची विवक्षित सेवा मन लावून दक्षतेनें करूं लागतांच, तो धनी योग्य विचार न

करतां त्याला तसल्याच कामाला योग्य समजूं लागतो. श्रीविष्णूला शेषानें आपले शरीर पर्यंकादाखल दिलें, तें गरुडाच्या त्रासापासून उसंत मिळेल म्हणून. पण यांत त्यानें स्वतःच्या स्वास्थ्यावर पाणी सोडलें. कारण तो आपला देहभार धारणसमर्थ आहे, असें पाहतांच, श्रीविष्णूनें त्याच्यावर आणखी साऱ्या पृथ्वीचा भार टाकला. या मातृगुप्तानें राजाच्या विश्वासांतील इतर लोकांपेक्षां आपल्या अंगीं अधिक गुण असल्याचे प्रकट केलें व पूर्ण विश्वासानें त्याची सेवा केली. त्याच्या ऐवजीं, अशा या गुणी व भल्या माणसाची अशी कदर व असा बहुमान करणाऱ्या राजाहून कमी गुणग्राहक दुसरा कोण असेल ?'

ज्याला सर्व चमकणारे पदार्थ व निस्सार इंद्रधनुष्य पहातांच आनंद होतो तो मेघ, आपला हा जणो रत्नाचा ताटवा पाहाताच खचित संतुष्ट होईल असें समजून मोर आपला पिसारा पसरून ऐटीनें नाचूं लागू लागतो. पण त्याला फार तर एखादा जलबिंदु टाकणाऱ्या मेघापेक्षां कमी शून्यहृदय कोण सांपडेल ?

मातृगुप्त काश्मीराचा मार्ग क्रमीत असतांना त्याला आपल्या भावी भाग्योदयाची मुळींच कल्पना नव्हती. त्याला एकापेक्षां एक वरचढ शुभ शकून होत गेले. त्यांचा मात्र त्याला आधार वाटत होता ( २२० ) त्याला कष्ट झाले नाहीत किंवा श्रम वाटले नाहीत. त्याला शकुन शास्त्राची माहिती होती. सांपाच्या फणेवर सरडा बसलेला त्यानें पाहिला तसेच, स्वप्नात आपण एका भव्य जहाजावर बसून समुद्र उल्लंघीत आहो, असेंहि त्याने पाहिले. अशा शुभशकुनावर राजाची आज्ञा आपणाला हितकरच होईल, अशी त्याला खात्री वाटूं लागली व काश्मीरानही शुभफल मिळालें तर पुढे आपणाला त्याहून चांगले दिवस येतील, असे त्याला वाटूं लागले.

त्याच्या सद्वर्तनाचे सुफलच जणों, असा त्याचा प्रवास सुखाचा झाला. वाटेंत सहज चढतां येणाऱ्या घाटया, अतिथींचे स्वागत करण्याला उत्सुक अशीं वसतिगृहें व त्याच्यांत पदोपदीं उत्तम स्वागत, त्याला प्राप्त होत गेलें. पुढें तो हिमालयाच्या प्रांत भागांत पोंचला तेव्हां, बर्फानें आच्छादित आणि दह्याच्या पांढऱ्या शुभ्र थाळ्याप्रमाणें मंगलप्रद असा शोभत असलेला तो पर्वतराज, त्याच्या खालचा गगनचुंबी व चंचल वृक्षराजींनी भूषित झालेला होता. हिमतुषार व देवदारूचा सुगंध, यांनी युक्त अशा त्या काश्मीर देशीय वायूच्या द्वारें, आपल्यावर राज्य करण्यास येणाऱ्या त्या मातृगुप्ताचे त्याने प्रथम स्वागत केले. तो क्रमवर्त देशांतलि कांबुव नांवाच्या घाटीवरील चौकीवर पोंचला. (हल्ली त्या स्थळाला शूरपूर म्हणतात. ) तेथें त्यावेळीं कांहीं कार्यानिमित्त काश्मीरची मंत्रि-मंडळी आली असल्याचें त्याला कळलें. तेथें नानादेशचे लोकहि जमलेले होते. जुनीं वस्त्रें बदलून, उज्वल आणि स्वच्छ पोशाख करून, तो तें राजाचे आज्ञापत्र घेऊन त्यांच्याकडे निघाला. वाटेंत त्याला भावी अभ्युदय सुचविणारे पुष्कळसें शुभशकुन झालें. त्यांचे कसे काय फल मिळते ते पहाण्याला दुसरेहि कांहीं लोक त्याच्याबरोबर गेले. ( २३० )

हर्ष–विक्रमादित्याकडून दूत आल्याचें कळतांच द्वारपालांनीं मंत्र्यांना वर्दी दिली, आणि त्याला 'यावें महाराज, प्रवेश करावा', असें चोहींकडून निमंत्रण मिळालें. तसा तो मंत्रिमंडळांत पोंचला. तेथें सर्व सामंतहि होतें. सर्वांनीं त्याचा आपापल्या दर्जाप्रमाणें सत्कार केला आणि त्याला सर्वांत उंच आसनावर नेऊन बसविलें. नंतर त्यांनीं त्याला नम्रपणें विक्रमादित्यराजाकडील आज्ञापत्राबद्दल म्हटलें. तेव्हां त्यानें भीतभीत व कांहींसें लाजतच तें राजाचें आज्ञापत्र त्यांना दिलें. त्याचा मोठ्या नम्रतेनें व सादर स्वीकार करून त्यांनीं ते एकीकडे नेऊन वाचलें. नंतर त्यांनीं मातृगुप्ताचें अभिनंदन करून, त्याला आदरानें 'मातृगुप्त आपणच काय,' असे विचारिलें. त्याला किंचित हंसत त्यानें 'होय' म्हटल्याबरोबर 'कामावर कोण कोण हजर आहेत ?' असें गडबडीनें विचारण्यांत येऊन एकदम अभिषेक सामुग्री जमविण्याची तारंबळ उडाली. लौकरच नागरिकांची गर्दी जमली. आनंद प्रदर्शक मंगल वाद्यांचा गजर सुरू झाला. जयघोष होऊं लागला. लौकरच प्रमुख प्रधानांनी मातृगुप्ताला सुवर्णाच्या भद्रासनावर पूर्वाभिमुख बसवून राज्याभिषेक केला. त्या अभिषेक जलाचा प्रवाह त्याच्या प्रशस्त उरस्थलावरून वाहातांना विंध्य पर्वताच्या पठारावरून वाहाणाऱ्या नर्मदा प्रवाहाप्रमाणें भासत होता( २४० ).

त्यानंतर त्याला दिव्य गंधानुलेपन करून सर्वांगावर बहुमोल वस्त्राभरणें घातली गेली. तो सिंहासनारूढ झाल्यावर मंत्र्यानीं त्याला राजा मानून विनंति केली की, 'आम्ही श्री विक्रमादित्य महाराजाना आमच्यासाठीं उत्तम राजा पाठविण्याविषयी विज्ञापना केली होती. ती मान्य करून त्यानी आपणाला स्वतःप्रमाणे राजा बनवून आमच्यावर राज्य करण्यास पाठविलें आहे. त्याप्रमाणें आपण आमचें पालन व शासन करावें. महाराज हें काश्मीर मंडलाचे राज्य नेहमी दुसऱ्या राज्यावर राज्य करण्याला राजे देत आलें आहे. तें आपल्याला कोणी दुसऱ्यानें दिलें आहे, असें समजूं नका. पितर निव्वळ जन्मापुरतें निमित्त कारण होत असतात. पण जीवाला जन्म मिळतो तो पूर्व जन्मांतल्या कर्मानुसार. दुसऱ्या राजांकडून राज्य मिळणारांचीहि तीच स्थिति असते. तेव्हां आपण दुसऱ्या कोणाला मालक मानून, स्वतःला आम्हांला लघुता आणूं नका'.

हें ऐकूनहि मातृगुप्ताला आपल्या मालकाने आपल्यावर केलेल्या उपकारी वर्तनाचें स्मरण होऊन, त्याला किंचित हसूं आलें. नंतर त्यानें आपल्या नूतन राज्याभिषेकाला उचित अशीं मोठमोठी दानें उदार पणानें दिलीं व तो अत्युत्तम भाग्याचा दिवस त्याने तेथेंच घालविला.

दुसऱ्या दिवशीं मंत्रिमंडळानें त्याला नगराला चलण्याविषयीं विनंति केली. त्याप्रमाणे निघण्यापूर्वी त्यानें अपणांवर असा अनुपम उपकार करणाऱ्या श्री विक्रमादित्याकडे कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी दूत पाठविले व त्यांच्याबरोबर अनेक प्रसंगोचित, विलक्षण बहुमोल, नजराणेहि पाठविले. पण त्याबरोबरच आपल्या नव्या राज्याची श्रेष्ठता दाखवीत आपण त्याची बरोबरी करीत आहों याबद्दल त्याला कांहींशी शरमही वाटली. त्यानें दुसऱ्या एका दूताबरोबर एक विज्ञापनपत्र पाठविलें. त्यांत त्यानें आपणांला आपल्या मालकाचें

स्मरण आहे असें व्यक्त केलें होतें. त्याचें स्मरण होऊन मातृगुप्ताचे नेत्र भरून आले. त्यानें एक श्लोक रचून लिहून पाठविला. त्याचा अर्थ असा होता कीं 'आपण आपल्या चर्येवरून कोणाला सुगावा न लागूं देतां व स्वतः परिस्फोट न करतां आणि आपल्या औदर्याची कोणाला कल्पनाहि न नेऊं देतां, एकाद्या वृक्षाप्रमाणें अवाचित उत्तम फल देणारे आहां. आपल्या देणग्यावरूनच आपली कृपा व्यक्त होते. महामेघ मुळींच गडगडाट न करतां विपुल जलवृष्टी करतात. तसाच हा आपला थोरपणाचा प्रकार होय'. त्या पत्राबरोबर त्यानें काश्मीरांत उत्पन्न होणाऱ्या उत्तमोत्तम फल पुष्यादिकांचाहि नजराणा पाठविला होता.

पुढें त्यानें क्षितीजापर्यंत पसरलेल्या सैनिकांसह मोठया थाटानें नगरप्रवेश केला व पिढीजाद राजाप्रमाणें प्रजेचें परिपालन केलें. औदार्य आणि शौर्य यांच्या संबंधांत त्या निसर्गश्रेष्ठ राजाचा कधींच उणेपणा दिसून आला नाही. उदारपणानें दक्षिणा देतां यावी म्हणून प्रथम, मोठ मोठे यज्ञयाग करण्याचें त्याच्या मनांत आलें. पण त्यांत पशुहिंसा होणार, हें लक्षांत येऊन त्याचें मन कचरलें. त्यानें राज्यांत कोठेंहि हिंसा होऊं नये, अशीं आज्ञापत्रें काढलीं. यज्ञांत पशुहिंसेच्या ऐवजीं त्यानें करंभ नांवाच्या नव्या सोन्याच्या नाण्याचा उपयोग केला. तो यज्ञभाग, मातृगुप्त राजा मुक्त हस्तानें वाटीत असतांना, तृष्णा भागली नाहीं, किंवा आनंदाचें भरतें आलें नाहीं, असा कोण याचक सांपडणार ? तो राजा मोठा गुणी, पुण्यशील, उदार, व स्वतः कष्ट सोसल्यामुळें परदुःख अभिज्ञ असल्यामुळें याचकांना तो विक्रमादित्याहून काकणभर अधिकच प्रिय झाला होता. त्याचे शुद्ध व विवेकपूर्ण करमणूकीचें प्रकार यांच्या योगानें शहाण्या व प्रतिष्ठित लोकांना आनंदच वाटे.

मेंठ कवीनें आपलें हयग्रीववध नांवाचें काव्य त्याच्यापुढे वाचून दाखविलें. वाचन संपेपर्यंत राजानें त्याच्याविषयीं एक शब्द उच्चारला नाहीं. ( २६० ) मेंठ पुस्तक वेष्टूं लागला तेव्हां, जणों त्या काव्याचा रस गळून जाऊं नये म्हणूनच, मातृगुप्तराजानें त्याच्या खालीं सुवर्णाचें पीठ–तबक–ठेवविलें. राजाच्या हातून आपल्या कृतीचे असें उत्तम चीज झालेलें पाहून भर्तृमेंठ कवीला दुसरें कांहीं बहुमोल इनाम व्यर्थ वाटलें.( मेंठ कवीचा उल्लेख क्षेमेंद्राच्या सुवृत्ततिलक ग्रंथांत आणि मंख कवीच्या श्रीकंठचरित काव्याच्या दुसऱ्या सर्गाच्या ५३ व्या श्लोकांत आढळतो. मंखानें त्याला सुबंधु, भारवी व बाण यांच्या तोडीचा म्हटलें आहे. श्रीवरकृत सुभाषितावलींत त्याच्या नांवावर कांहीं श्लोक दिलेले आहेत. त्या काव्यग्रंथाचा काव्यप्रकाश, साहित्यदर्पण व राघवभट्टकृत शाकुंतलाच्या टीकेंतही उल्लेख आहे. ) मातृगुप्तराजानें मातृगुप्तस्वामी नांवाचें मंदिर बांधविलें व त्याच्यांत श्री मधुसूदनांची स्थापना केली. त्याच्या खर्चाकडे लावून दिलेलें गांव पुढें मम्मानें आपल्या मंदिराकडे करून घेतलें.

( मम्मानें बांधविलेल्या मम्मस्वामीच्या मंदिराचा पुढें तरंग ४ श्लोक ६९८ मध्यें उल्लेख आहे. )

मातृगुप्तानें चार वर्षें नऊ महिने एक दिवस राज्य केलें.

काश्मीर मंडळांच्या पूर्वीच्या राजकुलांतील राजपुत्र आंजनेय प्रवरसेन हा नष्टश्री झालेला, वैतागून पित्रोद्धारास्तव तीर्थ यात्रा करीत फिरत होता. त्याला आपल्या काश्मीर मंडलांत मातृगुप्तराजा झाल्याचें कळलें. तेव्हां रात्रीं पडलेले दंवबिंदू सूर्यतापानें शोषले जातात, तद्वत् त्याचा पितृनिधनजन्यशोक रागामुळें सुकून गेला. तो श्रीपर्वतावर पोंचला. तेथें अश्वपाद नांवाचा पाशुपत सिद्ध होता. त्यानें आंजनेयाला कंदमूळ अर्पण करून म्हटलें कीं पूर्वजन्मीं मी सिद्ध असतांना, तूं माझा साधक शिष्य होतास. मला सिद्धि प्राप्त झाल्यावर मीं तुला त्या वेळीं तुझी इच्छा विचारली. तेव्हां तूं राज्यप्राप्ति, असें सांगितलेस. ती तृप्त-करण्याला मी प्रवृत्त होणार इतक्यांत, मला श्रीशंकराचा दृष्टांत झाला कीं, 'हा तुझा साधक, माझ्या गणांपैकींच एक आहे. त्याची इच्छा पुढल्या जन्मी मीच तृप्त करणार आहे, (२७०) तेव्हां तुझी इच्छा परमेश्वर पुर्ण करील.' इतकें सांगून अश्वपाद अंतर्धान पावला,

नंतर आंजनेय साम्राज्यप्राप्तीच्या इच्छेनें तेथेंच वर्षभर तप करीत राहिला. श्रीशंक-रांना अश्वपादाच्या भाषणावरून त्याचें स्मरण झालें व त्यांनीं त्याला यतिवेषाने दर्शन दिलें. त्यांनीं विचारल्यावरून त्यानें नरेंद्र होऊन, सर्व जगतीतलाचा राजा होण्याची इच्छा आहे, असें कळविलें. तेव्हां यतीनें त्याची परीक्षा पाहण्यासाठीं, "अरे, मोक्ष सोडून या क्षणिक राज्यभोगाची काय इच्छा करतोस?", असें म्हटलें. त्यावर आंजनेयानें कांहींसें रागानें, "आपण यती श्रीशंकर समजून मीं आपलें हृद्गत कळविलें पण आपण खरे जगत्गुरु शंकर नव्हे. दुसरेच कोणी आहांत असें दिसतें. खरे महात्मे अल्प याचकाला स्वतःच अधिक फल देत असतात. केवळ जलाची याचना करणाऱ्या उपमन्यूला श्रीशंकरांनीं क्षीरसागर दिला. माझ्या थोर कुलाचा उच्छेद झाल्यामुळें, माझ्या मनाला जो संताप होतो आहे, त्याचें पुनः गतवैभव प्राप्त होईपर्यंत शमन होणार नाहीं व तोपर्यंत स्वर्गसुख उपभोगीत असतांना देखील, तो झालेला परिभव मला दुःखच देत राहील. असें उत्तर दिलें."

हें ऐकून श्रीशंकर प्रसन्न झाले व त्यांनीं त्याला दर्शन देऊन त्याच्या इच्छेनुरूप वर दिला आणि म्हटलें, 'माझ्या आज्ञेनें कांहीं काल राज्यसुखोपभोग घेतल्यावर सिद्ध अश्व-पाद तुला माझें सायुज्यपद-कैलास-प्राप्तीविषयींची सूचना करील'. असें बोलून ते अदृश्य झाल्यावर, आंजनेय प्रवरसेनानें आपल्या तपश्चर्येच्या व्रताची सांगता केली आणि अश्व-पादाचा निरोप घेऊन तो अपल्या इष्ट उद्योगाला निघाला. (२८०)

त्यानें प्रवरसेन असें नांव धारण केलें होतें. तो प्रगट झाल्यावर, त्याच्याविषयीं अनुरक्त असलेले अमात्य येऊन त्याला भेटले. त्यांनीं त्याला काश्मीराकडील हकीकत कळविली, आणि मातृगुप्ताविरुद्ध उठावणी करण्याची सल्ला दिली. तेव्हां त्यानें त्यांना रागें भरून म्हटलें, त्या बिचाऱ्या मातृगुप्ताचा पाड काय, त्याला राज्य देणाऱ्या त्या धृष्ट विक्रमादित्याचें मी शासन करणार आहे. मातृगुप्तासारख्या दुर्बल व यःकश्चित राजांना धुळीस मिळविण्यास समर्थ, अशांचा समाचार घेतला पाहिजे. बिचारीं कमलेंचंद्रोदयाचा द्वेष करतात. यांचा नाश करण्याऐवजीं, त्या कमलांचा नाश करणाऱ्या हत्तींचे दांत फोडणेंच चंद्राला

जास्त पसंत असतें. थोर लोक हीन शत्रूपेक्षां, त्याच्याहून वरिष्ठाशीं स्पर्धा करूनच, स्वतःचा पराक्रम प्रगट करीत असतात.' पुढें त्यानें सैन्य जमवून प्रथम त्रिगर्ताचें राज्य घेतलें. नंतर तो पुढें चालला. तितक्यांत त्याला विक्रमादित्य निवर्तल्याचें कळलें. तें ऐकून त्याला फार शोक झाला. तो दिवसभर उद्विग्न व उदास राहिला. त्यानें स्नान, भोजन, कांहींच केलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं, मातृगुप्तराजाहि काश्मीरचें राज्य सोडून निघालेला, जवळच वस्तीला आहे असें ऐकून, न जाणों त्याला आपल्याच पक्षाच्या कोणीं लोकांनीं घालविलें असेल, असें वाटून, तो थोडयाशा लोकांनिशीं त्याच्या भेटीला गेला. मातृगुप्तानें त्याचें यथोचित स्वागत केलें व त्याला योग्य आसनावर बसविलें. त्याला प्रवरसेनानें नम्रपणानें म्हटलें, 'आपण काश्मीर मंडळाचें राज्य का सोडून आला?' मातृगुप्तानें क्षणैक स्वस्थ राहून, दीर्घ उसासा सोडीत, किंचित हंसत, म्हटले, 'हे प्रवरसेना, ज्याच्यामुळें आम्ही राजे झालों तो उदार, पुण्यात्मा, उरला नाहीं. सूर्यप्रकाश देईल तोंवरच सूर्यकांत प्रकाश देत असतो. असें नसतें तर, त्याच्या अभावी तो सूर्यकांत निवळ निस्तेज दगडच झाला नसतां कां!'

यावर प्रवरसेन म्हणाला, 'आपण असें उद्विग्न व दुःखी झाला आहा ते दुसऱ्या कोणी आपणाला त्रास दिला असून, त्याचा सूड उगविण्याच्या इच्छेने कां!' मातृगुप्ताने रागानें अधरोष्ट चावीत व हंसतसें उत्तर दिले. 'आतां आम्हाला कोण त्रास देऊं शकणार नाहीं, मग तो कितीहि प्रबल किंवा दुर्बल असो, खरोखर त्या गुणज्ञ महात्मा वीरानें माझा असा बहुमान केला, यात त्याने भस्मांत आहुती टाकली किंवा ऊसर भूमीत बीज पेरले, असें थोडेंच आहे. कृतज्ञ लोक आपोआपच उपकार करणाराचे अनुकरण कतात. सूर्यकांत व चंद्रकांत सुद्धां सूर्य व चंद्र अस्तास जातांच शांत व क्षीण होतात. आतां पवित्र वाराणशी क्षेत्रांत जाऊन मी ब्राह्मणधर्मानुरूप सन्यास घेऊन, शांति सुखाचे साधन करण्याचे ठरविलें आहे. विक्रमादित्य महाराज या भूतलाचे मणिदीप. ते नष्ट झाल्याने मला या अंधकारमग्न पृथ्वीकडे पाहण्याची सुद्धा भीति वाटते. तेव्हां यापुढें भोग योगाची गोष्टच कशाला?'

हें त्या महाभागाचें भाषण ऐकून त्या बुद्धिमान प्रवरसेनाला मोठा विस्मय वाटला आणि तो गंभीरपणानें म्हणाला, 'हे राजा, आपणांसारखीं थोर व निरपेक्ष राजरत्नें पैदा करणारी ही रत्नसू विश्वंभरा, खरोखर अन्वर्थक रत्नसू होय. (३००) तसेंच आपणांसारख्या गुणी व कृतज्ञ पुरुषाची खरी परीक्षा करणाऱ्या विक्रमादित्याच्या शिवाय, या पृथ्वीवर दुसऱ्या कोणाच्या गुणग्राहकतेची थोरवी गातां येईल? आपणांसारखे कृतज्ञतेचे मार्गदर्शक पैदा न होतें तर, कृतज्ञतेचा मार्ग कधींच पार नष्ट होऊन गेला असता. आज काल कोणी, कोणा सामान्य माणसावर उपकार केला तर, त्या उपकृताला वाटतें, अं 'माझें पूर्वसुकृत उदयास आल्याचेच हे फल. नाहीतर, त्यानें या पूर्वीच हे उपकार कां केले नाहींत? यांत त्याचा कांहीं तरी स्वार्थ असावा, नाहींतर तो आपल्या आप्तइष्टांवर कां न उपकार करतां? मला माहित असलेले त्याचें कांही रहस्य मी बाहेर पाडीन, अशी त्याला भीति असावी, म्हणूनच तो अक्ल लोभी, मला कांहीं तरी देतो आहे. उदात्त व गुणिजनां-

वर थोर व पुण्यवान लोकांनीं केलेली थोडीशीहि उपकृति, तेव्हांच शतशाखी होत असते. कारण तिला त्यांच्या पूर्व पुण्याईची पुष्टि मिळते. हे मातृगुप्ता थोर व तज्ज्ञ, अर्थानी कसोटीस लावून परीक्षा केलेल्या रत्नाप्रमाणें, तूं श्रेष्ट व उत्तम गुणवान ठरलेला मोठा धन्य होस. कृपा करून राज्यत्याग करूं नकोस. माझी ही गुणिजन पक्षपातिता तुझ्या द्वारें प्रगट होण्याला अवसर दे. तुला पूर्वीच मिळालेल्या व मी आतां पुनः समर्पण करीत असलेल्या, या राज्याला तू सनाथ कर.'

हें प्रवरसेनाचें निष्कपट उदारपणाचें भाषण ऐकून, मातृगुप्त हळू व हंसत म्हणाला, (३१०) 'हे राजा, मला यावेळी सभ्यपणानें न उच्चारतां येणारे शब्द, निरुपायानें बोलावे' लागताहेत. तुझा निष्कपटपणा व सरळपणा तुझ्या भाषणांत व्यक्त झालेले आहेत. त्यांचा मी धृष्टपणाने या वेळी अव्हेर करतो आहे. एकाद्याच्या पूर्वावस्थेतील लाघवाचें प्रत्येकाला ज्ञान व स्मरण होत असतें. पण त्याच्या पुढच्या खऱ्या थोरवीची जाणीव ज्याची त्यालाच असणार आपली व माझी पूर्वावस्था, या वेळीं दोघांनाहि ठीक ठाऊक असल्यानें, आपणां उभयतांनाहि मोह पडला आहे. राजा झाला असलेल्या मजसारख्याला दुसऱ्यानें दिलेली संपत्ति घेऊन, एकदम सर्व सभ्यपणाचा त्याग कसा करतां येईल ? यात त्या थोर विक्रमादित्याचे असाधारण महात्म्य व औदार्य, यांना, मी, केवळ भोगतृष्णेनें हीनपणा आणला, असें नाही कां होणार ? मला तशी भोगतृष्णा व इच्छा असती तर, स्वाभिमान कायम राखून, माझें त्यापासून कोण निवारण करणार होता. त्याने मजवर केलेल्या उपकारानुरूप माझे वर्तन न राहिले तर, माझ्याच ठायी त्याचा लय होणार. त्याचेंच मीहि योग्य अनुकरण करून, मला त्याचा पात्रापात्र विवेक जगजाहिर केला पाहिजे. एव्हढें हें कर्तव्य आटोपून, मी सर्व भोगांचा परित्याग करून, त्या कीर्तिशेष नृपतीचें अनुकरण करीत, सत्य प्रतिज्ञ होण्याचें ठरविले आहे.' (३२०) त्याला प्रवरसेन राजानें उत्तर दिलें, 'आपण जिवंत आहां तोवर मी आपल्या संपत्तीला स्पर्श सुद्धां करणार नाही.'

नंतर तो धर्ममूर्ति मातृगुप्त वाराणशीला गेला. तेथें काषायवस्त्रे धारण करून त्यानें संन्यास घेतला. प्रवरसेन, आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें काश्मीरच्या राज्याचें सारें उत्पन्न काशीस पाठवी. मातृगुप्त स्वतः भिक्षावृत्ति राहून, तें सर्व दान करी. हा त्यांचा क्रम दहावर्षे चालला होता. परस्परांविषयीं यथोचित अभिमान बाळगणाऱ्या, श्रेष्ट व थोर, हर्षाविक्रमादित्य, मातृगुप्त आणि प्रवरसेन, या तीन्ही राजांची ही कथा, त्रिपथगागंगेच्या जलाप्रमाणें पवित्र व पावन होय.

**राजा प्रवरसेन**—पुढे प्रवरसेनाने पुष्कळ पृथ्वीशांना पादाक्रांत करून, आपलें यश दशदिशांमध्यें पसरिलें. समुद्र शोषविणाऱ्या व विंध्यपर्वताचें उल्लंघन करणाऱ्या अगस्तीप्रमाणे त्याचा प्रचंड प्रताप, सर्व भुवनांना प्रसन्न करीत असे. ( अगस्ति ऋषीनें समुद्र प्राशन केला व विंध्य पर्वताला नमाविलें. तोच-क्ष्यानोपस-तारा उदय पावल्यावर पर्जन्यकाळ संपतो व जल निर्मळ होऊं लागतें. ) त्याच्या अगणित सैन्याच्या भारानें

सागराच्या प्रांत भागांतील, ताल व तमाल वृक्षांचीं पानें गळालीं व शत्रूंच्या स्त्रियांच्या कपाळांवरील तमाल तिलक, आणि कानांतील तानवडीं गळून पडलीं. त्याच्या सैन्यातील सहस्रशः हत्तींच्या कृष्णवर्ण मदजलस्रावामुळें, पूर्वसमुद्राला जणों गंगा व कालिंदी यांच्या संगमाची शोभा आली. त्याच्या पश्चिम क्षितिजापर्यंत पसरलेल्या, दिगंतस्पर्शी सैनिकांनीं, पश्चिम समुद्रावरील सौराष्ट्रांचें आक्रमण करून तेथील राजांचें समूळ उच्चाटण केलें. (३३०) हा पृथ्वीतलावरील इंद्र यशार्थी होता. त्यानें राग व द्वेष मनांत न धरतां, राजविजय केला. त्याचें ऐश्वर्य व त्याचा प्रताप सारखा वाढतच होता.

तसेंच त्यानें, शत्रूंनीं राज्यभ्रष्ट केलेला, विक्रमादित्याचा पुत्र शीलादित्य-किंवा प्रतापशील, याला सहाय्य करून पुनः गादीवर बसविलें. (हा विक्रमादित्यामागून गादी-वर बसलेला राजा, आपण हिंदुस्थानांत येण्यापूर्वी साठ वर्षे होऊन गेल्याचें, व्हेनत्संग यानें सी-यू-की-च्या दुसऱ्या भागांत लिहिलें आहे. त्यानें ई. स. ५५० ते ६०० पर्यंत राज्य केलें असावें, असें प्रो. म्याक्समूलर साहेबांनीं मानलें आहे. ) पूर्वी काश्मीर देशां-तले सिंहासन विक्रमादित्यानें उज्जनीस नेले होतें ते त्याने तेथून परत आणले. ( कोणी कोणी, हें सिंहासन विक्रमादित्यविषयक अनेक दंतकथांमध्यें उल्लेख आलेले, सुप्रसिद्ध सिंहासन समजतात. पण हें खरें नाहीं. ) त्यानें मुम्मुनी नांवाच्या राजाला सात वेळां परा-भव करून सोडलें होतें. तो कांहीं तरी निमित्त काढून वरचेवर उठावणी करी. आठव्या खेपेस तो उर्मटपणानें अशीच कांहीं सबब सांगूं लागला. तेव्हां प्रवरसेनानें रागानें, ' या मूर्खपशूला बांधून मारून टाका,' अशी आज्ञा केली. त्याबरोबर त्यानें प्राण वांचविण्या-साठीं, दीन होऊन, केविलवाणेंपणानें म्हटलें, ' हे धीरवीर महाराज, मी पशू म्हणून अवध्य आहे, नंतर तो त्या दरबारांत मोराप्रमाणें नाचूं बागडूं लागला. हें पाहून प्रवरसे-नाला त्याची दया आली, आणि त्यानें त्याला अभय व त्याबरोबरच नटाला योग्य, असें नृत्यगायनाचें सामानहि इनाम दिलें. ( मुम्मुनी कोण होता, याचा पत्ता लागत नाहीं. ते कोणा व्यक्तीचें नांव होतें किंवा शाही या नांवाप्रमाणें कोणा राजकुलाचें नांव होतें, हेंहि पक्कें सांगतां येत नाही पुढें त्याचा दोनचार वेळ उल्लेख आला आहे त्यांवरून, ते राजकु-लाचें नांव असण्याचा जास्त संभव दिसतो. )

याप्रमाणें दिग्विजय करून तो काश्मीरांत परत आला. तो आपल्या आजाच्या नगरांत रहात असतांना, त्याच्या मनांत आपल्या नांवाने नवें नगर स्थापन करण्याचा विचार आला. ( आजाचें-पहिल्या प्रवरसेनाचें-नगर. हें बहुधां पुराणाधिष्ठान असावें. ) त्याच्या-साठीं शुद्ध स्थळ व शुभ मुहूर्त, धुंडीत, तो सूर्यवर्चस्वी राजा, एका रात्री वीरचर्या करीत निघाला. त्या वेळीं त्याच्या किरीटांतील रत्नांमध्यें पडलेलीं नक्षत्रांचीं प्रतिबिंबें, रक्षासर्षपा प्रमाणें शोभत होतीं. (३४०) ( दृष्ट लागूं नये, किंवा पिशाचबाधा होऊं नये, म्हणून, सर्षपांचा-पांढऱ्या मोहऱ्याचा-उपयोग, काश्मीरांत हल्लीं सुद्धां करतात. त्या लहान मुलांच्या टोप्यामध्यें शिवून टाकलेल्या असतात ) तो एका नदीच्या तीरावर पोंचला. तेथील स्मशानांत अनेक चिता जळत होत्या. त्यांच्या उजेडानें तीरावरील वृक्ष विक्राळ

दिसत होते. पलीकडच्या कांठावर, त्या प्रबल राजाला, एक ऊर्ध्वबाहु व भयंकरसें पिशाच्च दिसलें. त्याच्या नेत्रांतून लालभडक ज्वाळा निघत होत्या. त्यांच्या उजेडानें त्याचें शरीर, उल्काग्नीनें आरक्त झालेल्या कुलपर्वतासारखें दिसत होतें. त्याचा प्रकाश राजाच्या अंगावरहि पडला होता. त्या पिशाच्चानें, दशदिशांत प्रतिध्वनि घुमून जाणाऱ्या भीषण आवाजानें व विकट हास्य करीत, त्या निडर राजाला म्हटलें, 'हे पृथ्वीपालका, खरें धैर्य, सत्व व शील, यांनीं युक्त शूद्रक व विक्रमादित्य आणि तूं स्वतः, त्यांच्याशिवाय निरसीम धैर्य, दुसऱ्या कोणाच्या अंगी दृष्टी पडणें कठिण. तूं हा बांध-सेतु-ओलांडून अलीकडे ये. म्हणजे तुझें मनोगत पूर्ण होईल. असें म्हणून त्यानें आपला पाय नदीच्या पात्रावर आडवा टाकला. त्या योगानें नदीचें पाणी दुभागून, एक सेतू किंवा बांध तयार झाला. त्या धीर प्रवरसेनानें तो राक्षसाच्या एका अवयवाचा संबंध सेतु बनलेला पाहून, म्यानांतून खंजीर काढला व त्या राक्षसाच्या मांडीवर घाव मारून, त्या सेतूवर त्याच्या मांसाच्या जणों पायऱ्या केल्या, व त्यांच्यावरून तो पलीकडे गेला. त्या स्थळाला क्षुरिकाबाल म्हणतात. तो जवळ जाऊन उभा राहिल्यावर त्या पिशाचाने त्याला शुभलग्न सांगून म्हटलें, 'मी लावून दिलेल्या सूत्र पाताप्रमाणें आपलें नवें नगर बसीव'. नंतर तें पिशाच्च गुप्त झालें.

पुढे पहाटे त्या राजाला तो सूत्रपात, शारीटक गांवाजवळ झालेला दिसून आला. तेथें शारिकादेवी आणि अट्ट नांवाचा यक्ष, यांचें निवासस्थान होतें. तेथेंच राजानें मोठ्या भक्तिपूर्वक प्रवरेश्वर लिंगाची स्थापना करण्याचा उपक्रम केला. तेव्हां त्याच्यासाठीं बनविलेल्या यंत्राचा भेद करून त्या पीठावर जयस्वामी विष्णु स्वतः अधिष्ठित झालेला दिसला. जय नांवाच्या कारागिराच्या नांवावरून त्या विष्णूच्या मूर्तीला जयस्वामी असें नांव दिलेलें होतें. जयाला पिशाच्चानें सांगितलेलें शुभलग्न माहित झालेलें होतें. त्या नगराला उलटें पडूं नये म्हणून, राजाच्या उत्कट भक्तीनें प्रसन्न होऊन, भीमस्वामि विनायक, आपणाला ही नव्या नगराची स्थापना अमान्य नाहीं, हें दाखविण्यासाठीं पश्चिमाभिमुख असलेला, स्वतः होऊन पूर्वाभिमुख झाला. ( प्रवरसेनपुरः—श्रीनगर-याच्या स्थापने-संबंधाची ही दंतकथा लक्षांत येण्याला हल्लीच्या या शहराची परिस्थिति माहित असणें अवश्य आहे. तिच्यावरून पाहातां प्रवरसेनपुर हल्लींच्या श्रीनगराच्या जागींच बसविलें गेलें होतें असें स्पष्ट दिसतें.

प्रवरेश्वर-जयस्वामि, भीमस्वामि विनायक—प्रवरेश्वराचें मंदीर, श्रीनगराच्या मध्यभागीं, हरपर्वताच्या दक्षिणेकडील पायथा, आणि जामे मशीद किंवा बाहाउद्दीन साहेबाची जियारत, यांच्यामध्यें होतें. त्या जियारती भोंवतालच्या कबरस्थानांत एक मोठाल्या दगडांनीं बांधलेला खूप मोठा व लांबरुंद दरवाजा उभा आहे. तो प्रवरेश्वराच्या मंदिराचें महाद्वार असावें. तेथून प्रवरसेन राजानें स्वर्गारोहण केलें, अशी ब्राह्मण मंडळींत दंतकथा आहे. जयस्वामींचें नक्की ठिकाण उपलब्ध झालेलें नाहीं. पण त्याचा पुनः एकदां पुढें तो. ५ श्लो. ४४ मध्यें उल्लेख आलेला आहे.

भीमस्वामि विनायक—हरपर्वत किंवा शारिका पर्वताच्या दक्षिण टोंकाच्या पायथ्याशीं असलेल्या एका खडकांत अद्यापि पूजला जात आहे. जवळच अकबराच्या किल्ल्याचा 'बाछ' दरवाजा आहे. त्या खडकावर शेंदराचीं जाड पुटें असल्यानें त्याच्यासंबंधीं अधिक माहिती मिळवितां येत नाहीं. त्या नगरांत, त्या इंद्राप्रमाणें थोर राजानें सद्भवश्री वगैरे श्री असलेलीं नावें असलेल्या पांच देवनांचीं हीं मंदिरें त्यानें बांधली. तसेंच त्याने वितस्तेवर बृहत्सेतु नांवाचा पूल—बांध-बांधविला. तो नावांचा होता. तेव्हांपासून ही नावांचा पूल बांधण्याची तजवीज अमलांत आली. बृहत्सेतुः—याचा उल्लेख पुढें त. ८ श्लो. ११७१ मध्यें आलेला आहे. पण तो अमुकच ठिकाणीं होता असे पक्कें ठरवितां येत नांहीं. श्रीनगरांत वितस्ता नदीवर सात प्रेक्षणीय व कायमचे सेतू आलेले मुसलमानी अमलांतले आहेत.)

त्या राजाचा मामा जयेंद्र यानें बृहत् बुद्धाची मूर्ति स्थापन केली, व जयेंद्र नांवाचा विहार बांधविला.( पुढें ललितादित्यानें स्थापन केलेल्या बुद्धाच्या ताब्याच्या प्रचंड मूर्तीप्रमाणेंच ही जयेंद्राची बृहत्बुद्धाची मूर्ति असावी. ललितादित्याच्या मूर्तीचा उल्लेख त. ४ श्लोक २०३ मध्यें आलेला आहे. जयेंद्रविहारः—याच्यांत इ. स. ६३१ ते ६३३ दोन वर्षे ट्हेनत्संग हा तेथील मुख्य भिक्षूजवळ बुद्धधर्माचें शिक्षण घेत राहिला होता. असे त्यानें आपल्या चरित्रात ( पान ६९ वर) लिहिलें आहे. हा विहार श्रीनगरांत होता. तो विहार व बृहत्बुद्धाची मूर्ति क्षेमगुप्तराजानें जाळून टाकून, त्याच्या धातूचा क्षेमगुप्तेश्वराचें मंदीर बांधण्याकडे उपयोग केला, असें पुढें त. ६ श्लो. १७१ वरून कळतें.)

त्याचा मंत्री मोराक याच्याकडे सिंहल वगैरे द्वीपें होतीं. त्यानें मोराक-भवन नांवाचा एक अद्भुत महाल बांधविला.

त्या नगराच्या हद्दीवर विश्वकर्मा व वर्धमानेश्वर यांचीं मंदिरें होतीं. त्या नगरांत, एकेकाळी ३६लक्ष घरे होतीं, अशी दंतकथा आहे. असें तें नगर वितस्ता नदीच्या दक्षिण तीरावर वसलेले असून, त्याच्यांत अनेक व व्यवस्थित बांधविलेले, शोभिवंत बाजार त्याच बाजूस होते. तसेंच त्याच्यांत पुष्कळसे भव्य, प्रचंड व गगनचुंबी महाल होते. त्यांच्या गच्च्यांवरून ग्रीष्म अखेर वृष्टीमुळें रमणीय आणि चैत्र मासात सुंदर फुललेल्या कुसुमांनी व्याप्त, अशी सारखी मैदानें पसरलेली दिसत असत. त्याच्या तोडीचें दुसरें शहर या भूतलावर दुर्लभ होतें. तेथील बाजार व क्रीडोद्याने, यांच्यांतील रस्त्यांच्या दोन्हीं बाजूस स्वच्छ जलाचे रमणीय पाट वहात होते. तसें दुसऱ्या कोणच्या शहरांत पहाण्यास सांपडणार? (३६०) त्या शहराच्या मध्यभागीं एक हर किंवा शारिका नांवाचा पर्वत होता. त्याच्यावरून शहरांतलि सर्व घराची विहंगम दृष्टया शोभा पाहतां येत असें. तेथें ग्रीष्म ऋतूंत बर्फाच्या ढेपशानीं युक्त व थंडगार झालेलें वितस्तेचें पाणी, लोकांना सहज मिळत असें. असें तें शहर सर्व तऱ्हेनें प्रेक्षणीय व रमणीय होतें.

काश्मीर मंडलांत राजेलोकांनीं मंदिरांना इतकी उमाप संपत्ति अर्पण केलेली होती कीं त्या संपत्तीच्या द्वारें ही समुद्रवलयांकित पृथ्वी, हजारदां विकत घेतां आली असती.

अशा त्या नगरांत प्रतिविधात्याप्रमाणें त्या राजानें साठ वर्षे साम्राज्यलक्ष्मीचा उपभोग घेतला. श्रीशंकराच्या त्रिशूळाचें चिन्ह असलेल्या त्याच्या भव्य कपाळावर वार्धक्यामुळें पांढरे शुभ्र झालेल्या त्याच्या मस्तकावरील केंस पसरलेले पाहून, त्याला श्रीशंकरच समजून गंगाप्रवाहानेच जणों त्याचा आश्रय केला आहे, कीं काय असें वाटे.

या सुमारास अश्वपादानें, श्रीशिवाच्या आज्ञेने त्याच्या सेवेंत जयंत नांवाचा एक काश्मिरी ब्राह्मण नुकतांच आलेला होता त्याला म्हटलें, 'अरे तूं आतां थकला भागला आहेस इतर कोठेंहि तुझी मनोरथसिद्धि व्हावयाची नाही, तर तूं हें पत्र नेऊन काश्मीरचा राजा प्रवरसेन याला दे'. तें घेऊन जयंत म्हणाला, 'मी दमलेला आहे. मला आतांच इतक्या दूर जाणें जमणार नाही'. त्याला अश्वपादानें म्हटलें, 'ठीक आहे. पण मी कापालिक माझ्या स्पर्शानें तुला विटाळ झाला आहे. तेव्हां या जवळच्या तीर्थकुंडांत स्नान कर'. त्याप्रमाणें जयंत पाण्यांत बुडी मारून डोळे उघडून पाहतो तों, आपल्या जन्मभूमींत काश्मिरांत पोचलेला होता. त्यावेळीं राजा प्रवरसेन स्नान करीत असून, त्याच्यासाठीं अनेक सेवक पाणी नेत होते. आपण आल्याची वर्दी लागावी म्हणून, त्यानें निश्शंकपणें तो लेख, हळूंच राजाकडे गंगोदक नेलें जात असलेल्या एका कलशांत टाकला. तो राजा प्रवरेश्वरावर अभिषेक करीत असतांना, खालीं पडला. तो घेऊन राजानें वाचला. त्यानें शोध करवून जयंताला पुढे आणविलें. त्या लेखात लिहिलें होते कीं, 'हे राजा, तू आतां कृतकार्य झाला आहेस. तू अनेक व विपुल दानें दिलींस. सर्व भोग भोगलेस. तुझें वयहि झाले आहे. आतां तुला कोणतें कार्य करावयाचे उरले आहे? त्वां आतां शिवलोकाला जावेस'. हा निरोप वाचून प्रवरसेनानें जयंताला मनसोक्त इनाम दिले. नंतर तो त्या पाषाणमय राजवाडयाचा भेद करून, निर्मल गगन मार्गानें निघाला. असा तो संदेह कैलास मार्गानें चाललेला, त्या वेळीं त्या स्वच्छ आकाश मंडलांत, तो लोकांना प्रति सूर्यच असा दैदीप्यमान दिसला. ( राजा प्रवरसेन प्रवरेश्वराच्या मंदिरांतून सदेह कैलासाला गेल्याविषयींची ही दंतकथा महाकवि बिल्हण याला माहित होती. यासंबंधीं त्यानें विक्रमांकदेव चरितान्या १८ व्या सर्गाच्या २८ व्या श्लोकांत वर्णन केलेलें आहे. )

अशी अद्भुत रीतीनें मिळालेली ती संपत्ति जयंत ब्राह्मणानें अपल्या नांवानें अग्रहार व इतर अनेक दानें देऊन, पावन केली.

याप्रमाणें, श्रेष्ठगणानें, भुवनैश्वर्य भोगून, तो प्रवरसेन राजा सदेह श्रीसदाशिवाच्या सभेंत पूर्ववत् सादर झाला. त्यानें ज्या सिद्धिक्षेत्र अशा प्रवरेश्वराच्या मंदिरांतून कैलास-लोकाला प्रयाण केलें, तेथे स्वर्गद्वारालाहि मागें सारणारें असे महाद्वार, अद्यापिहि कायम आहे.

**राजा युधिष्ठिर**—प्रवरसेन राजा व त्याची धाकटी राणी रत्नप्रभा, यांचा पुत्र युधिष्ठिर-दुसरा, यानें प्रवरसेनानंतर एकूणचाळीस वर्षे, नऊ महिने, राज्य केलें. त्याचे, सर्वरत्न, जय व स्कंदगुप्त नांवाचे मंत्री होते. त्यांनीं अनेक विहार व चैत्य बांधविले आणि त्या योगानें पुष्कळ यश संपादन केलें. (३८०)

जयेंद्राचा पुत्र वज्रेंद्र नांवाचाहि त्याचा एक मंत्री होता. त्यानें भवच्छेद नांवाचा एक गांव वसविला. तो अनेक चैत्यादिकांनीं स्तुत्य व प्रसिद्ध झालेला होता. (स्कंदगुप्तानें बांधलेला विहार व त. ६ श्लो. १३७ यांत उल्लेख झालेला स्कंदभवन विहार एकच. तो हल्लींच्या श्रीनगरांतील स्कंदभवनाच्या जागीच असावा. औकआंग यानें काश्मीरांतील जेजे नांवाच्या मठाचा उल्लेख केला आहे. तोच जयानें बांधविलेला विहार असावा, असे वाटतें. भवच्छेद हल्लींचे वूलर परगण्यांतील बूत्स नांवाचें गांव. तें मीरसंग्रामापासून अर्ध कोसावर आहे. ) त्या राजाचे कुमारसेनादिक दुसरेहि मंत्री होते. त्यांनीं आपल्या कीर्तीचे चंदन तिळक, दशदिशारूपी युवतींच्या कपाळावर लावले होते.:—

त्याच्या मागून राजा नरेंद्रादित्य किंवा लख्खन हा युधिष्ठिर राजा व पद्मावती राणी विमलप्रभा, यांचा पुत्र, नरेंद्रादित्य गादीवर बसला. त्यानें नरेंद्र स्वामींची स्थापना केली. मंत्री वज्रेंद्र याचे पुत्र वज्र व कनक हे त्याचे मंत्री व पुण्यकर्मे होते. त्या राजानें तेरा वर्षे राज्य केलें. त्यानें दस्तायवज नोंदण्यासंबंधाचें नवीन कर्मस्थान कायम केलें होतें. ( या राजाचें एक रुप्याचें नाणे सांपडलें आहे. त्याच्यावर (रा) ज लख्खन, उदयादित्य, अशीं अक्षरें आहेत. तें नाणें काश्मीरच्या राजाचें असावें असा, जनरल कनिंगह्याम यांनीं, या नांवाचा उल्लेख राज-तरंगिणीत आहे, व हें ठाऊक नसतांनाहि, कयास केला होता. कारण तें नाणें पुष्कळसें देव-शाही खिंगिल किंवा पहिला नरेंद्रादित्य खिंखिल याच्या उपलब्ध नाण्यासारखें होतें. )त्याच्या मागून त्याचा धाकटा भाऊः—

**राजा रणादित्य**—हा राज्याधिकारी झाला. त्यालाच पुढें तुंजीन असें नांव पडलें. त्याचें डोकें इतर लोकांच्या मस्तकांहून भिन्न, व चमत्कारिक, शंखासारखे असून सूर्यबिंबांत मिळून गेलेल्या चंद्रबिंबासारखें शोभत असे. शत्रूच्या कंठरूपी वनावर त्याचा सेतधार खड्ग पडत असे. त्यामुळें शत्रूच्या स्त्रियांच्या नेत्ररूपी कुंडांतून अश्रुजलाचा ओघ जास्त जोराने वाहूं लागे. त्याचा अदृष्टपूर्व प्रतापाग्नि, शत्रूच्या राज्यांत शिरतांच, शत्रूच्या स्त्रियांच्या नेत्रांतील अश्रुप्रवाहाला ऊत व पूर येऊन, त्यांच्या राजमंदिरावर तृणांकुर पैदा होत असत. त्यानें हातीं खड्ग घेतल्यावर, शत्रूच्या सैन्यांत कबंधांशिवाय दुसऱ्या कोणाचेंच (३९०) नृत्य चालत नसे. त्याची राणी रणारंभा ही, अखंड महात्म्ययुक्त, श्रीविष्णूची शक्ति श्रीलक्ष्मीच, या भूतलावर अवतरलेली होती.

पूर्वजन्मीं तो राजा एक पक्का द्यूतकार होता. त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं त्याचे सर्वस्व हरण केलें म्हणून, तो जीवावर उदार होऊन बसला होता. तरी खरा कितव मरतांना सुद्धां क्वचितच स्वार्थ साधनांचा विचार सोडीत असतो. त्या अन्वयें, त्यानें प्राणत्यागापासूनहि, कांहीं तरी लाभ करून घेण्याचा बेत केला आणि प्राण त्यागापूर्वी एकवार विंध्यवासिनी भ्रमरवाहिनी, राकामुखी, अमोघ दर्शनी, देवीचें दर्शन घेऊन, एकादी वरप्राप्ति, करून घ्यावी, मग त्यांत प्राण गेला तरी बेहत्तर, असें ठरविलें. तो देवीच्या मंदिराच्या

मार्गाला लागला. तो मार्ग पांच योजनेंपर्यंत, विषारी गांधण्या वगैरेंच्या दुस्सह व दुर्निवार्य त्रासामुळें दुर्गम होता. तरी त्याच्या प्रतिकाराचा उपाय करून पाहणें अशक्य नाहीं, त्यांत बहुधां त्या गांधण्यांच्या वज्रतुल्य डंखानें आपल्या शरीराचा नाश होणार. कांहीं होवो. तेथें कसें तरी करून, पोचावयाचेंच. असा विचार करून, त्यानें प्रथम आपल्या अंगावर धातुमय कवच घातलें. त्याच्यावर रेडयाचें चामडें मढविलें आणि त्याच्याहि वरून, शेणामातीचें लेप केले. ते वाळल्यावर, तो मातीच्या ठोकळ्यासारखा बनला, आणि दृढ निश्चय करून तो देवीच्या मंदिराकडे निघाला. ( ४०० )

आपल्या प्राणाची पर्वा आणि सरळ मार्ग, यांचा त्यानें बरोबरच त्याग केला व तो एका भयंकर व निबिड अंधःकार असलेल्या गुहेंत शिरला. त्या गुहेत तो शिरतांच अगणित विषारी भ्रमर व गांधण्या, आपल्या पंखांनीं काळाच्या भेरीसारखा भयंकर शब्द करीत उठल्या.

त्यांनीं एकदम प्रथम त्या शेणामातीच्या लेपावर जोरानें हल्ला केला. त्या मातीचे असंख्य बारीक कण, त्यांच्या डोळ्यांत गेल्यामुळें, त्यांना, त्याला फारसे व्रणित करतां आलें नाहीं. डोळ्यांना त्रास झालेल्या गांधण्या मागें हटत व त्यांच्या जागीं दुसऱ्या गांधण्या येऊन हल्ला करीत. त्यानें सुमारें तीन योजनें मार्ग क्रमला, तोंवर, तो शेणामातीचा लेप त्या गांधण्यांनीं नाहींसा करून टाकला. नंतर त्यांनीं त्या रेडयाच्या चामडयावर हल्ला चालविला. त्यांच्या डंखाचा भयंकर चटचटा शब्द होत होता. साडेतीन योजनें गांठीतों त्या गांधण्या धातूच्या कवचापर्यंत पोंचल्याचें, त्यांच्या शब्दावरून त्याला कळून आलें. तसा तो खूप वेगानें धावूं लागला. कांहीं वेळानें गांधण्यांनीं, चावून टाकल्यामुळें, तें कवच गळालें तरी त्याचा दृढनिश्चय व धैर्य गळालें नाहीं. देवीचें मंदिर गव्यूतीभर राहिलें होतें. तेथून त्या दुष्ट कीटकांना हातांनीं एकीकडे सारीत, तो एकदांचा त्या मंदिरांत पोंचला. तोंवर त्याचे स्नायू व अस्थि मात्र उरलें होतें. चर्म आणि मांस गांधण्यांनीं चाव चावून नाहींसें केलें होतें. त्यानें आपले नेत्र हातांनीं झांकून बचावले होते. ( ४१० )

तो मंदिरांत पोचतांच भ्रमरबाधा बंद झाली. त्यानें डोळे उघडून पाहिलें तों त्याला थोडासा प्रकाश दिसला आणि तो धडपडत, एकदांचा, देवीच्या पायांवर जाऊन पडला. त्यावेळीं त्याचें प्राण कंठगत व कासावीस झाले होते. देवीनें त्याच्या शरीरावरून हात फिरविला व त्याला दिव्य देह दिला. त्याच्या थोडयाशा उरलेल्या प्राणाला, त्या अमृतवर्षी करस्पर्शानें नवी चेतना आली आणि तो चोहींकडे हुषारीनें पाहूं लागला. त्याचा देह पूर्वीपेक्षां सुंदर व निरोगी झालेला होता. सिंहासनाजवळ पोंचतांना त्याला देवी आक्राळविक्राळ दिसली होती ती अदृश्य होऊन, थोडया वेळानें, ती त्याला जवळच एका पुष्करिणीच्या कांठावरील लता कुंजांत, विलासी, सुस्वरूप, कमलनेत्री, श्यामवर्णी, दिव्य तरुणीच्या रूपांत दिसली. ती हातांतील मुक्ताहाराच्या मोत्यांचा जणों अर्घ्य देत होती. तिच्या शरीरलतिकेचें, यौवनानें, सौंदर्यरूपी पुष्प गुच्छांनीं, पूजन

चालविलेलें होतें. तिच्या भरदार स्तनप्रदेशीं जणों त्या यौवनानें जोडलेले हात धरले होते. तिचीं कोमल चरणयुगलें, लाक्षारसानें रंजित झालेली होती. त्यांच्या द्वारें ती जणों कष्टानेच गमन करींत होती. स्तनद्वयामुळें दिसण्याला कठिण, अशा तिच्या मुख-कमलाला पाहण्याला, त्याची दृष्टी सर्वथैव उत्सुक झालेली जणों सारखी तपच करीत आहे, असें वाटे. तिचे अधर उज्ज्वल बिंबफलाप्रमाणें रक्तवर्ण होतें. केशपाश सुंदर व काळाभोर होता. तिचें मुख पूर्ण चंद्रबिंबासारखें आणि कटिप्रदेश सिंहकटीला लाजविणारा होता. अशी ती तिची मूर्ति आपल्या शिवस्वरूपानें जणों, सर्व देवतामय, प्रत्यक्ष प्रगट झाली आहे, असें वाटत होतें. असें तें सर्वावयवशोभि व यौवनामुळे प्रफुल्लित आणि कमनीय रूप, सन्निध असलेले पाहून, त्याचें मन मोहित झालें. तो कामविवश झाला. तिचें तें अवर्णनीय सौंदर्य पाहून, ती कोणी अप्सरा आहे, देवी नव्हे, असा त्याचा ग्रह झाला.

तिनें कृपाळूपणानें व अत्यंत मधुर वाणीनें त्याला म्हटलें, 'तुला या मार्गांत बराच वेळ दारुण दुःख भोगावें लागलें आहे. आतां स्वस्थ होऊन, इच्छित वर माग.' तो म्हणाला, 'तुझ्या दिव्य दर्शनांनीच माझे सारे श्रम परिहार झाले आहेत. पण तूं देवी नसलीस तर मला वर कशी देणार?' देवीनें उत्तर दिलें,'भल्या माणसा, मी देवी असो का नसो. हा तुला काय भ्रम झाला आहे? मी तुला वर देण्याला समर्थ आहे!' असें आश्वासन मिळाल्यावर, त्यानें सर्व मर्यादा सोडून, तिच्या संभोगाचा वर मागितला. ते ऐकून देवी म्हणाली, 'हे कुटिल माणसा, ही काय तुझी भलतीच मागणी, दुसरा काही वर माग. मीच प्रत्यक्ष भ्रमरवासिनी देवी.' याविषयीं खात्री असूनहि त्यानें तिकडे लक्ष दिले नाहीं. जन्मांतरांचे संस्कार व वासना कोणाला आवरता येतात! त्यानें त्या देवीला म्हटलें, 'तूं आपल्या वचनावर कायम राहणारी देवी असशील तर, माझा इच्छित वर मला देशील. मला दुसरें कांहीं नको. तूं भयंकर देवी किंवा सामान्य सुस्वरूप स्त्री असलीस तरी, तुला मी प्रथम पाहिली तशीच तूं मला दर्शन दे.' प्राण्याला पूर्वजन्मीं लागलेला अधिवास किंवा सम्मोह, अंगावरील तिळा-प्रमाणें कायम रहातो.

हें त्याचें भाषण ऐकून व त्याचा दृढ निश्चय पाहून, देवीनें त्याचें म्हणणें मान्य करीत म्हटलें,'ही गोष्ट अन्य जन्मीं घडेल. (४३०) दिव्य देवता मानव देहांना स्पर्श करीत नसतात, तूं मोठाच दृढनिश्चयी आहेस. आतां जा. नंतर देवी गुप्त झाली. अन्य जन्मी देवीचा संभोग मिळेल, या आशेने तो तेथून निघून प्रयागास गेला व तेथें अक्षय वटावरून त्यानें देहविसर्जन केलें.

पुढें तोच, राजा रणादित्य रूपानें जन्मास आला आणि देवी रणारंभा नामक राज-कन्या झाली. तिला पूर्वजन्माचें स्मरण होतें.

चोल देशाचा राजा रतिसेन हा एकदां सागरपूजनाला गेला असतांना, त्याला समुद्राच्या तरंगांतून एक रत्नमालेप्रमाणे दैदीप्यमान, कन्या प्राप्त झाली. बाल्यापासूनच

तिचें भाषण व वर्तन दिव्य असे. पुढें तिच्या योगानें यौवनाला शोभा आली. तिला कोणी तरी दिव्य वरच योग्य, हें जाणून, चोलाधिशानें पृथ्वीवरील अनेक मोठमोठ्या राजांच्या मागण्या मंजूर केल्या नाहींत .( चोल देश=हल्लींचा तंजावर प्रांत. ) रणादित्या-कडून मंत्र्यामार्फत आलेली मागणीहि तो फेंटाळून लावणार होता. इतक्यांत राजकन्येनें स्वतःच, ती मागणी, सर्वोत्तम आहे, असें सांगून त्याचें कारणहि तिनें पित्याला सविस्तर कळविलें. तेव्हां त्यानें तिला ताबडतोब, आपला मित्र कुलूत देशाचा राजा, याच्याकडे पाठविलें. ( कुलूत=हल्लींचा बियास नदीच्या खोऱ्याच्या वरील भागांतलि कुलू नांवाचा प्रदेश. ) तो देश कांहीं काश्मीरापासून फारसा दूर नव्हता. तेथें पोंचून रणादित्यानें तिच्याशी लग्न केलें आणि तिला अंतःपुरांत प्रमुखत्व दिले.

ती देवी मर्त्यरूपानें अवतरलेली, मनुष्य संपर्काला फार भीत असे. ती रणादित्याची पट्टराणी असूनहि, त्याला मायेनें मोहित करून, त्याचा स्पर्श न होऊं देतां, रात्री आपल्याच सारखी दुसरी स्त्री मायेने पैदा करून, राजाजवळ पलंगावर निजवी व स्वतः भ्रमरी रूपानें बाहेर राहात असे. (४४०)

त्या राजानें आपल्या व राणीच्या नांवानें, एका उत्तम कारागिराच्या हातून दोन सुरेख मंदिरें बांधविली. त्यांच्यांत स्थापन करविण्यासाठीं दोन चांगलीशी शिवलिंगेहि तयार करविलीं गेली होतीं. त्यांची प्रतिष्ठा करविण्याची सर्व तयारी झाली होती.(४४०) त्याच्या पर्वरात्रीं, एका परस्थ ज्योतिष्यानें, त्या दोन्ही लिंगांना फार नावें ठेविलीं व त्यांच्यांत जोड, आणि बेडूक आहे. असें खात्रीनें प्रतिपादन केलें. त्याचें म्हणणें खरें असल्याचेंहि निदर्शनास आलें. देवप्रतिष्ठेला आलेलें हें विघ्न पाहून, राजाचा गोंधळ उडाला. तेव्हां त्या दिव्यदृष्टी राणीनें म्हटलें, 'पूर्वी पार्वतीच्या विवाहप्रसंगीं ब्रह्मदेव पुरोहित असतांना, त्यांनीं आपल्या पूजासामुग्रींतून एक विष्णुमूर्ति काढली. ती शक्तिविरहित असल्यानें पूजनार्ह नाही, असें शंकरांनी ठरविलें आणि विवाहमहोत्सवासाठीं जमलेल्या देवासुरांनीं, अहेरासाठीं आणलेलीं अनर्घ्य रत्नें जमा करून, त्यांचे एक जगद्वंद्य लिंग तयार केलें व त्याची पूजा केली. पुढे ते शिवांनीं पूजलेलें लिंग व ती विष्णूची मूर्ति, कालेंकरून, रावणाला प्राप्त झाली. त्यानें त्यांची दीर्घकाल पूजाअर्चा केली. त्याच्या पश्चात वानरांनी लंकेंतून त्यांचें हरण केले. वानर जात्या पशूच. त्यांनी हिमालयावर उत्तर मानसांत रहात असतांना त्यांची कांहीं कदर न करतां तीं (४५०) उत्तर मानस सरोवरांत फेंकून दिलीं. ( उत्तर मानस=हरमुख शिखराच्या पूर्वेकडील बर्फमय प्रदेशाखाली, पूर्वभागीं, असलेलें गंगा सरोवर किंवा गंगबल. त्या सरोवराचें हेच नांव, हरमुकुटमहात्म्य, हरचरित, आणि नील मत पुराण, यांच्यांत दिलेलें आहे. )

त्या सरोवरांतून तीं उत्ताम शिल्प्याकडून काढून आणविलेलीं, उद्यां प्रातःकाळीं येथें आपणांला मिळतील. त्यांचीच आपण प्रतिष्ठा करावी.'

असें बोलून राणी अंतःपुरांत गेली व तिने अंतरिक्ष संचारी दूतांचें स्मरण केलें. त्याबरोबर प्रकट होऊन त्यांनीं तिच्या आज्ञेनें उत्तर मानसाला जाऊन, तेथून त्या हरि

हराचें लिंग व विष्णुमूर्ति काढून, राजवाड्यांत आणून ठेवल्या. दुसऱ्या दिवशीं त्यांच्यावर दिव्य सुमनवृष्टि झालेली पाहून, लोकांना आश्चर्य वाटलें. तो राजा परममाहेश्वर असल्यानें त्यानें शुभलग्न व मुहूर्त येतांच प्रथम रणेश्वर शिवलिंगाची प्रतिष्ठा करण्याची तजवीज चालविली. तितक्यांत राणी रणारंभा इच्या प्रभावानें प्राप्त झालेली रणस्वामीची मूर्ति, अद्भुत रीतीनें त्या तयार केलेल्या यंत्राचा भेद करून, स्वतःच त्या पीठावर आरूढ झाली. ( रणेश्वर व रणस्वामी यांचीं मंदिरें श्रीनगरांत जवळ जवळच असावींत. रणेशाच्या मंदिराचा पुनः पुढें कोठें उल्लेख आलेला नाहीं. पण रणस्वामींचें मंदिर पुढें बरेंच प्रसिद्धि पावलें होतें, असें दिसतें. मंखाच्या श्रीकंठ चरितांत त्याचा उल्लेख आहे आणि जोन राजानें आपल्या टीकेंत त्याला श्रीप्रवरपुर प्रधानदेवता, म्हटलें आहे.)

त्यांचा प्रभाव व्यक्त होण्यासाठीं राणीनें पुष्कळशी संपत्ति त्या मंदिरांना अर्पण केली. तिच्यांतून त्या रणस्वामी विष्णूच्या भक्तांना पुष्कळसे गांव अग्रहार देवविले गेले. यासंबंधाची आणखीहि एक दंतकथा प्रचलित आहे. ब्रह्मा नांवाचा एक सिद्ध, पाणक्याच्या रुपाने रहात असे. त्याची खरी योग्यता ओळखून, राणीनें त्याच्या हातून त्या दोन्ही देवतांची प्रतिष्ठा करविली. रणेश्वर लिंगाची स्थापना करतांच आपला सिद्धपणा उघडकीस आला असें पाहून, तो आकाशमार्गानें निघून गेला आणि पुढें त्यानें गुप्त रुपानें येऊन रणस्वामींची प्रतिष्ठा केली. पण रणस्वामींच्या पीठावर तो स्वतःच अवतार घेऊन बसलेला, लोकांच्या पहाण्यांत आला. असेहि कोणीं वर्णन केलेले आहे. (४६०)

त्या राणीनें ब्रह्माप्रमाणें शुद्ध, श्रेष्ठ, आणि ब्रह्मविद, अशा त्या अप्रतिम सिद्धासाठीं एक ब्रह्ममंडप नांवाचा भव्य मंडप बांधविला. तसेच या राजदंपत्यानें, रणरंभा स्वामी व रणारंभादेव यांचीहि दोन मंदिरें बांधवून प्रद्युम्न शिखरावर पाशुपत यतींसाठीं एक मठ स्थापन केला.

( प्रद्युम्न मूर्धान शिखर म्हणजे श्रीनगरांतील हर किंवा शारिका पर्वत. त्याच्या पूर्वेकडील उतारावर, पूर्वीचे मठ व मंदिरें, यांच्या जागी, हल्लीं अनेक मुसलमानी इमारती आहेत. ) रोग्यांना औषधपाणी मिळण्यासाठीं आणि सेनामुखी नांवाच्या राणीला होऊं घातलेल्या रोगावर उपचार कराविला जाणार, यासाठी, त्या राजानें एक उत्तम आरोग्यशाळा स्थापन केली होती. तसेंच सिंव्हरोत्सिका गांवांत रणपुरस्वामीं नांवानें प्रसिद्ध असलेलें एक मार्तंडाचें मंदिर बांधविलें. ( रणपुरस्वामी मार्तंड हें मार्तंडाचें मंदीर आणि ललितादित्यानें बांधविलेलें प्रचंड व सुरेख मार्तंडाचें मंदिर, हीं दोन्ही निरनिराळीं होतीं. सिंहरोत्सिका गांवाचा पत्ता लागलेला नाहीं. )

त्याचीं दुसरी एक राणी अमृतप्रभा इनें रणेश्वराच्या उजव्या बाजूस, अमृतेश्वराची स्थापना करविली आणि पूर्वी मेघवाहन राजाच्या भिन्ना नांवाच्या राणीनें बांधविलेल्या विहारांत एक सुरेखशी बुद्धाची मूर्ति स्थापन केली. रणारंभा राणीवर,

राजा फार अनुरक्त होता. त्याला झालेला आपला लाभ व्यर्थ होऊं नये म्हणून, तिनें त्याला पातालस्थ देवतांवरहि अधिकार चालवितां येण्यासाठीं, ' हाटकेश्वर ' नांवाचा मंत्र दिला. त्याच्या योगानें, त्याला फार वर्षें इष्ट साधन करून घेतां येत होतें.

त्यानें इष्टिकापथ येथें प्रखर व कडकडीत तपाचरण केलें. नंतर तो नंदिशिळेजवळ गेला. तेथें त्याला अनेक वर्षे त्या सिद्धि मंत्राचा उपयोग झाला. ( इष्टिकापथ व नंदिशिला एका टीकाकारानें हें व हल्लींचें लार परगण्यांतील रामसदन नांवाचें खेडें एकच, असें लिहिलें आहे. तेथूनच हरमुकुटाच्या यात्रेची चढण सुरू होतें. नंदिशिला=हल्लींच्या हमल परगण्यांतील नंदिहेल नांवाचें खेडें, असें म्हणतां येईल, पण तेथे कांही क्षेत्र नाहीं. )

चांगलीं चांगलीं स्वप्नें व दैवी चमत्कार, यांच्यावरून खात्री पटून दृढ निश्चयानें तो चंद्रभागा नदीच्या पात्रांतील पाण्यांतून जाऊन नमुचि दैत्याच्या गुहेंत पोंचला. ( ४७० ) ती गुहा मोकळी होती. तेथवर त्यानें आपले लोक बरोबर घेतले होते. तिकडे त्यानें त्यांना अनेक असुर स्त्रियांचा उपभोग घेऊं दिला.

याप्रमाणें त्यानें या पृथ्वीवर तीनशें वर्षे राज्य केलें. नंतर तो गुप्त पातालेश्वराच्या प्रसादानें निवार्णाला पोंचला.

( नमुचि दैत्याची गुहा पाताळांत होती, असें मानलें जातें. चंद्रभागा म्हणजे चनाब नदी असावी. )

राजा आपल्या परिवारासह दैत्यस्त्रियांकडे निघून गेल्यानंतर ती देवी—वैष्णवी शक्ती—ही श्वेतद्वीपाला निघून गेली.

पूर्वीच्या अनेक राजकुलांमध्यें दोन राजकुलें आणि त्यांच्यांतील दोनच राजे, यांनीं आपलें प्रजावात्सल्य पूर्णपणें दाखविलें, गोनंद वंशांतील रणादित्य आणि रघुकुलांतील श्रीरामचंद्र. त्यांनीं आपल्या प्रजेला स्वर्गसुखांतहि अंशभाक केलें होतें.

रणादित्याच्या मागून आपल्या पराक्रमानें दिग्विजय करणारा असाः—

**राजा विक्रमादित्य**—गादीवर बसला. त्याचा प्रताप व प्रभाव त्रिविक्रमाप्रमाणें होता. त्यानें विक्रमेश्वर शिवाची स्थापना केली. त्याचें ब्रह्म व गुलून नांवाचे दोन सुप्रसिद्ध मंत्री होते. त्यांच्यासह त्यानें देवेंद्राप्रमाणें पृथ्वीचें पालन ४२ वर्षें केलें. ब्रह्ममंत्र्यानें ब्रह्ममठ स्थापन केला, आणि लून दुष्कृत्य किंवा क्षीण पाप, अशा गुलूनानें आपली पत्नी रत्नावली इच्या हातून एक विहार बांधावेला.

त्या राजाच्या मागून त्याच्या उरलेल्या बंधूंपैकीं वडील असा—

**राजा बालादित्य**—राज्याधिकारी झाला. तो मोठा प्रबल, मानधन व शत्रूंना ताप देणारा असा होता. त्याच्या प्रतापामुळें क्षार सागरांतील क्षारजल प्यावें लागल्यामुळेंच जणों, शत्रूंच्या स्त्रियांचीं मुखें, क्षार नेत्रोदकानें युक्त होत असत. ( ४८० ) त्यानें उभारलेले जयस्तंभ, पराजित शत्रूच्या अंतःकरणांतील दुःखाचे जणों मानदंडच पूर्व समु-

द्राच्या तीरावर अद्यापि उभे आहेत. त्यानें आपल्या प्रतापरूपी अंकुशानें बंगालांना जिंकलें आणि काश्मीरी लोकांसाठीं कालम्ब्य नांवाचें आश्रयस्थान कायम केलें. तसेंच त्यानें काश्मीरांतील मडव राज्यांत ब्राह्मण लोकांना सुसमृद्ध असा भेडर नांवाचा गांव अग्रहार दिला. ( भेडर--हल्लींच्या ब्रिंग परगण्यांतील ब्रिदर नांवाचा मोठासा गांव. त्याच्यांत मध्यभागीं जुन्या मंदिराच्या अवशेषासारखा एक बराच मोठा उंचवटा आहे. )

त्याची बिंबोष्ठीराणी बिंबा ईनें अरिष्टोत्सादन येथें बिंबेश्वर शिवाचें मंदीर बांधविलें ( अरिष्टोत्सादन—एका टीकाकारानें याला रत्तोसान असें म्हटलें आहे. तें बहुशः माचहोम परगण्यांतील रतसून नांवाचें अलीकडील खेडें असावें. पण तेथे प्राचीन मंदिरें असल्याचें चिन्ह दिसत नाही. ) त्या मंदिराच्या योगानें लोकांचे अरिष्ट दूर झालें. खंख, शत्रुघ्न व मालव नांवाच्या, त्याच्या तिघा मंत्र्यांनी एक मठ, एक मंदीर व एक सेतु–बाध किंवा पूल बांधविले.

त्या राजाला एक कन्या झाली. तिचें नांव अनंगलेखा. ती जणों शृंगारसागराची चंद्रिका. त्रिभुवनैक सुंदरी होती. ती पित्याजवळ बसली असतांना, त्या हरिणाक्षीचीं लक्षणे पाहून एका उत्तम दैवज्ञानें राजाला स्पष्ट सांगितलें की, 'गोनंद कुलांत आपल्यापर्यंतच साम्राज्य राहील. आपल्या मागून आपल्या जामाताला सार्वभौमपद मिळेल.'

हें ऐकून, कन्या–संततीकडे राज्य न जावे म्हणून, पुरुष–प्रयत्नाने दैवाचा प्रतिकार करण्याचा निश्चय करून, बालादित्य राजानें कन्येला राज्ञीपद प्राप्त होऊ नये म्हणून, तिला कोणा राजपुत्राला न देतां, तिचें एका सामान्य कुलांत उत्पन्न शालेल्या पण सुंदर, अशा दुर्लभवर्धन नांवाच्या अश्वघास कायस्थ तरुणाशी लग्न केलें. ( ४०० ) ( श्रीनगरांत घोड्यासाठीं घास, गवत मुख्यतः आसपासचीं सरोवरे व दलदली, यांच्यात उत्पन्न झालेले नावांतून भरून आणतात. तें सर्व सरकारच्या मालकीचे समजलें जाते. त्याच्यावरील कर वसूल करण्यासाठी हल्लीं सुद्धां पृथक् कारकून नेमलेले असतात. त्यांना 'अश्वघास कायस्थ' म्हणतात. त्यापैकीच हा दुर्लभवर्धन असावा. ) दुर्लभवर्धनाची माता स्नान करीत असतांना, तिचा कर्कोटक नागानें उपभोग घेतला होता. आणि तो राज्योपभोगासाठी जणो जन्मास आलेला होता. पण हें राजाला माहीत नव्हतें. पंडितमन्य लोक, हट्टानें ज्याला अयोग्य ठरवितात त्यालाच दैव, जणों, त्यांची फजीति करण्यासाठीं, भाग्यवान व पात्र ठरविते. सूर्य अस्तास जातांना नवग्रहांशी हेवा करून त्यांना सोडून, आपले तेज अग्नीला अधिक योग्य समजून त्यांच्यात सोडून जातो. त्याला विधीची अघटित घटना कळत नाही, यामुळें तो हास्यास्पद होतो. कारण, तो, अग्नी तर राहूं दे पण त्याच्या पासून निघालेल्या यःकश्चित् दीपशिखेच्या द्वारें सुद्धां सूर्याचेंहि विस्मरण करवूं शकतो.

पुढे यश मिळविण्याच्या इच्छेने प्रेरित होऊन दुर्लभवर्धन मोठ्या दक्षतेनें व हुशारीनें आपले काम करूं लागला. त्याने सर्वांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें. कांहीं

कालानें, तो आपली बुद्धि व प्रज्ञा, यांच्या द्वारें चांगला पुढे येत असलेला पाहून त्याच्या सासऱ्याने त्याला प्रज्ञादिव्य असे नांव ठेवलें आणि त्याला कुबेरासारखें संपन्न केलें. पण पित्याचे फाजील लाड आणि यौवन मद, यांच्यामुळे अनंगलेखा उद्दाम व बेफाम होत्साती आपल्या पतीला कांहीच समजेनाशी झाली. पतीचा सौम्यपणा, सुखोपभोग, तारुण्य, तरुण पुरुषांची संगति आणि माहेरीं राहाणें, अशी, स्वैरिणी स्त्रियांना निरंकुश करणारी, कोणची म्हणून गोष्ट तिला कमी होती ? रोज निकट सहवासाची संधि सापडल्यानें मंत्री खंख याचा तिच्या अंतःकरणांत, तसाच अंतर्गृहांत, प्रवेश झाला. त्यानें तिला हळू हळू आपली प्रिय जारिणी बनविली. पुढें गुप्त प्रेमसमागमसुखाचा अनुभव घेतां घेतां तिनें, लज्जा, भीति आणि आदर, यांना पार झुगारून दिलें. ती अधिकाधिक धीट होत गेली आणि शेवटीं तल्लीन होत्साती जणो त्याची बटीक बनली. ( ५०० ) खंखानें आपलें वजन खर्चून व इनामे देऊन तिच्या दासदासी वश करून घेतल्या होत्या. यापुढें तो अंतःपुरांत वाटेल तसा वागूं लागला.

हळूं हळूं अनंगलेखेच्या तिरस्कारद्योतक वर्तनावरून, तिचे शील व चारित्र्य, भ्रष्ट झाल्याचें चतुर दुर्लभवर्धनाच्या लक्षांत येऊन चुकले. जाराला आपले प्रेम व शरीर विकले असलेल्या स्त्रीच्या अंगात संचारलेल्या अनीतिपिशाच्चानें घडवून आणलेला फरक तेव्हाच उघडकीस येतो. ती सख्यांमध्यें असताना चोरून हंसते. पतीला पाहतांच विवर्ण होतें, एकाएकी उठून रस्त्याकडे पहात स्मित करते, पती रागावलेला पाहून ती भोंवया चढविते, डोळे मिचकावते व हनुवटी हलवून तिरस्कार व्यक्त करते. त्याचें कठोर व रागाविर्भावें भाषण ऐकून, ती खाली पहात हसूं लागते. तिला त्याच्या विषयीं मुळींच आदर वाटत नाही. ती त्याच्या प्रतिस्पर्ध्याची प्रशसा मोठ्या आनंदाने ऐकते. तो विनोद करूं लागला तर तिकडे लक्षच न देता ती आपल्या सख्याशीं भाषण करण्यात मग्न होते. तो चुंबनोद्यत होताच मान खाली घालते. तो अलिंगन देऊं लागला तर ती त्याला मुळीच बधत नाहीं, आणि संभोगप्रसंगीं नेहमीं दुःखी कष्टी राहते. त्याच्यासह ती शय्येवर नुसती कपटनिद्रा करते.

अनंगलेखेच्या या दुस्सह गुप्त दुर्वर्तनानें दुर्लभवर्धन कृश व खिन्न होत्साता, सारखा उद्विग्न चित्त राहूं लागला. अशा स्थितींत तो एकदां रात्रीं अंतःपुरांत शयनमंदिरांत पोंचला. तेव्हां अनंगलेखा त्या खंख मंत्र्याबरोबर नुकतीच विविध सुरत सुखाचा उपभोग घेऊन थकलेली, त्याच्या अंगावर खिळून, गाढ झोपी गेलेली होती. दोघांनाही गाढ निद्रा लागलेली होती तरी नुकताच सुरतोपभोग घेतल्यामुळें त्याचा श्वासोच्छ्वास काहीसा चंचल चालला होता. व त्याच्यामुळें अनंगलेखेचे पीनपयोधर वरखालीं होत होते. हें पाहतांच तो क्रोधानें बेफाम झाला. अशा प्रसंगी कोणा तिऱ्हाइताला सुद्धा शांत राहणे अशक्य झालें असतें. त्यांना तात्काळ छाटून टाकावे, असें त्याच्या मनात आले व तसें आपण करूनमुद्धां चुकलों, (५१०) असेंहि त्याला वाटलें. पण तितक्यांत त्यानें विवेक केला आणि आपल्या क्रोधानें खवळलेल्या मनोविकाररूपी सागराला, मोठ्या कष्टानें विचाररूपी ओहोटीनें

आंवरून शांत केलें. खऱ्या, थोर, स्वाधीन मनस्कांना, नमस्कार असो. ईर्षा, क्रोध, असूया, इत्यादि विष विषूचिकांना पार जिरवून टाकणारे ते, खरोखर धन्य होत. नंतर दुर्लभवर्धनानें विचार केला कीं, अविवेकी, मनोविकारांना बळी पडणाऱ्या आणि आपणांबरोबर पुरुषांनाहि नरकांत ओढणाऱ्या, अशा या स्त्रियांना धिक्कार असो. इतर इंद्रियार्थाप्रमाणेंच स्त्री ही, एक इंद्रियांनीं उपभोग्य अर्थच आहे व ती सर्व साधारण उपभोग्य असल्यानें तिच्या संबंधांत संयमी लोकांनीं क्रोध कां करावा ? स्त्री मात्र निसर्ग चंचल. त्यांचें नियमन कोण करूं शकणार ? आणि ते करून तरी सज्जनाना, स्मरण होताच समाधान होण्याजोगा लभ्यांश कोणचा ? एकाच कुत्रीमागें लागलेल्या अनेक कुत्र्यांप्रमाणें, एकाच स्त्रीवर लुब्ध असलेल्या दोन पुरुषांमध्यें, ईर्षा व संघर्षण होणें, याला मान म्हणावयाचें तर, त्याच्याहून अधिक अवमान तो कोणचा ? मृगाक्षीविषयी सज्ञान माणसांनीं स्वाभिमान व प्रेम कां धरावे ? स्वतःच्या देहाविषयी सुद्धां अभिमान व प्रेम बाळगणें अयोग्य व व्यर्थ असतांना, दुसऱ्या कोणा व कशाविषयीहि तीं बाळगणें मूर्खपणाच होय. मला आलेला क्रोध व उद्वेग, याच्यामुळेंच हा मला वध्य वाटतो आहे. तरी त्याला कारण होणाऱ्या प्रेमाला मी कां विसरावें ? या प्रेमरूपी वृक्षाचीं मूळें सप्तपातालापर्यंत खोल गेलेलीं आहेत. त्याचें उन्मूलन करण्याला त्याच्या आधारभूत द्वेषाचें प्रथम निर्मूलन झालें पाहिजे. द्वेषरूपी दुर्धर्ष शत्रूवर, विवेकानें एकदा विजय मिळविणारा पुरुष, क्षणार्धांत प्रेमाचें नांवसुद्धां निःशेष करतो. ( ५२० ) हें प्रेमाचें औषध केवळ दैवी कृपेनें ओळखून, मनोविकारांना बली पडणाराच्या हितासाठीं ते प्रगट करावें आणि मत्सराचा नाश करावा.

नंतर त्यानें खंखाच्या वस्त्राच्या पदरावर ' हें खंखा, तूं यावेळी वधार्ह आहेस, पण मी तुझी गय करतों आहे. ' असे शब्द लिहून ठेवले व तो गुपचुप निघून गेला.

पुढें जागा झाल्यावर खंखानें ते शब्द वाचले. तेव्हां आज आपलें प्राण दुर्लभवर्धनाचा थोरपणा व दाक्षिण्य यांच्यामुळेंच वाचले, असे जाणून त्याने अनंगलेखेविषयींचा अनुराग, एकदम मनांतून दूर केला. त्याच्या उपकारांची फेड कशी करावी, याविषयींच्या काळजानें त्याचें चित्त वेधलें, कामाच्या पंचबाणांनीं नव्हे, त्याची दृष्टी निद्रानाशानें घेरली, राजकन्येनें नव्हे.

तो उज्ज्वल सत्कर्में करणारा बालादित्य राजा छत्तीस वर्षे, आठ महिने, राज्यकर्त्यांचा मुकुटमणि होऊन राहिल्यानंतर, शशिखंड मंडनाच्या अधिवासाला जाता झाला. तो गोनंद वंशांतला शेंवटला राजपुरुष होता. त्याच्यापूर्वींच त्याची जवळपासची आप्त नातेवाईक पुरूषसंतति नष्ट झालेली होती. कोणी मत्तगजानें एखाद्या पुष्करिणींत शिरून प्रथम तिच्यांतील कमले चुरडून टाकावीं व मागाहून महापूर येऊन, सारे कमलनाल व कमलकंद उखडून जावे, त्याप्रमाणें त्या गोनंद राजकुलाची दुःखद व कींव करण्यासारखी स्थिति झाली होती.

हें पाहून, त्या कृतज्ञ खंख मंत्र्यानें, इतर प्रमुख मंत्र्यांनीं मतभेद करून आणलेल्या सर्व अडचणी, आपल्या अकलेनें दूर केल्या आणि शेंवटीं त्यानें राजाचा जावई दुर्लभवर्धन याच्याच मस्तकावर सुवर्ण कलशांतून भरून आणलेल्या तीर्थोदकानें शास्त्रोक्त व विधिपूर्वक राज्याभिषेक करविला.

हा कर्कोटक नागानें पैदा केलेला राजा, आपल्या मुकुटांतलि मौक्तिकांच्या प्रकाश-किरणांनीं उज्वल फणांकुराप्रमाणें भासणाऱ्या दीर्घ बाहूंनीं, या वसुंधरेचें भरण व धारण करीत असतांना, त्याला शोभा देणाऱ्या मालेंतील पुष्कळशा सुवर्णमालिकेडे शेषाचे प्रफुल्लित नेत्रकटाक्ष आकार्षित होत होते. इतका त्या शेषाला आपल्या त्या आप्ताच्या उत्कर्षानें आनंद वाटला होता. (**कर्कोटक नाग**—नीलमत पुराणांतलि ९०१ श्लोकांत, काश्मीरांतील नागांच्या मालिकेंत, कर्कोटक नागाचा, नील, वासुकी, व तक्षक, यांच्याबरोबर उल्लेख केलेला आहे. या नागाची निरनिराळ्या जागीं पूजा होत असते तोस मैदान घाटापासून लोहरीनकडे जाणाऱ्या मार्गावर पहाडांत, एक लहानसे सरोवर आहे. त्याच्यात राहणाऱ्या एका कर्कोटक नागावरून, त्याच्या जवळच्या द्रंगाला, किंवा सरहद्दीवरील नाक्याला, कर्कोटक द्रंग हें नांव पडलें आहे, असें दिसतें व त्याच्यावरूनच त्या पठारीला काकोदर हे नांव मिळालेलें आहे. तसेंच कुटहार परगण्यांतलि उत्रुस नांवाच्या खेडयाजवळहि एक कर्कोटक नागाचे स्थान आहे.)

अमरसरीता गंगा आपला स्वर्गांतलि वक्र मार्ग सोडून त्रैलोक्यनाथ श्रीशंकराच्या जटाजूटाच्या आश्रयाला गेली, त्याप्रमाणें दुर्लभवर्धन राजाच्या कारकीर्दीपासून, पृथ्वीनें विशुद्ध गोनंद वंशीय राजापासून निसटून, अधिक पवित्र अशा कर्कोटक नागवंशीय राजाचा आश्रय केला. (५३२)

या तरंगांत १० राजांचें वर्णन आहे. त्यांनीं ५१७ वर्षें ४ महिने राज्य केलें.

काश्मिरिक महा अमात्य चंपकसुत कल्हणकृत राजतंरगिणीचा **तिसरा** तरंग समाप्त.

---

# तरंग चौथा.

## राजा प्रतापादित्य दुर्लभवर्धन.

श्रीपार्वतीच्या देहानें युक्त, निर्विघ्न सिद्धिप्रद, नागेंद्र वधूच्या शरीराच्या कुटिल कांतीनें युक्त व व्याप्त, अशा जटाजुटामध्यें वेणीच्या आकारानें शोभणाऱ्या भागिणीमुळें सुदर भासणारा श्रीगौरीशंकराचा देह आपल्या सर्व आरिष्टांचा नाश करो.

त्या प्रतापादित्य राजाला एकाच गोनंदकुलापासून पृथ्वी व अनंगलेखा राणी यांचा

लाभ झाला होता. त्या दोघीपासून पुढें त्याला नानाविध रत्नें आणि भोग व अनेक पुत्र यांची प्राप्ति झाली. त्यानें अनंगलेखा राणीच्या सर्व अवगुणावर पांघरूण घातलें. यामुळें तिची प्रतिष्ठा व सौभाग्य दोन्हींची वृद्धि झाली. पुढें तिनें अनंगभवन नांवाचा बिहार बांधविला.

त्या राजाचा **मल्हण** नांवाचा पुत्र अल्पायुषी होईल असें ज्योतिषांनी वर्तविलें होतें. त्याच्या हातून बालपणीच **मल्हणस्वामी** नांवाचें मंदिर बांधविलें गेले. या राजानें कांहीं थोर, सत्पात्र व विद्वान ब्राह्मणांचा आदर सत्कार करून, त्यांना **परिविशोक** नांवाच्या किल्ल्या-जवळ **चंद्रग्राम** नांवाचा गांव व दुसरेहि गांव दान दिलें. तसेंच त्यानें **श्री**नगरींत दुर्लभ-स्वामी विष्णूची स्थापना केली. त्यानें छत्तीस वर्षें राज्य केलें. ( **पारेविशोका** हें **विशोका** किंवा हल्लींच्या **वेसाव** नदीच्या पलीकडील एका टप्याचें नांव होतेसें दिसते. त्या नांवाचा किल्ला किंवा त्याचें निशाण हल्लीं उपलब्ध नाहीं, )

**राजा दुर्लभक** किंवा दुसरा **प्रतापादित्यः**--नंतर त्याचा अनंगलेखेच्या पोटचा पुत्र **दुर्लभक** गादीवर बसला. त्यानें प्रतिइंद्राप्रमाणें पृथ्वीचे राज्य केलें. त्याच्या आईनें त्याला आपल्या पित्याचा, त्याच्या **मातामहाचा**-नातू म्हणून वारस कायम केला होता. यामुळें त्याला कुलपरंपरागत राज्य व प्रतापादित्य हे नांव मिळालें. त्याचा मंत्री **ऊड** किंवा **ओड** याचा पुत्र **हनुमान**, हा मोठा भाग्यशाली होता. त्यानें **ऐडविड** किंवा **कुबेर** याच्याकडून अगणित संपत्ति आणली व तिच्या द्वारें पुष्कळसे सुसंपन्न अग्रहार स्थापन केले. हा प्रबल प्रौढ **प्रतापराजा** आपल्या शत्रूंना फार तापद होता. त्याने **प्रतापपुर** वसविलें ( १० ) या **दुर्लभक** राजाचीं थोडीशी ताब्यांचीं नाणीं सांपडली आहेत, एका चीनी प्रवाशानें ई. स. ६००-६५० च्या सुमारास, **ता-ले-पो** नावाच्या राजाचा उल्लेख केला आहे तो हाच असावा असे कांही विद्वानांचे म्हणणें आहे.

(**प्रतापपुर** हल्लींच्या **क्रोहिन** परगण्यांतलि **टापर** नांवाचें मोठेसें गांव. वराहमूलाहून **श्री**नगराला जाण्याच्या मार्गावर आहे. )

त्याच्या राज्यांत नाना देशचे पुष्कळसे श्रीमान व्यापारी व सावकार व्यापाराच्या उद्देशानें येऊन, विशेषतः त्या **प्रतापपुरांत** राहिलेले होते. त्यांच्यामध्यें **रोहितक** देशांतील **नोने** नांवाचा एक धनाढ्य सावकार होता. त्यानें **रोहित** देशीय ब्राह्मणांना राहण्यासाठीं आपल्या नांवानें एक विस्तीर्ण व सुंदर मठ बाधविला. ( **रोहितक**-याचा उल्लेख अल्बि-रूनीनें केला असून त्या नांवाचा **मुल्तान** प्रांतांत एक उजाड झालेला किल्ला असल्याचें लिहिलें आहे. डॉ. **बुल्हर** यांच्या मतें दिल्लीच्या वायव्येस असलेला **रोहटक** परगणा व गांव हेच **रोहितक** असावें. )

राजाने एकदां **नोनकाला** राजवाड्यांत बोलावून घेऊन त्याचें उत्तम स्वागत केलें त्याला एक दिवस ठेवून घेतले. दुसऱ्या दिवशी सकाळीं त्यानें त्याला, 'कां कसें प्रकृति बरी आहे ना ?' असें विचारतां, **नोननें** म्हटलें, 'येथील शयनगृहांतील दीपांच्या काजळीमुळे माझें मस्तक दुखतें आहे.'

पुढें एकदां नोनाच्या विनंतीला मान देऊन राजा एक रात्र त्याच्याकडे जाऊन राहिला. ते वेळीं नोनाच्या घरीं मणिदीप लागलेले त्यानें पाहिले, (मणिदीप–तेल वातीच्या जागीं प्रकाश देणारी रत्ने असलेले दीप–किंवा अलीकडील नव्या तऱ्हेच्या काजळी न देणाऱ्या कांचेच्या दीपाप्रमाणें दीप असावेत. )

त्याच्या घरांतील संपत्तीचे नाना तऱ्हेचे खेळ व चमत्कार पाहून राजा चकित झाला व तो त्याचा पाहुणचार घेत त्याच्याकडे आणखीहि दोन दिवस राहिला. त्या सावकाराची पत्नी नरेंद्रप्रभा फारच लावण्यवती होती. तिची शरीरकांति चंद्रिकेप्रमाणें अनुपम होती. राजा तेथें राहात असतांना ती सहज त्याच्या दृष्टी पडली. तिचे कृष्णवर्ण चिबुकयुक्त स्तन-कलश, हे त्याला त्या तिच्या देहाचे, किंबहुना त्या गृहाचे, दूर्वांकुरांनीं आच्छादित मंगल सुवर्ण कलशच वाटले. ती घरांत मोकळेपणी व निःशंक विहार करीत होतीं. तिला पाहून राजा काममोहित झाला. तिच्या सख्यांनीं तिला राजाला दाखविलें. तेव्हां तिनेंहि त्याच्या-कडे कर्णांतायत नेत्रांनीं किंचित् तिर्यग्वलित दृष्टीनें पाहिले. ( २० ) राजाची व तिची दृष्टा-दृष्ट होतांच, जन्मांतरीच्या प्रेमसंबंधामुळें किंवा कामदेवाच्या प्रेरणेमुळें, तिच्याहि मनांत आपल्याप्रमाणेच उत्कट कामवासना पैदा झाली आहे, असें राजाला दिसून आलें तिचा स्पर्श झाला नव्हता तरी त्या सौभाग्यामृत सुंदरीला आपण गाढालिंगन देतों आहों, असें राजाला वाटूं लागलें. ती खांबाआडून आपले मुखकमल वळवून वरचेवर राजाकडे प्रेमानें पहात निघून जाताना, तिनें जणों राजाचें चित्त चोरून हिरावून नेलें. पुढें तो तदर्पितांतः-करण होत्साता, चिंताग्रस्त व निश्चल दृष्टी असा, राजवाड्यात परत गेला. त्याचें सारे चित्त तन्मय झाले असल्यामुळें, अंतःपुरांतील सर्व राजस्त्रियांवरील त्याचें प्रेम आणि त्याचें शरीर दोन्ही एकदमच तनुता पावूं लागलीं.

राजानें मनांत विचार केला की, 'या माझ्या मानसोद्यानांत हा दुष्ट कामानुरागरूपी विषवृक्ष उगवला हे फार वाईट आहे. या दैवी प्रेमप्रसरानें, माझ्या मनांतील माझे सहाय्यक युक्तायुक्त विचार, वगैरे तत्सदृश सर्व गुणांना शत्रूप्रमाणें, माझ्या मनांतून पार धुडकावून दिलें आहे. मी राजा असूनहि सभ्यपणाला आड येणारे सर्व अविचार मी आज-वर दूर करीत आलों व त्यायोगानें भावी संकटे टाळलीं आणि आपल्या कुलीनपणाला बट्टा लागूं नये म्हणून सारखा झटत आलो. अशा माझ्या अंतःकरणांत या अनर्थावह अस-दाचाराचा प्रादुर्भाव कां बरें होत आहे ? राजाच प्रजेच्या स्त्रियांचा अभिलाष करूं लागेल तेथे अधर्माचरण करणाऱ्यांचें शासन कोण करणार ?' इत्यादि विचार मनांत येऊन त्याला साधुमार्ग सोडवेना व त्या वामलोचनेचें ध्यानहि सुटेना. ( ३० ).

पुढें कांहीं लोकांकडून, राजा अमक्या कारणामुळें आसन्नमरण झाला आहे, असें नोनकाला कळलें. तेव्हां त्यानें राजाकडे जाऊन त्याला एकांतांत विनंति केली कीं, 'महा-राज, आपली प्राणांतिक अवस्था झालेली असतांना, आपण धर्माधर्माच्या अडचणी कसल्या घेऊन बसलां आहां ? प्राणांतिक प्रसंगी प्राण्याला कोणचेंहि कर्म अधर्माचे होत नाहीं.

ज्या संयमी व थोर पुरुषांच्या अनुज्ञेची जाणते लोक अशा प्रसंगी अपेक्षा धरतात, त्यांनी-सुद्धां अशा अनिर्वाह प्रसंगीं आपला संयम दूर झुगारून दिला आहे. केवळ यशासाठीं सुद्धां देहाची उपेक्षा करणें ठीक नाहीं. दिगंत कीर्ति तरी मरणोत्तर कोणाच्या कानांत अमृतासारखी होणार आहे ? मजविषयीं शंका धरून आपण स्वहित-पराङ्मुख होऊं नये. या कामांत मला माझ्या प्राणाची सुद्धां पर्वा नाहीं मग या यःकश्चित् इंद्रियभोग विषयक पदार्थांची कथा काय ? यावरहि आपणाला तिच्याविषयीं हरकत वाटत असली तर, मी तिला देवदासी–नर्तकी–म्हणून मंदिरांत अर्पण करतों. तिला नृत्यगीत उत्तम येत आहे. तेथून तिचा आपण स्वीकार करावा.'

याप्रमाणें त्या सावकारानें व नंतर प्रबल कामानेंहि केलेल्या प्रेरणेमुळें, त्या राजानें प्रथम कांहीशा लज्जेचा व नंतर त्या सुलोचनेचा, कसा तरी स्वीकार केला, यांत त्या नरेंद्र-प्रभेच्या चारित्र्याला बट्टा लागला.पण तो तिने आपल्या औदार्यादिक गुणानी धुवून काढला. तिनें पुढें नरेंद्रेश्वर महादेवाची स्थापना केली.

पुढें कांही कालानें पृथ्वीपासून बहुमोल निधीचा लाभ होतो त्याप्रमाणें प्रजेच्या पुण्याईनें त्या राजपत्नीच्या पोटीं चंद्रापीड नांवाचा पुत्र पैदा झाला. खाणींतून काढलेल्या रत्नाचा मळ साहाणेवर घासल्यानें दूर होतो, तसा त्याच्या उत्पत्तिविषयक दोष त्याच्या उज्वल गुणांनी पार नाहीसा झाला. ( ४० )

कृष्णवर्ण मेघोदयापासून, गाढ धूमातून, स्वच्छ जलाची वृष्टि होते, तसेच ओबडधोबड दगडांतून तीक्ष्ण लोखंड निघतें. अतिशय थंड व जड अशा जलापासून प्रज्वलित और्वानल अग्नी पैदा होतो. श्रेष्ठ व भाग्यवान् पुरुषाचे गुण व स्वभाव, हे त्यांच्या उत्पत्तिस्थानावर अवलंबून असतात, असें थोडेंच आहे.

पुढे तिच्यापोटीं तारापीड व मुक्तापीड किंवा अविमुक्तापीड, हे पुत्र झाले. प्रतापा-दित्याचे हे तिघेहि पुत्र वज्रादित्य, उदयादित्य आणि ललितादित्य, या नावाने पुढे प्रसि-द्धीस आले. पन्नास वर्षें राज्याचा उपभोग घेतल्यावर तो राजा दुर्लभक आपल्या अगणित पुण्यकर्मेरूपी सोपानावरून हळू हळू चढत, पुण्यकर्मांचें फल, अशा स्वर्गलोकाला गेला.

**राजा चंद्रापीडः**—त्याच्या पश्चात् चंद्रापीड, हा राजचूडामणी गादीवर बसला. त्याच्या चंद्रालाहि मागें टाकणाऱ्या विमल कीर्तीनें कलीला पीडा केली. पूर्वीच्या राजांनी जणो समस्या पूर्तीसाठीं कलीचा एक पाद दिला होता. आपल्या विशुद्ध यशाने त्याने ती समस्या पुर्ती करून, कलीला बाकीच्या तिन्ही पदांनीं युक्त केले. (या चंद्रापीडाने चीनच्या बादशहाकडे इ. स. ७१३ मध्यें अरब लोकांविरुद्ध मदत मागितली होती. त्याला त्या बादशहानें ई. स. ७१९ त राजा ही पदवी दिली होती- असें चीनच्या ट्यांग राजघराण्याच्या बखरीवरून दिसते. ही गोष्ट क्लापरोथ साहेबांनीं प्रथम नजरेस आणली. त्या बखरीत या राजाचें नांव च्चेन-तो-लो-पी-ती असें दिलें आहे. कल्हणाच्या गणनेप्रमाणें या राजाची कारकीर्द ई. स. ६८६-६९५ पर्यंत पडते. तेव्हां हा २०-२५ वर्षांचा फरक विचा-राई आहे. )

दिव्य उद्यानांत सर्व ऋतूंचा एकदमच वास असतो. त्याप्रमाणें त्याच्या अंगी क्षमा व पराक्रम वगैरे परस्पर विरोधी गुण एकत्र वसत होते. उपवनांतील पाण्याच्या पाटाप्रमाणें त्याची भाग्यलक्ष्मी सतत प्रसादोन्मुख राहून त्याच्या सर्व आश्रितजनांच्या परिभ्रमाचा परिहार करीत असे. आपल्या जलातील सारा गाळ मार्गातील खडकाळ भागावर मागें टाकून, नदी आपलें स्वच्छ जल सागराला पोंचविते. तद्वत् सर्व दोष इतर राजांमध्यें सोडून, शुद्ध झालेलें भाग्य त्याला प्राप्त होत असे. तो राजा मोठा कार्यज्ञ होता. परिणामीं ज्याच्याविषयीं काळजी किंवा चिंता करावी लागेल, अशी कामें तो कधींच करीत नसे. नेहमी प्रशस्त कार्यांतच त्याचें मन गढलेले असें, कोणीहि स्तुति केलेली कानी आली तर त्याला लाज वाटे. ( ५० )

वज्र, हें रत्न मात्रांचा भेद करतें. त्याचा भेद कोणचेंहि रत्न करूं शकत नाहीं. त्याप्रमाणे त्याला मंत्र्याकडून राजनीति शिकण्याची अवश्यकता नसे. उलट त्याच्याकडूनच त्यांना तिचें शिक्षण मिळें. सूर्य रोज उगवतांना मंदेहांचा नाश करतो. तसा तो न्यायमार्गानें चालून, प्रत्यहीं व्यवहारांतील मंदेह–संशय–दूर करीत असे. (मंदेह हे एक प्रकारचे राक्षस दररोज सूर्याला उदयाचलावर अडवीत असतात, अशी कल्पना आहे. ) त्याच्या सद्गुणांचे येथें जास्त वर्णन करण्यांत कथानुसंधान सुटेल, म्हणूनच तें टाळलें जात आहे, त्याच्या अंगी ते गुण कमी होते म्हणून नव्हे.

त्यानें बांधविलेल्या त्रिभुवन स्वामीच्या मंदिराचें काम चालू झालें तेव्हां, त्याच्या आवारांत एका चर्मकाराची झोपडी घेणे अवश्य होतें. ती तो कांहीं केल्या देईना. इमारतीवरील कामगारांना ती तो देतों म्हणे, पण निकाल होईना. तेव्हां त्या कामगारांनीं ही गोष्ट राजाच्या कानांवर घातली. राजाने त्यांनाच नांवे ठेवली व म्हटलें, ' तुम्ही असे कसे अन्यायी, तुम्ही त्या चर्मकाराची संमति न घेतां मंदिराचें काम कां सुरू केलेंत ? आतां काम बंद करा व तें दुसरीकडे हवें तर बांधा. दुसऱ्याच्या भूमीचा अपहार करून आपल्या पुण्यकर्माला दोष कोण लावून घेईल ? योग्यायोग्य पाहणारे आम्हीच जर अधम करूं लागलो तर मग न्यायानें वागावयाचें कोणीं ?' ( ६० )

तोवर ह्या कामगारांनी त्या चर्मकाराकडे एक दूत पाठविला होता तो परत आला व त्यानें ' तो स्वतःच महाराजांच्या दर्शनासाठीं येणार आहे. त्याला राजवाड्यांत येण्याला अडचण असली तर, महाराज बाहेर बाह्यालींत येतील तेव्हां मी हजर होईन, असे तो म्हणतो. ' असें त्यानें कळविलें.

दुसरे दिवशीं राजानें त्या चर्मकाराला बाह्यालींत दर्शन देऊन म्हटलें, 'भल्या गृहस्था, आमच्या या धर्मकर्मांत कां विघ्न आणतो आहेस ? तें घर तुला विशेष आवडत असले तर त्याच्याहून चांगलें व सुंदर घर मागून घे, किंवा त्याच्या ऐवजीं पुष्कळसें द्रव्य घे, देऊं.'

यावर त्या चर्मकारानें, त्या राजाच्या दंतकिरणांवरून त्याच्या थोरपणाची अटकळ करीत थोडा वेळ थांबून विनंति केली कीं, 'महाराज, मी माझ्या मनातील गोष्ट आप-

णांला जशीच्या तशीच सांगतों आहे या याबद्दल आपण गर्वानें किंवा रागानें नाराज होऊन मुग्ध राहूं नये. मी कुत्र्यापेक्षां कांहीं कमी नाहीं व आपण काकुत्स्थापेक्षां कांहीं श्रेष्ठ नाहीत. तेव्हां हे आपले दरबारी लोक आमचें भाषण ऐकून असे कंपायमान होताहेत तें काय म्हणून ? जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या प्राणिमात्राचा देह निस्सत्व कवचाप्रमाणें अहंता व स्वाभिमान, या दोन खिळ्यांनीं तगवून धरलेला असतो. अंगद, कंकण व हारा दिकांनीं शोभणारे आपण राजे, महाराजे, याना जशी जाणीव व अहंता आहे, तशीच मज दरिद्र्यालाहि आहे. आपला शोभिवंत राजवाडा आपणांला जितका रमणीय वाटतो, तशीच मला माझी फुटक्या मडक्याच्या तोंडाचे गवाक्ष असलेली जीर्ण कुटी प्रिय वाटते. ती जन्मापासून माझ्या सुखदुःखाची साक्षिणी आहे. ती आज तोडून टाकलेली मला कशी पहावेल ? स्वतःचें घरदार नष्ट व आहृत होत असलेलें पाहून होणाऱ्या तीव्र दुःखाचें वर्णन, विमानच्युत स्वर्गास चाललेला कोणी देव, किंवा राज्यभ्रष्ट झालेला राजाच, यथावत करूं शकेल. तरी आपण माझ्या घरी येऊन याविषयीं योग्य रीतीनें मागणी केली तर, समुदाचाराला अनुसरून मला नाहीं म्हणतां येणार नाही.'

यावर राजानें त्याच्याकडे जाऊन याचना केली. तेव्हां त्या चर्मकाराने ती झोंपडी व जमीन खुषीनें विकत दिली.

सुख हवें असेल त्याने वृथाभिमान सोडला पाहिजे. नंतर त्या चर्मकारानें हात जोडून विनंति केली कीं, 'महाराजांनीं धर्माला अनुसरून माझे म्हणणे मान्य केले तें न्याय्यच आहे. पूर्वी पांडुपुत्र धर्माची एका कुत्र्याने परीक्षा केली होती. तसेच म्यां अस्पृश्यानें आज आपले धर्माचरण जांचलें आहे. आज आपलें हे वृत्त धार्मिक लोकाना मान्य व आदर्शभूत होत्सातें चिरकाल राहील. आपण दीर्घायु व्हा.'

असल्या निर्दोष आचरणानें तो राजा पृथ्वीला पावन करीत होता. त्यानें त्रिभुवन स्वामी विष्णूची स्थापना करून, हें त्रैलोक्य कृतार्थ केलें होतें. त्याची राणी प्रकाशदेवी, इनें आपल्या उज्वल कृत्यांनीं प्रकाशाधिष्ठान आकाश दीप्तीलाहि मागे टाकलें होतें. तिनें प्रकाशिका नांवाचा एक विहार बांधविला. तसेंच राजाचा उदार गुरु मिहिरदत्त यानें गंभीरा संगमावर गंभीर स्वामीची स्थापना केली. ( ८० ) आणि नगराधिकारी—कोतवाल—छलितक याने छलितस्वामीचें मंदिर बांधविले. त्याच्याकडे सर्वाधिकरणोच्छेत्त्याचें काम होते.

एकदां एका ब्राह्मणीनें प्रायोपवेशन केलें. तिला सरकारी अधिकारी विचारूं लागले, तेव्हां ती म्हणाली, 'मला धर्मासनावर बसलेल्या राजाकडे न्या. तेथें मी काय तें सांगेन.' त्याप्रमाणें राजाकडे गेल्यावर तिने राजाला म्हटलें, ' कोणीहि नांव ठेवणार नाहीं असें आपण या पृथ्वीचें शासन करीत असतांना माझ्या पतीचा कोणीसा प्राण घेतला आहे. तो स्वस्थ निजलेला होता. असा अपमृत्यु येण्यात न्यायी राजाला दोष लागतो. हा कलिदोषहि असेल. पण त्याविषयीं आपणांसारख्यांनीं उदासीन राहणें योग्य नाही. मी नीटपणें विचार करून पाहातां, यांत मला माझ्या पतीचा काहीं अपराध आढळत नाहीं

कारण त्याचें कोणाशीं वांकडे नव्हते. तो शांत व निरुपद्रवी होता. सर्वांशीं प्रेमाने बोले. तो अगदीं निर्लोभ व निरभिमान आणि सद्‌गुणी असे. तो अगदी निरिच्छपणानें वागे. त्याच्या मृत्यूच्या संबंधांत माझा एका ब्राह्मणावर संशय आहे. तो माझ्या पतीचा लहानपणापासून हेवा करीत असे. तो एक जादूगार असून माक्षिकस्वामीजवळ राहतो. (माक्षिक स्वामी हल्लींचें मायसूम बेट. हें श्रीनगरचा एक भाग किंवा मोहल्ला आहे.) दुष्ट व क्षुद्र लोक सज्जनांची नेहमीं स्पर्धा करतात. त्या स्पर्धेमुळें त्यांना झोप येत नाही. सज्जनांची त्यांना बरोबरी करतां येत नाही. आपल्याहून हुषार व श्रेष्ठ माणसांना ते नेहमी त्रास देत असतात. वेश्यापुत्रावांचून दुःशील कोण असणार? दोषी असल्याशिवाय सारखा भीत कोण राहील? कायस्थावाचून कृतघ्नपणा कोणाकडे सांपडणार? उदार माणसाचा पुत्र लोभी व कंजूष क्वचितच असणार. सतत दुःखी हेवेखोराशिवाय कोण मिळणार? लोकांत सारखे हंसे करून घेणे स्त्रीजिताशिवाय कोणाला साधणार? वृद्धावांचून नेहमी मधुरभाषणी कोण असतो? परबीजीशिवाय पितृद्रोह कोण करील? कामी माणसाइतका निर्लज्ज अन्य कोण असणार? तुच्छ, हलकट व कुविद्य, यांच्यावांचून नितांत दुष्टपणा कोण करील? हे सर्व माझ्या म्हणण्याचे सार आपण लक्षांत आणावें.' (९२)

हें ऐकून राजानें तिला, ज्याच्यावर शंका असेल त्याला शोधून आणण्यास व त्याच्या विरुद्ध पुरावा करण्यास म्हटलें. त्याप्रमाणे तो ब्राह्मण आल्यावर त्याला त्या स्त्रीच्या आरोपाचा जबाब विचारून, त्याला दिव्य करण्यास सांगितले गेलें. तेव्हा त्या ब्राह्मण स्त्रीनें म्हटलें 'तो खार्खोट विद्येत निपुण आहे. तिच्या द्वारे तो वाटेल तें दिव्य करील.'

हें ऐकून राजाने तिला खिन्न होऊन म्हटले, 'ज्याचा अदृष्ट दोष सिद्ध झालेला नाही, त्याचा आम्हीं न्याय करून त्याला शिक्षा कशी द्यावी? अपराध सिद्ध झाल्यावाचून सामान्य माणसाला सुद्धां दंड करतां येत नाहीं. हा तर ब्राह्मण. दोषी असला तरी त्याला वधाची शिक्षा देतां येणार नाही.

(खार्खोट विद्या=जादूगरी-या शब्दाची व्युत्पत्ति कळत नाही. काश्मीरी लोक प्राचीन काळापासून या विद्येंत निपुण असल्याविषयी व तिच्या द्वारें ते मूर्ती बोलविणे, हवेंत फेरफार करणे, गाढ अंधःकार पाडणें, वगैरे अनेक अद्‌भुत गोष्टी करूं शकतात, असें मार्कोपोलो यानें आपल्या प्रवास वृत्तांत वर्णन केलें आहे.)

त्या बाईनें राजाला उत्तर दिलें, 'मी सूड उगविण्यासाठीं सती न जातां उपास चालू केला, त्याला चार दिवस झाले. या खूनाचा पत्ता लागून तो करणाऱ्याला दंड होईपर्यंत मी उपाशी राहून, येथें धरणे देऊन प्राण देणार.' यावर राजानेंहि त्रिभुवन स्वामीपुढे प्रायोपवेशन चालविले. त्याने तीन दिवस उपोषण केलें. चौथ्या दिवशी पहाटें त्याला सत्य किंवा गरुडवाहन देवानें स्वप्नांत येऊन म्हटलें, (१००) राजा, या कलियुगांत सत्यान्वेषणासाठीं असा हट्ट धरणें योग्य नाहीं. रात्रीं सूर्योदय कोण करूं शकणार! तरी तुझ्या दैवी प्रभावानें तुला या एक वेळ प्रत्यंतर येईल. माझ्या मंदिराच्या आवारांत रात्रींच्या वेळीं तांदळाचें पीठ

पसरवून, त्याच्यावरून त्या आरोप असलेल्या माणसाकडून तीन प्रदक्षिणा घालीव. त्याच्या पावलामागें ब्रह्महत्त्येची पावलें उमटली तर त्याला योग्य शासन कर. हें दिव्य दिवसां करवूं नये, कारण सूर्यनारायण सर्व पापाचें हरण करतो. आणि ते दिव्य सफल होत नाहीं. '

राजानें त्याप्रमाणें करविलें तेव्हां तो जादूगार ब्राह्मण दोषी असल्याचें सिद्ध झाले. तो ब्राह्मण असल्यामुळें त्याला वधाव्यतिरिक्त दंड केला गेला. हें पाहून त्या पुण्यवती ब्राह्मणीनें त्या पार्थिवाला धन्यवाद देत म्हटलें, ' हे राजा, असें हें गुप्तपातकाचें शोधन व शासन पूर्वी कार्तवीर्याच्या व हल्लीं तुझ्या राज्यांतच पाहाण्यांत आले. तुजसारखा दंडधर शास्ता असेल तोवर या पृथ्वीवर कोणालाहि उत्कट स्नेह किंवा द्रोह, याचे योग्य फळ मिळाल्यावाचून राहणार नाही. '

त्या राजाची कारकीर्द थोडींच वर्षें राहिली. तरी त्याच्या अशा अनेक अद्‌भुत न्याय करण्याच्या कथांवरून, ती कांहींशीं कृत युगाचें स्मरण करून देत होती. ब्रह्मदेव कमलासनावर बसत असल्यामुळें त्याच्या अंगांत व चित्तात आतिशय जाडय आले असावें व म्हणूनच त्याने अशा तऱ्हेनें निरनिराळ्या वर्णाला सुख देणाऱ्या राजाला, इंद्रधनुष्याप्रमाणे क्षणदृष्ट नष्ट, असें केले असावें. ( ११९. )

पुढे कांही दिवसांनीं दुष्ट तारापीडानें, त्या दंड झाल्यामुळे क्रुद्ध झालेल्या अभिचारक ब्राह्मणाकडून जादू करवून, त्या चंद्रापीड राजाला कीर्तिशेष केलें. तेव्हांपासूनच या राज्यांत गादी मिळविण्याची इच्छा करणारे राजवंशीं आपल्या, वडील राज्याधिकृतांना अभिचारादिक प्रयोग करून मारवूं लागले. पूर्वार्जित दुष्कृतामुळे त्यांनी सुखप्राप्तीच्या इच्छेने, दुष्टांकडून सज्जनाविरुद्ध करविलेल्या कुकर्माचे फल त्यांना उपभोगावयाला मिळत नाही. काटे खाण्याला मिळावें म्हणून उंट केतकी वृक्षाचा नाश करीत असतो.

राजा चंद्रापीड आसन्नमरण पडला असतांना त्याला त्या अभिचारी ब्राह्मणांच्या कृतीमुळेंच आपणाला रोग झाला आहे, असें कळून आले. पण तो प्रयोग त्यानें दुसऱ्याच्या शिकवणीवरून केलेला, त्यांत त्याचा स्वतःचा दोष नाहीं, हें जाणून, त्याने त्याला कांही शासन केलें नाही. अशा त्या राजाची ती क्षमा व ते शील वगैरे उच्च गुणानीं कृत युगीन राजांनाच शोभणारें स्वरूप अंत:चक्षूपुढें येऊन, कोणाच्या मनाला व शरीराला प्रसन्न केल्याशिवाय राहील ? वास्तविकपणें तो कृतयुगांतील राजांच्या मालिकेत गुंफण्याच्या योग्यतेचा राजा, त्या युगांत विस्मरणानें राहून गेलेला पाहून, त्याला ब्रह्मदेवानें हें तसले वैभव थोडया काळापुरते, या कलियुगांत देऊन, जणो काकपद घेऊन त्या आपल्या पूर्वीच्या चुकीची दुरुस्ती केली होती. त्यानें आठ वर्षे आठ महिने राज्य केले. नंतर त्या जितेंद्रिय राजाने स्वर्गांतील सज्जन माणसांत एकदमच प्रवेश केला.

**राजा तारापीड**—चंद्रापीडाच्या पश्चात् भ्रातृद्रोही तारापीडाला त्याच्या पापाचें फल, असे तें राज्य मिळालें. नवीन वैभव प्राप्त झाल्यावर त्याने पुष्कळशा शत्रूंचा शिरच्छेद केला आणि अतुल प्रताप गाजवीत त्यानें रणांगणांत, त्यांचे हजारो कबंध नाचविले.(१२०)

त्याचें वैभव व त्याचा प्रखर प्रताप यांच्यामुळें सर्वत्र अस्वस्थता उत्पन्न झाली. स्मशानांतील अग्नीच्याप्रमाणे तो सर्वांना भारी द्वेषजनक झाला.

ब्राह्मण लोक मंत्र तंत्राच्या द्वारें देवताची सिद्धि प्राप्त करून घेतात म्हणून तो देव व द्विज दोघांचाहि द्वेष करूं लागला. त्यानें ब्राह्मणांना उग्र दंड करण्याचा सपाटा लावला. अशा रीतीनें त्यानें चार वर्षे व चोवीस दिवस राज्य केले. गुरुद्रोहामुळे त्याचें पूर्व पुण्य नष्ट झाले होते. पुढे सारेच ब्राह्मण त्याच्या विरुद्ध अभिचार करूं लागले. तेव्हां त्याचे आयुष्य क्षीण होऊन त्याला त्याच्या भावाप्रमाणेच मरण प्राप्त झालें. पण त्याला स्वर्ग-प्राप्ति झाली नाही.

दुसऱ्याच्या नाशाची योजना करणाराचा त्याच योजनेने नाश होत असतो. नेत्रांना आंध्य आणणाऱ्या धूमाला अग्नि उत्पन्न करतो. पण तो धूमच मेघरूपाने जलवृष्टि करून त्या अग्नीचे शमन करतो. ( 'चाह कंदारा चाह दरपेश.' गुलिस्तान ).

**राजा ललितादित्य—तारा**पीडामागून त्याचा कनिष्ट बंधू ललितादित्य सार्व-भौम राजा झाला. विधात्याला सामान्य राजेच उत्पन्न करतां येतात. पण तो विधात्याच्या कर्तृत्वाच्या पलीकडे श्रेष्ठ व भाग्यशाली होता. त्याने आपल्या प्रतापाच्या किरणजालाने जंबुद्वीपातील दिग्गजांवर जणों उत्तम वास चूर्णाची वृष्टि केली होती.

(**राजा ललितादित्य**—चीनच्या टॉगराज घराण्याच्या बखरीत या मुक्तापीड ललितादित्य राजाच्या नांवाचा उल्लेख आढळतो. व्हेनत्सुंग बादशहाच्या कारकीर्दीत ( ई. स. ७१३ ते ७५५ ) त्यानें सं. ७३६ ते ७४७ च्या दरम्यान, पो. ली. ड्र. वर किंवा बाल्तिस्थानावर स्वारी केल्यानंतर, काश्मीरचा राजा मु-तो-पी, याच्याकडून वकील आले होते, व त्याने तिबेटाविरुद्ध मदत मागितली होती, असे त्या बखरीत लिहिलेले आहे. त्याप्रमाणें त्याच्या मदतीला एक चिनी फौज धाडली गेली होती. तिने जाऊन मुक्तापीडाच्या राज्यांत महापद्म-हल्लीचे वूलर-सरोवराच्या कांठावर तळ घ्यावयाचे ठरलें होतें. मुक्तापीडाने २००००० फौजेला रसद—सामान सुमान-पुरविण्याचे कबूल केले होते. मध्य हिंदुस्थानांतील राजांच्या सहाय्यानें, त्यानें तिबेटांत जाण्याचे पाचहि मार्ग रोकून टाकल्याचें कळविले होते. काश्मीरचे वकील कोणत्या वर्षी गेले होते, याचा खुलासा नसल्यानें कल्हणानें दिलेल्या ललितादित्याच्या कारकीर्दीच्या ई. स. ७०० ते ७३६ वर्षांची नीट तपासणी करता येत नाही. त्या बखरीच्या अनुरोधाने चंद्रापीडाच्या कारकीर्दीसंबंधांत २५ वर्षांची तरी दुरुस्ती करावी लागते. याबद्दल मागें चंद्रापीडाच्या कारकीर्दीवरील टीपेत लिहिलेच आहे.

हिंदुस्तानाच्या वायव्येकडील प्रदेशांत या सुमारास अरब लोकांचा चांगला जोराचा प्रादुर्भाव झाला होता. त्यावरून चिनी बखरींतील काश्मीरच्या राजाचें वैभव व प्रचंड राज्यविस्तार, यांचें वर्णन बरेच अतिशयोक्तीचे असावे असे वाटतें.

अल्बिरूनीने काश्मीरचा राजा मुत्तई याने, तुर्की लोकांवर जय मिळविला व त्या

विजयासंबंधानें प्रतिवर्षी चैत्र शुद्ध द्वितीयेच्या दिवशी महोत्सव होतो, असें लिहिले आहे तो मुक्तई हाच मुक्तापीड असावा असें वाटतें. 'काश्मीरी लोक त्या राजाचा अंमल साऱ्या पृथ्वीवर होता असें म्हणतात. पण असें वर्णन ते आपल्या बहुतेक राजांविषयीं करतात. तसें वर्णन आपल्या जवळच्या काळांतील राजांनाहि लावले आहे. त्यावरून त्यांची लबाडी व्यक्त होते.' असेंहि तो लिहितो.

कनोजचा राजा यशोवर्मा याच्याविषयीं अद्यापि चांगली विश्वसनीय व तपशील-वार माहिती मिळालेली नाहीं. या राजतरंगिणीतल्या उल्लेखाशिवाय त्याच्यासंबंधानें वाक्प-तिराज या कवीनें, गौडवध नावाचें महाकाव्य लिहिले आहे, त्यांच्यांत कांहीं माहिती आहे. तिच्या संबंधानें गौडवध काव्याचें प्रकाशक शंकर पांडुरंग पंडित, यांनीं त्याच्या प्रस्तावनेंत बराच ऊहापोह केला आहे. तो पाहण्यासारखा आहे आहे.

ललितादित्यानें ज्या मध्य हिंदुस्थानांतील राजांच्या सहाय्यानें तिबेटांत जाण्याचे मार्ग रोकून टाकले होते, तो हा यशोवर्माच असता तर, ललितादित्यानें त्याचा पराभव केला, तो चीनला वकील पाठविल्यानंतरचा असला पाहिजे. मध्यहिंदुस्थानचा राजा इ. छा. फान. मो. ज्यानें आपला मंत्रि संग पो. ता. याला चीनच्या बादशहाकडे, ई. स. ७३१त पाठविले होते, तो हा यशोवर्माच होय, असें यापूर्वीच पाथियर साहेबांनीं सुचविलेलें होतें. प्रो. म्याक्समुलर यांनीं यशोवर्मा व वाक्पतिराज हे संवत ८०० ई. स. ७४४ मध्यें हयात होते, असा जैनी तपागच्छ पदावलीमध्यें उल्लेख असल्याचें लिहिलें आहे. माणिक्याल येथील स्तूपामध्यें कांहीं ससानियन–आरबी–नाण्यांबरोबर यशोवर्म्याचेंहि एक नाणें मिळालें आहे.

ललितादित्याचा सूर्यासारखा प्रखर ताप सहन होईना म्हणून यशोवर्म्यानें त्याच्या कडून तोंड फिरविलें, पण पुढें त्याच्याशीं सख्य करून सूर्याकडे पाठ करून मनुष्य शेकत असतो, तसा तो सुख पावला. त्याच्या आश्रयाखालीं बसून सुख पावतो. असा १३४ व्या श्लोकाचा भावार्थ दिसतो.)

ललितादित्य दिग्विजयाला निघाला असतांना प्रतिपक्षी राजे त्याच्यापुढें विनय नम्र होऊन, हात जोडून, त्याच्या पुढें उभें राहतांच, तो आपली युद्धाची हांव सोडून देत असे. तो हल्ला करीत असतांना त्याच्या रणभेरींचा भीषण रव ऐकून शत्रूंच्या नगरींतील प्रजा घाबरून घरें सोडून बाहेर पडत. तो जणों त्या नगरींचा गर्भपातच होत असे. त्याच्या प्रतापामुळें शत्रुस्त्रियांचे सौभाग्यतिलक गळून पडत, व नेत्रांतून अश्रुधारा वहात, त्याच्या द्वारें त्या जणों आपल्या पतींना कुंकुमयुक्त निवापांजलीच देत आहेत, असें वाटे.( स्त्रियांनीं निवाप जल देतांना त्यांच्यांत थोडेसें कुंकुम व चंदन घालण्याचा प्रघात आहे.) (१३०) प्रत्यहि सर्व पृथ्वीची प्रदक्षिणा करणाऱ्या सूर्याप्रमाणें त्या विजयेच्छू राजाचे बहुतेक दिवस दिग्विजय यात्रेंतच जात होते. पूर्व दिग्भांतील करभार वसूल करीत असतांना त्यानें

आपल्या मस्तकावरील कीर्तिरूपि वस्त्रानें अंतर्वेदांतील सर्व भाग चांगला शोभाविला होता. ज्या गाधिपुरांत पूर्वी वायुदेवानें कन्यांना कुब्जत्व दिलें होतें, तेथेंच त्या प्रथितयश राजानें आपल्या शौर्यानें तेथील योध्यांना आपल्या पाठी वाकाविण्याला लावले होते. (गाधिपुर=हल्लींचें कनोंज शहर-हे नांव त्याला तेथील पौराणिक गाधीराजाच्यावरून पडलें होतें. त्याच गाधि राजाच्या वंशांत विश्वामित्र पैदा झाले.)

ललितादित्यानें तेथील राजा यशोवर्मा याची सेनारूपी वाहिनी-नदी-क्षणभरांत सुकवून टाकली आणि त्या योगानें अद्रिवाहिनीना-पहाडी नद्यांना-एकदम सुकवून टाकणाऱ्या आदित्याच्या प्रखर तापाची प्रौढी मिळविली. तेव्हां त्या विचारी व कारस्थानी अशा कान्यकुब्ज देशाच्या राजाने, त्याचें वर्चस्व कबूल केलें आणि त्या उग्र प्रतापी ललितादित्यापुढें प्रथम आपली पाठ नमविली आणि नंतर तो त्याचा मांडलिक बनला. चंदनवनांतून येणारा परिमळ वासंतिक परिमळाहून उग्र असतो. त्याप्रमाणें ललितादित्याच्या बरोबरीचे मंत्री, त्याच्याहूनहि जास्त मानी असत. यशोवर्म्याशीं झालेल्या तहामध्यें यशोवर्म्याचें नांव प्रथम घातलें होतें यामुळे त्याचा संधिविग्राहक मंत्री मित्रशर्मा याला त्याचें औपचारिक महत्त्व, आपला मालक ललितादित्य याच्यापेक्षां अधिक झालें, असेही वाटले, व त्याला गोष्ट खपली नाही. त्यानें त्याला हरकत घेतली. इतर सेनानायक लढाई फार दिवस लांबल्यामुळें यासंबंधाने मित्र-शर्म्याला नांवें ठेवूं लागले. पण राजाला मंत्र्याचा आग्रह पसंत पडला. पुढे युद्ध होऊन त्याच्यांत यशोवर्म्याचा पुर्ता पराजय झाला. ललितादित्यानें त्याचीं १ महाप्रतिहारपीडा २ महासंधिविग्रह, ३ महाअश्वशाला ४ महाभांडागार व ५ महासाधनभाग, अशी पांचहि महाबिरुदें काढून घेऊन, ती मित्रशर्म्याला दिली आणि यशोवर्म्याच्या पुर्वार्जित कीर्तीचें समूळ उच्चाटण केलें. पुर्वींच्या अठरा कचेऱ्या-कारखान्यावर-ही पांच बिरुदे प्रमुख करण्यांत आली. या महाबिरुदांच्या कामांवर शाही व दुसरे राजपुरूषच नेमले जात असत. त्या यशोवर्म्याची पूर्वार्जित कीर्तीच अवशिष्ट राहिली आणि कान्यकुब्ज देशाचा यमुनेच्या पलिकडील कालिका नदीपर्यंतचा भाग, ललितादित्याचा जणो गृहागण झाला.

(शाही घराणें गजनवी घराण्याच्या पूर्वी काबूल व गंधार या प्रदेशावर राज्य करीत असलेलें हिंदु राजघराणे होतें. त्यालाच आल्बिरूनीनें काबुलाचे हिंदुशाही राज-घराणे म्हटले आहे. पुढें कल्हणानें शंकरवर्म्याच्या वेळीं, ललिय नांवाच्या प्रबल अशा शाही राजाचा उल्लेख केला आहे तो आणि आल्बिरूनींने दिलेला कमल नांवाचा हिंदुशाही राजा हे एकच असावेत. येथे उल्लेख केलेले शाही याच घराण्यांतले होते.

शाही हें राजघराण्याचें नांव काबूल व गंधार येथें, पूर्वीपासून राज्य करीत अस-लेल्या निरनिराळ्या जातींच्या राजधराण्यांना लावण्यात आलेलें आहे. तेव्हां तें पद या हिंदूशाहीच्याहि पूर्वीपासून उपयोगांत होतें; असे खात्रीपूर्वक म्हणतां येते.

ते लोक तुर्की असून मूळ तिबेटांतून आलेले होते, अशी लोकांची समजूत अस-

त्याचें अल्बिरुनी म्हणतो व याचें प्रत्यंतर औक ओंग याच्या लेखावरूनहि मिळतें. तो ई. स. ७५३ ते ७६४ पर्यंत, गंधारला गेला असतांना, तेथील मुख्य अधिकार मूळच्या तुर्क वंशीय राजघराण्याकडे होता, असें त्यानें लिहिलें आहे, ते लोक ललितादित्याचे समकालीन असून, त्यांच्यापैकीच कोणी त्याचा तावेदार झाला असावा.

**कालिकानदी**:—ही बहुधां हल्लींची काली नदी असावी. ती गंगेच्या उजवी कडून तिला समातर वहात जाऊन, कनोजच्या खालीं कांहीं अंतरावर गंगेला मिळते. ह्वेनत्संग या चिनी प्रवाशानें, कनोजच्या राज्यविस्ताराच्या केलेल्या वर्णनावरून, त्या राज्यांत गंगापारचाहि पुष्कळसा भाग सामिल होता, असें दिसते. त्याला हे वर्णन कांहीसें आड येतें. पण ह्वेनत्संगचें वर्णन हर्ष वर्धनाच्या वेळचे आहे. शिवाय कल्हणानें दिग्विजयाचें वर्णन करण्यात बराच अलंकारिक भाग व कविकल्पना घातलेली आहे त्याला या प्रदेशाविषयी प्रत्यक्ष पक्की माहिती होती असे दिसत नाहीं. )

यशोवर्म्याच्या पदरी वाक्पति व भवभूती, हे महाकवी, त्याचे स्तुतिपाठक होते. या पराभवानंतर खुद्द यशोवर्मा ललितादित्याचा स्तुतिपाठक बनला

गंगानदी आड आलेल्या हिमाचलरूपी अडचणीचे उल्लंघन करून जाऊन पूर्वसमुद्र गाठते, त्याप्रमाणें ललितादित्याची सेना, त्या यशोवर्म्याचे आतिक्रमण करून पूर्व समुद्राला पोचली. तिच्यात अगणित कलिंगदेशीय हत्ती होते. त्यांनी ती आपली जन्मभूमी पाहिली. तेव्हां त्यांना तेथून मोठ्या कष्टानेंच पुढे न्यावे लागले. ( कलिंग-ओडीसा प्रांताच्या नैऋत्येकडील समुद्रकाठचा प्रदेश. हल्लींचे मद्रास इलाख्यातील गंजम व विजगापट्टण जिल्हे. )

लक्ष्मीचा पर्यंकवाहक गजेंद्र, राजाच्या सैन्याबरोबर होता. त्याच्या स्नेहामुळें आकर्षित झालेले पुष्कळसे गौडदेशीय गज, त्याला येऊन मिळाले. त्याची आघाडी पूर्व समुद्रावर पोचली तेव्हां, त्या अगणित हत्तींच्या शुंडादंडांनीं त्या सागराचा केशपाशच जणो ओढला जात आहे, असे दिसत होते. ( गौड-हल्लीचा बंगाल देश ) ( १५० )

तिकडून त्याने सागर तीरावरील निबिड अरण्यांतून दक्षिण दिशेकडे मोर्चा फिरविला. त्याच्या तरवारीनी त्याच्या शत्रूला यमाकडे रवाना केले. कर्नाट लोक उंच शिरोभूषणें घालतात. ते त्याचा प्रताप पाहून त्याला शरण आले. त्याकाळीं दाक्षिणापथांत सुप्रसिद्ध चंचल नेत्रीं रट्टाराणी राज्य करीत होती. तिनें दुर्गादेवीप्रमाणें प्रभाव गाजवून, साऱ्या विंध्य वनांतील मार्ग निष्कंटक करून टाकले होते. ती राणी, ललितादित्याला शरण आली. आपलें सुंदर मुख त्याच्या चरणनखदर्पणांत प्रतिबिंबित करण्यांत तिला आनंद वाटला. ( रट्टा ही राष्ट्रकूट घराण्यातील एक सुप्रसिद्ध राणी असावी. या राष्ट्रकूट राजाचा महाराष्ट्रावर अंमल होता व त्यांनीं कर्नाटक देशहि जिंकून घेतला होता. )

त्याचे वीर ताडवृक्षाखालीं बसून नारळाचें-नीरु-पीत असतांना कावेरी तीरावरील

थंडगार वाऱ्यानें त्यांचा श्रमपरिहार होत असे. श्रीखंड-चंदन-वृक्षांच्या शाखांवरून सरकणारे कृष्णसर्प, हे जणों त्या राजाच्या भयाने त्या चंदनाद्रीने उपसलेल्या तरवारीसारखे भासत होते. उथळ नदी उतरताना पाण्यात ठेवलेल्या दगडांवरून पाय ठेवून जातात, त्याप्रमाणें तो राजा लहान मोठया बेटांवरून सागराचें लंघन करून द्विपांतराला जाऊन आला.

समुद्राच्या लाटांच्या घोषानें जणों मोठ्याने जयघोष व मंगल गीत गायनच होत असतांना, त्या थोर व दिग्विजयी राजानें पश्चिम दिशेकडे तोंड वळविलें. सहस्ररश्मी सूर्य आपल्या सप्त अश्वांनीं सप्त द्वीपाचे आक्रमण करतो, त्याप्रमाणें त्या राजानें आपल्या प्रखर प्रतापाने कोंकणादि सप्त प्रदेशांचे आक्रमण केलें. पश्चिम सागरावरील वायूनें क्षुब्ध झालेल्या लाटानी व्याप्त अशा जलधीनें वेढलेली द्वारकापुरी पाहून त्याच्या सैनिकांना, तिच्यांत प्रवेश करण्याची उत्कट इच्छा झाली. (१६०) त्याच्या सैन्याच्या प्रयाणानें मार्गांत उडालेल्या धुरळ्याने सारें आकाश आच्छादित होऊन आकाश व पृथ्वी एकच झालेलीं दिसत होतीं व त्यामुळें जणों विंध्याद्रि क्रोध ताम्राक्ष होऊन व मर्यादा उल्लंघन करून पुनः उभा राहिला आहे असें वाटत होतें.

यानंतर त्या राजानें आपल्या गजपंक्तीसह अवंति नगरींत प्रवेश केला. ( द्वारकेंत पोंचल्यानंतर तो पुनः उज्जनीस गेल्याचे हे वर्णन चमत्कारिक आहे. तें इतर महा कवींनीं वर्णिलेल्या दिग्विजयाला अनुसरून येथे दडपून दिलेले दिसते. त्याच्यांत ऐतिहासिक सत्य विशेष आहे असें वाटत नाहीं. ) तेथे जणो महा काळाच्या किरीटांतिल चंद्रकलेच्या कांतीनें त्याच्या गजांचे दंत फुटूं तडकूं लागले.

पुढें सर्व दिशा जितप्राय आणि सर्व राजे वशंगत झालेले पाहून ललितादित्याने अत्यंत विस्तीर्ण अशा उत्तरापथांत प्रवेश केला. तिकडील मोटमोठया व प्रतापी राजांशी त्याचे घनघोर युद्ध झाले. त्यावरून पक्षच्छेदोद्यत इंद्रानें पर्वतांशी केलेल्या युद्धाचे स्मरण होत होतें.

त्याने कांबोजाधिपतीच्या सर्व अश्वशाळा उधळून टाकल्या. तेव्हां त्या अंधेऱ्या पागा जणों काळ्याकुट्ट महिषांनीं भरल्यासारख्या भासूं लागल्या. त्याचें सैन्य पाहून तुहक्कार लोक आपले घोडे सोडून उंच पर्वत भागात पळून गेले. तिकडे अश्वमुखी किन्नर त्यांनीं पाहिलें. तेव्हां त्यांनीं आपल्या घोडयांची आशा व इच्छा सोडून दिली. ( कांबोज व काबूल हे देश घोडयाच्या पैदायशीविषयीं प्रसिद्ध होते. हल्लीं सुद्धां तिकडील पुष्कळसे घोडे हिंदुस्थानात प्रतिवर्षी विकावयास येतात.

तुहक्कर-हे लोक आक्सस नदीच्या खोऱ्यांत रहात असत. कांहीं प्रतीत तुहक्करच्या ऐवजी बहक्कर-बुखारा असें लिहिलें आहे. पण तुहक्कर किंवा बुखारा निरनिराळे होत. यावरूनच ठाकूर-ठक्कर हा शब्द निघाला आहे किंवा काय अशीहि शंका येते.

त्या राजानें मम्मुनीचा तीन वेळां पराभव केला. तेव्हांच तो त्याचा खरा पराभव झाला असें वाटले. खऱ्या शूर लोकांना शत्रूचा एकादे वेळीं केलेला पराभव आकस्मिक व घूणाक्षर न्यायानें झाला असेल असें वाटतें.

भौत किंवा भूतानचे लोक यांना त्याच्यामुळें काळजी वाटून त्यांचीं तोंडें फटफटित पडलीं. पण त्यांचे चेहरे मूळचेच पांढरे फटफटित व कळाहीन असल्यामुळें त्यांच्यामध्यें कांहीं फरक दृष्टीस पडला नाहीं. माकडाचें तोंड मूळचेच पिंगट, लाल असतें. यामुळें त्याला राग आल्यानें त्याचें तोंड निराळें लाल झालेलें कसें दिसणार ?

उदयोन्मुख सूर्यमंडळाला पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांमधील वनज्योत्स्नांचा प्रकाश खपत नाहीं, त्याप्रमाणें त्या राजाला दरद लोकांचें सारखें चाललेलें मद्यपान आवडलें नाहीं. उत्तरा पथांतील मृगनाभी व केशर कुसुम, यांना स्पर्श करून येणारा सुगंधयुक्त शीतल वायु, त्याच्या सैनिकांपुढें परिचारकांप्रमाणे सेवेत तत्पर व हजर होता. (१७०)

यानंतर तो ईशान्येकडील प्रदेशांत शिरला. तिकडे प्राग्जोतिषपुर विराण झालेले होतें. तिकडे त्याना वनांत पेटलेल्या कृष्णागुरु वृक्षापासूनच सुगंधी धूप प्राप्त झाला.

पश्चिमेकडील सागरासारख्या पसरलेल्या रुक्ष वालुकामय मरुभूमींत त्या राजाचें प्रचंड गजेंद्र, नक्रासारखे दिसत होते. तसेच स्त्रीराज्यांत त्याच्या शूर वीरांना तेथील स्त्रियांच्या सैन्यानें गजांच्या कुंभाकार घटांच्या ऐवजीं, आपल्या उत्तुंग स्तनकुंभांनीच हत-वीर्य केलें. तेथील राणीच त्या राजापुढे गेली, तेव्हां तिला भीतीमुळे त्रास झाला किंवा प्रेमामुळे त्याचा अभिलाष वाटला, हें ठरविणें कठिण होतें.

गरुडाच्या भीतीमुळें मोठमोठें नाग आपापल्या बिळांत लपतात. तद्वत उत्तर कुरु देशांतील राजे त्याच्यापुढें, त्यांना आश्रय देणाऱ्या वृक्षांमध्ये दडून बसले. गजमौक्तिकानी भरलेल्या नखांसह सिंह आपल्या गिरि गुहेत प्रवेश करतो त्याप्रमाणे वियज व संपत्ति संपा-दन करून तो राजा आपल्या राज्यांत परत आला.

त्यानें जालंदर, लोहर, वगैरे राज्यें स्वतःच्या पराक्रमाने काबिज केलीं आणि आपल्या सेवकांना तेथील राजे नेमले. ( जालंदर—हल्लींचें जालंदर शहर व परगणा. पूर्वी त्या राज्यात त्रिगर्त किंवा कांगडा आणि बियास नदीच्या खोऱ्याच्या वरचा पहाडी भागहि सामिल होते. )

पराजित राजे व लोक यांच्याकडून तो आपल्या विजयाची द्योतक बिरुदे व चिन्हें धारण करवीत असे. तीं तें अद्यापि नम्रपणे भूषण म्हणून धारण करीत आहेत. त्याने तुरु-ष्कदेशीय लोकांना आपले हात मागे करण्याला व अर्ध्याच मस्तकाचे मुंडण करण्याला लावले. तसे ते अद्यापि करीत आहेत. तसेच दाक्षिणात्यांचे तिर्यक्त्व व्यक्त होण्यासाठीं त्याने त्यांना, आपल्या नेसलेल्या धोत्राचे सोगे, मागें जमीनीपर्यंत पुच्छासारखे लोळणारे लांब ठेवावयाला लावलें. (१८०) ( तुरुष्क वगैरे लोकांमध्ये या चाली हल्ली सुद्धां दिसून येतात. यारकंदी व तिबेटी लोक काश्मीरांत अद्यापि हात मागे बांधल्यासारखे धरून चालत अस-तात. तसे काश्मीरांतील हिंदु मुसलमान चालत नाहींत. दक्षिणी व बंगाली लोक नेसलेल्या धोत्राचे सोगे मागे शेपटासारखें सोडतात. तें पाहून काश्मीरी लोकांना चमत्कार वाटतो.

सागर राजानें म्लेंच्छांना आपली केशरचना निरनिराळ्या तऱ्हेची करण्याला भाग पाडले होते, असे हरिवंशांत वर्णन आहे. )

या राजानें जेथें देवता प्रतिष्ठा करविली नाहीं, असें एकहि गांव, नदी, समुद्र, किंवा बेट नाहीं. अशा रीतीनें त्यानें स्थापन केलेल्या धर्मकृत्यांना, त्या त्या कृत्यांना अन्वर्थक किंवा प्रसंगाला शोभणारीं अशीं त्यानें नांवें दिलीं. त्यानें दिग्विजयाचा निश्चय केला तेव्हां प्रारंभीं त्याचे स्मारक म्हणून सुनिश्चितपुर वसविलें व दिग्विजय आटपून आल्यावर तद्विषयक दर्प किंवा प्रौढी द्योतक दर्पितपुर वसवून, तेथें केशव देवाची स्थापना केली. त्यानें फल गृहण केलें तेथें फलपुर व पर्ण गृहण केलें तेथें पर्णोत्स, हीं गांवें स्थापन केलीं. क्रीडा करण्याच्या जागीं क्रीडाआराम नांवाचा विहार बांधविला. स्त्रीराज्यांत त्यानें नृसिंहाची स्थापना केली. त्या मूर्तीला लोहचुंबकाच्या द्वारे अधात्री टांगून वर खाली करण्याची व्यवस्था केलेली होती. तो दिग्विजय करीत फिरत असतांना मार्गे त्याच्या कारागिराने ललितपुर वसविले. त्यानें त्या नगरांत आदित्याची स्थापना करून आढ्यतेने त्याच्या खर्चाकडे कान्यकुब्ज देशातील घेतलेले सारे गांव धर्मार्थ लावून दिले होते. तसेंच त्या थोर व उदार राजानें हुष्कपुरांत श्रीमुखस्वामींची स्थापना केली आणि तेथेंच एक मोठा विहार व एक स्तूप असे बांधविले.

( फलपुर हें गांव परिहासपुराजवळ वितस्ता व सिंधु यांच्या संगमाजवळ असावें.

पर्णोत्सः—हल्लींचें पूंच किंवा प्रूंन्त्स नावाचें गांव. त्याच्यावरून हल्लीच्या पूंचच्या लहानशा पहाडी संस्थानाला नाव पडलेलें आहे. तेथील संस्थानिक काश्मीरच्या राजांच्या आप्तांपैकी आहे. व्हेनत्संग काश्मीराहून राजपुरीला याच गांवावरून गेला होता. त्यानें त्याचें नांव पुनत्सो, असें दिलें आहे.

क्रीडाआराम विहाराचा पुनः कोठें उल्लेख आलेला नाहीं व त्याचे स्थळहि नक्की ठरलें नाहीं.

ललितपूरः––ललितादित्यपुर हल्लींचें लाटपूर. तें विही परगण्यांत वितस्तेच्या तीरावर आहे. या जागीं पूर्वी ललितादित्यानें स्थापलेलें मोठें नगर होते, असे तेथील लोक सांगतात. पण जुन्या इमारतींचे अवशेष जवळपास कोठें दिसत नाहीत.

हुष्कपुरः—वराहमूल घाटाच्या आग्नेयीस सुमारें दोन मैलांवर असलेलें उस्कूर नांवाचें खेडें. तें हुष्क नांवाच्या तुर्की राजाने वसविलें.

कल्हणाने ललितादित्यानें बांधलेल्या विहाराचें नांव दिलेलें नाहीं. पण तें मुक्तापीड विहार असावें. तो विहार ओक ऑंग या चीनी प्रवाशाने पाहिला होता. तो फार मोठा भव्य व प्रेक्षणीय होता, असे त्यानें वर्णन केलें आहे. तेथील स्तूपहि अजूनपर्यंत कायम होता. तो ई. स. १८८२ त कोणी ग्यारिक नांवाच्या साहेबानें खोदवून पाहिला. या पलीकडे त्याच्याविषयीं जास्त माहिती मिळत नाहीं.

उस्कूर व बारामूल घाटाची टांग्याची चौकी. यांच्यामध्यें अर्ध्या मैलावर एक दहा फूट उंच असें प्रचंड शिवलिंग उभें आहे. त्याच्या आसपास पुष्कळशा जुन्या इमारतींचे अवशेष आहेत. )

दिग्विजयाला निघतांना ललितादित्यानें एक कोटी दिनार बरोबर घेतले होते. तो आटपून परत आल्यावर त्यानें प्रायश्चित्तप्रीत्यर्थ भूतेशाला अकरा कोटी दिनार अर्पण केले. त्यानें ज्येष्ठेश्वराचें एक मोठें दगडी देवालय बांधविलें.

( एक व अकरा कोटी ही संख्या त्या वेळच्या चालू दिनाराची आहे. काश्मीरी लोकांना परदेशी-काश्मीराबाहेर-प्रवासाला जाऊन परत आल्यावर प्रायश्चित्त घ्यावें लागतें. ही चाल आजपर्यंत चालू होती. दिग्विजयांत ललितादित्य राजाला अनेक म्लेंच्छ वगैरे हीन समजले गेलेल्या लोकांशीं संबंध आलेला असल्यामुळें त्याला प्रायश्चित्त घेणं भाग पडलें होतें.

ज्येष्ठेश्वराचें दगडी मंदिर बुत्सर येथील भूतेश्वराच्या देवालयाजवळच बांधलेलें होतें. हल्लीं त्या जागीं या दोन्ही देवळांचे अवशेष जवळ जवळच आढळतात. )

ज्येष्ठेश्वराच्या मंदिराच्या खर्चाकडे त्यानें कित्येक गांव व जमीनी लावून दिल्या. ( १९० ) त्यानें चक्रधर येथें ( उंचवट जमीनीला पाणी मिळण्यासाठीं ) वितस्तेला पुष्कळशा रहाटाच्या ओळ्या बांधवून त्यांच्यापासून अनेक गांवांना पाणी पोचविण्याची व्यवस्था केली. मार्तांडाचें प्रचंड व प्रेक्षणीय मंदिर व त्याच्यासभोंवारचा सुंदर भक्कम दगडी कोट ही ललितादित्य राजानें बांधविली व त्याच्या आसपास एक मोठें शहर वसविलें. तें द्राक्षवेलींनीं जसें गच्च भरलेले होते तसेच त्यानें लोकपुण्याजवळ एक नवीन गांव वसवून तेथें सर्व प्रकारच्या सोयी करविल्या आणि तो गांव व दुसरीहि कांहीं खेडीं श्रीविष्णूच्या नांवानें अर्पण केला.

( श्रीमार्तांडाचें मंदिर-साऱ्या काश्मीर मंडलांत एव्हढें प्रचंड व सुरेख दगडी मंदिर दुसरें नव्हतें. तें मतन जवळ एका उंच व विस्तीर्ण उदाराच्या किंवा पठाराच्या टोंकाला बांधलेलें होतें. त्या पठाराच्या तळाशीं मार्तांड तीर्थाचे झरे-नाग व कुंड-आहेत. या मंदिराचे अवशेष हल्लींसुद्धां फारच विस्तीर्ण, प्रेक्षणीय व महत्त्वाचे आहेत. यामुळें त्याचें वर्णन अनेक साहेबांनी तपशीलवार केलेले आहे. त्यांत फरग्यूसन साहेबांनी वास्तुशास्त्राच्या दृष्टीनें केलेले वर्णन, उत्कृष्ट व वाचनीय आहे. तें मंदिर, सुल्तान शिकंदर बुतशिकन यानें उध्वस्त केलें, असें जोनराज यानें आपल्या राजतरंगिणीच्या पुढील ऐतिहासिक चालू भागांत लिहिलें आहे. हल्लीं मूळच्या मार्तांडाच्या मंदिराच्या जागीं पूजाअर्चा वगैरे कांहीं होत नाहीं. ती यात्रेकरू लोक झऱ्याजवळच्या एका अर्वाचीन मंदिरांत करतात. हें मंदिर आदित्याचें होतें.

लोकपुण्य हें नाग, झरे किंवा तीर्थ, ब्रिंग परगण्यांतील लारिकपुराजवळ होतें. हल्लीं ते वीराण आहे. त्या जागीं त्या कुंडाच्या काठावर जुन्या मंदिराच्या दगडांनीं बांधलेली एक मुसलमानी तऱ्हेची बाराद्वारी आहे.)

त्या देवेंद्रतुल्य थोर राजानें इंद्रपुरीलाहि लाजविणारें परिहासपुर नगर वसवून, तेथें परिहास केशवाची रुप्याची मूर्ति स्थापन केलीं. सागराच्या पृष्ठभागावर सुखशयन करीत

असतांना, श्रीजलशायी विष्णूचा देह अंगावरील मोत्यांच्या किरणांनीं दैदिप्यमान होत असतो, तशी ती रुप्याची मूर्तीहि चकाकत असे. त्यानें मुक्ताकेशवाची सुवर्णाची मूर्तीहि तयार करविली होती. ती श्रीविष्णूच्या नाभिसरोजाच्या गर्भातील किंजल्क पुंजाप्रमाणें भासत असे. शिवाय त्यानें एक महावराह देवाची मूर्ति तयारी करविली होती. तिच्या अंगावर सुवर्णाचें कवच होते. त्याच्या योगानें ती पातालांतलिहि गाढ तमाचें हरण करणाऱ्या, दैदिप्यमान सूर्यमंडलाप्रमाणें चमकत असे. त्याने श्रीगोवर्धन देवाची रुप्याची मूर्ति करविली. तिचा वर्ण गोकुलांतील गाईंच्या दुधाच्या पूराप्रमाणें पांढरा शुभ्र होता. तसेच त्यानें एक चोपन्न हात उंच असा एक सांधी, पाषाणाचा खांब उभा करवून त्याच्यावर दैत्यारि श्रीविष्णूचें वाहन गरुड याची स्थापना केली होती.

तो राजा निरभिमानी व निर्द्रोह होता. त्याच्याजवळ उमाप संपत्ति होती. त्यानें सदासंपन्न असा राजविहार बांधविला. त्याच्यांत मोठा थोरला चौक होता. त्याच्याजवळच एक मोठे चैत्याहि बांधविलें आणि त्या चैत्यात एक भली मोठी जिनाची-बुद्धाची, बृहद्बुद्धाची-मूर्ति उभी करविली होती. ( २०० )

श्रीमुक्ताकेशवाची सुवर्णाची प्रचंड मूर्ति त्यानें करविली होती. तिचे वजन चौऱ्यांशी हजार तोळे होते. तितकेंच पलभार चांदीची परिहास केशवाची सुप्रसिद्ध अशी मूर्तीहि त्यानें करविली. याशिवाय त्यानें करविलेल्या बृहद्बुद्धाच्या मूर्तीचे वजन चौऱ्यांशी हजार प्रस्थ होतें. ती मूर्ती फारच उंच होती. या सर्व मूर्तीसाठी त्यानें, तसेच मोठें, शोभिवंत व हवेतसे सोयीचे चौक आणि चैत्य वगैरेहि बाधविले. त्या प्रतिकुबेर राजाने त्या त्या मुख्य मूर्तींच्या बाजूला इतर देवतांच्या सोन्या रुप्याच्या मूर्तीहि तयार करवून बसविल्या होत्या.

( तोलक=हल्लींचा तोळा. तो अबूलफजलच्या वेळेपूर्वीपासून आतांपर्यंत सोळा माशांचा व शहाण्णव रतींचा आहे. हिंदुस्थानांत तो बारा माशांचा असून एक माशा आठ गुंजाचा किंवा रतीचा चालू आहे.

४ तोळे = १ कर्ष किंवा पल.

१६ पल = १ प्रस्थ.

१ पल = $\frac{1}{20}$ शेर.

त्यानें या मंदिरांना अर्पण केलेले गांव, संपत्ति व सेवेकरी यांची गणति तरी कोण करूं शकेल? त्याचे आप्त, राण्या, मांडलिक, मंत्री, वगैरेंनींहि त्याचें अनुकरण करीत, त्या नगरांत शेंकडो मूर्ति स्थापन करविल्या.

त्याची राणी कमलवती प्रत्यक्ष कमलालया लक्ष्मीशीं स्पर्धा करीत असे. तिनें कमलाहट्ट नांवाचा बाजार वसविला आणि कमला केशवाची एक मोठी थोरली चांदीची मूर्ति करवून तिची स्थापना केली.

त्याचा प्रधान मंत्री मित्रशर्मा यानें मित्रेश्वर शंकराची आणि लाट येथील मांडलिकानें कैय्यस्वामी, यांची स्थापना करविली होती. शिवाय कैय्यानें एक सुप्रसिद्ध असा

कैय्य नांवाचा विहारहि बांधविला होता. त्या विहारांतच जणों जिनाचा अवतार, असा सर्वज्ञमित्र नांवाचा भिक्षू राहात होता.

( लाट-मध्य व दक्षिण गुजराथ प्रांताचें प्राचीन नांव. )

तुःखार देशीय चंकुण मंत्री, यानें चंकुण विहार बांधविला व त्या राजाच्या थो चित्तापेक्षांहि उंच असा एक स्तूप तयार करविला आणि जिन देवाच्या सुवर्णाच्या मूर्तीहि बनविल्या. त्याची पत्नी ईशानदेवी इनें एक उत्कृष्ट तीर्थ-कुंड-बांधविलें. त्याचें पाणी स्वच्छ गोड व रोग्यांना अमृतासारखें आरोग्यदायक होतें.

( तुःखार चंकुण हें नाव तुर्की व चिनी भाषांमधील अपभ्रष्ट रूप दिसतें. त्याचं कोणच्याहि संस्कृत शब्दांशीं किंवा नांवांशीं साम्यता नाही. चंकुणाचा श्रीनगरांतील विहार, कल्हणाच्या वेळेपर्यंत कायम होता. जयसिंह राजाचा मंत्री रिल्हण याची पत्नं सुस्सला, इनें त्याची दुरुस्ती करविली होती. कल्हणाने पुढें बुद्धाची मोठी मूर्ति पाहिल्याचें लिहिलें आहे. ती मूर्ति याच विहारांतली, परिहासपुरातील नव्हे, कारण त्याच्या वेळी परि हासपुर वीराण झालेले होते. )

ललितादित्याची राणी चक्रमर्दिका इनें चक्रपुर वसविलें व त्याच्यात सात हजा घरें बांधविलीं. भप्पटाचार्यानें, भप्पटेश्वराची स्थापना केली. तसेंच दुसऱ्या काहीं लोकान रंकटेशादि शेंकडों देवाच्या स्थापना करविल्या.

मुख्य मंत्री चंकुण यानें श्रीनगरांत चैत्य व विहार बांधविले. अशा प्रकारच्या धर्म कृत्यांमध्यें श्रेष्ठ प्रकारचें होतें. चंकुणाचा एक जांवई ईशानचंद्र वैद्य, यानें तक्षक नागाच्य प्रसादानें पुष्कळशी संपत्ति मिळवून, एक उत्तम विहार बांधविला.

याप्रमाणे त्या पृथ्वीपतीनें सर्व पृथ्वी जणों सुवर्णमय केली होती. त्याने शौर्य औदार्य, वगैरे गुणानीं इंद्रालाहि मागें टाकलें होतें. त्याच्या तोंडून सहज निघालेल आज्ञा देव देखील उल्लंघन करींत नसत. एकदा तो सैन्यासह पूर्व समुद्र तीराव तळ देऊन राहिला असतांना. त्यानें कपित्थ फलें आणण्याविषयीं आज्ञा केली ! ती ऐकू त्याचे सेवक स्तब्ध झाले. ती फळें कोठून आणावीं, हें त्यांना कळेना. ते कुंठित झाले तितक्यात एक दिव्य वेषधारी पुरूष, तीं फलें घेऊन राजापुढें प्रकट झाला ( २२० राजाच्या भ्रूसंकेता अन्यवें द्वारपालानें पुढें होऊन ती फलें घेतलीं व त्या दिव्य पुरुषाल आपण कोणाचे सेवक, कोठून आलां ? असें विचारले. त्यावर त्यानें, ' मी इंद्राच्य नंदनवनांचा रक्षक, इंद्राकडून आलो ' असें कळविलें आणि, 'इंद्राचा निरो एकांतात सांगावयाचा आहे'. असे म्हटले. त्यावर द्वारपालानें तेथून सर्वांना दूर के नंतर त्या दिव्य पुरुषानें राजाला म्हटलें, 'हे राजा, इंद्राची तुला एक प्रार्थना आहे. त कटु तरी तुमच्या हिताची आहे. तेव्हां त्याबद्दल क्षमा असावी. ती प्रार्थना हीच कीं आम्ही चतुर्युगीचे दिक्पाल, तरी या कालियुगांत तुझ्या आज्ञा मानतों. याचें कारण, एका पूर्वीच्या जन्मीं, एका धनाढ्य सावकाराच्या घरीं एक शेतकरी होतास. ग्रीष्म ऋतुं

एके दिवशीं, तूं नागर हांकून अगदीं थकला भागलेला, निर्जल, अरण्यप्राय भागांत पोंचलास. तेथें त्या सावकाराच्या सेवकांनीं तुजसाठीं पाण्याची झारी व कांहीं अपूप-घारगे-आणून दिले. तू हातपाय धुवून, ते खावूं लागणार, इतक्यांत एका क्षुत्क्षामकंठ ब्राह्मण अतिथीनें तुला म्हटलें, 'अरे, माझे भुकेने प्राण कासाविस होताहेत. तूं हें न खातां मला खाण्यास देऊन माझे प्राण वांचीव'. (२३०) हे ऐकून, तूं तुझे सोबती नको म्हणत असलेलें न ऐकतां, त्याच्यांशीं गोड बोलून, त्याला आपलें अर्धे पाणी व अपूप दिलेस. या तुझ्या कळकळीच्या व सत्पात्री दानामुळें तुझ्या शंभर आज्ञा अखंडित पाळल्या जाव्या, असें स्वर्गलोकीं ठरविण्यांत आलें. त्या वेळच्या तुझ्या जलदानाऐवजीं, तूं इच्छा करशील तेथें -प्रत्यक्ष मरुदेशांत देखिल-तुझ्या मार्गांत सुखदायक नद्या पैदा होतील. उत्तम क्षेत्रांत लावलेला हा दानरूपीवृक्ष, प्रिय भाषणरूपी आळ्याने वेष्ठित, निर्मल अंतःकरणाची प्रसन्नता रूपी जलाने सिंचित होत्साता, दात्याला अभीष्ट फलप्रद व सदासर्वदा प्रफुल्लित राहून कल्पवृक्षावरहि मात करतो. हे राजा, तुझ्या आज्ञा अनुल्लंघनीय, तरी परिमित आहेत. त्या तूं आजवर बऱ्याच अविचारानें देत आला आहेस. आतां त्या थोड्याशाच उरल्या आहेत. तूं खरा सज्जन. तुजकडून अविचार कां बरें व्हावा ? हीं फलें काश्मीरांतहि ऐन वर्षाऋतूंत क्वचित उत्पन्न होणारी, तीं या पूर्व समुद्रावर, शरदृतूंत कशीं मिळणार ? तू जाशील तिकडील दिक्पालांना, तुझ्या आज्ञा मानाव्या लागतात. या माहेंद्री दिशेला तूं आलेला. तुझी आज्ञा अकुंठशक्ति इंद्रानें कशी तरी बजावली आहे. पण तशा विशेष महत्त्वाच्या प्रसंगाशिवाय असल्या आज्ञा खर्ची टाकणे योग्य नाहीं. कारण त्या आतां फारशा उरलेल्या नाहींत'. (२४०) असें बोलून तो दिव्यपुरुष गुप्त झाला. ( कपित्थफल या फलाच्या नांवाविषयीं गडबड झालेली दिसते. कपित्थ-कवठ-हे फल काश्मीरांत होत नाहीं व साऱ्या हिंदुस्थानभरहि दुर्मिळ आहे, असेहि नाहीं. राजानें त्या पूर्व समुद्रतीराच्या भागांत दुर्मिळ व त्याच्या आवडीचें काश्मीरांतच होणारें फल मागितलें असावें व तें बहुधां चेरी-पहाडी जांभूळ-असावें. )

त्याचा तो निरोप ऐकून त्या थोर राजाला दानाचें खरें महात्म्य कळलें. त्याला मोठें आश्चर्य वाटलें व तो मोठ्या विचारात पडला. तेव्हांपासून त्यानें दानाचें अपरिमित पुण्य मिळविण्याविसाठीं, परिहासपुरांत एक मोठा वार्षिक उत्सव चालू केला. त्याला सहस्रभक्त असें नांव होतें. त्याच्यांत तो एक लक्ष व एक इतकी अन्नपूर्ण पात्रें व दक्षिणा, याचक लोकांना दान देत असे. याच हेतूनें त्यानें ऊसर व क्षारयुक्त प्रदेशांत, तृषित लोकांना मनमुराद पाणी मिळण्यासाठीं, जागजागीं वस्ती करवून, पाणपोया घातल्या.

नाना वृक्षांवरून फुललेलीं फुलें वायु जमा करतो, तद्वत् त्यानें देशोदेशींहून विद्वान लोक बोलावून घेऊन, त्यांचा संग्रह केला होता. तुःखार देशचा रससिद्धी जाणणारा कंचनवर्ष नांवाचा गृहस्थ होता. त्याचा गुणी व थोर बंधु चंकूण याला त्यानें आपल्या पदरीं

ठेवलें होतें. तो किमयेच्या योगानें पुष्कळसें सुवर्ण तयार करून, ते राजाच्या खजीन्यांत शिल्लक टाकून, पुष्करिणी कमलाला संतोष देते तद्वत, तो त्याला आनंद देत असे.

एकदां त्या राजाची फौज पंचनदी किंवा पंजाब देशांत असतांना, एका नदील महापूर आल्यामुळें अडकून पडली होती. यामुळें राजाला काळजी पडली व त्यानें स मंत्र्यांना, नदी उतरण्याची अडचण दूर करण्याची योजना काढण्याविषयीं म्हटलें त्यांतच चंकूण 'नदीकांठीं' उभा होता. त्यानें आपल्याजवळचा एक मणी काढून तो त्य नदींत टाकला. त्याच्या प्रभावानें नदींचें पुराचें पाणी दुभागलें आणि त्याच्या मधून राज आपल्या फौजेसह उतरून गेला. ( २५० ) नंतर चंकुणानें दुसरा एक मणी टाकून त्याच्य द्वारें तो पहिला मणीहि काढून घेतला. तेव्हां पाणी पूर्ववत् झालें. हा अद्भुत प्रका पाहून राजानें चंकुणीची प्रशंसा केली आणि आदरानें ते दोन्ही मणी त्याच्याजवळ मागि तले. त्याला चंकुणाने हंसत म्हटलें, 'हे मणी मजजवळ आहेत तोंवरच त्याच्यामध्यें ह गुण असतो. ते आपल्याजवळ ठेवण्याचा उपयोग काय ? उत्तम वस्तूला विशिष्ट योग्यत प्राप्त होते ती दुसऱ्या सामान्य वस्तूंमध्यें ती उत्तम वस्तु असेल तोंवरच. ज्यांच्याजव अनेक उत्तम वस्तूंचा संग्रह असतो त्यांच्याकडे तिची किंमत किंवा महात्म्य काय असणार चंद्रकात मणी सागरापासून दूर असेल तोंवरच त्याच्या द्रवण्याचें महात्म्य. समुद्रांत तो कितीहि पाझरला तरी त्याचा पत्ता काय लागणार' ? हें ऐकून राजानें आश्चर्यानें म्हटले 'या मण्यांहूनहि मौल्यवान् वस्तु मजजवळ आहे, असे आपणाला वाटतें कीं काय ? त ती खुशाल घेऊन आपण हे मणी मला द्या.'

नंतर चंकुणानें विनंति केली, 'महाराज, हा आपला मजवर मोठाच उपकार आहे. मणी महाराजांना नजर आहेत. महाराजांनी माझी एक मागणी मान्य करावी. ती ही कीं, आपण मगध देशांतून गजस्कंधावरून श्रीसुगत देवाची मूर्ति आणलेली आहे. ती मल देण्याची कृपा करावी. संसारसागर तरणोपायाचे साधनभूत अशी ती मूर्ति, मला देऊ जलांतून पार उतरण्याचें साधनभूत हे मणि, आपण घ्यावे. ( २६० ) ( मगधचें राज गंगेच्या दक्षिण कांठावरील हल्लींचे गया व पटणा हे दोन जिल्हे होय. त्याच प्रदेशां बुद्धाचें पूर्ववय गेलें होतें. )

ही त्याची विनययुक्त प्रार्थना राजानें मान्य केली आणि त्याला ती जिनाची-बुद्धाची मूर्ति दिली. योग्य आणि वक्तृत्वपूर्ण प्रार्थना कोण मान्य करणार नाहीं ? ती मूर्ति त्य चंकुण सिद्धानें स्वतःच्या विहारात स्थापन केली. त्या मूर्तीचा वर्ण भिक्षूंच्या कौपीनाच्य रंगासारखा काषाय-पिंगट-व सतेज होता. तिच्या बैठकीभोंवतीं धातूचे पट्टे अद्यापि काय आहेत त्यावरून ती मूर्ति पूर्वी गजस्कंधावर बसविलेली होती हे स्पष्ट दिसत आहे. स्वत पृथ्वीसुद्धां थोर व प्रतापी राजाचे मनोरथ पूर्ण करण्याला एका पायावर तयार असते आश्चर्यच नव्हे काय ?

तो राजा अश्वविद्येंत निपुण होता. नवीन अश्व स्वतःसाठीं स्वारींत तयार करण्याकरि

तो स्वतः त्यांना फेरफटका करीत दूरवरच्या प्रदेशांत दवडीत नेत असे. तसा तो एकदां एक नवा घोडा घेऊन फेरफटक्यासाठीं निर्जन प्रदेशांत दौडत असतांना, त्याला एकेजागीं एक सुस्वरूप कन्या गात व दुसरी नृत्यकरीत असलेली दृष्टीस अशा पडल्या. तो तसाच घोडा फेकीत राहिला. काही वेळानें त्या दोघीहि कन्या नृत्य गायन आटपून निघून गेल्या. हा प्रकार राजानें थोडें दिवस बुद्धया तेथें घोड्यावरून पोचून पाहिल्यावर, एके दिवशीं त्यानें त्या कन्यांजवळ जाऊन, त्यांना कोण काय वगैरे विचारले. त्यांनीं उत्तर दिलें, ' महाराज, आह्मी देवदासी —नर्तकी–याजवळच्या शूरवर्धमान नांवाच्या गांवांत राहातो. आमच्या आर्यांच्या आज्ञेनुसार, आमच्या कुलाचाराप्रमाणें, आम्ही रोज येथें येऊन नृत्यगायन करतों. (२७०) हा कुलाचार आमच्या कुलांत फार जुना चालत आलेला आहे.पण त्याचें कारण मात्र आम्हाला किंवा दुसऱ्या कोणाला माहित नाहीं. '

हे ऐकून राजा आश्चर्यचकित झाला. दुसरें दिवशीं त्यानें त्या कन्यांनीं दाखविलेली जागा मजूर लावून बरीच खोल खोदविली. तेव्हां दोन जुनीं देवळें लागली. त्यांचीं दारें बंद होतीं. तीं खोलवून पाहतां आंत केशवस्वामीच्या दोन मूर्ती आढळल्या. त्याच्या बैठकींवर कोरलेल्या लेखांवरून त्या मूर्ती, राम लक्ष्मणांनीं, करविल्याचे दिसून आले. राजानें परिहास केशवाच्या मंदिराजवळच एक नवें दगडी देवालय बांधवून, त्याच्यात त्या रामस्वामीच्या मूर्तीची स्थापना करविली.

राणी चक्रमर्दिका हिनें राजाला प्रसन्न करून घेऊन, त्याच्याकडून ती दुसरी लक्ष्मणस्वामीची मूर्ती चक्रेश्वराजवळ नवें मंदिर बाधून, त्याच्यांत स्थापन करविली.(राजा राणीनीं स्थापन केलेल्या मूर्ती आणि जुन्या मंदिरांत सापडलेल्या रामलक्ष्मणानीं स्थापन केलेल्या मर्ती एकच होत्या किंवा निरानिराळ्या होत्या तें स्पष्ट झालेलें नाहीं.)

एकदा तो राजा दिग्विजयासाठी हत्तीवर बसून बाहेर पडला असतांना, एक गृहस्थ येऊन त्याच्यापुढे आडवा पडला. त्याचें नाक, कान, हात, वगैरे नुकतेच तोडले गेले असून त्यांच्यांतून रक्त टपकत होतें. राजाला त्याची दया आली व त्यानें त्याला त्याची हकीकत विचारली. तेव्हां तो म्हणाला, 'मी सिकतासिंधूजवळच्या एका राजाचा विश्वासू मंत्री. त्या राजाला थोर व कृपाळू अशा आपणा ललितादित्य महाराजांची ताबेदारी कबूल करण्यांत आपलें हित होईल, अशी मीं सल्ला दिली. यामुळें त्यानें माझी ही अशी दशा केली आहे.' हें ऐकून राजानें त्याला मदत करून, याबद्दलचा सूड घेण्याचें कबूल केलें आणि त्याच्या औषधपाण्याची व्यवस्था लावून, त्याला बरें करविलें. पुढें त्यानें सैन्यासह त्या राजावर स्वारी केली व त्या गृहस्थाला बरोबर घेतलें. नंतर स्वारींत असतांना त्या मंत्र्यानें एकांतांत राजाला म्हटलें, 'मी प्राण ठेवला आहे तो केवळ हा सूड उगविण्याच्या उमेदीवर. तेवढें काम होतांच मी या अवमानित व नष्ट, अशा जीविताचा त्याग करून, सुख व दुःख दोन्हींना आपल्या अश्रुजलाची तिलांजली देणार. पर्वताच्या अंगावर कोणी रागानें ओरडला तर तो अधिक जोरानें उलट प्रतिध्वनि देतो, त्याप्रमाणें शत्रूनें केलेल्या लहानशा अप-

काराचाहि बदला, त्याचा भारी मोठा नाश करून करावा लागतो. तें राज्य तीन महिन्यांच्या वाटेवर आहे. तेथें लौकर कसें पोंचतां येईल व पोंचलों तरी, तो शत्रु जागेवर कसा राहणार? तेव्हां तिकडे पोंचण्याचा एक पंधरा दिवसांचा मार्ग आहे. तो मी आपणांला दाखवितों. तो जवळचा मार्ग आहे. पण त्याच्यावर पाणी मिळत नाहीं. म्हणून पाणी बरोबर घेतल्याशिवाय त्या मार्गानें जातां येणार नाहीं. माझे आप्तइष्ट त्या बाजूला आहेत. ते त्या राजाकडे खबर पाठविणार नाहींत अशी खात्री आहे. त्या राजावर अवचित हल्ला केला तर आपणाला तो राजा, त्याचे मंत्री, राण्या, खजिना वगैरे एकदम हस्तगत करतां येईल.' याप्रमाणें बोलून, त्यानें त्या सिकतासिंधूतून जाण्याला त्या राजाचें मन वळविलें. बरोबर पंधरा दिवसांचे पाणी घेऊन, तो राजा सैन्यासह त्या सिकतासिंधूंत शिरला. तिकडें पंधरा दिवसांनंतर पाणी मिळेनासें झाले. पुढें कसाबसा संकटानें तो सैन्यासह दोन तीन दिवस आणखी पुढें गेला. शेंवटीं सारें सैन्य अतिशय तृषाक्रांत व व्याकुळ झालें. तेव्हां राजानें त्या गृहस्थाला म्हटलें 'या मार्गावर तुम्ही सांगितलेल्या अवधीहून कांहीं दिवस जास्त झाले. सर्व सैन्य तृषाकूल होऊन मरतें आहे. अद्यापि मार्ग बाकी आहे तरी किती ? '

हें ऐकून त्या गृहस्थाने विकट हास्य करीत उत्तर दिले. 'आपण मार्ग विचारतां, तो त्या शत्रूच्या राजधानीचा कां यमपुरीचा ! मी आपणाला सैन्यासुद्धां येथवर आणलें, तें माझ्या मालकाच्या हितासाठीं, त्या पायी मीं आपल्या प्राणाचीहि पर्वा केली नाहीं. आपण फौजेसुद्धां आयतेंच मृत्यूच्या दाढेत सांपडला आहां. हा भयंकर मरुभूमीतलि अत्यंत निर्जल व तापद सिकतासिंधु. येथे जललवाचें नांवसुद्धां नाही. यांतून आतां आपलें रक्षण कोण व कसें करतो पाहूं'.

हें ऐकतांच सर्व सैन्य हताश व निर्जीव झालें. गारा पडून सर्व लोंब्या गळून गेलेल्या व नुसत्या काटक्या उभ्या असलेल्या साळीच्या शेतासारखी त्याची अवस्था झाली. सर्व सैनिक, प्राणाची आशा सोडून आक्रोश करूं लागले. त्यांचें सांत्वन करीत राजानें हात उभारून म्हटलें, 'भल्या गृहस्था, हें काम तरी तूं स्वामिभक्तीने प्रेरित होऊन केलें आहेस. याच्या संतोषानें या मरुभूमीतहि माझ्या अंगावर, शीतकालांतल्याप्रमाणें काटा आला आहे. पण माझ्या वज्राप्रमाणें अभेद्य दृढनिश्चयापुढें तुझा हा प्रयत्न लोखंडाप्रमाणें व्यर्थ आहे. रत्न म्हणून अग्नीची ठिणगी उचलणाऱ्याची अंगुली भाजते व त्याला पश्चात्ताप होतो. तद्वत् आज तुला आपण आपलें अवयव व्यर्थ कांपवून घेतले, असें वाटेल. मेघगर्जना होतांच गोमेदाच्या भूमींतून वैडूर्यमणी निघतात. त्याप्रमाणें माझ्या आज्ञेच्या प्रतापानें या मरुभूमींतूनहि आज पाणी पैदा झालेलें तुझ्या पाहण्यांत येईल'. ( ३०० )

असें बोलून राजानें पाण्यासाठीं जमीनींत भाला मारून ती उकरली. त्याबरोबर, त्रिलोचन शंकरांनीं त्रिशूल मारून वितस्ता नदी उत्पन्न केली. त्याप्रमाणें ताबडतोब, त्या सैनिकांच्या जीविताच्या आशेबरोबरच, पातालजललक्ष्मीचें लीलाहास्यच, अशी जलपूर्ण नदी निघाली आणि तिनें त्या सैनिकांचें दैन्य आणि त्या लबाड व व्यर्थ अवयव तोडवून

घेतलेल्या मंत्र्याची उमेद, दोन्ही एकदमच नष्ट केली. आपले सारे परिश्रम व्यर्थ गेलेले पाहून, तो मंत्री आपल्या मालकाकडे पळून गेला. तो राजधानीला पोंचतो तोंच, ललितादित्यरूपी यमराजाची स्वारीहि तेथें पोंचली व त्यानें त्या दुष्ट राजाचीहि त्याच्या लबाड मंत्र्यासारखीच अवस्था करून टाकली. (नीलमत पुराणांत वितस्ता नदी श्रीशंकरांनी नीलनागाजवळ त्रिशूळाचा प्रहार करून पाताळांतून वर आणली. असें वर्णन आहे.)

ललितादित्य राजानें त्या मरु देशांतील मार्गांत जागजागीं नद्या काढल्या त्या नद्या अद्यापिहि कुंतवाहिन्या या नांवानें वाहात आहेत. ( अशाच तऱ्हेची गोष्ट अल्बीरूनीनें, आपल्या 'इंडिका' नांवाच्या पुस्तकात कनिक–कनिष्क–राजानें कनोजवर स्वारी केली, त्या वेळची लिहून ठेवली आहे. 'यामधील साम्यावरून कल्हण व अल्बिरूनी, या दोघांनींहि परंपरागत प्रचलित पाठावरून त्या कथा घेतल्या असाव्या, असें म्हणतां येतें. )

महा नद्यांच्या पात्रांत मोठाले खडक असतील तेथेंच, त्यांचें पाणी प्रचंड शब्द करीत असते व त्यांचे मूळचे स्वच्छ पाणी, अभ्रागमनानंतर गढूळ होतें. त्याप्रमाणें मोठ्या लोकांनाहि देश व काल यांच्या परिस्थितीच्या अनुरूप वागावें लागतें. कलीचा किंवा राज्याधिकाराच्या मदाचा प्रभाव, यामुळेच कीं काय, या राज्याच्या हातून कधी कधीं भयंकर दुष्ट वर्तन घडत असे. तो एकदां परिहासपूर येथें ऐषआरामांत व मदिरापानांत मग्न असतांना, त्यानें मंत्र्यांना, प्रवरसेनाने वसविलेलें प्रवरपुर–श्रीनगर–परिहासपुराइतकें सुरेख व शोभिवंत असलें तर, तें जाळून टाकावें, जशी आज्ञा केली. ( ३१० ) ती भयंकर आज्ञा त्यांना मोडतां येईना. सबब त्यांनी वातुलावक जवळच्या घोडयाच्या गवताच्या गंजींना आग लावविली. त्या आगीच्या गगनस्पर्शी ज्वाळा उठल्या. त्यांचा तो भीषण प्रकाश पडलेला आपल्या महालावरून पाहून, राजा हर्षातिरेकानें नाचूं लागला ! सद्वर्तनी माणसालासुद्धां द्वेषादि विकारांमुळें इतर लोक विपरीत वाटूं लागतात व चंद्र नक्षत्रादिक दुहेरी दिसतात. त्यांचे नेत्र दिसण्यांत सतेज असले तरी, त्यांना जणों तिमिर रोग झालेला असतो. अशाच कांहीशा स्थितींत त्या राजानें ही आज्ञा दिली होती. नाहीं तर स्वतः अनेक नवीन नगरें वसविणाऱ्या त्या राजाला प्रवरसेनाचें नगर तेव्हढें कां अधिक वाटलें असतें ?

पुढे मद्याचा मद उतरल्यावर, त्याला आपण करविलेल्या नगरदाहाविषयक पातकाचा फार पश्चात्ताप झाला व त्या तापाचा धूरच असे त्याच्या अंतःकरणांतून दुःखमूलक दीर्घ व उष्ण उच्छ्वास निघूं लागले. पोटांतल्या–ढोलींतील–अग्नीमुळें जीर्णवृक्ष शेवटीं जळून जातो. त्याप्रमाणेंच अंतःकरणांत निगूढ दुःख सोसावें लागत असणाराची स्थिति होते.

त्याची ती खेदजनक स्थिति पाहून मंत्र्यांनीं त्याला खरा प्रकार कळविला. तेव्हां त्याचा शोक शांत झाला. स्वप्नांत पुत्राचा नाश झाला म्हणून शोकाक्रोश करणाऱ्याला, जागा होतांच पुत्र पुढें उभा पाहून, त्या शोकाची निवृत्ति होते, तसा तें प्रवरपुर जळालें नाहीं, हें ऐकून, त्याला आनंद वाटला. तो मंत्र्यांवर प्रसन्न झाला. त्यानें त्यांची प्रशंसा केली व

इतःपर मद्याच्या मदांत मीं कांहीं आज्ञा केली तरी, ती मुळीं अमलांत आणूं नये, असें त्यानें त्यांना बजावलें. ( ३२० )

कांहीं राजसेवक केवळ स्वार्थसाधन व सुखप्राप्ती या साठीं या पृथ्वीरूपी वारांगनेचा किंचित् काल उपभोग घडत असलेल्या आपल्या मालकांना, अयोग्य सुखाचा अभिलाष करण्याच्या भरी भरवीत असतात. अशा त्या नीच सेवकांना धिक्कार असो. उलट आपल्या प्राणाचीहि पर्वा न करतां आपल्या मालकाला भलत्या मार्गानें न जाऊं देण्याविषयीं जपणाऱ्या थोर व महात्मे, अशा सेवकांच्या द्वारेंच, ही पृथ्वी पावन होत असते.

तो राजा इंद्राहूनहि श्रेष्ठ असताना, त्याच्या हातून यःकश्चित सामान्य राजांना सुद्धां न शोभे अशी आणखीहि एक अनुचित गोष्ट घडली. त्याच्याकडे गौड देशाचा राजा आपल्या सेवकांसह, शारदेच्या दर्शनाच्या इच्छेनें पाहुणा आला होता. त्याला त्यानें परिहास केशवाच्या भव्य मूर्तीच्या साक्षीनें रक्षणाची हमी दिली असतांना, त्यानें त्याला त्रिग्रामी येथें तीक्ष्णाच्या-हातीं ठार मारविलें. ( त्रिग्रामी-हल्लींचें त्रिगाम. तें परिहासपूरच्या प्राचीन मंदिराच्या अवशेषांपासून सुमारें दीड मैलावर आहे. सुय्यानें वितस्ता व सिंधू यांच्या संगमांत फरक केला, त्याच्यापूर्वी तो संगम या त्रिग्रामाजवळ होता, असें पुढें तरंग ५, श्लोक ९ मध्यें वर्णन आलें आहे. त्यावरून या म्हणण्याला पुष्टि मिळते.

तीक्ष्ण मारेकरी-भाड्यानें हवें तें धाडसाचें व दुष्ट काम करणारे. )

हें पाहून त्या गौड राजाच्या सेवकानी मोठें शौर्य गाजवीत प्राण दिलें. त्यांनी जाऊन त्या साक्षीभूत परिहास केशवाच्या मंदिराला वेढा दिला. ते येत असलेले पाहून पुजाऱ्यांनीं मंदिराचें महाद्वार बंद केलें. त्या गौड सेवकांनीं (सैनिकांनीं) नेटानें हल्ला करून परिहास केशवाच्या मूर्तीऐवजीं रामस्वामींची मूर्ति फोडून, तिची पूड केली व ती चोहींकडे उधळून दिली. पुढें श्रीनगरींतून आलेल्या राजाच्या सैनिकांनीं त्या गौड सेवकाना ठार मारलें. तें कृष्णवर्ण सेवक, रक्तबंबाळ होऊन पडलेले, काळ्या कुरुंदाची शकलें, लाल गेरूच्या द्रवानें माखल्यासारखे शोभत होते. त्यांच्या रक्ताच्या प्रवाहानें त्या जमीनीला शोभा व पुष्टि दोन्हीं प्राप्त झाली. ( ३३० ) वज्रापासूनच वज्राची भीति नष्ट होते, माणिक्य रत्न भरभराटी करविते व पाचेच्याद्वारें नाना तऱ्हेच्या विघ्नांचें शमन होतें. असें हे श्रेष्ठ जातीच्या रत्नांचे चमत्कारिक प्रभाव त्यांच्या अंगच्या नैसर्गिक गुणांमुळेंच प्रकट होत असतात. त्याचप्रमाणें श्रेष्ठ नररत्नांना अंगच्या अप्रमेय शक्तींच्या द्वारें सिद्धि मिळवितां येणार नाहीं, अशा कोणच्या व काय गोष्टी असणार ? त्या गौड सेवकांचा मालक मारला गेलेला व त्यांचा परत जाण्याचा मार्ग अतिशय दूर, अशा स्थितींत त्यांनीं दाखविलेली स्वामिभक्ति व आत्मनिष्ठा, यांचें असे दुसरें उदाहरण विधात्यालासुद्धां क्वचितच दाखवितां आलें असतें. त्या दिवसांत अशी अलौकिक स्वामिभक्ति व निष्ठा दाखविणारे सेवक, राजे लोकांना मिळत असत. या गौडांच्या गडबडींत परिहास केशवाचें

रक्षण झालें पण त्या राजाला प्रिय असलेल्या रामस्वामी देवाचा नाश झाला. तेव्हांपासून तें मंदिर ओस पडलें आहे आणि त्या गौड वीरांचें यश सर्वत्र दुमदुमत आहे.

याप्रमाणें अनेक बऱ्या वाईट गोष्टी करीत, तो थोर राजा थोडेसे दिवस आपल्या राज्यांत व पुष्कळसे परदेशीं घालवीत राहिला होता.

पुढें इतरांनीं अदृष्टपूर्व देशांवर स्वारी करून ते देश पाहून येण्याची ललितादित्य राजाची उत्कंठा वाढली, व तो उत्तरा पथांतील अमर्याद विस्तीर्ण देशावर स्वारी करण्याच्या हेतूनें मोठी थोरली फौज घेऊन रवाना झाला. त्याच्या पराक्रमाची परीक्षा करण्यासाठीं कुबेरादिक लोकपालांनीं पाठविलेले अनेक दक्ष राक्षससमूह त्याला आडवे आले. त्यांच्याशीं त्याने युद्ध केले. जिकडे सूर्याच्या प्रकाशाचें किरणसुद्धां पोंचलेले नाहींत अशा त्या प्रदेशातसुद्धां त्याची सत्ता व आज्ञा अकुंठित चालू झाली. तो तिकडे जाऊन पुष्कळ दिवस झाले. त्याच्याकडील कांहीच वर्तमान कळेना. तेव्हां मंत्र्यांनीं त्याच्याकडे एक दूत पाठविला. त्यानें परत येऊन, राजाकडून आणलेला निरोप मंत्र्यांना कळविला कीं:-( ३४० ) ‘ या देशाला येऊन पोंचल्यानंतर, मी लौकर परत फिरावें, अशी तुम्ही लोकांनीं इच्छा करणें, साहजिक असले तरी, तें भ्रमाचे आहे. मी इकडे नित्य नवे नवे देश आक्रमण करीत आहे. ते सोडून मी तिकडे यावे तर तसें तुम्हीं मजसाठीं महत्त्वाचें काम तरी कोणचें काढले आहे ? उगमापासून पुढे वाहणाऱ्या नद्यांना सागरच गांठावा लागतो. त्याचप्रमाणे, प्रतिदिवशीं विजयी होणाऱ्या विजयेच्छूच्या अप्रतिहत संचाराला सीमा किंवा अवधि कोठून असणार ? तेव्हां तुम्ही माझ्या गैरहजिरीत राज्यव्यवस्था कशी ठेवावी याविषयीं मी तुम्हांला माझी मुख्य मुख्य तत्त्वे सागून पाठवीत आहे. त्याअन्वयें तुम्हीं निश्शंकपणें स्वस्थ कारभार चालवा. म्हणजे तुम्हाला कोणी नांवें ठेवणार नाहीं.

‘ हें आपलें काश्मीर मंडळाचें राज्य प्रबल रहावें अशी इच्छा धरणारांनीं, अंतस्थ झगड्यांविषयीं विशेष जपलें पाहिजे. कारण येथील राजकर्त्यांना चार्वाक मताचे लोक परलोकांचे जितपत भय मानतात तितकेंच परकीयाचें भय मानावें लागतें म्हणावयाचें' या राज्यांतील पहाडी प्रदेशांत दुर्गम दुर्गांमध्ये राहणाऱ्या लोकांना त्यांच्या आश्रयामुळें, वठणीला आणणें; तेंहि ते विशेष संपन्न असतील तर कठिण पडतें. म्हणून ते दोषी, निर्दोषी, कसेहि असले तरी त्यांना सारखे दंडीतच असावे. कारण ते संपन्न झाले व त्यांच्याजवळ थोडीशी पुंजी झाली कीं, त्याना वठणीला आणणे कठिण पडतें. त्याच्यापाशीं वर्षभर पुरेल इतकीच खाण्यापिण्याची सामग्री, आणि शेतीला हवे तितकेच बैल राहूं द्यावे. याहून अधिक गांठीं राहतांच ते प्रबल व त्रासदायक डामर बनतात. वर्षावर्षाच्या पिकानें त्यांचें बहुतेक काम भागतें व ते राजाला न जुमानण्याइतके सामर्थ्यवान होतात. या खेडवळांना जर कां शहरांतल्या लोकांप्रमाणें चांगले व लोंकरीचे कपडे, स्त्रिया, मिष्टान्न, अलंकार भूषणें आणि अश्व वगैरे प्राप्त झाले आणि राजानें अविचारानें रक्षणीय किल्लेकोटांचा योग्य बंदोबस्त करण्याकडे दुर्लक्ष केलें, राजसेवकांनी विवेक सोडला, स्वार शिपाई भरती होण्याची मदार एकाच प्रदेशावर येऊन पडली, अंमलदार लोक परस्पर विवाहादिसंबंधानें बांधले गेले,

आणि राजांनीं कायस्थ वृत्ति पतकरली म्हणजे प्रजेचें दुर्दैव बळावून ओढवलें, असें पक्कें समजावें. ( ३५२ ) माझ्या वंशजांच्या योग्यतेविषयीं मी सांगतों तें लक्षांत ठेवावें व त्याच्याबद्दल गुप्तपणें तपासणी करून, त्यांच्या मनाच्या प्रवृत्ती जाणून घ्याव्या आणि त्यांच्यामधील फरक समजून घ्यावा. वाहत्या वायूबरोबर येणाऱ्या मदगंधावरून मस्त हत्तींचें सान्निध्य ओळखतां येतें, विजेच्या चमकीवरून मेघगर्जना व घंटा यांचें अनुमान होतें, तसेंच पूर्वजन्मार्जित स्वभावांतील कायमचें वळण, विचारी व सूक्ष्मदृष्टी विद्वानांना एकाद्याच्या वर्तनावरून स्पष्ट निदर्शित होतें. '

'कुवलयादित्य व वज्रादित्य हे दोघेहि सापत्न बंधू, माझेच पुत्र. पण त्यांचा स्वभाव व वृत्ति भिन्न भिन्न आहेत. ज्येष्ठपुत्राला माझ्यामागे राज्याभिषेक करावा. पण तो मूर्ख, क्रोधी व तापट निघेल तेव्हां तुम्ही त्याला विरोध करावा. त्यामुळे तो त्रागा करून प्राण देईल किंवा राज्य सोडून निघून जाईल. तरी खेद करण्याचें कारण नाहीं. त्याच्या धाकट्या भावाला गादीवर बसवूं नका. इतक्यावर तो राजा झालाच तर, तो वाईट असला तरी त्याच्या आज्ञेत वागा. माझा कनिष्ठ व अल्पवयी नातू जयापीड याला आपल्या आजा-प्रमाणें होण्याविषयीं नेहमीं उपदेश करा'.

या सर्व अर्थगर्भ गोष्टी त्या प्रधानांनीं हताश व नम्र होऊन मान्य केल्या, व त्या अमलांत आणण्याचें ठरविलें. त्यांनीं प्रजाजनांना जमवून, अर्घ्यप्रदानांचे जललव संतप्त भूमीचें सिंचन करतात त्याप्रमाणें, त्याच्या शोकाग्नीचे शमन करणारे अश्रू गाळीत त्यांना म्हटलें, 'या दूताच्या निरोपावरून पुण्यश्लोक ललितादित्य महाराज देवलोक झाले असें ठरतें त्यांच्या जागी कुवलयापीड याना गादीवर बसवावें. ' तसेंच त्यांना, चंकुणसिद्धानें शोकाकुल होऊन कळविलें कीं, ललितादित्य महाराजांचा खजिना समृद्ध ठेवण्यासाठीं मी प्राप्त करून घेतलेली रससिद्धि एकाएकी नष्ट झाली आहे. '

ललितादित्य महाराज दूरदेशीं गेलेले असूनहि मोठमोठीं व कठिण राज्यकार्यें त्यांच्या भाग्याने सहज पार पडत असत. सूर्य दूर अंतरावर असून त्याच्याआड मेघमंडळें आलीं असली तरी, तो कमलांना उमलवितोच. अभ्रें दूर असूनहि प्रखर सूर्यताप कमी करतात. तद्वत् थोरांच्या अंगीं असलेल्या अचिंत्य व अद्भुत शक्तीच्या द्वारें अनेक मह-त्कृत्यें, कांहीं अडचणी न येतां घडून येत असतात.

ललितादित्य महाराज सर्व प्रजेला चंद्राप्रमाणें आल्हाद देत छत्तीस वर्षें, सात महिने अकरा दिवस राज्य करून अस्तास गेले.

ते भयंकर तुषार वृष्टीमुळें आर्याणक देशांत मरण पावले, असेंहि कोणीं म्हणतात. तर त्यांनीं आपलें दीर्घकाल संपादित व संचित यश कायम राहावें म्हणून, अपरिहार्य आपत्ति प्राप्त झालेली पाहून, स्वतःच अग्निप्रवेश केला, असेंहि कोणीं म्हणतात मनुष्य-मात्रांना दुष्प्राप्य व देवतांनाच सुलभ, अशा घोर उत्तरापथांत, ते महाराज सैन्यासुद्धां

गारत झाले, असेंहि कोणी वर्णिलें आहे. त्यांच्याविषयीं अगणित अद्भुत कथा प्रचलित आहेत, त्याप्रमाणें त्यांच्यावर आलेल्या आपत्तींचीं वर्णनेंहि अद्भुतच आहेत. ( ३७० )

सूर्य मावळतो तेव्हां तो सागरांत बुडी मारतो, असें कोणी म्हणतात, तर कोणी त्यानें अग्निप्रवेश केला आणि कोणी तो लोकांतराला गेला , असें मानतात. त्याचप्रमाणें महात्म्या पुरुषांवर आलेल्या अखेरच्या अज्ञात आपत्तीसंबंधानें त्याच्या विलक्षण महत्त्वानुरूप नाना तऱ्हेच्या अद्भुत कथा प्रचलित होत असतात.

**राजा कुवलयापीडः**—आदितेय इंद्र कुवलयावर सत्ता चालवितो, त्याप्रमाणें कमलदेवी आणि ललितादित्य महाराज, यांचा पुत्र कुवलयापीड हा त्यांच्या मागून या पृथ्वीवर अंमल करूं लागला. मोठाले सर्प मलिन कांत टाकून सतेज होतात त्याप्रमाणें त्यानें, आपले औदार्य व दानधर्म यांच्या द्वारे, राज्यलक्ष्मीचे मालिन्य धुवून टाकून तिला उज्ज्वल स्वरूप प्राप्त करून दिलें. कांहीं कालपर्यंत तो कनिष्ठ बंधूबरोबर राज्यकारभार चालवीत होता. यामुळें प्रदीप्त अग्निपुढें दीपतेज लोपते, तशी त्याची स्थिति झाली होती. दरबारी लोकांनी त्या दोघांकडूनहि देणग्या उपटण्यासाठीं ईर्षेनें पुढे पुढें करून त्यांची स्थिति, भ्रमरांनी अहमहमिकेनें दानोदक शुष्क केलेल्या हत्तीसारखी, करून सोडली होती.

पुढे त्याने लौकरच बंधु व मंत्री मंडळी यांची कारस्थानें हाणून पाडली. मंत्री लोक त्यांचा खजिना लुटीत होते. त्याने शत्रूचा नाश करून आपला अधिकार जमविल्यावर, आपलें राज्य निष्कंटक करण्यासाठी, आणि दिग्विजय करण्यासाठी सैन्य सज्ज केलें. त्यासंबंधाची त्याची आज्ञा एका मंत्र्यानें, त्याच्या पित्याच्या आज्ञेनुरूप किंवा उर्मटपणानें मानली नाहीं. यामुळें राजाला क्रोध आला. त्याच्या विचारानें त्याला रात्रभर झोंप आली नाहीं. क्षणभरसुद्धां त्याचा डोळा लागला नाहीं. त्या क्रोधावेशाच्या भरात त्यानें त्या मंत्र्याचा वध करण्याचा विचार केला. त्या मंत्र्याबरोबरच त्याचे इतर आप्त इष्टहि मारावे लागणार, ही गोष्ट त्याच्या लक्षात आली. ३८० वैराग्यरूपी मंदराचलानें त्याच्या अंतःकरणरूपी सागराचे मंथन होताच, त्याच्यांतून प्रारंभी क्रोधरूपी काळकूट व त्याच्या मागून शांतिस्वरूप अमृत निघालें. त्याच्या क्रोध शात झाला. त्यानें विचार केला कीं, ज्याच्या प्रीत्यर्थ इतका भारी प्राणनाश करण्याचे माझ्या मनांत आलें व ज्याच्यापायीं अनेक कुकर्मांत रत होऊन महत्पाप संपादन केलें जात असतें तो देह तरी कोठें कधीं कोणाचा कायम होऊन राहिला आहे ? या कृतघ्न व नश्वर देहासाठीं, कोण सावध व स्मृतिशील मनुष्य, पुण्यमार्गाचा सत्यानास करील ?

कालरूपी बल्लव. प्राण्यांच्या देहांना सारखा निरनिराळ्या अवस्था प्राप्त करून देत देत शेवटच्या अवस्थेसाठीं तयार करीत असतो, हें मनुष्यमात्राच्या लक्षांत येत नाहीं. काल बालपणींच्या अनिमित्त हास्याने कोमल कमल गर्भाप्रमाणें शोभणारें हे रम्य मुखकमल आज एकाएकीं कठोर साधूंच्या व दुष्ट मनोविकारांच्या योगानें विवर्ण झालेलें आणि उद्या कोमेजलेले व शुभ्र दाढी मिशा व जटा यांच्या योगानें वृद्ध बोकडाच्या मुंडक्याप्रमाणें दुर्द-

र्शनीय झालेलें पाहून, दीर्घायु व विचारी लोकांना हंसू येत असेल. असा विचार करून, त्यानें समाधान वृत्तीच्या द्वारें शाश्वत सुख संपादन करण्यासाठीं, ऐहिक सुखाचा नाद सोडला. आणि राज्याचा त्याग करुन प्लक्ष प्रस्रवण वनांचा–नैमिषारण्याचा—आश्रय केला. निघतांना त्यानें सिंहासनावर ' हे भल्या गृहस्था, वनवासाला जा व तपाचरणांत मन गुंतीव, कारण, या साऱ्या संपदा अपाययुक्त व क्षणभंगुर आहेत. ' या अर्थाचा, गच्छ भद्र वनायैव तपस्याधीयतां मनः। सापायाः क्षणभंगित्यः एवं प्राया विभूतयः।। हा श्लोक लिहून ठेवून आपलें कडक वैराग्य व्यक्त केलें. तिकडे त्यानें तपाचरणानें सिद्धी प्राप्त करून घेतली. तो अद्यापि सुद्धां श्रीपर्वतावर व इतर पवित्र तीर्थांच्या ठिकाणीं पुण्यवान लोकांना दिसतो म्हणे. ( ३९० )

आपल्या राजाचा पुत्र याप्रमाणे निघून गेल्यावर, मित्रशर्मा प्रधान व त्याची पत्नी यांनीं शोकाकुल होऊन, वितस्तासिंधु संगमावर देहत्याग केला. ( हा संगम हल्लींच्या साद-पुर–शहाबुद्दीनपुर–जवळ आहे. नीलमत पुराणांत याला प्रयाग म्हटलें आहे. काश्मीरांत त्याची योग्यता गंगायमुनेच्या संगमावरील प्रयागाइतकी मानली जात होती. )

त्या राजानें सारें एक वर्ष व पंधरा दिवस राज्य केलें आणि नंतर मुक्तिमार्गाचा अवलंब केला. त्याच्या मागून वज्रादित्य गादीवर बसला.

**राजा वज्रादित्य**—त्याला ललितादित्य व बप्पियक असेंहि म्हणत. चक्रमर्दिका-राणी ही त्याची राणी होती. पूर्वीच्या राजांच्या मानानें तो फारच दुष्ट व प्रजेस पीडा देणारा झाला. त्यांच्या व याच्यामध्ये सर्वांना आनंदायक चंद्र आणि त्याचाच भाऊ दुर्वास ऋषी, याच्यासारखें साम्य होतें. त्या दुष्ट धनलोभ्याने परिहासपुरांत त्याच्या पित्यानें अर्पण केलेलें सारे धर्मादाय बंद केले आणि तेथील सारी संपत्ति धुवून नेली. तो फारच क्रोधी, लोभी व विषयलंपट होता. त्याच्या अंतःपुरांत किती तरी स्त्रिया असत. त्यांच्याशीं तो वळू घोड्याप्रमाणें सारखा रममाण राहात असे. त्यानें पुष्कळसे लोक धरून नेऊन म्लेंच्छांना विकले व म्लेंच्छांनाच उचित असे अनेक आचार अनाचार या मंडळांत चालू केलें. अशा तऱ्हेनें त्या प्रजेला दुस्सह तापद व पापी राजानें सात वर्षे, निव्वळ संभोग सुखे उपभोगीत राहून शेवटीं तज्जन्य क्षयरोगानें देह सोडला. त्याच्यानंतर राजा पृथ्व्यापीड सिंहासनाधीश झाला.

**राजा पृथ्व्यापीड**–वज्रापीड राजा व राणी मंजरिका, यांचा पुत्र हा पृथ्व्यापीड राजा साऱ्या पृथ्वीला अंतकाप्रमाणें तापद झाला. त्यानें चार वर्षे व एक महिना राज्योप-भोग घेतला. त्याला पदच्युत करून बप्पियव–मम्माराणी, यांचा पुत्र पहिला संग्रामपीड यानें सात दिवस राज्य केलें. ( ४०० ) त्या दोघांहि बंधूंच्या कारकीर्दींत पृथ्वीवरील प्रजेला मुळींच सुख मिळालें नाहीं. शिशिर व हेमंत ऋतूंतील सूर्यबिंबाप्रमाणें, राज्यलक्ष्मी मंद तेजच राहिली होती. त्याच्या मागून ललितादित्याचा नातु थोर असा जयापीड गादीवर बसला.

**राजा जयापीड**—( याचें विनयापीड असेहि नांव होते. हें त्याचे नांव असलेलीं त्याचीं पंचरसी धातूचीं बरीच नाणीं मिळालेलीं आहेत. )

जयापीड राजाला त्याच्या मंत्र्यांनीं, 'आपणहि आपले आजे ललितादित्य महाराज, यांच्याप्रमाणें भाग्यशाली व यशस्वी व्हाल', असें म्हटलेलें ध्यानांत ठेवून, त्यानें मोठें सैन्य तयार करविलें व तो दिग्विजयाला निघाला. तो मोठा शाहाणा व विचारी होता. त्याच्या बरोबर पुष्कळसे मांडलिक राजे होते. त्यांच्यासह तो आपल्या राज्याच्या सरहद्दीबाहेर पडत असतांना, त्यानें सरहद्दीवरील द्वाररक्षक, वृद्ध वीरांपैकी कांहींना म्हटलें, 'माझे आजोबा दिग्विजयाला निघत तेव्हां, त्यांच्याबरोबर किती सैन्य रहात असे, ते आपण वृद्ध मंडळींनीं पाहिलें असेल, तें मला सांगा'. त्यावर त्यांनीं हंसत उतर दिलें, 'महाराज, पूर्वींच्या गोष्टींची आतां बरोबरी कोण करणार ? त्यांच्या सैन्यांत कर्णीरथ–डोल्या किंवा पालख्याच सव्वा लाख असत. हल्लीं सारें सैन्य मुळीं ऐंशीं हजार आहे ! त्यांची गोष्टच कशाला,' ( काश्मिरी सैनिक लोक बहुतेक पादचारीच असतात. त्यांच्यामध्यें घोडे, हत्ती, वगैरे व त्यांच्यावर स्वार होणारे कमी. त्यांच्यातील सरदार लोक कर्णांतून–डाल्यापालख्यांतून–फिरतात, असें अल्बिरुनीनें लिहिले आहे. ) हें त्याचें भाषण ऐकून, जयापीड राजाला आपल्या कमीपणाविषयी फारसें वाईट वाटलें नाही. कारण कालगतीनुरूप या पृथ्वीवरील सर्वच बाबतींत पाहतां पाहातां सपाटून संकोच होत चालला आहे. हें तो जाणत होता. त्याचा असा विवेकी स्वभाव व वर्तन पाहून, त्या वृद्धांना ललितादित्य राजाच्या गूढ स्वभावज्ञानाचें कौतुकपूर्ण स्मरण होत असे.

जयापीड राजा दिग्विजय करीत दूर देशीं गेलेला पाहून, त्याचा शालक जज्ज, यानें राजद्रोह केला व विश्वासघातानें काश्मीर मंडळांत शिरून, राजगादी बळकावली. (४१०) हें ऐकून, राजाच्या सैन्यांतील बरेच लोक घरीं जाण्याच्या उत्कट इच्छेमुळें, स्वामिभक्ति सोडून, सैन्यांतून परतले. त्यांची पर्वा न करितां जयापीड राजानें स्वतःच्या हिंमतीवर, इष्ट हेतु साध्य करण्याचें व उलटलेल्या दैवाला मुळींच दाद न देण्याचें ठरविलें. तो दृढ निश्चयी राजा, उरलेल्या लोकांनिशीं, प्रयागास पोंचला. त्यानें बरोबरच्या मांडलिकांनाहि परत पाठविलें होतें. प्रयाग येथें त्यानें ९९९९९–एक कमी लक्ष–इतके मनोजव अश्व, ब्राह्मणांना दान दिले व शिवाय भरपूर दक्षिणा वाटली. नंतर त्यानें तेथून परगांवीं भरून पाठविले जाणाऱ्या गंगेच्या तुंगांच्या तोंडांवर भारल्या जाण्यासाठीं, 'थोर अशा जयापीडाची मुद्रा', अशीं अक्षरें कोरलेल्या मोहरा करून दिल्या आणि त्या मोहरा, पुढें कोणी पुरें लक्ष अश्व दान देईल आणि त्या योगानें आपल्याहून श्रेष्ठ होईल, तोंवर अबाधित चालाव्या, असा निर्बंध करून दिला. तेव्हांपासून याच मोहोरा होत असतात. त्याची मोहोर लागलेलें गंगाजलच अद्यापपर्यंत घ्यावें लागत असल्यामुळें मोठमोठ्या मानी महाराजांना, असूया व संताप वाटत आला आहे.

तेथून बाकीच्या सर्व सैनिकांनीहि परत जाण्याविषयींची आज्ञा एका विश्वासु सेवकाजवळ लिहून ठेवून, तो रात्रीं गुप्तपणें एकटाच निघून गेला.

आपलें तेज प्रकट करण्याला अवसर व अवकाश पहात, सूर्य, मेघमंडळांतून भ्रमण करीत असतो, तसा तो गुप्तपणें, गुप्त वेषानें, निरानिराळ्या राजांच्या राज्यांत फिरत फिरत गौडराज जयंत, यानें परिपालित अशा पौंड्रवर्धन नावाच्या नगराला गेला. तेथील राज्यव्यवस्था उत्तम, प्रजा सुखी व सुसंपन्न व शहर रमणीय, पाहून त्याला समाधान वाटलें. त्या शहरांतील कार्तिकेयाच्या मंदिरांत नृत्यगायन चालले असतांना तो सहज तें पाहण्या ऐकण्याला गेला. तो स्वतः भरतनाट्य शास्त्रात निष्णात होता. तेथील नृत्यगायन त्या शास्त्रानुरूप चाललेले पाहून, तो देवदर्शन घेऊन, दारांतील एका शिळेवर थोडा वेळ बसला. त्याची चर्या, तेज व ऐट पाहून; तेथील लोक चकित झालें व बाजूला सरले त्या वेळी कमला नांवाच्या नर्तकीचें नृत्यगायन चालले होते. तिची त्या जयापीडाच्या सुंदर रूपाकडे सहज नजर गेली. तसेंच, तो राहून राहून जणों ताबूलवीटिकेसाठीं खांद्यावरून मागें हात करीत असे, तेंहि तिच्या लक्षात आले. तशी ती चकित झाली, आणि त्यावरून तो कोणी गुप्त वेषानें संचार करणारा थोर कुलीन, गृहस्थ, राजा, किंवा राजपुत्र असावा, असें तिनें ताडले. मदलोलुप भृंगांचा त्रास मिटल्यावरहि गज कर्णताडन करीतच असतो, गजाच्या कळपानें आगला पिच्छा सोडून दिल्यावरहि मृगराज मागें टवकारून पहातच असतो, लागलेल्या संवयीचे निमित्त नाहींसें झाल्यावरही आणि मेघमंडळापासून तृष्णा निवारण होण्याची उमेद नष्ट झाल्यानंतरहि, मोर कंठशोष करीत टाहो फोडींतच असतो. दीर्घकालिक संवय सहसा सुटत नाहीं.

असा विचार करून तिनें आपल्या एका चतुर दासीला आपल्या विचारांत घेतले आणि तिला पाठवून तिच्या हातें, जयापीडाने ताबूलवीटिकेसाठीं पुनः हात सहज मागें करतांच, त्याच्यात हळूंच ताबूल टाकविला. तो त्यानें तोंडांत टाकून, मागें वळून, त्या सुभ्रूला पाहिलें ( ४२० ) आणि भ्रूसंकेतानेंच ' कोण काय, ' असें पुसलें. त्याला तिने तसेंच आपल्या मालकिणीविषयी कळविलें. पुढें आपल्या मधुर व चतुर वचनानीं तिनें त्याचे मन मोहून टाकून, हलुंहळूं संकेत ठरवून त्याला रात्रीं आपल्याबरोबर नेलें. तोंवर कमला नृत्यगायन संपवून, आपल्या घरीं गेली होती. त्या मनोहर चारुगात्रीनें, प्रेमळ भाषण व वर्तन करीत, त्याचा मोठा आदरसत्कार केला. या तिच्या सेवाचाकरीनें तोहि आश्चर्ययुक्त झाला.

चंद्रोदय होऊन निशामुख उज्ज्वल झाल्यावर, तिने त्याला हातीं धरून महालांत नेऊन सुवर्णमंचकावर बसविलें. पुढें मद्यादि सेवन केल्यावर, तिने प्रमत्त होऊन संभोगेच्छा दर्शविली. तरी तो विवश झाला नाही. त्यानें तिला तसेंच हृदयाशीं कवटाळलें तेव्हां ती लज्जीत व नम्र झाली. तिची प्रशंसा करीत तो म्हणाला, ' हे कमलपत्राक्षी, तूं माझें मन पार हरण केलें आहेस तरी पण मी व्रतस्थ असल्यामुळें, मला तुझा मनोभंग करावा लागतो आहे. हे प्रियतमे, तुझ्या सहज सौंदर्यामुळें व विनयामुळें, मी तुझा दास झालों

आहे लौकरच माझी हकीकत तुला कळून येईल आणि माझ्या उत्कट प्रेमाचा तुला अनुभव घडेल.' असें बोलून त्यानें पुढें दीर्घ उच्छ्वास टाकीत आणि आपल्या अंगुलीयकयुक्त अंगुलींनी, मंचकावर ताल धरीत, स्वतःशींच पुढील श्लोक म्हटला, ( ४४१ ) असमाप्त जीवितम्य स्त्री चिंता का मनस्विनः ।। अनाक्रम्य जगत्सर्वं नो संध्यां भजते रविः ।। १ ।। ( मनांत ठरविलेली इतिकर्तव्यता पार न पाडलेल्या मनस्वी पुरुषाला, स्त्रीविषयक अभिलाष कोठून असणार ? साऱ्या जगाचें आक्रमण आटपल्यावांचून सूर्य संध्या देवीचें सेवन करीत नसतो. ) यावरूनहि त्या नर्तकीनें तो कोणी महात्मा व थोर पुरुष आहे, अशी मनांत पक्की गांठ मारली.

प्रातःकाळीं तो जाऊं लागला तेव्हां, त्या प्रेमवश कमलेनें नम्रपणानें त्याला, कसेंहि करून राहण्याचा आग्रह केला. तेव्हां त्याचा निरुपाय झाला. पुढें तो एकदां नदीवर संध्या वंदनाला गेला होता. तिकडून येण्याला त्याला बरीच रात्र झाली म्हणून कमला चिंताग्रस्त झालेली पाहून त्यानें तिला त्याचें कारण विचारलें. त्यावर तिनें आनंदानें व हंसत कळविलें कीं, इकडे एक भयंकर सिंह आहे. तो नर, तुरग, गज, वगैरे प्राणिमात्रांचा संहार करीत असतो. आपणांला येण्याला रात्र झालेली पाहून आम्हांला त्यासंबंधानें भारी काळजी पडून, आमची गाळण झाली. येथील राजे, राजपुत्र व सरदार, सारे त्याच्या भीतीनें, रात्र पडताच दारें लावून घरांत बसतात. त्यांना बाहेर पडण्याचें धैर्य होत नाहीं. यावर त्यानें त्या सुमुखीचें सांतवन केलें व रात्र बरीच पडतांच, तो गांवाबाहेर गेला आणि एका वटवृक्षाखालीं त्या सिंहाची मार्गप्रतिक्षा करीत राहिला. कांहीं वेळानें थोड्या अंतरावर फुललेल्या बकुल वृक्षाप्रमाणें व अंतकाचा मूर्तिमंत जंगम अट्टहासच असा शोभणारा, एक भयंकर सिंह, गर्जना करीत निघालेला त्याला दिसला. ( ४५० ) तो वनमृगराज हळूं हळूं एकीकडे चाललेला पाहून, त्या नरसिंह जयापीड राजानें त्याला जोरानें हटकलें त्यासरशी तो कान थरारून, जबडा वासून, आयाळ फेंदारीत, लालगुंज नेत्र वटारीत पुढील भाग उभारीत व क्रोधानें गर्जना करीत, त्याच्यावर धांवला. तो आपणांवर झपकतो तोंच, जयापीडानें मोठ्या शिताफीनें त्याच्या जबड्यांत आपलें डावें कोंपर खुपसलें व जंबियानें त्याचें उरस्थळ पार चिरलें. त्या एकाच तडाख्यानें तो सिंह तत्काळ मरून पडला. त्याचें वाहणारें रक्त, गज गंडस्थळावर फांसलेल्या लालभडक रंगासारखें शोभत होतें. जयापीडाने कोंपरावर लागलेली थोडीशी जखम पट्टी बांधून झांकून घेतली आणि तो त्या वेश्येच्या घरी परत जाऊन नित्याप्रमाणें स्वस्थ निजला.

प्रातःकाळीं सिंह मारला गेल्याचें ऐकून जयंत राजाला भारी आनंद झाला व तो स्वतः मोठ्या उत्सुकतेनें त्याला पाहण्यास गेला. तें प्रचंड व भयंकर धूड, एकाच वारानें ठार झालेलें पाहून; त्याला भारी आश्चर्य वाटलें आणि तो वार करणारा कोणी दिव्य पुरुष असला पाहिजे, अशी त्याची खात्री झाली.

त्या सिंहाच्या दाढेंत एक अंगद किंवा भुजबंद अटकलेला होता. तो एका सेवकानें काढून राजाला दाखविला. त्याच्यावर, थोर अशा जयापीड महाराजांचे नांव पाहून, त्याला

अचंबा वाटला. पृथ्वीपति जयापीड आपल्या येथें कधीं व कसे आले, याची त्याला कांहीं कल्पना होईना त्यांचें नांव ऐकतांच सर्व नागरिकांचा थरकांप झाला. जयंत राजानें त्याचा तपास चालविला आणि थोडया विचाराअंतीं त्यानें त्या लोकांना म्हटलें. 'अरे, तुम्ही सारे भारी वेडे दिसतां. या आनंदाच्या प्रसंगीं, असे भितां कां ? (४६०) स्वभुजबलावर भिस्त ठेवून, जयापीड महाराज कांहीं कारणास्तव गुप्तपणें, एकाकी कल्लट राजपुत्र या नांवानें फिरत आहेत, असें म्हणतात. मला पुत्र नाहीं. ही आपली प्रियकन्या कल्याण देवी, मी त्यांनाच देणार. ज्याचा शोध करावयाचा, ते स्वतःच आले असले तर, रत्नसंपादनासाठीं रत्नद्वीपाच्या सफरीला निघणाऱ्याला, घरातच रत्ननिधि सांपडावा, तसें झालें म्हणावयाचें. ते सार्वभौम महाराज, या नगरांतच असावेत. त्याचा शोध काढील त्याचे मी सकल मनोरथ पूर्ण करीन.'

जयंत राजा योग्य व सत्यवचनी होता. त्याचे हें भाषण ऐकून, गांवच्या लोकांनीं खटपट करून जयापीड महाराज, नगरांतच कमला नर्तकीच्या घरीं असल्याचा शोध लावून राजाला कळविलें. तेव्हां तो आपल्या राण्या व प्रधान यांच्यासह कमलेच्या घरीं पोंचला आणि मनोभावानें व विनयपूर्वक आग्रह करून, त्याने जयापीडाला मोठ्या थाटानें राजवाडयांत मेजवानीला बोलावून नेले आणि लौकरच त्या भाग्योदयोन्मुख जयापीडाकडून त्यानें कांहीं काळ टाकलेल्या राजलक्ष्मीचेंच जणों, कल्याण देवीच्या रूपाने पुनः पाणीग्रहण करविलें. पुढें जयापीडाने विशेष सहाय्य सामग्रीची अपेक्षा न ठेवतांच पांच गौड राजांचा पराभव केला आणि त्याना जयंत राजाचे ताबेदार मांडलिक बनविलें.

थोडयाच दिवसांनी मित्रशर्मा मंत्र्याचा पुत्र देवशर्मा, जयापीडाकडे आला. जयापीडानें परत पाठविलेले, निर्नायक असे सैनिक, त्यानें पदरीं ठेवलें होते. त्याच्या विनंतीला मान देऊन, जयापीड भावी विजयलक्ष्मी आणि कल्याण देवी व कमला नर्तकी यांना बरोबर घेऊन आपल्या राज्याकडे जाण्यास निघाला. (४७०) मार्गांत मोठा पराक्रम करून त्यानें कान्यकुब्ज देशाच्या राजाचा पराभव करून, त्याचें सिंहासन हरण केलें. असे पराक्रम करीत तो मोठ्या सैन्यासह आपल्या राज्यांत पोंचतो तोंवर, जज्जहि आपल्या फौजेसह त्याच्याशीं लढण्याला आला होता. उभय सैन्यांचें शुष्कलेत्र (हल्लीचे हुस्खालित्र.) गांवाजवळ पुष्कळ दिवस निकराचें युद्ध झालें. जयापीड राजा त्याच्या प्रजेला फार प्रिय होता. जज्जाच्या अमलाला त्रासलेले पुष्कळसे खेडवळ व जंगली लोक त्याला येऊन मिळाले. त्यांच्यांतच श्रीदेव नांवाचा एक गांवचा चांडाल होता. तो आपल्या आईला, मी 'लढाईवर जातो आहें. मी जज्जाला ठार करणार, मला भाकऱ्या दे.' असें बोलून आपल्या गांवकऱ्याबरोबर रणांगणात आलेला, सैनिकांना, 'जज्ज कोणचा व कोठे आहे' म्हणून विचारीत होता. त्याला त्यांनीं दुरून दाखविलें. त्यावेळीं जज्ज घोडयावर बसलेला, तृषार्त होऊन, सुवर्णाच्या झारींतून पाणी पीत होता. त्या चांडालानें तात्काळ त्याच्या तोंडावर नेमका एकच गोफण गुंडा मारला. त्यानें राजा घायाळ होऊन पडलेला पाहून, तो चांडाल, 'मी राजाला ठार केला,' असें ऐटीनें ओरडत, आपल्या मातेकडे निघून गेला. जज्ज जबर जखम

होऊन, जबडा फुटून, घोड्यावरून पडला व प्राणांतिक वेदना होऊन जमीनीवर लोळूं लागला. त्याला तसाच टाकून, त्याचे लोक पळून गेले. त्यानें राजद्रोह करून राज्य बळकावलें होतें. आपला प्रबळ शत्रु केव्हां परत येऊन घात करील कोण जाणें, अशी त्याला सारखी भीति होती. त्याच्यामुळें प्रजा फार त्रस्त होती. असा तो दुष्ट जज्ज तीन वर्षांनीं राज्य आणि जीवित, दोन्हींला मुकला. (४८०)

ठेवी पचवून सांठविलेलें सावकाराचें धन, यारांची वंचनाकरून जमा केलेली वारयोषितांची संपत्ति आणि राजद्रोहानें बळकावलेली राज्यसंपदा, या साऱ्या खरोखर भारी अस्थिर असतात.

जज्ज मारला गेल्यावर जयापीडानें आपलें राज्य परत कबजात घेतलें. आपलें चोख वर्तन व सद्गुण, यांच्या द्वारें त्यानें राज्यलक्ष्मी, पृथ्वीचा राज्यकारभार आणि सज्जनांचीं अंतःकरणें, यांचें एकदमच आक्रमण केलें.

याप्रमाणें शत्रूच्या नाशामुळें कल्याणप्रद झालेल्या त्या प्रांतांत कल्याणदेवी व राजा जयापीड यांनीं अनुक्रमें कल्याणपुर (हल्लींचे शुकू परगण्यांतील कलमपोर. हे 'शूपियनपासून श्रीनगराला जाणाऱ्या मार्गावर आहे.) आणि मल्हाणपुर (हल्लींचें वितस्तेच्या डाव्या तीरावरील मल्लूर.) हीं नगरें बसविलीं आणि कमला नर्तकीनें आपल्या नांवानें कमलापूर बसविलें. कल्याणदेवीनें कल्याणपूर येथें विपुल केशव देवाची स्थापना केली.

त्यानें, कल्याणदेवीवरील आपलें प्रेम व आदर व्यक्त करीत, तिला महाप्रतिहारपडाचे बहुमानाचें पद दिलें. गुप्त झालेल्या वितस्ता नदीला कश्यपऋषींनीं काश्मीर मंडलांत पुनः प्रकट करविली, त्याप्रमाणें त्यानें सर्व विद्यांचे आदिप्रभवस्थान अशा या आपल्या राज्यांत, लुप्तप्राय झालेल्या विद्यांचें पुनरुज्जीवन केलें;व स्वतःला मूर्ख म्हणविणाऱ्यांना सुद्धां ज्ञान मिळवून घेण्याची व्यवस्था केली होती. त्या देशांत लुप्तप्राय व विच्छिन्न झालेल्या व्याकरण महाभाष्याची त्यानेंच, देशांतराहून विद्वान वैय्याकरण आणवून पुनः प्रवृत्ति केली. त्यानें क्षीर नांवाच्या जबर वैय्याकरण पंडितापाशीं व्याकरणशास्त्राचें अध्ययन केलें व तो स्वतः उत्तम पंडित बनला होता. (क्षीर–क्षीरस्वामी–हा काश्मीरी पंडितांमध्यें प्रचलित असलेल्या दंतकथेअन्वयें–ईश्वरस्वामीचा पुत्र होता. त्याची अमरकोशावरील टीका सुप्रसिद्ध आहे. शिवाय त्यानें व्याकरणशास्त्रावर दुसरेंहि लहान लहान ग्रंथ लिहिले आहेत.) तो कोणाहि राजाची आपल्याशीं स्पर्धा चालूं देत नसे. पण स्वतः विद्वानांशीं स्पर्धा करण्यांत त्याला गौरव, हौस व आनंद वाटत असे. (४९०) राजा या पदवीपेक्षांहि त्याला पंडित ही पदवी, जास्त शोभत व आवडत असे. त्याचे इतर सर्व गुणदोष कालवश विस्मृत झाले, तरी पंडित पद कायम राहिलें आहे.

तो विद्वानांचा जणों दास असे. त्याच्या सेवेंत हजर होणारे सामंत, त्याच्या दर्शनासाठीं विद्वान लोकांच्या घरोघर फिरत असत. त्यानें इतक्या उत्सुकतेनें विद्वान लोकांचा तपास करण्याचें व त्यांना पदरीं बाळगण्याचें काम चालविलें होतें कीं, त्यामुळें इतर

राजांच्या राज्यांत विद्वानांचें दुर्भिक्ष झालें होतें. त्याचा प्रधान मंत्री शुक्रदंत याच्या अन्नछत्रावरील थक्किय नांवाचा जाडा विद्वान अधिकारी, याला त्यानें आपल्या पदरीं घेऊन, त्याला सर्व विद्वानांवर अध्यक्ष नेमलें होतें. भट्ट उद्भट नांवाचा विद्वान आलंकारशास्त्रज्ञ हा त्याचा पदरीं सभापति होता. त्याला रोज एक दिनार वेतन मिळत असें. ( भट्ट उद्भटांचा अलंकारशास्त्रावरील एक लहानसा ग्रंथ प्रो. बुल्हर साहेबांना उपलब्ध झाला आहे. ) दैत्यराज बली यानें कवि शुक्राचार्य याला मुख्य सचिव व आचार्य केलें होतें, त्याप्रमाणें त्यानें कुट्टिनी मतकार कवि दामोदर गुप्त याला आपला मुख्य मंत्री नेमलें होतें. मनोरथ शंखदत्त, चटक व संधिमान, हे कवी आणि वामनादिक मंत्री त्याच्या पदरीं होते. (दामोदर गुप्ताचें कुट्टिनीमत नांवाचें काव्य, प्रो. पीटरसन, यांना खंबायत येथील मंदिराच्या प्राचीन पुस्तकालयात मिळालें होतें. तें काव्यमालेच्या तिसऱ्या पुस्तकात छापून प्रसिद्ध झालेलें आहे. मनोरथ कवींचे कांहीं श्लोक. वल्लभदेवाच्या सुभाषितावलींत दिलेले आहेत. वामनमंत्री हा पाणिनीय व्याकरण सूत्रावर काशिकावृत्ति ही टीका लिहिणाऱ्यांपैकीं एक असावा, असें मानलें जातें. पण प्रो. विल्सन् यांच्या मतें,काव्यालंकार वृत्तीचा कर्ता असावा. काशिकावृत्तीचा उल्लेख इत्सिंग या चिनी ग्रंथकाराच्या लेखांत आहे. तो ई. स. ६९० हून अलीकडचा नाहीं. तेव्हा ती वृत्ती जयापीडाच्या समकालीन वामनानें लिहिली असणें असंभवनीय दिसतें. )

त्याला एकदां स्वप्नांत सूर्य पश्चिमेकडे उगवलेला दिसला. त्यावरून, आपल्या राज्यांत कोणी श्रेष्ठ धर्मगुरु-धर्मोत्तराचार्य-प्रविष्ट झाला आहे, असे त्याच्या मनाला पक्कें वाटलें. तो राजा मोठा बुद्धिवान्, विवेकी, अनुभविक आणि साऱ्या उपभोग्य विषयांचें तत्त्व जाणणारा असा होता. उत्तम चित्ताकर्षक वस्तू किंवा गोष्टींवर ज्यांची दृष्टि किंवा चित्त ठरत नाहीं आणि ज्यांना खऱ्या, माधुरीची पारख नाही, असे राजे, अंध वृषभाप्रमाणे उदरंभरू; त्यांना दुसरें काय कळणार ? ( ५०० )

चितेंत प्रवेश करण्याला तयार झासेल्या सतीनें चितेवरील प्रेताला दिलेलें आलिंगन, महामोहामुळें नष्ट स्मृति झालेल्याला पांडया उसाच्या मधुर रसाचें पान,किंवा प्रेताला माल्य, अवतंस, गजरे, इत्यादिकांचा सुवास, या गोष्टी आणि मृतापुढें आलेलें सृष्टिसौंदर्य व वैभव सारखेंच. मंत्र आणि पराक्रमरूपी समोरासमोर ठेवलेल्या दोन आरशामध्यें प्रतिबिंबित झालेलें त्यांचें रूप सहस्रपट दिसत असें.

एकदां त्यानें आपल्या एका दूताला लंकेश्वराकडून पांच राक्षस आणण्याची विलक्षण आज्ञा दिली. ती त्या दूतानें गृहण केली. तो, जलमार्गानें लंकेंद्राकडे जात असतांना, नौका बुडून पाण्यांत पडला. त्याला एका माशानें गिळलें त्याचें पोट फाडून तो बाहेर पडला व लंकेच्या किनाऱ्याला लागला व लंकेद्र बिभीषणाकडे गेला. रामाच्या भक्तीमुळें बिभीषण मानवांना प्रियमित्र मानीत असल्यामुळें, त्यानें त्या राजाच्या दूताचा सत्कार केला आणि त्याला पांच राक्षस बरोबर देऊन परत पोंचविलें. राजानें त्या दूताला पुष्कळसें इनाम दिलें

व त्या राक्षसांकडून एक अथाग सरोवर भरून काढविलें आणि तेथें स्वर्गाशीं स्पर्धा करणारें, जयपूर कोट हें सुंदर शहर वसविलें. ( जयपूर द्वारवती ही जोड गांवें संबल सरोवराच्या कांठावर, अंद्रकोट या खेडयाजवळ होतीं, असें डॉ. बुल्हर यांनीं स. १८७६साली तपासाअंतीं, ठरविलें आहे. अंद्रकोट हें संबल सरोवरांतील एक लहानसें बेट आणि त्याच्या व वितस्ता नदीच्या मधील भागांत वसलेलें आहे. त्या बेटावर प्राचीन मंदिरांचे पुष्कळसे अवशेष आहेत. ती मंदिरें जयापीड राजानें बांधविलीं होतीं, असें तेथील लोक सांगतात. श्रीनगरचे पंडितहि याला पुष्टि देतात. अंद्रकोट म्हणजे आभ्यंतर कोट. त्याच्या बाह्यकोटाला द्वारवती हें नांव होतें. पंधराव्या शतकाच्या अखेरीस, श्रीवर कवच्या वेळीहि, हें स्थळ 'जयापीडपुर किंवा जयपूर, या नांवानें प्रसिद्ध होतें. या बेटाच्या वायव्य टोकांकडील विस्तीर्ण अवशेष विपुल केशवाच्या भव्य मंदिराचेच असावेत ). त्यानें तेथें तीन बुद्धाच्या मूर्ती स्थापन करविल्या व एक मोठा विहार बांधविला. तसेंच त्या पुण्यात्म्याने त्या नगरांत जयादेवीचेंहि मंदिर बांधविलें. ( संकर्षण, अनिरुद्ध, वासुदेव, व प्रद्युम्न, अशा ) चतुरात्मा शेषशायी केशवानें विष्णु लोकांतील वस्ती सोडून त्या नगरांत जणो कायमची वस्ती केली होती.

त्या राक्षसाच्या हातून आणखीहि कांहीं कामें करवून घेतल्यावर, त्यानें त्या सरोवरांतील पाणी इतर मजूरांकडून झांकून टाकविलें, असें कांहीं लोकांनीं लिहिलें आहे.

त्या राजाला कंसारि श्रीकृष्णानें आपल्यासाठीं प्रतिद्वारका तयार करून देण्याची, स्वप्नांत आज्ञा केली त्याप्रमाणें त्यानें ती तयार करविली. ( ५६० ) तिला बाह्यकोट व जयपुराला आंतरकोट असें म्हणत असत.

त्या राजाचा महामंत्री जयदत्त, याला पंच महाबिरुदें मिळालेलीं होतीं. त्यानें जयपुरामध्यें एक मठ बांधविला. तसेंच राजाचा प्रतिहार, मथुराधीश प्रमोद याचा जांवई, आच यानें आचेश्वर शिवाचें मंदिर बांधविलें.

नंतर सर्व सिद्धता करून तो पुनः स्वारीवर निघाला. त्याच्या सैन्यांतील प्रचंड हत्तींच्या रांगांमुळें, जणों, वेलाद्रीच आपली सीमा वाढवीत आहे, असें दिसत होतें. हिमनगांतून बाहेर पडलेली भागीरथी पूर्वसमुद्राला पोंचून, परत हिमाचलावर येऊन पसरावी, त्याप्रमाणें त्याची अफाट सेना शोभत होती.

मुम्मुनिप्रमुख सामंत, उग्र व राकट चांडाळ लोकांच्या डोळ्यांसह रात्रभर त्याच्या सेना निवेशाभोंवती पाहरा करीत असत.

त्यानें विनयादित्य हें नवें नांव धारण केलें आणि विनयादित्यपुर नांवाचें नवें नगर वसवून, त्या पूर्व दिग्भागाला शोभा आणली.

मर्यादेबाहेर साहस करूं जाणाऱ्या प्रतापी राजाची सुद्धां राज्यश्री संशयारूढ होत असते.

त्या भागांत भीमसेन नांवाचा एक राजा होता. त्याची अंतःस्थिति जाणण्याच्या हेतूनें विनयादित्य बैराग्याच्या वेषानें, दुसऱ्या थोडया तशाच मित्रांसह, गुप्तपणें भीमसेनाच्या किल्ल्यांत शिरला. तो तेथील मान्याच्या जागांची टेहळणी करीत असतांना तेथेंच बरेच दिवसांपासून रहात असलेला जज्जाचा भाऊ सिद्ध, यानें त्याला पाहून ओळखलें व याची भीमसेन राजाला खबर दिली. ( ५२० ) तेव्हां पूर्वी अजगर रूपी नहुषानें कौंतेय भीमपराक्रमी भीमाला अवचित घेरून टाकलें होतें. त्याप्रमाणें या भीमसेनानें विनयादित्याला जखडून, बंदोबस्तानें कैदेंत टाकलें. विधीला धुरंधर वीरांच्या उन्नतींचा जणो नेहमीं विषाद वाटत असतो, म्हणून त्या वीराग्रणीची ती दुर्दशा पाहून विधीनें आपलें शिर जणों ऐटीनें उन्नत केलें असावें ! तशा दारुण संकट प्रसंगींहि न डगमगतां तो स्वतःच्या मुक्ततेचे उपाय योजीत राहिला.

याच सुमारास त्या प्रांतांत लूता रोगाची भयंकर सांथ सुरू झाली. त्या देशाच्या चमत्कारिक स्थितीमुळें तो रोग अतिशय मारक व स्पर्शसंचारी झालेला होता, त्याला स्थानत्यागावांचून उपायच नव्हता. हें पाहून जयापीडानें त्याचा आपल्या सुटकेसाठीं उपयोग करून घेण्याचें ठरविलें. त्यानें गुप्तपणें, आपल्या सेवकांकरवीं कांहीं जिन्नस आणविले. ते खाल्ल्यानें त्याला खूप जोराचा पित्तज्वर आला. तसेंच त्यानें वज्र नांवाच्या झाडाचा चीक मागवून, अंगाला लावला व त्यायोगानें सर्वांगावर फोड उठविले. तेव्हां त्याला लूता रोग झाला आहे, अशी रक्षकांकडून भीमसेन राजाला खबर मिळाली. तो त्या रोगाला खाचित बळी पडणार, असें समजून, त्यानें जयापीडाला आपल्या देशांतून घालवून दिलें.

स्वतःच्या बुद्धिकौशल्यानें अशा रीतीने संकटांतून पार पडतांच जयापीडानें भीमसेनाचा तो गगनस्पर्शी दुर्ग व त्याचें यश, दोन्ही एकदमच हरण केलें.

शास्त्ररूपी वृक्षाला मूढजन नेहमीं नांवें ठेवीत असतात. त्याचें मूळ, अंकुर व फुलें, वगैरे स्पष्ट दिसत नाहींत; तरी तो ऐन संकटसमयीं फलद्रूप होऊन, तात्काल दैन्य नष्ट करीत असतो. ( ५३० )

नेपाळचा राजा अरमुडी. ( हे नांव नेपाळच्या प्राचीन राजांच्या उपलब्ध यादींत आढळत नाहीं. ) हा फार हुषार, तसाच पराक्रमी, होता, तो शहाणपणानें जयापीडाला गोत्यांत आणूं पहात होता जयापीडानें त्याच्यावर चढाई केली तेव्हां त्याला शरण येण्याऐवजीं अरमुडी, आपल्या राज्यांतील दूर दुर्ग भागांत निघून गेला कसेंहि करून त्याचा पाडाव करण्याच्या हेतूने, जयापीड त्याच्या मागें लागला. वाटेंत जातां जातां त्यानें अनेक राजे जिंकून घेतले. अरमुडी कधीं प्रकट व कधीं गुप्त होत असे. त्याचा पाठलाग करण्यांत जयापीडानें श्येन कपोतीय प्रकार चालविला होता. पुढें अरमुडीला पळण्यादडण्याला स्थळ उरलें नाहीं. तोंवर जयापीडाचें दिग्विजयीं सैन्य, एका मोठ्या नदीचा सागराशीं, संगम झाला होता, त्याच्या वरच्या अंगाला पोंहचलें होतें. तेथेंच त्यानें तळ दिला. दोनतीन दिवसांनीं तो पूर्वसमुद्राच्या रोखानें चालला. त्याच्या फौजेचीं निशाणें पूर्वसमुद्रा-

वरून येणाऱ्या वाऱ्यांत फडकत होतीं. त्याच नदीच्या पैलतीरावर अरमुडीनेंहि आपल्या फौजेचा तळ दिला असल्याचें त्याला दिसून आलें. त्याच्यांतच अरमुडींचें श्वेतछत्र चमकत होतें. तें मोठें थोरलें सैन्य पाहतांच, घृताहुतींनीं प्रज्वलित झालेल्या होमाग्नीप्रमाणें जयापीडाचा क्रोधाग्नी भडकला. त्याच्यासमोर त्यावेळीं नदीला गुडघाभरच पाणी होतें. तेव्हां आपणांला सहज नदीपार उतरून जातां येईल असें समजून, तो रागाच्या भरांत नदींत घुसला. तो प्रदेश व ती नदी त्याला अगदीं अपरिचित होती. तो पात्राच्या मध्यभागीं पोंचतो तों, अवचित आलेल्या समुद्राच्या भरतीच्या पाण्याच्या तुंबाऱ्यामुळें पाणी अथांग झालें ( ५४० ) व नदींत उतरलेले त्याचे हत्ती, घोडे व पायदळ, क्षणभरांत बुडून गेले. लाटांच्या सपाटयानें राजाचीं वस्त्रें व अलंकार वाहून गेले. तो नेटानें पोहत असतांना भरतीच्या लोटामुळें दूरवर वाहवला. एका सैन्यांतील दुःखाक्रोश, दुसऱ्यांतील जयघोष, आणि नदीचा जोराचा प्रवाह व लाटा यांचा घोर शब्द, यांनीं दशदिशा दुमदुमून गेल्या. अरमुडींचे लोक चामड्याच्या फुगविलेल्या मसका घेऊन तीरावर उभे होते. त्यांना एकदम नदींत उतरवून त्यानें जयापीडाला कांठावर ओढून आणविलें आणि या जयाबद्दल त्यानें आनंदमहोत्सव चालविला.

दैव आणि मेघ यांना उपकार करण्याची संवय क्वचितच असते. दैव प्रारंभीं एकाद्याला आनुकूल्य दाखवितें व त्याबरोबरच घोर आपत्ति तयार करीत असतें. तसेंच मेघ ग्रीष्मांतील दीर्घ व तापद दिवसांच्या संतापाचें शमन करण्याची तात्कालिक उमेद दाखवीत असतांनाच विद्युत्पाताच्या द्वारें वृक्षांचा नाश करीत असतात.

अरमुडीनें जयापीडाला कालगंडिका नदीच्या ( गंडकी नदी, इच्याच वरच्या भागाला काली असेंहि नांव आहे. नेपाळच्या पश्चिम भागांतील दक्षिण पाणढाळावरील बहुतेक पाणी याच नदीत येतें. ) कांठावरील एका उंच दगडी किल्ल्यांत आपल्या विश्वासू आप्तांच्या पाहाऱ्यांत सक्त कैदेंत ठेवलें. अशा रीतीनें पुनः संकटांत पडल्यावर जयापीड राजाला पुढे काय करावें ते सुचेना. त्याला गूढ शोकाग्नी सारखा जाळीत होता. त्या हुषार अरमुडीनें त्याची कैद इतकी कडक केली होती कीं, प्रभावान् सूर्य-दिवसां-किंवा कलावान चंद्र-रात्रीं-यांनासुद्धां त्याचें दर्शन दुर्लभ होते.

कारागृहांतील एका वातायनाशीं तो आला व त्यानें बाहेर पाहिलें. तेथून त्याला नदीचें पात्र खोल असलेलें दृष्टीस पडलें. तो सुटका होण्याचे उपाय पाहूं लागला. त्या कारागृहांत असतांना त्यांनें कांहीं श्लोक रचले. त्यांच्यांत त्यानें आपल्या हताश स्थितीचें सुरेख वर्णन केले आहे. ते श्लोक वाचून विद्वान लोक अद्यापिहि दुःखीकष्टी होतात. ( वल्लभदेवाच्या सुभाषितावलींत एका जयापीडाचा एक श्लोक आढळतो. तो न जाणों याच जयापीडाचा असावा. )

तो असा पुनः कैदेंत पडलेला पाहून, त्याचा मानी व हुषार मंत्री देवशर्मा याला राजाकडून प्राप्त झालेल्या बहुविध बहुमानाचें स्मरण होऊन, रात्रंदिवस भारी दुःख होऊं

लागलें होतें. त्यानें त्याच्या सुटकेविषयीं सारखा विचार व खटपट चालविली होती. स्वतःचा देहत्याग करूनसुद्धां मालकाची मुक्तता करण्याचा निश्चय करून, त्यानें चतुर व मिष्ट भाषणी दूत पाठवून अरमुडीला कळविलें कीं, जयापीडाची सारी दौलत आणि काश्मीरचें राज्य आपल्या स्वाधीन करण्याला मी तयार आहे. यावरून अरमुडी भुलला व त्यानें आपले दूत पाठविले. नंतर अपसांत ठराव होऊन देवशर्मा सैन्यासह नेपाळला गेला. बहुतेक सैन्य त्यानें कालगंडिकेच्या पलीकडे ठेवलें व थोड्याशा लोकांनिशीं तो पार उतरला. त्याला सामोरें आलेल्या सांमतांनीं त्याचा सत्कार करून अरमुडीच्या दरबारांत नेलें. त्यानें अरमुडीला प्रणाम केल्यावर, अरमुडीनें त्याला बसण्यास सांगितलें. थोडा वेळ बोलणें होऊन देवशर्म्यानें मार्गक्रमणाचा थकवा घालविण्यासाठीं रजा मागितली. अरमुडीकडील भेटी, डाल्या वगैरेचा स्वीकार करून, त्या दिवसभर तो आपल्या डेऱ्यांतच राहिला.

दुसरे दिवशीं त्यानें अरमुडीबरोबर कोशपानपूर्वक भाषण करुन, पुढे कसें काय करावयाचें तें ठरविलें. नंतर देवशर्म्यानें त्याला म्हटलें कीं, ' जयापीडानें सांठविलेला सारा खजिना सैन्याबरोबर आहे. पण त्याची जागा त्याला आणि त्यांच्या विश्वासांतील सेवकांना व सैनिकांनाच माहीत आहे. तो खजिना दिला तरच सुटका होण्याचा संभव आहे, असे सांगून जयापीडाला तो खजीना कोठें आहे तें विचारावें म्हणतों. ( ५६० ) म्हणूनच मीं सैन्य दूर ठेवलें आहे. खजीन्याची माहिती असलेल्यांना, ते फौजेंतच असतांना, एकदम कैद करणें शक्य नाहीं. त्यांपैकीं एकेकाला बोलावून घेऊन, कैद केलें तर, इतर सैनिकांना आपल्या बेताची बातमी लागणार नाहीं व ते गडबड न करितां विचारल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याला आणि खजिन्याविषयीं माहिती देण्याला बहुतकरून तयार होतील. '

याप्रमाणें बोलून त्या चतुर मंत्र्यानें अरमुडीला मोह घालून, त्याची संमति मिळविली व तो कारागृहांत जयापीडाजवळ पोंचला. राजाची दुर्दशा पाहून त्याला भारी दुःख झालें. पण तें त्यानें दृढ निश्चयानें व धैर्यानें गिळून टाकलें. नंतर तेथें एकांत करवून त्यानें राजाला गडबडीनें म्हटलें, ' आपण आपलें तेज व ओज कायम राखलें आहेना? चित्ररचनेला भिंतीची, तशी आपलें साहसाचें विचार अमलांत आणण्याला, त्याची आवश्यकता आहे. ' राजानें उत्तर दिलें,' मी निश्शस्त्र व अशा या दुःस्थितींत पडलेला आहे. तेव्हां ओज व धैर्य कायम असून तरी माझ्या हातून कोणचें शतकृत्य होणार? ' तेव्हां देवशर्मा म्हणाला, ' महाराज, आपलें ओज व धैर्य कायम असलें तर आपण हा आपत्तिरूपी सागर या क्षणीं तरून जाल. पहा तर, या वातायनांतून खालीं पाण्यांत उडी टाकून पोहत पलीकडे पोंचतां येईल कां? तिकडे आपली फौज तयार आहे. ' यावर राजानें म्हटलें, ' फुगलेल्या मसकेवांचून खालीं पाण्यांत उडी मारून तरतां येणार नाहीं व ती असली तरी, ती उडी मारतांच पाण्याच्या आघातानें फुटेल. तेव्हां हा उपाय कांहीं शक्य दिसत नाहीं. माझा हा झालेला अवमान शत्रूच्या निर्दाळनानें धुवून टाकल्यावाचून व्यर्थ प्राण धोक्यांत घालणें योग्य नव्हे. ' ( ५७० )

हें ऐकून त्या मंत्र्यानें थोडासा विचार करून म्हटलें, ' महाराज, कांहीं निमित्तानें आपण येथून दोन घटका बाहेर जाऊन, नंतर एकटेच परत या. तोंवर आपणांला नदीपार होण्याचा उपाय तयार मिळेल. तो आपण निश्शंक अमलांत आणा. '

राजा बहिर्दशेला म्हणून जाऊन, दोन घटकांनीं आंत येऊन पाहातो तों, देवशर्मा उपरण्याचा गळफांस लावून घेऊन मरून पडला होता. त्यानें त्या उपरण्याच्या टोकांवर नखांनीं काढलेल्या रक्तानें लिहून, ठेवलें होतें कीं, ' हा मी आतांच प्राण देऊन, आपल्यासाठीं फुगलेली पण न फुटणारी मसक बनलों आहे. तिच्या आधारानें नदींत उडी टाकून पार निघून जा. आपल्या मांड्यांना आधार पाहिजे म्हणून मी कंबरेला आपला पटका बांधून ठेवला आहे. त्यांच्यांत पाय ठेवून ताबडतोब नदींत उडी टाका. '

हें पाहून जयापीड राजाला भारी विस्मय वाटला व त्याच्या मनांत देवशर्म्याविषयीं भारी प्रेम व आदर वाटला. नंतर त्यानें त्या प्रेताचा आधार घेऊन, नदींत उडी मारली व पोहत पार उतरून, आपले सैन्य गांठलें आणि ताबडतोब हल्ला करून त्यानें अरमुडीचा व त्याच्या राज्याचा, एकदमच नायनाट केला. त्याच्यावरील रक्षकांना तो सुटून गेला हें कळण्यापूर्वीच त्यानें तें राज्य कथावाशिष्ट करून टाकलें होतें. ( ५८० )

राजानें कारागृहांतून सुटतांच विलक्षण रणतांडव सुरूं झालें. त्यांच्यांत मुंडहीन धडें नाचूं लागलीं. रणांत पडलेल्या वीरांच्या गळ्यांत अप्सरांनीं घातलेले हार हे सुमनमाळा, व प्रचंड रणभेरींचा ध्वनी, मंगल वाद्यांचा गजर झाला होता !

जज्जासारखा स्वामिद्रोह करणारा जन्मास आला तेथेंच व त्याच सुमारास, थोर कर्तृत्ववान व स्वाभिभक्तीसाठीं प्राण देणारा देवशर्माहि जन्मास यावा, हें तरी विलक्षणच नव्हें काय ? आपला पिता मित्रशर्मा याच्याहून देवशर्मा भिन्न गुणी निपजला नाही. तो मोठा प्रतापी व योग्य होता. तेजोराशी सूर्याच्या पोटीं तमोराशी शनैश्वर पैदा झाला, तशांतला प्रकार कांहीं येथें झाला नाहीं.

काय चमत्कार आहे पहा ! उन्हाळ्यांत इतर पहाड, पर्वत, दावाग्नीनें व्यापले जातात यामुळें त्यांना टाळावें लागतें. पण हिमनग विरघळणाऱ्या बर्फराशींतून वाहणाऱ्या निर्झरोदकानें वहात असल्यामुळें सुखकर व सुसेव्य होत असतो.

मंत्री देवशर्मा आपणासाठीं मरण पावला. यांत आपल्या गळ्यांतील रक्षामणीयुक्त ताईत हरपला. त्या अर्थी नुकतीच परत मिळालेली राज्यलक्ष्मी, त्या राजाला मिळून न मिळून सारखीच वाटली.

असा हा दिग्विजय आटपल्यावर जयापीडाच्या मनांत असलेला कलंक दूर झाला, हें खरें, पण त्यामुळें त्या मंत्र्याच्या उपकाराचा भार त्याच्या मनावरून कांहीं हलका झाला नाहीं.

त्यानंतर जयापीडानें मोठ्या व सुसंपन्न अशा स्त्रीराज्यावर स्वारी करून, तें विस्तीर्ण राज्य जिंकून घेतलें. इतर राजांना त्याच्या राज्यविजयापेक्षां त्यानें दाखविलेल्या इंद्रिय

ग्रामावरील विजयाचें विशेष महत्त्व व कौतुक वाटलें. त्यानें त्या राज्यांतून कर्णश्रीपट हरण केला आणि त्यांनीं युक्त असें नवीन धर्माधिकरणाचें किंवा न्यायासनाचें कर्मस्थान स्थापन केलें. तसेंच स्वतःचीं कायमचीं गंजस्थानें किंवा खजीने, स्वारी शिकारींत दूर राहून, तितकीं उपयोगी पडत नसत, म्हणून त्यानें चल गज–फिरते खजीने–कायम केलें. अधिक कोठवर वर्णन करावें, त्याच्या भुजांतरामध्यें स्वस्थ विश्राम पावणाऱ्या विजयश्रीला, चतुःसमुद्र हें रत्नखचित क्रीडाआदर्शासारखें झालें होतें. ( ५९० )

नंतर जयापीड राजा आपल्या पुष्कळशा मांडलिकांसह काश्मीरांत परत आला व स्वपराक्रमानें संपादिलेल्या विजयश्रीचा तो पुष्कळ दिवस स्वस्थपणें उपभोग घेत राहिला. दिग्विजयामुळें त्याचा प्रभाव आतिशयच वाढलेला होता.

एकदां स्वप्नांत एक दिव्य पुरुष त्याच्यापुढें आला व त्यानें हात जोडून त्याला विनंति केली कीं, ' हे राजा, मी महापद्मनाग तुझ्या राज्यांत आपल्या बांधवांसह महापद्मसरोवरांत सुखानें राहात आलों आहें. मी तुला शरण आलों आहें. एक द्रविड मांत्रिक मला जबरदस्तीनें जलाकांक्षी मरुभूमींत नेऊन विकूं पाहातो आहे. त्याच्यापासून माझें रक्षण केलेस तर, मी तुझ्या राज्यांतच तुला एक सुवर्ण निघणारा पर्वत दाखवून देईन. ' या स्वप्नाअन्वयें राजानें तपास करवून, त्या द्रविडाला कोठूनसें आणविलें व त्यानें त्याला त्याचा हेतु विचारला. द्रविडानें अभय मागून घेऊन, ' नागानें सांगितलेलें खरें आहे, ' असें सांगितलें. याचें राजाला आश्चर्य वाटलें. त्यानें द्रविडाला पुनः म्हटलें, 'हें सरोवर किति तरी योजनें विस्तीर्ण; त्याच्यांतून तू त्या प्रतापी नागाला काढणार कसा ? ' द्रविडाने उत्तर दिलें, ' महाराज मंत्रशक्तीचा प्रभाव विलक्षण व अचिंत्य असतो. तो पाहावयाचा असेल तर आतांच मजबरोबर चला. '

त्याप्रमाणें राजा त्याच्याबरोबर त्या सरोवरावर गेला. तेथें जातांच त्या द्रविडानें मंत्रसिद्धीनें दिग्बंध करून, भारलेलें बाण सोडितांच, ते सरोवर सुकलें. ( ६०० ) त्याच्या तळांत चिखलामध्यें एक वीतभर लांब नाग वळवळत होता. त्याचें मुख माणसासारखें होते. त्याच्याभोवती तसलेच अनेक नाग होते. ते राजाच्या दृष्टी पडले. द्रविडानें राजाला म्हटले; ' मी या नागाला मंत्राने भारले आहे. आतां मी त्याला धरून नेतों. ' पण राजाने त्याला मना केलें व मंत्राचा प्रभाव उतरवितांच तें सरोवर पूर्ववत् तुडुंब, भरलें. राजानें त्या द्रविडाला उदंड द्रव्य देऊन वाटेस लावलें.

नंतर नागाने कबूल केल्याप्रमाणें, सुवर्ण निघणारा पर्वत आता कसा मिळणार, असा राजा मनांत मांडे खाऊं लागला असतांना, त्या नागाने पुनः स्वप्नांत येऊन त्याला म्हटलें, ' राजा, तुझा मजवर कोणचा उपकार झाला म्हणून मीं तुला सुवर्ण निघणारा पर्वत दाखवावा ? हा देश आपला व तो परका, हा भाव प्राणिमात्राच्या मनांत, दृढ परिचय व सतत वास्तव्य, यांच्यामुळे पैदा होऊन एकाविषयीं आदर व दुसऱ्याविषयीं ताटस्थ्य वाढूं लागतें. अवमानाच्या भितीनें मी तुला शरण आलों. पण तूंच तें भय याझ्या वांट्याला आणलेंस. आपला मालक

सागराप्रमाणें दुष्पीड्य आहे, असें प्रजेला वाटत असतें. त्याचीच त्या प्रजेदेखत फजीती होणें, याहून अधिक अवमान तो कोणचा ? माझ्या कलत्राची माझ्यासमक्ष दुसऱ्यांनी मानखंडना केली. तेव्हां आतां मी त्यांच्याकडे कोणच्या तोंडानें आढ्यतेनें पाहूं ? आमच्याकडे तूं कारणात्मक दृष्टीनें पाहण्याऐवजीं तूं आम्हांला दीन व विकिर समजून वेड्यासारखें हास्यास्पद व तुच्छ केलेंस. ( ६१० ) अथवा श्रीमदाध विचारपूर्वक काम न करणारे व मनास येईल तसे वागणारे, अशा राजांच्या वर्तनात विलक्षणपणाशिवाय दुसरें काय असणार ? भल्यांची मानखंडना करणें हा राजेलोकांना एक खेळ वाटतो. पण तें त्या लोकांना यावज्जीव जिवंत मरणच होतें. स्वार्थासाठीं अभिमान गुंडाळून ठेवण्यास नड नाहीं, असें राजेलोकांना वाटतें. पण मानधन लोक प्राणाचीहि पर्वा न करता त्याचें पालन झालें पाहिजे, असेंच मानतात. मोठ्या माणसांकडून अवमान होऊन, तशाच दुसऱ्या अवमानित लोकांमध्यें मिसळावें लागलेल्या लोकांच्या मनांच्या स्थितीची जाणीव, दुसऱ्या कोणाला कशी होणार ? तरी अशा स्थितींत सुद्धां आमचे दर्शन तुमच्या दर्शनाप्रमाणें निष्फळ नसतें, याच्या प्रत्ययासाठींच, मी तुला तांबे निघणारा पर्वत दाखवून देतों. नंतर त्यानें त्याला त्या पर्वताच्या खाणाखुणा सांगितल्या आणि तो गुप्त झाला.

त्याप्रमाणें सकाळीं तो पहाड राजानें सहज शोधून काढला. तो पहाड क्रमराज्यांत होता. त्याच्यांतून उमाप तांबें काढवून त्याने आपल्या नांवाचे नव्याण्णव कोटी दीनार पाडले आणि इतर राजांचा दर्प हरण करण्यासाठीं, ' जो कोणी शतकोटि दीनार पाडील तो आपल्याहून श्रेष्ठ समजला जावा, ' असा निर्बंध ठरविला अशा प्रकारें त्यानें इतर राजांच्या पुढें, ही दीनार निर्माण करण्याची, जणों समस्याच टाकली होती. ( जयापीडाचीं विशेषतः रौप्य मिश्रित धातूचीं नाणीं पुष्कळशीं सापडलीं आहेत पण शुद्ध तांब्याचें नाणें एकसुद्धां आढळलें नाहीं, हें चमत्कारिक आहे )

पुढें प्रजेच्या दुर्भाग्यानें त्या राजानें आपल्या आजाचा मार्ग सोडून पित्याचा मार्ग धरला. ( ६६० ) दिग्विजयादि क्लेशकारक व निरुपयोगी कामांऐवजी, देशांतल्या देशांतून द्रव्यसंचय करणे जास्त सोयीचें होय, अशी धूर्त कायस्थ कामगारांनीं त्याला विनंति केली. तेव्हां तो आपल्याच प्रजेवर अनन्वित जुलूम करूं लागला. कायस्थ खजिनदारांनी त्याची धनतृष्णा फारच वाढविली. तेव्हांपासून इकडील राजे कायस्थ कामगारांच्या तोंडाकडें पहात व त्यांच्या नोकरांच्या नादानें वागूं लागले. पूर्वी अनेक परराजांना पकडून आणण्याचे बेत चालत. त्यांऐवजी आतां आपल्याच नागरिकांना कैदेंत टाकून, नाडण्याकडे त्याची प्रवृत्ति झाली. विद्वत्तेनें सज्जनाच्या मनाला शांति व समाधान प्राप्त होत असतें पण विद्वान जयापीड राजा दुर्वृत्त झाल्यावर त्याची विद्वत्ता त्याला नीच व पापी योजनांचा विचार सुचविण्याच्या कामीं येऊं लागली. प्रति सौदास किंवा कल्माषपाद राजाप्रमाणें तो अनेक लोकांचे प्राण घेऊं लागला. तसें करण्यांत आपण कांहीं गैर करतों आहों, असें त्याला स्वप्नांतसुद्धां वाटेनासें झालें. स्वैरिणी स्त्रीनें सहज कौतुकानें म्हणून एकदांच वांकडें पाऊल टाकलें, किंवा कोणी राजानें

एकवारच कां होईना, एकच क्रूर कृत्य केलें आणि पुनः तें न करण्याचा कितीहि निश्चय केला, तरी तो दुष्टपणा त्याच्या जीवाला इतका बिलगून जातो कीं, पुढें त्या स्त्रीला नीचाहून नीच पुरुषाशीं रत होण्यांत आणि त्या राजाला प्रत्यक्ष पितृघात करण्यांतहि मुळीच क्षती वाटत नाही.

या लोभाच्यापायीं त्यानें तीन वर्षेपर्यंत इतका जुलूम केला कीं, त्यानें शेतकरी लोकांची झाडून सारी पैदावारी सरकारांत जबरदस्तीनें घेतली. अशा लोभमूर्ति व दुष्ट राजाला परस्व हरण करणारे, पण त्याच्यांतून अत्यल्प अंश सरकारांत भरणारे कायस्थ कामगार, खरे स्नेही व हितकर्ते वाटूं लागले. समुद्रांतील मासे व राजे लोक यांची तऱ्हा एकच. त्या माशाना त्यांच्याच समुद्रांतून शोषून नेलेल्या पुष्कळ पाण्यापैकीं चार पाण्याचे थेंब टाकणारे मेघ, मोठे उपकारक वाटतात. तसेंच राजे लोकांना लबाड कामगार, आपण मिळविलेल्या लुटीपैकीं थोडासा भाग आणून देतात, तेव्हां ते मोठे इमानदार वाटतात ( ६३० ).

अशा त्या नीच व दुष्ट राजालाहि, निर्भीडपणें व सतत कसून विरोध करणाऱ्या ब्राह्मणलोकांचें धैर्य धन्य होय. पुष्कळसे ब्राह्मण त्याच्या त्रासामुळें देशातराला निघून गेले व उरलेले त्याच्या जुलुमामुळें,मोठ मोठ्यानें आक्रोश करीत प्राण सोडीत होते.तरी राजाची लूटमार चालूंच होती. त्या क्रूर व दुष्ट राजानें आज्ञा केली होती कीं,‘ एकोनशत–नव्याण्णव ब्राह्मण मरतील तेव्हां तेव्हां मला वर्दी देत जावी. ’ राजाच्या वर्तनांत बदल झाला, त्याचप्रमाणें तत्कालीन कांहीं विद्वानांनीं त्याच्या स्तुतिपर श्लोक आपल्या काव्यांत घातले होते. त्यांचा उलटहि अर्थ होत होता. उदाहरणार्थः—त्यांनीं व्याकरण महाभष्याची व्याख्या करण्याच्या प्रसंगानें, ‘ नितांत कृतकृत्य ’ व ‘ गुणवृद्धीकरणारा ’ त्याचप्रमाणें ‘ विप्रांचा उपसर्ग करणारा’ व ‘भूतनिष्ठा–नाशकरणारा’ पाणिनी आणि जयापीड, यांच्यामध्ये अंतर तें काय ? अशा विलक्षण कोटया व श्लोकबद्ध समस्या केल्या होत्या. हा तरी त्यांच्या बुद्धीचा व विद्वतेचा दुरुपयोग व विपर्यासच होय. ( या श्लोकांत तीन अर्थ होऊं शकतात. एक पाणिनीपर, दुसरा जयापीडाच्या स्तुतीपर व तिसरा त्याची निंदा द्योतक )

तो राजा चंद्रभागातीरावरील तूलमूल्य नांवाच्या अग्रहाराचा अपहार करूं लागला तेव्हां नव्याण्णव ब्राह्मणांनी त्या नदींत प्राण दिले. ( चंद्रभागा हे तूलमूल्याजवळच्या लहानशा नाल्याचें नांव दिसतें. तें नांव चीनाब नदीलाहि आहे. पण तिचा तेथें संबंध नाहीं. तूलमूल्य हल्लींचें तुलमूल खेडें सिंधु व वितस्ता याच्या संगमाच्या अलीकडील दलदलीत आहे. तेथील मोठासा झरा महाराज्ञी किंवा दुर्गाईचें तिर्थ म्हणून प्रसिद्ध आहे. त्यालाच तूलमूलक असेंहि नांव आहे. ) ही गोष्ट त्या राजाला कळली. तेव्हांपासून त्यानें सबंध अग्रहार हरण करणें बंद केलें. पण कांहीं व्यक्तींच्या जमीनी जप्त केल्या होत्या त्या सोडल्या नाहींत.

तूलमूल्य येथील ब्राह्मणांना त्यांच्या प्रतिहारांनीं झोडपलें. तेव्हां मोठ्यानें शोकाक्रोश करीत त्यांनीं राजाला विनंति केली कीं, ( ६४० ) ‘मनु, मांधाता, राम वगैरे

थोर थोर राजे झाले. त्यांच्या वेळीं ब्राह्मणांना अशी मानखंडना सोसावी लागली नाहीं. क्रोधाविष्ट ब्राह्मण इंद्रासह स्वर्ग, पर्वतांसह सारी पृथ्वी, किंवा नागेंद्रासह सारे पाताळ व रसातळ, क्षणभरांत भस्मसात करूं शकतात.' हें ऐकतांच राजाच्या कांहीं सामंतांनीं राजाची पाठ सोडली. पण राजानें, एक भृकुटीवक्र करीत, उद्दामपणानें म्हटलें, 'काय हे भिक्षाकणभोजी मूर्ख भटुरडे, प्राचीन ऋषींच्याप्रमाणें व्यर्थ स्वतःची शेखी मिरविताहेत! यांचा कोण हा मदज्वर' हें ऐकून व त्याच्या त्या भयंकर भ्रूभंगाला भिऊन, बहुतेक ब्राह्मण गप बसले. पण इट्टिल (विठ्ठल)नांवाचा एक तप व तेज यांचा निधीच, असा ब्राह्मण होता.त्यानें राजाला उत्तर दिलें' राजा, युगायुगांत युगधर्मानुरूप तुज राजा सारखेच आह्मीहि ऋषि आहोंतच. नाहीं असें समजूं नको.' राजानें पुनः डौलानें म्हटलें, 'तूं कोण तपोधन वसिष्ठ कां विश्वामित्र कां अगस्ती?' हें ऐकतांच इट्टिलाची चर्या रागानें तात्काळ बदलली. त्याचा देह जणों मूर्तिमान त्वष्ट्यासारखा दिसूं लागला. क्रोधावेशामुळें त्याच्या मुखांतून शब्द बाहेर पडेना. अशा स्थितींत त्यानें मोठ्या आवेशानें त्याला उत्तर दिलें, 'तूं हरिश्चंद्र, त्रिशंकु किंवा नहुष असशील तर विश्वामित्रादिकांप्रमाणें मी एकटाच तुला पुरून उरण्यासारखा आहे.' राजा हंसत व त्याचा तिरस्कार करीत म्हणाला,'विश्वामित्रादिकांच्या कोपानें हरिश्चंद्रादिकांचा नाश झाला. तुझ्या रागावण्यानें होणार काय?' (६५०) यावर त्या ब्राह्मणानें रागानें जमीनीवर हात आपटींत म्हटले, 'माझ्या क्रोधामुळें या क्षणींच तुजवर ब्रह्मदंड पडणार नाहीं की काय?' राजा खदखदां हंसला व रागानें बोलला 'मग उशीर कां! पडूं देना. आज एक दिवसाचा तरी विलंब कशाला?' तेव्हां इट्टिलानें, 'हा पहा दुष्टा, पडतो आहे', असे शब्द उच्चारावयाला व सज्जांतून सुटलेला सुवर्णदंड खालीं राजाच्या अंगावर पडावयाला एकच गांठ पडली. त्यानें झालेल्या जबर जखमेमुळें राजाच्या शरीरांत किडे पडले व तो भाग करवतानें कांपून काढावा लागला. पुढें बऱ्याच रात्रीं भावी तीव्र नरकयातनातुल्य क्लेश भोगल्यावर, त्याचा निर्याणोन्मुख प्राण एकदांचा देह सोडून गेला.

याप्रमाणें ब्रह्मदंडकृत दंड अनुभवून तो दंडधारी राजा अकस्मात पडलेल्या सुवर्णदंडानें दंडित होऊन दंडधर यमाच्या दरबारीं पोंचला. (असाच दंड शब्दाचा अनुप्रास दंडीनें दशकुमार चरिताच्या प्रारंभाच्या श्लोकांत साधला आहे. लेले.)

त्या राजाचें चित्त अतिशय अस्थिर होतें. त्यानें एकतीस वर्षें राज्य केले.

कलुषित जलपानाने तृषा वाढून मत्स्य कुमार्गानुसारी होतात, जमीनीवर येऊन पडतात, तडफडतात व शेवटीं धीवरांच्या तावडींत सांपडतात. तसेंच द्रव्य लोभानें, द्रव्यप्राप्ति व भोगेच्छा मिळूनहि भूर्तांची तृष्णा वाढते व ते कुमार्गगामी होत्साते कृतांताच्या तावडींत फसतात.

त्याला याप्रमाणे पापमरण प्राप्त झालेलें पाहून, त्याची माता अमृतप्रभा इनें

त्याच्या पापाचें क्षालन होऊन त्याचा उद्धार व्हावा म्हणून, अमृतकेशवाचें मंदिर बांधाविलें.

त्याच्यानंतर त्याच्या दुर्गा नांवाच्या राणीचा पुत्र ललितापीड राजगादीवर बसला. ( ६६० )

**राजा ललितापीड**—हा अतिशय विषयासक्त होता. तो राजकार्य मुळींच पहात नसे. त्याच्या दुर्नयानें व दुष्टपणानें डागळलेल्या त्याच्या राज्याचा उपभोग, वारांगनांना मिळाला त्याच्या नरकांत पोंचलेल्या पित्यानें पापकर्मांनीं साठविलेली संपत्ति, नट भांडादिकांमध्यें विभागली जाऊन, तिचा विनियोग तिच्या पैदायशीला अनुरूपच झाला म्हणावयाचें ! बंधकींचे आप्त विट, राजवाड्यांत आश्रय पावून, त्यांनीं राजाला पूश्चली विद्येमध्यें तरबेज केलें. उनाड स्त्रियांनीं कुरतडलेले आपले केस, व त्यांच्या नखांनीं व्रणित झालेलें वक्षस्थळ, त्याला किरीटकटकांहून जास्त भूषणास्पद वाटूं लागलें ! शूर किंवा विद्वान पंडितांपेक्षां वेश्या कथाभिज्ञ किंवा नर्मकथा विचक्षण माणसें, यांच्यांशीं त्याचा अधिक स्नेह असे.थोडक्याशा स्त्रियांवर तृप्त राहणाऱ्या व जिंकलेलें स्त्रीराज्य सोडून आलेल्या जयापीड राजाला तो वेडा समजत व म्हणत असे. त्याचा काम प्रज्वलित असल्यानें त्याला थोडयाशा बायका पुरत नसत. गणिका संभोग हेच त्याला एकांतिक सुख वाटे. तो नीच प्रेमी मंडळींतच सदां रहात असें. म्हणून तो दिग्विजयादिकरणाऱ्या राजांचा उपहास करी.

विटलोक हलकट भाषणांनीं वृद्ध लोकांचीं मनें दुखवीत व राजापासून त्यांना दूर ठेवीत असत. ते नीच लोक त्याला प्रिय असत व त्यांना हवी तशी इनामें मिळत होतीं. ग्राम्य थट्टामस्करी करण्यांत, बाजारांतील अट्टल सोद्यांप्रमाणें तो राजा निष्णात होता. तो गणिकांसह दरबारांत जाऊन, वृद्ध मंत्र्यांना लाज आणीत असे. तो दुष्ट राजा सामान्य मंत्र्यांना बंधकी चरणांकित सुरेखसे झगे वगैरे घालावयास लावी. ( ६७० ) त्याचे नियमन करणें अशक्य पाहून, एकट्या मनोरथ नांवाच्या मानी मंत्र्यानेंच त्याच्याशी कांहीं एक संबंध ठेवला नाहीं. दुष्कर्में, योग्यतेचा आभाव, नैराश्य, अव्यवस्थित व विश्वासघाताचे वर्तन, असेल तर, तशा दुर्वृत्त राजाला टाळा दिल्यावांचून गत्यंतर नसतें. त्या राजानें सुवर्णपार्श्व-( हल्लींचें बीरू परगण्यांतील सुनपाह गांव. ) फलपुर व लोचनोत्स हीं गांवें ब्राह्मणांना अग्रहार दिलीं. त्यानें बारा वर्षे राज्य केलें. त्याच्या मागून जयापीड व राणी कल्याणदेवी यांचा पुत्र दुसरा संग्रामापीड हा राजा झाला.

**राजा संग्रामापीड** किंवा **पृथ्व्यापीड**—यानें सात वर्षे राज्य केले. त्याच्या मागून ललितापीडाचा अल्पवयी पुत्र प्रथितयश चिप्पटजयापीड किंवा बृहस्पती हा गादीवर बसला.

**चिप्पटजयापीड** किंवा **बृहस्पती**—एका कल्यपाला-कलाला-ची कन्या जयादेवी ही ललितापीडाची राख होती. तिच्या पोटीं याचा जन्म झालेला होता. तो कामरूपी मगराच्या मिठींत पूर्ता फसला होता. जयादेवी उप्प, नांवाच्या कलालाची

कन्या, ती फारच सुस्वरूप होती; तिच्या रूपाला भुलून ललितापिडानें तिला अंतःपुरांत घेतलेलें होतें.

चिप्पट जयापीड तरुण असतांना त्याचे मामा. १ पद्म. २ उत्पलक, ३ कल्याण, ४ मम्म व ५ धर्म, हे त्याच्या वतीनें सर्व राज्यकारभार चालवीत होते. उत्पलकानें पंच महाअधिकार स्थानें आपल्याकडे ठेवलीं व बाकीचीं अधिकाराचीं कामें आपल्या भावांकडे सोंपलीं होतीं- ( ६८० ) त्यांच्या हातीं राज्याधिकार होता तोंपर्यंत ते जयादेवीच्या आज्ञा शिरसा मान्य करीत होते. जयादेवींनें जयेश्वराचें शिवालय बांधविलें.

अतिलोभानें अंध होऊन सांठविलेला राजाचा खजीना त्याच्या मागून येणारे दुसरेच कोणी तरी लौकरच पार उडवून टाकतात. जयापीडाचा खजीना त्याचा पुत्र ललितापीड यानें उधळून, उरलेला त्याच्या पुत्राच्या शालकांनीं, बहुतेक पार लुबाडला. त्या भाग्यवंतांना आपल्या भगिनीच्या सौंदर्यमूलक सौभाग्यामुळें कायमची चैन व वैभव उपभोगावयाला मिळालें. ते सर्व बंधू हलक्या कुळांतले होते. तेव्हां तदनुरूप त्यांचें वर्तन उद्दामपणाचें व निरंकुश होते, यांत नवल नाहीं.

त्यांचा भाचा हळूं हळूं वयांत येत होता. तो पुढें आपल्याला जाचक होईल या भीतिनें, त्यांनीं राजसत्ता स्वतःच्या हातींच राहावी या हेतूनें, अभिचार करवून, त्या अल्पवयी धन्याचा प्राण घेतला. याप्रमाणें नुसतां नांवाला बारा वर्षें राजा राहून तो राजा मरण पावल्यावर, त्या भावांनीं अपसांतील चुरस व मत्सर यांच्यापायीं कोणालाच राजा-करण्याचें मनांत आणलें नाहीं. स्वतःच प्रमुख राहण्याच्या इच्छेनें ते नांवाला कोणातरी राजकुलोत्पंन्न पुरुषाला पुढें करीत, अपसांत भांडत, निरनिराळ्या राज्याच्या विभागांत स्वतंत्रपणें राज्याधिकार चालवीत होते.

**राजा वज्रादित्य**—बप्पिय-आणि राणी मेघावलीं यांचा पुत्र त्रिभुवनापीड हा वडील होता. तो राजकारस्थानांत पडत नसे. म्हणून त्याला गादी मिळाली नव्हती. त्याला दुसऱ्या एका जयादेवीच्या पोटीं अजितापीड नांवाचा पुत्र झालेला होता. त्याला उत्पलानें जबरदस्तीनें गादीवर बसाविलें ( ६९० ) आणि त्याच्या दरबार खर्चाची व पोटापाण्याची वगैरे गेमणूक, पांचव्या जमाखर्ची खात्यांकडून मिळत जाण्याची तजवीज केली. त्या खात्याकडे बाकीच्या तशाच चार शोद नांवाच्या खात्यांकडील शिल्लक येत असे. त्या राजाला त्या भावांवर सर्वस्वीं अवलंबून राहावें लागत होतें. यामुळें त्याची स्थिति फार नाजुक व चमत्कारिक झालेली होती. तो त्यांना सारख्या योग्यतेचे समजत नसे. तो कोणा एकाशीं मेळानें बोलला तर, ते दुसऱ्या भावांना खपत नसे. तो नुसतां नांवाचा राजा असे. राज्याचें सारें उत्पन्न गडप करून ते बंधू नवीं नवीं पुरें व मंदिरें स्थापन करीत होते. अरण्यांत मरून पडलेल्या वनमहिषाच्या कलेवरावर, लांडगे अपसांत झगडत ताव मारीत असतात; तसे ते बंधू व त्यांचे आप्त इष्ट, त्या जणों अराजक राज्याच्या उत्पन्नाचा फडशा पाडीत होते.

उत्पलान उत्पलपुर व उत्पलस्वामी यांचीं आणि पद्मानें पद्मपुर व पद्मस्वामी यांची स्थापना केली. ( उत्पलपुर व पद्मपुर हीं हल्लींची वितस्ता तीरावरील काकपुर व पांपुर हीं गांवें असावींत. या दोन्ही स्थळीं प्राचीन मंदिराचे जीर्ण अवशेष आढळतात. )

पद्माची गुणोज्वला पत्नी गुणादेवी इनें राजधानींत एक व विजयेश्वर येथें एक, असे दोन मठ बांधविले. धर्माची धर्माकडे प्रवृत्ति होऊन त्यानें धर्मस्वामींचें मंदिर आणि सत्कर्मा कल्याणवर्मा यानें कल्याणस्वामींचें मंदिर बांधविलें. बुद्धिवान्, चतुर व श्रीमान अशा मम्मानें मम्मस्वामींची स्थापना करविली आणि त्याच्या कुंभ प्रतिष्ठेच्या वेळीं त्याने ५००० गायी दान दिल्या व प्रत्येक गायीबरोबरच्या सामग्री पेटें पांच पांच हजार दीनार दिले. त्यानें या प्रसंगीं केलेल्या खर्चाची गणना कोणाला करतां येणार ? आणि या सर्व भावांच्या अफाट संपत्तीची योग्य कल्पना व हिशेब कोणाला व कसा होणार ? (७०० )त्यांची संपत्ति दुष्कृतानें, सुकृतानें कशीहि मिळविलेली असो, तरी त्यांच्या औदार्यामुळें सर्वांना आनंद झाला.

त्या मंत्र्यांनीं बांधविलेल्या प्रचंड मंदिरांपुढें इतरांनी उभारलेलीं मंदिरें, दिग्गजांपुढें हत्तीच्या पोरांसारखीं दिसत होतीं.

या बंधूचा भाचा राजा चिप्पट जयापीड हा लौकिक किंवा सप्तर्षि शकाच्या ३८८१ व्या वर्षी, म्हणजे ई० स० ८२३–२४ वर्षी मरण पावला. तेव्हांपासून २६ वर्षे किंवा इ० स० ८५०–५१ वर्षांपर्यंत त्या भावानी निर्वेधपणे राज्याचा उपभोग घेतला. ( येथून पुढें कल्हणानें प्रत्येक कारकीर्द व विशिष्ट गोष्ट यांची पक्की मिती दिली आहे. त्यानें या लौकिकशकाचा प्रारंभ गतकालीं २५ वर्षे म्हणजे ख्रिस्तीशकापूर्वी ३०७६–५ वर्षांच्या चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून धरला आहे. या कालगणनेविषयीं विचार प्रास्ताविक भागांत केलेला आहे. कल्हणाने वर्षे देतांना शेकडे सोडलेले आहेत, ते सहज भरतां येतात. )

यानंतर मम्म आणि उत्पलक यांशी घोर लढाई झाली. तिच्यांत पडलेल्या सैनिकांच्या प्रेतानीं वितस्तेचा प्रवाह बंद पडला होता. या युद्धाचें रसाळ वर्णन विद्वन्मानससिंधु शशाक अशा शंकुक नांवाच्या कवीनें भुवनाभ्युदय नांवाच्या काव्यांत केलेलें आहे. ( या कवीची कांही सुभाषितें वल्लभदेव व शार्ङ्गधर यांच्या सुभाषित संग्रहांत दिलेलीं आहेत व त्याचा उल्लेख काव्यप्रकाशाच्या चौथ्या उल्लासांतहि आलेला आहे. ) रवी नक्षत्रांचें तेज लोपवितो. त्याप्रमाणें मम्माचा पुत्र यशोवर्मा यानें या लढाईत सर्व वीरांचें तेज हरण केलें.

पुढें मम्म व त्याच्या पक्षाचे लोक यांनी अजितापीडाला उखडून टाकून दुसऱ्या संग्रामापीडाचा पुत्र अनंगापीड याला राज्यपद दिलें. उत्पलाचा पुत्र सुखवर्मा याला त्यांचा उत्कर्ष सहन झाला नाहीं. तो रागारागानें त्यांच्या विरुद्ध खटपट करीत होता. पुढें तीन वर्षांनी उत्पल मरण पावला. तेव्हां सुखवर्म्याने अजितापीडाचा पुत्र उत्पलापीड

याला गादीवर बसविलें. हे राजे पूर्वीच्या आश्वयुजी पौर्णिमेला होणाऱ्या नव्या नव्या राजांप्रमाणें होते. ( नीलमत पुराणांत २०८ ते ३२६ श्लोकांमध्यें दिलेल्या कथेचें येथें अनुसंधान आहे. त्या कथेवरून असें दिसतें की, प्राचीनकाळी कश्यप ऋषीच्या शापामुळे काश्मीरी लोकांना पिशाच्चांच्या त्रासामुळें प्रतिवर्षी आश्वयुजीपासून चैत्री पौर्णिमेपर्यंत सहा महिने, देश सोडून जावें लागत असें. त्यांच्याबरोबरच तेथील राजेहि जात. अशा त्या अस्थिर राजांप्रमाणेंच हेहि राजे होते, असा या लिहिण्याचा भाव आहे. आश्वयुजी पौर्णिमेच्या दिवशीं पिशाच्चांना भेंवडावण्यासाठीं सर्व लोक परस्पर मनसोक्त शिव्यागाळी करीत व अंगावर धूळ, राख, चिखल, फेंकीत. म्हणजे अलीकडील जणों धुळवड खेळत. या प्रकाराला पुढे कल्हणानें तरंग ७ श्लोक १५५१ मध्यें ' आश्वयुजीगाली; ' असे म्हटलें आहे. हा प्रकार हल्लीच्या लोकांना मुळींच माहित नाहीं. )

हे राजे असे अजागळ होते तरी, कांहीं कारस्थानी मंत्री त्याच्यावेळींहि बरीच सत्ता मिळवीत असत. अशांपैकीच या राजाचा संधिविग्रह मंत्री रत्न हा एक होता. त्यानें रत्नस्वामींचें मंदिर बांधविले. त्याच कारकीर्दीत नर वगैरे व्यापारी होते. त्याच्याजवळ उत्तमोत्तम अश्व असत. त्यांच्याकडे दार्वाभिसार व त्याच्या शेजारच्या प्रांतांमध्ये बरेच गांवहि होते. तिकडे त्यांनी आपापलीं राज्ये स्वतंत्र स्थापन केली होतीं.

कर्कोटक वंशीय राजांचें कुल नष्टप्राय होऊन उत्पल वंश उत्कर्ष पावला व ते राजे मोठे वैभवशाली झाले. सुखवर्मा स्वतःच्या सामर्थ्यानें प्रतिराजा बनला होता. त्याला त्याचा एक आप्त शुष्क यानें मत्सराने ठार मारिले पुढें सुखवर्म्याचा योग्य व गुणवान् पुत्र अवंतिवर्मा हाच राजा होण्याला पात्र आहे, असें मंत्री शूर यानें जाणून त्याचा पक्ष स्वीकारला आणि लौकिक वर्ष ३९३१–ई. स. ८५५–५६ या वर्षी त्यानें उत्पलापीडाला पदच्युत करून अवंतिवर्म्याला गादीवर बसविलें आणि प्रजेच्या मनातील व साऱ्या राज्यांतील गडबड नाहींशी केली. बाप व आजा यांना पुष्कळ क्लेश सोसून व कष्ट करूनहि साध्य न झालेली राज्यलक्ष्मी, या अवंतिवर्म्याला त्याच्या पूर्व पुण्याईमुळें आपोआप प्राप्त झाली.

कुंभांना पयोनिधि आटविण्याचे परिश्रम व्यर्थ पडत असतात. पण त्यांतीलच एक कुंभ असा भाग्यवान् निघाला कीं, त्याच्यापासून पैदा झालेल्या–अगस्तिऋषीनें एका क्षणात सारा पयोनिधि पिऊन टाकला.

त्या अवंतिदेवाच्या मस्तकावर कनकघट मुखांतून वेगानें अभिषेक जल पडलें व त्याबरोबरच त्याला राजलक्ष्मी कटाक्षरूपी प्रथम पट्टबंध झाला. त्याच्या कानांत दोन दैदिप्यमान रत्न कुंडले चमकत असलेलीं जणो, रवि व सोम, या दोन्ही राजवंशांतील राजांनीं पाठविलेले त्या नूतन राजाच्या कानांत राज व्यवहार तंत्राचा उपदेश करण्यांकरितां स्वतः सूर्य व चंद्रच त्यांच्या रूपाने कानाशीं लागल्यासारखे वाटत–दिसत–होते आणि स्वच्छ श्वेत छत्राच्या मिषानें प्रत्यक्ष पद्मेचें आसनभूत पुंडरीकच त्याच्यावर छाया करीत होतें. ( ७२० )

काश्मीरक महामात्य चंपक पुत्र कल्हणकृत राजतरंगिणीचा चौथा तरंग समाप्त झाला.

दोनशें साठ वर्षे सहा महिने, दहा दिवस इतक्या अवधींत कर्कोटक वंशीय सत्रा राजे झाले.

( येथें सात दिवसांऐवजीं सात वर्षे चुकीनें धरलेलीं आहेत. )

---

# तरंग पांचवा.



त्या विलक्षण एकरूप झालेल्या, श्रेष्ठ अशा शिवपार्वती यांच्या एकत्र हलणाऱ्या पण भिन्नार्थी शब्द उच्चारणाऱ्या जिव्हा आपलें रक्षण करोत. श्री शिवांनीं पार्वतीला म्हटलें, 'तुझ्या केशकलापाची कांहीं विलक्षणच कृष्णसर्पाप्रमाणें शोभा दिसत आहे. पुढें पहा तर, तुझ्या कंठांतून निघालेला पूंस्कोकिलाच्या सारखा स्वर चक्षुश्रुति कृष्ण सर्पांना कसा आनंदवीत आहे तो!' यावर पार्वतीनें म्हटलें, 'आपणांला आपल्या देहावर जागजागीं कृष्ण सर्पांच्या गांठी मारण्याची भारी आवड आहे. आपण पुढें पहा तर, आपल्या कंठाच्या द्युतीचे पूंस्कोकिलाच्या कांतीसारखे भासणारे किरण पाहून चक्षुश्रुति कृष्ण सर्पांचे नेत्र आनंदाने निमीलित होत आहेत.' (हें मंगलाचरण अर्धनारीनटेश्वराला लागू व शिव व पार्वती दोघांच्याहि तोंडीं शोभेल असे द्व्यर्थी घातलेलें, चांगलें आहे.)

**राजा अवंतिवर्माः**—(ई. स. ८५५ ते ८८३)

अवंतिवर्मा सम्राट पदावर बसल्यानंतर त्यानें आपल्या मार्गांतील शत्रूरूपी कंटक खोडून टाकले आणि आपल्या महत्कृत्यांच्या द्वारें सज्जनाचे देह आनंदाने कंटकित व पुलकित केले. तो राजा व त्याचा तो अमात्य शूर दोघेहि आज्ञा करण्यांत सारखेच धनी व आज्ञा पालन करण्यांत सारखेच नम्र सेवकाप्रमाणें तत्पर होते. कृतज्ञ, गुणग्राही व क्षमाशील भूमिप आणि भक्त, अनुरक्त, निगर्वी, निर्मत्सरी मंत्री, असा हा विलक्षण शुभयोग कधींमधीं पूर्व पुण्याईनेंच पाहण्यांत येतो.

तो राजा मोठा विचारी व बुद्धिमान होता. राजवैभव प्राप्त झाल्यावरहि तो पूर्वस्मृति विसरला नाहीं. त्यानें स्वतःशीं विचार केला कीं, 'ही मातंगोत्संग ललित–महारांच्या–हीन कुलोद्भवाच्या. मांडीवर खेळणारी–मत्तगजापृष्ठावर लीलेनें आरूढ होणारी लक्ष्मी, राजवल्लभा बनते व महात्म्याच्या मनांतहि उत्कट दुष्टवासना उत्पन्न करून, त्यांना दूषण आणते. नीच समागमाप्रमाणें तिचा समागम व प्रेम, प्रारंभीं अनुकूल दिसले तरी तें शेवटीं संतापकारक झाल्यावांचून रहात नाहीं. लक्ष्मी ही मुळीं अंबुधींत व चपल आणि चंचल अप्सरांमध्यें वाढलेली. तिला एकालाच घट्ट धरून राहण्याचें वळण कोठून मिळणार? ती मूळचीच निस्नेह. कितीहि काळ कोणा राजाला धरून असली तरी, ते राजे निस्सहाय्य व परलोक साधक पाथेय व सेवकहीन असे परलोक मार्गी निघाले असतांना, ती त्यांच्याबरोबर केव्हांहि गेलेली नाहीं.

पूर्वीच्या नृपांपैकीं कोणीहि परलोकीं जातांना सांठविलेलें सुवर्ण भाजन भांडादिकांचे धनी राहिले नाहींत. ( १० ) दुसऱ्यांनीं वापरलेल्या उच्छिष्ट पात्रांतून उष्टें खाण्याची, मागून आलेल्या राजांना लाज किंवा खंत कशी वाटत नाहीं ? नर कपाल तुल्य रौप्यपान-पात्रांवर, पूर्वीच्या–मृत–राजांचीं नांवें व निशाणें कोरलेलीं पाहून, कोण साशंक झाल्यावांचून राहील ? तसेंच, कंठीं कालपाश पडलेल्या मुमूर्षु राजांनीं वापरलेले व त्यांच्या कंठांतून खेंचून घेतलेले दूषित व अपवित्र हार, कोणाला आनंद देणार ? मरत पडलेल्या राजांच्या दुःखोष्ण बाष्पसलिलानें दूषित झालेल्या राजकीय अलंकारांना स्पर्श करतांना कोणाचें काळीज कांपणार नाहीं ! निरंतर वारांशींत मग्न राहणारी ही लक्ष्मी सदांच दूषित असते. तरी पण ती सत्पात्र व सज्जन आणि दारिद्र्यानीं प्रतप्त, अशांच्या पदरांत पडते तेव्हां, अग्नींत पडलेल्या आहुतीप्रमाणें आणि अग्निशौच मृगांप्रमाणें, ती तावून सुलाखून, निर्मल व पावन होत असते. ( अग्निशौच मृग हे अग्नीत उडी टाकतात तेव्हां त्यांच्या अंगावरील केस शुद्ध व स्वच्छ होतात अशी समजूत आहे. याविषयीं पुढें साहाव्या तरंगांत आणि तरंग ८ श्लोक ३०२४ मध्येंहि उल्लेख आहे. तसेंच ब्रह्मवैवर्तपुराणांतहि तीन चार जागीं उल्लेख आलेले आहेत. वरील ९।१० श्लोकांत अवंतिवर्मा राजाच्या तोंडीं घातलेले प्राचीन राजांनीं सांठवून ठेवलेल्या संपत्तीविषयीं तुच्छता व घृणाद्योतक विचार चांगले मननीय आणि लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. )

नंतर त्यानें सर्व मौक्तिकादि रत्नें काढवून त्याचे लहान लहान पुंजके केले आणि सुवर्ण रजताचे तुकडे करवून, त्या सर्वांची खिचडी स्वतः ओंजळी भरभरून द्विजांना दान दिली. त्यापैकीं एका द्विजाने दान मिळाल्यावर आनंदाच्या भरांत, ‘ साधु महाराज साधु ’ असें म्हणण्याच्या ऐवजीं ‘ साधु अवंतिन् साधु ’ असे म्हटलें. तें ऐकून राजानें त्याला आणखीहि ओंजळी भरून दिल्या ! अशा रीतीने त्यानें सारी धनदौलत दान केली. स्वतः-साठीं फक्त राजवैभवद्योतक छत्र व चामर, हीं राजाचिन्हें बाकी ठेवलीं होतीं. अपार संपत्तीनें संपन्न व मदांध झालेल्या आपल्या अनेक आप्तांच्या त्रासामुळें त्याला राजवैभव भोगणें बरेंच कष्टकारक व कठिण झालें होतें. पुढें आपल्या सर्व विरोधी आप्तबांधवांचा वरचेवर पराभव करून, त्यानें आपलें राज्यनिष्कंटक केलें. ( २० ) आपली सत्ता पक्की कायम केल्यावर त्यानें त्या राज्यलक्ष्मीचा उदारपणें व प्रेमानें आपले आप्त, आश्रित आणि सेवक, यांनाहि भागीदार करून उपभोग घेतला.

त्याला आपल्या कुटुंबांतले लोक प्रिय होते. त्यानें आपला शूर व शाहाणा सापत्न बंधु शूरवर्मा याला युवराजाचे सारे मोठाले अधिकार अर्पण केले. त्या शूरवर्म्यानें खाधूया व हस्तिकर्ण नांवाचे दोन अग्रहार दिले आणि शूरस्वामी विष्णूची व एका गोकुलाची स्थापना केली. तसेंच त्यानें पंचहस्ता नांवाचा अग्रहार दिला आणि एक मठीहि बांधविली. ( खाधूया यालाच एका टीकाकारानें भूधखोहा म्हटलें आहे. पण त्याचा पत्ता लागत नाहीं. हस्तिकर्ण हें हल्लींचें दचूनपोर परगण्यांतलि वितस्तातीरावरील व्याघ्राश्रम–वाग-हाम–वाघोम हें गांव होय. तेथें एक झरा आहे. त्याला हस्तिकर्ण नाग म्हणतात.

हें गोकुल बहुधा श्रीनगरांतच असावें. त्याच्याखालीं गायरानें होती, असें दिसतें. पंचहस्ता हें हल्लींचें देवसर परगण्यांतील पांझथ, नांवाचें गांव. त्याच्या जवळचा एक झरा किंवा नाग हा वितस्तेचा एक प्रकट उगम मानतात. त्याचें नांव नीलमत पुराणांत पंच-हस्ताक नाग असें दिलेलें आहे.)

त्या राजाचा दुसरा एक भाऊ समर यानेंहि चतुरात्मा अशा समरस्वामीची स्थापना केली. (समरस्वामीचें मंदिर यच्छयक्ष परगण्यांत वितस्तेच्या डाव्या कांठावर सोमरखुग येथें होतें, असें एका टीकाकारानें म्हटलें आहे. या मंदिराचा उल्लेख पुढें तरंग ८ श्लो. २१०५ मध्यें आलेला आहे )

शूराचे पुतणे धीर व विपन्न, यांनीहि आपल्या नांवानें मंदिरें बांधविलीं. त्याचे दुसरे दोघे पुतणे गणनापती–खजीनदार–होते. त्यांची पारमार्थिक योग्यता वेडसरपणाखालीं झांकलेली होती. पण ते पुढें कैलासांत शिवाच्या दरबारांत मोठी प्रतिष्ठा पावले.

शूराचा मुख्य द्वारपाल महादेव यानें महोदयस्वामींची प्रतिष्ठा करविली आणि तेथें मोठा वैय्याकरण म्हणून नावाजलेला रामट उपाध्याय, याला व्याख्याता नेमलें होते.

राजाचा अमात्य श्रीप्रभाकरवर्मा यानें श्रीप्रभाकरस्वामी नांवाच्या विष्णूचें मंदिर बांधविले. ( ३० ) तेथील देवप्रतिष्ठेच्या वेळीं घरच्या व बाहेरून आणलेल्या शुकांक-डून, मिळालेल्या मोत्यांची त्यानें एक सुप्रसिद्ध शुकावली तयार करविली (ही शुकावली काय होती तें कळत नाहीं. पण ती एक विशेष मौल्यवान व चल वस्तु असावी. कारण, पुढें तरंग ८ श्लोक ८० मध्यें ती हर्ष राजानें काढून नेली असें व नंतर उच्चल राजानें ती त्रिभुवस्वामीच्या मंदिराला आलंकारार्थ अर्पण केली, असें वर्णन आलें आहे.)

काश्मीर मंडलात विद्येचा प्रसार विच्छिन्न झाला होता. त्याचें पुनरुज्जीवन शूर मंत्री यानें, विद्वान व सभ्य अशा लोकांना राजसभेंत सन्मानाचें स्थान देऊन केलें. त्या विद्वानांना जणों राजासारखें वैभव व संपत्ति मिळे व ते राजांना योग्य अशा शिबिकादि वाहनांतून राज-दरबारांत जात येत असत. या राजाच्या दरबारांत मुक्ताकण, शिवस्वामी, आनंदवर्धन कवी आणि रत्नाकर यांची प्रतिष्ठा व कीर्ति झाली. (मुक्ताकण याचा उल्लेख क्षेमेंद्राच्या अक-राव्या शतकांतील–दोन ग्रंथांत आलेला आहे. शिवस्वामीचीं कांहीं सुभाषितें क्षेमेंद्रकृत कवि-कंठाभरणांत आणि त्यानंतरच्या कांहीं सुभाषितावल्यांमध्यें दिलेलीं आहेत. कवी आनंद-वर्धन याचा ध्वन्यालोक व देवीशतक प्रसिद्ध असून, त्यांच्यावर दहाव्या शतकांत टीका झालेल्या आहेत. रत्नाकर हाच राजानक रत्नाकर वागीश्वर होय. त्यानें चिप्पट जगापीड किंवा बृहस्पती, याच्या वेळीं हरविजय हें काव्य रचिलें. हा बृहस्पती अवंतिवर्म्याच्या पूर्वी ४२ वर्षे मरण पावला होता.).

मंत्री शूर याच्या पदरचा भाट कृतमंदार, हा त्याला त्याच्या घरी जमणाऱ्या विद्वत्सभेंत, आपला कृतनिश्चय कायम ठेवावा, ही गोष्ट सुचविण्यासाठीं पुढील अर्थाची आर्या नेहमीं म्हणत असे. ' प्रकृति चंचल विधी अनुकूल आहे, असा हाच समय उपकृति

करण्याचा योग्य अवसर आहे. विपत्ति सदोदित डोके वर उचलण्याला तयार असतांना तमल्या समयाची वाट पहात राहण्यांत काय अर्थ आहे ?'

या अमात्य शूरानें अनेक इमारती बांधविल्या. त्यांतच सुरेश्वरी क्षेत्रांत अर्धनारीनटेश्वराचें एक पक्कें फार वर्षें टिकेल असें, मोठें मंदिर बांधविलें. ( सुरेश्वरी क्षेत्र दल सरोवरावर इश्बर नांवाच्या खेडयाजवळ होते. त्याच्याशेजारीं शतधारा तीर्थ होतें. याविषयीं शर्यावतार या ग्रंथाच्या पांचव्या अध्यायांत व नीलमत पुराणाच्या १३२२ व्या श्लोकांत उल्लेख आहे. )

त्या हुषार मंत्र्यानें आपल्या वाडयाप्रमाणेंच मोठें व भव्य असें शूरेश्वराचें मंदिर बांधविलें व तपस्वी लोकांना राहण्यासाठीं शूर मठ स्थापन केला. शूरेश्वराचें मंदिर शूरपुर किंवा हल्लींचें हूरपुर येथें होतें. शूरमठ श्रीनगरांत होता. हल्लीं या दोन्हींचाहि पत्ता लागत नाहीं. वरील अर्धनारीनटेशाचें मंदिर आपल्या वेळीं कायम असल्याचें कल्हणानें तरंग ८ श्लोक ३३६५ मध्ये लिहिलें आहे. पण हल्लीं त्याचा मागमूस नाहीं. )

त्यानें क्रमवर्त येथील ढक्क किंवा द्रंग अथवा सरहद्दीवरील नाकें उठवून, ते स्वतः वसविलेल्या सुरेखशा शूरपुरामध्यें कायम केलें. ( हल्लीं हे नाकें इलाही दरवाजा या नांवानें प्रसिद्ध आहे. तेथें जुनी नाणी बरीच सापडतात. )

त्याचा पुत्र रत्नवर्धन याने सुरेश्वरीच्या आवारांतच भूतेश्वरांची स्थापना केली व दुसराहि एक मठ शूर मठांतच कायम केला. ( ४० ) अमात्य शूर याची थोर व कुलीन पत्नी काव्यदेवी इनें सुरेश्वरी येथे काव्यदेवीश्वर नामक सदाशिवाची स्थापना केली.

अवंतिवर्मा राजा अगदी निर्मत्सर होता. त्यानें उदारपणाने व मोकळ्या मनानें आपले सहोदर, अमात्य शूर आणि त्याचे पुत्र, यांना राजाप्रमाणें ऐश्वर्य व हक्क कायमचे दिले.

तो लहानपणापासून वैष्णव मताचा होता. पण तो अमात्य शूर याला देवाप्रमाणें मानी. म्हणून त्याच्या मर्जीखातर, तो शैव मतानेंच वागे. विश्वैकसार क्षेत्रात मरतील त्यांना मोक्षप्राप्ति होते. तेथें त्याने सर्वोपभोग समृद्ध असें अवंतिपुर बसविलें. ( हल्लींचें वांतिपोर ते वूलर परगण्यांत वितस्तेच्या उजव्या कांठावर आहे. तेथें दोन प्राचीन मंदिरांचे अवशेष आहेत. ते अवंतिस्वामि व अवंतीश्वर यांच्या मंदिरांचे असावेत. अवंतिपुर हें अनेक वर्षेपर्यंत चांगले महत्त्वाचें स्थळ होतें. त्याचा या ग्रंथांत पुढें जागजागीं अनेकवार उल्लेख आहे. )

राज्यप्राप्तिपूर्वीच त्याने तेथें अवंतिस्वामींची स्थापना केली होती. पुढें राजा झाल्यावर त्याने तेथें अवंतीश्वर शंकराची स्थापना केली. त्यानें त्रिपुरेश्वर, भूतेश्वर व विजयेश, यांच्या मंदिरांत रुप्याच्या स्नान द्रोणी असलेलीं तीन पीठें तयार करविलीं होतीं. ( त्रिपुरेशाचे मंदिर बहुधां हल्लींच्या दल सरोवराच्या एका कोन्यांत असलेल्या त्रिफर नांवाच्या खेडयाजवळ असावें. तें पुष्कळ वर्षेपर्यंत एक फार पवित्र तर्थि मानलें जात होतें. )

अमात्य शूर हाहि राजाला आपलें अधिदैवत मानीत असे. त्याचें प्रिय व हित साधण्यासाठीं तो स्वतःचा प्राण, धर्म किंवा सुत, यांचाहि त्याग करण्याला मागें पुढें पहात नसे. एकदां तो राजा भूतेश्वराची पूजा करण्यासाठीं गेला होता. ( हरमुख पहाडाच्या पायथ्याशीं पसरलेल्या जुन्या इमारतीच्या अवशेषांमध्येंच या भूतेश्वराच्या मंदिराचें अवशेष आहेत. ) तेथें त्यानें आपल्या वैभवाला अनुरूप, असें पूजेचें सामान अर्पण केलें. त्यावेळीं त्या देवाच्या पुजाऱ्यांनीं त्या देवाच्या पीठावर उत्पलशाख नांवाच्या कडवट जंगली पालेभाजीचा नैवेद्य अर्पण केलेला पाहून, त्यानें त्यांना त्याचें कारण विचारलें. तेव्हां त्यांनीं साष्टांग नमस्कार घालून व हात जोडून नम्रपणें विनंति केली कीं, ( ५० ) ' महाराज, या देवाचे गांव धन्व नांवाच्या प्रबल डामरानें दाबले आहेत. तो लहर प्रांतांत राहतो. (लहर हल्लीचा लार प्रांत. त्याच्यांत सिंध नदी व तिला मिळणाऱ्या नद्या यांच्या पाणढाळा खालचा बहुतेक प्रदेश येतो. ) तो भारी दांडगा असून त्याला शूर अमात्यांचा आश्रय आहे. तो मंत्री त्याला पुत्राप्रमाणे लेखतो. यामुळें आम्हांला भूतेश्वराला याशिवाय दुसरा नैवेद्य अर्पण करण्याचें त्राण उरलें नाहीं. ' हें ऐकले न ऐकलेसे करून व अकस्मात् शूल उठल्याचा बाहाणा करून, राजा पूजा अर्धीच सोडून निघून गेला.

हें ऐकताच, त्याला तसेंच कांहीं विशेष कारण असावें, असें ताडून शूर अमात्यानें तपास चालविला. तेव्हां त्याला भूतेश्वराच्या पूजाऱ्यांकडून सर्व हकीकत कळली. तसा तो तडक रागारागानें थोडयाशा सेवकांसह जवळच असलेल्या मातृचक्रांतील भैरवाच्या देवळांत गेला व तेथून त्यानें धन्वाला बोलावून आणण्यासाठीं तांतडीने व लागोपाठ माणसे धाडलीं. (हे भैरवाचे लहानसें देऊळ भूतेश्वराच्या मंदिरापासून सुमारें ३०० पावलावर होते. त्याला लागूनच नारायण नाग नांवाचें पक्कें दगडी चोपडें होतें. तेंच नीलमत पुराणांतील व कल्हणानें वर्णिलेलें सोदरतीर्थ होय. भैरवाच्या पूजेत बलिदान होत असल्यानें त्याचें देऊळ, बहुतेक सर्वत्र, कांहींसें एकीकडेच असतें. )

धन्वडामर आपल्या परिवारासह जणो पृथ्वी कंपायमान करीत, मोठ्या ताठ्यानें, सशस्त्र व निष्कंप असा शूराकडे भैरवाच्या देवळाजवळ पोंचतो तोंच, मंत्र्याच्या इषाऱ्या सरशीं, भैरवासमोरच, त्याचें मुंडके उडविलें गेलें व त्याचें रक्तबंबाळ धड, जवळच्या चोपडयांत फेंकलें गेलें. तेव्हां शूर तेथून बाहेर पडला.

मंत्र्यानें आपल्यासाठीं त्या पुत्रतुल्य पण क्रूर धन्वडामराचें शिर उडविल्याचें ऐकून, राजाचा राग शांत झाला आणि त्याच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली. (६०) तो शय्येवर पडलेला होता. तेथें पोंचून शूरानें त्याला, प्रकृतीबद्दल विचारलें तेव्हां राजाने त्याला, ' होय, आतां शूल नाहींसा झाला, ' असें म्हटले. नंतर मंत्र्यानें त्याला उठवून नेऊन पूजा पूर्ती करविली. याप्रमाणें तो सर्व गोष्टींत राजाचा भाव ओळखून, प्राणाची पर्वा न करतां त्याचें हित, न बोलतां व आपण होऊन करीत असे.

परस्पर द्वेष व नाराजी उत्पन्न होऊं न देतां, अशा रीतीनें वागणारी राजा व मंत्री यांची अशी जोडी, क्वचितच कोठें पाहण्यांत किंवा ऐकण्यांत आली आहे.

त्या वेळीं एकदां भयंकर जलप्रलय झाला. तेव्हां नदींतील पाणी अतिशय गार झालें. त्यामुळें त्रस्त झालेले, श्राद्धांत शुद्ध व ग्राह्य मानलेले, पाठीन नांवाचे मासे, निर्भयपणे नदीच्या तीरावर येऊन खुशाल ऊन खात पडत होते.

त्या राजाच्या कारकिर्दीत श्री कल्लटादिक लोकानुग्रह समर्थ सिद्ध, या काश्मीर मंडळांत अवतरले होते. त्यांतील अनेकांचीं चरित्रें वर्णनीय आहेत. पण त्यांपैकीं एकाचेंच थोडक्यांत वर्णन पुढें देत आहें. (भट्टकल्लट हा, काश्मीरी शैव आगमापैकीं स्पंद शास्त्राच्या शाखेचा प्रवर्तक व संस्थापक वसुगुप्त, याचा शिष्य म्हणून प्रसिद्ध आहे. वसुगुप्ताच्या स्पंद कारिकांवर कल्लटाची स्पंद सर्वस्व ही टीका उपलब्ध आहे.)

महापद्मसराचें व नदीनाल्यांचें पाणी वाढून, काश्मीर मंडळ बहुतेक जलमय रहात असें. यामुळें तेथील जमीनींत त्यावेळीं फारशीं पिकें येत नसत. ललितादित्य राजा मोठा प्रबल व कर्तृत्ववान् होता. त्याच्या दीर्घ उद्योगामुळें त्या पाण्याचा कांहींसा निकाल होऊन त्या जमीनींत बरेंच अधिक उत्पन्न येऊं लागले होतें. जयापीडानंतर दुर्बल व निरुपयोगी राजांच्या कारकिर्दीत पुनः पाण्याच्या पुराचा त्रास वाढत चालला (७०) आणि पिकें बुडून दुर्भिक्ष पडले. तें येथवर कीं, खारीभर भाताला दहाशे पन्नास दीनार पडूं लागले. (खारीचा उल्लेख ऋग्वेदांत खार असा आहे. फारसी भाषेंत तिला खरवार–खरबार–गाढवाचें ओझें म्हणत. ३-६ तोळ्याचा एक पल. अशा १९२० पलांची एक खारी. ती सुमारें ८९ पक्के शेरांची होते. हे खारीचें माप धान्यादि जिन्नस, नगदीं व जमीन यांनाहि लागू केलें जात असे.) त्या दिवसांत त्या राजाच्या पुण्याईनें प्रजेचे प्राण वांचविण्यासाठीं श्रीमान् सुय्य याच्या रूपानें त्या देशांत जणों अन्नपतीच अवतरला. त्या पुण्यात्म्याचें कुलवृत्त व जन्मकथा निश्चितशी उपलब्ध नाही. पण तो या चौथ्या कलियुगांत जन्मला असूनहि, त्याच्या अद्भुत कृत्यांवरून, लोक त्याला अयोनिज समजत होते.

सुय्या नांवाची एक महारीण रस्ता लोटीत असतांना, तिला उकिरड्यावर एक झांकण घातलेलें कोरे मडकें दिसलें. झांकण उचलून पाहतां त्याच्यांत एक तान्हें बाळ आंगठा चोखीत असलेले तिच्या दृष्टीस पडलें. तें कमलनेत्र व सुंदर होतें. तें कोणी भाग्यहीन मातेनें लाजेमुळें टाकलेले असावें असे मनांत येऊन, सुय्येला पान्हा फुटला. तिनें त्याला स्पर्श न करतां एका शूद्र स्त्रीच्या घरीं पोंचवून त्याच्या पालनपोषणाची व्यवस्था केली.

त्या मुलाचें नांव सुय्य असें पडलें. तो फार बुद्धिमान् होता. मोठा होऊन चार अक्षरें शिकल्यावर, तो एका गृहस्थाच्या घरीं पंतोजीपणा करूं लागला. तो प्रातःस्नान, नित्यनेम व व्रतें वैकल्ये करीत असे. त्याची बुद्धीहि कुशाग्र होती. हें पाहून त्याच्याभोंवतीं चार भले लोक जमूं लागले व त्यांना तो आवडूं लागला. ते लोक महापूरामुळें झालेल्या नुकसानाबद्दल बोलत व दरबाराला त्याबद्दल नांवें ठेवीत असत. तें ऐकून तो त्यांना म्हणे, ‘ मला याचा प्रतिकार करण्याची बुद्धि आहे पण साधन नाहीं, याला मी काय करूं ’ (८०) तो याप्रमाणें उन्मत्तासारखा बडबडत असतो, ही गोष्ट हेरांकडून राजाला कळली. तेव्हां त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें सुय्याला बोलावून आणवून, ‘ तुझें म्हणणें तरी काय

आहे;' असें विचारतां, सुय्यानें बेधडक, 'मला बुद्धि आहे, पण साधन नाहीं. तेव्हां मी काय करूं?' असें उत्तर दिलें. तें ऐकून राजाजवळच्या माणसांनीं त्याला वेडयांत काढलें. पण राजानें त्याची परीक्षा करण्यासाठीं त्याला लागेल तितकें द्रव्य द्यावें, अशी आज्ञा केली. दीनार भरलेलें कांहीं हंडे बरोबर घेऊन सुय्य हा तडक नावेंतून मडव राज्यांत नंदक गांवाला पोंचला. ( मडव हल्लींचा मराझ परगणा. नंदक गांवाचा पक्का पत्ता लागत नाहीं पण कैमूह खेडयाजवळून वेशाव नदीचा नांदी नांवाचा पाट निघतो. त्याचा या नंदक गांवांशीं कदाचित संबंध असावा, असें वाटतें ) नंदक गांव पुरानें बुडालेला होता. तेथें नदीच्या पात्रांत सुय्यानें एका हंडयांतील दीनार फेंकविले आणि तो तसाच परत फिरला, हें ऐकल्यावर तर, तो खराच वेडा झाला, असें राजमंत्री सुद्धां म्हणूं लागले. तरी राजाने तिकडे लक्ष न देतां त्याचा परिणाम काय होतो तें पाहण्याचा निश्चय केला.

नंतर सुय्य क्रमराज्यांत ( हल्लीच्या कमराझ परगण्यांत ) यक्षदर गांवाला गेला. ( यक्षदर याला एका टीकाकाराने द्यारगल म्हटलें आहे. हल्ली वितस्तेच्या पात्रापर्यंत वाढून आलेली, खादन्यार गावाजवळ द्यारगुल नांवाची पठार आहे. तीच हें द्यारगल होय. ती पठार वराहमूलापासून खाली दीड कोसावर आहे. ह्या ठिकाणीं नदींत खडकाचा बंधारा आहे. तो फोडून कमी केला जाईल तितका वरील पात्रातील पूर कमी होण्याजोगा आहे. ) त्या गांवाजवळ दोन्ही किनाऱ्यावरील दगड नदीच्या पात्रात ढासळून वितस्तेच्या प्रवाहाला अटकाव होतो व पाणी उलट खातें व मागे फुगतें. तेथेंहि सुय्यानें ओंजळीभर भरून दीनार पाण्यांत फेंकले. दुर्भिक्षाने पीडलेले गांवकरी त्या नदीच्या पात्रांतून दगड वर काढून, दीनार हुडकूं लागले. याप्रमाणे दोन तीन दिवस काम चालून पाण्याला वाट झाली. नंतर त्याने मजूर लावून वितस्तेचें पाणी एकाच ठरींव जागेंतून बाहेर पडण्याची व्यवस्था केली (९०) व त्या स्थळीं एक अद्भुत सेतु (बांध) बांधला. यामुळे सात दिवसांत नीलनागतीर्थापासून निघालेल्या वितस्तेच्या पात्रांत, हवे तितके पाणी पुनः तुंबलें व भरलें. पुढे त्यानें खालच्या पात्रांतलेहि दगड काढवून त्यातील अडचण व दगडाची रोंक काढवून टाकविली. तेव्हां फार दिवस विरोध झाल्यामुळें उत्कंठित झालेली वितस्ता नदी मोकळी होऊन, मोठ्या वेगाने सिंधुसमागमासाठीं धांवूं लागली.

नदीचें पाणी ओसरून दोन्ही कांठची जमीन उघडी पडली. तिच्यावर जमलेल्या गाळांत सफेत मासे तडफडत होते. ते त्या कृष्णवर्ण जमीनरूपी नभस्थळावर नक्षत्रांसारखे चमकत होते.

महापुरांत जेथें जेथें नवे ओघ पडण्यासारखें वाटलें, तेथें सुय्यानें नदींतून नवे पाट काढविले. त्यांच्यामुळें पूर्वीच्या एकाच पात्राऐवजीं प्रवाहाला अनेक वाटा मिळाल्या आणि ती नदी एकाच प्रवाहाला एकाच धडावर अनेक फणा असलेल्या नागिणीसारखी शोभूं लागली. त्रिग्रामीच्या डावीकडून सिंधू व उजवीकडून वितस्ता येऊन, वैन्यस्वामींच्या मंदिराच्या

वरच्या बाजूस त्यांचा संगम झालेला होता. त्याऐवजी आतां त्यांचा आकल्प टिकणारा असा श्रीनगराजवळ सुय्यानें सुरेखसा नवा संगम साधला आहे. पूर्वीच्या संगमाच्या दोनी बाजूस, फलपुर व परिहासपुर, येथें विष्णूस्वामी व वैन्यस्वामी यांचीं मंदिरें होतीं. पण हल्लींच्या सुंदरीभवनानजीकच्या संगमावर सुय्यानें पूजन केलेला योगशायी हृषीकेश विष्णू विद्यमान आहे. ( १०० ) नदीच्या पूर्वीच्या पात्रावरील जुन्या वृक्षांच्या खोडांवर निषादांनीं नावा बांधण्याच्या दोरखंडाचे करकोचे पडले होते. जुने वृक्ष अद्यापीहि तेथें आहेत. ( निषाद-नावाडी धीवर यांचा धंदा करणारे, हलक्या जातीचे लोक, त्यांना हल्ली हांझी म्हणतात. )

बाहेर काढलेल्या जिभा जोरानें वळवत असलेल्या नागांना, गारोडी हवेतसे खेळवितात. तद्वत् स्फुरण पावणाऱ्या तरंगांनीं युक्त वितस्तेच्या पाण्याचे अनेक पाट सुय्यानें शेतकीच्या कामीं उपयोगांत आणले. तसेंच त्यानें वितस्तेच्या दोनी तीरांवर पुराच्या पाण्याला अटकाव करण्यासाठी दगडी बांध, सात योजनें ( सुमारें ५६ मैल ) लांबीचे बांधविले व महापद्म सरोवराच्या तोंडावर बांध बांधून पाणी तुंबविले. तेथून त्या सरोवराचें पाणी वितस्तेंत सुटतांच तें कमानी-धनुष्यापासून सुटलेल्या तीराप्रमाणें वेगानें पुढें वहात असतें.

त्यानें आदिवराहाप्रमाणें मेदिनीचा जलांतून उद्धार केला व तिच्यांत पुष्कळसे गांव वसविले. त्यांच्यांत लौकरच कितीतरी लोकवस्ती गजबजूं लागली. त्या गांवांभोंवतीं गोल बांध बांधवून तेथें त्यानें पुराचें पाणी न जाण्याचा बंदोबस्त केला. त्या बांधांना कुंडलें म्हणत व त्यांच्यावरून त्या गावांनाहि कुंडले अशी नावें पडलीं. तीं कुंडलें किंवा गांव फार चांगले व सर्व तऱ्हेनें समृद्ध होते. नदीतील पाणी शरदृऋतूंत ओसरतें तेव्हा, त्यांच्यांत पूर्वी उभे केलेले मोठमोठाले खुंट, मत्त जलगजाचे छावे बांधण्याच्या स्तंभासारखे शोभत असत.

पुढें नदीच्या पुराचें पाणी ओसरल्यावर काही दिवसांनीं त्यानें नंदक गांवाजवळ खोल पाण्यांत टाकलेला दीनारांचा हंडा चांगल्या कोरड्या जमीनीवर सांपडला.

त्यानें निरनिराळ्या प्रकारच्या जमीनीची पाहणी करून त्या सर्व गांवांतील जमीनीवर हवे तितकें पाटाचें पाणी पोंचण्याची व्यवस्था केली. यामुळें त्यांना पावसावर अवलंबून राहण्याची अवश्यकता उरली नाहीं. याप्रमाणें पाण्याची सोय केल्यावर त्यानें प्रत्येक गांवांतून थोडी थोडी माती आणवून ती पूर्ती भिजल्यावर तिला वाळण्याला किती वेळ लागतो व तिच्यात चांगलें पीक येण्याला किती वेळां पाणी द्यावें लागतें तें ठरविलें. ( २१० ) प्रत्येक गांवाला नियमित व हवें तितकेंच पाणी पाळींपाळींनें, व्यवस्थेशीर मिळत जाण्याजोगे पाट व नाले तयार करविण्याचीहि त्यानें योजना केली. शिवाय आनूला वगैरे नदी नाल्यांचेंहि पाणी उपयोगांत आणून त्यानें सर्व जमीन पुष्कळच सुपीक केली. त्या हुषार व गुणी सुय्यानें काश्मीर मंडलांत जें काम सहज करून दाखविलें, तसें पूर्वी कश्यपऋषींनीं, किंवा संकर्षणबलरामानेंहि केलें नव्हतें. पृथ्वीचें पाण्यांतून उद्धरण, तिचें द्विजांना दान, शिला सेतुबंधन व

कालियदमन, हीं चार महाकृत्यें करण्याला श्रीविष्णूला वराह, परशुराम, राम व कृष्ण, असे चार अवतार घ्यावे लागले होते. पण हीं चारहि महत्कृत्यें त्या पुण्यराशि सुय्यानें एकाच जन्मांत करून टाकलीं ! ( महा पद्मनाग वूलर सरोवरांत रहात होता. तो व कालिनाग हे एकच, असें जोनराजानें आपल्या राजतरंगिणीच्या पुढें चालविलेल्या कथा भागांत ९३३ व्या श्लोकांत म्हटलें आहे. )

चांगलें पीकपाणी होऊन उत्तम सुभिक्ष असतांना सुद्धां काश्मीर मंडळांत भाताच्या एका खारीची किंमत दोनशे दीनार द्यावी लागे. त्याच काश्मीरांत यापुढें ती किंमत छत्तीस दीनार झाली. हें नवलच नव्हे काय ? ( वरील सुय्यानें केलेल्या सुभिक्षाचें वर्णन जोनराजानेंहि श्लोक ८७६त केलें आहे. ) वितस्तानदी महापद्मसरोवरांतून बाहेर पडते. त्या सुमारास सुय्यानें आपल्या नांवानें स्वर्गोपम असें सुय्यपुर वसविलें. (सुय्य-पूर हल्लींचें सोपूर. वितस्तेच्या दोन्ही कांठावर वूलर सरोवराखालीं अर्ध कोसावर आहे. त्याचा पुढें तरंग ८ श्लो. ३१२८ त उल्लेख आला आहे. तेथील वस्ती ई. स. १८९१ च्या खानेसुमारीत ८००० होती. पुढें तेथें सुल्तान हसनशाह यानें एक नवा राजमहाल बांध-विल्याचें श्रीवर यानें आपल्या काश्मीरच्या इतिहासाच्या तिसऱ्या भागाच्या १८३व्या श्लोकांत लिहिलें आहे.) त्या क्षितीजाला भिडलेल्या विस्तीर्ण सरोवराच्या कांठावर मासे व पक्षी यांची शिकार केव्हांहि —कल्पांतापर्यंत- केली जाऊं नये, याविषयी सुय्यानें आपल्याच अधिकारांत, नियम केला. त्याने सुय्याकुंडल हें गांव द्विजांना दान दिले आणि सुय्यासेतु नांवाचें धरण बांधविलें. (१२०) त्या पाण्यांतून उद्भवलेल्या जमीनींत पुढे अवंतिवर्मादिकांनी जयस्थल वगैरे हजारों गांव वसविले.

अशा अनेक धर्मचरितांनी मांधात्याप्रमाणे, आणि जणों कृत युग पुनः अवतरीत अवंतिदेवानें पुष्कळ दिवस पृथ्वीचे पालन केलें. पुढें प्राणांतिक रोग झालेला पाहून, तो त्रिपुरेश पहाडीवरील. ज्येष्ठेश्वराच्या शिवालयाजवळच्या तीर्थभूमीला गेला. तेथे आसन्न मरण झाला तेव्हां त्याने, आपलें फार दिवस दबविलेलें वैष्णवत्व शूर मंत्र्यापुढें हात जोडून, प्रकट केले. शेंवटीं मोठ्या भक्तीनें श्रीमद्भगवत् गीतेचें श्रवण व वैष्णव धाम वैकुंठ, यांचें ध्यान करीत, त्या राजर्षभाने आनंदानें प्राणत्याग केला. त्या दिवशीं लौकिक शक ३९५९ ई. स. ८८३ची आषाढ शुद्ध तृतीया होती.

त्याच्या मागून राज्यप्राप्तीविषयी उत्सुक अशा पुष्कळशा उत्पलवंशीयांनी एकदमच गादीसाठीं खटपट चालविली. पण प्रतिहार रत्नवर्धन यानें मोठ्या मेहनतीनें व शिताफीने अनंतवर्म्याचा पुत्र शंकरवर्मा याला गादीवर स्थापन केलें. त्याचा प्रतिस्पर्धि विघ्नपाचा अमात्य कर्णप, यानें शूरवर्म्याचा पुत्र सुखवर्मा, याला युवराज केलें. तेव्हां राजा व युव-राज यांचें वैर पडून लढाया चालल्यामुळें ते राज्य डळमळूं लागले. (१३०) या युद्धांत शिवशक्ती वगैरे वीरांनी स्वामिभक्तिसाठीं प्राण देऊन, आपलें सत्व कसोटीस लावलें. त्यांना शत्रूकडून दानमानादिकांची लालूच दाखविली गेली होती. पण त्यांनी सत्वाला जागून ती झिटकारिली व ते आपल्या मानधनावर कायम राहिले.

त्यावेळीं सेवक मंडळी हुरळलेली नव्हती किंवा त्यांना श्वत्रृत्ति पतकरून तुकड्या-साठीं हवे त्या बाजूनें लढण्याची हलकट व निंद्य संवय लागलेली नव्हती.

पुढें त्या शूर व प्रतापी शंकरवर्म्यानें युक्तीनें व शौर्यानें त्या प्रबल युवराजाचा पराभव केला आणि त्यायोगानें जणों आपल्या पुढील दिग्विजयाचा प्रशंसनीय असा ओनामाच केला. त्यानें समरवर्मा वगैरे प्रतिस्पर्ध्यांशीहि अनेक लढाया केल्या व विजयश्रीरूपी प्रियपत्नीला निर्मलकीर्तिरूपी दुसरी वैभवशाली सवत मिळवून दिली.

याप्रमाणें दायादांना दाबून टाकल्यावर तो दिग्विजयाच्या दिव्य उद्योगाला लागला. कालगतीमुळें त्यावेळी काश्मीरच्या राज्यांतील वस्ती व समृद्धि कमी झाली होती. तरी तो दिग्विजयासाठीं आपल्या राज्याच्या सरहद्दीवरील द्वार किंवा चौकीवरून बाहेर पडला. तेव्हां त्याच्याबरोबर नऊ लक्ष पायदळ, एक लक्ष स्वार आणि तीनशे हत्ती होते! एकदां ज्याची आज्ञा त्याच्या राजधानीबाहेर सुद्धां नीट पाळली जात नव्हती, त्याचीच आज्ञा आतां थोर व संपन्न राजे लोक आपल्या रत्नखचित शिरोभूषणांवर नम्रपणें धारण करूं लागले! दिग्विजयाच्या वर्णनाचा प्रघात सुद्धां अलीकडे विद्वानांच्या काव्यांतून मागें पडला होता. तो शंकरवर्म्यानें आपल्या तेजस्वीपणानें पुनः चालू केला, याबद्दल तो प्रशंसेला पात्र आहे. जागजागी मांडलिकांच्या फौजा येऊन मिळत गेल्याने, मोठी नदी, पुढे येऊन मिळालेल्या अनेक नदीनाल्यांच्या पाण्याने फुगते, तद्वत् त्याची सेना फुगत होती. ( १४० )

त्याच्या सैन्याचा जयघोष, दार्वाभिसारच्या राजाच्या फौजेच्या ऐवजी तो भिऊन तिच्या-सह ज्या दुर्गम पहाडी प्रदेशांत पळून गेला होता, त्या पहाडातलि दऱ्याखोऱ्यांनीच श्रवण केला. ( दार्वाभिसार–वितस्ता व चिनाब नद्यांमधील पहाडी प्रदेशापासून गुजरातच्या उत्तरेपर्यंतचा भाग. एका टीकेंत त्याचें नांव दानगलें, असें दिलेले आहे. ) तसेच, संख्या-तीत हारिगणांचा राजा दौडत आपल्या दुर्गांत पोंचण्यापूर्वीच शंकरवर्म्यानें त्याला पकडून दुसऱ्याच एका किल्ल्यांत पाठविलें. ( हरिगण हा कोठील व कोण राजा होता, हे कळत नाहीं. याचा अर्थ कोणी हरि म्हणजे सिंह यांचा कळप असाहि केला आहे.

गुर्जर प्रांतावर स्वारी करून तो पूर्ता पाडाव करण्याचा निश्चय करून, राजा शंकर-वर्मा, बरोबर–बिनीला–नऊ लक्ष पायदळ एक लक्ष स्वार व तीनशे हत्ती घेऊन निघाला. ( गुर्जर प्रांताचें स्मारक असें हल्लींचें गुजरात हे शहर, पंजाबांत चिनाबच्या पश्चिम कांठापासून अडीच कोसांवर आहे. तेंच नांव त्याच्या आसपासच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशाला होतें. तो प्रदेश जेहलम व चीनाब नद्यांमधील दुआबाचा वरील भीमभर पहाडापर्यंतचा भाग होय. प्राचीन काळी चीनाबच्या पूर्वेकडील तक्कदेशाचाहि या गुर्जर देशांत अंतर्भाव असे. ) हें ऐकून त्रिगर्ताचा राजा पृथ्वीचंद्र याला स्वतःच्या पराभवाची भीति पडली. त्यानें आपला पुत्र भुवनचंद्र याला शंकरवर्म्याकडे नीवीस किंवा ओलीस पाठविलें व तो स्वतः त्याची ताबेदारी पतकरण्यासाठी निघाला होता. पण शंकरवर्म्याचें

अनेक मांडलिकांनीं युक्त व महासागरासारखें पसरलेलें प्रचंड सैन्य पाहतांच, न जाणों शंकरवर्मा आपणांला कैद करील, या भीतीनें तो परत फिरला आणि फार दूर पळून गेला. याबद्दल त्याचें फार हंसें झालें. ( त्रिगर्त-हल्लींचा कांगड्याचा पहाडी प्रदेश. एका टीकेंत त्रिगर्त म्हणजे नगरकोट असेंहि लिहिलें आहे. त्यालाच कोट कांगडा हें नांव असून ती या प्रांताची राजधानी होती. हा एक फार जुना व मजबूत दुर्ग आहे. त्याच्या संबंधानें गिजनीच्या महंमदापासून आतांपर्यंतची सलग माहिती मिळते. त्याचें मूळचें नाव सुशर्मापुर होतें. कांगड्याच्या प्राचीन राजवंशावळीत पृथ्वीचंद्र व भुवनचंद्र या दोघांचींहि नांवें नाहीत. दार्वाभिसारवरून गुजरात प्रांतावर स्वारी करून जातांना शंकरवर्मा त्रिगर्ताला गेला होता किंवा काय हें स्पष्ट नाही. नीवी शब्दाचा—ओलीस दिलेला—असा एक अप्रसिद्ध अर्थ आहे. )

राजा शंकरवर्मा फार सुस्वरूप होता, असें प्राचीन लेखक वर्णन करतात. तसा तो सुंदर असूनहि भयभीत व त्रस्त नृपांना, तो कर्दनकाळासारखा कुरूप व उग्र भासत असे. त्यानें गुर्जराधिप अलखान याच्याशीं युद्ध करून, त्याची बद्धमूल राजलक्ष्मी क्षणभरांत उघळून, त्याला दीर्घ शोकांत टाकलें. तेव्हां अंगुलि देऊन देह राखावा तद्वत्, त्यानें नम्रपणाणे टक्क प्रदेश ( हल्लींचे टोकी खोरें ? ) देऊन, आपलें राज्य वांचविलें. ( १५० ) (अलखान हा बहुधां, त्यावेळीं काबूल येथें प्रबल हिंदूशाही घरण्यांतील राजे राज्य करीत होते. त्यांपैकीं कोणा राजाचा तांबेदार असावा. )

थक्कियान्वय राजपुत्र शंकरवर्म्याच्या पदरी त्याचा प्रतिहार झाला होता. त्याचें राज्य अधिराज भोज यानें हरण केले होतें. ते शंकरवर्म्यानें त्याच्याकडून सोडवून थक्किय राजपुत्राला परत दिलें. ( थक्कियान्वय याचा पुनः उल्लेख आलेला नाही. मागें तरंग ४ श्लोक ४९४ मध्यें पंडित थक्किय याचा उल्लेख आहे. त्याच्याशी याचा संबंध आहे किंवा काय कळत नाहीं. अधिराज भोज हा कनोजचा भोजराजा असावा, असे कोणाकोणाचे मत आहे. तो या सुमारास राज्य करीत असल्याविषयी देवगड येथील सं. ८६२ च्या, ग्वाल्हेर येथील सं. ८७६ च्या आणि पिहोआ येथील सं. ८८२च्या, शिला लेखांत उल्लेख आहेत. पण हा प्रश्न वादग्रस्त आहे. अलखानाचा आश्रयदाता लल्लियशाही, हा दरद व तुरुष्क यांच्यामध्यें सांपडला होता. हिमवान व विंध्य या दोन पर्वतांमध्यें असलेल्या आर्यावर्ताप्रमाणें वनवराह व सिंह या दोघांच्यामध्ये आल्यासारखी त्याची स्थिति होती. त्याच्या उद्भांडपुर नांवाच्या राजधानींत, इतर पराभूत झालेल्या राजांना आश्रय मिळत असे. त्यांची स्थिति पक्षछेदोद्यत शक्रापासून रक्षण व्हावे म्हणून सागराच्या आश्रयाला गेलेल्या पर्वतासारखी झालेली होती. तो लल्लियशाहि शंकरवर्म्याचा आश्रय करूं इच्छित होता. पण त्याचें साम्राज्य हिरावून घेण्याचा शंकरवर्म्याचा विचार असल्यानें, त्यानें ही गोष्ट पतकरली नाहीं.

याप्रमाणें दिग्विजय करून शंकरवर्मा परत आल्यावर, त्यानें पंचसत्र नांवाच्या विभागांत आपल्या नांवानें शंकरपुर हें गांव वसविलें. (श्रीनगराहून वराहमूलाकडे जाणाऱ्या

मार्गावरील हल्लींचें पट्टन नांवाचें मोठें खेडें. हल्लीं तेथें तहशील आहे. ) क्षपाकर चंद्राला रांका प्रिय असते, त्याप्रमाणें उदक्पथाचा राजा श्रीस्वामिराज याची कन्या सुगंधादेवी, ही शंकरवर्म्याची प्रिय पत्नी होती. त्या इंद्राशी स्पर्धा करणाऱ्या राजानें स्वतःच्या व राणीच्या नांवानें, त्या नव्या नगरामध्यें शंकरगौरीश व सुगंधेश, यांची स्थापना करविली. (या दोन्ही मंदिरांचे जीर्ण अवशेष अद्यापि पट्टन येथें आहेत.) तेथें त्यानें शारदेचें निवास-स्थान आणि चतुर्विद्याशारद, अशा नायक नांवाच्या ब्राह्मणाला व्यवस्थापक नेमलें.

अलीकडील कवी व राजे दुसऱ्याची काव्यकृति आणि मालमत्ता चोरून, स्वतःच्या कृतींची भरती करीत असतात. (१६०) त्याप्रमाणेंच या चारित्र्यहीन राजाने आपल्या त्या नव्या नगराच्या अभिवृद्धीसाठीं, जवळच असलेल्या परिहासपुरांतून, साऱ्या चागल्या चांगल्या वस्तू काढवून नेल्या. शंकरपुर-पट्टन-याला शोभा आली, ती परिहासपुरांतलि पट्टवान-शालनामें विणणार लोकांचे कारखाने व गुरांचे बाजार वगैरे काढून नेऊन तेथें वसविल्यामुळेंच.

त्याला गादीवर बसविणारा रत्नवर्धन मंत्री यानें श्रीरत्नवर्धनेश सदाशिवाची स्थापना केली.

कीर्तिरूपी निर्झरोदकानें स्वच्छ झालेले देह धारण करणारे राजे लोक, गजांचे अनुकरण करीत व्यसनासक्तिरूपी धुळीने स्वतःला पुनः मलिन करून घेतात, हें किती तरी चम-त्कारिक आहे!

पुढे शंकरवर्मा भारी लोभी झाला. त्यापायीं त्यानें प्रजापीडनांत पंडितपणा मिळ-विला. अनेक व्यसनांपायीं उधळपट्टी करीत, त्यानें सर्व खजिना खालीं केला. नाना तऱ्हेच्या व असह्यायक युक्त्या योजून, त्यानें पुष्कळशा देवांच्या मंदिरांतून व इतर ठिकाणांतूनहि सर्वस्व हरण केलें. पुरग्रामादिकांतील मंदिरें वगैरेतूनहि धन हरण करणाऱ्या, या अधम चोरानें अट्टपतिभाग व गृहकृत्यभाग नांवाच्या दोन नवे कर वसूल करण्याच्या कचेऱ्या कायम केल्या. तसेच देवालयांतून धूप, चंदन, तेल, वगैरेंच्या किंमती अन्यायानें वाढवून, त्यांच्या विक्री-पासून आलेला सर्व नफा आपला राजभाग म्हणून तो स्वतः घेऊं लागला. त्यानें चौसष्ट मंदिरें लुबाडलीं व त्यांच्यावर स्वतंत्र व नवे व्यवस्थापक कामगार नेमले. त्यांचीं इनाम गांवें गांवें जप्त केली व त्याऐवजीं त्यांना कांहीं प्रतिकर-नगदी-नेमणुकी करून दिल्या व स्वतःच त्या गांवांची लागण केली. ( १७० ) त्यानें ठरलेल्या वार्षिक वेतनाचा तिसरा हिस्सा लबाडीनें किंमती वाढविलेल्या अन्न व कंबलादि प्रावरणाच्या स्वरूपाने देणें सुरू केलें. शिवाय वजन मापहि तितकेंच कमी केलें.

तो फिरतीवर एका विभागांत गेला होता. तिकडे जे गांवकरी वर्षभर बेगारीनें ओझीं वाहण्याला गेले नाहींत, त्यांना त्यानें त्या प्रांतांतील वाढीच्या भावानें त्या बेगारी-पेटें भात वसूल केलें. तीच व्यवस्था त्यानें दुसऱ्या वर्षीहि सर्व गांवांवर केली. तसेंच प्रत्येक गांववाल्याकडून बेगार करविण्याची व त्याच्या ऐवजी जबर नगदी दंड वसूल करण्याची

तऱ्हा, या काश्मीर मंडलांत प्रथम त्यानेंच सुरू केली. याला रूढभारोढी म्हणत. हे दंड तेरा प्रकारचे होते. त्यांच्यामुळें सर्व गांव दरिद्री झाले. ( ही जबरीची बेगार काश्मीरांत अद्यापि बऱ्याच प्रमाणांत चालू आहे. कारण त्या पर्वतप्राय देशांत बहुतेक ने आण मजुरांकडूनच करवावी लागते. तिकडे चागले रस्ते नसल्यानें गाडया घोडे वगैरें वाहनें कमी आहेत. ) स्कंदग्राम व ग्रामकायस्थ यांच्या वृत्ती आणि दुसरे त्रासदायक कर यांच्या द्वारें, त्यानें सारी प्रजा पिळून काढली. ( ग्रामकायस्थ हा अलीकडील पटवारी-कुलकर्णी-याचें व स्कंदग्राम हा पाटील किंवा जमीनदार अथवा मुकादम-लंबरदार-अथवा यांचें, मूळ रूप होत. ) तोलांत कमी जास्ती करून आणि ग्रामदंडादि कर बसवून व ते वसूल करून, त्याने गृहकृत्य या खात्याच्या खर्चासाठीं पैसा जमा केला. त्या खात्यांत पूर्वी पाच दिविर-कारकून-होते. त्याच्याशिवाय त्यानें शकच किंवा लवट नांवाचा साहावा गंजवर किंवा खजीनदारहि नेमला. ( या लवटाचाच उल्लेख पुढें तरंग ५ श्लोक २०५ आणि तरंग ८ श्लोक २६३ मध्यें आला आहे. त्याचा अर्थ भारवाहक मजूर-हमाल-असा आहे. ) अशा तऱ्हेने त्या मूर्खाग्रणी शंकरवर्म्यानें भावी राजे व कामगार यांच्या प्रीत्यर्थ धनसंचय करण्यात स्वत:साठीं नरकाचें साधन करून ठेवलें. या काश्मीर मंडळांत विद्वानाचा अनादर आणि राजाची प्रतापहानि सुरू होण्याला या शंकरवर्म्याशिवाय दुसरा कोणी कारण झाला नाहीं.

गुणि लोकांची धनहानि व तिच्यामुळें राजाच्या यशाचा नाश, होण्याचे साधन झालेले ते राडलेक कायस्थ, यांच्या महत्त्वाला सुरुवात तरी याच मूर्खशिरोमणीनें केली. ( १८० ) त्याच्याविषयींच्या कळकळीमुळें सारे राज्य, कायस्थाचे जणो, कुरण बनले. त्याच्या द्वारे राजाच प्रजेला लुटीत आहे, अशी त्या राजाची दुष्कीर्ति झाली.

प्रजेला अशा तऱ्हेने दुस्सह दुःख होत असलेलें पाहून युवराज गोपालवर्मा याचें मन फार कळवळलें व त्याने एकदां राजाला म्हटलें, 'महाराज, पूर्वी मला आपण एक वर देत होता. तो आपल्याकडे तसाच आहे. आपण सत्यसंघ आहांत. आपण या कायस्थांच्या प्रेरणेनें प्रवृत्त केलेल्या अनेक त्रासदायक करांतून प्रजेला श्वासोच्छ्वास करणें तेवढें सुटलें आहे. या प्रजापीडना-पासून ऐहिक किंवा पारलौकिक सुखप्राप्तीचें साधन मुळींच दिसत नाहीं. गूढ अदृष्टाविषयीं खात्रीनें कोण काय सांगू शकतो. पण ऐहिक दृष्टया तरी यापासून अनिष्ट फलाशिवाय कांहीं दिसत नाहीं. प्रजेला एकीकडून संततव्याधि व दुर्भिक्षादिक दैवी विपत्ती भोगाव्या लागता-हेत आणि दुसरीकडे हा महाराजांचा लोभ त्यांना पिळून काढतो आहे. लोभी राजाचें वैभव आणि अकालीं व निष्फल कुसुमोद्भव, हें कोणालाच आनंद देत नाहींत. महा राज औदार्य व प्रेमळ भाषण, यांच्या द्वारें सर्व कांहीं हातीं येत असतें. पण लोभ या दोहोंचीहि जबरदस्तीनें नाश करण्याला झटत असतो. हेमंत दिवसाची शोभा, दीर्घपणा व वैभव, मेघमाला नष्ट करीत असते. तद्वत् लोभ हा राजाचें वैभव, आयुष्य आणि प्रताप, स्मृतिशेष करतो, ( १९० ) खर्चाच्या भीतीनें साहसोद्यम करण्यांत मागें घेणारे राजाचे

दायाद, जागजागीं बळावून द्रोह करूं लागतात. सेवाचाकरीची कदर करून इनाम न देणाऱ्या मालकाशीं कोणीहि इमानदार रहात नाहीं. निवळ धनसंचय करणाऱ्या राजाचे स्वजनच नेहमी त्याचा प्राण घेण्याला टपलेले असतात. या लोभरूपी शत्रूपासून राजे लोकांना काय काय म्हणून अपाय होत नाहींत? व त्यामुळें कोणाचा बरे नाश होत नाहीं. हा राज-संवाह नांवाचा नवा कर प्रजेला प्राणहारक होतो आहे. तेव्हां महाराजांनीं या लोभमूलक सर्व त्रासाचें निवारण करावें, असें माझें महाराजाजवळ मागणें आहे. तेवढें महाराजांनीं मला द्यावें.'

युवराजाचे हे उदारपणाचे स्पष्ट असें भाषण ऐकून, राजाने किंचित् तिरस्कार द्योतक स्मित करीत, हळूं हळूं उत्तर दिलें, 'या तुझ्या नव्या तरतरीला अनुरूप व भलेपणाच्या भाषणावरून, मला माझ्या तरुणपणाच्या अशाच मनोवृत्तीचें स्मरण झालें. हें पहा, मी लहान असतांना तुझ्याप्रमाणेंच माझेंहि अंतःकरण दयार्द्र असून, मला प्रजेविषयीं अशीच भारी कळकळ वाटत असे. त्या वेळीं माझे वडील मला नेहमीं आपल्याबरोबर ठेवून, स्वारी शिकारीत पायी व अनवाणी दवडीत असत. मला उन्हाळ्यांत जड चिलखत व हिंवाळ्यांत कडक थंडी पडली असतांना बारीक व तलम वस्त्रे घालून हिंडावें लागे. अशा स्थितींत शिकारीच्या वेळीं धांवतांना पायांत कांटे व खडे बोचून क्षतें पडत आणि दुःखामुळे मी रडकुंडीला येत असे. हे पाहून बरोबरीचे लोक माझी कींव करून वडिलांजवळ माझी रदबदली करीत. तेव्हां ते त्यांना म्हणत, 'मी स्वतः अगदीं सामान्य स्थितींत असतांना राजा झालों. सेवक लोकांना वेळोंवेळीं पडणाऱ्या परिश्रमाचा मला चांगला अनुभव आहे. अशा परिश्रमाचा व त्रासाचा अनुभव घेतल्यानेंच माझ्या पुत्राला, तो गादीवर आल्यावर, दुसऱ्याच्या दुःखाची खरी जाणीव राहील, नाहीं तर गर्भश्रीमंतपणामुळे तो त्यांच्याविषयीं अनभिज्ञ राहील.

माझ्या वडिलांनीं मला असें शिक्षण दिलेलें असून सुद्धां, मी गादीवर बसल्यावर प्रजेला इतकी पीडा देतों आहे. (२००) गर्भवासांतील पीडेचा प्राण्याला विसर पडतो. त्याच-प्रमाणें गादीवर बसतांच राजाला पूर्वीच्या सर्व विचारांचें पार विस्मरण होतें.

तेव्हां तूंच आज माझी एक मागणी मान्य करून, मला देणगी दे, कीं, तूं गादीवर बसलास म्हणजे, प्रजेला मजेपक्षां अधिक त्रास व पीडा देणार नाहींस.'

हें राजाचें तिरस्कार व असूयायुक्त असें उत्तर, युवराजानें लाजेनें मान खालीं घालून स्वस्थ उभा राहून ऐकिलें. त्यावेळीं राजाचे लबाड व धूर्त अंतरंगांतले लोक, एकमेकांकडे पाहात हंसत होते. यामुळें युवराज खजिल झाला होता.

गुणिजनांची कांहीं संभावना करावी लागेल या भीतीनें तो राजा त्यांच्या समागमाला पारखा झाला होता. त्याच्यावेळीं भल्लटादिक कवींची फारच दुर्दशा होती. (या कवीचें भल्लटशतक व पदमंजरी नांवाचे कोश उपलब्ध आहेत. त्यांचा क्षेमेंद्रानें पुष्कळदां उल्लेख केलेला आहे.) त्याच्याकडून थोर व विद्वान कवींना आश्रय व वेतन मिळत नसे. मूळचा भारवाहक मजूर असलेल्या लवटाला, राजाच्या कृपेमुळें दररोज दोन हजार दीनार

मिळत असत. ( मागें १७७ व्या श्लोकांत असलेला खजीनदार लवट. हा राजाच्या कृपेंतला होता. ) या राजाला संस्कृत भाषा येत नव्हती, तो दारुड्यांना योग्य अशी अपभ्रष्ट व गांवढळ भाषा बोलत असे. त्यावरून त्याचें हीन-कलालाचें-कुल व्यक्त होत होतें.

दाढी मिशीवरून आर्योचित वेषानुरूप धाटा बांधलेला, नाकावर तर्जनी, आणि ध्यानस्थ दृष्टि, अशा वेषांत त्या छांदिष्ट राजापुढें येणारा मंत्री सुखराज नटव्यासारखा दिसत असे.

या शंकरवर्मा राजानें राजद्रोहाची शंका घेऊन दार्वाभिसारचा निरपराधी राजा नरवाहान याला त्याच्या सेवकांसह रात्रीच्या वेळीं, अपघातानें मारविले. त्या दुराचारी राजाला प्रजेचा शाप लागून, त्याचे वीसतीस पुत्र सहजासहजीं मरण पावले ( २१० ) प्रजापीडक राजाचे कुल, वैभव, दारा, जीवित, किंबहुना, त्याचें नांव निशाण, सर्व कांहीं क्षणभरांत नष्ट होत असतें, असा प्रवाद पूर्वीपासून चालत आलेला, हल्लींसुद्धां खरा आहे. तसाच या दुष्ट राजाचा प्रकार झाला. त्याच्या क्रूरपणामुळें त्याचें नांवसुद्धां पार बुडालें. त्याने शंकरपुर नांवाचें नगर वसविले होतें, त्याचे ते नांव नष्ट होऊन, पट्टन हे नांव पडलें. अशी स्थिति दुसऱ्या कोणच्या राजाच्या नगरीची झाली आहे ?

शंकरवर्मा राजाने सुख राजाच्या भाचाला द्वाराधिप केलें होते. तो स्वतःच्याच चुकीमुळें वीरानक येथे मारला गेला. म्हणून राजा उन्मत्तपणाने व रागारागाने त्याच्यावर चालून गेला व त्यानें तो गाव उध्वस्त करून टाकला. पुढे तिकडील भाग जिंकण्याची त्याला प्रबल लालसा व महत्त्वाकांक्षा झाली व तो तसाच उत्तरापथाला गेला. तिकडे त्यानें सिंधू नदीच्या तीरावरील अनेक प्रदेश जिंकलें. तेथील राजे भयभीत झाले व त्याला शरण आले. नंतर तो तिकडून परतून उरशा येथें पोंचला. ( द्वारपति, द्वाराधीश्वर द्वारेश, द्वारनायक, द्वाराधिकारी, हीं सर्व काश्मीर मंडळाच्या सरहद्दीवरील डोंगरांतील घाट्या किंवा नाकीं संरक्षण करण्याचें काम ज्या अधिकाऱ्यांकडे असे त्यांची नांवें होत. काश्मीराभोंवताली उंच पर्वत असल्यानें या द्वारां-नाक्यां-वाचून त्यांच्यांत प्रवेश करण्याला मार्गच नाहीं. त्यांचा नीट बंदोबस्त ठेवला तर त्या राज्याला परशत्रूची भीति उरत नाही. हें द्वारापतीचें काम मोठें महत्त्वाचे व मंडलेशाच्यापेक्षांहि अधिक योग्यतेचें असें. वीरानक-काश्मीरच्या सरहद्दीवरील कौंदंड नांवाच्या पठारीवरील वीरन नांवाचे खेडेंच असावें. तें बोल्यासकच्या समोर होतें. हल्लीं तेथील लोक खख्ख जातीचे आहेत. यावरून तें वीरानक येथील प्राचीन खश लोकांचेच वंशज व निदर्शक असावेत. उरशा हल्लीच्या इंग्रजी अमलांतील हजारा प्रांताच्या उत्तर भागांतील मुख्य गांव. )

तेथें पडावावरून गांवकऱ्यांची व राजाच्या सैनिकांची मारामारी जुंपली. तिच्यांत एका उंचवट्यावर उभा असलेल्या एका चांडालानें जोरानें एक बाण मारला. त्यावेळीं राजा बेसावध होता. त्याच्या मानेंत तो बाण घुसला, व राजाचे प्राण कासावीस झाले. तेव्हां त्यानें सरदारांना, सैन्य संभाळून सोडवून नेण्यास सांगितलें व तो स्वतः कर्णी रथांतून

–मेण्यांतून-पुढें रवाना झाला. त्याला दिसत नव्हतें. सुगंधा महाराणीनें त्याला सांवरलें होतें. ( २२० ) तिच्या शब्दावरून तिला ओळखून राजानें तिला हळू हळू तुटक शब्दांनी, राजपुत्र गोपाळवर्मा, अद्यापि लहानच व निराश्रित आहे. त्याला नीट सांभाळावें असें सांगितलें. रुतलेला बाण काढीत असतांना राजाचा प्राण गेला. त्यादिवशीं लौकिक शक ३९७७ ( ई. स. ९०२ ) वर्षाची फाल्गुन वद्य ७ होती.

सुखराज वगैरे मंत्र्यांनीं त्या परकी देशांतून तें सैन्य संभाळून पुढें चालविलें. साहाव्या दिवशी ते आपल्या हद्दींत, द्वारवती प्रांतांतील वराहमूल जवळील बोल्यासक-पेल्यास–या गांवीं पोंचले. तोवर त्यांनीं राजाच्या मरणाची बातमी युक्ति प्रयुक्तीनें गुप्त ठेवली होती. वाटेंत मांडलिक राजे त्याच्या दर्शनाला येत तेव्हां त्या राजाच्या निर्जीव मस्तकाला दोऱ्या –सूत्रें–बांधून वर खाली करून प्रतिप्रणाम करवीत असत. पुढें भीति नाहीं असे पाहून, त्यांनी तेथेंच अंत्यविधि उरकला. राणी सुरेंद्रवती व दुसऱ्या दोघी राण्या त्याच्याबरोबर सती गेल्या. तसेंच कृतज्ञ व राजनिष्ठ वेलावित्त राजाश्रित जयसिंह आणि लाड व वज्रसार नांवाचे दोघे सेवक यांनीहि स्वतःला जाळून घेतले.

**राजा गोपाळवर्मा**:—ई. स, ९०२ ते ९०४–त्याच्यामागून गोपाळवर्मा राजा झाला तो अल्पवयी असल्याने राणी सुगंधा त्याची पालक झाली.

तो राजा बाल असूनहि धार्मिक वृत्तीचा व सत्यसंध होता. दुर्वृत्त व हलकट राजवल्लभ व सेवक यांच्या सहवासांत राहात असूनहि त्याला वाईट संवयी लागल्या नाहींत. विधवा राजमाता सुगंधा राणीनें, भोगप्राप्तीमुळें बेफाम होऊन, मंत्री प्रभाकरदेव याच्याशीं प्रेमसंबंध जुळविला. ( २३० ) त्याच्या निर्भर संभोगानें खुष होऊन, तिनें त्याला आपलें प्रेम, सौभाग्य आणि बहुमान, हे एकाद्या मुकुटावर तीन जडाऊ चंद्रकोरी लावाव्या, त्याप्रमाणें अर्पण केले. त्याच्याकडे कोशाध्यक्षाचें काम होतें. त्यानें त्या अनुरागिणी राणीच्या सौभाग्य-संपत्तीबरोबरच तिचा खजीना लुटला व तो खर्च करून उद्भांडपुरांतील शाही राजानें बंड केलें होतें त्याचा पराभव केला आणि त्याचें राज्य शाही लल्लिय याचा पुत्र तोरमाण याला दिलें. त्याचें त्यानें कमलुक असें नवें नांव ठेवले ( अल्बिरूनीच्या हिंदी शाही घराण्यांतील राजांच्या यादींतील तिसरा राजा कमलू हाच तोरमाण होय. जामिऊल हिकायतमधील एका कथेत. 'हिंदुस्थानचा राय कमलू, हा खुरासानचा अमीर उम्रोलेस ( सं. ८७८ ते ९०१ ) याचा समकालीन होता,' असें लिहिलें आहे. हा काल वर दिलेल्या प्रभाकरदेवाच्या स्वारीशीं मिळतो. बंडखोर शाही हा बहुधां अल्बिरूनीच्या यादींतील दुसरा शाही राजा सामंद-सामंत-असावा. ) मंत्री प्रभाकरदेव तिकडून विजयोर्जित व स्वयंमन्य होत्साता राजधानीला परत आला. या विजयामुळे तो राजमातेचा जार, फारच गर्विष्ठ व उद्दाम झालेला होता. तो पदोपदी दुसऱ्या योग्य वीर लोकांना टाकून बोले व त्यांचा अवमान करी. कोणा हलकट यारानें एकाद्या वेश्येचें घर घेरलेलें असतांना, तेथें दुसऱ्या कोणाचा रिघाव होत नाहीं, तद्वत् त्यानें व्यापलेल्या त्या राजजननीच्या वाड्यांत दुसऱ्या कोणाचा प्रवेश होत नव्हता.

गोपाळवर्म्याला हळूं हळूं खरा प्रकार कळूं लागला. तेव्हां तो प्रभाकरदेव त्याच्या डोळ्यांत फारच खुपूं लागला. त्यानें खजीन्याची तपासणी चालविली. तेव्हां त्याच्यांत तूट पडलेली दिसून आली. ती शाहीवरील मोहिमेमुळें पडल्याचें त्याला सांगितलें गेलें.

पुढें कोशाध्यक्ष प्रभाकरदेवाला राजाची भीति वाटूं लागली, तेव्हां त्यानें आपला एक खार्खोद विद्यानिपुण आप्त रामदेव याच्याकडून राजावर अभिचार करविला. त्यामुळें शरीराचा दाह होऊन गोपाळवर्मा लौकरच मरण पावला. त्यानें दोनच वर्षें राज्य केलें (२४०) रामदेवाचा हा घोर अपराध उघडकीस आला तेव्हां राजदंडाच्या भीतीनें त्यानें आत्महत्या केली.

रस्त्यांतून पकडून आणलेल्या गोपाळवर्म्याच्या भावाला-संकटवर्म्याला-गादीवर बसविलें गेलें. पण तो दहा दिवसांनी मरण पावला.

याप्रमाणें शंकरवर्म्याच्या कुलाचा शेवट झाल्यावर, प्रजेच्या प्रार्थनेला मान देऊन सुगंधा राणी स्वतः राज्य करूं लागली. तिनें पुण्यप्राप्तीसाठी गोपाळपूर वसविलें आणि गोपाळकेशव विष्णूचें मंदिर व गोपाळमठ यांची स्थापना केली. तसेंच स्वतःच्या नांवानेंहि एक पुर वसविलें. (एका टीकेंत गोपाळपुराला गुरीपुर म्हटलें आहे. ते हल्लीं वितस्तेच्या डाव्या कांठावर अवंतिपुराखालीं गूरपूर नांवाचें खेडें आहे तेंच बहुधा असावें.) गोपाळवर्म्याची राणी श्रेष्ठ कुलांतली व अल्पवयस्कच होती. तिच्या नांवानें नंदामठ व नंदिकेशव यांची स्थापना केली गेली. तिची सवत जयलक्ष्मी गर्भवती होती. तिच्या संततीच्या द्वारें आपला वंश पुढें चालेल अशी सुगंधा राणीला उमेद होती. पण तें मूल उपजताच मेलें. तेव्हां तिला भारी दुःख झालें. पुढें तिनें आपल्या कुलांतीलच कोणाला तरी राज्य देण्याचा विचार केला त्यावेळीं तंत्रिपदाति मंडळानें राज्याधिकाऱ्यांच्याविरुद्ध निग्रहानुग्रह समर्थ प्रबळ कट केलेला होता. म्हणून राणीनें त्यांच्या व एकांगांच्या सहाय्यानें स्वतःच दोन वर्षें राज्य केलें.

**राणी सुगंधा**-ई. स. ९०४ ते ९०६:—

पण पुढें पुनः एकदा तिनें आपल्या बाजूचे सामंत, मंत्री, तंत्री, व एकांग वगैरेंना जमवून त्यांना कोणा योग्य पुरुषाला राज्याधिकार सोंपावा, असें म्हटलें. (२५०) (या तंत्रिमंडळाचा पुढें वारंवार उल्लेख आलेला आहे. ती एक भारी प्रबळ सैनिक लोकांची संस्था होती. पार्थ राजा गादीवर बसल्यापासून चक्रवर्म्यानें शंकरवर्धनाचा पराभव केला तोंपर्यंत ई. स. ९०६ ते ९३६ त्यांची मोठी भरभराट होती.

एकांगांविषयीं निश्चित माहिती मिळत नाहीं. ते राजाजवळ राहून त्याचें संरक्षण करीत. त्यांची ठरीव जमात नव्हती. मंत्री, तंत्री, सामंत, वगैरेंबरोबर त्यांचेंहि नांव येतें. त्यांनीं अनेक राजांचें रक्षण केल्याचें वर्णन पुढें आलेलें आहे.) (ग्वाल्हेर व इंदूर या संस्थानांत एकांडे या नांवाचे पुष्कळसे वरिष्ट दर्जाचे घोडेस्वार-शिलेदार-भरती असत. त्यांचा मान शिलेदाराहून जास्त व सरदार मानकऱ्यांहून कमी असे. त्यांच्यांतून सरदारहि केले जात. हाच शब्द पूर्वीच्या एकांगाचा कदाचित् निदर्शक असेल. लेले)

अवंतिवर्म्याचा वंश नष्ट झाला होता म्हणून सुगंधा राणी व सुखवर्मा यांचा पुत्र व शंकरवर्म्याचा नातु निर्जितवर्मा हा आप्तपणामुळे आपल्या मर्जीप्रमाणें वागेल, अशा समजुतीनें सुगंधा राणीनें त्यालाच गादीवर बसविण्याविषयीं म्हटलें. तेव्हां कांहीं मंत्र्यांनीं तिचा निषेध करीत म्हटलें कीं, "तो पंगु, सारी रात्र जागतो, विषयांत निमग्न असतो व दिवसभर निजतो तो राज्य कसें चालविणार?" राणीच्या विचाराविरुद्ध त्यांचें असें भाषण चाललें होतें तोंवर तंत्रिपदातींनीं निराळाच कट करून निर्जितवर्म्याचा दहा वर्षांचा पुत्र पार्थ याला नेऊन गादीवर बसविलें आणि असे करण्यांत कोशाध्यक्ष प्रभाकरदेव यानें त्यांचीं दुर्भाषणें करून मानखंडना केली होती तिचा त्यानीं जणों सूड उगावेला.

**पार्थ राजा**—ई. स. ९०६ ते ९२१—

अशा रीतीनें पदच्युत झाल्यावर सुगंधाराणी रडत रडत राजधानी सोडून हुष्कपुराला जाऊन राहिली. तिच्या नेत्रांतून टपकणाऱ्या अश्रु बिंदूचा जणों तिच्या गळ्यांत मुक्ताहार होत होता. ती बाहेर पडल्यावर, तिला आपल्या पक्षाचे वाटत असलेले बहुतेक पुराणे सेवक, प्रतिपक्षाला मिळालेले दिसून आले.

सुगंधाराणी परत येते–ई. स. ९१४–

लौकिक शक ३९८९–ई. स. ९१४–या वर्षीं एकांगांनीं एकत्र होऊन व कट करून सुगंधा राणीला हुष्कपुराहून परत आणिलें. त्यावेळीं चैत्र महिना संपत आला होता. ती येत असल्याचें ऐकून पार्थाच्या पक्षाचे सर्व तंत्री लोक खवळून लढाईला निघाले. (२६०) त्यांनीं व्यवस्थितपणें एक जुटीनें लढाई करून लौकिक शक ३९९०–ई. स. ९१४–च्या वैशाखांत राणीच्या तर्फेच्या फौजेचा पराभव केला. राणी पळून जात असतांना त्यानीं तिला पकडून निष्पालक विहारांत कैद केलें व पुढें तिला तेथेंच मारून टाकलें. भाग्य–दैव –नेहमीच विलक्षण व एकसारखें खालीं वर होत असतें.

यानंतर उत्कृष्ट व भाग्यशाली असलेल्या या काश्मीर मंडलांत प्रजेचें वित्त व जीवित, या दोन्हीचा सत्यानास करणारी अनर्थ परंपरा उद्भवली.

पार्थ राजा अल्पवयी म्हणून त्याचा जनकपिता–पंगू–निर्जितवर्मा हा त्याचा पालक झाला. तो व त्याचें मंत्री प्रजेला मनसोक्त पीडून जबरीनें द्रव्य उकळूं लागले. ग्रामकायस्थाप्रमाणें राजपुरुष हे तंत्र्यांना अधिकाधिक लाच देऊन एकमेकाचें उच्चाटण करूं लागले. जेथलि राजांनीं कान्यकुब्ज देशाच्या वगैरे प्रबल राजांना पादाक्रांत केलें होते तेथीलच हे राजे, पोटासाठीं तंत्र्यावर हुंडिका–हल्लींच्या हुंडया–देऊं लागले.

मंत्री मेरुवर्धन यानें पुराणाधिष्ठान येथें सुप्रसिद्ध मेरुवर्धनस्वामि विष्णूची स्थापना केली होती. त्याचे पुत्र (चक्रवर्मा, शूरवर्मा, शंभुवर्धन व शंकरवर्धन) यांनीं प्रजेवर जुलूम करून खूप खजीना जमा केला होता. त्यांनीं राज्यलोभानें भयंकर गुप्त कट चालविले होते. त्यांनी आपली राज्यतृष्णा गुप्त ठेवली होती. त्यांतलि वडील शंकरवर्धन यानें सुगंधादित्यांशीं गुप्त मसलत करून राजवाडयातून द्रव्य लुटण्याचा सपाटा चालविला होता.

याप्रमाणें प्रजा जुलूम सोशीत असतांनाच क्षतावर क्षार पडावा त्याप्रमाणें (खरीफ) पावसाळी भाताचें सारें पीक जलप्रलयानें पार बुडालें. ( २७० ) लौकिक शक ३९९२ –ई० स० ९१७–१८–या वर्षी भयंकर दुष्काळ पडला. एक खारी भाताला हजार दीनार पडूं लागले. त्यामुळें कोणाला भात घेतां येईना, सर्वांची उपासमार होऊं लागली आणि भयंकर प्राणहानि झाली. वितस्तेचें पात्र सडलेल्या व फुगलेल्या प्रेतांच्या राशींनी झांकून गेलें. तिकडे कोणाला नुसतें पाहवेना. सर्व देश पहावा तो जिकडे तिकडे अस्थी पसरलेला –स्मशानासारखा–दिसूं लागला.

जवळचें शिल्लक असलेलें धान्य अतिशय महाग दरानें विकून, मंत्री व तंत्री खूप गबर झाले. अशा स्थितींतल्याहि प्रजेला विकून, जो कोणी तंत्र्यावरील हुंड्यांचा पैसा जास्तीत जास्ती देईल व वसूल करील त्याला राजा मंत्री मुकरर करी ! भयंकर अरण्यांत अकस्मात झंझावात सुटून मुसळधार थंडगार पर्जन्य पडून व गारांची वृष्टि होऊन, सर्व लोक त्रस्त असतांना एकाद्या उत्तम ऊबदार स्थळी बसून स्वस्थ बेफिकिरपणे त्या लोकांकडे पाहात असावें, त्याप्रमाणे सारी प्रजा हवालदिल झालेली असतांना तो हताश–(निभागी)– पंगुराजा, राजवाड्यांत राहून, स्वतःच्या सुखी परिस्थितीची प्रशंसा करण्यांत गर्क होता. पहिला तुंजीन व चंद्रापीड वगैरे प्रजावत्सल राजांनी प्रेमानें पोसलेल्या प्रजेचा, त्या राक्षसी राजाच्या हातून क्षय होत चालला होता.

त्यावेळीं राजे तरी फार दिवस क्वचितच टिकत होते. पावसाळ्यांतील संथ पावसाच्या थेंबांनी उठणाऱ्या बुडबुड्यांसारखी त्यांची स्थिति होती. केव्हां पार्थ राजा पित्याचें उच्चाटण करून स्वतः प्रबल होई, तर लगेच त्याचा पिता तंत्रिचक्राच्या सहाय्यानें त्याला हटवून पुनः अधिकार बळकावी. ( २८० )

वळू घोडा पुष्कळशा पसूमाद्याना व्यवायानें खूष करीत–भरीत–असतो, तसा तरुण सुगंधादित्य पंगू राजाच्या राण्यांचा यथेच्छ उपभोग करीत असे. गाढ प्रेमालिंगनाच्या द्वारें तो बप्पट देवीला खूष करीत असे व तीहि त्याची द्रव्यलाभाची इच्छा, हवें तितकें धन देऊन पुरवीत होती. भगिनीच्या सौभाग्याच्या योगानें आपले अधिकार कायम करण्यासाठी मेरुवर्धनाच्या पुत्रांनीं आपली रूप लावण्यसंपन्न बहीण मृगावती, पंगु राजाची राणी करून दिली होती. ती हौसेनें आपण होऊन, सुगंधादित्याच्या गळीं पडून, त्याची कामित कामिनी बनली होती व त्याचा यथेच्छ उपभोग घेत होती. पंगूच्या या दोघी राण्यांच्या भोगेच्छा तो प्रत्यहि आळीपाळीनें पुरवीत असे. एकाद्या दरिद्री माणसाच्या दोघी बायका, त्याच्या एकाच ताटांत जेवतात, तशी या राण्यांची स्थिति झालेली होती. आपापल्या पुत्रांना राज्य मिळवून देण्याच्या स्पर्धेनें त्या सुगंधादित्य मंत्र्याला स्वशरीर-भोग व शिवाय बहुमोल बक्षिसें देण्यांत, त्यांची जशी चढाओढ लागली होती.

लौकिक शक ३९९७–ई० स० ९२१–वर्षी पौषांत तंत्रिमंडळानें पार्थाला काढून पंगूला पुनः राज्य दिलें. पुढील माघांत आपला बाल पुत्र चक्रवर्मा याला गादीवर बसवून

तो पुण्यहीन पंगुराजा मरण पावला लौ. शक ३९९८ ( ई० स० ९२३ ) तेव्हां पार्थाला गादी मिळवून देण्यासाठीं तंत्रिपदातींनी एकांग पक्षाशीं लढाई आरंभली.

बाल राजा चक्रवर्मा प्रथम माता बप्पट देवीच्या, नंतर दहा वर्षे आजी शिल्लिका यांच्या देखरेखीखाली होता. ( २९० ) बालपणी त्याचे दुर्गुण उघडकीस आले नाहीत. त्यांनीं त्याचें पालनपोषण केलें तें अंडयांतल्या कृष्णसर्पाच्या पोषणासारखें झाले. पण याबद्दलचा दोष त्यांनी घेतलेली काळजी व केलेली खटपट, यांच्याकडे कांहीं येत नाही. पुढें लौकिक शक ४००९–ई० स० ९३३–३४–या वर्षी तंत्र्यांनीं चक्रवर्म्याला काढून पंगु व मृगावती यांचा पुत्र शूरवर्मा याला गादीवर आणले. त्याचे मामा व मंत्री, यांना त्याच्याविषयीं मुळींच प्रेम वाटत नव्हतें. ते निवळ स्वार्थदृष्टी बनले होते. या उलाढालीसाठीं ठरलेलें धन त्यांनीं तंत्र्यांना दिलें नाहीं. यामुळें त्या शूरवर्मा राजाला पदच्युत व्हावें लागलें.

तो सज्जन होता पण त्याला तंत्र्यांना हवें तसें विपुल धन देतां येणें शक्य नव्हतें. वेश्यांना देखील दरिद्री असलेला पण नुसता सद्गुणी यजमान आवडत नाहीं. तद्वत् तो तंत्र्यांना पसंत पडेनासा झाला. त्यांनीं त्याला पदच्युत केलें आणि द्रव्यलाभाच्या लोभाने पुनः पैसेवाल्या व उदार पार्थाला गादीवर बसविलें.

या प्रार्थ राजाची सांबवती नांवाची प्रिय वेश्या होती. ती तंत्रिचक्राशीं वळण बांधण्यांत पटाईत, म्हणून प्रसिद्ध होती. तिनें सांबेश्वराची स्थापना करविली. ( एका टीकेंत तिनें ही स्थापना सांबोरण येथे केल्याचें म्हटले आहे. वितस्तेच्या उजव्या कांठावर सोंबूर नांवाचें एक खेडें आहे. तेंच हें सांबोरण असावें. पण तेथें प्रसिद्ध जुन्या मंदिराचे अवशेष नाहींत. )

चक्रवर्मा चांगलीशी संधि पहात राहिला होता. त्यानें जास्त द्रव्य देऊं केलें. तेव्हां लौकिक शक ४०११–ई० स० ९३५–च्या आषाढांत, त्याला पुनः राजा करण्यांत आले. मेरुवर्धनाच्या पुत्रांनी पूर्वीं खटपटी करून पार्थादिक राजांकडून निरनिराळ्या अधिकाराच्या जागा व संपत्ति मिळविली होती. तरी ते त्या राजांना पदच्युत करण्यांत सामिल झाले होते व त्या योगानेंहि त्यांनीं स्वहित साधन केलें होते. हें सर्व स्पष्ट झालें असून सुद्धा, त्या नष्टबुद्धि चक्रवर्म्यानें, राज्य मिळतांच त्यांच्या हातींच सर्व अधिकार सोंपविलें. (३००) त्यानें शंकरवर्धनाला अक्षपटलाचा–गणनाधिष्ठानाचा–अधिकार दिला व लबाड आणि धूर्त शंभुवर्धनाला गृहकृत्याचा—खासगीकडील—अधिकारी नेमलें. पुढें त्यांच वर्षी पौषांत धनाभावामुळें त्याला तंत्र्यांना दिलेल्या हुंडया पटवितां आल्या नाहींत. तेव्हां तो भिऊन पळून गेला. तो मडव राज्यांत असतांना शंकरवर्धनानें स्वतःसाठीं राज्यपद मिळविण्याच्या इच्छेनें तंत्र्यांशीं बोलणें लावण्याकरितां शंभुवर्धनाला त्यांच्याकडे पाठविलें. त्या वाटाघाटींत त्यानें अधिक द्रव्य देण्याचीं पुष्कळशीं अभिवचनें देऊन, भावाला फसविलें व तंत्र्यांमार्फत आपणालाच गादीवर बसवून घेतलें.

तीर्थामधील तिमी स्वजातीच्या तिमींना खातो. त्याला मौनी व ध्यानी बगळा, थागून गट्ट करतो. तापसाप्रमाणें राहणारा अरण्यवासी व्याध येऊन, त्या बगळ्याची शिकार करीत असतो. याप्रमाणे ठकाला महा ठक भेटून, एक दुसऱ्यावर वरचढपणा मिळविण्याचाच क्रम सा खा चालू आहे.

राजा चक्रवर्मा पदच्युत झाल्यावर तो एकदां रात्री श्रीढक्क येथें संग्राम नांवाच्या डामर नायकांच्या घरा पोंचला. त्याचा वेष व चर्या यांच्यावरून, संग्रामानें त्याला ओळखलें व हात जोडून प्रणाम केला आणि ताबडतोब स्वतःच्या आसनावर नेऊन बसविलें. राजानें त्याला आपली सर्व हकीकत कळवून, त्याचें सहाय्य मागितले. विपत्ति आल्यानें तो असा मृदु भाषण करीत आहे, असे मनांत आणून, थोडा विचार करून, संग्रामानें म्हटलें, ' महाराज, मजपुढें तंत्री तृणवत् तुच्छ आहेत. त्याची युद्धांत गणतीच काय ? आपल्या सेवेला मी तयार आहे, मजकडून त्यासाठीं होणार नाहीं, असें कृत्यच कोणचें ? पण वैभवप्राप्तीनंतर आपण आमच्यावरच उलटून आमचा नाश कराल. काम सरल्यावर राजे लोक उपकार विसरत असतात. (३१०) आपल्या अभिवृद्धीला साधन व आधार झालेल्याना ते पुढें, चढण्याला उपयोगी पडलेल्या पायऱ्यांप्रमाणें, कुऱ्हाड घेऊन छाटून टाकीत असतात. हातीं कोयता घेऊन, फांद्यांच्या आश्रयाने, झाडावर चढलेला मनुष्य, खालीं उतरतांना त्या फांद्या कापीत येत असतो. राजे लोकांचा अभ्युदय होण्यांत, ज्यांची बुद्धि, धैर्य, वगैरे गुणांच्या प्रभावानें उपकार व सहाय्य झालेले असते, त्यांच्या त्याच गुणांवरून, अभ्युदय पावल्यानंतर, राजे लोक त्यांच्याविषयीं साशंक होतात आणि त्या लोकांमुळेंच आपणावर आपत्ति आली, अशी कुशंका धरून, आपले खरे हितचिंतक, पूर्वापार वृद्धि पावत आलेले आणि आपत् प्रसंगीहि टिकलेले, अशा सेवकांना, मूर्खपणानें घालवून देतात. विपत्काळीं सहाय्य झालेल्यांचे उपकार संपत्काळीं राजे लोक विसरतात. त्यांच्याकडून सहाय्य करतांना चुकून घडलेले प्रमाद तेव्हढे ते मनात ठेवतात. श्रेष्ठपणा व उदय पावलेल्या राजांना, आपली दुखणी व क्षुधा तृषा, यांच्यामुळे झालेले कष्ट व शत्रूंची पीडा, वगैरे आपत्ति ज्यांनी पाहिली आहे, असे आपले मित्र व सेवक, यांची लाज व भीति वाटते. म्हणून ते त्यांचा नाश करवितात. चांगल्या राजांनाहि स्वतः पाहिलेल्या गोष्टींपेक्षा लबाड लोकांच्या कानगोष्टीचा अधिक विश्वास वाटतो.

मलिन मधुप मत्त मातंगाच्या मस्तकावर त्याच्या कानाशी गुणगुण करीत असतात, तशी त्यांची स्थिति होते. रात्रीं स्वैरिणीसारखी, दिवसां पिशुनाची प्रेरणा, सांन्निध्यामुळें प्रभूला नेहमी डवचत असते. तिला प्रत्येक ईर्षाळु व विवेकी माणसानें शक्य तेथवर जपलें पाहिजे.

महाराज, रात्रीची गुरु व उपदेशक पत्नी. ती एकांतांत जें शिक्षण देते, त्या संबंधांत सारखें सावध राहणें सर्वज्ञ माणसाशिवाय इतरांना साधत नाहीं. मोठ्या प्रयासानें कुशल मंत्र्यांनीं दिवसां राजे लोकांच्या मनांत ठसविलेले शिक्षण राजेलोक, नीलगौप्रमाणें, रात्रीं विसरतात. मुंग्या खाणारे शल्यक–आस्वल–मुंग्यांना उचलून तोंडांत टाकते, तसें स्निग्ध व दीर्घ

जिव्हेनें-भाषणानें-लोभवून, लबाड लोक त्यांना ग्रासून टाकतात. बगळा फार तर जवळच्यांना मारूं पाहतो, दूरच्यांना नव्हे. पण द्रोही राजाजवळच्या व दूरच्या दोघांचाहि नाश करूं शकतो. योग्य समय मिळेतोंवर अंगांत बोचलेले कांटे मुकाटयानें सोसावे लागतात. सिंह पडतें घेऊन व साप भेट घेत घेत मारतो. तसेंच वेताळ खदखदां हंसत आणि राजा प्रसन्न मुख ठेवूनहि घात करण्याला चुकत नाहीं. तेव्हां आपण आम्हांला शेंवटपर्यंत द्रोह करणार नाहीं, असे वचन द्याल तर, मी सैन्यासह पहाटेंच आपणाबरोबर निघण्याला तयार आहे. हें ऐकून राजा कांहींसा लाज्जित झाला. त्याची बुद्धि कांहीं वेळ कुंठित झाली. तरी हंसत मुखाने त्यानें त्याला म्हटलें, 'मजवर उपकार करण्याला प्रथम तयार होणाऱ्या तुमचे मी माझ्या प्राणापलीकडे रक्षण करीन.'

नंतर त्या उभयतांनीं, हातीं शस्त्रे घेऊन, ताज्या मारलेल्या मेंढ्याच्या, रक्त शिंपडलेल्या चामडयावर उभे राहून, कोशपानपूर्वक शपथा केल्या. (तीर्थोदक-कोश-पान पूर्वक, शपथ करण्याचा प्रकार फार दिवसांचा असून, त्याचा बऱ्याच स्मृतींमध्यें उल्लेख आहे. स्मृत्युक्त नऊ दिव्यांपैकींच तोहि एक आहे, असें **याज्ञवल्क्य, नारद,** व **विष्णू,** या स्मृतींत म्हटलें आहे. त्यांच्यांत कोणा एका देवतेचें तीर्थपान करून शपथा करतात. त्या मोडल्या तर नुकसान झाल्यावाचून रहात नाहीं, अशी समजूत आहे. येथेंही शपथ दोघांनींहि मेंढ्याच्या ताज्या व कच्च्या चामडयावर उभे राहून केल्याचें वर्णन आहे. हा प्रकार दुसऱ्या कोठें आढळत नाहीं.)

पुढें पुष्कळचसें प्रचंड डामर सैन्य बरोबर घेऊन **चक्रवर्मा** व **संग्राम डामर** यांनीं पहाटेंच निघून नगरावर चाल केली. त्यांना तोंड देण्याला **शंकरवर्धनाच्या** हाताखालचे तंत्रिपदाति दळ, चैत्र शुद्ध अष्टमीला पुढें वाढून आलें. **चक्रवर्म्याचें** शौर्य तोंवर योग्य संधि न मिळल्यानें प्रछन्न होतें. तो सर्वांना यःकाश्चित वाटत होता. पण त्यानें यावेळीं आपलें शौर्य खूप प्रगट केले. पद्मपुराजवळ घोर लढाई झाली. तिच्यांत **चक्रवर्म्यानें** घोडा पुढें घालून, सपाटयासरशीं **शंकरवर्धनाला** ठार मारलें. (३३०) तो सेनापति पडताच, वादळ झालेल्या सागरांतील नौकांप्रमाणे त्या तंत्रिपदाति सेनेची वाताहत झाली व ती शेंकडों वाटानीं पळाली. तिच्या मागें दवडून राजानें आपल्या स्वारांनीं त्यांना अडविलें व तरवारींनीं त्यांतील अगणित सैनिकांची शिरें उडविलीं. तो त्या रणभूमीवर संचार करीत असतांना, त्याच्या मस्तकावरील वीरपट्टाचे सोगे, त्याच्या मानेवर सिंहाच्या सटेसारखे शोभत होते. फार काय सांगावे, थोडयाच वेळात त्या रणामध्ये तंत्रिपक्षाचे पांच सहा हजार सैनिक ठार होऊन पडले. रणसंरंभानें थकलेल्या त्या तंत्र्यांना **चक्रवर्म्यानें** त्या रणभूमीवर गृध्र पक्ष्याच्या पंखांच्या छायेखालीं विश्रांति घेण्यास लावलें. वीर असा **शंकरवर्धन** त्या वीरशय्येला, बरोबरच्या थोर कुलीन व गुणी अनुयायांसह भारी शोभा देत होता. त्या तंत्रिपदातीचा उदय व अस्त, दोन्हीं, संहत स्थितीच झालेले पाहून, त्याचा कोणाला बरें हेवा वाटणार नाही. ? कृष्ण सर्पांना खेळणें करून पोटासाठीं भीक मागत फिरणाऱ्या गारोडयांप्रमाणें, त्या दुष्कर्मी तंत्र्यांनीं पूर्वी गुप्त वैराच्या विषाग्नीनें,

मान्य महावंशोत्पन्न महीपतीरूपी महा भुजंगांजवळ, कोणाचा प्रवेश होऊं नये, इतके त्यांना दुष्प्राप केलेले होते, ते सतत नव्या नव्या मागण्या करून सहज लीलेनें पोटासाठीं, त्यांना पोरकटपणाच्या वृत्तीला पात्र करून टाकलें होतें. या त्यांच्या दुष्ट तिरस्करणीय वर्तनाची चक्रवर्म्याला फारच चीड आली होती. म्हणून त्यानें गुप्त द्वेषरूपी प्रखर विषयुक्त महा कृष्णसर्पाप्रमाणें त्यांना पार जाळून टाकलें. ( ३४० )

दुसऱ्या दिवशीं शंभुवर्धन त्या पराभूत व उधळलेल्या तंत्रिपदार्तांची पुनः जमवाजमव करीत असतांना इकडे आपल्या विजयानें ऊर्जित झालेल्या चक्रवर्म्यानें, त्याला प्रेमानें येऊन मिळालेले सामंत, मंत्री एकांग व त्यांची सैन्यें, यांच्यासह नगरांत विजय प्रवेश केला.

चक्रवर्मा तिसऱ्यांदां राजपद पावतो.–स० ९३६–३७–त्यावेळीं त्याचे, क्षितिजापर्यंत पसरलेले सैनिक निरनिराळ्या मार्गांनी गर्जत चालले होते. घोडेस्वारांनीं वेष्टित असा चक्रवर्मा एका उमद्या घोड्यावर स्वार होता. तो घोडा सारखा नाचत होता. लगाम धरलेल्या डाव्या हाताने तो शिरस्त्राण वांकडे झालें म्हणजे, वर उचलीत होता. त्याच्या घामेजलेल्या उजव्या हातांत त्यानें नागवी तरवार घट्ट धरली होती. तिच्यांतून परावृत्त झालेल्या किरण जालांनीं त्याच्या कानांतील कुंडलें चमकत होतीं. त्यानें अंगांत दृढ व उंचवट कवच घातलें होतें तें त्याच्या मानेला रुतत होतें. त्याची चर्या त्रस्त व चेहेरा उग्र भासत होता व त्याच्या भिंवया वक्र व वर चढलेल्या होत्या. बाजारांतील दुकानांत लुटालूट करणाऱ्यांना तो तिरस्कारानें दटावीत व दरडावीत होता, आणि आपलें मस्तक व नेत्र यांच्या संज्ञांनीच, तो भयभयीत त्रस्त नागरिकांना उत्तेजन देत होता. त्याच्या रणवाद्यांच्या भीषण रवांत पौरजनांचे आशीर्वाद व जय शब्द दबून जात होते व त्या घोर आवाजानें कानटिळ्या बसत होत्या.

पुढें तो स्वस्थपणें राजसिंहासनावर आरूढ झाला असतांना शंभुवर्धनाला कोठूनसें पकडून बेड्या घालून भूभटानें त्याच्या समोर आणले. शंभूवर्धन शस्त्रपाताच्या भीतीमुळे डोळे मिटून उभा होता. त्याला त्या हत्यारी भूभटाने आपली स्वामिभक्ति दाखवीत, चांडाळाप्रमाणें राजासमोर ठार मारलें. त्याच्या वधापासूनच, धर्ममर्यादा सोडलेल्या सेवकांनीं विश्वासघाताने पितृतुल्य सन्माननीय राजपुरुषांचा वध करण्याची गर्ह्य चाल सुरू झाली. (३५०)

राज्य निष्कंटक केल्यावर चक्रवर्मा राजा हळूं हळूं गर्विष्ठ व उन्मत्त होऊन गर्ह्य कृत्यें करूं लागला. आपल्या पराक्रमाची पुनरुक्त प्रशंसा ऐकून संतुष्ट होऊन, तो धूर्त विट, व लबाड खुषमस्करे व भाट, यांच्या तावडींत सांपडला व ते सांगतील तसा वागूं लागला. या त्यांच्या स्तुतीला फसून तो स्वतःला देवतुल्य समजूं लागला आणि त्यानें अविचाराचें व मनसोक्त वर्तन चालविलें.

या सुमारास त्या नगरांत रंग नांवाचा एक प्रख्यात परदेशी डोंब जातीचा गवयी आला. तो हीन जातीय असल्यानें, राजानें त्याची बाह्य मंडपांत

भेट घेतली. त्याचें गाणें वगैरे ऐकण्यासाठीं तेथें मोठा दरबार भरला होता. द्वारपालांनी राजा, मंत्री, सामंत व इतर आलेल्या लोकांना यथोचित जागीं बसविलें. राजापुढे प्रशस्त व मोकळी जागा ठेविली होती. रंगाबरोबर हंसी व नागलता नांवाच्या दोन मुली होत्या. ती राजसभा अनेक दीपांच्या प्रभेनें व बसलेल्या दरबाऱ्यांच्या शिरोवेष्टनांवरलि भूषणांनीं प्रकाशित झाली होती. त्यामुळे ती फणामणींनीं उज्ज्वल अशा शेषशय्येसारखी दिसत होती. संध्याकाळचा मंद व शीतळ वायु, राजपत्न्या व इतर स्त्रिया, यांच्या केशपाशांतील हारांमध्यें खेळत राहिल्यानें सुगंधित झाला होता. नृत्यगीत समारंभ पाहण्यासाठीं बसलेल्या अंतःपुरांतलि हरिणाक्षि स्त्रियाची, मधुर मद्यसेवनानें सुवासित झालेली मुखकमलें गोल वातायनाच्या रांगांना उज्ज्वलित करीत होतीं, नंतर तो डोंब गवयी पुढे आला. त्याच्या बरोबरच्या हंसी व नागलता, या ललितलोचना मुलींनीं, आपल्या रूपलावण्याने त्या राजसभेला आश्चर्यचकित व चित्रार्पितसे करून टाकले. (३६०) त्या डोंबाबरोबरची मंडळी सुवर्णकटक, केयूर, हारादिक, अलंकारांनीं शोभिवंत झालेलीं होतीं. राजसभेंतील सर्व मंडळी त्याच्याकडें व विशेषतः त्या दोघीं मुलींकडे टकमक पहात राहिली. पुढें त्यांचें नृत्य व गायन सुरू झालें. तेव्हां त्यांचे विलासवलित व चलित आणि अपांग विभ्रम, यांनीं, त्या सभेंत जणों पुष्कळशीं फुलेंच उधळलीं जात होतीं. त्यांचें गायन त्या राजाच्या गुणवर्णनाने भरलेलें होतें. त्या राजसभेंत जय, जीव, या शब्दांचा एकसारखा कोलाहल उठत होता. एक विशेष राग गातांना त्या पंचम सुरांत ताना घेत होत्या आणि वंशवाद्यें त्यांची उत्कृष्ट साथ करीत होती. त्या दोघीहि एकरूपतेनें गात होत्या. त्यांचे ते मोहक हावभाव, शिरें हलविणे–मुरके मारणें–भ्रूकुटी वक्र करणे, नेत्रकटाक्ष फेंकणें, वगैरेंमुळें त्याचें नृत्य अधिकच खुलत होतें. त्यामुळे राजा तल्लीन झाला. त्याचे ताबूलचर्वण बंद पडलें व तो कुरंगाप्रमाणें सारखा डोलूं लागला. ही त्याची अवस्था पाहून त्यांनीं विशेषच विलासस्मित विभ्रमयुक्त मधुर व मोहक गायन सुरूं केलें. राजा त्यांच्याशीं जणो समरस झाला आणि तो व त्या जणों, केवळ स्वसंवेद्य दग्व्यापाराने अपसांत संलापच करूं लागले.

ही राजाची भान हरपलेली स्थिति ओळखून, एका मर्जीतल्या विटानें प्रसंगानुरूप प्रणयवृद्धि करीत, म्हटले, 'महाराज, या पोरीचें हें गीत यावेळीं कापराच्या पारींत पडलेले मैरेयच समजा. त्या गात असतांना त्यांच्या दंतपंक्तींमध्यें चंद्रमा प्रतिबिंबित होऊन, जणों त्यांचें चुंबनच घेतो आहे. (३७०) त्या करतलावर कपोल ठेवून गात असतांना, आपल्या नेत्रकटाक्षांनीं जणों वैमानिक देवांना मोहिनीच घालताहेत. आपण तिच्याविषयीच बोलतों आहो हें ताडूनच जणों, ती पहा कसा असूया गर्भकटाक्ष फेंकते आहे ! एक खालीं तोंड करून गात असतांना तिच्या कानांतलि कुंडलें हलत असलेलीं जणों ती विपरीत रतीचा उद्रेक केल्यासारखी शोभते आहे. ज्या कोणाच्या विरहानें अशा स्त्रिया, उत्सुक होत्सात्या, निर्जन स्थलीं गात असतील, त्याचेंच तारुण्य सफल झालें म्हणावयाचें. श्रोत्रांनीं ध्वनि व नेत्रांनीं त्यांचें रूप, गृहण करण्यांत दोष नसला तर तशाच अंगानें त्यांच्या कमनीय, अंगाला स्पर्श करण्यांतच कां पाप असावें ?'

स्वभावतः पूर्वीच भुलून गेलेल्या त्या राजाच्या चित्तांतील प्रेमांकुर या विटाच्या भाषणानें सिंचित झाला.

लब्धोदय वारिधर मेघ आणि धूर्त विट, हे क्षणभरांत सिंहांना व नृसिंहांना –भूपांना–विपथावर भलतीकडेच नेऊन सोडून, त्यांची वर्णसंकराची रुचि वाढवितात. सिंहांना घनगर्जित ऐकून त्वेष येतो. त्यांचे डोळे इंद्रधनुष्याच्या चंचल व नाना वर्ण तेजानें दिपून जातात व ती गर्जना दुसऱ्या कोणा सिंहाची आहे, असें मानून ते त्वरेनें धांवत जाऊन कडयावरून पडून नाश पावतात. त्याप्रमाणे कुलगोत्राचा विचार न करितां, मधुर भाषणांनीं राजाचें मन मोहून, धूर्त विट, त्याला बुडवितात—आपल्या मधूर भाषणांनी जड व मूर्ख अशा–नृपांना–कोणचीहि लबाडीची गोष्ट चांगली भासविण्याला समर्थ, असे नीच विट, या जगांत नसते तर, नरक ओस पडून, तेथें मृग चरूं लागते! राधेय कर्णाप्रमाणें उदार, पण असत्पात्रीं दान देणारा तो राजा, त्या डोंबाना पुष्कळसे हार, केयूर व कुंडले देऊन अंतर्गृहांत गेला. ( ३८० )

पुढें त्या रंग डोंबाला वाटलें कीं, 'हा राजा या दोघींपैकीं एका मुलीवर फारच फिदा झालेला आहे.' या विचाराने तो आनंदाने नाचत नाचत कांहीं पद्येंहि म्हणे.

राजाची मर्जी संपादन करण्यासाठीं त्यावेळीं कांहीं मूर्ख कवींनीं त्याच्या संबंधाने कांहीं प्रशस्त्याहि रचिल्या! अशा मूर्खांना धिःकार असो! वेश्यानुराग व हळदीचा रंग, हे नेहेमी इंद्रधनुष्याच्या रंगाप्रमाणें अस्थिर असतात. तोच प्रकार मनोहारि उपांग गीताच्या माधुर्याचा असतो.

त्या डोंब कन्यांना पाहून उत्पन्न झालेलें राजाचें प्रेम, त्यांच्या सतत सहवासामुळें वाढत गेलें. त्याला त्यांच्याशिवाय चैन पडेनासें झालें. तो निजला असतांना त्या जवळच गात बसत. हळूं हळूं त्यांनीं त्याला आपलें चुंबन घेण्याला लावलें व पुढें हट्टानें रति–सुखाभिज्ञहि केले. त्यांच्या विजातीय व नवीन समागमामुळें तो हतवीर्य झाला. पुढें त्याला याची लाज वाटेनाशी झाली. रतीनंतर त्याला खूप घाम सुटूं लागला. त्याच्या द्वारें त्यांच्या शरीरातील भाग्योष्मा जाऊन त्याला जडता आली.

त्या प्रेमांध राजानें हंसीला महाराणी केलें! महाराण्यांमध्येंहि तिच्यावर व्यजन व चामरें ढळूं लागलीं. ज्यांनीं तिचे उष्टें खाल्लें, ते चक्रवर्म्याचे व त्याच्या मागून झालेल्या राजांचेहि दरबारी बनले. डोंबांची चतुरपणानें खुशामत करणारे मंत्री, अभ्युदय पावूं लागले व त्यांना अक्षपटलादिकांत अधिकार पदे मिळत गेलीं. कांहीं मूर्ख श्वपाक मंत्री झाले नाहीत. पण त्यांच्यांत हुषार होते ते मंत्र्यांप्रमाणें राजकार्यें करूं लागले. (३९०)

मंत्री चोर, महाराणी महारीण आणि श्वपच राजवल्लभ, अशा त्या चक्रवर्मा राजाला आणखी लोकोत्तर असें, काय करावयाचें उरलें होतें!

ती श्वपाकी राणी स्नानानंतर आपल्या आर्तवानें अंकित झालेली वस्त्रें इनाम देई. तीं चढाओढीनें व डौलानें अंगावर घेऊन मंत्रि मंडळी राजसभेंत येत! ज्या थोड्यांनीं त्या वेळीं राजाची नाराजी पतकरूनहि तिचें उष्टें खाल्लें नाही, ते सोमपान करणाऱ्या ऋत्वि-

जांच्या योग्यतेचेच म्हणावयाचे! त्यावेळीं त्या काश्मीर मंडळांत प्रखर प्रभावयुक्त दैवतें रहातच नसावींत. नाही तर त्यांच्या मंदिरांत श्वपाकीचा प्रवेश कां होता!!

तिल द्वादशीला हंसा राणी रणस्वामीच्या दर्शनाला गेली. (तिलद्वादशीचा उत्सव माघ वद्य द्वादशीला असतो. त्या दिवशीं तिलाचें हवन करतात त्याचे वर्णन नीलमत पुराणांत ४८८ श्लोकांत दिलेलें आहे.) तेव्हां तिच्याबरोबर अभिमानी व मानधन असे डामर मात्र गेले नाहींत. डोंब लोक राजकुटुंबांतले असे झालेले असल्यामुळे त्यांचें हुकूम राजाच्या आज्ञांप्रमाणे अनुल्लंघ्य मानले जात होते.

राजानें रंग डोंबाला हेलू गांव इनाम दिला. त्याचे दानपत्र पट्टोपाध्याय लिहिना. तेव्हां रंगानें अक्षपटलांत पोंचून रागारागानें त्याला आपल्या ग्राम्य भाषेंत ताणीत म्हटलें, 'रांडलेका, रंगाला हेलू दिलें, असे कां नाही लिहून देत?' तेव्हां त्याच्या भ्रूभंगाला—दरडावण्याला—भिऊन त्याने तें कसें बसें लिहून दिलें. राजा दुर्वृत्त झाल्यावर कोणचा म्हणून अनन्वित प्रकार घडल्यावांचून राहील?

त्या पातकी राजानें विटाना मातंगीशीं गमन करण्याबद्दलचें प्रायश्चित्त विचारलें. (४००) तेव्हां त्यांनीं विकट हास्य करून कांहीं किरकोळ प्रायश्चित्तें सांगितली. हिमानें हिम शमतें, तसें एका पापाने दुसऱ्याचा परिहार होतो. म्हणून अगम्य गमनरूपी पापाचें क्षालन, त्यानें महिनाभर व्रती उपोषित राहिलेल्या विप्राच्या पवित्र पत्नीवर बलात्कार करून केले! अशा त्या नष्ट व पातकी राजाकडूनहि अग्रहार मिळविणारे व त्याच्याकडे भोजन करणारे, त्याच्याहून वरचढ नष्ट, पापी, द्विज त्यावेळी होते!

त्या पापी राजानेहि पाशुपत तापसांना राहण्यासाठीं, एका मठाचें काम चालू करविलें. तें पुढें त्याच्या एका राणीनें पूर्ते केले.

पुढें त्या श्वपाकी वल्लभानें डामरांनी पूर्वी केलेलें सहाय्य विसरून, त्यांच्यावर विश्वास ठेवून राहिलेल्या, कांहीं डामरांनीं, त्यांचा कांहीं अपराध नसता, कपटानें मारविलें. त्यावरून, त्याच्या विश्वासांतील कांही दस्यू डामरांनीच त्याला मारण्याचा विचार ठरविला व ते त्यासाठीं योग्य संधि पाहूं लागले. एकदां रात्रीं तो श्वपाकीच्या शयनमंदिराजवळच्या मलशुद्धीच्या जागेंत, निःशस्त्र बहिर्दिशेला गेलेला पाहून, त्यानीं त्याच्यावर चोंहोंकडून अनेक शस्त्रें मारलीं. तळ्याच्या कांठावर निजलेला एकाएकी आंत पडल्यानंतर ओरडूं लागतो, तसा तो झोपेने जड झालेले डोळे चोळीत व मोठमोठ्यानें आरडत, शस्त्र शोधीत निघाला. (४१०) त्याच्या अंगांतून रक्ताच्या चिळकांड्या उडत होत्या. त्याच्या मागें ते मारेकरी लागले होते. असा तो धांवतच त्या शयनमंदिरांत शिरला. त्याला शस्त्र सांपडेना. ती चांडाली त्याला आलिंगन देऊन ओरडूं रडूं लागली, तिच्या उन्नत कुच प्राताला तो बिलगलेला असतांनाच त्यांनीं त्याला ठार केलें. तो मरत पडला असताना त्याच्या राण्यांनीं तेथें पोंचून प्रोत्साहन दिल्यावरून, त्यांनीं त्याचे गुडघे दगडांनीं ठेंचून टाकले. याप्रमाणें लौकिक शक ४०१३–ई. स. ९३७–या वर्षी ज्येष्ठ शुद्ध अष्टमीच्या रात्रीं

तो श्वपाकींनीं उपभोग घेतलेला नष्ट राजा, शौचकूपांत, कुत्र्यासारखा चोरांकडून मारला गेला.

नंतर शर्वट वगैरे मूर्ख मंत्र्यांनीं पार्थाचा दुष्ट पुत्र उन्मत्त अवंतिवर्मा याला गादीवर बसविलें. त्या दुष्ट व दुराचारी श्वपाकी कामुकांला चोरांनीं रात्रीं मारल्यानंतर, लोकांच्या अत्यंतिक दुर्भाग्यानें, ही त्याच्याहूनहि अधम व क्रूर अशी ब्याद त्यांच्या डोक्यावर येऊन बसली. त्याच्या पापमय कथेच्या विटाळाची काव्यसरस्वतीलाहि भीति पडली. पण तिला एकाद्या बिचकलेल्या घोडीप्रमाणें मी कशी तरी चुचकारून पुढें चालवीत आहे.

जलापासून निघणारा और्वाग्नि त्यालाच खातो. तसें त्या क्रूर व नीच नृपकुणपानें आपलें पितृकूलच खाऊन टाकलें ! टक्करा मारून, नाकानें, खाद्यांनीं, कांखांनीं व डोक्याच्या कवचीवर आघात करून, सूर काढणारे, असे हलकट लोक, त्याचे प्रमुख मंत्री बनले होते. ते निर्लज्जपणानें भीक मागत फिरणाऱ्या हलकट गायकाप्रमाणें, त्याची खुषामत करीत. तेच पुढें मोठमोठ्या अधिकारपदाला पोंचावयाचे होते !

पण या सर्वांमध्यें भर सभेंत नागवा होऊन नाचणारा पर्वगुप्त, याच्यावर राजाची बहाल मर्जी होती. ( ४२० ) तंत्रीपदातीच्या गडबडीपासूनच तो राजांना यःकश्चित कीटकप्राय समजत होता. तो स्वतः राज्य मिळविण्याच्या खटपटींत होता. त्या संबंधांत त्यानें भूभट, शर्वट, छोज, कुमुद व अमृताकर, या प्रमुख मंत्रिपंचकाशीं गुप्तपणे सख्य करून कोशपानपूर्वक शपथा करविल्या होत्या.

संग्राम डामराच्या घरीं एक शूर व विख्यात असा रक्क नांवाचा ब्राह्मण राहात होता. त्याला गवाक्षसरामध्यें श्रीचे दर्शन झालेलें होतें. तो नुसता एक प्यादा असतांना, त्यानें एका लढाईंत उत्कृष्ट शौर्य दाखविलेलें राजाच्या पाहण्यात आलें होतें. तो शरीरानें धिप्पाड व ढेरपोट्या होता. त्याला राजानें मुख्य मंत्री केलें. ( नीलमतपुराणांतील १०३३ व्या श्लोकांत एका गवाक्षी देवीच्या तीर्थाचा उल्लेख आहे. पण त्याचा पक्का स्थलनिर्देश केलेला नाहीं. तेंच हें गवाक्षसर होते किंवा कसें हें सांगतां येत नाहीं. ) त्या रक्काने त्या गवाक्षसरांत दर्शन घडलेल्या देवीच्या स्वरूपाप्रमाणें मूर्ति घडवून तिचें रक्कजयादेवी या नांवानें एक मंदिर बांधविलें.

पर्वगुप्तानें आपणाला निष्कंटक झालेलें राज्य राहावें म्हणून, राजाकडून राजकुलांतील बहुतेक मंडळी ठार मारविली. राजाने आपला पिता पार्थ याचें सर्वस्व हरण केलें तेव्हां तो सहकुटुंब जयेंद्र विहारांत जाऊन राहिला. तेथें त्याला श्रमण लोक अन्नवस्त्र देत असत.

त्यांचे पुत्र व राजाचे बंधू शंकरवर्मा वगैरे अल्पवयी होते. त्यांना त्या राजानें कैदेंत टाकून, उपाशी मारलें. त्याच्या मनांतून बापाचा प्राण घेण्याचें होतें. या गोष्टीला अनुकूल असलेल्या मंत्र्यांना त्यानें पागोटीं बांधली व नको म्हणणाऱ्यांच्या पायांत बेड्या ठोकविल्या. ( ४३० )

पुढें त्याच्या आज्ञेनें मंत्री, सामंत, तंत्री, कायस्थ, वगैरेंनीं रात्रीं जाऊन,

पार्थ रहात असलेल्या विहाराला वेढा दिला. त्यावेळीं पार्थाची पत्नी क्षीण, म्लान- वदन व जीर्ण वस्त्रे नेसलेली, त्यांना दारावर आडवी आली. वासरें भिऊन गायींना बिलगतात तशी, तिचीं मुलें रडत ओरडत तिला बिलगलीं होतीं. कुमुद वगैरे राजवल्लभांनीं त्यांना ढकलून दिलें व तिला मारलें आणि गोठ्यांतून मेलेलें ढोर ओढतात तसें, पार्थाचे केंस धरून त्याला बाहेर ओढून आणलें. तो खालीं पडला. खडे रुतून त्याचे अंग ओरखडलें. तो भुकेनें कासावीस झालेला, नागवा उघडा व अशस्त्र, असा मोठ्यानें आक्रोश करीत असतांना, त्याला त्या चांडालांनी ठार मारलें. बापाला याप्रमाणें मारल्याचें ऐकून राजाला कौतुक वाटलें! व तो सकाळीं सचिवांसह त्याला पाहण्याला गेला! त्याला पाहून राजाला मोठा हर्ष झाला. त्यावेळीं त्याच्या मर्जीतली मंडळी, त्याला, 'मीं हा अमुक जागीं वार केला, असें सांगत, ऐटींने आपल्या पराक्रमाचें वर्णन करीत होते! या सुमारास, पर्व- गुप्तावर राजांची कांहीशी नाराजी होती ती जाऊन, तो पुनः मर्जीत आलेला होता. तोहि राजा- बरोबर आलेला होता. त्यानें राजाला खुष करण्यासाठीं आपला पुत्र देवदत्त याला उत्तेजन दिलें. त्यावरून त्याने पार्थाच्या प्रेतांत आपली सुरी भोंसकली. हें पाहून राजेसाहेब खुष झाले व पुष्कळ वेळ हंसले ! !

चक्रवर्मा राजा मारला गेल्यावर, डामरांनी सारा देश लुटून फस्त केला. शिवाय राजानें दुष्ट व लबाड कायस्थांना कामावर नेमून, त्यांच्याकडून देशावर अधिकच धाड आणली होती. दुष्ट सोबत्यांच्या प्रेरणेने त्या राजानें शस्त्राभ्यास चालविला. त्याच्यांत तो नागव्या उघड्या स्त्रियांच्या स्तनांच्या मध्यभागीं जंबि- यानें निशाण मारी! (४४०) गर्भाची स्थिति पाहण्यासाठीं तो गर्भिणींचे अवयव व पोटें चिरवून पाही. कामकरी मजूरांची सहनशक्ति आजमावण्यासाठी तो त्यांचे अवयव तोडवी —फाडवीत—असे. दानें मिळविण्याच्या अत्युत्कट लोभामुळें किंवा त्याचें न ऐकलें तर तो वध करील, या भीतीमुळे त्या निर्घृण व क्रूर नृपाधमाकडूनहि, अग्रहार घेणारे ब्रह्मबंधू, त्याकाळीं त्याला मिळत होते!

पुढें त्याच्या क्रूर पापकर्माचें फलच जणों असा त्याला भयंकर क्षयरोग लागला व त्याला भारी क्लेश होऊं लागले. हें पाहून त्याच्या प्रजेलाच नव्हे तर त्याच्या चौदा राण्यां- नाहि संतोष वाटला.

तो नरकांत जाण्याच्या तयारींत असतांना अंतःपुरांतील दासींनीं कोठूनसा आणून, राजाच्याच पोटचा असें खोटेंच सांगितलेल्या शूरवर्मा नांवाच्या मुलाला, त्या पापी राजाने गादीवर बसवून त्याला सामंत, सचिव, एकांग व तंत्री, यांच्या पदरांत घातलें. पुढें हा पितृघाती पार्थिवाधम प्रजेच्या पुण्याईनें लौकिक शक ४०१५—ई० स० ९३९—या वर्षी मरण पावला. तो कंपनाधिपति कमलवर्धन याला फार भीत होता. (कंपन—कंपना म्हणजे सैन्य —सेना—त्यांचा पति अधिपति—कंपनाधिपति—सेनापति,) त्या उभयतांचें अपसांत भारी वैमनस्य पडलें होतें. त्यावेळीं कमलवर्धन मडव राज्यांत राहून डामरांचें उत्पाटन करीत होता. या कामाला तो एकटाच समर्थ असल्याचें सिद्ध झालें होतें.

बालराजा शूरवर्मा आषाढ शुद्ध सप्तमीला–रथ सप्तमीला–जयस्वामि नांवाच्या सूर्याच्या मंदिरांत देवदर्शनाला जाण्यासाठीं निघाला. त्यावेळीं त्याची नूतन राजलक्ष्मी कृपाणरूपी गलित वेणी व छत्रचामर रूपी सुहास्य, यांनीं फार चांगली शोभत होती. ( ४५० ) तितक्यात धांवत आलेल्या दूतांनीं कळविल्यावरून कमलवर्धन काहीं सामंतांसह, जलदीनें नगराजवळ येऊन पोंचला. तो थकला भागला होता तरी तसाच राजधानीत शिरूं लागला तेव्हां एकांग, तंत्री, सामंत व स्यालहारक–शिलेदार–त्याला आडवे आले. वाटेंत जागजागी त्याला डामरांशीं लढावें लागलें होतें. त्याचे लोकहि थकले होते, तरी त्याने आपल्या शौर्याच्या सहाय्यानें प्रतिपक्षाचा पराभव केला. थोडयाशा स्वारानिशी त्यानें शत्रूंचे हजार स्वार उधळून लावले आणि काही अटकाव न होतां तो राजवाडयांत पोंचला. हें ऐकतांच त्या बालराजाबरोबरचे लोक त्याला सोडून पळून गेले. तेव्हां त्याची आई त्याला घेऊन कोठेंशी निघून गेली.

मूर्ख मंत्र्याच्या मसलतीनें, किंवा पूर्व जन्मींच्या कर्मदशेनें मोहित होऊन, कमलवर्धन वेडेपणानें तत्काल सिंहासनारूढ झाला नाहीं. तो राजकारणपटु नव्हता. तो आपल्या घरीं गेला. दुसऱ्या दिवशीं त्यानें स्वत.च राजा निवडला जाण्याच्या उमेदीने, सर्व द्विजमंडळी जमवून त्यांना, कोणा प्रौढ व प्रबल स्वदेशी सरदाराला राजा निवडण्याला सांगितलें. स्वतःच्या कर्तृत्वावरून ते आपणालाच राजा निवडतील, असें त्याला वाटलें होतें.

एकाद्याने दुर्लभ, आतुर आणि प्रमत्त सुंदरी, एकांतात हाती आलेली न उपभोगतां जाऊं द्यावी व दुसऱ्या दिवशीं तिच्याकडे दूती पाठवून तिची याचना करावी–अथवा जबरदस्तीने हाती आणलेली राजसत्ता तात्पुरती सोडावी व दुसऱ्या दिवशी अन्य मार्गानें ती मिळविण्याची खटपट करावी ! त्यातलाच हा प्रकार होता. याच्यापेक्षां अधिक शोचनीय तें काय असणार ? ( ४६० )

याप्रमाणें उच्चलाच्या राजघराण्याचा शेंवट लागल्यानंतर, ते जाडी भरडी कांबळी पांघरलेले, केंस व स्मश्रु धुरकटलेले, द्विजरूपी शृंगहीन नंदीबैल, गोकुळांत ( त्या नांवाच्या विवक्षित प्रशस्त मंदिरांत ) एकत्र जमून, कोणाला राजा करावे, याचा विचार करूं लागले. ( उत्पल नांवाच्या कल्यपाल–कलालाने–आपला भाचा चिप्पट जयापीड याला जादू करून मारवून आपला पुतण्या अजितापीड याला गादीवर बसविलें. तेव्हांपासून या कल्यपाल घराण्याचें राज्य सुरू झालें. तें उन्मत्त अवंतिवर्म्यापर्यंत चालून नष्ट झालें. )

ते अपसांत वादविवाद करीत असतांना, कोणावरहि अभिषेक जल पडण्याचा योग येण्याऐवजी, ते बोलतांना उडालेल्या थुंकीचा मात्र अभिषेक त्यांच्या दाढ्यांवर होत होता ! त्यांना आपलें स्मरण देण्यासाठीं तो साधा भोळा कमलवर्धन त्यांच्या सभेंत गेला असतांना, त्यांनीं त्याला विटाचे रोडे मारून, तेथून हांकून लावलें.

ही त्याची वाटाघाट पांच सहा दिवस चालली होती. त्यावेळीं ठिकठिकाणच्या परिषदांच्या झुंडीच्या झुंडी तेथें गोळा झाल्या. त्यांच्याबरोबर छत्रें, चामरें, पताका,

यांची गर्दी होती आणि काहला, कांस्यताल, घंटा वगैरे वाद्यांचा भयंकर कोलाहाल चाललेला होता. त्यांनीं वाहनावर बसवून आपापलीं देवपीठें बरोबर आणलीं होतीं. त्यावेळीं, आपली बायको बंधकी होऊन, दुसऱ्याशीं लागूं होत असलेलीं दृष्टीस पडावी, तशी, हातीं आलेल्या राज्यलक्ष्मीची स्थिति झालेली पहात, कमलवर्धनाला दुःखी कष्टी होऊन स्वस्थ बसावें लागलें होतें.

अवंतिवर्म्याच्या राणीनेंहि, आपल्या म्हणविलेल्या पुत्राला राज्य मिळावें म्हणून, बोलणें करण्याकरितां, त्या जणों, प्रायोपवेशन करून बसलेल्या द्विज मंडळीकडे वकील धाडले होते.

पिशाचपुर येथील वरिदेव नांवाच्या गृहस्थाला कामदेव नांवाचा पुत्र होता. तो साक्षर झाल्यावर चांगला स्नान संध्याशीळ व सद्वर्तनी म्हणून प्रसिद्धि पावला होता. तो मेरुवर्धनाच्या मुलांचा पंतोजी झाला व पुढें एक गंजाधिकारी झाला होता. मेरुवर्धनाचा पुत्र प्रभाकरदेव, हा शंकरवर्मा राजाच्या पदरी हळू हळू राजाधिकारी होऊन, सुगंधा राणीचा गुप्त जार बनलेला होता. कामदेवाचा पुत्र यशस्कर हा मोठा विद्वान व हुषार होता. पण लक्ष्मी व सरस्वति यांच्यामधील नेहमीचा द्वेष, किंवा देशांतील गड बडीची स्थिति, यांमुळे, तो फार गरीबीला पोंचला होता म्हणून, तो आपला मित्र फल्गुण याच्यासह देशांतराला गेला होता. पुढें कांहीं काळानें, या सुमारास, शुभस्वप्नें व पीठदेवतेचे आशीर्वाद यामुळे उत्तेजन पावून, तो आनंदानें व मोठ्या उमेदीनें नुकतांच आपल्या जन्मभूमीला परत आला होता. ( पीठदेवी–दुर्गेनें दक्षयज्ञांत प्राण दिल्यावर तिच्या देहाचे ५२ अंश ज्या ज्या जागीं पडले, त्याला तांत्रिक मार्गांत पीठस्थान म्हणतात. त्यांपैकींच हें एकादें स्थान असावें. )

चक्रवर्म्याच्या राणीचे वकील त्या द्विजसंघाकडे जात असतांना, त्यांची व यशस्कराची गांठ पडली. तो विद्वान् वक्ता व चतुर असल्याने आपल्याला उपयोगी पडेल, असें समजून, त्या वकीलांनीं त्याला बरोबर घेतलें. त्याच्या सुदैवानें त्याला पाहतांच सर्व पारिषद्य द्विजांनी ' हाच राजा झाला पाहिजे, ' असें एकदम म्हटलें व सर्वांनी एकमतानें त्याला राजा निवडलें. याप्रमाणें त्या यशस्करला अवचित राज्य प्राप्त झालें.

तो पृथ्वीच्या राज्यकारभाराची धुरा धारण करण्याला समर्थ होता. नंतर मेघांनीं पर्वत शिखरावर जलवृष्टि करावी तद्वत्, त्या द्विजांनीं तत्काल त्याच्या मस्तकावर अभिषेक जलाची वृष्टि केली.

जोरानें परस्पर घर्षण पावून उत्पन्न झालेल्या वणव्यानें वेणुवन दग्ध होतें आणि जोराची पर्जन्यवृष्टि होऊन त्याचीं पाळें मूळें कोणीकडे तरी वाहून जातात. झंझावातानें कोठून तरी उन्मूलन होऊन आलेल्या वृक्षाला एकाद्या पर्वताच्या दरींत पुनः जमविण्याकरितां विधाता काय काय म्हणून योजना करीत नाही!

दुष्ट व लबाड भृत्यांच्या प्रेरणेनें पार्थाचा पुत्र नष्ट चक्रवर्मा यानें आपल्या वंशाचा

उच्छेद करविला नसता आणि त्याच्या पुत्राचें कमलवर्धनाच्या हातून उच्चाटन झालें नसतें तर, मोठ्याशा कुलांत न उत्पन्न झालेला, दरिद्री, पृथ्वीच्या पाठीवर भटकणारा, अशा यशस्कराला राज्यलक्ष्मीची प्राप्ति कशाला झाली असती? (४८०) पूर्वी ज्याला लोकांनीं पादचारी व एकटाच भटकत असलेला पाहिला होता, तो यशस्कर साम्राज्यपद पावून राजमार्गातून थाटानें मिरवत राजवाड्यांत जात असतांना, त्याची ती प्रेक्षणीय स्वारी पाहण्यासाठीं जमलेल्या नारींच्या नेत्रकटाक्षांनीं व नेत्र मुखकमलांनीं, सारा राजमार्ग प्रफुल्लित झालेला होता. जमलेल्या जनसमूहांनीं दिलेल्या आशीर्वाद व जय शब्दांचा ध्वनि कानीं पडतांच तो अहंभाव विसरून, प्रेमानें व आदरानें आपले नेत्र मुरडीत असे. त्याच्यावरून, त्यानें प्रजेचें उत्तम रीतीनें संगोपन करण्याचा निश्चय केला आहे, असें चतुर लोक मनांत समजत होते. त्याच्यावर धरलेलें श्वेत छत्र, सूर्यप्रकाशामुळें चमकत होतें, तें रुप्याच्या जिल्हईदार आरतीच्या पात्राप्रमाणें त्याच्या भोंवतीं आरतीची शोभा देत होतें. अशा रीतीनें त्या भूलोकींच्या चंद्रानें नागरिक नरनारींच्या जय शब्दानीं व मंगल आशीर्वादांनीं निनादित झालेल्या राजवाड्यांत प्रवेश केला. ( ४८३ )

काश्मीरक महामात्य चंपक प्रभूचा पुत्र कल्हण यानें रचलेल्या राजतरंगिणीचा हा पांचवा तरंग समाप्त झाला.

( याच्यापुढें कांहीं प्रतींमध्यें आणखी एक श्लोक आहे त्याच्यांत, 'त्र्याऐंशी वर्षे व चार महिने, इतक्या काळांत, कलालाचे आठ वंशज, एक रस्त्यांतून धरून आणलेला—संकटवर्मा—एक स्त्री—सुगंधा राणी—व एक मंत्री शंभुवर्धन इतक्यांनीं राज्य केलें,' असें लिहिलें आहे. यांतील वर्षें बरोबर आहेत. पण अवंतिवर्मा गादीवर बसल्याची मिति दिलेली नसल्यानें महिन्याविषयीं पक्कें सांगतां येत नाहीं. )

---

# तरंग साहावा.



'वात व पर्ण अशन करीत कडकडीत तपाचरण केलें तर, त्याच्या प्रभावानेंच श्री शिवाशीं समागम प्राप्त होतो, असें नाहीं. कारण तसें अशन करणारे हे सर्प व नंदीहि आहेत. त्यांना श्री शिवाच्या देहाबाहेरच राहावें लागतें. अपर्णेला त्याच्या अर्ध्या शरीरांत स्थान मिळालें तें केवळ त्यांच्या प्रेमामुळें, अशी सुरवधूंनीं केलेली कर्णमधुर स्तुति व प्रशंसा ऐकून, आनंदित झालेली व उग्र तपश्चर्या करीत असतांना जिनें पर्णसुद्धां खाल्लें नाहीं, अशी अपर्णादेवी आपलें रक्षण करो.

**राजा यशस्करः—( सं. ९३९ ते ९४८. )**

राजा यशस्कर राजवाड्याच्या चौकांतून आंत चालला तेव्हां, त्यानें मागोमाग येणाऱ्या द्विजमंडळाला तेथेंच थांबविण्याला द्वारपालांना आज्ञा केली. कारण तो स्वतः अलंघनीय

राहूं इच्छित होता. त्याप्रमाणे द्वारपाल करूं लागलें तेव्हां, त्यानें त्या द्विजांना हात जोडीत म्हटले, ' आपण मला राज्य दिले आहे. आपण मला देवाताप्रमाणें पूज्य आहां. पण मला राज्यपद दिल्याच्या अभिमानानें आपण उद्दाम होऊं नये. आपण कोणी मजकडे कामाशिवाय येऊं नये. ' हे ऐकून, तो सहज मिळण्या-पोंचण्या-सारखा नाहीं, अशी त्या सर्व लोकाची खात्री झाली आणि त्याच्या पूर्व सहवासामुळे त्यांना वाटत असलेलें बरोबरीचें नातें त्यांना विसरावे लागले.

चांगला कवि पूर्वीच्या चांगल्या कवींच्या पद्धतीचे पुनरुज्जीवन करतो, तसें त्यानें स्वतःच्या प्रतिभेने पूर्वीच्या राजांच्या वेळच्या चांगल्या चांगल्या राज्यव्यवस्थेच्या, बंद पडलेल्या गोष्टी पुनः चालू केल्या. त्याच्या अमलात चोरांचे नाव नाहींसे झालें. रात्री देखील बाजारांतील सर्व दुकानाची व वेशीची दारें उघडी राहूं लागली. मार्गस्थांना सारे मार्ग निर्भय झाले. तो सर्व कामावर स्वतः नजर ठेवी. यामुळे पूर्वी सर्वच लुटीत असणाऱ्या कामगारांना, कृषिकर्मावर लक्ष ठेवण्यापलीकडे कांहीं काम उरलें नाहीं. रयत केवळ कृषिकर्म तत्पर झाली तिला राजस्थानें पाहण्याची आवश्यकता उरली नाहीं. विप्र केवळ स्वाध्यायनिरत झाले, आणि त्यांनी शस्त्रधारण सोडलें विप्र गुरूंनी सामगायन करतांना मदिरापान करणे सोडले. तपस्वी लोकांनी पुत्र, दारा, गृह, पशु, धन, धान्य संपादनाचा त्याग केला. ( १० ) मूर्ख गुरूंनी मत्स्य अपूप इत्यादिकानीं यज्ञ करणें आणि स्वतःच प्रक्षिप्त श्लोक रचून, परंपरागत साम्प्रदायाचें संशोधन करणे सोडून दिले भोंदू गुरूंकडून दीक्षा घेतलेल्या गृहिणी स्त्रिया, स्वत देवता बनून, मस्तक हलवीत, आपल्या भर्त्यांच्या उज्ज्वल शीलाचा निषेध करीनाशा झाल्या. ( हे वर्णन कांही विशिष्ट तांत्रिक प्रकाराला अनुलक्षून आहे. ) त्यावेळी ज्योतिषि, वैद्य, मंत्री, गुरु, अमात्य पुरोहित, वकील, न्यायाधीश, कारकून यांच्यापैकीं कोणीहि अपंडित किंवा निरक्षर नव्हता.

एकदां एकजण राजद्वारावर प्रायोपवेशन करून उपाशी बसला असल्याचे, राजाला प्रायोपवेशाधिकाऱ्याने कळविले. तेव्हा त्याला बोलावून आणवून राजाने विचारपूस करता, त्याने म्हटले कीं, ' महाराज, मी मूळचा येथलाच राहणारा चांगला धनाढ्य सावकार होतों. पण पुढें दुर्दैवाचा फेरा येऊन दरिद्री झालों. मला भारी कर्ज झाले. सावकारांनी तगादा केला तेव्हां कर्ज कसें तरी फेडून देशान्तराला जाण्याचे ठरविले व सर्वस्व विकून टाकलें. माझा मोठा वाडा मी एका सावकाराला विकला पण पत्नीच्या पोटापाण्यासाठीं मी त्या लगतची पायऱ्याची विहीर राखून ठेवली. तिच्या शीतळ जागेत बसून, उन्हाळ्यांत फुलें व विड्याचीं पानें विकणाऱ्यांकडून येणाऱ्या भाड्यावर त्या बिचारीचा निर्वाह होण्याची मी व्यवस्था केली होती. नंतर मी परदेशीं गेलो. तिकडेच वीस वर्षे भटकत होतो. पुढे थोडेंसे द्रव्य मिळवून मी नुकतांच या माझ्या जन्मभूमीला परत आलों. ( २० ) मी पत्नीचा तपास केला तेव्हां ती बिचारी साध्वी, विवर्ण व कृश झालेली, कोणाकडे मोल मजूरी करून, कशीबशी दिवस काढीत असलेली मला आढळली. तेव्हां मला फार वाईट वाटले. मी तिला विचारलें की, ' मीं तुझ्या पोटापाण्याची व्यवस्था करून गेलो

असतांना तुझी अशी अवस्था का ? ' त्यावर ती म्हणाली, ' आपण मला पायऱ्याची विहीर देऊन गेल्यावर मी तिकडे गेलें. तेव्हां त्या सावकारानें मला तेथून कांठ्या मारून हाकून दिलें. अशा स्थितींत मला उदरनिर्वाहाचे यावांचून दुसरें काय साधन उरलें ? '

' हें ऐकून मी शोकसागरांत बुडून गेलों. मला भारी संताप आला. मी फिर्याद केली. पण स्थेयानीं–न्यायाधीश व पंच यांनीं–जागजागी मजविरुद्ध व त्या प्रतिपक्षी सावकारा-सारखाच निवाडा केला. मी साधासीधा माणूस. मला न्यायाची बारकाई कळत नाही. तरीपण मी पायऱ्याची विहीर खास विकली नाहीं. हे मी आपले प्राण पणास लावून सांगतो. माझी ती मिळकत व्यर्थ नाहीशी झाली आहे. माझा न्याय व्हावा, नाहीतर मी प्रायोपवेशन करून आपल्या दारीं प्राण देणार. '

हे त्याचें म्हणणे ऐकून राजा स्वतः धर्मासनावर बसला. त्याने ते सर्व न्यायाधीश व पंच जमा केले आणि यातील खरी हकीकत काढण्याचा विचार चालविला. त्या लोकांनीं त्याला कळविलें कीं, 'आम्ही पुर्ता विचार करूनच त्याच्याविरुद्ध निकाल केला आहे. हा न्यायाची पर्वा न करतां, लबाडीनें, आम्ही केलेल्या न्यायाला दूषण देतो आहे, सबब कागद खोटा म्हणणाऱ्याला दंड झाला पाहिजे. '

यावर राजानें मूळचे खरेदीपत्र आणविलें. त्यांच्यांत ' सोपान कूपासहित, वाडा विकला', असें लिहिलेले होतें, ( ३० ) तें राजानें वाचलें. त्यावरून त्या लोकांनीं, ' आपण निकाल केलेला योग्य आहे, ' असें म्हटलें. तरी राजाचें मन त्याला, त्या फिर्यादीचें म्हणणें खरें आहे असें सांगत होतें. म्हणून त्याने थोडा वेळ विचार केला. नंतर तो त्या मंडळी-बरोबर पुष्कळ वेळ निरनिराळ्या विषयावर बोलत, त्याना भुलवीत राहिला. त्यांतच त्याने सहज त्यांच्यांतील रत्ने पाहण्याच्या मिषानें, त्या सर्वांकडून त्यांच्या आंगठ्या मागून घेतल्या. तो सावकारहि तेथें आलेला होता. त्याचीहि आंगठी त्यानें मागून घेतली. कांहीं वेळाने तो पादप्रक्षालनासाठी म्हणून बाहेर गेला व त्यानें त्या सावकाराची आंगठी खुणे-साठीं देऊन, एका सेवकाला त्या सावकाराच्या गणनाध्यक्षाकडे पाठविलें आणि त्याच्या हातीं, ज्या वर्षी तें खरेदीदत्र झालें होते त्या सालची कीर्द मागविली. ' ती शेटजींना आज हवी आहे, ' असे त्या सेवकानें सांगितलें. त्यावर अंगठी घेऊन, गणनाध्यक्षाने ती किर्द त्याच्या स्वाधीन केली, तिच्यांत खरेदीपत्र झालेल्या दिवशीच्या खर्चात, ते खरेदी-पत्र लिहिणाऱ्या सरकारी अधिकरण लेखकाच्या नांवें एक हजाराची रक्कम खर्ची पडली होती. त्याला ठराविक थोडीशी रकम देण्याऐवजीं, इतकी भारी रक्कम दिली गेलेली पाहून, राजाची खात्री झाली कीं, सावकारानें त्या लेखकाकडून खरेदीपत्रांत लबाडीनें, रकाराच्या –रहिता–ऐवजी सकार–सहित–करविला असला पाहिजे.ही गोष्ट त्याने न्यायसभेला दाख-विली. त्यानें त्या लेखकाला बोलावून आणविलें आणि त्याला अभय देऊन त्याच्याकडून या विषयींची खात्री करविली. ( ४० ) तेव्हा त्या न्यायसभेच्या विनंतीप्रमाणें राजानें त्या लबाड सावकाराचा वाडा व मालमत्ता त्या वादीला देववून त्या सावकाराला हद्द-पार केलें.

पुढें एकदां तो सायंकाळचें आन्हिक उरकून भोजनास बसणार, इतक्यात द्वारपालानें, अवेळ होती तरी, भीत भीत, वर्दी दिली की, ' एक ब्राह्मण अर्जदार आला आहे. त्याला स्वारी नुकतीच काम आटपून आंत गेली आहे. उद्यां फुरसतीनें अर्ज करण्याला सापडेल, असें सांगितलें गेलें पण ते न ऐकतां तो प्राणत्याग करीन म्हणतो आहे. '

हें ऐकून राजानें भोजन थोपवून, त्या ब्राह्मणाला बोलावून घेतलें व त्याला त्याची हकीकत विचारली त्याला त्यानें मोठ्या दुःखानें व दीनपणें म्हटलें, ' मी परदेशीं फिरत राहून, मोठ्या परिश्रमानें शंभर सुवर्ण रूपक, शिल्लक टाकले व ते घेऊन इकडे स्वदेशांत, सुराज्य झाल्याचें ऐकून परत आलों. आपल्या कारकिर्दीत मार्गात चोरांची कांहींच भीति उरलेली नाहीं. म्हणून मी सुखानें प्रवास करीत करीत, काल रात्रीं लवणोत्स गांवांत मुक्कामाला राहिलों. मी दमलों होतों म्हणून मार्गावरील एका बागेंत एका झाडाखालीं स्वस्थ निर्धास्त निजलों. जवळच झुडपानीं झांकलेली एक विहीर होती. ती माझ्या लक्षांत आली नाहीं. तिच्यांत, माझ्या कपड्यात गांठ देऊन बांधलेली माझी सुवर्ण रूपकाची (मोहोरांची) पोटळी पडली. हें मला उजाडल्यावर कळलें. माझें सर्वस्व गेल्यानें मी फार वेळ शोक केला व शेवटीं मी त्या विहिरींत उडी टाकूं लागलों. पण जमलेल्या लोकांनीं मला टोंकलें. त्यांच्यामधील एका उल्हासी व साहसी माणसानें मला म्हटलें, ' मी तुझें तें द्रव्य काढून दिलें तर तूं मला काय देशील?' ( ५० ) मी उत्तर दिलें, ' अहो, माझ्या या असहाय्य स्थितींत माझी आतां त्याच्यावर सत्ताच कोठें उरली आहे? तुम्हांला आवडेल तें मला द्या. ' नंतर त्यानें ती पोटळी काढली व तिच्यांतून मला दोन मोहोरा दिल्या आणि ९८ बाकीच्या आपण ठेविल्या. यावर मी त्याच्याशीं भांडूं लागलों. हें पाहून लोकांनीं मला नांवें ठेवीत म्हटलें, ' या यशस्कर महाराजांच्या राज्यांत सर्व व्यवहार वचननिष्ठ चालतो. ' ' मी सहज औपचारिक बोललों त्याचा फायदा घेऊन, कपटानें माझी सर्व कमाई हरण झाली आहे. तेव्हां असला अन्यायाचा व्यवहार चालूं देणाऱ्या आपल्या दाराशीं मी प्राण देणार. '

राजानें त्याला त्या साहसिकाचें नांव व पत्ता विचारतां त्यानें ' मी त्याला त्याच्या चेहेऱ्यावरून ओळखीन, ' असें कळविलें. नंतर राजानें त्याला ' याचा मी उद्यां निकाल करतों. ' असें सांगितलें व मोठ्या मुष्किलीनें त्याची समजूत करून, त्याला बरोबर घेऊन भोजन केलें.

दुसऱ्या दिवशीं राजानें दूत पाठवून बोलावून आणलेल्या लवणोत्सामधील सर्व पुरुषांमधून त्या ब्राह्मणानें त्या साहसिकाला ओळखून काढलें. राजानें विचारल्यावरून, त्यानेंहि त्या ब्राह्मणाच्याप्रमाणेंच हकीकत कळविली आणि तोंडीं व्यवहार ठरल्याप्रमाणें आपण वागलों असें सांगितलें. त्या बोलण्याचा दुसराहि एक अर्थ होतो, हें लक्षांत न आल्यानें सर्व लोक संशययुक्त व व्याकुळ झाले व त्यांनीं माना खालीं घातल्या. त्यावर राजानें धर्मासनारूढ होऊन, निकाल दिला कीं, ' त्या ब्राह्मणाला ९८ व त्या साहसिकाला दोन मोहोरा मिळाव्या.' ( ६० )

याबद्दलची शंका निवारण करण्यासाठीं त्यानें म्हटलें, ' उद्दाम अधर्माला हाणून पाडण्यासाठीं धांवणाऱ्या थोर धर्माची गति मोठ्या विचारानें ठरवावी लागते. सूर्य सायंकाळीं, अग्नींत व जलमय चंद्रबिंबांत स्वतःचें तेज विभागून देऊन, प्रज्वलित दीप आणि चांदणें यांच्या द्वारें उदयोन्मुख गाढ तमाचे निवारण करीत असतो. त्याच रीतीनें धर्म अधर्माचा पाडाव करीत असतो. अग्नि आणि इंधन यांच्याप्रमाणे धर्म हा अधर्माच्या जवळ अदृश्य रूपानें सतत जागरूक राहून त्याला पकडतो. तद्वत् या ब्राह्मणानें, 'तुम्ही द्याल तें द्या,' असे म्हणण्याऐवजीं, सहज ' तुम्हांला आवडेल ते द्या. ' असे म्हटले. या लोभ्याला ९८ सुवर्ण रूपक आवडले, ते त्यानें या बिचाऱ्या गांवडळाला न देतां, त्याला न आवडलेले दोन सुवर्ण रूपक दिले. हे बरोबर नाहीं. '

या व अशाच तऱ्हेच्या अनेक गोष्टींत सूक्ष्म दृष्टीनें योग्य तपासणी ठेवण्यांत तत्पर राहून, त्या यशस्कर राजानें जणो कृतयुग परत आणलें होते.

वैद्यानें दुसऱ्याला पथ्य करण्यास सांगावे व स्वतःच कुपथ्य करीत असावे, त्याप्रमाणे कांहीं काळानें तो दुसऱ्याचा न्याय करणारा, स्वत.च अन्यायाने वागूं लागला. यामुळे त्याचें हंसे झालें जल व मृत्तिका यांनी शुचिता राखण्यात तो श्रोत्रिय ब्राह्मणावरहि ताण करी. पण डोंबाचें उच्छिष्ट खाल्लेलें जवळचे सेवक त्याने दूर केले नाहीत. शिवाय तो पूर्वीच्या एका नगराधिकृताच्याऐवजीं चौघांच्या मार्फत धन संपादन करूं लागला. ते चौघेहि या कामात चढाओढ करीत होते. (७०) त्या राजाने आपली तरवार सुप्रसिद्ध अशा रणेश्वराच्या पाठापुढे वाहिली होती. तो नेहमी आपल्या वचनावर कायम रहात असे. त्याच्यामुळे पदाति लोकांची गेधा झाली होती. त्याचा एक वडील भाऊ होता. तो मरण पावला तेव्हा त्याने, साऱ्या पृथ्वीचा लाभ झाल्याप्रमाणे विलक्षण आनंद दाखविला. त्यावरून, त्याने त्याला, स्वतःच शोधून काढलेले विष देऊन मारविले की काय, अशी विचारी लोकाना शंका आल्यावाचून राहिली नाही.

एका वेलावित्ताचे त्याच्या राण्यांशी संधान जुळलें होते त्याच्याकडे डोळेझांक करून त्यानें त्याला सचिव केलें होते. तसेच त्याने प्रेमांध होऊन लल्ला नावाच्या वेश्येला अंतःपुरांतील राण्यामध्ये प्रमुख केले होते. तिचे त्याच्यावर फारच वर्चस्व झालेले होते.

सुवृत्तत्वाला स्त्रियांच्या हृदयांत जागा नसते 'म्हणूनच जणो, विधात्याने त्यांचें सुवृत्त -गोल-स्तन, हृदय स्थानांतून बाहेर, वर, काढले आहेत. उत्तम व अधम यांच्याशीं अंगना सारख्याच रीतीनें संसक्त होतात. हे पाहूनच त्यानें त्या वरवर शुचि क्रियांना, जणों अंगना बनविल्या आहेत!

ती ललित लोचना लल्ला राजाची लाडकी असूनहि, रात्रीं पाहाऱ्यावर असणाऱ्या एका तरुण चांडाल चौकीदाराशी रत होत असे. त्या तरुणाच्या अंगीं तसेंच कांहीं वशीकरण सामर्थ्य असावें म्हणूनच ती, राजवधू असतांना, त्याला भाळली होती व त्याच्या पूर्णपणे अंकित झालेली होती. न जाणों ती चांडालबीजाची असेल किंवा त्याला वशी-

करण साध्य असेल, नाहीतर हा असा असंभाव्य समागम कसा जुळून येता? त्याची तिची कशी गांठ पडली, तें बाहेर आले नाही. (८०) त्या दोघा पाप्यांचें परस्पर नेत्रकटाक्ष चाललेले वगैरे पाहून, त्यांचा प्रेमसंबंध हाडी नावाच्या अधिकाऱ्याच्या लक्षांत आला. राजाने गुप्त हेरांमार्फत हा प्रकार खरा असल्याची खात्री करून घेतली. पुढें प्रायश्चित्तें घेतां घेतां तो सुकून गेला. तेव्हांपासून तो कृष्णाजिने वापरूं लागला. (प्रायश्चित्तासंबंधानें गोचर्म व कृष्णाजिने वगैरेंचा उपयोग करणे मिताक्षरा व चतुर्वर्ग चिंतामणि, या ग्रंथांत वर्णिलेले आहे.) त्याला लल्लाचा भारी राग आला असूनहि, त्याने प्रेमाधपणामुळें तिचा प्राण घेतला नाहीं. यामुळे लोक त्याला फार नावे ठेवूं लागले. कुष्ठिसंपर्काने कुष्ठ लागतें. त्याप्रमाणे डोंबांचें उच्छिष्ट खाल्लेल्या सेवकांच्या संसर्गामुळे त्या राजाला संसर्ग दोष लागलेला होता.

पुढील जन्मांतहि राज्य वैभव लाभावे म्हणून, त्याने शहाणपणाने कांही अडचण न येऊं देतां, सर्व राज चिन्हें ब्राह्मणाना दान दिलीं. पूर्व जन्मीच्या सुकृतामुळेंच, आपणांसारख्या सामान्य माणसाला, हे वैभव प्राप्त झाले आहे, असे तो समजत होता. त्याला दान देण्याची मोठी आवड होती. त्यानें आपल्या पित्याच्या मालकीच्या जमीनींत, आर्य देशीय विद्यार्थ्यासाठी, एक मठ स्थापन केला. तेथील मठपतीला त्याने छत्रचामरें वगैरे राजाचिन्हें दिलीं. फक्त टंक-नाणे पाडण्याचा अधिकार-आणि अंतःपुर मात्र दिलें नाही. तसेच त्यानें वितस्तातीरावर नाना उपकारणांनी युक्त असे पंचावन्न अग्रहार ब्राह्मणांना दिले. (हे अग्रहार श्रीनगराजवळच्या कास्थेला-हल्लींचें काथूल-गांवी होते. तो गाव वितस्तेच्या डाव्या तीरावर दुसऱ्या पुलाच्या वरच्या अंगास होता. त्याच जागी अनंत राजानें दिलेले अग्रहार होते, असा विक्रमांक देव चरिताच्या १८ व्या सर्गाच्या २५ व्या श्लोकांत उल्लेख आहे.)

पुढें त्याला उदर झाले. तेव्हां त्याने, संग्रामदेव हा आपल्या पोटचा नव्हे, असें जाणून, सामंत, सचिव व एकांग, यांच्या संमतीने, आपला चुलत आजा रामदेव याचा पुत्र वर्णट, याला राज्याभिषेक करवून त्याच्या स्वाधीन केले. यामुळे त्याच्या मागून राज्य मिळविण्यासाठी टपून बसलेल्या मंडळींची निराशा झाली. (९१) कारण, अल्पवयी मुलाला राज्याभिषेक होता तर, हुसकून देणे सोपे होते. त्याचसमयीं या योगाने, पर्व-गुप्ताचें कपट फलद्रूप होण्याचाहि योग फसला.

वर्णट राजवाड्यांतच रहात होता. तरी तो त्याला राज्य देणाऱ्या यशस्कराच्या समाचारालासुद्धां गेला नाहीं याचें यशस्कराला वाईट वाटलें व त्याला पश्चात्ताप झाला. तो आसन्नमरण असतांना मंत्र्यांनी, आपण इतक्यांत कांही मरत नाहीं, असे सांगून, त्याचे आश्वासन केलें आणि संग्रामदेवाला पुनः राज्य देण्याविषयीं आग्रह केला. राजाच्या आज्ञेनें दुसऱ्या दिवशीं वर्णटाला काढून देण्याच्या हेतूनें आठ खांबी मंडपांत अटकेंत ठेववून, त्यांची द्वारे बंद करविली होती. त्याच्या सेवकांना भीतीमुळे किंवा जागरणामुळें दस्त लागले व त्यांनी तो राजमंडप घाण करून टाकला. तो वर्णट एकच दिवस

राजा झाला होता. त्याचा सेवक देवशर्मा राजपूत याने लज्जित होऊन आपली तरवार विजयेश्वराच्या मंदिरांत अर्पण केली.

संग्रामदेवाला पुनः राज्याधिकारी केल्यावर यशस्कराचा रोग असाध्य होऊन, त्याला तीव्र व्यथा होऊं लागली व तो मरण्यासाठी राजवाडा सोडून आपल्या मठात गेला. त्याच्या कांही सेवकांनी त्याच्या समक्ष उसन्या कृतज्ञपणाच्या आवेशानें आपण दाढीमिशा मुंडून संन्यासी होणार व शस्त्रत्याग करणार, अशा शपथा घेतल्या. ( १०० ) पण तो मरूं लागतांच ते हें सर्व विसरले, राजवाड्यातून निघतांना त्याने २५०० सुवर्णरूपक, बांधून बरोबर घेतले होते. ते पर्वगुप्तादि पाच मंत्र्यांनी त्याच्या जिवंतपणीच काढून वांटून घेतले. त्या मठांतील अंगणांत, एका अंधेऱ्या पर्णकुटीत, व्याधिग्रस्त, हताश व मुमूर्षु स्थितींत, तो पलंगावर गडबडा लोळत होता. तो चांगला शुद्धीत होता. आपले लोक लबाडी व नुकसान करण्याला प्रवृत्त झालेले त्याला दिसत होते. तो तीन दिवस मरत पडला होता शेवटी त्याचें राज्य हरण करण्याला उत्सुक, असे, आप्त व सेवक यांनी त्याला विष दिलें !

विरोचन सूर्य याला त्याची प्रभा अनुगत होते, तशी त्याच्या अंत:पुरातील स्त्रियां- पैकीं एकटी साध्वी त्रैलोक्येदेवी सति गेली. प्रजेकडून वर्णाश्रम धर्म पाळविण्यांत हा राजा फार दक्ष असे. चक्रमेलक येथील भानू नावाच्या एका तपस्वी ब्राह्मणाच्या हातून घडलेल्या घोर पातकाबद्दल, त्यानें धर्मशास्त्रास अनुसरून त्याच्या कपाळावर श्वपदाचा डाग देवविला होता. ( ११० ) ( असा डाग चोरीच्या अपराधासाठी दिला जात्रा. असे मनु- स्मृतीच्या नवव्या अध्यायाच्या २३७ व्या श्लोकांत लिहिले आहे, ) त्यावरून भानूचा काका व त्या राजाचा संधिविग्रहक मंत्री वीरनाथ यानी रागाने अभिचार करून, त्याचा सूड उगविला, असे कांही गुरूंनीं मोठ्या आढ्यतेनें म्हटले आहे. पण ही गोष्ट पूर्वींच्या ब्राम्हणाच्या अंगच्या शापप्रसाद शक्तींचे महात्म्य वाढवून स्वतःचे महत्त्व स्थापित करण्या- साठीं केलेली दिसते. त्याच्या अभिचारामुळेच तो सात दिवसांत मरण पावला असेहि प्रकट करण्यांत आले आहे. पण तो राजा पुष्कळ दिवस रोगग्रस्त होता व पुढे मरण पावला, याची उपपत्ति या गोष्टींने लागत नाही. तो अजारी असतांना ही गोष्ट घडली, असे मानले तर, वर्णटादिकांचे शापहि परिणामकारक झाले. असे म्हणण्याची पाळी येईल.

या राजानें नऊ वर्षे राज्य केले व तो लौकिक शक ४०२४ (ई. स. ९४८) या वर्षी भाद्रपद वद्य तृतीयेला मरण पावला.

**राजा संग्रामदेव**—(सं. ९४८–९४९) संग्रामदेवाच्या आजीला त्याची पालक म्हणून सिंहासनावर बसवून भूमटादिक पांच मंत्र्यांसह पर्वगुप्त मुख्य मंत्री झाला. पुढें त्यानें हळूंहळूं ती आजी व इतर मंत्री, यांची वाट लावली आणि त्यानें स्वतःच राजा व मंत्री दोघांचीहि अधिकार चिन्हे धारण केलीं. त्यावरून त्याला, राजा म्हणावें की मंत्री,

त्याविषयीं लोकांच्या मनांत शंका वाटूं लागली, तो राजानक-(रीजंट)-बनला. त्या बाल राजाचे खाण्यापिण्याचे पदार्थ वगैरे स्वतः मागवून, तो त्याची सेवा करी आणि सरळ मनाच्या लोकांच्या मनांत आपल्याविषयीं निष्कपट भाव उत्पन्न करीत असे. ज्यांना द्रोहभीरु समजून यशस्कर राजाने आपल्या अल्पवयी पुत्राला सोपले होते, तेच लोक त्याचा उच्छेद करण्याला प्रवृत्त झाले.

आपण राजाच आहों असे दाखवीत, पर्वगुप्त आपल्या प्रशस्त वाढलेल्या दाढीवर उत्तम केशराची उटी लावीत असे. त्याच्या केसाचा रंग उंटाच्या पोरांच्या केंसाच्या रंगाप्रमाणें होता. ( १२० )

तो एकांगाना फार भीत होता. त्याला त्यांचे उघडपणें उच्चाटन करतां येईना म्हणून त्याने अभिचार कर्म करविलें. त्यांत त्याला दृष्टांत झाला की, 'हें राज्य, चैत्र शुद्ध प्रतिपदेला योग्य रीतीनें तुला व तुझ्या संततीला मिळेल. पण याच्याविरुद्ध खटपट केलीस तर तुझ्या व तुझ्या वंशजाच्या प्राणावर बेतेल.' याप्रमाणें अभिचार व्यर्थ गेलेला पाहून त्याचें मन जास्तच अधीर झालें आणि प्रतिपक्षी एकांग, वगैरेंच्या भीतीने व तद्विषयक चिंतेमुळें तो श्रमिष्ट होऊन, रात्रंदिवस तडफडूं लागला. शेवटीं त्यानें एके दिवशी, एकाएकीं सर्वत्र बर्फ पडून लोकांची वावर बंद असताना, आपले लोक जमवून, राजवाड्याला वेढा दिला. नंतर आपला प्रतिस्पर्धि, राजनिष्ठ मंत्री रामदेव व त्याचा पुत्र बुद्ध हे आडवे आलेले पाहून, त्यानें त्यांच्यावर हल्ला केला व त्यांना ठार मारले. वक्राग्नि संग्राम राजांच्या गळ्यांत त्याच्या पित्याचा बेलावित्त याने, पुष्पहार म्हणून बरोबर आणलेली दोरी घालून, त्याला सिंहासनावरून ओढलें आणि दुसऱ्या मंडपांत त्याचा प्राण घेऊन, त्याचें प्रेत गळ्यांत दगड बांधून वितस्तेंत बुडविलें नंतर तो नीच व क्रूर पर्वतगुप्त लौकिक शक४०२४ (ई. स.९४९)वर्षाच्या फालगून वद्य दशमीला कवच घालून व खड्ग धारण करून, सिंहासनारूढ झाला.

**राजा पर्वगुप्त**—(स० ९४९-९५०) हा संग्रामगुप्ताचा पुत्र. त्याचा आजा अभिनवगुप्त हा पारेविशोका येथील एक दिविर होता. ( १३० ) कांहीं मंत्र्यांनीं त्याला आड येऊं, असें म्हटलें होते. पण सारे लोक त्याच्या या अभ्युदयाला भिऊन, त्याच दिवशी हजर होऊन, त्याला प्रणाम करते झाले. प्रतिपक्षी, मंडलेश, एकांग, सरदार, मंत्री, कामगार व तंत्री हे त्यासा भ्यालेले होते. तरी पुढें त्याने त्याचा द्रोहच केला.

त्या दिवशी राजदरबारांत सुय्याचा वंशज मदनादित्य एकांग, याचा मोठा नगारा चुकून फुटला. तेव्हां त्या नवीनच राजपद हरण केलेल्या पर्वगुप्तानें रागारागाने त्या मदनादित्याला नागवा उघडा करून त्याची फार बेअब्रू केली. तेव्हां त्यानें दाढी मिशा व केंस काढून संन्यास घेतला. त्याची बायकामुलें होती. त्याचे वंशज अद्यापि त्रिपुरेश्वरीं राहात आहेत.

पर्वगुप्ताने हरतऱ्हेने द्रव्यार्जन चालविले आणि त्याच्यासाठी प्रजेचे काळच, असे

कायस्थ कामवाले नेमले. अशा रीतीने दुष्टपणानें मिळविलेलें द्रव्य, खर्चून, त्याने स्कंद भवनविहाराच्या आवाराशेजारींच पर्वगुप्तेश्वराचें मंदिर बांधविलें.

यशस्कर राजाची नृपसुंदरी नांवाची राणी श्रीगौरीप्रमाणें विशुद्ध व बुद्धिमान होती. तिचें वर्तन उत्तम असल्याने लोकनिंदेला जागा नव्हती. तिच्यावर पर्वगुप्ताचें उत्कट प्रेम बसले होतें. तिनें वश व्हावें म्हणून त्यानें पुष्कळ यत्न केला. पण त्या सतीनें युक्तिप्रयुक्तीनें त्याला दाद दिली नाही. शेवटी त्या कमलनयनेनें त्या दुष्टाला सांगितले कीं, ' या यशस्कर स्वामींच्या मंदिराचे, यशस्कर महाराजांच्या हातून अर्धेच राहिलेलें काम पूर्ते झाल्यावर मी आपल्या म्हणण्याप्रमाणे पाहीन. ' त्यावरून त्याने मोठ्या उल्हासानें व उमेदीने तें काम अगदीं थोडया दिवसांत संपविलें. तत्संबंधी होमहवनात घृताहुतींनी प्रज्ज्वलित झालेल्या होमाग्नीत त्या साध्वीने पूर्णाहुतीबरोबर, एकदम स्वतः उडी टाकली. यामुळे तिच्यावर पुष्कळशी पुष्पांची आणि तिचा अभिलाष करणाऱ्या त्या पर्वगुप्तावर शिव्याशापांची वृष्टि झाली.

पुढे दीर्घ कालिक व सतत चिंतेमुळे सुकून गेलेल्या त्या पर्वगुप्ताला तृष्णा-उदररोग झाला.

मूढ लोक, होणाऱ्या क्लेशाचे शमन होण्यासाठीं केलेले सारे उपाय व्यर्थ आहेत व आपण थोडयाच दिवसांचे सोबती आहोंत, हे जाणत असूनहि, अस्थिर लक्ष्मीच्या लोभानें दैव अनुकूल होईल अशी आशा धरून, खटपट व धडपड करीतच असतात व रोगाच्या शमनाचे उपाय करीत राहतात. या स्थितींत पर्वगुप्ताला भारी भीति वाटत होती. याच्या पूर्वजन्मींच्या अवशिष्ट पुण्याईमुळें त्याला सुरेश्वरी क्षेत्रांत मरण आले. लौकिक शक ४०२६ (ई. स. ९५०) या वर्षी, आषाढ शुद्ध त्रयोदशीला, सर्वांशीं द्रोह करून संपादिलेल्या राज्यकारभाराचा भार त्याच्या मस्तकावरून उतरला.

याच जन्मांत उत्कट दुष्कृताचे फल, तात्कालिक दुःसह व्याधि व मृत्यु अशा रूपानें अनुभवास येत असते व त्याच्यावरून भावी परलोकांतील दुस्सह यातनांचें अनुमान करतां येत असते. असे नसतें तर दुष्कर्माचरणानें संपत्ति मिळविण्याचा प्रयत्न केल्यावांचून कोण राहता ?

**राजा क्षेमगुप्त**—(ई. स. ९५० ते ९५८ ) त्याच्या मागून त्याचा पुत्र क्षेमगुप्त गादीवर बसला. त्याच्या अंगी लक्ष्मी व यौवनमूलक ज्वर, फारच भडकलेला होता. त्यांच्यांत अतिरिक्त मद्यपानाची भर पडली. तो मूळचाच दुष्ट. त्याच्या दुष्टपणांत दुर्जन संगतीची भर पडून, तो अधिकच दुर्वृत्त झाला. अमावास्येच्या रात्री घनदाट, मेघ येऊन, अधिकच घनदाट अंधःकार पडतो. त्याप्रमाणे त्याची भयंकर स्थिति झाली होती. ( १५० ) त्याच्यासारखाच वेष व अलंकार केलेले फल्गुण वगैरे शंभर दुराचारी प्रेमांतले सोबती, नेहेमी त्याच्याभोवती त्याच्या सेवेंत हजर असत. द्यूत, मद्यपान व अंगना, यांचे अनन्वित सेवनरूपी दुर्व्यसनाधीनता आणि धूर्त विटांकडून लुबाडले जाणे, या गोष्टी सारख्या चालू असूनहि त्याच्या वैभवांत कमीपणा आला नाहीं.

अनुरागी, मद्यप्रेमी, अक्षयद्यूतासक्त व त्याचे सर्व सार हरण करणाऱ्या विटांनी ग्रासलेला राजा, हा एकाद्या कमळासारखा असतो. तें कमलरागीरंगयुक्त मधूनें भरलेले व बीजयुक्त व त्याच्या कोशांतील सार हरण करणाऱ्या मधुपांनी ग्रासलेले असतें. अशा स्थितीतहि श्री त्याचा आश्रय करीत असतेच. तेव्हां ती अशा राजालाहि चिकटून राहते, यांत फारसें नवल नाहीं.

जिष्णूचा पुत्र वामन व इतर विट यांनी त्यांच्या अंतःकरणांत शिरून, त्याच्या मनात पिशाच्चाप्रमाणें अशुचि विषयाची आवड उत्पन्न केली होती. असा तो राजा परस्त्रीकामुक झालेला होता. तो दुसऱ्यावर अनर्थ ओढविण्यात तयार होता. त्याला जवळचे लबाड लोक हवातसा वळवीत. तो जवळ राहणाऱ्या वृद्ध लोकांच्या दाढीवर थुंके व त्याच्या कानांत दुःशब्द ओती व डोक्यावर थापट्या मारी. स्त्रिया त्याच्याशीं कटिसंघट्टन करून, शिकारी लोक त्याच्याबरोबर नेहमीं एकटे दुकटे रानावनांत फिरून आणि लबाड विट चावटपणा करून, त्याची कृपा संपादीत असत. पूंश्चली, जाल्प, वैधेय, मुले बिघडविणारे याची गर्दी असलेला त्याचा दरबार सभ्य लोकाना पाय ठेवण्याजोगा उरला नव्हता जिष्णुपुत्र विट, त्याला कळसूत्री बाव्हल्याप्रमाणें नागवीत असत. (१६०) त्यानी त्याला कंकणवर्षी, असे नांव दिलें होतें व ते त्याच्याकडून आपल्या हातांवर अनेकवार कनक कंकणाची वृष्टि करवून घेत. सभ्य लोकाचें खोटेंच दोषाविष्करण, नव्यानव्या वस्तूंचे प्रदर्शन आणि सज्जन व निर्दोष अशांच्या मस्तकांना टक्करा मारून, ते त्या राजाची कृपा संपादन करीत. ते त्या कामुक राजाला आपल्या घरीं नेऊन आपल्या स्त्रियाचे कुच व कटिप्रदेश दिसतील अशा त्यांना त्याच्या दृष्टीस पाडीत व द्यूतांत खूप लुटीत. त्या राजाला एकांतिक विषयासक्तींत सतत रममाण करून सोडण्याची, त्यांच्यामध्यें जशी चढाओढ लागलेली असे. ते निर्लज्ज लोक त्याच्याकडून आपल्या बायकाचा उपभोग करवून, त्यांच्यातून कोणची व कां पसंत पडते, म्हणून त्याला विचारीत आणि कोणाकडून जास्त सुख झालें, असा प्रश्न करीत. नंतर त्याच्याकडून हवी तशी संपत्ति प्राप्त करून घेत.

हरी व धूर्जटी नावाचे त्याचे दोन सेवक, असल्या संभोग व ढोंकनाच्या बाबतीत, अगदी अनभिज्ञ व मूर्ख समजले जात, कारण त्यांनी आपल्या आयाबहिणींचे चारित्र्य रक्षण केले होतें.

मूर्ख विटलोक स्वतःचें शरीर, थट्टा मस्करीलि पात्र करून स्वाभिमानाला मुकतात, स्वतःच्या स्त्रियांना बिघडवून कुलकलंकित करतात व असल्या नीच सेवेत दीर्घकाल राहून, स्वतःच्या सौख्याचा नाश करून घेतात. तेव्हां ज्याच्यासाठीं सारी धडपड व परिश्रम करावयाचें तेंच सुख गमविणारे हे विट, काय मिळवितात कोण जाणें !

भट्ट फल्गुण हा पूर्वी यशस्कराचा मंत्री होता. पण शेवटीं तोहि क्षेमगुप्ताचा विट बनला. सुखोपभोगतृष्णेला धिक्कार असो ! त्याने विष्णु फल्गुणाचें मंदिर व दुसरीहि मंदिरें बांधविलीं. त्याच्या सल्लामसलतीची राजा मागें थट्टा करीत असे.

त्याच्या पश्चात् त्या दुष्ट मंडळींतली त्याची जागा, पूर्वी कंपनेश असलेल्या रक्कानें भरून काढली. आपल्यावरील गैरमर्जी कमी करविण्यासाठीं, त्याने त्याच्याकडून डोक्यावर थापट्या मारून घेण्याचें हलकट वर्तन सोसलें ! ( १७० ).

क्षेमगुप्ताने संग्रामडामरावर मारेकरी घातले. तेव्हां तो आश्रयासाठी सुप्रसिद्ध अशा जयेंद्र विहारात शिरला. तेव्हा क्षेमगुप्तानें क्रूरपणाने त्या विहाराला आग लावली. तो विहार पार जळाला. तेव्हां त्याने त्याच्यांतील सुगताची पंचरसी मूर्ति काढून नेली व जुन्या देवळाचे दगड काढून आणवून, नगरांतील बाजारांतील राज रस्त्यावर, स्वतःचें नांव चिर स्थायी रहावें या इच्छेनें क्षेमगौरीश्वराचें मंदिर बांधविले. (हे मंदिर प्रवर पुरांत–नगरांत–मोठे भव्य होतें असे, बिल्हणाने विक्रमांकदेव चरिताच्या १८व्या सर्गातल्या २३ व्या श्लोकांत वर्णन केलें आहे. त्याचे मंडप वितस्ता संगमापर्यंत पसरलेले होते असेहि तो म्हणतो. पण हा संगम वितस्तेचा व दुसऱ्या कोणच्या नदीचा होता ते लिहिलेले नाही. )व एक मरतो दुसरा त्याची जिंदगी घेतो तेव्हां त्याला मोठा आनंद होतो. आपल्या मागून ती जिंदगी दुसऱ्याच्या हाती जाईल, हे त्याच्या ध्यानांत येत नाही. अशी भयंकर भुरळ घालणारा हा गाढ मोह विलक्षण होय !

त्या जळालेल्या विहाराची ३६ इनाम गांवे, त्या उधळ्या क्षेमगुप्ताने काढून घेऊन खशांचा राजा सिंहराज याला दिलीं. त्या इंद्रतुल्य पराक्रमी व लोहरादिदुर्गाच्या सिंहराजाने आपली कन्या दिद्दा इचे क्षेमगुप्ताशी लग्न करून दिले. ती शाहीच्या मुलीची मुलगी होती. तिच्यावर क्षेमगुप्त इतका आषक होता कीं, त्यावरून त्याला लोकांनी दिद्दाक्षेम असे हलके नांव दिले होतें. तिचा मातामह भीमशाही याने श्रीनगरांत एक फार उंच व मोठे असे भीमकेशवाचे मंदिर बांधविलें. ( हा भीमशाही अल्बिरूनीच्या यादीतील कमलू कांवाच्या, काबूल येथील हिंदूशाही राजाच्या मागून गादीवर बसलेला भीमराजा होय. कल्हणानें त्याला उदभांडचा शाही राजा भीम असे म्हटले आहे. उदभांड ही गांधार देशाची प्राचीन राजधानी होती. या शाही घराण्यांतून पुढें लोहर येथील राजघराण्यांतहि मुली दिल्या गेल्या होत्या.

**भीमकेशव**—भीमशाहीने आपल्या नातीच्या देशांत असें प्रचंड देवालय बांधविले व त्याला पुष्कळसे उत्पन्न लावून दिले होते. त्यावरून त्याच्या वैभवाचे चांगले अनुमान होते. पुढें त्या मंदिरांतून हर्ष राजानें पुष्कळच जड जवाहीर व संपत्ति काढून नेली. हें मंदिर मार्तंड भुवनापासून अर्ध्या कोसावर बुमाझू नांवाचे हल्लीं एक मुसलमानी पीराचे स्थान आहे, तेच असावेंसें दिसते.

**दिद्दाक्षेम**–क्षेमगुप्ताची नाणी सांपडली आहेत, त्यांच्यावर दि क्षेम–देव अशीं अक्षरें आढळतात. त्यावरून त्याने आपल्या राणीच्या नांवाचे आद्याक्षर, आपल्या नांवामागे लावलेलें दिसते. )

द्वारपती फलगूण याने आपली कन्या चंद्रलेखा इचे क्षेमगुप्ताशी लग्न केले होते. त्यावरून

दिद्दाराणी त्याचा फार हेवा व द्वेष करीत असे. राजाला उत्तम गुरूकडून निशाणबाजीचें शिक्षण मिळालें होते. त्याने त्यांच्यांत कौशल्य संपादण्यासाठी फार परिश्रम केले होते. पण त्याने त्याचा जो उपयोग केला, त्याच्यावरून त्याला फार निंद्यपणा आला (१८०) त्याने आपल्या अमोघ व अचूक निशाणबाजीचा उपयोग, शूरपणाचीं कृत्ये करण्याच्या ऐवजी, यःकश्चित् कोल्ह्या-खोकडांवर तीरंदाजी करण्यांत केला. कुत्रे व जाळी घेतलेले डोंब, पारधी आणि दुसरे हलकट लोक यांनीं तो सारखा वेढलेला आणि त्यांच्यासह नेहमी भटकत असलेला लोकांच्या पाहण्यांत येई त्याचा सारा वेळ दामोदरारण्य, लल्याण, व शिमिका, अशा रुक्ष शिकारीच्या व जंगली प्रदेशांत कोल्ह्याची शिकार करीत हिंडण्यात जात असे. (दामोदर आरण्य-दामोदर उदर-किंवा दामोदर सूद, ही पठार येच्छ-यक्ष-परगण्यांत वहटोर गावापासून वायव्येस पसरलेली आहे. वहटोर गांव श्रीनगरापासून साडेतीन कोसांवर आहे. ती पठार तीन कोस लांब व दीड कोस रुंद आहे. तिच्यावर पाणी नाहीं. यामुळे तेथे शेती होत नाहीं. ती कोल्ह्यांच्या शिकारीला चांगली जागा आहे. शिमिकेचा उल्लेख, पुढें तरंग ७ श्लोक ३६९ मध्यें आलेला आहे. तें स्थळ विजब्रोर जवळ असावेसे दिसते.)

तो राजा वद्य चतुर्दशीला शिकार करीत असतांना त्याला मुखांतून ज्वाळा निघत असलेली व मोठ्याने ओरडत असलेली एक कोल्ही आढळली. तेव्हां त्याची गाळण झाली. पुढे त्याला लूता रोग होऊन ज्वर आला व तो मरणोन्मुख झाला. तेव्हां तो वाराह क्षेत्राला गेला. तेथें त्यानें हुष्कपुराजवळ श्रीकंठ व हेम या नांवांचे मठ स्थापन केलेले होते. (वाराह क्षेत्र-वराह मूल. हल्लीचे बारामूला हे क्षेत्र व गांव, आदिवराहाचे स्थान व नगर म्हणून प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे. आदिवराहाचें मंदिर नदीचा उजवा काठ व पलीकडील पहाडी, यांच्या मधील जमिनीच्या चिरोटीवर होतें. हल्लीं हें शहर बरेंच भरभराटीत आहे. हुष्कपुर-हल्लींचे उष्कूर-हे जवळच्या मैदानांत वसलेले असल्याने पूर्वी चांगले विस्तीर्ण व अबाद होतें. पण हल्लीं तें एक लहानसें खेडे आहे.)

क्षेमगुप्ताच्या अंगावर मोठ्या डाळींसारख्या लूता-देवी-आल्या होत्या. त्यांनी तो लौकिक शक ४०३४ (ई. स. ९५८) या वर्षी पौष शुद्ध नवमीला मरण पावला. त्याच्या मागून त्याचा अल्पवयी पुत्र अभिमन्यू गादीवर बसला व निर्दय अशी दिद्दा राणी त्याची पालक झाली. संधिविग्रह मंत्री, प्रतिहार व गृहकृत्याधिकारी वगैरे मंत्री, त्या राणीच्या शयनगृहांत खुशाल जात येत असत.

**राजा अभिमन्यू**—(ई स ९५८ ते ९७२.) या अभिमन्यू राजाच्या कारकिर्दीत तुंगेश्वराजवळच्या बाजारापासून अवचित आग सुरू झाली. (१९०) (हा बाजार तुंगेश्वराच्या मंदिराजवळच असावा. त्या मंदिराच्या स्थळाचा पत्ता लागलेला नाहीं) ती आग फारच भयंकर होती. ती तेथून थेट विष्णुवर्धन स्वामीच्या जवळ भिक्षुकी परकापर्यंत पोचली. व तिच्यामुळे वेताळसूत्र पातापर्यंतच्या सर्व मोठमोठाल्या इमारती जळून गेल्या. (हे विष्णुवर्धन स्वामीचे मंदिर प्रवरसेनाच्या पुराच्या हद्दीवर होते.)

त्या आगीनें जणों डोंब व चांडाल संपर्कदूषित राजांनीं विटाळलेल्या सर्व मोठ्या इमारतींचा दाह करून, तें नगर व मंडळ शुद्ध केलें. यामुळें राजाची आई पालक दिद्दाराणीचें मन गोंधळून गेलें.

कोणी कांहीं सांगेल तें सर्व खरें मानणें हा स्त्रियांचा स्वभावच आहे. ऐकल्यापैकीं खरें कोणचें व खोटें कोणचें, याचा त्यांना निर्णय करतां येत नाहीं.

पति जिवंत असतानाच ती, मुख्य मंत्री फल्गुण—यानें आपली कन्या राजाला दिली होती म्हणून त्याच्यावर नाराज होती. पति मेल्यावर राजाच्या इतर राण्या सती जाण्याला तयार झालेल्या पाहून, तिनेंहि सती जाण्याचें म्हटलें. तसें फलगुणानें तिला तात्काळ अनुमोदन दिलें होतें. पण चितेजवळ तिचें धैर्य गळून, तिचें मन फिरलें. हे पाहून मंत्री नरवाहन याला दया आली व त्यानें विनवण्या करकरून तिला परत फिरविलें होतें.

रक्क हा मूळचाच कुटिल मनाचा होता. त्यानें त्या मूळापासूनच विरुद्ध असलेल्या राणीच्या मनांत, फलगुण हा राजा होण्याच्या खटपटींत आहे, असें भरवून दिलें. चाल-लेल्या प्रकारावरून राणी व इतर मंत्रीहि प्रतिकूल आहेत असें पाहून, फलगुण भ्याला. तो सर्वाधिकारी होता. त्याच्या धैर्य, कर्तृत्व, उत्साह, वगैरे गुणांमुळे, सर्व मंत्री त्याचा द्वेष व हेवा करीत होते. ( सर्वाधिकार—राजाचा प्रतिनिधि किंवा मुख्य मंत्री—तो नेहमीं नेमला जात असे, असें नाहीं. राजाच्या मर्जीनुरूप, तशाच एखाद्या उत्तम मंत्र्याची, त्या जागेवर कधींमधीं नेमणूक होत असे. ) फलगुणाचा पुत्र कर्दमराज हा क्षेमगुप्ताच्या अस्थी घेऊन गंगेस गेला होता. ( २०० ) तो परत येईपर्यंत राजवाड्यातच राहणें ठीक नाहीं, न जाणों प्रतिपक्षी घात करतील, या भीतीमुळे फलगुणानें पर्णोत्स येथे जाऊन राहण्याचें ठरविलें आणि आपलें सामानसूमान, खासगी नोकर, प्यादे आणि बरेचसे सैनिक, घेऊन तो नग-रांतून निघून काष्ठवाट येथें पोचला. तोंवर रक्क वगैरेंच्या चिथावणीवरून, दिद्दा राणीनें, संभावितपणाचा निरोप पाठविण्याऐवजीं, त्याच्या मागें चोबदार पाठविले. या नव्या अप-मानामुळे त्या मानी मंत्र्याला मनस्वीं वाईट वाटलें व तो परतून पुष्कळशा फौजेसह वराह क्षेत्राला गेला. तो परत येत असल्याचें ऐकून, राणी भिऊन थरथर कांपूं लागली. इकडे त्या शूर पराक्रमी फलगुणानें त्या क्षेत्रांत आपल्या मृत मालकाबद्दल फार वेळ शोक केला आणि आपलें शस्त्र वराह देवाच्या पायावर ठेवलें आणि त्या योगानें राणीच्या मनांतील आपल्या राजद्रोहाविषयींची कुशंका घालविण्याचा प्रयत्न केला. योग्यायोग्य विवेकहीन माणसांनी कामात आणलें जाणारें शास्त्र, किंवा शस्त्र, मोठें आपत्तिकारक होत असतें. तो मनुष्य त्याचा उपाय म्हणून उपयोग करूं लागला असतांना, त्याच्यावर गुप्त राजद्रोहाचा आरोप येऊं लागतो, म्हणून असलें अर्धवट सहाय्य मिळणारें शास्त्र किंवा शस्त्र, आग्रहानें कामीं आणणें ही गोष्ट केवळ खऱ्या बुद्धिवानालाच साधते.

फलगुण पर्णोत्सला निघून गेलेला पाहून, इतर मंत्र्यांना, गुरुजी बाहेर गेलेल्या शाळे-तील मुलाप्रमाणें आनंद झाला आणि दिद्दाराणी आपला अधिकार दृढ करून वाढवि-ण्याच्या विचारांत रात्रंदिवस जागरूक राहूं लागली. ( २१० )

पर्वगुप्त राज्याधिकार बळकावण्याच्या खटपटींत असतांना, त्यानें आपल्या दोन मुली चोज व भूभट नांवाच्या मंत्र्यांना दिल्या होत्या. त्या मंत्र्यांनीं त्याच्याशीं कोशपानपूर्वक शपथा केल्या होत्या. त्याचे पुत्र सुप्रसिद्ध महिमान व पाटल, हे राजवाड्यांत, राजपुत्रांप्रमाणें वाढविले गेले होते. ते पुढें तेथेंच रहात असत. त्यांनीं गादी मिळविण्याविषयीं हिम्मक वगैरे बाष्कळ मंडळींबरोबर गुप्तकट केला होता. ( हैदर मलिक व नारायण कौल यांच्या कैफियतीमध्ये हा हिम्मक तुर्की होता असें लिहिलें आहे. )

दिद्दाराणी प्रबळ झाल्यावर, तिनें त्या दोघांनाहि राजवाड्यांतून बाहेर काढले. ते रागानें आपल्या घरून इतर लोकांकडे जात येत असतांना, राणीनें त्यांच्याशीं उघडपणे वैर चालविलें. पुढे एकदां महिमनाला हद्दपार करण्याच्या हेतूनें तिने त्याच्या मागे चोबदार धाडले. तो आपला सासरा शक्तिसेन याच्या घरीं गेला होता. म्हणून ते चोबदार तेथे पोचले. त्यांना शक्तिसेनानें सामोपचारानें परत जाण्यास सांगितलें. तें त्यानीं मानले नाही. त्यावर त्याने आपल्या जांवयाला उघडपणे आश्रय देऊन त्याचें भय दूर केले असा आश्रय मिळाल्यावर, हिम्मक, मुकुल, परिहासपूर येथील पेरमंतक अमृताकराचा पुत्र उदयगुप्त, व ललितादित्यपुराहून आलेला यशोधर वगैरे, त्या कटांत सामील असलेले लोक, बरोबर आणलेल्या सैनिकांच्या पादाघातानें जणों पृथ्वी कंपायमान करीत, तेथें पोचले आणि त्या सर्वांनी बंड उभारले. ( २२० ).

या कठिण व धोक्याच्या प्रसंगी विश्वासु व राजनिष्ठ मंत्री नरवाहन व त्याचे आप्त यांनीं मात्र राणीचा पक्ष सोडला नाहीं. आपला जमाव चांगला मोठा झालेला पाहून बंडवाले लढण्याला उत्सुक होत्साते शस्त्रें चमकावीत पद्मस्वामीच्या मंदिराजवळ पोचले. हें पाहून राणीने आपल्या पुत्राला शूर मठांत पाठविले व आलेले संकट कसेंहि करून टाळण्याची खटपट चालविली. ती यावेळीं बरीच घाबरली होती. तिने पुष्कळसें द्रव्य पेरून, थोड्याच अवकाशांत ललितादित्यपुरांतलि ब्राह्मणांना फोडले व त्यांच्या द्वारें त्या शत्रूंच्या कटांत भेद केला. त्या सर्वांनी तीर्थोदक प्राशन करून शपथा केल्या होत्या कीं, आपणांपैकीं कोणाएकावरहि हल्ला झाला तर, सर्वांनीं त्याच्या प्रतिकारार्थ तयार होऊन उठावे. पुढे त्या ब्राह्मणांनीं राणी व महिमन यांचा समेट केला. ती राणी लंगडी. तिला गोष्पद तरी लंघतां कसचें येणार, असे सर्वांना वाटत होते. पण तिनें यावेळीं हनुमानाप्रमाणें, संपत्तीच्या जोरावर शत्रुसेनारूपी सागर उल्लंघन केला. अशा त्या विलक्षण शक्तिमान संपत्तीला नमस्कार असो. तिच्या दानाने, मणि व महौषधि यांच्या दानाप्रमाणेंच संकटाचा नाश होत असतो.

लांच देण्यापेक्षां कृपा करणें जास्त श्रेयस्कर होते, असा विचार करून, त्या राणीनें पुढे यशोधरादिकांना कंपनेशादिकांची कामें दिलीं. नंतर लौकरच त्या विधवा राणीने अभिचार करवून महिमनरूपी कांटा काढून टाकला. तेव्हां त्या मंडळांत तिची सत्ता अप्रतिहत झाली.

पुढे कांहीं दिवसांनीं शाही राजा थक्कन याची खोड मोडण्यासाठीं कंपनाधिपतीनें आपले लोक बरोबर घेऊन, त्याच्यावर स्वारी केली.

तो प्रदेश नद्या, नाले व पर्वत यांच्यामुळे दुर्गम होता. तरी त्याच्यांत तडाक्यानें घुसून, त्या शूर व ओजस्वी कंपनाधिपतीनें, थक्कनाला घेरले. तेव्हां तो शरण आला. त्याच्या कडून खंडणी घेऊन, त्यानें त्याला त्याचे राज्य परत दिले. या जणों नूतन राज्याभिषेक जलसिंचनानें त्या कंपनेशाच्या कीर्तिलतेचें संवर्धन झालें. पण इकडे रक्कादिक त्याच्या दुष्ट वैऱ्यांनी, त्या अविचारी राणीजवळ, त्यांना मिळत असलेल्या अप्रतिहित प्रवेशाचा फायदा घेऊन, तिच्या मनांत त्या कंपनेशाविषयीं द्वेष उत्पन्न केला.

राजा, स्फटिक मणि व कुशल स्त्री, यांच्याजवळ नेहमी जसे सहचर असतील, तसा नवा नवा रागरंग येत असतो. गांवढळ लोक व गणिका, याना लबाडीने प्रिय बोलून, विट लोक त्याच्यावर पगडा बसवीत असतात. तोच प्रकार राजाजवळच्या गर्भदास विटांचा असतो.

कंपनाधिपती यशोधराने थक्कनाकडून पैसा घेऊन त्याचे रक्षण केले व तो आपला द्रोह करतो आहे, असे त्यांनी त्या राणीच्या मनात, सहज बोलतां बोलता भरून दिले. तिला तें खरें वाटलें म्हणून, यशोधर विजयी होऊन थाटाने घरी पोचतो तोवर, तिनें त्याच्याकडे त्याला हद्दपार करण्याच्या इरायानें चोबदार पाठविले. ही तिची आगळीक पाहताच ठरावाप्रमाणे हिम्मक, ऐरमंतक, वगैरेंनी बंड केले. त्या वेळीं राणीकडीलहि कांहीं लोक तिच्या विरुद्ध झाले. पण मंत्री नरवाहनानें व तत्पक्षीयांनीं, तिचा पक्ष सोडला नाही. शुभधर वगैरे रागारागाने नगरात चढाई करून आले. तेव्हां राणीने आपल्या पुत्राला भट्टारक मठांत ठेवले. ( २४० ) आणि ती एकटीच राजवाड्याचीं दारे बंद करून बंदोबस्तानें राहिली. त्यावेळीं प्रतिपक्षाला तिचा पाडाव करता आला असता. पण ते दुर्दैवहत झाल्या मुळे तसें करण्याला चुकले दुसऱ्याच दिवशीं तिच्या पक्षाचे लोक येऊन पोंचले. तेव्हां तिला बराच दम आला.

जयभट्टारिका मठापासून शूरमठापर्यंतच्या भागांत जागजागी दोन्ही पक्षाच्या लोकांच्या झटापटी झाल्या. राणीच्या पक्षाचे सैनिक घाबरून पळाले. ते राजवाड्याच्या आश्रयाला आले. (भट्टारिका मठाचे–हल्ली ब्रडिमर या रूपानें नाव अद्यापि श्रीनगरच्या एका भागाला चालू आहे तो भाग वितस्तेच्या उजव्या तीरावर, चौथ्या व पांचव्या पूलांच्यामध्यें आहे. हा मठ चांगला मोठा व प्रशस्त होता. हे मठ मजबूत व चौकासारखे बांधलेले असत. राजवाड्यापेक्षां त्यांचें रक्षण जास्त चांगलें करतां येत असे. म्हणून संकट-समयीं त्याचाच आश्रय केला जात असे.) त्या प्रसंगीं एकांग लोक, आपल्या प्राणाची पर्वा न करितां, फळी बांधून, राजवाड्याच्या सिंहद्वारापुढें, त्या पळून आलेल्या लोकांना धीर देत उभे राहिले. त्यांच्यांतील कांहीं एकांगानीं नेटानें पुढे सरसावून, प्रतिपक्षाच्या बऱ्याच लोकांना मागें हटविलें. तितक्यांत राजकुलभट्ट येऊन पोंचला. त्याच्या सैन्याबरोबरच्या रण वाद्यांच्या आवाजानें शत्रुसैन्याला भय व राजपक्षीय सैन्याला हिम्मत आली व आनंद वाटला. तो आलेला पाहतांच प्रतिपक्ष हताश झाला व त्याचे सैनिक उधळून गेले. शस्त्रदेवतांना दुष्टद्रोह खपत नसतो.

भीम पराक्रमी हिम्मक हा लोखंडी साखळदंड व दगड सुद्धां सहज तोडतो, फोडतो असा त्याचा लौकिक होता व तो त्यानें खरा करून दाखविला होता. त्याने या लढाईंत आपली तीच तरवार राजपक्षीय सेनापति राजकुलभट्ट याच्या कमरेवर सपाट्यानें मारली असतांना, त्याच्या चिलखतावरील चामडें सुद्धां चिरलें नाहीं! ही असंभवनीय व विलक्षण गोष्ट पाहून, प्रतिपक्षाचे सैनिक दीन व हताश झाले, हिम्मक मारला गेला व यशोधराला सैनिकानी पकडलें. (२५०) तरी ऐरमंतक पुढें कांहीं काळ लढतच होता. पण त्याची तरवार मोडली व तो घोडयावरून पडला व जिवंत धरला गेला.

सुप्रसिद्ध राजपुत्र उदयगुप्त या लढाईंत होता. पण तो राजवंशी म्हणून त्याला सैनिकानीं धरलें नाहीं. तो लढाई सोडून कोणीकडे निघून गेला.

याप्रमाणें जय मिळतांच राणीनें रागारागानें, यशोधर, शुभधर, मुकुल व त्याचा भाऊ, यांना एकदम कैदेंत टाकलें आणि परिहासपुरवा शूर ऐरमंतक याला गळ्यांत दगड बांधवून वितस्तेंत बुडविलें. त्यानें गया क्षेत्रांत, काश्मीरी लोकांना श्राद्धांत द्याव्या लागणाऱ्या दक्षिणेसंबंधानें होणारा जाच नाहींसा केला होता. त्याचा राजद्रोह व दुर्वर्तन यांचें त्याला या जिवंत जलसमाधीच्या रूपानें प्रायश्चित्त मिळालें.

गोपाळ राजापासून अभिमन्यूपर्यंत साठ वर्षांत सोळा राजे झाले. त्यांचे प्राण, प्रताप आणि वैभव, यांचें हरण करणारे राजद्रोही असे सारे मंत्री व त्यांचे वंशज, आप्त इष्ट व आश्रित या सर्वांना त्या दिद्दारूपी दुर्गेनें, मोठमोठ्या असुरांप्रमाणें नुसत्या भूभंगानें निःशेष करून टाकलें.

अशा त्या गर्विष्ठ व उन्मत्त मंत्र्यांना उखडून टाकल्यानंतर, दिद्दा राणीनें रक्क वगैरेना कंपनाधिपतींचे व इतर मंत्र्याचे अधिकार दिले. इंद्रतुल्य पराक्रमी व मंत्रिसर्वोत्तम अशा राजनिष्ठ नरवाहनानें, त्या विधवा राणीला सारें राज्य निर्द्रोह व निष्कंटक करून दिलें होतें. त्यानंतर ती महेंद्राप्रमाणें थाटानें राज्य करूं लागली. ( २६० ) राणीनें कृतज्ञपणानें व मोकळ्या मनानें, त्या धुरंधर विश्वासनिधि, नरवाहन मंत्र्याला, सर्व मंत्र्यासमक्ष राजानक ही बहुमानाची पदवी दिली. तिचा त्याच्यावर अत्यंत विश्वास व लोभ होता. येथवर की, तो निजल्यावरच ती निजे, तो जेवल्यानंतर ती स्वतः भोजन करी, त्याला हर्ष झाला म्हणजे ती हर्षित होई व तो उदास व कष्टी असेल तेव्हां ती कष्टी होत असे. तो घरीं असतांना त्याच्या प्रकृतीविषयीं तपास केल्यावांचून व प्रत्येक कामांत त्याची सल्ला घेणे आणि त्याच्याकडे आपल्या आवडत्या वस्तु भेटीदाखल पाठविणें, या गोष्टी केल्यावाचून तिला चैन पडत नसे.

पूर्वी मेणे पालख्या वाहणारा कुय्य नांवाचा एक भोई होता. त्याला सिंधु व भुय्य नांवाचे दोघे पुत्र होते. वडील पुत्र सिंधु पर्वगुप्ताच्या घरीं एक आवडता नोकर होता. तो हळूं हळूं गंजाध्यक्ष झाला होता. कांहीं दिवसांनीं दिद्दा राणीनें त्याला गंजाधिकारी केलें. त्या कामावर तो फार दिवस होता. तो आपल्या कामांत फार हुशार

होता. त्यानेंच नवीन नवीन उत्पन्नाच्या बाबी काढून, उत्पन्न वाढविलें होतें. त्यानें सिंधु-गंज नावाची नवीन वसुलाची कचेरी कायम केली होती. त्या धूर्त व लबाड गृहस्थानें राणीला म्हटले की, ' नरवाहन मंत्र्यानें आपल्याकडून बहुतेक राज्यसत्ता लाटली आहे. ' त्यावर तिने ' होय, तसें झालें आहे खरे, ' असें म्हणून, आपली सम्मति दर्शविली. तिच्या मनावर अशा भाषणाचा तेव्हांच परिणाम होत असे. याच सुमारास दैवयोगानें नरवाहनाने तिला मोठ्या भक्तीनें व आदरानें आपल्या या घरीं मेजवानीला निमंत्रण केले. त्यावर सिंधूनें तिला भीति घातली की, ' आपण तिकडे गेला तर नरवाहन आपणांला व आपल्या लोकांना कैद करणार आहे. ' हे ऐकून राणीला भीति पडली व तिनें त्याला याविषयीं उपाय विचारला. ती निमंत्रणाप्रमाणें नरवाहनाकडे गेली. पण लगेच त्याला न कळत राजवाड्यांत परत आली. आणि तिने रजोधर्मिणी असल्याचे सांगून पाठविलें.

आपण निस्सीम राजनिष्ठेनें वागत असतांना राणी असें उलट वर्तन करीत आहे असें पाहून, ( २७० ) नरवाहन याचीहि निष्ठा व प्रेम कमी झालें. त्यांच्यामधील स्नेहभाव नष्ट झाल्यावर, खटपटी मंडळींनी, तेल निघालेल्या तिळाच्या पेंडेप्रमाणे त्याच्यामध्ये पुनः निःस्नेहपणा उत्पन्न केला.

वज्र हे सर्व धातूंनी अभेद्य, तसेच दगडी बांध पाण्याला अभेद्य, मानले जातात. पण असत्यापुढें कांहीच अभेद्य नसते. दिसण्यांत अर्भकाप्रमाणें खोटे व कुटिल लोक मूढपणात सुरगुरूपेक्षाहि कुशाग्रबुद्धि असतात. त्यांची उत्पत्ति व घटना कसल्या परमाणूंपासून होत असेल कोण जाणे. पक्के अविश्वासू व धूर्त असे कावळे, दुसऱ्या पक्ष्यांचीं कोकिळेची पोरे स्वतःचीं समजतात. चोचीने नीर व क्षीर निवडणाऱ्या हंसाला, शुष्क मयाची भीति वाटत असते. प्रजापालन समर्थ राजाला, दुष्ट व लबाड माणसांचें बोलणें खरें वाटतें. अशी ही चतुरता व मूर्खपणाची खिचडी, ज्याच्या कृतींत एकत्र दिसून येते, त्या विधात्याला धिःकार असो.

त्या लंगड्या व मूर्ख राणीला तिच्या या आचरणावरून लोक नांवे ठेवूं लागले. मूर्ख व श्रुतिचरण अनभिज्ञ ब्राह्मणासारखी तिची स्थिति झाली होती. ती वरचेवर नरवाहनाचे मन दुखवून त्याचा अपमान करूं लागली. त्यामुळे अत्यंत त्रासून जाऊन, त्यानें आत्महत्या केली. यशस्वी, मानधन व प्रज्ञावान लोकांना अप्रतिकार्य व दुःसह अवमान व त्रास होऊन अनिवार संताप आल्यावर मरणावांचून दुसरें कोणचें गत्यंतर असणार ?

नरवाहन नाहींसा झाल्यावर ती राणी व तिची राज्यलक्ष्मी, शशिवाचून रात्र, किंवा सत्यावांचून वाणी यांच्यासारखी निस्तेज झाली. तिचें मन क्रूरपणाच्या सवयीमुळें निढावलेले होतें. तिच्याजवळ शूर अशा संग्राम डामराचे पुत्र रहात होते. त्यांना मारावेण्याचा तिनें निश्चय केला. तसे ते घाबरून आपल्या उत्तरेकडील प्रांतांत असलेल्या घोष नांवाच्या गांवाला पळून गेले. तिकडे त्यांच्यावर द्वारनायक कल्यक वगैरेंनीं हल्ला केला. (उत्तर घोष–हल्लींचें उत्तर रगण्प्रांतील गुश नांवाचें खेडें. यालाच शारदामहात्म्य श्लोक १२४ मध्यें गोष म्हटलें आहे).

रण त्यांना त्यांनीं ठार मारिले. हें ऐकून राणीला बंड होण्याची भीति पडली व तिनें या झालेल्या अवमानाची लाज सोडून त्यांच्याशीं समेट करण्याचा प्रयत्न केला. त्यावरून ते तिच्याकडे परत आले. स्वार्थी लोकांना स्वाभिमान कोठून असणार? पण त्यांनी येण्यापूर्वी स्थानेश्वरादिक डामर नायकांनीं मेळ करून स्वतःला धीर आणला होता. त्यावेळीं रक्क मंत्री मरण पावलेला होता व राणीला डामरांचे भय वाटत होते. तिला कोणा तरी प्रबल माणसाची अवश्यकता होती. म्हणून तिने फलगुणाला बोलावून घेतले. त्याने शस्त्रसंन्यास केला होता तरी, राजकार्याप्रीत्यर्थ त्यानें पुनरपि त्याचें ग्रहण केले. भोगवासना त्याग करणे फार कठिण काम आहे. राजपुरी वगैरे जागी पूर्वी त्याने गाजविलेल्या पराक्रमाचा अद्भुत प्रभाव यावेळीं जणों त्या वृद्ध बंधकींचा-दिद्दा राणीचा-विकत घेतलेला गुलाम बनला. (राजपुरी-राजोरी-हल्लींचे राझवीर-हा प्रांत पीरपंत्साल या पहाडी रांगेच्या मध्यभागाच्या दक्षिणेस असून, त्याच्यात तोहि व तिला मिळणाऱ्या नद्या यांच्या पाणढाळाचा भाग येतो. ते एक लहानसें पहाडी संस्थान होतें. त्याचा काश्मीराशी पुष्कळसा संबंध होता.)

राणीचा भाऊ उदयराज याचा प्रिय जोडीदार व अक्षपटलाचा अधिकारी दुर्बुद्धि जयगुप्त याने दुसऱ्या तशाच क्रूर व दुष्ट अधिकाऱ्यांशीं मिळून, प्रजेच्या पापाने दूषित झालेल्या, त्या साऱ्या काश्मीर मंडळात, मनमुराद लूट चालविली होती.

अभिमन्यू राजा आपल्या मातेच्या दुष्ट व दुराचारमूलक पापकर्मांनी खिन्न व उद्विग्न झालेला होता. त्याला या सुमारास क्षयाची भावना झाली. त्याचे नेत्र कमलाप्रमाणे सुरेख दिसत असत. तो पूर्वीपासून शास्त्रनिपुण व विद्वान लोकाना फार प्रिय असे. विद्या व तारुण्य यांच्यामुळे तो उज्ज्वल व प्रेक्षणीय वाटत असे. ( २९० ) पण पुढे दुष्ट व दुर्वृत्त लोकाच्या संपर्काने, सूर्यतापाने कोमजलेल्या शिरीष पुष्पाप्रमाणे, तो सुकून गेला. शेवटीं त्या प्रजेला आनंद देणाऱ्या चंद्राला अर्ध्या सुद्धा कला प्राप्त होण्यापूर्वीच लौकिक शक ४०४८-ई. स. ९७२-वर्षी कार्तिक शुद्ध ३ ला, दुर्दैवरूपी राहूने ग्रासून टाकले.

**राजा नंदिगुप्तः**—( ई. स. ९७२-९७३ )

त्याच्यामागून दिद्दा राणीने त्याचा अल्पवयी पुत्र नंदिगुप्त याला गादीवर वसविले. गाढ पुत्रशोकानें तिच्या हृदयांत जणो कायमचे ठाणे दिले. त्यामुळे तिच्या क्रूरपणावर तात्पुरतें पाघरूण पडले व ती काहींशी नरम झाली. अंधेर पडल्यावर सूर्यकांत मणिशलाकेचा उष्णता प्रकट करण्याचा गुण झाकला जातो, तशी तिची स्थिति झाली होती.

तेथून पुढे तिचीं धार्मिक कृत्यें करण्याकडे विलक्षण प्रवृत्ति झाली आणि तिने वाईट मार्गाने संपादन केलेल्या संपत्तीला चांगुलपणा आणिला. सिंधूचा भाऊ नगराधिपति भुय्य हा मोठा सज्जन व सद्वर्तनी होता. तो तिच्या धार्मिक प्रवृत्तीला उत्तेजन देत असे. त्यानेंच तिच्या मनांत प्रजेविषयी प्रेम व अनमोल कळकळ उत्पन्न केली. तेव्हांपासून तिनें दुष्टपणा सोडला. त्यामुळे तिच्याविषयीं सर्वांना आदर वाटू लागला व ती प्रजेला प्रिय झाली. प्रखरपणा किंवा क्रूर स्वभाव सोडलेले हेमंतांतील सूर्यासारखे, सुखसेव्य, साचिव सुंद-

वानें व काचितच प्रजेला लाभतात व राजसेवा सुखप्रद करतात. दिद्दा राणीनें आपल्या पुत्राला पितृलोकीं पुण्यप्राप्ति व्हावी म्हणून, अभिमन्युपुर व अभिमन्युस्वामी यांची त्याच्या नांवानें स्थापना करविली. तसेंच स्वतःच्या नांवानें दिद्दापुर व दिद्दास्वामी यांची स्थापना केली आणि मध्यदेश लाट व सौदोत्र इकडील लोकांना राहण्यासाठीं एक मठहि बांधविला. ( ३०० ) ( या दोन्हीं पुरांचा व मंदिरांचा पत्ता लागत नाही. दिद्दा मठाचा उल्लेख पुढें तरंग ७ श्लोक ११ व तरंग ८ श्लोक ३४९ यांत आला आहे. श्रीनगरांतील वितस्तेवरील सातव्या व आठव्या व पुलांमधील उजव्या तिरावरील दिद्मर या भागाला तें नांव दिद्दापुर यावरूनच पडलेलें असावें )

या मनोज्ञा राणीनें आपल्या पतीला पुण्य लागावें म्हणून, त्या कंकणवर्षी—कनक कंकणाची वृष्टि करणाऱ्या—राजाच्या नांवानें कंकणपुर वसविलें. तसेंच तिनें पांढऱ्या पाषाणाचें दुसरेंहि दिद्दास्वामीचें मंदिर तयार करविलें. तें मंदिर श्रीविष्णूच्या चरणकमलापासून निघालेल्या गंगेच्या जलानें धुतल्यासारखें स्वच्छ व सफेत होतें. ( कंकणपुर हल्लींचें सिंधु-नदीच्या उजव्या तीरावरील कंगण नांवाचें खेडें असावें. ) याशिवाय तिने काश्मीरी व देशी लोकांना राहण्यासाठीं एक उंच व प्रशस्त चौसोपी विहार बांधविला आणि आपला पिता सिंहराज यांच्या नांवानें सिंहस्वामीचें मंदिर व परदेशी ब्राह्मणांना राहण्यासाठीं एक मठ बांधविला. ( सिंहराज मठाचा पुनः उल्लेख तरंग ७ श्लोक १५६८ यांत आला आहे. तो मठ विजयेश्वराजवळ असावा असें दिसतें. विष्णुसिंहराज स्वामीच्या एका मंदिराचा उल्लेख तरंग ८ श्लोक १८२२ यांत आलेला आहे. )

अशा तिनें केलेल्या मठप्रतिष्ठा व वैकुंठ निर्माण वगैरे धर्म कृत्यांची व मंदिरांची तपशीलवार यादी कशाला पाहिजे, तिनें निरनिराळ्या स्थळीं मिळून चौसष्ट मंदिरें बांधवून त्यांच्यांत देवताप्रतिष्ठा करविल्या, असें म्हणतात. तिनें जीर्णोद्धार करण्याचें मनांत आणून ज्या ज्या मंदिरांचे कोट जळून गेले होते, त्या सर्वांचे ते कोट दगडी बांधविले.

पळण्याच्या खेळांत त्या लंगड्या राणीला पाठीवर घेऊन पळणारी वल्गा नांवाची दासी होती. तिनें वलगा मठ बांधविला,

तिमिंगल मासा नेहमीं तीर्थांत वास करतो व मौन धरून असतो, तरी तो सारखा आपल्याच ज्ञातिबांधवांना खात असतो. नुसतें घनांबु पिणारा शिखी वाताशनी सर्पांना खातो. सारखा ध्यानस्थ बसलेला बगळा विश्वासानें जवळ येणाऱ्या माशांना मटकावीत असतो. त्याप्रमाणें दुष्ट माणसांची धर्मकृत्यें आणि पापाचरण, यांचा कांहीं नेम सांगतां येत नाहीं.

एक वर्षानंतर त्या पापी व जारिणी राणीचा शोक कमी पडला व ती पुनः भोगोत्सुक झाली तिनें आपल्या अल्पवयी नातवावर अभिचार प्रयोग करविला.( ३१० ) आणि त्याला लौकिक शक ४०४९ (ई. स. ९७३) वर्षी मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीला ठार मारविलें. तसेंच तिनें आपला दुसरा नातु त्रिभुवन याला लौकिक शक ४०५१ (ई. स. ९७५) वर्षी मार्गशीर्ष शुद्ध पंचमीला त्याच रीतीनें मारविलें. पुढें तिनें आणखी एक नातु भीमगुप्त याला

गादीवर–म्हणजे मरण शय्येवर–आणून बसवून त्याचाहि प्राण घेतला. (राजा त्रिभुवन ई. स. ९७३ ते ९७५ याचीं कांहीं थोडीं दुर्मिल नाणीं सांपडलीं आहेत. त्यांच्यावर त्रिभुवन गुप्त असें नांव आहे. राजा भीमगुप्त (ई. स. ९७५ ते ९८०–८१) हा राजा ई. स. ९७६–७७ त राज्य करीत असल्याचें, आनंदवर्धनाच्या देवी स्तोत्रावरील टीकेंत चंद्रादित्याचा पुत्र कैय्यट यानें लिहिलेलें आहे.)

याच सुमारास वृद्ध मंत्री फल्गुण मरण पावला. त्याच्या धाकाने त्या दुष्ट व क्रूर दिद्दा राणीने आपले दुर्गुण कांहीसे झांकून ठेवलेले होते. तो मेल्यानंतर ती उद्दाम झाली व शेंकडों दुष्कर्में व दुराचार उघडपणें व निःशंक करूं लागली आणि ती मस्तींत आलेल्या हत्तिणीसारखी, निरंकुश व तोंडावरील पडदा टाकून वागूं लागली.

मोठ्या कुलांत उत्पन्न झालेल्या स्त्रियांची महा नद्यांच्या सारखी उपजतच नीचगामी प्रवृत्ति असते. याला काय म्हणावें कळत नाही. साऱ्या जलाचा राजा सागर, त्याच्यापासून निघालेली लक्ष्मी, लहानशा पल्वलांत पैदा झालेल्या पद्माशीं संसक्त असते. तद्वत प्रथित कुलोत्पन्न स्त्रिया नीचि भोग्या होत असतात, हे ठीकच आहे.

पर्णोत्समधील बद्दिवास या खेडयांत खश जातीचा बाण नांवाचा गुराखी होता, त्याचा पुत्र तुंग हा म्हशी राखीत असे. (बद्दिवास हल्लींचें बोडेल किंवा बुडिल हे मोठेंसें खेडें पीरपंत्सालच्या दक्षिणेस आन्स नदीच्या वरच्या भागांतील एका नाल्यावर आहे. तें पर्णोत्स परगण्याच्या अलीकडील हद्दीपासून दूर असून, मध्यंतरीं एक पहाडाची रांग आलेली आहे.) सुगंधिसीह, प्रकट, नाग, अट्टायिक, अशा आपल्या पांच भावांबरोबर तो काश्मीरांत आल्यावर, लेखहराचें–जासुदाचें–काम करूं लागला. तो एकदां संधिविग्रहक मंत्र्याकडे सहज दिद्दा राणीच्या दृष्टी पडला. तेव्हां तिचें मन त्याच्यावर बसलें. (३२०) तिनें त्याला गुप्तपणे एका दासीमार्फत बोलावून घेतले. दिद्दाराणीचे दुसरेहि अनेक यार होते. पण दैवयोगानें तिच्या मनांत त्याच्याविषयी विशेष अनुराग उत्पन्न झाला. पुढें त्या तुंगानुरागिणी पापी राणीने, भुय्यानें आपली नाराजी व्यक्त केली म्हणून त्याला विष देऊन मारविलें.

प्रसन्न झाल्यावर नुसती पोकळ प्रशंसा करणारे व इनामें न देणारे, पण यत्किंचित अपराध घडतांच प्राण व धन यांचा नाश करणारे, अशा दुष्ट धन्यांना धिक्कार असो!

मंत्री रक्क याचा पुत्र देवकलश हा वेलावित्त होता. त्याला राणीनें भुय्याच्या जागीं नेमलें. तो फारच नीच व निर्लज्ज असून, कुंटणपणा करीत असे. कर्दमराज वगैरे द्वाराधिपती आणि मुख्य मंत्री हे सुद्धां यावेळीं कुंटणपणा करीत, तेथें दुसऱ्यांची गणनाच काय करावयाची?

चार पांच वर्षे राजवाडयांत राहिल्यावर भीमगुप्त बराच प्रबुद्ध झाला होता. राज्य-कारभारांतील गोंधळ व आपल्या आजीचें दुर्वर्तन त्याच्या बरेंच लक्षांत येऊन त्यांत सुधारणा होणें अवश्य आहे, असें त्याला वाटूं लागलें. त्यावरून त्या चंचलचित्त राणीच्या मनांत त्याच्याविषयीं शंका व अविश्वास उत्पन्न झाला. ती स्वभावतःच निर्घृण आणि शरी-

राने तशीच नैतिक आचरणानें विकलांग होती. भीमगुप्त थोर कुलांत पैदा झालेला होता. यामुळेंच तो असा चांगला होता. त्याला अभिमन्यूच्या राणीनें गुप्तपणें आणवून आपल्या मुलाच्याऐवजीं बदलून घेतलें होतें. दिद्दा राणीनें घाबरून देवकलशाच्या सूचनेप्रमाणें भीमगुप्ताला उघडपणें कैद करविलें. ( ३३० ) पूर्वी तिनें नंदिगुप्त वगैरेच्या संबंधांत गुप्तघात करविल्याविषयीं लोकांच्या मनांत शंका आलेली होती. ती या तिच्या राजरोस कृतीनें खरी ठरली. तिने भीमगुप्ताचे कैदेंत फार हाल करविले. शेंवटी नाना प्रकाराने छळून त्याचा प्राण घेतल्यावर ती लौकिक शक ४०५६ (ई. स. ९८०–८१) वर्षी स्वतःच सिंहसनारूढ झाली.

**दिद्दा राणीः**—(ई. स. ९८०–८१ ते ई. स. १००३ )

त्या राणीचे तुंगावर फारच प्रेम बसलेलें होतें. तिने त्याला हळूं हळूं वाढवीत, सर्वाधिकारी केलें. तो सर्व मंत्र्यांमध्ये वरिष्ठ आणि भारी उद्दाम झाला त्यानें आपल्या भावांनाहि श्रेष्ठ अधिकाराच्या जागा दिल्या.

पुढे तुंगामुळे व त्याच्या भावांच्यामुळें कामावरून दूर झालेल्या मंत्र्यांनी नाराज होऊन, अपसांत कट करून बंड करण्याची खटपट चालविली. त्यांनी राणीचा शूर कारस्थानी व प्रबल भाचा विग्रहराज याला काश्मीरात बोलावून घेतले. त्यानें येतांच राज्यांत गडबड उठविण्यासाठी मुख्य मुख्य अग्रहारांतील ब्राह्मणांकडून एकमताने प्रायोपवेशन करविले. तसे इतर सर्व लोकहि बिथरले आणि त्यानीं तुंगाला ठार मारण्यासाठीं त्याचा शोध चालविला.

दिद्दा राणीला, यामुळे बंड होण्याची भीति पडली व तिने तुंगाला काही दिवस एका बंद व सुरक्षित जागीं लपवून ठेवले. नंतर तिनें सुमनोमंतक वगैरे ब्राह्मणांना लांच देऊन वश केले आणि प्रायोपवेशनें बंद पाडलीं. याप्रमाणें त्या प्रबल प्रतिपक्षाचे लाच देऊन निरसन होतांच विग्रहराज निरुत्साह व हतवीर्य होऊन, आला होता तसाच परत गेला. ( ३४० )

तुंग व तत्पक्षीय लोक पुन. अधिकारी व पूर्वीपेक्षांहि अधिक दृढमूल झाले आणि त्यानीं हळूं हळूं बंडखोर कर्दमराज वगैरेंना ठार मारविले आणि रक्काचा पुत्र सुल्कन–सुलक्षण–व इतर मंत्री, यांच्यावरहि राणीची इतराजी करवून, त्यांना हद्दपार केलें. पुढे कांहीं दिवसांनीं त्यानीं राणीला प्रसन्न करून त्यांच्यांतील काहींना परत बोलावले.

विग्रहराजाचें वैर वाढतच होते. त्यानें पुनः गुप्त दूताकरवी ब्राह्मणांना प्रायोपवेशन करण्याला उत्तेजन दिले. पण तोवर तुंगाचा अधिकार दृढमूल झाला होता. त्यानें त्या-ब्राह्मणांना लांच देऊन त्यांचे प्रायोपवेशन बंद पाडले.

त्या ब्राह्मणांमध्यें विग्रहराजाच्या मर्जीतला कटक वारिक कामगार गुप्तपणे राहात होता. तो पळून जात असतांना मारला गेला. वत्सराज नावाचा एक प्रतिहारहि पळून जात होता. त्याचा पाठलाग करून न्यंकोत वगैरेंनीं त्याला पकडलें. शिवाय पुढें तुंगानें त्या लांच घेणाऱ्या सुमनोमंतक वगैरेंनाहि कैदेंत टाकलें.

फल्गुण मरण पावलेला पाहून पुढे लौकरच राजपुरीचा राजा पृथ्वीपाल यानें दांडगाई आरंभिली. त्यावरून सर्व मंत्री चिडले व त्यांनी त्याच्यावर चढाई केली. हे मोठेंच संकट आलें होतें. तरी पृथ्वीपालानें मोठ्या धैर्यानें हल्ला करून एका घाटीत काश्मीरी सैन्याची त्रेधा उडविली. त्या हल्लयांत मंत्री शिपाटक व हंस हे मारले गेले आणि चंद्र वगैरे मंत्र्याची मरण बरे, अशी दुर्दशा झाली. ( ३५० )

इकडे तो शूर तुंग व त्याचे बंधू, यानी दुसऱ्याच मार्गानें घुसून जाऊन राजपुरी जाळून टाकली. त्यामुळे पृथ्वीपालाचा पराभव झाला आणि इतर मंत्र्यांच्या सैन्याची त्या घाटीत आलेल्या प्राण संकटातून मुक्तता झाली. अशा निरुपायाच्या स्थितीत पृथ्वीपालाला तुंगाला करभार द्यावा लागला.

याप्रमाणे मंत्री तुंग याने या प्रसंगी अंगावर झालेल्या कठिण प्रसंगांतून आपली बाजू सांवरली. तेव्हां तिकडून परत आल्यावर राणीनें त्याला कंपनेश केले. पुढे त्यानें असाच सारखा पराक्रम करीत राहून डामर सैन्याचाहि फडशा पाडला.

यानंतर दिद्दा राणीने निश्शंकपणानें आपला बंधु उदयराज याचा पुत्र संग्रामराज याला युवराज केल. त्यापूर्वी तिने त्याची परीक्षा करण्यासाठी त्याच्या व आपल्या इतर सर्व भाचाच्या पुढें शेव नांवाच्या फळाच्या राशी टाकविल्या व त्यांच्यांतून कोण किती घेतो ते पांहण्याकरिता त्यांच्यामध्यें चढाओढ लावली. ते अपसांत भांडू लागले. त्यांतील बहुतेकांनी थोडीच फळे मिळविलीं पण संग्रामराजानें पुष्कळ फळे मिळवूनहि इतर राजपुत्राप्रमाणें त्याला कांही लागले नव्हतें. हें पाहून तिला, कौतुक वाटलें व तिनें त्याला 'मुळीच मार न खातां इतकीं पुष्कळशी फळें कशीं मिळविलीस' असा प्रश्न केला. तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, ' मी त्याच्यामध्ये आपसांत कलागत लावून स्वस्थ वेगळा राहिलो. म्हणून मला मुळीच धक्का न लागता ही इतकी फळें स्वस्थपणें मिळविता आलीं. '

स्वतः परिश्रम न करता भाडणे लावून नांवानिराळे राहणाराना कोणची म्हणून स्वार्थसिद्धि प्राप्त होणार नाही ? (३६०)

ती स्वतः स्त्री, स्वभावतःच भीरु, त्याच्या हुषारीचें व सावधपणाचें निदर्शक असे त्याचे तें उत्तर ऐकून तिला तो राज्य करण्याला लायक आहे, असें वाटलें.

शूर लोकाना आपलें कार्य शूरपणानेंच होईल किंवा व्हावें असें वाटत असते. त्याचप्रमाणे भित्र्यांना तें सावधपणानेच साध्य होतें किंवा व्हावें, असें वाटणें साहाजिकच आहे. अग्निस्पर्श न झालेले देखील लांकूड—वानेरधन—माकडांना शीत निवारक वाटत असतें. तसेंच अग्निशौच एणक—मृगाच्या चर्मांची शुद्धि जल व अग्नि यांनीं होत असते. प्रत्येक प्राण्याचें कार्य निरनिराळ्या पदार्थांपासून पार पडत असतें. ते त्यांच्या केवळ गुणधर्मामुळे नव्हे.

पुढें लौकिक शक ४०७९ (ई.स.१००३) या वर्षी भाद्रपद शुद्ध अष्टमीला दिद्दा राणी देवलोक झाल्यावर तो युवराज केलेला संग्रामराज गादीवर बसला. या काश्मीर मंडळांतील भूपाल वंशांत विवाहसंबंधामुळे झालेला हा विलक्षण असा तिसरा फेरपालट होय.

एकाद्या उपवनांतील वाईट झाडें झुडपें दावानलानें दग्ध होऊन पर्जन्य वृष्टीनें ओलावा आल्यानंतर, त्यांच्यांत चूत प्ररोह–आंब्यांची कलमें–वाढूं लागतात, त्याप्रमाणें या सुसंपन्न व समृद्ध काश्मीर मंडळांतील शत्रुरूपी कंटक नष्ट झाल्यानंतर श्रीसातवाहन कुलाचा उदय झाला.

या संग्रामराजाचें अंतःकरण फार कोमल होतें. त्याचा दृढ निश्चय त्याच्या मृदु स्वभावाखालीं दबलेला होता. शेष आपल्या कमलनालाप्रमाणें शोभणाऱ्या फणांच्या खालीं आपले तीव्र विषोद्गार झांकून ठेवून साऱ्या पृथ्वीचा भार त्या फणांवर धारण करीत असतो. त्याप्रमाणें त्या संग्रामराजानें आपल्या भुजबलानें सर्व पृथ्वीचें रक्षण व पालन करीत तिला सुख दिलें. ( ३६८ )

श्रीकाश्मीरक महामात्य चंपक प्रभु पुत्र कल्हणकृत, राजतरंगिणीचा साहावा तरंग समाप्त. याच्यांत चौसष्ट वर्षे साडेआठ महिने, इतक्या अवधींत दहा राजांनीं राज्य केले त्यांचे वर्णन आलेलें आहे.

---

# तरंग सातवा.



'विधात्यानें तुझ्या मातेची तनु निर्मल अशा पितृगणाच्या कुलांत पैदा केलेली आहे. तूं या संध्यासमयीं आलिंगन देऊन गमतीनें माझ्या जपाकुसुमसम आरक्त किंवा जप करण्यात गुंतलेल्या अधरोष्ठाशीं खेळते आहेस, याला काय म्हणावें.' अशा वाक्छलाच्या द्वारें, संध्या देवीची स्तुति करीत असल्यामुळें सवतीमत्सर वाटत असलेल्या गिरिजेची स्तुति करीत, संध्या वंदन चालू ठेवणारे ते गौरीश्वर सर्व जगताचें प्रिय करोत.

**राजा संग्रामराजः**—(ई. स. १००३ ते १०२८) तो संग्रामराज भूपति आपल्या मनानें क्षमा व प्रबल भुजांनीं क्षमा किंवा पृथ्वी इचें धारण करीत होता. त्यानें वाहिनीपती–सेनांचेपती–राजे व वाहिनी–नद्या–यांचा अधिपति सागर, यांच्यावर आपल्या गांभिर्यादि गुणांनीं ताण केली होती. दिद्दा राणी मेल्यामुळें तुंगाचें महत्त्व नष्ट होऊन तो दिनश्री मावळलेल्या सायंकाळच्या सूर्यबिंबासारखा विरागी होणार, असें लोकांना वाटलें. पण अनेक प्रतिपक्ष्यांची खोड मोडून, तो एकदम विलक्षण उन्नत झाला. विधिविलसताची अटकळ कोण करणार?

या सुमारास शूर, समर्थ व सर्वाधिकार योग्य असा राजाचा आप्त चंद्राकर मरण पावला. तसेच भीमतिका गांवचा सुसंपन्न दिविर–कुलकर्णी–पुण्याकर याचे शूर पुत्रहि मेले. अशा योग्य व समर्थ मंत्र्यांच्या अभावीं राजाला मनांत नसूनहि निरुपायानें तुंगाला जवळ करावें लागलें होतें. आसन्नमरण दिद्दा राणीनें राजा व तुंग वगैरेंकडून परस्पर निर्द्रोह करण्याविषयीं तीर्थजलपानपूर्वक शपथा करविल्या होत्या.

त्या राजाला राजकार्य जड वाटलें. त्याचे परिश्रम त्याला होईनात. तो ऐषआराम

मग्न रहात असे. त्याने सर्व राज्यकारभार तुंगावर सोपविला. त्याच्या भ्याड व हलकट स्वभावाचें कोठवर वर्णन करावें? स्वतःस समर्यी साहाय्य मिळावें म्हणून त्यानें राजकुलाशीं असम अशांशीं सोयरीकी केल्या व यामुळें झालेली बदनामी मुकाट्यानें सोसली. (१०) त्याने आपली कन्या लोठिका इला दिद्दा मठाचा अधिपति–मुख्य कामगार–समृद्ध व धैर्यादि गुणयुक्त प्रेम, याला दिली. कोठे दिग्विजय करण्याला समर्थ राजाला योग्य राजकन्या आणि कोठें दानजलानें नेहमीं हात ओले झालेला क्षुद्र द्विज!

पुढे तुंगाच्या पक्षाचा पाडाव करण्यासाठी ब्राह्मण मंत्र्यांनीं परिहासपुर वगैरे ठिकाणच्या ब्राह्मण परिषद्यांकडून प्रायोपवेशन सुरू करविले. मंत्री व ही ब्राह्मण मंडळी यांचा हा मेळ व कट पवमान व अग्नी यांच्या मेळाप्रमाणे दुस्सह व हाणून पाडण्यास कठिण झाला. त्यांचा विचार राजाचेंच उच्चाटण करण्याचा होता. पण बऱ्याच वाटाघाटी, नंतर, तुंगाला अधिकारावरून दूर करणे, इतकाच क्षांतिचरु पतकरण्यास ते कबूल झाले. ही गोष्ट राजानें व तुंगाने मान्य केली. तसे ते मूर्ख व नष्ट द्विज आपल्या मागण्या वाढवीत हातपाय पसरूं लागले. त्यांनी एका विहिरींत पडलेलें विप्राचें प्रेत काढून, तो तुंगाच्या जुलमामुळे मेला, सबब त्या प्रेताचा अग्निसंस्कार तुंगाच्या घराला आग लावून, त्याच्यांतच करण्याचें ठरविले व त्याप्रमाणे त्यांनीं ते प्रेत तिकडे नेले. त्यांनीं केश होमाच्या द्वारे कृत्या उठविली होती, ती जणों उलटली. तुंगाच्या घराजवळ दंगा झाला. त्यांत शस्त्राशस्त्री होऊन ती अशुचि कृत्या त्या द्विजांच्या नाशासाठी, त्यांच्यावरच पडली. तुंगाच्या लोकांनी हल्ला केला. तसे ते द्विज उधळून राजकलशाच्या वाड्यांत आश्रयाला गेले. तो या कामीं त्याचा गुप्त सल्लागार होता. ( २० ) आपले कपट उघडकीस आलेले पाहून-राजकलश पुष्कळ वेळ लढला. तोंवर ते विप्र पक्षद्वारांनी आपापल्या घरी पळून गेले.

राजकलश हटलेला पाहून त्याच्या पक्षाचे दुसरे ब्राह्मण व श्रीधराचे-मंत्री असलेले–सात पुत्र तेथें पोहोंचले. त्यांनी लढण्याची शिकस्त केली. शेवटीं ते सारे मारले गेले. तुंगाचा धाकटा भाऊ सुगंधसिंह याने राजकलशाला पकडलें होतें. तो जखमी व निःशस्त्र झालेला होता. त्याला तुंगाने आपल्या समोर आणविले. तुंगाच्या शिपायांनीं वाटेंत त्याची हालर अपेष्टा केली. ते त्याच्या खांद्यावर बसले. त्यांनी त्याला नाचविलें व पळविले. मंत्री भूतिकलश व त्याचा पुत्र राजक हे पराभव पावून शूर मठाला गेले. पुढें कांहीं दिवसांनी सुगंधसिंह वगैरेंनी राजकलशाला कृपा करून सोडून दिले. तेव्हां तो अवमानरूपी आगींत पोळलेला, पुत्रासह परदेशीं गेला.

याप्रमाणे परिहासपुराहून उठलेले हे राज्यावरील अरिष्ट, सुदैवाने उलटें तुंगाला शुभ फलप्रदच झाले. पुढे मंत्री गणदेवाच्या मार्फत राजाची प्रसन्नता मिळवून, भूतिकलशहि गंगास्नान करून परत आला. त्यानें हळूं हळूं राजाश्रय संपादन केला आणि कांहीं दिवसांनीं तुंगावर गुप्त मारेकरी घालण्याचा बेत केला. ( ३० ) तो तुंगाला कळतांच, त्याने राजाला कळवून त्याच्याकडून भूतिकलश व त्याचा पुत्र यांना पुनः हद्दपार केलें.

चंद्राकराचा पुत्र मय्यामंतक याची कांहीं काल बरीच चलती होती. तो आणि

कांही दिवस राजकन्या समागमाला पात्र होऊन, राजाच्या उपयोगी पडलेला मठपति प्रेम, हे या सुमारास मरण पावले. शिवाय राजाच्या लोभांतले गंग वगैरे लोकहि नाहींसे झाले आणि तुंग व त्याचे बंधू हेच अधिकार व सुखोपभोगाला उरले. तुंगाला खास घातक होतील अशा वाटलेल्या सर्व गोष्टी सुदैवाने उलट त्याला उपकारकच झाल्या.

कालवशात आधारभूमि खरडून जाऊन केवळ मुळाच्या आधारावर टिकलेला नदीतीरावरचा वृक्ष, पूराच्या पाण्याने ऐन पडण्याला झालेला, त्याच पूराने आणून जमविलेल्या गाळाने, ती आधारभूमि घट्ट होऊन, तेथेच पक्का जमावा, तशातलाच हा विलक्षण प्रकार झाला.

तुंगाचा कारभार उज्ज्वल व नीतीचा असे. तो नेहमी प्रजेचें आराधन करण्यात तत्पर रहात होता. पण पुढे पूर्व पुण्याई संपल्यामुळे त्याची बुद्धि हळू हळू अस्थिर व भ्रष्टशी झाली आणि त्याने हीन कुलोत्पन्न व क्षुद्र अशा भद्रेश्वर नांवाच्या कायस्थाला आपला मदतनीस केले. तोच त्याच्या भाग्याला हानिकारक झाला. भद्रेश्वर हा मूळचा भाजीपाला करणारा बागवान. त्या कामांत त्याला घाण खत वाहावें लागे. तो शेणी व लाकडे विकी. कसायाचेंहि काम तो करीत असे. त्याचे धंदे असले हीन व हलकट होते. पुढे तो अंगावर जाडेंभरडे कापडयाचे डगले घालून कामगारामागे त्यांची दप्तरे व व दौती घेऊन, पोटासाठी फिरत असे. ( ४० )

तुंगाने अनेक राजकर्त्यांच्या भारामुळे थकून जाऊन, असल्या त्या हीन कायस्थाला मदतनीस केलें. तेव्हा त्याच्यामुळे स्वतःचा भाग्यक्षय होत असलेला, त्याला कळला नाही. त्यानें त्या दुष्टाला थोर व धर्मशील धर्मार्कीच्या जागी, राजग्रहकृत्याधिकारी नेमले. तेव्हा त्याने जणो अकाल मृत्यूच बनून, राजोपजीवी देव, गोब्राह्मण, अनाथ व अतिथी, यांच्या वृत्तींचा उच्छेद चालविला. निर्घृण व प्रेतोपजीवी कापालिक देखील स्वकीयाचे पोषण करतो. पण त्या पापी भद्रेश्वरानें आपल्या आप्तानाहि जिवंत सोडले नाही. तुंगाने त्याला चैत्रांत सर्वाधिकारी केले. पुढें आषाढात सर्व राज्यकारभाराचा भार धारण करण्यास समर्थ असा त्याचा धाकटा भाऊ सुगंधसिंह, मरण पावला. तेव्हा तुंगाला जणो स्वतःचा शिरच्छेदच झालासे वाटून दुःख झाले.

राजाने मार्गशीर्ष महिन्यांत त्याला त्रिलोचनपाल शाही याच्या सहाय्याला पाठविलें. त्या शाहीने राजाचे सहाय्य मागितले होतें. त्यावेळीं त्यानें तुंगाबरोबर राजपुत्र, मंत्री, सामंत, महामात्य, यांनी युक्त व त्रिभुवन क्षोभ करण्यास समर्थ, असे भारी सैन्य दिलें होतें. शाही त्याला पुत्रासह सामोरा आला व त्यांनी त्याचें थाटाने स्वागत केले. तुंग त्या देशांत पाच सहा दिवस स्वस्थ व बेफिकीर राहिला. तो उद्दाम व मस्त होता. त्यानें चौकी पहारा, जाग, शस्त्राभ्यास, सैन्याची हालचाल व पाहणी आणि जागजागीं बंदोबस्ताची वाटणी, किंवा हल्ला करण्याची, अथवा तो झाल्यास त्याचा प्रतिकार करण्याची तयारी, वगैरे गोष्टींकडे कांहींच लक्ष दिले नाही. हे पाहून शाहीने त्याला म्हटलें.

( ५० ) ' तुरुष्काच्या युद्धाच्या तऱ्हेची माहिती होईपर्यंत आपण या पहाडी पठारीवरच राहिलेले बरे. ' पण ही हिताची गोष्ट न ऐकतां तुंगाने घाई चालविली.

तुरुष्क सरदार हम्मीर याने कांही फौज टेहेळणीसाठी पाठविली होती. तिचा तुंगानें तौसी नदी उतरून मोड केला. यामुळे त्याला वीरश्री चढली व गर्व झाला. तरी युद्ध-कला विशारद शाही त्याला पूर्वीचीच सल्ला देत होता. पण या विजयप्राप्तीने शेफारून, लढाईविषयी आतुर बनलेल्या तुंगाने, ती ऐकली नाही. नाश आसन्न असेल त्यांना केलेला उपदेश व्यर्थ होतो. सकाळी, युद्धांतील व्यूह रचण्यात निपुण अशा तुर्की सेनापति हम्मीराने रागानें व नेटाने हल्ला चढवितांच तुंगाच्या सैन्याची दाणादाण झाली. तरी शाहीचे सैन्य कांहीं वेळ लढलें. नंतर तीं दोन्ही सैन्यें परत फिरली. त्या रणभूमीवर जयसिंह, श्रीवर्धन व संग्राम डामराच्या कुलांतील विभ्रमार्क, हे तीघे त्वेषाने लढत व चमकत राहिले. त्या वीरक्षेत्रांत घोडयांच्या टापांचा खणखणाट सारखा ऐकू येत असतांना, जोराने हाणामारी करणाऱ्या त्या तीघा शूर व थोर वीरांनी, आपल्या देशाचें यश कांहीं काळ राखलें. त्या रणांत केलेल्या शाही त्रिलोचनपाल याच्या महत्त्वाच्या कामगिरीचे व त्याच्या शौर्याचें यथार्थ वर्णन कोण करूं शकेल ? शत्रू असंख्य असूनहि ते त्याला जिंकू शकले नाहीत. ( ६० ) तो रुधिरासारवर्षी त्रिलोचन, कल्पांती प्रखर दहनज्वाला पसरविणाऱ्या त्रिलोचना-कालरुद्रा-प्रमाणे शोभत होता. शेवटी अंगीकृत कार्याचे महत्त्व व वेळप्रसंग लक्षात आणून, तो त्या कोटयावधि शत्रूरूपी संकटांतून एकटाच पार निघाला. तो दूर जातांच, शत्रूची प्रचंड चंडाल-चमूरूपी टोळधाड, त्याच्या सर्व देशभर पसरली. श्री त्रिलोचनपालाच्या विलक्षण शौर्याचे स्मरण असल्यामुळे हम्मीर हा विजय मिळवूनच स्वस्थ व संतुष्ट राहिला नाही. शाही राज्यभ्रष्ट झाला होता तरी त्याने आपल्या हत्तींच्या सैन्य विभागाच्या आश्रयाने जयश्री परत मिळविण्याची नेटाने खटपट चालू ठेवली होती.

पुढे लौकरच या शाही राज्यश्रीचें नावसुद्धां नष्ट झाले. यासंबंधांत येथवर विशेष वर्णन आलेलें नाहीं म्हणूनच हा प्रसंगोपात्त थोडासा उल्लेख केला आहे. स्वप्नांत सुद्धा असंभाव्य व मनोरथाच्याहि पलीकडच्या गोष्टी, प्रबल विधि सहज लीलेनें घडवून आणतो. त्याला असाध्य असें कांहींच नाही. शंकरवर्मा राजाच्या कारकिर्दीच्या वर्णनांत या प्रचंड शाही राज्याचें विलक्षण वैभव व विस्तार यांचें मागे दिग्दर्शन झालें आहे. ते विस्तीर्ण शाही राज्य, तो देश, तेथील राजे, अमात्य, दरबार, सर्व कांही, कधी होते किंवा नाही, यांचीच मनाला शंका येण्या इतपत, इतक्यातच त्याची स्थिति होऊन गेली आहे ! !

( शाही त्रिलोचनपाल. हा आनंदपाल राजाचा पुत्र, तो हिंदी शाही घराण्याचा शेंवटचा राजा होता, असें अल्बिरुनी याने लिहिलें आहे. महमूद गिजनीपुढे या पितापुत्रांनीं पुष्कळ वर्षे टिकाव धरला होता. शेंवटीं त्याचा पाडाव झाला. बापाच्या वेळी त्रिलोचनपाल महमूदाशीं टक्कर देणाऱ्या फौजेचा सेनापति असे.

कल्हणानें हा त्याच्याविषयीं केलेला उल्लेख अशा एकाद्या महमूदाच्या स्वारी-संबंधाचाच असावा. हम्मीर हें नांव महमूदाच्या अमीरुलमोमनीन, या पदवीचें अपभ्रष्ट रूप असावें. त्याचें सैन्य तुरुष्कांचें होतें, असें कल्हणानें म्हटलें आहे. तेंहि खरें आहे. कारण या स्वारींत महमूदाबरोबर मुख्यत्वें तुर्की शिपायीच होते. कल्हणानें तुंगाच्या स्वारीचें नक्की वर्ष दिलेलें नाहीं. तरी ती महमूदाची स. १०१३ मधील नववी स्वारीच असावी. तिच्यांत त्याचा त्रिलोचनपालाशीं पंजाबांत शेंवटचा सामना झाला. कल्हणानें केलेलें या लढाईचें वर्णन खरें आहे. महमूदानें हा विजय जेहलमकडून काश्मीरांत जाणाऱ्या मार्गाच्या एका खोऱ्यांत मिळविला. नंतर त्यानें त्रिलोचनपालाचा काश्मीराकडे पाठलाग केला. सर-हद्दीवरील कांहीं सामंत त्यावेळीं महमूदाचे ताबेदार झाले. याच वेळीं कांहीं काश्मीरी लोकांना जबरदस्तीनें मुसलमान केल्याचा उल्लेख आहे. या मोहिमेंत शाहीला एका काश्मीरी फौजेनें मदत केली होती, असें मुसलमानी इतिहासकारांनींहि वर्णन केले आहे. ५३ व्या श्लोकांतली तौसी नदी हीच तोही नदी होय. पर्णोत्स–प्रून्त्स–प्रांतांतून येऊन जेहलम गांवाजवळ वितस्तेला मिळते. या प्रून्त्सच्या खोऱ्यांतून लोहराकडे जाण्याचा रस्ता आहे. तिकडूनच पूर्वींचा तोस मैदानाच्या घाटीनें पुढे काश्मीरांत जाण्याचा बराच रहदारीचा मार्ग होता. पुढें दोन वर्षांनी महमूदानें काश्मीरावर याच मार्गानें स्वारी केली असतांना त्याला लोहकोट–अल्बिरुनीचा लौहूर–किल्ल्याजवळ अटकाव झाला. तोच हा लोहर किल्ला होय.

प्रुन्त्स तोहीच्या खोऱ्यांत कोटली गावापर्यंत अद्यापपर्यंत बरीच काश्मीरी वस्ती आहे. त्यावरून त्या काश्मीऱ्यांना जबरदस्तीनें मुसलमान करण्याचा प्रयत्न झाला होता, हेंहि वर्णन ठीक आहे.

या तौसीवरील लढाईमुळेच शाही राज्य शेंवटीं कायमचें बुडालें. पुढें त्रिलोचन-पालानें राज्य परत मिळविण्यासाठीं अनेक लढाया केल्या. त्यांचे वर्णन मुसलमानी ग्रंथांत दिलेलें आहे. पण त्या लढाया मूळच्याच शाहीच्या पंजाबच्या राज्यांत झाल्या नाहींत. त्या वर्णनावरून कल्हणाने केलेले त्रिलोचनपालाचे अढळ धैर्य व अप्रतिम शौर्य, यांचें वर्णन योग्य होतें, असें दिसतें. तो हिजरी सं. ४१२ त (ई. स. १०२१-२२) त मरण पावल्याचें अल्बीरुनीनें लिहिलें आहे. त्याचा पुत्र भीमपाल त्याच्या मागें पांच वर्षें कायम होता. पण तो स्वतंत्र राजा असल्याचा मुसलमानी ग्रंथात उल्लेख नाहीं.

या शाही राजाचा असा अवचित नाश झाला. त्याचा समकालीन लोकांच्या मना-वर चमत्कारिक व चिरस्थायी परिणाम झाला असावा. मुसलमान इतिहासकारांनींसुद्धां या शाही राजाच्या थोर गुणांचें आदरपूर्वक वर्णन केलेलें आहे.

हें राज्य बुडालें तद्विषयक गोष्टी अल्बिरुनीनें प्रत्यक्ष पाहिल्या होत्या. त्या राजाच्या संबंधांत त्यानें लिहिलें आहे की, 'हें हिंदू शाही घराण्याचें राज्य हल्लीं नष्ट झालें असून त्या थोर घराण्याचा कांहींच अवशेष उरलेला नाहीं. त्या राज्याच्या अत्युच्च वैभवाच्या

कालांतहि त्या राजानीं न्याय व चोख वर्तन करण्याची आपली इच्छा कधींहि कमी केली नाहीं. त्याचे वर्तन थोर, विचारी, प्रौढ व प्रथित असें होते. ही गोष्ट कबूल करणे भाग आहे.'

कल्हणानें याविषयीं श्लोक ६६ ते ६९ मध्ये केलेला उल्लेख, त्या वेळच्या लोकांच्या मनांत या थोर व वैभवशाली राज्याच्या अवचित नाशामुळे पैदा झालेल्या मनोविकारांचा पूर्णपणें निदर्शक होता, असे मानण्याला हरकत नाही. )

( याच प्रकारचा अवचित नाश पुढे ई. स. १५६५ सालीं-५४२ वर्षांनीं दक्षिणेंतील विजयनगरच्या साम्राज्याचा झालेला लक्षांत ठेवण्यासारखा आहे. लेले.)

याप्रमाणें पराभव पावून तुंगाने तुर्कांना या साऱ्या महीतलावर धिंगाणा घालण्याला मार्ग मोकळा करून दिला. ( ७० ) नंतर तो मार खाल्लेल्या कोल्ह्याप्रमाणे हळू हळू स्वदेशी परत गेला. या पराजयरूपी अपराधाबद्दल राजानें त्याच्यावर राग केला नाही. कारण त्याचें धैर्य त्याच्या चारित्र्याला अनुरूप असेच होतें. त्याच्या मनांत आपली तुंगावरील पराधीनता सारखी डंवचत होती. परावलंबनामुळे पशूंचेसुद्धां चित्त उद्विग्न व उत्तप्त होतें.

तुंगाचा पुत्र कंदर्पसिंह हा श्री व शौर्य यांच्या मदाने राजासारखा वागत असे. याचाहि राजाला भारी उद्वेग वाटत असे. तुंगाचा भाऊ विग्रहराज, हा तुंगाचा कांटा काढून टाकण्याला संधि पहात होता. तो गुप्त लेख पाठवून राजाला त्यासंबंधीं प्रेरणा करीत होता. पण पूर्वी झालेली आण भाक लक्षांत घेऊन व इतर गोष्टींमुळेंहि, याविषयीं राजाची बुद्धि पुष्कळ दिवस संशयीत राहिली होती. शेवटी सारखी टोंचणी लागल्याने त्यानें वेळ मारून नेण्यासाठीं त्या प्रेरक लोकांना म्हटलें कीं, 'तुंग व त्याचा पुत्र, हे केव्हांहि एकाकी आमच्या दृष्टि पडले तर, काय करावयाचें तें पाहूं. तूर्तच हल्ला करण्याची घाई केली तर, ते प्रबल असल्यानें, आमचाच घात करतील.' ते लोक, ही त्याची पडत्या फळांची आज्ञा समजून, तुंग राजाकडे एकटाच पोंचण्याच्या उद्योगाला लागले. पुढे सहा महिन्यांच्या आंतच सुदैवानें एकदां राजाच्या निमंत्रणावरून तुंग आपल्या पुत्रासह त्याच्याकडे जाण्यास निघाला. त्याला दुष्ट स्वप्न पडले होतें. तिकडे त्यानें दुर्लक्ष केले. राजवाड्यांत पोंचतांच राजाकडे थोडा वेळ राहून, तो पांच सहा सेवकांसह जवळच्या मंत्रिमंडपांत गेला (८०) पर्व, शर्वरक, वगैरेंनीं त्याच्यामागून जाऊन राजाला न कळत तुंगावर शस्त्रे चालविलीं शंकरवर्मा राजाचा मंत्री महारथ, याचा थोर व कुलीन वंशज सिंहरथ, हा तुंगाच्या पदरीं असलेला, यायेळीं निःशस्त्रच त्याच्याबरोबर होता. तो त्याचा बचाव करण्यासाठीं मध्यें पडला. या योगानें सर्व तुंगसेवकांमध्यें तोच प्रशंसनीय झाला. पहिल्याच वारानें तुंग निश्वास झाला आणि इकडे राजाचाहि श्वास सुकला होता तो तुंग गतप्राण झाल्यावर पुनः चालू झाला! त्यावेळीं त्या मंत्र मंडपांतील आस्थान ब्राह्मण धर्म, याचा पुत्र पार्थ आणि दुष्ट कंक, हे जवळच होते. तुंगाची पापकर्माकडे प्रवृत्ति तेच करीत असत. त्यांची भीतीनें गाळण

झाली. त्यांनी मल मूत्र वसर्जन केलें. त्यांचीं शस्त्रे गळून पडलीं आणि त्यांनी पशुप्रमाणें प्राणरक्षणासाठीं दांतीं तृण धरलें ! तुंगाच्या अंतरंगांतील चंग वगैरे सल्लागार सशस्त्र असूनहि भिऊन बायकाप्रमाणें स्वस्थ राहिले.

बाहेर तुंगाचे सेवक व सैनिक होते. ते झालेला प्रकार ऐकतांच गडबड उडवितील, लढतील व आगी लावतील, या भीतीमुळे व आपल्या सेवकांना धीर व उत्तेजन येण्यासाठी राजानें तुंगाचे व त्याच्या पुत्राचेहि, शिर कापवून, तीं शिरें बाहेर फेंकविलीं. तीं पाहतांच तुंगाचे बहुतेक लोक दीन होऊन पळून गेले. पण त्याच्यांतील थोडयानी हाणामारी चालवून आपला खरा सेवाधर्म गाजविला. (९०) त्यांच्यापैकींच द्विजपुत्र, सामंत भुजंग यानें धावून येऊन, संग्राम राजाचा पिच्छा पुरविला व त्याला जागजागीं पिटाळून लावलें. आस्थान मंडपाचें बंद असलेलें द्वार, कनकदंडानें फोडून तो आत शिरला व तेथें त्यानें वीस सैनिक ठार मारले. तसेच खजीनदार त्रैलोक्यराज व केंग्या मंतकाचा क्षत्रिय बंधु अभिनव, हेहि लढतां लढतां मारले गेले. राजवाडयापुढील पटांगणांत तुंगाच्या पदरच्या पैकीं तीस एकांगांनी आपल्या देहांनीं जणों स्वर्गसोपानच बांधला होता. वीर पद्मराज खूप लढला. पण तो अक्षत निसटला आणि त्यानें स्वामिनिधनरूपी दुखाग्नीचा ताप तीर्थयात्रेच्या द्वारें शमविला. दुसऱ्या कांहीं लोकानी इहपरलोकीं परित्राणसाधन अशा तरवारी टाकल्या व तें यश आणि जीवित दोन्हींलाहि मुकले. स्वतःला शूर समजणारा चंद्र परदेशीय अर्जुन व हेलाचक्र डामर, यांनीहि शस्त्रें टाकलीं होतीं. त्यांना शत्रूंनीं ठार मारलें.

आषाढ शुद्ध द्वादशीला तुंग व त्याचा पुत्र हे असे मारले गेल्यावर, राजानें तुंगाचें घरदार लुटवून त्याची सर्व संपत्ति सरकारात घेतली आणि त्याचे नांव मिटवून टाकलें. निर्द्रोह असा तुंग मेल्यावर, राजवाडयांत खलप्राय लोकाचा सुळसुळाट झाला. त्यांच्यापैकीच मूढ व गुप्त कपटानें राजाला बिघडविणाऱ्या अशा नागाला, राजानें कंपनापति केलें. त्या नागानेच आपला बंधु तुंग व पुतण्या, याच्या विरुद्ध राजाचें कान भरून त्याच्यावर आपत्ति आणली होती. (१००) त्यामुळे तो स्वकुलाचा अंतक म्हणून लोकनिंदेला पात्र झाला.

कंदर्पसिंहाची बायको क्षेमा, ही मोठी चवचाल व जारिणी होती. रात्रिंचरी राक्षसीप्रमाणें तिनें कृष्ण पक्षातील रात्रीं, नागाशीं कृष्णकृत्याचा संबंध ठेवला होता. ही गडबड मिटल्यावर तुंगाची सून-शाहीची कन्या-बिंबा ही चार दिवसांनी सती गेली. कंदर्पसिंहाचे मम्मा वेश्येच्या पोटचें पुत्र, विचित्रसिंह व मातृसिंह आणि दुसरी सून, यांना घेऊन तुंगाची पत्नी मंखना, दीनपणे राजपुरींत जाऊन राहिली.

नंतर राजानें त्या पापी भद्रेश्वराला तुंगाची जागा दिली. त्यानें भूतेश्वरादि देवस्थानांतील खजीना, व दुसरी सर्व चीजवस्त लुटली. या राजाच्या विवेकभ्रष्टतेचें कोठवर वर्णन करावें ! ! त्याने पार्थादिकांसारख्यांना नगराधिकारी नेमलें. तो पार्थ भारी दुर्बुद्धि व क्षुद्र भावजयीशीं लागूं होता. त्याच्या मनाला सुकृताचा स्पर्श मुद्दां झालेला नव्हता. त्यानें प्रवरेशाच्या पवित्र रंगपीठावर पशुमारणादि पापकर्में करविलीं.

सिंधूचा पुत्र मातंग, हा कृपण शिरोमणी होता. त्याला प्रजेला लुटण्याचें कसब उत्कृष्ट साधलें होतें. त्याच्या द्वारें त्यानें त्या लोभी राजाचा खजीना भरला. (११०)

देवमुख दिविराला एका वेश्येच्या पोटीं झालेला पुत्र चंद्रमुख, तुंगाच्या आश्रया-मुळे राजवल्लभ झालेला होता. त्याची आई अपूप-घारगे-विकीत असे. त्यानें कवडी कवडी करून कोटी दीनार सांठविले होते. तरी तो भेट आलेले अपूपसुद्धां मळच्या धंद्याला अनुसरून, आपले सेवक व इतर लोक याना विकीत असे. प्रारंभीं त्याचा जठराग्नि चागला प्रदीप्त असून तो निरोगी होता. पण संपन्न व ऊर्जित दशा आल्यावर त्याला अग्निमांद्य झाले व तो रोगग्रस्त झाला. हे पाहून लोक त्याला हंसत होते. त्यानें मरतांना एक कोटी दीना-रांचा तिसरा हिस्सा श्री रणेश्वराच्या मंदिराच्या जीर्णोद्धारासाठी दिला. हे एकच सत्कृत्य त्याच्या हातून घडले होते. त्याचे पुत्र नान, भाग, व नंदिमुख, या तीघांना राजानें तुंगाच्या हाताखाली सेनापति नेमले होतें. पुढे त्यांची तुंगाच्या जागी नेमणूक झाली. मुलें सोन्याच्याऐवजी जवाची कणसें गोळा करतात. त्यातलाच हा हास्यास्पद प्रकार होय ! तेहि तुंगाबरोबर राजाच्या आज्ञेने तुरुष्कावर गेले होते व त्याच्याबरोबरच मार खाऊन परत आले होते. ( ही गोष्ट बहुधा महमूदाने लोहरापर्यंत स्वारी केली त्या वेळीं घडली असावी. )

असा क्षांति व शांतिशील राजा आणि निरुपयोगी मंत्री पाहून, दरद, दिविर, व डामर प्रबल झाले व त्यानी उठावणी करण्याचा उद्योग आरंभिला

राजकन्या लोठिका इने स्वतःच्या व आईच्या नांवाने अनुक्रमे लोठिका मठ व तिलोत्तमा मठ बांधविले. ( १२० )

सद्वासना कधीमधीं पाप्यानाहि होत असते. त्या अन्वये भद्रेश्वरानेहि एक सुकृतो-ज्ज्वल असा विहार बांधविला. पण संग्रामराजाची या सर्वांवर कडी होती. आपले द्रव्य अन्यायाने मिळविलेले आहे, या सबबीवर त्याने त्याच्यातून एकादी पाणपोईसुद्धा घातली नाही !

यशोमंगलाची सुस्वरूप कन्या राजपत्नी श्रीलेखा ही पती वीर्यहीन पाहून स्वैरिणी बनली होती. सुगंधसींह व जयलक्ष्मी याचा पुत्र त्रिभुवन, याच्यावर तिचे भारी प्रेम जडले होते. तसेच बुद्धिमान, चतुर व खजीना भरण्याच्या कामी अश्रांत झटणारा, जयाकर हाहि तिचा प्रेमी यार होता. त्यानें जयाकरादि गंज कायम केले. तिने मयग्रामीण वगैरे गंज बसविले. ती द्रव्यसंचय करण्यात फार दक्ष होती, म्हणून राजा तिच्यावर फार प्रसन्न असे. यामुळें चैनींत, अधिकारात आणि वैभवात, केव्हांहि उणीव किंवा त्रास पडत नसे.

त्या राजाने आपला पुत्र हरिराज याला अभिषेक करविला व तो लौकिक वर्ष ४१०४-(ई० स० १०२८) च्या आषाढ शुद्ध प्रतिपदेला मरण पावला. तो चैत्रोत्सवाप्रमाणे सुमनांनीं-पुष्पांनी-पंडितांनी-सेवित असून सर्वांच्या आशा-दिशा-यांचे पूरण करीत असे. तो सर्वांना आनंद व शीतलता देत असे. त्याची आज्ञा अप्रतिहत व अमोघ होती. त्यानें साऱ्या राज्यांत चोरांचे नांव सुद्धां उरूं दिलें नाही. यामुळें रात्रीं बाजारांतील दुका-

ा रस्त्यांवरील दरवाजे लावण्याचें कारण पडत नसे. त्याची कारकिर्द थोडीच पण
तण वैभययुक्त व नवेंदुकलेप्रमाणें, राजे लोकांमध्यें वंद्य झाली होती. ( १३० ).

विमलयश अशा नव्या हरिराज राजानें सारें बावीस दिवसच राज्य केलें आणि
ावण शुद्ध अष्टमीला मरण पावला चंचल लक्ष्मी ही ग्रीष्मांतील रात्रीं प्राणिमात्रांवर
त काल चमकणाऱ्या नक्षत्राप्रमाणें, क्षणभंगुर प्रसाद करीत असते. आपल्या जननीचें
र्तन पाहून तो राजा नाराज झाला. यामुळें तिनें त्याला जादू करून मारविलें, असा
ठीं लोकप्रवाद होता. तो कोणी खोडून काढलेला नाहीं.

त्या पुत्राच्या मागून, स्वतःलाच राज्याभिषेक कराविण्याची तयारी करवून, श्री-
स्नानाला गेली. ती परत येण्यापूर्वीच हरिराजाचा धात्रेय बंधु सागर व कांहीं
ा यांनीं तिचा अल्पवयी पुत्र अनंत याला अभिषेक करवून टाकला !

एकादा निधि काढून नेला गेल्यावर दुसऱ्या कोणी लोभ्यानें निधिरक्षक नागाचा
रणें, निवळ पापाला कारण होतें. तद्वत त्या राज्यलुब्ध राजमातेनें स्वतःच्या पुत्राला
ण्यांत, तें राज्य दुसऱ्यानें हरण केल्यामुळें, केवळ पाप पदरीं बांधले. ज्या भोगलाल-
पायीं ती पुत्रप्रेम विसरली आणि राज्य हातचें गेल्यावर दुःख पावती झाली, तिला
र असो.

त्या बालराजाचा चुलता, वृद्ध, सुप्रसिद्ध व पराक्रमी चुलता विग्रहराज, पुतण्याचें
हरण करण्यासाठीं मोठया तांतडीनें लोहराहून निघाला. वाटेंत त्यानें तोसमैदान
रील सरकारी द्वार-चौकी-जाळली आणि अडीच दिवसांत-सुमारे साठ मैलांची मजल
व १३००० फूट उंचीची घाटी ओलांडून-तो नगराला पोंचला. ( १४० ) त्यानें
का मठांत तळ दिला होता. श्रीलेखेनें पाठविलेल्या सैनिकांनीं त्या मठाला आग
ी. तिच्यांत विग्रहराज व त्याचे लोक नाश पावले.

राणी श्रीलेखा इनें सढळपणें खर्च करून, पति व पुत्र याच्या नांवानें दोन मठ
ले. ती रात्रंदिवस द्रव्य खर्चून राजद्रोहाच्या विचारांत निमग्न असे. थोड्या वर्षांनीं
जाचें बालपण संपलें. तोंवर गर्भेश्वरत्वामुळें तो भारी उधळ्या व व्यसनी बनला
रुद्रपाल वगैरे शाही राजपुत्रांवर त्याचा अत्यंत लोभ असे. मोठाल्या नेमणुकांच्या
ते राज्याचें उत्पन्न लुटीत होतें. रुद्रपालाला दररोज लक्ष दीनारांची नेमणूक होती.
ाचें दैन्य कांहीं सुटलें नाहीं. दिद्दापालाला प्रत्यहीं ऐंशीं हजार दीनार मिळत
हे त्याला कर्जाच्या व खर्चाच्या काळजीमुळें कधीं रात्रीं सुखानें झोंप येत नसे.
ाळरूपी वेताळाला राजा अतिशय भाळला होता. तो देवाच्या-सुवर्ण रजताच्या
फोडून टाकविण्याच्या विचारांत गर्क होता. प्रजेचें धन व प्राण हरण करणाऱ्या
चांडालप्राय दुष्ट लोकांना रुद्रपाल हा एक जणों वज्रपंजराप्रमाणें परित्राण सांपडला
तसेंच, त्याची स्नेही कायस्थ मंडळी ही सारखी प्रजापीडन करीतच होती. त्यांचा
श्रीमान उत्पल यानें अंधमठ स्थापन केला. रुद्रपाल हा राजाचा असा कांहीं प्रेमी

बनलेला होता कीं, त्याच्या भूपाल वल्लभत्वाचें यथार्थ वर्णन होणें अशक्य होय. ( १५० ) त्यानें जालंदरचा राजा इंदुचंद्र, याची कन्या सूर्यमती, इचें राजाशीं लग्न करविलें आणि तिची मनोहर वडील बहीण आसमती, ही स्वतः वरिली. ( जालंदरच्या राज्यांत त्रिगर्त किंवा कांगडा याचा अंतर्भाव होता. कांगडयाच्या राजांच्या नांवाच्या यादींतलें इंद्रचंद्र हें नांव व कल्हणाचें इंदुचंद्र नांव एकाच राजाचें दिसते. त्याची कन्या इंदुमुखी इचा बिल्हणानेंहि उल्लेख केला आहे. ) तो राजाचा कर्णसुखदायी सखा होऊन, सुयोधनाला कर्ण दुष्ट सल्ला देत असे, त्याप्रमाणे सल्ला देऊन त्याच्याकडून दुष्ट कर्मे करवीत असे.

त्या सुमारास प्रबल असा कंपनापति त्रिभुवन याने बहुतेक सैन्य फितविले व डामराचें सहाय्य घेऊन राजावर चढाई केली. एकांग व स्वार राजाच्या पक्षालाच राहिले. अनंत देवाने स्वतः मोठ्या शौर्यानें त्रिभुवनाशीं लढाई केली व आपल्या तरवारीनें त्याच्या अमोघ बाणांचे तुकड उडवून मोठाच पराक्रम केला. त्रिभुवनाच्या अंगांत लोहकवच होतें म्हणूनच तो वांचला व पळून गेला. राजानें केलेल्या गाढ प्रहाराने त्याला तोंडांतून स्वप्रतापरूपी रक्तच ओकावें लागलें. यावेळीं राजाचें वय विशेष होतें असे नाहीं. त्याचें शौर्य त्याच्या अंगच्या विनयानें झांकलेलें फार शोभत होतें. त्रिभुवन पळून गेल्यावर त्यानें शालास्थल येथें ( हें यच्छ परगण्यांतील हलथल नांवाचें गांव असावें. ) धनुर्बाण युद्धांत निपुण अशा शमालाकडील अभिनव डामरानें केलेल्या जोराच्या हल्ल्याचा मोठ्या शौर्यानें प्रतिकार केला. ( शमाला-हल्लींचा क्रमराज परगणा. ) त्यावेळीं भुवनक्षोभकारी दंडपाणी भैरवाप्रमाणें अनंतदेव, आपली रक्त व मांस यांनीं दंडासारखी झालेली तरवार हातीं धरून संचार करीत होता. ( १६० ) त्याला पदोपदी आपल्या पक्षांतील पुष्कळसे एकांग जबर जखमा लागून मरून पडलेले आढळत होते. त्यांचीं नावें सेवकांना विचारून घेऊन, तो त्यांच्या संबंधानें मोठ्या कळकळीनें विचारपूस करी. पुढें त्यानें त्या लोकांविषयी सहानुभूती दाखवीत, त्यांना अक्षपटलांत हजिरीला व पगाराला जावे लागें ते माफ करून परभारें कायम नेमणुका मिळण्याची व्यवस्था केली. याप्रमाणें त्यानें कृतज्ञपणानें स्वपक्षीयांना एकंदर शहाण्णव कोटी दीनारांची नेमणूक करून दिली. असें सांगतात कीं, तो रणभूमीवरून परत आला तेव्हां, त्याच्या हातीं फार वेळ घट्ट धरल्यानें दृढ झालेली तरवार मुठीवर मारखी दुधाची धार धरून सोडवावी लागली ! अशा त्याच्या थोरपणाचें कोठवर वर्णन करावें !

पुढे कांहीं दिवसांनीं त्रिभुवन देशांतराहून अगदीं दीन होत्साता परत आला. तेव्हां अनंतदेवानें त्याच्यावरील राग सोडून त्याला पदरीं ठेविलें.

त्यानें आपला आप्त ब्रह्मराज, याला गंजाधिपति केलें. त्याचें रुद्रपालाशीं वांकडें आल्यामुळें तो नाराज होऊन निघून गेला. पुढें सात म्लेंछ राजे, डामर मंडळी व दरदांचा राजा अचलमंगल, यांच्यासह त्यानें चढाई केली. तो दरद राजा क्षीरपृष्ठ ( क्रमराज्यांतील खरोट नांवाचें गांव ) येथें पोंचतो तोंच, शूर रुद्रपाल त्याच्यावर चालून गेला.

दुसरे दिवशीं लढाई ठरली. दरदांचा सज्जा त्याच दिवशीं सहज गमतीने जवळच एका गोल कुंडावर पिंडारक नागाचें वसतिस्थान होतें तेथें पोंहोचला आणि त्याच्या सेवकांनीं रोंकलें असूनहि, त्यानें एका उसळलेल्या मत्स्यावर भाला टाकला. ( १७० ) तसा त्या कुंडांतून एक नाग, कोल्ह्याच्या रूपानें उठला. शिकारीच्या इच्छेनें प्रेरित होऊन तो दरद राजा त्याच्यामागे धांवला. त्यावरून त्याच्या सैनिकानीं लढाईची ठरलेली व्यवस्था बदलली असून, शत्रूचा हल्ला येत आहे असें वाटले व तेहि लढण्याला निघाले. लढाईचें तोंड लागून घोर संग्राम झाला. त्यांच्यांत अगणित शूर वीरांचे अप्सरांशीं स्वयंवर झाले. शस्त्रास्त्रांच्या खडखडाटानें अग्नीच्या ज्वाळा उठल्या. त्या वीर सम्मर्दांत दरद राजाचें शिर उडविले गेले आणि रुद्रप्रभावी रुद्रपालाचे यश वृद्धिंगत झाले. म्लेंच्छ राजे पडले व कांहीं कैद झाले. काश्मीरच्या राजाला सुवर्ण रत्नादिकांची पुष्कळशी लूट मिळाली दरद राजाचें शिर रुद्रपालानें राजाकडे भेटदाखल नेले. तें रक्तानें माखलेलें होते. त्याच्यावर बहुमोल मोत्याचे तुरे व शिरोभूषणे होतीं त्यातील मौल्यवान् मोत्यांच्या पाण्याने ते रक्त जणो धुतलें जात होते

( अनंतदेवाने दरद राजावर मिळविलेल्या या विजयाचा उल्लेख बिल्हणाने विक्रमांकदेव चरिताच्या १८ व्या सर्गाच्या ३८ व्या श्लोकांत केलेला आहे. )

त्याचा भाऊ उदयवत्स याने चिथावलेल्या प्रायोपवेशन करणाऱ्या ब्राह्मणाकडूनहि त्याला बराच त्रास झाला. पुढें रुद्रपाल लूता रोगाने मरण पावला व नंतर लौकरच त्याचे बंधूहि वारले. त्या पालबंधूवरील अंधप्रेमरूपी मल दूर झाल्यावर राजाचें अंतःकरण निर्मल व वर्तन साफ झाले आणि त्याच्या अंतःकरणरूपी आदर्शांत देवी सूर्यमतीचे सद्गुण पूर्णपणे प्रतिबिंबित झाले

तिचें सुभटा असेहि नाव होतें. ( त्याच नांवाने बिल्हणानें तिचा उल्लेख केलेला आहे. ) त्या नांवावरून तिने वितस्तेच्या वाळवंटात सुभटामठ स्थापन केला. तिने गौरीश्वराची स्थापना केली त्या वेळीं यथेच्छ गायी, सुवर्ण, रत्ने, घोडे, वगैरे दान करून, तिने किती तरी द्विजांचे दारिद्र्य दूर केले. (१८१) तिचा धाकटा बंधु कल्लन–आशाचंद्र–याच्यावर तिचें: फार प्रेम होते. म्हणून तिने त्याच्या नावानेहि एक अग्रहार दिला व मठ बांधवेला. तसेच दुसरा बंधु शिल्लन व पति अनंतदेव, याच्या नांवाने तिने विजयेश व अमरेश नांवाचे दोन मठ कायम केले. ( हे अमरेशाचे मंदिर श्रीनगराच्या उत्तरेस चार मैलावर सिंधूच्या खोऱ्याच्या वाटेवर, हल्लीच्या अंबुऱ्हेड नांवाच्या खेडयाजवळ होते. हल्लीचें अंबुरनाथाचे मंदिर लिडर नदीच्या उगमाजवळ फार उंच प्रदेशीं आहे. ते याहून निराळे होय. ) श्री विजयेश्वराच्या प्रचंड व प्रेक्षणीय मंदिराजवळ तिने एकशे आठ अग्रहार, वेद्वान् ब्राह्मणाना दान दिले आणि जागजागी बाण, त्रिशूळ आणि शिवलिंगे यांच्या प्रतिष्ठा करवून, मोठें पुण्य संपादन केले. शिवाय, अमरेश्वराजवळहि तिने आपल्या पतीच्या नांवानें अग्रहार दिले. त्या उभयताचा पुत्र राजराज मरण पावला. तेव्हां त्यांनीं राजवा-

यांत राहणें सोडलें व ते श्री सदाशिवाच्या मंदिरासन्निध राहूं लागले. तेव्हांपासून पुढील राजांनींहि तीच वहिवाट कायम केली.

पागेतील घोडे राजाला जीव की प्राण असत. यामुळे त्याच्याकडून मिळालेलीं इनामें व याच्या कृपेच्या भरंवशावर त्यांच्यावरील मोतद्दार चोहीकडे चालविलेली लूटमार व चोऱ्या, यांच्या द्वारें पुष्कळच गब्बर व मस्त झाले होते. तसेच डल्लक नावाचा एक विदेशी गृहस्थ भारी नकल्या व हुषार असल्याने, राजाचा त्याच्यावर जणो राजकुलांतल्या माणसाइतका लोभ असे. तोहि प्रजेला मनसोक्त लुटीत होता.

अनंतदेव राजाला तांबूलसेवनाचें भारीच व्यसन होतें. पद्मराज नांवाचा एक परदेशी तांबोळी त्याला प्रत्यही पानें व विड्याचें सामान पुरवीत असे, म्हणून तो त्याला फार प्रिय झाला होता त्यानें त्या राजाकडून त्या प्रदेशाचें बहुतेक उत्पन्न आपणांकडे लावून घेतलें होतें

मालव देशचा राजा भोज यानें पापसूदन तीर्थाच्या जलानेंच मुखमार्जन व स्नानादिक करण्याचा नियम केला होता तो पार पाडण्यासाठीं पद्मराजानें, त्या पाण्याचे पुष्कळ कांचेचे कुंभ, त्याच्याकडे अचूक पोंचविण्याची व्यवस्था केली होती. त्याच्या मार्फतच मालव राजानें अगणित द्रव्य व्यय करून कपटेश्वर येथें एक गोल तीर्थकुंड बांधविलें होतें. (मालव राजा भोज -हा सुप्रसिद्ध धारानगरीचा राजा भोज होय. तो ई. स. १०१० पासून व १०६३ च्या नंतरपर्यंत गादीवर होता, असें आतां बहुतेक पक्कें ठरलें आहे. पुढे या तरंगाच्या २५९ व्या श्लोकात, तो सं. १०६३ त कलशराजाच्या राज्याभिषेकाच्या वेळीं हयात असल्याचा उल्लेख आलेला आहे. पापसूदन हे प्राचीन तीर्थ कपटेश्वर किंवा हल्लीचें कोठेर येथें होतें. भोजानें बांधविलेल्या गोल तीर्थकुंडाचे अवशेष अद्यापि कायम आहेत. त्याचा व्यास सुमारें ( १८० ) फूट असून, दगडी काम चांगलें मजबूत आहे. त्यांतील पाणीहि बरेंच खोल आहे. अलीकडे आसपासच्या लोकांच्या मतें तें कुंड मुचकुंद राजानें बांधविलें, अशी दंतकथा आहे. जवळच त्याच राजानें बांधविलेलें म्हणून एक लहानसें मंदिरहि दाखवितात. गंगाजलच मागवून रोज पीण्याचा काहीं राजेलोकांचा प्रघात बराच प्राचीन काळापासून चालत आला आहे. हल्लीं काश्मीरांत तांबूल खाण्याची चाल नाहीं. विड्याची पानें तिकडे बाहेरून पोंचविण्याला फार खर्च येतो. अनंतदेवाच्या वेळीं, हे व्यसन भारीच खर्चाचें असावें, म्हणूनच पद्मराजाला त्याच्यावर इतकें संपन्न होतां आलें, असें दिसतें. )

पद्मराजानें अनंत देवाला पुष्कळसें कर्ज दिलें होतें. त्याला तारण म्हणून, त्यानें राजाकडून त्याचा पंच चंद्रकयुक्त राजमुकुट आणि राजसिंहासनहि कबजे गहाण लावून घेतलें होतें. हीं राजचिन्हें महिन्यांतून एकदा दरबारच्या कामापुरतीं, त्याच्याकडून वाड्यात आणविलीं जात असत. पद्मराजामुळें आलेलें हें अपयश व दैन्य, सूर्यमती राणीनें आपल्या जवळची शिल्लक देऊन पद्मराजाचें कर्ज फेडून दूर केलें. तसेच तिनें मोतद्दार व डल्लक वगैरे-

लुटारूंचा त्रासहि मिटविला. तेव्हां राज्यकारभार बराच सुरळीत चालूं लागून, सर्वत्र कांहींशी शांतता झाली.

यापुढे राणीच सर्व कारभार पाहूं लागली. राजा शौर्याच्या व शिकारीच्या नुसत्या कथा कथन करीत, स्वस्थपणे सांगितले तितकें काम करूं लागला. राणीच्या निष्कलंक शीलामुळे राजाचें तिच्या तंत्राने चालणें व तिने त्याच्यावर सत्ता चालविणे, याबद्दल उभयतांनाहि दूषण येण्यासारखे नव्हते. ( २०० ) पुढें पुढे श्री शंकराची अनन्य भक्ति, स्नानसंध्या, दान, औदार्य व शील, वगैरे गुणांच्या द्वारें त्या अनंतदेव राजानें प्राचीन ऋषि-मुनींना देखलि मागें टाकले.

त्याच्या दीर्घकालिक कारकिर्दीत त्याची मर्जी, स्वयंवरांतील पतिवरेप्रमाणे, सारखी नव्या नव्या भृत्यावर बसत होती.

त्यावेळी क्षेम नांवाच्या एका नापितानें ' द्वादश भाग ' हा व इतर कर बसवून, राजाचा खजीना भरण्याचा क्रम चालविला होता. पुढे त्रिगर्त देशांतील केशव नांवाचा एक सज्जन ब्राह्मण मंत्री झाला. त्याच्या योगाने, चंद्रिकेनें सौधाला शोभा येते, तद्वत त्या राजाला व राज्याला शोभा आली होती. तरी पुढे लौकरच त्याच्यावर राजाची अवकृपा होऊन, तो दीन व दरिद्री होत्साता, रस्त्यांतून एकटाच फिरत असलेला, लोकांच्या दृष्टी पडला ! मेघमालेतील विद्युल्लतेतुल्य चंचल भाग्यलक्ष्मी कधीं कोणापाशीं कायम टिकते ! ! संपदा भाग्याधीन असते, तरी मुग्धलोक तिचा, अधिकाराचा व कुलाचा, व्यर्थ गर्व बाळगतात.

गौरीशाच्या मंदिरांत भूती नांवाचा एक वैश्य चौकीदार होता. त्याला हलधर, वज्र व वराह, असे तीघे पुत्र होते. हलधर सूर्यमतीच्या पदरी होता. तो वाढत वाढत सर्वाधिकारी झाला होता. तो मोठा बुद्धिमान होता. त्याने आपल्या शहाणपणाच्या कारभाराने सर्व लहान लहान सामंताना वठणीला आणलें होते. त्यावरून राजा व राणी आश्चर्यचकित होऊन, सर्व कामाकाजांत त्याच्याच तोंडाकडे पहात असत. क्षेमाने पादाग्र, हे पद नवेंच कायम केले होतें. तें हलधराने सर्वांत प्रमुख मंत्रिपद केलें. ( २१० ) ( त्या पदाचा संबंध वसूल वासलातीशी व नवीन कर वगैरे बसविण्याशीं आणि राज्याचें उत्पन्न वाढविण्याशी असावा व तो अधिकार मुख्य मंत्र्याकडेच बहुधा असे. ) राज्यांतील सर्व सुवर्णाची तपासणी, पारख व वजन करवून, त्याच्यावर राजाची मुद्रा करविण्याचा राजाचा जुना हक्क होता. त्याच्या-पासून लोकांच्या संचित वित्ताचा राजे लोकांना अपहार करण्याला सवड मिळत असे. म्हणून हलधराने शहाणपणानें तो हक्क बंद केला. लोकांचे धन व दारादिकांचा अपहार करणारे सरकारी मोतद्दार व इतर लोकांपैकीं बऱ्याच जणांना देहांत शासन करून त्यानें प्रजेचा त्रास मिटविला व वितस्ता सिंधु संगमाला, सुवर्णालंकृत मंदिरे, मठ व अग्रहार वगैरेंच्या द्वारें त्याने उत्कृष्ट शोभा आणिली. ( एका हलधरानें अग्रहार दिल्याचा विक्र-मांकदेवचरित, सर्ग १८, श्लोक १९ त उल्लेख आहे. तो बहुतेक हाच हलधर असावा. )

त्याचे बंधू व पुत्र, संपत्ति मिळाल्याने उन्नति पावले व लक्ष्मीच्या सान्निध्याने मस्त ल्या हत्तीप्रमाणें, दानजलाची वृष्टि करूं लागले. त्याचा बंधु बराह याचा पुत्र द्वारारी असलेला, श्रीमान् बिंब, हा प्रलयमेघाप्रमाणे अतिशय उदारपणाने दानरूपी ची वृष्टि करीत असे. तो पुष्कळशा डामरांचा जणो काळ होता. त्याची खश लोकांशीं इ झाली. तिच्यांत त्याच्याजवळ फारसे सैनिक नसतांनाहि, त्याने माघार न घेतां मोठा क्रम गाजविला. पण तो त्या लढाईंत मारला गेला.

अनंतदेवानें चंपायेथील साल राजाचे उच्चाटन करून, तेथे नवा राजा कामय . ( चंपा—हल्लीचें चंबाचें पहाडी राज्य. त्याच्यांत रावी नदीच्या उगमाजवळची व चीनाब नदीची ही बरींच खोरी आहेत. सालराजा हाच सालवाहन राजा . चंबा येथील एक ताम्रपट डॉ. कीलहॉर्न यांनी प्रसिद्ध केला आहे. त्याच्यांत, सालन हा चंबा येथील सोमवर्म देव राजाच्या पूर्वी गादीवर असल्याचे लिहिले आहे. ताम्रपट ई. स. १०८७ सालचा चंबाच्या आसत राजाच्या वेळचा आहे. विक्रमाकदेव तांत अनंत देवाने चंपा, दार्वाभिसार, त्रिगर्त व भर्तुल=वर्तुल ? येथील राजांना ले ताबेदार केल्याचें लिहिलें आहे. )

अनंत देवाने अनेक राजांवर जय मिळविले. तो अविचारानें व दुराग्रहाने परमुलखावर ई करून जाई. त्यांत अनेक प्रसंगी त्याला मोठ्या संकटात सांपडावें लागें. असा तो तां तुक्क राजाचा पुत्र कलश, याच्यावर स्वारी करून गेला असतांना, त्याचें सैन्य थकलें ी भारी अडचणींत फसला. तेव्हा त्याला हलधरानें मोठ्या युक्तीने वल्लापुराहून वून आणलें. ( २२० ) तसेच उरशावरच्या स्वारींत शत्रूने त्याचे मार्ग अडविले तांना सेनापति हलधराने, मार्ग मोकळा करून त्याला परत निघून येण्याची सवड र दिली. याप्रमाणे शत्रूशी लढत असतांना त्याच्या राज्यांत वरचेवर अनेक दंगे व जुलुप्रकार घडून येत होते. (वल्लापूर—हल्लीचे जम्मूच्या पलीकडील खालच्या पहाडांतील वर नावाचे लहानसे संस्थान. ते काश्मीरच्या अमलांत जाण्यापूर्वी, तेथील संस्थानिी आपली राजधानी रावी तीरावरील बसौली येथे नेली होती. बल्लावर येथें अद्यापि ीभवाचे साक्षिभूत अवशेष कायम आहेत. या वल्लापुराचा पुढें अनेक जागी उल्लेख ला आहे. )

अशा स्वाऱ्यांमध्यें भद्रेश्वराचा शूर व द्वाराधिपति असलेला पुत्र राजेश्वर व दुसरेहि प्रसिद्ध पुरुष क्रमराज्यांतील डामराच्या हातून मारले गेले.

राजवाड्यांत पूर्ण विचाराने, नीतीने व भिऊन वागत असून सुद्धां, अवमानाचा ा आला नाही, अशी सेवा कोणालाहि क्वचितच साधते. हलधराला राणीशीं नेहमी पडत असे. यावरून त्याच्या संबंधानें भलत्याच कंड्या सुरूं झाल्यामुळें रागावून ाचंद्र वगैरेनी त्याला कैद केले व राजानें त्याचें सर्वस्व हरण केलें. ा कारागृहवासाचे क्लेश अनुभवावे लागले. भाग्याचा प्रभाव नेहमींचाच चंचल. तेव्हां यांत एकांतिक व सारखें सुख कोठून मिळणार? पुढें राजानें त्याला मुक्त केलें. तेव्हां

त्याला पुनः राजलक्ष्मी प्रसन्न होऊन वैभव प्राप्त झालें. यामुळें त्याला कसेंसेंच वाटून, त्याच्या तोंडावर राजछत्रामुळें आलेली शोभाच, असें किंचित हास्य झळकूं लागलें. वर्षाकाळात अभ्रछाया व ऊन वरचेवर लागोपाठ दिसून येत असतात, तद्वत त्याला राणीची कृपा व कोपयुक्त वर्तनाचा वरचेवर अनुभव येत होता.

तो राजा फार सरळ स्वभावाचा होता. तो हळूं हळूं निवळ राणीच्या तंत्रानें वागूं लागला यामुळें त्याच्या संकटपरंपरेला जणों आव्हानच मिळालें. राणी पुत्रप्रेमानें मूढ बनली होती. तिनें सारखी टोंचणी लावून सर्व राज्याधिकार राजपुत्र कलशाला सोंपविण्यांच राजाच्या मनात भरविलें. (२३०) याबद्दल पुढें पश्चात्ताप करावा लागेल, असें राजाला हलधर वगैरे मंत्र्यांनी बजावलें. पण तिकडे दुर्लक्ष करून, त्यानें खासगीकडील मंत्री रणादित्य याला अभिषेकाची तयारी करण्याला आज्ञा केली. रणादित्यानेंहि, याबद्दल पुढें पश्चात्ताप होईल, असें जयविलें. शेंवटी लौकिक वर्ष ४०३९-ई. स. १०६३-च्या कार्तीक शुद्ध षष्ठीला त्यानें कलशाला राज्याभिषेक करविला. त्यानंतर दरबार झाला. त्यात रणादित्यानें नव्या राजाला सिंहासनावर बसवून इतर राजपुत्र व सामंत यांचा नामनिर्देश करतांना नव्या राजाचें खरें महत्त्व लक्षांत घेऊन, अनंतदेवताच्या मानेवर हात देत, नव्या राजाला म्हटलें, 'महाराज, हे राजपुत्र अनंतदेव, यांच्याकडे नजर द्यावी.' यावर अनंतदेवानें मागें वळून त्याच्याकडे रागानें पाहिलें. तेव्हां रणादित्यानें हंसून स्पष्टपणें म्हटलें, 'कान्यकुब्जादि राजांना देखील याचप्रमाणें दरबारांत पेश करण्याचा प्रघात आहे. तेव्हां आता आपणाला, राज्यत्याग केल्यानंतर, याहून विशेष पद काय मिळणार? ऋषिमुनींना सुद्धा अभिमान सोडवत नाही. तेव्हा या पायी आपणाला उत्तरोत्तर अधिकाधिक पश्चात्ताप व त्रास होईल.' हे त्याचें खरें व रोखठोक भाषण ऐकून अनंतदेव निरुत्तर झाला. (२४०)

दुसरे दिवशी सर्व राजमंडळ, त्या नव्या नृपाच्या नोकरीत निमग्न असून अनंतदेवाजवळ परिमित जुने सेवक राहिले होते. हे पाहून चतुर हलधरानें रागाचा आव आणीत म्हटलें, 'आपण वृद्धपणीं केवळ आपल्या आरामाकडे दृष्टि देऊन, या आपल्या अप्रौढ पुत्रावर हा राज्यकारभाराचा मोठा थोरला भार टाकला व त्याच्या सुखांमध्ये व्यत्यय आणला, याची आपणाला लाज नाही कां वाटत? आपणच राज्यकारभार पाहून राजपुत्राला त्याच्या यौवनाला अनुरूप सुखोपभोग करूं देणें बरें नव्हे का?'

अशा भाषणांनी त्यानें अनंतदेवाकडून पुनः राज्यसूत्रें हातीं घेवविली आणि युक्तीनें कलशाला ठकविलें. पुढें तो नुसता नावाला राजा राहिला. त्याचें खान, पान व राहणें बसणें, अनंतदेवाकडेच होत असे. दरबार, शस्त्रास्त्रपूजा, वगैरे राजोचित संस्कार व विधी करतांना. कलश केवळ अनंतदेवाचा पुरोहित-प्रतिनिधि-होत असे. कारणावांचून प्रहृष्ट किंवा अनुतप्त होणाऱ्या अस्थिर लोकांची स्थिति पशुसमान असते. त्यांच्यावर कांहींच विश्वास ठेवतां येत नाहीं.

याप्रमाणें पतीकडून मोठ्या कपटानें व युक्तीनें राज्याधिकार पुत्राकडे सोंपविल्यावर सूर्यमती राणीला वाईट वाटलें व तिच्या पुत्रप्रेमांत अंतर पडलें. तिला अनुताप व मत्सर

टूं लागला. पुत्र राजा होऊन, मुनाना महाराणी पदायोग्य वैभव व वस्त्रालंकार प्राप्त झालेले ला खपेना. ती त्यांच्याकडून दासीना योग्य अशी सम्मार्जनादि हलकी कामे करवून घेऊं गली. तरी त्या मुनांनी त्याबद्दल तिटकारा दाखविला नाही. ( २५० )

पुढे राजाचा चुलतभाऊ लोहरचा राजा, विग्रहराजाचा पुत्र क्षितिराज, हा अनंत-ाकडे आला. ( या क्षिति राजाचा उल्लेख विक्रमांकदेव चरित, सर्ग १८, श्लोक ४७ ते › त आला आहे. तो मोठा शूर व भोजराजाप्रमाणे विद्वानांचा आश्रयदाता होता. त्याने ।जपुरीवाल्यावर विजय मिळविला. तो पक्का वैष्णवधर्मी असून, त्याला तपस्वी लोकांची र आवड होती, असे वर्णन केलेले आहे )

क्षितिराजानें अनंतदेवाकडे गाऱ्हाणे केले कीं, ' आपला पुत्र भुवनराज, फार दुष्ट दुर्व्यसनी निपजला असून, तो नीलपूरच्या राजाच्या आश्रयाला जाऊन ।च्या सैन्याच्या सहाय्याने आपल्यावर स्वारी करणार आहे. त्याने धर्मद्वेष्टेपणाने कुत्र्याना ोपविते घालविली व आपणांला पूज्य अशा भगवद्भक्तांची नांवे त्यांना ठेवली आहेत. ।पली राणीहि विरुद्ध झाली आहे. यामुळे आपण सर्व संसारतापहारक सन्यासरूपी अमृ-चे सेवन करणार ' नंतर त्याने कलशराजपुत्र व राममलेखा राणी, यांचा लहानगा दुसरा । उत्कर्ष, याला आपले राज्य दिले व तो राजर्षी, विद्वान व भगवभद्भक्त साधूंच्या बरोबर र्थयात्रेला निघून गेला. पुढे कांही कालाने तो परम भागवत व सुबुद्ध क्षितिराज शमसु-चा उपभोग घेऊन चक्रधरतीर्थात चक्रायुधाचे सायुज्य पद पावता झाला.

( उत्कर्ष याचा उल्लेख विक्रमांकदेव चरितात. १८ व्या सर्गात, ६७ व्या श्लोकात, आला हे. तो एकाकाळी भूपतींचे वैभव स्थानभूत लोहरचा अधिपति होता. त्याने दूरवर पृथ्वी-।ळ म्लेंछांची पदलाञ्छने मिटवून टाकली, असे वर्णन आहे. तो पुढे काश्मीरचा राजा ।. )

क्षितिराज हा भोज राजाप्रमाणेच दानोत्कर्षत्व व कविबांधवत्व, याच्यामुळे विश्रुत ला होता. अनंतराजाने आपला चुलत चुलता जस्सराज याचा पुत्र तन्वंग राज, याच्या टीत त्या आपल्या नातवाला--बालराजाला--घातले होते. ( २६० ) पुढे तो बालराजा व चें राज्य यांचें उत्तम संवर्धन केल्यानंतर, तन्वंगराज काश्मीर मंडलात परत आला, नेंहि चक्रधर तीर्थांतच देह ठेवला. तोंवर या राजकुलातील लोकाना द्रोहरूपी कलंक गलेला नव्हता. ते सर्व माल मिळकत सारख्या हक्काने उपभोगांत असत.

इंदुराजाचा पुत्र बुद्धराज, याचा पुत्र सिद्धराज, त्याचा पोटी शूर वीर असा मदन ज, हा पैदा झाला. त्याचा पुत्र जिंदुराज, भारी गर्विष्ठ होता. राजा आपल्याशीं नाराज लेला पाहून, तो दूरदेशीं निघून गेला होता. तो मोठा धीर व शूर होता, म्हणून डामर कांच्या दांडगाईमुळें त्रासलेल्या राणीनें, त्याला बुद्धयां बोलावून घेऊन मंत्रिपदावर कायम े होते. त्यावेळीं देवग्राम येथील क्षोभ डामर, राज्याला भारी तापद झाला होता. जिंदु-ानें त्याच्यावर तावडतोब हल्ला केला व त्याला धरून फांशीं दिलें. ( देवग्राम हे बहुधा

रेंब्यार नदी कांठच्या शुपियन गांवापासून दीड मैलावर असलेलें द्रेग्राम असावें. तेथून जवळच कपालमोचन तीर्थ आहे. त्यालाच नकाशांत नगबल असें म्हटलेलें आहे. )

नंतर त्या प्रतापी वीराला राजानें मुख्य सेनापति केलें. त्यानें राजपुरी वगैरे ठिकाणच्या राजांकडून करभार वसूल केला. पुढे अनंतदेवाच्या राज्यांत आलेल्या अनेक संकटें व अडचणी यांचें निवारण करणारा कालदंडच, असा अमात्य हलधर, चक्रधर तीर्थांत आसन्नमरण होऊन पडला होता. त्याच्या समाचाराला व त्याचा अखेरचा उपदेश ऐकण्यासाठीं राजा अनंतदेव व राणी सूर्यमती, त्याच्याकडे गेले. तेव्हां त्याने त्याना बजावलें की, 'परराज्यावर साहसाने व अविचाराने केव्हांहि चढाई करूं नये, अशा अंगावर ओढून आणलेल्या संकटांतून, मी अनेक प्रसंगी वल्लापुरादि स्थळातून आपणाला मोठ्या युक्तीने व शर्थीने बचावून आणले आहे. तसेच हा जिंदुराज भारी वाढलेला आहे. त्याच्याविषयीं नेहमी सावध रहा. तो आपणा पितापुत्रामध्यें वैर पाडील ' हे त्याचें बोलणे लक्षांत ठेवून अनंतदेवाने पुढे लौकरच तो ओजस्वी जिंदुराज निश्शस्त्र असतांना त्याला युक्तीने बिज्जाच्या हातीं कैद करविले.

पुढें लौकरच सेवकाच्या नादाने दुर्वृत्त कलश राजा फारच निंद्य वर्तन करूं लागला शाहीराजवंशांतील बिज्ज, पित्थराज, पाज व आणखी एक, असे चौघे जण त्याचे अंतरंगातलि प्रेमी बनले, तसेच गंजपति नाग याचा पुत्र जयानंद, हा त्याचा कौटिल्यउपदेशक व नर्म सचिव झाला द्विजेंद्र अमरकंठ शिवस्वरूप झाल्यावर, त्याचा पुत्र प्रमदकंठ, याला कलशाने गुरु केले. कलश जात्याच दुष्ट. त्याला प्रमदकंठाने दुष्कर्मे व गम्यागम्य विचार याचा त्याग, यांमध्ये भर दिली. त्या गुरूच्या श्रेष्ठतेचे कोठवर वर्णन करावे ! तो निःशंकपणे स्वतःच्या कन्येशी लागू होता.

तांत्रिक महासमय संचार चतुर व स्वभावतःच उग्र व निडर असा बिडालभट्टपाद नांवाच्या वाण्याला प्रत्यक्ष भैरवाची सुद्धां पर्वा किंवा क्षती नसे. त्रस्त, विपन्न, ढोपरे फुटलेले असे वणिज शिष्य त्याच्या पायां पडत. तेव्हां त्याच्या मस्तकावर वरद हस्त ठेवून ते बिडालाभट्टपाद त्यांना स्वस्थ व बरे करीत असत ! ( २८० ) तो पूर्वी एक वाणी होता. त्यानें एक काळे माजर पाळले होते त्यावरून त्याचे नाव कृष्ण बिडाल पडले होतें. तो मूळचा अगदी ठोंब्या. पण पुढें आपल्या ज्ञानाची फुशारकी मारीत त्यानें वैद्यकी सुरूं केली व तो हळूं हळूं रजक व शिल्पी वगैरे हलक्या लोकाचा गुरु बनला. तो बऱ्याच विद्वान व प्रतिष्ठित लोकांच्या शिरावर सुद्धा मांजराची विष्ठा व हिंग वगैरेची घाण येत असलेला, आपला वरद हस्त ठेवून, त्यांना बरे करण्याचा आव आणीत असे.

शुष्कमेघ दिवसाला काळा कुट्ट बनवितात, त्याप्रमाणें मूळांत निस्सार व चारित्र्यहीन पण सारखी गर्जना करणारे असे हे गुरुलोक त्या कलशाला जणो आंधळा बनवीत होते.

चमक नावाचा एक फिरता तमाशेवाला अलगुज वाजविण्यांत निपुण होता. बायका बिघडविण्याच्या कामांतहि त्याचा हात खंडा असे. तो रात्रीं गाणें बजावणाऱ्या मंडळींच्या सह-

वासांत असावयाचा. ती मंडळी सारखी जागून खूप खादाडपणा करी. अपचनामुळें त्यांच्या तोंडाला नेहमीं घाण येत असे. त्यांचे घसे जणों मोऱ्या, त्याच्यांतून प्यालेलें मद्य, शौचास घेतलेल्या पाण्यामारखें एकदम घसरून पोटांत पडत असे.

हलधराचा एक पुत्र कनक याने मद्याच्या नशात रागाने चमकाला नोकरांकरवीं खाबाला बाधवून त्याचे नाक कांपविले होते. अशा त्या नकट्या व अभद्र विटाने कुंटण-पणाच्या द्वारे हळूं हळूं कलश राजाला भारून, त्याचें प्रेम संपादन केलें होते. राजाच्या कृपेमुळें हा नृकुक्कर चागला संपन्न झाला होता व त्याला मंत्र्याचे पद मिळाले होते. त्या बरोबरच त्याला–लहानसा राजपुत्र किंवा संस्थानिकाना यांना मिळणारी–ठक्कुर ही पदवीहि प्राप्त झाली होती.(२९०)लोकामध्ये काहीं प्रतिष्ठा वाढतांच त्याने आपल्या कुलाशी व वंशाशी संबंध तोडून टाकला होता कारण त्याचा त्याला हलकेपणा वाटे ! त्याचप्रमाणें त्याला आपल्या नासावंशछेदाचा–नाक कापले गेल्याचाहि–अभिमानच वाटत असल्यास नवल नाहीं !

चमकाच्या प्रोत्साहनाने कलश राजाने निर्लज्जपणा व मनसोक्त वर्तन, यांची कमाल चालविली होती त्याच्या उच्चाराने जिव्हा विटाळणे योग्य नव्हे. तरी ओघाने आल्या-प्रमाणे त्याचे थोडेसे दिग्दर्शन करणे भाग आहे.

राजाची बहीण कल्हना व तिची कन्या नागा, यानामुद्धा त्या परदारासक्तानें अंगाखाली घातल्यावांचून सोडले नाही ! ही गोष्ट वृद्ध अनंतदेव व राणी सूर्यमती याना कळली. तेव्हा जनलज्जेमुळे त्यानी त्याची परिस्फुटता केली नाही, पण तद्विषयक डाच मनात ठेवला

ओबन गावचा, ( ओबन किंवा उयन हे लहानसे गाव, पामपुर पद्मपुराच्या ईशान्येस सुमारें तीन मैलावर होतें. तेथेंच एक उन्हाळे होते.) लोष्ठक नावाचा एक गरीब ग्रामजोशी, मूठ मूठ भिक्षा मागून निर्वाह करीत असे. तो लोकाचे पडेल ते कामहि करी. तो निशाचर वृत्तीने फिरत असताना, त्याच्यावर ग्रामदेवतेचा प्रसाद होऊन, त्याला मुठीत धरलेल्या वस्तूंचे ज्ञान होऊं लागले. यावरून त्याचे नाव मुष्टिलोष्ठक पडले. गुरु, दैवज्ञ आणि कुट्टण, या नात्यानें त्याच्यावर राजाचे भारी प्रेम बसले.

भट्टारक मठाचा अधिपति व्योमशिव, हा एक धार्मिक व कर्मठ भिक्षू–तापस–होता. त्याने खुखुट नांवाची सिद्धि मिळविण्यासाठीं, कडकडित तपश्चर्या केली होती. त्यानें पूजापाठासाठीं मम्म नांवाचा एक आधळा गवयी ठेवला होता. त्याला हातीं धरून चागविणारा एक मदन नांवाचा अवंतिपुरचा टारगा ब्राह्मण होता. ( ३०० ) त्याचीं सणाचीं हलकीं वस्त्रें बदलून व चांगले कपडे घालवून त्याला व्योमशिव हा राजाकडे प्रसा-दाचीं फलपुष्पे घेऊन पाठवीत असे. तो मोठा वाचाळ होता. तो त्या दुष्ट कुट्टण मंडळींत मिसळून त्यांच्या सारखाच हळूं हळूं राजाच्या अंतरंगांतील एक प्रमुख प्रेमी बनला.

असली लबाड व नीच मंडळी व विट यांच्या दमांत येऊन, त्या मूर्ख कलश राजाला पापकर्मेंहि सत्कर्में वाटूं लागलीं. त्यांच्याविषयीं तो फुशारकी मारूं लागला. लज्जास्पद नर्म वाक्ये म्हणजे थट्टा, प्रजापीडन हेंच उचित व न्याय्य कर्म, निर्लज्जपणा

हाच आर्जस्विता व तेज, अगम्यांगनागमन हाच खरी व मनोहर रसिकता, लुच्चा लफंग्यांनी दिलेल्या शिव्या निमूटपणे सोसणे म्हणजे ऋजुता, असें मानणाऱ्याला कोणची गोष्ट वाईट व त्याज्य असणार ?

तो राजा चौर्यरतीच्या नादाने व हव्यासाने रात्री घरोघर भटके. त्याला स्वदारालिंगनसुख आवडेनासें झाले पारतंत्र्यामुळे जास्त प्रिय वाटणाऱ्या परदार रतीचा अभिलाषरूपी प्रखर आगीत मनुष्याची स्थिति घृताच्या आहुतीसारखी होत असते.

त्या पांच सहा कुट्टणांना असल्या या घाणेरड्या कामासाठी बरोबर घेऊन कलश राजा, एका रात्री चौर्य रतीसाठी उत्सुकतेनें जिंदु राजाच्या वाड्यांत पोंचला. त्याच्या अत्यंत छिनाल सुनेकडून त्याला संकेत मिळाला होता. तो दारांत शिरताच कुत्रे भोंकले. तसे चौकीदार चांडाल, चोराची चाहूल समजून, तरवारी घेऊन धांवले. तोंवर कलश घाबरून जमीनीवर पडला होता. त्याच्यावर आतां वार होणार, असे पाहून, त्याचें साथीदार त्याच्या पाठीवर पडले व त्यांनी त्याचे प्राण वाचविले. ( ३१० ) चांडाल त्याला यथेष्ट मुष्टिमोदक देऊं लागले. तसे त्या साथीदारांनी, 'तो कलश राजा आहे, थांबा, मारूं नका, ' असे म्हटलें व त्याला कसे तरी सोडविले. आपण त्या स्त्रीकडे जाताना त्या अभद्र नकट्या चमकाला बरोबर घेतलें, म्हणूनच हा अपशकून झाला अशी कलशाने मनाची समजूत केली ! त्या जारिणीच्या वक्र कटाक्षानीं व्यथित होत्साता, तो तिच्याकडे निघाला होता. पण त्याला तेथे मृत्यूचे कटाक्ष पाहावे लागले. तो केवळ दैवाच्या कृपाकटाक्षानेंच जिवंत परत आला.

त्याने आपल्या मनाच्या दुष्टपणामुळे नीतिमार्गाचे उल्लंघन केलेलें होते यामुळे राजा असूनहि त्याला अंत्यजांच्या हातून असा अवमान पावून मार खावा लागला होता. या इंद्रियांनी इंद्रचंद्रादि देवताना सुद्धां लज्जित केलेलें, तेव्हां त्याच्यामुळे यःकश्चित मानवाचा मान म्लान झाल्यावाचून कसा राहणार? प्रथम दुर्नयाचा उदय होतो, नंतर गर्ह्य कामेच्छा प्रबल होते. आरंभी धर्माचा संक्षय होतो, मग कुलक्रमागत स्वाभिमान नष्ट होतो. आधी कुलीनपणाला बट्टा लागतो. मग जीवितहि संषयात पडते. चारित्र्यरूपी चिंतामणी गळाल्यावर, कशाचा म्हणून विपर्यय झाल्यावाचून राहणार ?

तो दुर्वृत्त कलश राजवाड्यांत परत पोंचे तोंवर, त्याच्या आईबापांना सर्व हकीकत कळली होती. सुतस्नेह, जनलज्जा, शोक, खेद, वगैरेमुळे त्यांना फार वेळ रडूं आलें. शेवटीं त्यांनी यापायी त्या पापी पुत्राला कैद करण्याचे ठरविलें. त्याचा वडील नातु, बाप्पिकेचा पुत्र, ( बाप्पिका ही चंपाच्या राजाची कन्या होती ) हर्ष, हा सर्व विद्या व कला यांच्यात प्रवीण होता. त्याला राज्य देण्याचा त्यांनीं विचार चालविला होता. सकाळीं त्यांनीं कलशाला बोलावणे पाठविलें. तेव्हां कलशाला त्यांची भीति वाटली व ती त्यानें बिज व जयानंद यांना बोलून दाखविली. (३२०) पुढे जयानंदाचा हात धरून तो कसाबसा वडिलांकडे गेला. बिज त्याच्या मागें होता. तो जवळ पोंचतांच अनंत-

देवाने रागाने एकदम त्याच्या तोंडांत मारलें व म्हटलें, ' निभाग्या, कारट्या, ती हातां-तली कट्यार, टाक खालीं. ' हें ऐकून कलश कांहींसा गर्भगळित व त्रस्त झाला. त्याला सांवरून धरीत बिज्जानें आवेशानें आपल्या तरवारीला हात घालून, धिटाईनें अनंतदेव राजाला म्हटलें, ' महाराज, आपण स्वतः मानधनाग्रणी, मानी लोकांना आपलें मानी-पणाचें व्रत सोडतां येत नाहीं, हें आपण कसें विसरतां ? मी कलश महाराजाकडून वेतन पावणारा राजपुत्र, त्याच्यापाशीं सशस्त्र असताना, जिवांत जीव आहे, तों मी त्यांचा साथ कसा सोडूं ? आपण वडील व हे पुत्र. मी जवळ नसेन तेव्हां, आपणाला वाटेल तसें करा'. अशा स्निग्ध व कठोर भाषणानें बिज्जानें राजाला चकविलें व तो कलशासह परत निघून गेला.

अनंतदेवापुढें हें असें धीराचें व प्रसंगावधानाचें वर्तन करण्यांत बिज्जानें दाख-विलेलें विलक्षण साहस व धैर्य याची साऱ्या धीरवीर लोकांकडून प्रशंसा झाली. या प्रसंगीं केवळ भावी प्रबल दैवामुळेंच राणी सूर्यमती निरुपायानें जप करण्यांत निमग्न झालेली होती. नाहीतर त्याच दिवशीं कलशाला कैद किंवा मरण प्राप्त झालें असतें. ( ३३० )

बिज्जानें कलशराजाला त्याची चतुर राणी द्दिल्ला इच्या घरी नेलें. तिला सर्व प्रकार कळला होता. कलश फार उदास व त्रस्त झाला होता व तो भीतीनें गांगरून गेला होता. त्याला जबर मस्तकशूळ झाला असल्याचें प्रकट करून, द्दिल्ला राणीनें त्याच्या मस्तकाला पुष्कळसें तेल चोळलें व दारावर बंदोबस्तासाठीं बिज्जाला नेमून, कलशाकडे कोणीहि जाऊं नये, अशी व्यवस्था केली !

जपांतून उठल्यावर राणी सूर्यमतीनें राजाची निर्भर्त्सना केली. नंतर ती प्रकृतीची चौकशी करण्यासाठीं, कलशाकडे गेली. तसेंच त्याला कैद करविण्याचा निश्चय करून, राजाहि तिकडे गेला. तेव्हां बिज्जानें फक्त त्यालाच आंत सोडलें व बरोबरच्या लोकांना बाहेर अटकाविलें. हें पाहून संतापाच्या सपाट्यांत राजा अनंतदेव विजयेश्वराला जाण्याला निघाला. तो अवंतिपुराजवळ पोंचला तेव्हां तेथील चिरशावद्र वगैरे विप्रांनीं त्याला भेटून विनंति केली कीं, ' महाराज, आपण स्वतःच राज्याधिकार सोडलात. आतां हा त्रास संताप व पश्चात्ताप कशाला ? आपण जाणूनबुजून बरें वाईट केलें असेल, त्याचा पुढें पश्चा-त्ताप करणें ठीक नाहीं या दुर्बुद्धि पुत्राला आपण आतां नांवें ठेवणेंहि योग्य नाहीं. कारण आपणच सर्व प्रजेला त्या त्याच्या दुष्टाव्याला सोंपलें आहे'.

राजाच्या अंगीं खरोखर कळसूत्री बाहुल्या इतपतच सत्ता असते. ( ३४० ) प्रजेच्या शुभाशुभ नशीबाप्रमाणेंच तिला सुष्ट किंवा दुष्ट राजा मिळत असतो. वृक्षांना अंबुवाहक अभ्रांकडून अमृत-जल-किंवा घातक अशनिपात प्राप्त होतो तो, त्याच्या पूर्वसुकृत दुष्कृता-नुरूपच होय.

' या कुमार्गी पुत्राचा त्याग करून, आपण मुखानें राहूं म्हणता, पण आपण रिकामे, कोश भांडार वगैरे मागें टाकून निघून आला आहां. तेव्हां तें साधणार कसें ? सद्दंशी

व शुचि, अशा पुरुषाचेंहि सामर्थ्य, कोशयुक्त व धाराधिरूढ आसिलतेप्रमाणें असतें. कोशहीन व नष्टधार तरवार, तसेच नष्टाधिकार आणि कोशहीन राजा, यांना कोण पुसतो ?' !

हें ऐकून राजाचें मन फिरले व त्याला परत जावें असें वाटले. तितक्यांत कलश-राजपुत्र आपल्या राण्यासह त्याचें सांत्वन करण्यासाठी आला. तसा तो नगरांत परत गेला. पण त्याचा राग गेलेला नव्हता. त्यानें राजवाड्याच्या इमारती शिवाय सर्व काहीं गोळा केलें. सारी संपत्ति, घोडे, आयुधें, कवचें वगैरे घेऊन, तो परत गेला. काही वेळ त्यानें वितस्तेच्या तीरावर आपल्या राण्याची वाट पाहिली. त्यानीं येताना सर्व प्रकारचे सामान नांवांमध्यें भरून आणले होते. वाडयांतील भिंतीत ठोकलेले खिळेसुद्धां मागे सोडलें नाहीत. तो पहिल्या खेपेस निघाला होता, तेव्हां, लोकांना त्याचा सुगावा नव्हता. यामुळें लोक गप होते. पण यावेळी तो जात असल्याचे ऐकून सर्व प्रजा शोकाक्रोश करूं लागली. तिने त्याच्या मार्गावर पुष्पांजली टाकल्या व बाष्पबिंदूच्या मिषानें जणो अनेक अर्घ्य अर्पण केले. साऱ्या मार्गांत, ' अहो बाबा, अहो मातोश्री, आम्हांला असें येथे टाकून आपण कोठे हो चालला ! ' या शोकशब्दाशिवाय दुसरें कांहीच ऐकूं येत नव्हते. ( ३५० ) मधून मधून हा रस्त्यावरील शोकध्वनि थांबे. त्यावेळी शैलातील निर्झराचा ध्वनि–जणों त्या शैलांचा दीर्घ शोकस्वरच असा–ऐकूं येत असे. मार्गावर सारख्या ऐकत आलेल्या शोक-स्वराचा आर्तनाद, निर्जनस्थळींहि त्याच्या कानात सारखा घुमत असे. तो स्वतःच्या पुत्राच्या पापकृत्यामुळे निघून चाललेला पाहून, लोक, वृक्षांवर घरट्यांत पिल्लांचें पोषण करणाऱ्या पक्ष्यानासुद्धां नांवे ठेवूं लागले !

पुत्राच्या दुर्वर्तनामुळे खिन्न व त्रस्त झालेल्या त्या दंपत्याला विजयेश्वराच्या मंदि-राचे दर्शन एकाधा प्रेमळ बाधवाच्या व आप्ताच्या दर्शनाप्रमाणें, भारी समाधानकारक वाटलें. तेथे त्यानी पोहोचतांच पहिल्या दिवशीं खजीना, घोडे, नोकर, चाकर, वगैरेसाठीं व्यवस्थित जागा नेमून दिल्या. त्या सर्व भागात खजीना, सामान सुमान, धान्य, वगैरेंचीं गोतीं कशीतरी पडलेलीं होती. त्यामुळे तो प्रदेश लाकडाच्या ओंडक्यांनी भरलेल्या मैदाना-सारखा दिसत होता. तन्वंगाचे राजपुत्र व गंग वगैरे राजाचे आप्त, तसेच सूर्यवर्म चंद्रादिक डामर, हे राजाबरोबरच निघून आले. त्यांना व क्षीरभूप वगैरे डामरांना राजानें त्या नव्या वस्तींतच हवी तशी सोईवार जागा दिली आणि आपल्या बंदोबस्ताचें कामहि त्यांच्या-कडेच सोपविलें. अशा तऱ्हेनें तो त्या नव्या नगरींत राहिला.

पुढें सर्व व्यवस्था लागून स्वस्थपणा मिळाल्यावर, त्या राजाचा काल त्या विजयेश्वर क्षेत्रात सुखानें व आनंदांत जाऊं लागला. राजपुत्र, स्वार, शस्त्रधारी, डामर मंडळी, वगैरे सर्वजणांनीं त्या वृद्ध राजाच्या जवळच आपली वस्ती कायम केली. ( ३६० ) त्या राजानें लौकिक वर्ष ४१५५ (ई. स. १०७९) च्या ज्येष्ठांत नगर सोडलें, तेव्हांपासून त्याला विज-येश्वर क्षेत्रांत जणों स्वर्गसुख प्राप्त होऊं लागलें.

राजा निघून गेल्यावर कलशाला सर्व संपत्ति धुवून नेलेलें, निधि काढला जाऊन त्यावरील रक्षक नागहि निघून गेलेल्या स्थळासारखे, तें राज्य मिळालें. त्याच्या स्वतःजवळ

कांहीच शिल्लक उरलें नव्हतें. तरी त्याने आपला राज्यकारभार उज्ज्वल व्हावा म्हणून बिज्जादिकांच्या विचारानें योग्य व मान्य अंमलदार नेमले. जयानंदाकडे सर्वाधिकारिपद दिलें आणि वितस्तात्र येथे राहाणारा वराहदेव याला द्वाराधिकारी केलें. तसेंच जिंदुराजाच्या कंपनामध्यें विजयमित्र नांवाचा कापडनीस होता. त्याला त्याने कंपनाधिपति केलें व दुसऱ्या काहीं लोकांनांहि त्यांच्या त्यांच्या योग्य, अधिकाराच्या जागा दिल्या. पित्याशीं झगडावे लागेल म्हणून त्यानें द्रव्यसंचय चालविला.

पुढे जयानंदाने हर प्रयत्नाने मिळतील तशा बऱ्या वाईट सावकारांकडून पैसा काढून काही पायदळ भरती केले आणि त्याच्या व बिज्ज वगैरे राजपुत्रांच्यासह तो त्या वृद्ध राजाशीं लढण्याच्या इरायानें अवंतिपुराला गेला. जिंदुराज कैदेंतून सुटला होता. त्याला या प्रसंगीं सहाय्य करण्याविषयीं कलशाने विनंति केली. त्याप्रमाणें त्यानें शिमिकाच्या मार्गानें हल्ला करण्याचे ठरविलें. राजाकडचे डामर व स्वार वगैरे, हे ऐकताच हिम्मतीनें राजाला येऊन मिळाले. (३७०) विजयेश्वराभोंवतालचा सर्व भाग सैनिकानीं भरून गेला. जागजागी स्वाराचे घोडे, रातबाचे गोळे खात असलेले दिसत होते. राजाला भारी राग आला होता. तरी राणीनें पुत्रस्नेहामुळे दोन दिवस लढाई लाबविली आणि मध्य वगैरे विश्वासू विप्राच्या हाती रात्रौ गुप्तपणें पुत्राकडे निरोप पाठविला की, ' तूं इतका मस्त होऊन प्रत्यक्ष वडिलाशीं लढण्याला प्रवृत्त झाला आहेस, असा तुझ्या बुद्धीला हा काय घातक भ्रम पडला आहे ? ज्यांनी नुसत्या भ्रूभंगानें दरद राजासारख्याचा फडशा पाडला, त्याच्या कोपानलामध्ये तूंही पतंगलीला का करतो आहेस ? हा प्रति अग्नीसारखा प्रतापी राजा, एकदा स्वार होऊन, निघाल्यावर, तुझ्या तृणप्राय सैनिकांची काय वाट होईल ? अशा प्रबलाग्रणीशीं लढण्याची हांव तूं कोणचे सैन्य, शौर्य, किंवा धन, यांच्या भरंवशावर धरतो आहेस ? यांनी हे राज्य आपण होऊन सोडलेले. त्या साऱ्या राज्याचा उपभोग घे. यानीं तीर्थवास पत्करलेला ! त्यांनी तुझें कोणचें नुकसान केले आहे ? तुम्हा दोघांमध्ये वैर पाडूं इच्छिणाऱ्या लफंग्यानीं तुला या दारुण संकटात पाडले आहे. तूं मूळचाच तृणप्राय. त्यांच्या पायीं तुझी लौकरच राख रांगोळी होणारसे दिसते. आपलें सैन्य परत ने. माझ्या जिवात जीव आहे तोंवर तुला इकडून कांही भीति नाहीं. ते मोठे सरळ मनाचे आहेत. पश्चात्तापाच्या व नम्र भाषणाच्या द्वारें त्यांच्या मनाला द्रव आण.' (३८०) आईची ही त्या दूतां मार्फतची गुप्त विनंति मान्य करून कलशाने रातोरात सैन्य परत नेले. सारें सैन्य रात्रींच परत गेल्याचें प्रातःकाळी राणीला कळतांच ती अनंतदेवाकडे गेली. ही आनंदाची बातमी त्यालाहि दूतांकडून कळली होती. राणीनें राजाची चांगली स्पष्टपणे कानउघाडणी केली व त्याला बराच दोष दिला.

पुढें तिनें त्यांच्या मधील उखाळ्या पाखाळ्या बंद केल्या होत्या तरी, लबाड लोकांच्या कलागतीमुळें त्यांचीं मनें वरचेवर कलुषित होतच होतीं. वैर वरचेवर दूर करून संधि केला जात असला तरी, तें सारखे पुनः उचल खात असते. हा त्याचा नैसर्गिक धर्म व परिणामच असतो. जीर्णवस्त्र कितीदां शिवले तरी पुनः फाटतेच.

बाहेर दरबारांत व खानगींतहि पुत्राच्या दुष्कार्माचें वर्णन झालेलीं ऐकून राजाला भारी खेद व संताप होत असे. त्याच्यातच राणीच्या उपालंभाच्या कर्णकटुभाषणांची भर पडल्यामुळें तो अधिकच त्रस्त व कष्टी होत असे दिवसभर उन्हानें तापणाऱ्या व रात्री थंडीनें सुकडणाऱ्या पुष्करिणींतल्या निर्मळ पाण्याप्रमाणें, त्या शुद्धांतःकरणी राजाची स्थिति झाली होती.

पुढें पित्याच्या पक्षातील लोकांच्या घरादाराचा कलशानें नाश चालविला. पण त्या स्नेहवश अनंतदेवानें पुत्राच्या पक्षांतील लोकांचें कांहीं नुकसान केलें नाही. राणी पुत्रस्नेहानें अंध झाली होती. ती एकीकडून राजाचा सारखा उपालंभ करी व जुलूम पावलेले त्याच्या पक्षातील लोक त्याला कटु भाषणें बोलत. अशी त्या राजाला दोहींकडून भारी पीडा सोसावी लागे. यामुळें तो नेहमीं फारच दुःखी कष्टी रहात असे.

कलशाकडे नांवाजण्यासारखा कोणी शूर वीर नव्हता व जिंदूराजाला राजा कस्पटा सारखा मानीत होता म्हणून कलशाकडून राज्य काढून घ्यावें, अशी राजाला उत्कट इच्छा होती. पुत्राला पदच्युत करून तन्वंगाच्या पुत्राना राज्य द्यावें, असें त्याच्या मनात आलें. पण ते कबूल नव्हते. हें पाहून राणीला आपल्या वंशाकडून राज्य जाण्याची भीति पडली व तिनें राजाशी रात्रभर वाटाघाट करून आपला नातु हर्ष याला राज्य देण्यासाठीं बोलावणें पाठविलें. ( ३९१ ) आजोबाकडून आलेल्या दूतानीं बोलावल्याप्रमाणें, कांहींसा अटकेंत होता. तरी, हर्ष या साहस कर्माला तयार झाला. तो बाहेरच्याहि पहाऱ्यांतून निसटून स्वार होऊन निघाला. त्याचा घोडा फारच तेजस्वी, जणों मनोजव होता त्याला फटकारीत तो क्षणार्धांत पांच योजनें निघून गेला. बरोबरचे स्वार त्या कसलेल्या घोड्यामागें दवडण्यांत थकून शेण झाले. विजयेश्वरीं पोंचताच हर्षानें प्रथम आजा व आजी यांचें दर्शन घेतलें. तो त्यांच्या पायां पडला तेव्हा त्यांनीं आनंदाश्रुजलाच्या द्वारें, जणों त्याला राज्याभिषेकच केला. आपला पुत्र हर्ष आपल्या पित्याजवळ पोंचलेला पाहून कलश कांहींसा घाबरला. त्यानें समेटाच्या इच्छेनें अधिक बिघाड करणें बंद केलें. त्यानें हर्षाकडे समजुतीचीं पत्रें पाठवून, राज्याची होत असलेली खराबी लक्षात आणून, उघड वैर करणें बंद केलें. तरी अपसात वैर वाढतच चाललें होतें कांहीं काल कलश आपल्या आईच्या मतानें वागण्याचेंहि दाखवीत होता. त्याच्या आज्ञेनें त्याचा सेनापति खशाली–खशालया–कडे जावयाचा होता. त्याला, त्यानें राजाकडे येऊन पादवंदन करून जाण्याच्या शर्तीवर राणीनें परवानगीहि देवविली.

याच सुमारास हें राज्याला घातक असें पितापुत्राचें भांडण बंद पाडण्यासाठीं त्या दोघांच्याहि विरुद्ध सर्व विप्रांनीं प्रायोपवेशन चालविलें. ( ४०० ) तेव्हां त्यांच्या म्हणण्याप्रमाणें समेट होऊन, राजा व राणी दोन महिने नगरात जाऊन राहिली. पण लौकरच, जयानंदादिकांच्या सल्ल्यानें कलश आपणाला कैद करविणार आहे, असें ऐकून, ती दोघेंहि लगबगीनें विजयेश्वरी परत गेलीं. पुढें कलशानें, राजाच्या घोड्यासाठीं लावलेल्या

गवताच्या गंज्यांना रात्रीं आग लावविली व त्याच्या बऱ्याच पायदळ सैनिकांना अग्नि, विष, शस्त्र, वगैरेंनीं मारविण्याचा क्रम चालविला. असें हें वैर वाढतच होते. तरी राणीनें पुत्रस्नेहविवश होऊन, राजाला त्याचा प्रत्यपकार करूं दिला नाही.

लड्डा नावाची एक चवचाल कोळीण होती. तिचा एक थक्क नांवाचा टकल्या डामरजार होता. त्याच्यावर तिचे भारी वर्चस्व होते. त्या दोघाना कलशाजवळचीं टवाळ मंडळी, थट्टेने, राजाराणी म्हणत. तें ऐकून त्यानींच कलशाचा चेहरा प्रफुल्लित होई व त्याला गंमत वाटून हंसूं येत असे !

नंतर लौकरच राजा व राणी यांनी आपली सुवर्णतुला करविली. तसेच दुसरेहि अनेक दानधर्म व पुण्यकर्मे करीत आपले चित्त स्थिर व प्रसन्न ठेवण्याचा प्रयत्न चालविला. जवळच्या मोठ्या द्रव्यसंचयामुळें, त्याना कोणच्याहि प्रकारची ददात किंवा काळजी नव्हती. हे पाहून त्या नष्ट व पापी कलशानें, द्वेषाने, एका रात्री त्याच्या वस्तीला आग लावविली. तिने साऱ्या मालमत्तेमुद्धा, त्या नव्या विजयेश्वराजवळील वस्तीची राखरांगोळी झाली. या भयंकर सर्वनाशाच्या प्रसंगी राणी फारच दीन व हताश झाली. ती मरण्याला तयार झाली व त्या आगीतून बाहेर निघेना. तेव्हा तिला तन्वंगाच्या तनयानी कशीतरी बाहेर काढली. ( ४१० ) राजाचे सैनिक कपडे काढून निजलेले, गडबडीने उठले. त्याना दिगंबर स्थिति प्राप्त झाली होती. राजवाड्याच्या अत्युच्च गच्चीवरून हा सर्व प्रकार पाहून कलशराजा आनंदाने टिऱ्या पिटीत, त्या गगनस्पर्शी अग्नीच्या ज्वाळासारखा नाचत होता ! ( याच तऱ्हेचे रोमन इतिहासात याच्या पूर्वी सुमारे हजार वर्षांचें, नष्ट व नीच अशा नीरो नावाच्या बादशहाचे उदाहरण आहे. सारे रोम शहर पेटलेले असताना ही वेताळस्वरूपी स्वारी, आनंदाने अलगूज वाजवीत व नाचत होती ! लेले).

असा हा सर्वस्व नाश झालेला पाहून ते वृद्ध राजा राणी वितस्तेपार उतरून गेले. पण तेथें ते दुस्तर शोकसागरात बुडाले होते. त्याना काहींच सुचेना. दुसऱ्या दिवशीं सकाळी राणीला त्या अग्निप्रलयातून वाचलेले एक रत्नमय लिंग सापडलें. ते तिने सत्तर लक्ष दीनाराला तिच्याकडे एक ताक देशीय व्यापारी गृहस्थ आला होता, त्याला विकलें. ( ताक=तक्क देशीय-या देशाच्या पूर्वेस विपाशा-बियास-व पश्चिमेस सिंधु या नद्या आहेत. त्याची राजधानी प्राचीन शाकल नगरी होती. तेथे मद्राचे किंवा बाहिकाचें राज्य असल्याचे महाभारतांत वर्णन आहे. हे बाहिक व तक्क एकच, असे हेमकोशांत लिहिलें आहे. ) राणीने त्या द्रव्याने प्रथम सर्वांना अन्नवस्त्र विकत आणवून वाटलें व जळालेल्या वस्तीची दुरुस्ती चालविली. राखेच्या राशीतून राजाला जें गळलेले सुवर्ण व इतर संपत्ति सापडली त्याविषयींचें वर्णन सुद्धां हल्लीच्या पिढीला अद्भुत व कौतुकास्पद वाटते !

ते नवें पट्टण शून्याटवीसारखे झालें होते. त्याच्यांत तट्ट्याच्या छत्राकार झोपड्या कशा तरी तयार करवून, तो राजा, बरोबरच्या लोकासह राहू लागला. त्याच्यापाशी द्रव्य

साधन बरेचसे असूनहि, राज्याधिकाराच्या अभावीं–कामकरी न मिळाल्यामुळें–ती वस्ती त्याला मनांत असूनहि, पुनः चांगली व नवी बांधावितां आली नाहीं.

मातेच्या अनुकूलतेमुळे कलशराजावर कांहीच दाब उरला नाहीं. तो वरचेवर संतापकारक निरोप पाठवून पित्याचा पिच्छा पुरवीत होता. त्याच्या मनांतून त्याला तेथून कसेंहि करून हलविण्याचें होतें. म्हणून त्याने दूतांमार्फत राजाकडे पर्णोत्स येथे जाण्याविषयी सांगून पाठविलें. त्याला ती चढेल राणी सारखा दुजोरा देत होती, याचा राजाला भारी संताप आला व त्याने एक वेळ तन्वंगाचा पुत्र थक्कन, याच्या समक्ष खानगींत राणीला अश्रुतपूर्व भाषण करून खूप झिडकारलें. तो म्हणाला, 'मी आजवर बाईलबुद्धि-होऊन स्वाभिमान, शौर्य, यश, ओज, बुद्धि, राज्य, धन, काय काय म्हणून गमविलें नाही! नारी हें नराचें एक निरुपयोगी खेळवणें म्हणतात. पण शेंवटी नरच त्यांचे खेळवणें बनतो, हेंच खरें. द्वेष, विरक्ति, मत्सर, वगैरेंनीं प्रेरित होऊन, आजवर स्त्रियांनीं कितीकांना तरी, कृतांताचे अतिथी केलेले आहेत. कांहीं स्त्रियांनीं जादू करून पतींचे रूप, कांहींनी त्याचे बल, कोणी त्याची प्रज्ञा आणि कोणी पौरुष व कोणी प्राणसुद्धां हरण केलेले आहेत. पयोधराच्या स्तनाच्या–मेघाच्या–उन्नतीने उचंबळणाऱ्या तरंगिणी लहरी स्त्रिया नद्यांप्रमाणे प्रमत्त होत्सात्या अन्य गोत्रज–पुत्र–पर्वतावरील दगड माती, पतीवर–आसपासच्या तीर प्रदेशावर लादून त्या त्याच्या पृथ्वीपतित्वाचे–पर्वतपणाचें–हरण करीत असतात. पुत्रच शेवटी कामी येणार म्हणून, त्या जीर्ण व पतनोन्मुख पतिरूपी खोड हवें कशाला, असें समजून त्या पुत्राचे पोषण व भर्त्याचे शोषण करूं लागतात. असले हे इचे दोष, मी नेहमी जाणत असूनहि, स्वतःच्या थोरवीकडे लक्ष देऊन, आजवर तिची कानउघाडणी केली नाहीं. या त्राटिकेने माझे ऐहिक सुख तर बुडविलेंच. पण आतां ती माझ्या पारलौकिक सुखाच्या आशेच्याहि आड येऊं पाहते आहे. ( ४३० ) मी आसन्नमरण, वलीपलित व पांढरा सफेत झालेला, आता मीं हे विजयेश्वर क्षेत्र सोडून कोठें जावें? या क्षपाकर–चंद्र–कलामौलि व किल्बिषक्षपणक्षम –पाप नाश करण्यास समर्थ–अशा विजयेश्वराच्या द्वारी उत्कंठेनें सेवा करीत राहण्याची माझी इच्छा आतां दुसऱ्या कशाने तृप्त होणार? पुत्र पितरांना उभय लोकीं तारक असतो. या पुण्यतीर्थांतून हांकून देऊन, एकाद्या घाणेरड्या गल्लीत मी मरावे, असे इच्छिणारा असा पुत्र दुसऱ्या कोणाला तरी असेल कां?

पूर्वी लोकप्रवाद होता की, 'हा अन्य कुलसंभूत पोरटा, माझ्या घरी घुसविला गेला. तो मला आतां आठवतो व तो खरा असावा असें वाटतें. आकार व आचार यांच्यामध्यें विसदृश, बंधु विरोधी व प्रत्यक्ष पित्याशी द्रोह करणारा पुत्र अन्य बीजाचा समजावा.'

आजवरचा सर्व दाब झुगारून देऊन फारां दिवसांपासून सांचलेला राग व्यक्त करणारे हे राजाचें भाषण राणीला मर्मी लागले. असलें कडक व मर्मभेदी भाषण व तेंहि आप्तांसमक्ष करून, पुत्रासंबंधाचें रहस्य बाहेर काढलेलें पाहून, राणी विशेषच लज्जित व अवमानित झाली. कलश मूळचा महत्तम मंत्री प्रशस्त याचा मुलगा. आपलें मूल मेलेलें पाहून राणीनें त्याची गुप्तपणें अदलाबदल केली. असा कलशाच्या जन्माच्या वेळीं लोक-

प्रवाद उठलेला होता. ( महत्तम-हा एक विशिष्ट मंत्री होता. त्याच्याकडे कोणचे अधिकार होते याचा खुलासा नाही. एकाच वेळी अनेक महत्तम मंत्री असत. ) नवऱ्यांना मुठीत ठेवणाऱ्या स्त्रियांना, भर्त्यानें स्पष्टपणें विरुद्ध भाषण करून नांवे ठेवणें ही गोष्ट, अगदीं हलक्या माणसाने मस्तकावर मारलेल्या लाथेसारखी वाटते.

या भाषणाचा राणीला फार संताप आला व तिने त्वेषाने, ऐटीनें, ठसठशीत, कठोर व एकाद्या बाजारबसवीप्रमाणें, त्याला उत्तर देत म्हटले, ( ४४० ) ' या गतश्री, भिकार, भाग्यहीन, मूढ व व्यर्थ वृद्ध झालेल्या, थेरड्याला, कोठें व काय बडबडावे, तें कळत नाहीं. त्याला स्नानाला पडदणीसुद्धां मिळत नव्हती. त्याच्या मदतीला मी मिळेपर्यंत त्यानें काय काय म्हणून गमविण्याचें बाकी ठेवलें होते, हें सर्व लोक जाणतात. तुम्ही मला दिलेली सारी दूषणे आपल्या आप्तस्त्रियांना लागू असतील. ही प्रायश्चित्त करण्याची वेळ. ते तुम्ही कां करीत नाही. तुम्ही कुचकामाचे, केवळ असमर्थ, पुत्राने देशोधडी लावलेले, आतां पत्नीनेंहि तुम्हांला सोडले, असे लोक म्हणतील, याचेंच मला भय वाटते आहे. '

राणीचे हे मर्मभेदक व गृहछिद्रे उघडीं करणारे भाषण ऐकून राजा अत्यंत दुःखी होऊन स्वस्थ बसला. थोडया वेळाने त्याच्या पलंगाच्या बाजूने रक्ताची धार लागलेली दिसली. त्याच्या चेहऱ्यांत मुळीच फरक पडलेला नव्हता. ते रक्त पाहून राणी घाबरली. व थक्कनाला रडूं आले. रागाच्या आवेशांत राजाने कोणाला न कळत, गुदद्वारात कट्यार खुपसली होती, असे त्याला दिसून आलें. राजा लाजला. तरी त्याने धैर्याने आज्ञा केली कीं, ' बाहेर, मला जबर रक्तातिसार झाला, असेच प्रकट करा. '

केवळ स्त्रियांच्या बुद्धीला आहारी गेलेले, विश्वासघातकी सेवकांवर हट्टाने पुनः पूर्ण विश्वास ठेवणारे व यःकश्चित शत्रूवर वरचेवर हल्ले करून त्याला नसते महत्त्व देणारे, असे निर्बुद्ध राजेलोक लौकरच नाश पावतात.

घोडयावरून परत येत असताना राजाला शरदातपाच्या त्रासामुळे फार तृषा लागली व त्यावेळी तो धन्याचे पाणी प्याला. यामुळे रक्त पडूं लागले, असे राजसेवकानी, गंभीरपणाने, बाहेरच्या मंडळीला कळविलें. खरा वृत्तांत त्या वेळीं बाहिर आला नाही. ( ४५१ )

लौकिक वर्ष ४१५५ (ई. स. १०८१) वर्षी कार्तिकी पौर्णिमेच्या दिवशी तो राजा विजयेश्वराच्या मंदिरासन्निध मरण पावला. तेव्हां तो एकदांचा पत्नी व पुत्र, दोघांच्याहि जाचांतून सुटला व त्याला मोकळेपणी पाय पसरून दीर्घ निद्रा घेण्याला फुरसत मिळाली. त्यापुढें त्यानें कोणाशीं वैर धरलें नाहीं, किंवा त्याच्याशीं कोणाचें वैर उरलें नाहीं. यामुळें तो थोर मनाचा राजा सुखी व शांत झाला. तो संग्राम राजाचा वारस व राजा असून त्याचा देह, त्या मंदिरांत जमीनीवर, एकाद्या अनाथ व स्नेह-मित्र-हीन माणसासारखा पडला होता. सर्वस्व दान केलेल्या त्याला, प्रिय जनांचा शोकाक्रोश किंवा

वैऱ्यांचीं कर्णकटु भाषणें, याचा आनंद किंवा विषादहि वाटण्यासारखा नव्हता. त्यांतून सुटून तो दीर्घ निद्रासुख अनुभवीत होता.

आपल्या संबंधांत केलेल्या दाक्षिण्याच्या उल्लंघनाचें प्रायश्चित्तच, म्हणून त्यानें प्राण दिलेला पाहून, त्याच्या कृतज्ञ राणीनें त्याला सनाथ केलें. ती त्याचें सर्व भाषण विसरली. आचांडाल राजपुत्र, सर्वांच्या ठरलेल्या नेमणुका स्वस्थपणे व राजाच्या वेळच्याप्रमाणें वाटून तिनें राजाला ऋणमुक्त केलें. नंतर तिनें सर्वांकडून, श्री विजयेश शिवलिंगापुढे,स्वतः समक्ष, आपला नातु हर्ष याचें स्वामिभक्तीपूर्वक संरक्षण करण्याविषयीं, तीर्थजल प्राशन पूर्वक शपथा घेवविल्या. हर्षानें शोकाकुल होऊन तिच्या पायावर मस्तक ठेवलें. तेव्हां तिनें त्याला, तीर्थ अर्पण करीत, त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व ' पित्याचा केव्हांहि अगदीं विश्वास धरूं नको,' असें बजावलें. (४६०)

नंतर तिनें पतीचें वाण घेतलें. हातीं वेत्र—प्रतिहाराची छडी—घेऊन तिनें पतीच्या प्रेताचा अंत्य शृंगार करवीपर्यंत पहारा दिला नातवाच्या संरक्षणासाठीं तिनें स्वतंत्र शंभर स्वार,त्याच्या तैनातीला नेमून दिले व पतीचें प्रेत शिबिकेंत ठेवविलें. ही व्यवस्था होई तों दीड दिवस लागला. नंतर ती विजयेशाला नमस्कार करून, मेण्यातून निघाली. ती त्या प्रेतयात्रेबरोबर बाहेर पडताच,प्रेतवाद्याचा गजर आणि सर्व लोकांचा शोकाक्रोश,याच्या योगानें दाही दिशा जशा फाटूं लागल्या. प्रेताच्या शिबिकेवरलि पताका कडकत होत्या आणि तिच्यावरलि अलंकारामध्यें, चाललेल्या माणसाची प्रतिबिंबें पडत होती. यावरून ते लोक त्याच्याबरोबरच स्वर्गास चालले आहेत असें वाटे त्या शिबिकेला राजपुत्रानीं खांदे दिले होते. त्यांच्या उघड्या मस्तकावरील केस वाऱ्यानें उडत होते. ते त्या प्रेतावर चवऱ्या ढाळल्या सारखे शोभत होते.

त्या राजाच्या प्रेत यात्रेबरोबर सैनिकांची राजाला शेवटची हजीरी पहात पहात राणी सूर्यास्ताच्या सुमारास स्मशानात पोंचली. पुत्रस्नेह सुटेना म्हणून किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें तिला त्यावेळीं पुत्राच्या भेटीची अतिशय उत्कंठा होती. सैन्याच्या वर्दळीनें उडालेला धुरळा पाहून तिला आपला पुत्र कलशच येतो आहे असें वाटलें व तिची वृत्ति चंचल झाली. तितक्यात नगराकडून कांहीं लोक आले. त्याना तिनें मोठ्या आस्थेनें व आशेनें 'कलशराजा येत आहे का ?' असें विचारलें. (४७०)

इकडे कलशराजा आईकडे जाण्याला फार आतुर झाला होता.पण तऱ्हे तऱ्हेनें भीति घालून, तंटा लावणाऱ्या लबाड मंडळीनें त्याला रोकलें. शेवटीं राणी निराश झाली. तिनें वितस्तेचें जल हातीं घेतलें आणि, वितस्ताजलपानकरून मरणाऱ्याना निस्संशय ब्रह्मवाद्यांप्रमाणें मोक्ष मिळतो, या अर्थाचा श्लोक म्हणत, तिनें तें प्राशन केलें. त्यानेंच तिनें उपस्पर्श केला व मार्जन केलेंनंतर थोडेसे जल हातात घेऊन तिनें, ' खोश्यानाच्या चहाड्या सांगून, आम्हां दोघांशीं आमच्या पुत्राचें प्राणात वैर पाडणाऱ्या सर्व दुष्ट व नीच माणसांचे लौकरच निसंतान होवो,' असें म्हणून शापोदक सोडलें, तिचा तो घोर व अप्रतिकार्य शाप लौकरच प्रत्ययास येऊन, जयानंद, जिंदुराज वगैरे लौकरच प्राणास मुकले.

तिचा हलधराशीं संबंध असल्याविषयीं प्रवाद होता त्या संबंधांतही त्या सतीनें आपण निर्दोष नसलो तर आपणाला स्वर्गप्राप्ति न होवो अशी प्रतिज्ञा केली. याप्रमाणे आपले विशुद्धशील व चारित्र्य उज्ज्वल करून तिनें समाधानाने व हंसत मुखानें डोलींतून एकदम त्या प्रज्वलित अग्नीच्या प्रचंड ज्वालांमध्ये उडी टाकली. त्या वेळीं आकाशांत उंच उसळलेल्या ज्वालामुळे, जणों तिच्या स्वागतासाठीं स्वर्गातल्या सुरांनीं उत्सव करीत, साऱ्या आकाशाला शेंदरी रंग दिला होता. सर्व लोक दुःखाक्रोश करीत होते. त्यांच्या आवाजात त्या चिताग्नीचा भयंकर चटचटा शब्द दबून गेला व त्याच्या उत्कट शोकसंतापापुढें त्याना त्या चिताग्नीची धग मुळींच भासली नाही. यामुळे त्याना तो चिताग्नी, चित्रातल्या सारखा भासत होता. ( ४८० ) गंगाधर, टक्किबुद्ध, व दंडक हे सेवक आणि उद्दा, नोनिका व वल्गा, या दासी, यानी तिच्याबरोबर अग्निप्रवेश केला.

राजाच्या प्रेमांतले बप्पट व उद्भट याच्या कुलातले सेनत व क्षेमत बैरागी होऊन विजयेश्वरी राहिले.

या जगांतील सर्व प्राणिमात्र क्षणभंगुर असल्यामुळे ते फार दिवस टिकत नाहीत. माणसाचे मन व कांचेची कुपी, याच्यामध्ये हा एक साधारण गुण असतो कीं, त्याच्यात सांठविलेल्या अद्भुत कथा व गंगोदक न सांडतां किंवा शिळें होतां, फार दिवस सारखें टिकते.

तो राजा पत्नीसमवेत श्रीगौरीशंकराच्या सायुज्यतेला पावला त्यावेळी त्याला बासष्ट्रावें वर्ष होते. नंतर चौथे दिवशी त्याच्या अस्थी सावरून तन्वंग राजाचे सर्व पुत्र गंगेला गेले.

हर्ष विजयेश्वरीच आपल्या आजाचा परिवार व खजीना संभाळून राहिला. पुढे त्याचे लौकरच पित्याशी वाकडे आले. पूर्वीच्या भांडणांत कलश राजा नगरांत व त्याचा पिता अनंतदेव, सुप्रसिद्ध अशा विजयेश्वरी रहात होता. पण आतां त्याच्या विरुद्ध प्रकार होता. पिता नगरात व पुत्र विजयेश्वरी होता. त्या वेळी पिता साधनहीन होता. त्याला दारिद्र्याची भीति होती. म्हणून त्याने दूतांमार्फत समेटाचें बोलणें लावलें. पुत्र हर्ष, संपन्न व कांहींसा उधळ्या होता. दूतानीं पुष्कळशा खेपा घालून व योग्य भाषणें करून शेवटी त्या मानी राजपुत्राचे मन वळविलें व समेट केला. हर्षानें पित्याला ठरीव नेमणूक देण्याचें कबूल केलें व कलशानें त्याच्या व त्याच्या आजाच्या खजीन्याला व परिवारांना त्रास न देतां त्याचे रक्षण करण्याविषयीं वचन दिले. ( ४९० ) कलश राजा विजयेश्वराच्या वस्तीत शिरला तेव्हां, जळक्या घरांनी त्याची दृष्टी आणि जननिंदेनें त्याचे कान दग्ध होत होते. त्यानें तीर्थजल घेऊन शपथ केल्यावर, हर्ष त्याच्याबरोबर नगरांत गेला. त्याच्या खजीन्यावर त्याचीच मोहोर करवून कलश राजानें तो निराळा ठेवविला

पुढें हळूं हळूं कलश राजाची वृत्ति निवळत व सुधारत चालली. त्याचे आचरण चांगले सदाचरणयुक्त होऊं लागलें. तो आपल्या संपत्तीची योग्य काळजी करूं लागला. तसें त्याचें दारिद्र्य दूर झाले.

सेल्यपुर ( हें बहुधां झून्त्स परगण्यांतलें शीलपूर नांवाचें मोठेसें खेडें असावें. लोहराहून श्रीनगराला जाण्याच्या मार्गावर आहे. ) येथील मयनाचा पुत्र जय्यक ह हळूं एक संपन्न डामर झाला होता. त्याची शेतीवाडी व व्यापार फार मोठा होता. त भारी लोभी होता. दूरदूरच्या प्रदेशांत धान्य व इतर माल पाठवून त्यानें कुबेराशी स्पर्धा करत येण्यासारखी संपत्ति संपादन केली होती. त्यानें दीड कोसपर्यंत जमीनीत चर खोदवू त्यांच्यांत जागजागी दीनारांच्या राशी पुरवून, त्याच्यावर भातखाचरें तयार करवि आणि साळी पेरविल्या होत्या. त्या चरांमध्ये तो रात्रींच्या वेळीं सेवकांकरवीं लक्षाव दीनार पुरवी. ही गोष्ट गुप्त राहावी म्हणून त्यानें त्यातील बरेचसे सेवक ठार मारवि होते. तो आपल्या पदरच्या सशस्त्र सैनिकासह भांगीलचा कबजा घेण्याचा यत्न करी असतांना, त्याचे सैनिक एकदम भिऊन पळून गेले. त्याचा घोडा द्राक्षवेलींत अटकल असतांना, कोणी प्यायानें त्याला ठार मारलें. ( भांगील=हल्लीचा बांगिल परगणा. तो परस पोरच्या नैर्ऋत्येकडे आहे. ) पुढे त्याचे अगणित पुरलेले द्रव्य राजाला लाभले. त्यानें सारें काढवून घेतले. त्याच्या द्वारें राजाचें दैन्य कायमचे दूर झाले. ते उकरून काढलें दीनार धुतले जात असतांना बरेच महिनेपर्यंत त्याना लागलेल्या मातीनें वितस्तेः पाणी गढूळ झालें होते ' ( ५०० )

संपन्न पण लोभी लोक जीवापाड कष्ट करून धनसंचय करतात, तो दुसऱ्याच्य उपभोगासाठीं. ते स्वतः त्याचा उपभोग घेत नाहीत किंवा त्याचें दानहि करीत नाहीत हे तरी चमत्कारिकच होय ! धनलोभी मनुष्य रक्षक नागाप्रमाणे जणों वाऱ्यावर प्राण धारण करून, अंधेऱ्या कोठडीत–बिळात–पडून राहून, नग्न व दरिद्री स्थितीत, केवळ पर व्ययासाठीं निधीचे रक्षण करीत असतो. असा त्याच्याहून अधिक परोपकारी अन्य कोण आढळणार ?

साऱ्या नद्या शेवटी सागराला जाऊन मिळतात, त्याप्रमाणें त्या भाग्यवान् भूपतील दुसऱ्या अनेक मार्गांनीं तऱ्हेतऱ्हेची संपत्ति मिळत गेली. सायंकाळी चोहींकडून पक्षी गोळ होऊन एकाद्या वृक्षावर बसावे त्याप्रमाणें भाग्योदयकाळी मनुष्याला शेंकडों अर्थ आपोआप प्राप्त होत असतात. शुष्क सरोवराला मोठमोठाले पूर आलेले नाले व नद्या येऊन मिळतात तसेंच त्याच्या खालच्या जमीनीला अनेक झरे खालून पुष्टि देत असतात. शिवाय वरू आकाशांतून पर्जन्यवृष्टीहि होत असते. भोवतालच्या हिरव्यागार जमीनीतून त्याच्यां पाटाचें पाणीहि येऊन पोंचत असते. अशी पर्जन्यकाळीं, त्या सरोवराची चोहीबाजू सारखी भर चाललेली असते. खऱ्या भाग्योदय प्रसंगीं कोणकोणच्या शेंकडोंशे द्वारांनं संपदा येऊन पडत असत नाही ?

पुढें प्रजेच्या पूर्व पुण्याईचे फलच जणों उदयास येऊन कलश राजा प्रजेचें पितृव पालन करण्यांत दक्ष राहूं लागला. द्रव्यार्जनाच्या व व्यवहाराच्या कामीं, तो वाण्याप्रमाणे चतुर व सावध झाला. तरी तो योग्य सद्व्यय सढळ हातानें करीत असे. जमाखर्चाव त्याची सक्त नजर असे. तो कारकुनाप्रमाणें तात्काळ हिशेबाचें टिपण ठेवण्यासाठीं भूर्जपत्र

व खड्ग जवळ ठेवूं लागला. स्वतः नीट पाहून तपास केल्याशिवाय तो रत्नादिक खरेदी करीत नसे. यामुळें व्यापाऱ्यांना त्याला ठकविता येणें अशक्य झालें. तो आपली वेळ व्यवस्थित वाटून, योग्य रीतीनें व सुखासमाधानानें धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गाचें साधन व सेवन करी. तिसऱ्या प्रहरानंतर तो कोणालाहि भेटत नसे. (५१०) त्यानें चतुर व चौकस चार–हेर–ठेवले होते. त्यांच्या द्वारें त्याला, प्रजेला पडलेल्या स्वप्नावांचून, सर्व कांही वृत्तांत कळत असे. कोणी सज्जन कुटुंबी आपल्या घरची कच्ची व्यवस्था पाहतो त्याप्रमाणें तो राज्याची व्यवस्था पाही. यामुळें त्याच्या प्रजेंत कोणी दुःखीकष्टी नसे. त्याला कौलीनाचा चांगलाच अनुभव आलेला असल्यामुळें, न्याय इन्साफ करण्यात तो चोरांना सुद्धां सहसा उघड दंड करीत नसे. मंत्र्यांकडून कांही चुकी झाली असली तरी ती त्यांच्याकडून कबूल करविण्याच्या भरीस न पडतां, तो त्या चुकाची आपणच भरपायी व दुरुस्ती करी. त्याची प्रजा नेहमी शेकडों विवाह, यज्ञ, यात्रा वगैरे मंगल महोत्सवांत आणि मजेंत नेहमीं निमग्न असे. त्यानें न्याय नीतीने आपल्या ताबेदारींत आणलेले शेजारचे राजे, त्याच्या देखरेखीबाहेर भोजनसुद्धा करीत नसत. अमृतस्राव करणाऱ्या कलांच्या द्वारें पितर आणि देव याना सोम संतुष्ट करतो, त्याप्रमाणें त्याने तन्वंगाचे पुत्र थक्कन, आज्जक व धम्मट हे देशांतराला गेलेले परत आल्यावर, तसेच गुंगाचे पुत्र मल्ल वगैरेनाहि पुष्कळशीं इनामें देऊन संतुष्ट केलें.

त्याला दुष्कीर्तीचे परिणाम पूर्वी चागलेच भोवले होते. त्याचा नाद त्याला, त्या नीच अशा विदेशी मंडळीनें लावला होता. या वेळीं तो पोक्त व उतार वयाचा होता. तरी त्या नादाने त्याला पुनः पछाडले व त्यानें ते वेडे चार पुनः सुरू केले.

वुलिय नांवाचा एक तक्क देशीय गृहस्थ होता. त्यानें तुर्की व्यापाऱ्यांकडून नानादेशातील सुंदर पोरी विकत घेऊन कलशाकडे आणल्या. (५२०) त्यांपैकी कांहीं पोरी, आणि सुरेख म्हणून धरून आणून अंतःपुरांत घातलेल्या दुसऱ्यांच्या बायका. अशा मिळून त्यानें ७२ स्त्रियांची भरती केली. तो पुष्कळशा स्त्रियांचा उपभोग करी, तरी मत्स्ययूषादि वृष्य पदार्थांच्या सेवनामुळे त्याचें वीर्य व त्याची पुष्टि कमी होत नव्हती. महासमय पूजेची त्याला भारी आवड असे. तिच्यांत तो गुरूंच्या बरोबर मनसोक्त मोठाले प्याले भरभरून मद्य प्राशन करीत असे. अशा बऱ्या वाईट कामांत निमग्न असूनहि त्यानें विजय क्षेत्रांतील दग्ध झालेली वस्ती नवी वसाविली, तेथील दगडी देवालय नवें बांधविलें आणि शिखरावर एक गगनस्पर्शी सुवर्णछत्र बसाविलें. त्यानें त्रिपुरेश्वराच्या मंदिरांतील खर्चाचा कायमचा बंदोबस्त केला. तेथें एक शिवालय बांधविले व त्याच्या शिखरावर सुवर्णामलक बसविला. धार्मिक कृत्यें करणाऱ्यांमध्यें तो अग्रणी होता. त्यानें कलशेश्वराचें एक दगडी देवालय बांधविलें व त्याच्यावर सुवर्णाच्या अगणित एकेरी व दुहेरी गोल घंटा लावविल्या. त्याच्यावर त्यानें एक सुवर्णाचें तोरण–छत्र–करविण्याचें ठरविलें. त्या सुमारास तेथें एक तुर्की कारागीर आला होता. त्याने त्याच्यासाठीं हजारों सुवर्ण दीनार मिळाले तर, ते

बनवून देण्याचें कबूल केलें. तेव्हां त्याचा राजाकडून बरेच दिवस चांगलाच थाटा बंदोबस्त राहिला. ( ७३० ) त्यानें आपल्याला माहित असलेले ताब्यावर सोन्या मुलामा करण्याचें कसब गुप्त ठेवले होतें. पण राजाचा कल्पक व हुषार मंत्री नोनक यानें स्वतःच्या बुद्धीने, त्याची अटकळ बसविली व त्या कारागीराला लज्जित केले. त तो परत गेला. नोनकाने ते काम थोडयाशाच सोन्याने तयार करून दाखविले.

पुढे त्या अतिमहेंद्र वैभवशाली राजानें अनंतेश नावाचे बाणलिंग व इतर पुष्कळशा मूर्ती, यांची स्थापना करविली

राजपुरी येथील राजा सहनपाल मरण पावल्यावर त्याचा अल्पवयी पुत्र संग्रा पाल याला राज्याभिषेक करण्यांत आला. त्याचा प्रबल व महत्त्वाकांक्षी चुलता मदनपा यानें त्याचे राज्य हरण करण्याचा उद्योग चालविला. तेव्हां त्या बालराजाची बहीण आणि जस्सराज ठक्कर, यानी मिळून कलश राजाची मदत मागितली. कलशाने त्यां मोठ्या खुषीने स्वागत केले व जयानंदाला, बिज्जादिक शूर वीर सहाय्याला देऊन, त्याच्य मदतीला पाठविले त्याने शत्रूला धुडकावून लावले. संग्रामपालाच्या अमात्याच्या मना जयानंदाविषयी शंका आली. कारण तो प्रबल होऊन सर्व संस्थान दाबून बसल त्याने परत जावें म्हणून त्यांनी त्याला हरतऱ्हेने सांगून पाहिले, त्रास दिल व भीतीहि घातली. पण तो उमगला नाही या कामी त्याना बिज्जानेच चिथा विले आहे. असे समजून जयानंद त्याच्यावर नाराज झाला. राजपुरीवाल्यां त्याला पैका देऊन पुन विनंति केली, तेव्हा त्याने शहाणपणाने, मागें बंदोबस्तासा म्हणून, आपली फौज ठेवली व तो स्वतः परत गेला. ( ७४० ) कलश राज हुषार व राजकारणपटु होता. त्याला जयानंदाने याप्रमाणे राजपुरी कबजात राहण्याच बंदोबस्त केलेला पाहून आनंद झाला तेथे बिज्जादिक राजकीय थाटाने वागूं लागले होते

यानंतर जयानंद दुर्दैवाने प्राणांतिक अजारी पडलेला असताना, राजा त्याच्य समाचाराला गेला. त्यावेळी बिज्जादि मंडळी बरोबर होती. बोलता बोलता जयानंदा सहज राजाला 'मला एकांतांत काहीं विनंति करावयाची आहे, असे म्हटले. तेव्हा बिज्ज शिवाय सर्व मंडळी बाहेर गेली तरी जयानंद काही बोलेना. तसा विडा थुंकण्याच्य बहाण्याने बिज्ज बाहेर जाऊं लागला. त्याला राजा व जयानंद यानीं 'का कशाला जाता असे वरकरणी म्हटले तरी तो बाहेर जाऊन बराच वेळ राहिला. त्यावर जयानंदाने राजाल राजपुरीची हकीकत कळविली आणि, 'बिज्ज असा प्रबल झाला आहे. तेव्हां हें राज आपलें कसलें ?' असे म्हटलें शिवाय बिज्जाने सरकारी कामात खूप कमाई केल्याबद्दलच लांबलचक पाढा वाचला.

पुढे राजा नाराजसा होऊन वाडयांत परत आला. तेव्हा त्याचे मन आपल्या विषयीं कलुषित झालेलें ताडून, बिज्जाने परदेशीं जाण्याला परवानगी मागितली. त राजानें, वरवर निषेध करीत दिली. तो गेल्याचा राजाला संतोषच वाटत होता

बिज्जाने घरीं येऊन सर्व सामानसुमानाबरोबर आपल्या भावांना देऊन पुढे रवाना केले व तो राजाचा निरोप घेण्यासाठीं गेला. (५५०) त्यावेळीं त्याला राजाने 'नको' म्हटलें नाहीं. याचा बिज्जाला राग आला. तरी त्याची राजावर फार भक्ति होती. म्हणून त्याने त्याला कांहीं म्हटलें नाहीं. तो निरोप घेऊन निघाला तसा राजा त्याला पोंचविण्यासाठीं उठला व त्या उभयताचे थोडा वेळ हळूं हळूं बोलणे झाले. नंतर बिज्ज हंसत मुखानें रवाना झाला पूर्वी हलधराने आसन्न मरणस्थितीत, जिंदु राजाचे उच्चाटण केले होतें त्याचीच जयानंदानेहि बिज्जाच्या संबंधांत जणो पुनरावृत्ति केली.

बिज्ज निघाला तेव्हां मंत्र्यानीं राजाला म्हटलें, 'हा बिज्ज पहा आपली सर्व संपत्ति व चीजवस्त घेऊन जातो आहे. या प्रदेशांत त्याने आपले काहीं बाकी ठेवले नाहीं. त्याचे सर्वस्व हरण करून घ्यावें ' पण राजानें ही गोष्ट ऐकली नाहीं. राजा त्याला जाऊं देणार नाहीं. ठेवून घेईल, अशा समजुतीनें राजाशिवाय बहुतेक सारे लोक त्याला पोंचविण्याला गेले होते. तो प्रबल मंत्री निघून गेल्यावर, तो परत येऊन आपणावर हल्ला करील की काय, या भीतीने राजाला पांच दिवस, एकादी काडी हलली की, थरकांप सुटत असे. त्याला रात्रीं झोंप येत नसे. बिज्ज शूरपुरापुढे जाऊन, त्याला पोंचविण्यास गेलेले लोक परत आले. तेव्हा राजाचा जीव खालीं पडला व त्याने आपली भीति मंत्री मंडळीला कळविली. त्यावरून त्यांना बिज्जाचे सर्वस्व हरण करण्याची सल्ला राजानें ऐकली नाहीं, हा शहाणपणा केला, असें दिसून आलें निर्द्रोही बिज्ज आपल्या मंडळीसह जाई तेथें, रत्नासारखा पूज्यच होत असे. ( ५६० ) पुढे बिज्ज अधिकाधिक योग्यतेला चढला तरी, त्याची कलशावरील देवाप्रमाणे असलेली भक्ति यत्किंचितहि कमी झाली नाहीं. तो त्याच्या पदीं नेहमीं लीन रहात असे.

बिज्जादिकांना घालवून दिल्यावर थोडेच दिवस अधिकार उपभोगून, सूर्यमतीच्या शापाच्या प्रभावाने जयानंद मंत्री मरण पावला तसेंच अनंत राजाशीं द्रोह करणाऱ्या जिंदुराजाचीहि तीच वाट लागली. बिज्जादिक गौड मंडळांत गेले. तिकडे ते चांगले वैभवाला चढले. तेहि तिकडे त्या शापाच्या प्रभावानें थोड्याच दिवसात नाश पावले. एक अकस्मात् झगडा उपस्थित झाला. त्याच्यात बिज्ज मारला गेला. त्याचे बंधूचे कैदेंत पडून त्याचे पुष्कळ दिवस हाल झाले. ते सुटल्यावर पाजक हा वाघाच्या मुखीं पडला व बाकीचे हाल अपेष्टा होऊन मेले. त्या पितापुत्रांमध्ये वैर पाडणाऱ्यापैकीं मदन वगैरे दोघे तिघे तेव्हांच मेले नाहीत. तरी त्याचीहि कांहीं दिवसांनी फार दुर्दशा झाली.

जयानंदाचा हस्तक वामन मंत्री त्याच्या मुलाचा पालक होता. त्याला राजानें सर्वाधिकारी नेमलें. तो मोठा चतुर व राजकार्य धुरंधर होता. त्याच्या विलक्षण चातुर्याचें व उत्कृष्ट कामागिरीचें विद्वान व वृद्ध लोक अद्यापि गौरवाने वर्णन करतात.

पुढे त्या राजाला भारी लोभ सुटला व त्यानें अवंतिस्वामी वगैरे देवस्थानांकडे लावून दिलेले गाव काढून घेतले आणि कलश गंज नांवाची वसूलाची कचेरी नवी कायम

केली. ( ५७० ) त्याचा मंत्री नोनक हा पैसा काढण्यात मोठा निपुण होता. पण तो क्रूर स्वभावाचा असल्यानें प्रजेला फार त्रास होईल, हे लक्षात घेऊन व प्रजेच्या हिताकडे दृष्टि देऊन, राजानें त्याच्याकडे पादाग्राचा अधिकार दिला नाहीं. राजकलश मंत्र्याचा पुत्र प्रशस्तकलश, वगैरे मंडळीनें राजाची मर्जी चांगली संपादन केली होती. त्यांच्यापैकीं स्वच्छंदी, लबाड, आणि चोऱ्यामाऱ्या करविणारे होते, त्याना राजाने कांहीं अधिकाराची कामें दिलीं नाहीत.

मदनपालाने राजपुरीवाल्यावर पुनः चढाई केली. तेव्हा राजाने त्याच्या सहाय्या-साठीं सेनापति बप्पट याला पाठविले. त्या लहानशा अंमलदारानें सुद्धा, राजाच्या प्रता-पानें मदनपालाचा पराभव केला व त्याला पकडून काश्मीरात पाठविलें.

वराहदेवाचा बंधु, शूर असा कंदर्पदेव, याला राजाने द्वारपति नेमलें. त्यानें स्वारी करून डामरांचा फडशा पाडला. राजनीति व पराक्रम याच्यामध्ये तो जिंदुराजाचा शिष्य होता. त्याने आसपासच्या सामंताना आपली आज्ञा शिरसा-मान्य करावयाला लावलें. त्याने राजपुरी वगैरे ठिकाणींहि जय मिळविलेला होता. त्याचा स्वभाव फारच तापट होता. तो जेव्हां तेव्हा द्वारपतींचे काम सोडून परत येई. पण राजा त्याची वरचेवर समजूत करून त्याला आग्रहाने परत पाठवीत असे. मदनपालाला राजानें कंपनेश केल्यावर त्याने उद्दाम झालेले बोप वगैरे अनेक डामर मारून टाकले.

राजाचा श्येनपाल—ससाणे पाळणारा—विजयपाल याची सेवा लक्षात घेऊन राजानें त्याला नगराधिकारी-कोतवाल—नेमले. त्याने चोरांचा नायनाट केला. (५८०) तसेंच राजानें कंदर्प व उदयसिंह, वगैरेना लोहर येथे पाठवून, त्यांच्या हातीं भुवन राजाला दूर पिटा-ळून लावलें

नीलपूरचा राजा कीर्तिराज याची कन्या भुवनमति, इच्याशीं विवाह करून राजाने त्या आपल्या एका पुराण्या शत्रूचा कांटा काढून टाकला.

गुंगाचा पुत्र मल्ल याला काम शिकविण्याकरितां राजानें त्याला विजयसिंहाकडील नगराधिकाऱ्याचें काम सांगितलें. ( गुंग हा तन्वंगाचा बंधु व लोहरच्या कांतिराजाचा नातु. त्याचा पुत्र मल्ल. त्याचे पुत्र उच्चल व सुस्सल. हे पुढे काश्मीरचे राजे झाले. ) पुढें त्याने त्याला द्वारपतीचें काम दिलें. त्याने जाऊन तिकडील सामंतांच्या मौलिमण्यांमध्यें आपला प्रताप प्रतिबिंबित केला. उत्तरगोग्रहण प्रसंगीं पार्थानें एकट्याने प्रगट केलेला पराक्रम व प्रताप, यांचें वर्णन प्रसिद्धच आहे. त्याच्याच तोडीचे शौर्य व प्रताप त्या मान-धन मल्लानें, उरशा नगरीत घुसतांना दाखविले. या प्रकारचे हे दोनच प्रसंग खरे प्रशंसनीय होत. मल्लानें केवळ पांच सहा स्वारांसह, कृष्णा नदी उतरून अभय राजाचें राज्य व त्याचे घोड्याचे कळप, एकदमच पादाव केले. (कृष्णा=हल्लीची किशन गंगानदी. उरशा किंवा हल्लीचा हजारा प्रांत, याच्यांत जाण्याला ही नदी मुजफराबादेजवळ उतरावी लागते.

याप्रमाणें त्या नीतिज्ञ व शूर राजाने त्या भूभागावर आपला अंमल बसविला होता.

लौकिक वर्ष ४१६३ (ई. स. १०८७-८८) या वर्षी त्याच्या राजधानींत एकाच वेळीं पुढील आठ राजे जमले होते. १ बद्धापूरचा राजा कीर्तिराज. २ चंपाचा राजा आसत. ३ वल्लापूर येथील राजा तुक्काचा पुत्र कलश. ४ राजपुरीचा राजा संग्रामपाल. ५ लोहरचा राजा उत्कर्ष. ६ उरशा येथलि राजा संगत. ७ कांदचा संस्थानिक गांभीरसिंह आणि ८ काष्टवाटचा राजा श्रीमान उत्तमराज. (५८०) सागराला मिळणाऱ्या नद्यांचा वर्षाकालांतील महापूर त्याच्यात लक्षांत येत नाही. तद्वत, त्या प्रचंड वस्ती असलेल्या श्रीनगर राजधानींत ते राजे व त्यांच्याबरोबरचे लोक, गडप होऊन गेले. ( १ बद्धापुर, बब्बापुर किंवा बंधापुर याचा नीट पत्ता लागत नाही. कीर्ति—हा मागे आलेला कलशाचा नवीन सासरा कीर्तिराजच असेलसे वाटते. चंपा, वल्लापूर, राजपुरी व लोहर, येथील राजांचा उल्लेख नुकतांच मागे येऊन गेला आहे. उरशाच्या राजाचे नाव मुंगज, मुंगत किंवा संगत, असे दिलेलें आहे. कांद प्रांताविषयीं पक्की माहिती मिळत नाही. पण तो प्रांत भद्रावकाशांतून काश्मीरास जाण्याच्या मार्गावर असल्याचे वर्णन आलेले आहे. तो पहाडी प्रदेश काश्मीरच्या आग्नेयीस असावा. काष्टवाट=हल्लींचा काष्टवार प्रांत, चिनाब नदीच्या खोऱ्याच्या वरच्या भागात आहे. हल्ली सुद्धां तेथें अर्ध्याहून अधिक वस्ती काश्मीरी आहे. तेथलि रजपूत राजे, औरंगजेबाच्या कारकिर्दीपर्यंत हिंदू राहिले होते. ते महाराज गुलाबसिंग यांच्या वेळेपर्यंत बहुतेक स्वतंत्र होते. )

त्यावेळीं वितस्तेचे पाणी कडक थंडी पडून दगडासारखे गोठले होतें तरी तेथें त्या राजाना पुष्कळच सुख भोगावयास सापडले. त्या राजांनी मनांत आणलेल्या वस्तू, वामन मंत्री त्याना तात्काल पुरवीत असे. या कामीं त्याने जे विलक्षण व प्रशंसनीय चातुर्य दाखविले त्याचे वर्णन करावे तितके थोडेच आहे. याप्रसंगी त्यानें नित्य क्रमांतल्या सारखी व्यवस्था ठेवली होती.

ते राजे परत गेल्यावर, मल्लानें द्वारपतीचे काम करण्याविषयी निरुत्साह दाखविला. तेव्हां राजानें ते काम पुनः कंदर्पाला दिलें. त्याने मोठ्या हिम्मतीने, ऐटीनें व स्वतःच्या खर्चानें अजिंक्य मानलेल्या 'स्वापिक' नावाच्या दुर्गावर चढाई केली आणि युक्तीनें त्याचा पाडाव केला. तिकडून परत आल्यावर कांही कारणावरून त्याचें मन विटलें व राजाचा आग्रह असतांनाहि त्यानें ते काम सोडलें. या कामी प्रशस्तकलश हा मध्यस्थ होता. त्याला तो कांहीं टाकून व टोंचून बोलला. म्हणून प्रशस्तकलशानें रागावून स्वतःच्या खर्चानें पुष्कळशी फौज भरती केली आणि राजाकडून तिचें सैनापत्य आपल्या भावाला देवविलें. तो चांगला संपन्न होता. यामुळे त्याला आपल्या संपत्तीच्या जोरावर, हा मोठेपणा मिळवितां आला होता. त्याच्या भावाच्या अंगीं कंदर्पाची कांहींच योग्यता नव्हती. चित्रातल्या सिंहाकडून खऱ्या सिंहाचा पराक्रम थोडाच होणार! ( ६०० )

पुढें राजानें मोठ्या मिन्नतवारीनें त्या भूलरत्नाकडून पुनः नगरांत राजस्थान या

पदाचा स्वीकार करविला. ( हें पद बहुतेक मुख्य न्यायाधीशाचें असावें. ) पण कांहीं दिवसांनीं राजाच्या आज्ञेनें एका चोराला अतिशय मार बसला व त्यामुळें तो मेला. मल्लाचें मन फार मृदु होतें. याचें त्याला फार वाईट वाटलें व तो तें काम सोडून गंगेला जाण्याला निघाला. तेव्हां राजानें त्याला पदर धरून ' नको ' म्हटलें. पण राजाचा हात झिटकारून, तो रागारागानें निघून गेला. याचा राजालाहि संताप आला. पुढें त्याला पकडून राजाकडे आणलें गेलें. राजाच्या मनांत पूर्वी झालेली मानखंडना डंवचत होती. तरी त्याचा विचार फक्त मल्लाची नक्षी उतरण्याचा होता. त्याला जीवें मारविण्याचा नव्हे. त्या राजाची बुद्धि स्थिर होती व तो विचारी असे. शूर वीर, मंत्री, काम पतकरीत किंवा सोडीत. त्यांची तो समाधान वृत्तीनें गयच करीत असे.

इतर देशांतल्याप्रमाणें या काश्मीर मंडळात उपागगीताचा व चांगल्या चागल्या निवडक नर्तकी नोकर ठेवण्याचा प्रघात कलश राजानें चालू केला.

पुढें त्यानें जयवनाजवळ आपल्या नावानें एक नवीन नगर स्थापन केलें. थोडयाच दिवसात तेथे शेकडों अग्रहार, प्रासाद, लहान मोठीं घरें, तलाव, बाग, बाजार, वगैरे तयार झाले. ( जयवन हे श्रीनगराच्या आग्नेयीस तीन कोसावर झेवन नांवाचें खेडें आहे. तेंच असावें. )

राजपुत्र हर्ष आपले अनेक गुण व अप्रतिम पौरुष याच्या द्वारे फारच प्रसिद्धि पावला होता. त्याला सर्व देशी भाषा येत होत्या. त्याच्यामध्ये तो सुरेख काव्ये रची. तो सर्व विद्या व कला, यांचा जणों निधी होता. त्याची परदेशांतहि पुष्कळच ख्याति होती. ( ६१० ) त्याच्या लोभी पित्याकडून आश्रय न मिळालेल्या परदेशी विद्वान, गुणी, व शूर लोकाना तो आपल्या पदरीं ठेवून घेऊन, त्यांना नेमणुकी करून देत असे यामुळे त्याचा खर्च वाढलेला होता. पित्याकडून मिळणारी ठरीव नेमणूक त्याच्या उदारपणामुळे त्याला पुरत नसे व मधून मधून एकेक दिवसाआड भोजन करावे लागे !

तो चागला गवयासारखे गाऊन राजाला प्रसन्न करी त्याच्याकडून मिळालेल्या इनामांतून तो पदरची माणसें पोशीत असे. एकदा तो, राजा व त्याच्याबरोबरची मंडळी, यांच्यापुढे गात असतांना सर्व मंडळी प्रसन्न झाली होती. तितक्यात काहीं जरूरीच्या कारणा-मुळे राजाला मधूनच विरस करून उठून जावें लागले. यामुळे हर्षाला लाज वाटली आणि त्यानें खिन्न होऊन खालीं मान घातली. क्षमाहीन प्रभू, अविश्वासू स्नेही, कटु व कठोर भाषणी स्त्री, गर्विष्ट व उन्मत्त पुत्र, उलट उत्तरें देणारे सेवक, हे सर्व मुकाट्यानें सोसतां येईल, पण श्रोत्यांची अवज्ञा व परिभवद्योतक दृष्टी, सोसवणें कठिण !

पुढे राजाचा आश्रित विश्शावट विट यानें जणों सहज थट्टेनेसे हर्षाला म्हटले, ' राजाला ठार मारून राज्याधिकार कां हाती घेत नाही ? ' याचा राज-पुत्राला राग आला व त्यानें त्याचा धिक्कार केला. त्यावेळी भम्मटहि तेथेंच होता. त्यानें ' हे म्हणतात तेहि कांहीं गैर नाहीं, ' असें म्हटलें.

पुढील भोगेच्छा तृप्तीचे साधन कायम राहावे म्हणून, वेश्या आपल्या यारांच्या स्नेह्यांशींहि मेळ ठेवीत असतात. त्याप्रमाणें राजाचें अनुयायी राजपुत्राजवळ, आपला पुढेहि जम कायम राखण्यासाठीं व पुढील फायद्यावर लक्ष देऊन याप्रमाणे भक्ति दाखवीत गुप्तपणें वागत असतात.

दुसरे दिवशीं राजा पुनः त्या मंडळांत आला. तेव्हां त्याने त्या मानी हर्षाला इनामें दिली व त्याचा गौरव केला. ( ६२० ) राजाकडे भोजन करून परत येतांना विश्शावटाने पुनः एकांतांत, या गोष्टीची पुरवणी केली. हर्षाने त्याला झिडकारलें तरी त्याचा लोंचटपणा कमी होत नाहीं असें पाहून हर्षानें त्याला एक जोरानें थप्पड मारली. तिनें विश्शाविटाच्या नाकांतून रक्त गळूं लागलें. हर्ष मनाचा थोर व उदार होता. रक्त आलेलें पाहून त्याचें मन कळवळलें व त्यानें सेवकाकडून रक्त धुववून वस्त्रांतर करविलें आणि हंसत म्हटलें, 'असल्या पापाविषयीं नुसता उच्चार केला तरी असें फल मिळतें.' यावरून हर्षाची खरोखर तशी इच्छा नसताहि त्या विटाला, आपलें म्हणणें त्याच्या मनांत रुजलें आहे, असें वाटलें व त्यानें याविषयीं सारखी चर्चा चालविली. दुश्शील पुरुष, परस्त्रीच्या सहज स्मितावरून सुद्धां, तिचें मन आपल्यावर आहे असें मानूं लागतो. शेंवटीं हर्षाच्या मनांत पितृद्रोहाचें पापी रोंपडें रुजलें व त्यानें दुसऱ्या कांहीं नीच लोकांशीं गुप्तपणें मसलत करून, पित्यावर हल्ला करण्यासाठीं जागजागीं गुप्त तीक्ष्ण लोक-मारेकरी-ठेवले.

पुढें तो राजा अनेकवार त्या मारेकऱ्यांच्या तावडींत सांपडला असूनहि हर्षाच्या मनाला स्नेहलव स्पर्श होऊन, त्यानें त्याला मारूं दिलें नाहीं आणि त्याचा नादहि पण सोडला नाहीं. मारेकरी लोक हर्षाच्या विश्वासास पात्र बनलेले पाहून, ते हा बेत उघडकीस आणतील, या भीतीनें विश्शाविटानें स्वतःच, एके दिवशीं राजाला, त्याच्याबद्दल खबर दिली. हे कळतांच राजपुत्र भ्याला आणि राजाकडून बोलावणें आलें असूनहि त्या दिवशीं तो नित्याप्रमाणें राजाकडे भोजनाला गेला नाहीं. ( ६३० ) त्यावरून त्या गुप्त कटाविषयीं खात्री झाली. त्याला भारी वाईट वाटलें व तो आणि त्याच्या बरोबरची मंडळीहि त्या दिवशीं जेवली नाहीं.

दुसरे दिवशीं थक्कन व त्याचा भाऊ हे राजाकडे गेले असतांना, त्यांना त्यानें आपली ती दुर्दैवाची हकीकत कळविली आणि त्याच्या मांडीवर मस्तक ठेवून, तो पुष्कळ वेळ रडला. त्यानें त्यांना धम्मटाविषयींची हकीकत कळविली. त्याला कैद करून आणा, असें त्याला थक्कनाला उघडपणें सांगवेना. त्यावर त्या तन्वंग पुत्रांनीं म्हटलें कीं, 'धम्मटाच्या वर्तनाची आम्हांला मुळींच माहिती नाहीं. आम्ही दोघेहि आपल्या कृपेनें आजवर आपल्याचें परित्राण करण्याविषयीं तत्पर आणि आपल्या रक्षणासाठीं रात्रंदिवस जपत आलों आहों. आमचा बंधु दोषी निर्दोषी कसाहि असो. आमच्या प्राणावर बेतलें तरी त्याला आम्ही कसें सोडावें? त्याला पाठीस घालण्यांत स्वामिद्रोह पदरीं येणार. तेव्हां आतां आम्हांला देशत्यागाशिवाय उपाय उरला नाहीं. ' त्यांनी

राजाच्या पायावर डोकी ठेवून रजा मागितली. ती त्यानें कशी तरी दिली. धम्मटाला वाटेंतच कोणी न मारोत, म्हणून त्यांनीं त्याला मध्यें घेतलें आणि ते आपलें सामान सुमान, सैन्य व वाहनें वगैरे घेऊन परदेशीं निघून गेले.

ते गेल्यावर राजानें हर्षाला एकांतांत शांतपणें म्हटलें, ( ६४० ) ' या संसाराच्या प्रारंभापासून पृथ्वीवर प्रथितयश पित्यापासून पुत्राची प्रजेमध्ये प्रख्याति होत आली आहे. पित्यावरूनच लोकांत पुत्राची योग्यता प्रसिद्ध होत असते. पण आमची स्थिति याच्या उलट आहे. चंद्रावरूनच त्याचा पिता अत्रिऋषि याची प्रसिद्धि आहे, त्याप्रमाणें तूं माझा पुत्र, तुझ्या गुणांवरून मज पित्याची देश देशांतरांत माहिती झालेली आहे. असा तूं गुणिजनाग्रणी, प्रथितयश, असतांना हें निंद्य, अनार्य व साधुजनविगर्हित वर्तन कां घडावें ? तुझ्या आजाची व मीहि मिळविलेली संपत्ति, मी आजवर तुला सोंपली नाहीं याचें कारण कळल्याशिवाय तूं मजवर रागावणें योग्य नाहीं. ही संपत्ति अशी जपून ठेवण्याचें कारण, साधन संपत्तिहीन राजाला आप्त, प्रजा आणि शत्रू, यांच्या मर्जीप्रमाणें वागावें लागतें. या नव्या नगराची रचना संपवून, मी तुजवर राज्यधुरा ठेवून वाराणशीस किंवा नंदिक्षेत्र तेथें जाऊन तपाचरण करणार. हे सिंहासन व सारा खजीना, लौकरच तुझा होणार असतांना व्यर्थ घाई करून आपलें सारें सामर्थ्य अशा निंद्य व नीच प्रयत्नांत कां खर्चतो आहेस ? लबाड लोकांनी तुजविषयीं मला जें भलभलतें सांगितलें आहे, तें माझ्या मतें, तुझ्याठायीं संभवत नाहीं. तेव्हां हा खरा प्रकार स्वतःच सांगून या अपवादाचें निरसन कर.'

राजानें, हें भाषण बुद्ध्या, हर्ष ते साफ खोटें आहे असें सांगून, स्वतःची सफाई करील, अशा आशेनें पुत्रस्नेहानें हेतुगर्भ केलें होतें. तो हर्षाला क्षमा करण्याला उत्सुक होता. त्याच्याविषयींचा प्रवाद निवळ गप्पा आहेत, असा खुद्द त्याच्या उत्तरावरून लोकांना प्रत्यय यावा, हाच त्याचा हेतु होता. ( ६५० ) हर्षानें ते भाषण निमूटपणें ऐकलें व तें योग्य असल्याचें कबूल केलें आणि 'आप्तांमार्फत खरी हकीकत कळवितो', असें म्हणून तो बाहेर पडला. नंतर राजानें पाठविलेल्या विश्वासु गृहस्थाला त्यानें खेदानें व त्रासानें, 'ही गोष्ट मीं दुसऱ्याच्या प्रेरणेनें करण्याचें ठरविलें होतें खरें,' असें सांगितलें आणि तो आपल्या वाड्यांत परत गेला. तो गृहस्थ म्लान वदन करून परत आलेला पाहून, राजानें कपाळ बडवून शोक करीत, 'हायरे निर्भाग्या पुत्रा', असें म्हणून 'हर्षाला पकडावें, पण तो मारला जाईल तर आपण प्राण देऊं, अशी आज्ञा दिली व बजावलें. तेव्हां राजाचे सैनिक हर्षाच्या वाड्याला वेढा देऊन बसले. आंत जमलेले तीक्ष्ण किंवा मारेकरी इतर लोक. आपण खास धरले मारले जाणार हे पक्कें समजून उद्दाम-बेफाम-झाले. त्यांनी वाड्याचा दरवाजा बंद केला व ते सारे हर्षाला घेरून बसले. त्यांनीं त्याचा अवमान करीत व त्याला धमकी देत रागा रागानें म्हटलें, 'तुम्ही महा नीच, दुष्ट व वेडे. केवळ अविचारानें राजद्रोह करण्याला प्रवृत्त झाला. आमचा असा घात करवून तुम्ही जिवंत सुटाल, असें तुम्हांला वाटतें कां ? आम्हांला मना करीत व आड येत राहून, तुम्ही राजाचा प्राण वांचविला. तेव्हां ते तुमचें

रक्षण करतील. आम्ही मात्र खास मारले जाणार. तुम्ही आमच्यांतच राहून लढलांत तर ठीक आहे. नाही तर आम्ही प्रथम तुम्हांला ठार मारतों. आतां तुम्हांला दुसरा मार्ग नाही.'

ही हकीकत राजाला कळली. तेव्हां तो व्याकुळ झाला. त्यावेळीं त्याच्याजवळ दंडक नावाचा वृद्ध महत्तर -प्रतिहार–उभा होता. तो हर्षाकडे गेला. तो राजपुत्राच्या घरोब्यांतला असल्याने, त्या तीक्ष्णांनी त्याला हर्षाकडे जाऊं दिलें. तो मोठा चतुर होता. त्यानें पोचतांच सर्वांना मोह घालीत, हर्षाला म्हटले, (६६०) 'हे मुक्षत्रिय राजपुत्रा, पंच महाकारण देवतांना देखील कल्पाचे कल्प कायम राहून, शेवटीं नियतिवशतेमुळे नष्ट व्हावे लागतें. ( शैव आगमाप्रमाणे या देवता ब्रह्मा, विष्णु, महेश किंवा रुद्र, ईश्वर व सदाशिव, अशा आहेत. ) तेव्हा आपणांला हे असें खात्रीचे व श्लाघ्य मरण प्राप्त होत आहे. अशा वेळीं, ज्याच्या रक्षणासाठीं शस्त्रग्रहण केलें जातें, त्या स्वाभिमानाचे तरी संरक्षण करा. आपण तरुण, विद्वान्, विश्रुत व यशस्वी क्षत्रिय आहात. युद्ध लाथणीवर टाकण्यांत फायदा कोणचा ? हे अप्रतिम शूर व जिवावर उदार झालेले तीक्ष्ण सहाय्यकारी आणि हा मी पुढारी उभा आहे. हे प्रौढ प्रतापी वीरा, आपणाला आता विजय किंवा मरण दोन्ही सारखींच शोभतील. उठा, नखे व केशस्मश्रू काढवून, वीरपट्ट बांधा. तोच अप्सरांशी स्वयंवर करण्याला विजयमाला होऊं दे.'

नंतर नापिताला बोलावून त्याच्यासह हर्षाला त्याने आत पाठविले. हर्षानें आपली तरवार बाहेरच सोडली होती. मंडळीने त्या वृद्ध प्रतिहाराची फार प्रशंसा केली. तो आपला जंबिया बाहेर टाकून, हर्षाच्या पाठोपाठ झपाट्याने आंत घुसला व त्याने तत्काल दार घट्ट बंद केले. नंतर त्यानें खिडकीतून जवळच बाहेर असलेल्या राजस्थानीयाला म्हटले की, 'राजपुत्र सुरक्षित आहे. आता योग्य दिसेल तें करा.'

या पृथ्वीतलावर राजे लोकादिकांना होऊं घातलेल्या भयाचा प्रतिकार, अनुभविक, वृद्ध व बुद्धिमान मंत्री वगैरे लोक, मंत्र तंत्र, कवचे, औषधि व सैन्य, यांच्या द्वारें उलट भय पैदा करून करवीत असतात, हे सुप्रसिद्ध आहे.

पुढे राजाचे शिपायी आरडाओरडा करीत हर्षाच्या वाड्याच्या कोटावर–व महाद्वारावर हल्ला करूं लागले. त्याना वाड्यांत शिरावयाचे होतें. ( ६७० ) राजपुत्र आत गेलेला होता. त्याला तसेच सोडून तेथील सैनिक व कटवाले मार देत, खात, लढत, बाहेर पडूं लागले. तसे ते मारले जात होते. त्यांच्यात दोघे तिघे गृहस्थ सहज तेथे आलेले होते. त्यांचा त्या कटाशी कांहीं संबंध नव्हता. ते कसे तरी पार निघून गेले. बाहेर पडलेले लोक आड आलेल्यांना मारीत जवळच सूर्यमती राणीच्या गौरीशाच्या मंदिरावरून सदाशिवाच्या मंदिराला पोंचले. राजाला आपल्या आप्तांविषयी आदर वाटत होता. त्यांचे रक्षण करण्याविषयीं त्यानें आज्ञा दिलेली होती. तरी त्यांच्यापैकीं सहज हा प्रथमच मारला गेला. शूर म्हणून प्रसिद्ध असलेला तिठ्य नांवाचा विद्वान ब्राह्मण व केशी

नांवाचा कर्नाटकी, हे प्रतिपक्षाकडून मारले गेले. कांही मूर्खांनी शस्त्र टाकली व कित्येकांनीं आत्महत्या केली. पकडले गेलेल्या भित्र्यांना, वध कैद वगैरे यथायोग्य शिक्षा भोगावी लागली. लौकिक वर्ष ४१६४ (इ. स. १०८८) च्या पौष शुद्ध प्रतिपदेला लबाड लोकांनी पितापुत्रांमध्यें वैर पैदा केल्यामुळे हा प्रकार घडून आला होता

राजपुत्रांची मने पित्याशीं बिघडतात ती, उधळेपणाविषयी दुराग्रह व आवड, प्रिय व तरुण पत्नींची टोचणी, दुष्ट व लबाड मंडळींची सोबत, पित्याच्या पूर्वप्रेमांत अंतर, अमात्य, बंधू, सापत्न माता, यांच्याशी कलह, वगैरे कारणामुळेच,

दुष्ट व लबाड लोकांच्या संगतीमुळेच सुखोपभोगाला योग्य अशा या हर्ष राजपुत्राच्या हातून अविचार घडला व त्याला कैदेत पडून भारी दुःख सोसावे लागले त्याच्या संबंधांत राजाशीं ठराव झाला होता, त्याच्यांत मानवती राणी, भुवनमती, जामीन झाली होती राजानें हर्षाला कैदेत टाकलेले पाहून तिने कंठछेद करून प्राण दिला.(६८०) राजानें त्याच्यावर विश्वासु मंत्री पाहऱ्यावर ठेवले. पुत्रस्नेहामुळे तो त्याच्याकडे राजपुत्राला योग्य असे खान पानाचे पदार्थ पाठवीत असे. हर्षाकडे बालपणापासून असलेला सेवक प्रयाग हा साधासुधा व राजकीय खटपटींत पडणारा नाहीं, असे समजून, राजाने त्याला हर्षाकडे राहूं दिले. पुढें मंत्री नोनक याने, राजाला, स्वतःच किंवा परहस्ते हर्षाला ठार मारवावे, निदान त्याचे डोळे काढवावे, असे सुचविले होते.

तो राजा शीलभ्रष्ट, पशुतुल्य व निर्लज्ज वर्तन करूं लागला. त्याने आपल्या सुनापैकी कांहींना, जणो काय त्या पकडून आणलेल्या शत्रूच्या स्त्रियाच आहेत, असे मानून अंगाखालीं घातले. त्याच्यांतील तुक्क राजाची नात सुलभा इने सासऱ्याचे प्रेम संपादन केल्यावर नवऱ्याचा वध करण्याचा प्रयत्न केला. तिने नोनकाशी कट करून एका आचाऱ्याकडून हर्षाच्या अन्नांत विष घालविले. हे दुसऱ्या एका आचाऱ्याकडून प्रयागाला कळलें तेव्हां त्याने ते आलेले अन्न खाऊ न देतां, दोन कुत्र्यांना घालविले. ते खाताच ती कुत्री मेली. हे ऐकून हर्षानें आपल्या जीवाची आशा सोडली. या कामी राजाची फूस असावी असे वाटून, त्याने राजाकडील ताटे नुसती स्पर्श करून दूर करण्याचा व प्रयाग दुसरीकडून जे कांही आणून देईल त्यावरच राहण्याचा क्रम चालविला. ( ६९० ) आपलेकडील अन्न, हर्ष खात नाही, असें आचाऱ्याकडून कळल्यावरून राजाने प्रयागाला याबद्दल विचारतां, त्याने हर्षाला विष देण्याचा प्रयत्न झाल्याची हकीकत कळविली. पण त्यांत त्याने कोणाचे नाव घेतले नाहीं. राजाने पुढे आचारी बदलले. तरी हर्षानें प्रयाग आणून देईल तेच पदार्थ खाण्याचा परिपाठ ठेवला. सर्वच लोक उलटलेले पाहून तो. गेला तो दिवस आपला, असे मानी व त्यानें पुढच्याविषयीं काळजी करण्याचें सोडून दिलें.

याच सुमारास राजाच्या वर्तनांत अदृष्टपूर्व व अनर्थावह फरक पडला व त्याच्यावरून त्याचे मरण जवळ आलें, असें दिसूं लागलें. त्यानें ताम्रस्वामी नांवाची सूर्याची फार प्राचीन तांब्याची मूर्ति होती ती फोडविली व विहारांतील अनेक पितळेच्या बुद्धाच्या—

मूर्ती जबरदस्तीनें उचलून आणवून फोडून टाकविल्या. तसेंच दुर्वृत्त राजानें न्यायनीति पार झुगारून देऊन व क्रूरपणानें अनपत्य मरणाऱ्या लोकांची मालमत्ता हरण करण्याचा सपाटा लावला. पुढे लौकरच प्रजेचा तीव्र संताप व त्यावरून तिनें दिलेला शाप याचें फल आणि अतिरिक्त स्त्रीसंगमूलक धातुक्षय, यांच्यामुळे त्याला एकाएकीं भयंकर रोग जडला. तो एका शिवालयांत कुंभप्रतिष्ठेचा समारंभ करीत असताना, महाकालकुंभामध्यें त्याच्या नाकांतून रक्ताचा थेंब पडला. या अपशकुनरूपी आधिव्याधींचा प्रतिकार करण्यासाठीं केलेले सर्व प्रयत्न हरले व रोग बळावला. ( ७०० ) रुधिरस्राव वाढला व त्याची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होऊन त्यानें अंथरूण धरलें. अग्निमांद्य वगैरे व्याधींनी त्याची शक्ति गेली व त्याची कलाशेष चंद्रासारखी स्थिति झाली.

त्याचा हेतु हर्षाला राज्य देण्याचा होता. पण मंत्री विरुद्ध असल्यामुळे त्यानें लोहराहून दुसरा पुत्र उत्कर्ष याला आणविलें. आसन्नमरण स्थितींत त्यानें अंतःपुरांतील स्त्रियांशिवाय सर्वांना इनामें दिलीं. त्या स्त्रियांवर तो नाराज होता व त्यांच्याविषयीं त्याला मत्सर वाटत होता. हर्षाला त्याचा पैका परत देऊन, परदेशीं पाठविण्याचें योजून, त्यानें त्याला आणविण्याविषयीं म्हटलें. पण मंत्र्यांनीं हर्षावरील पाहारे बदलून त्याच्या जागीं लोहरच्या ठकुरांना नेमलें व त्याला उत्कर्षाच्या हवालीं केलें. त्यानें त्याला नाट्यमंडपांतून काढून चतुस्तंभ मंडपांत, त्याच्या मित्रापासून अलग ठेवलें. त्यावेळीं हर्ष फार कृश व अशक्त झालेला होता.

मरण खास जवळ आलें असें पाहून, राजा लौकरच निघून एका तीर्थाला गेला. ताम्रस्वामीची मूर्ती फोडविल्यामुळे, आपल्यावर सूर्यदेवतेचा क्षोभ झाला आहे, असें समजून तो श्रीमार्तंडाला शरण गेला व प्राण रक्षण व्हावें म्हणून प्रार्थना करूं लागला, तो शैव सांप्रदायी असूनहि, यावेळीं मोक्षदायक विजयक्षेत्र सोडून, श्रीमार्तंडाच्या मंदिराला गेला. (७१०) (श्रीमार्तंडाचें सुप्रसिद्ध मंदिर मतन येथें एका उदराच्या किंवा प्रशस्त पठारीच्या टोंकावर बांधलेलें होतें. तें फारच मोठें सुरेख व भव्य होतें, असें त्याच्या हल्लींच्या अवशेषांवरून दिसून येतें. त्याच्याखालीं सुमारें एक मैलावर मार्तंडतीर्थ, झरे व कुंडें आहेत.)

अधिकारमदामुळे सारें जग तृणप्राय मानणारा अंमलदार, दुःखाच्या प्रसंगीं दीनपणें घरच्या बटकीच्याहि पाया पडून रडूं लागतो. गुरूपदेश घेतल्यामुळे आपण मोठे ज्ञानी झालों आहों, असें मानणारा मूर्ख मनुष्य, मोठमोठ्यानें वटवट करीत, काय काय म्हणून बोलत व प्रतिपादीत नाहीं ? पण तोच प्राणांत प्रसंगीं पोराप्रमाणें कोणचें म्हणून वेडेवेडे चार करण्याचें बाकी ठेवतो ?

गुरूपदेश घेतलेला असल्यामुळे त्या राजाला मोठी आढ्यता वाटत होती. पण अशा या दीन दुबळ्यांना शोभणाऱ्या वर्तनामुळे तो गर्ह्य व हास्यास्पद झाला होता. तो मार्गशीर्ष शुद्ध तृतीयेला सायंकाळीं शय्येवरून उठून, मेण्यांत बसून, मरण्यासाठीं बाहेर पडला त्या वेळीं प्रजाजनांची रडारड, वाद्यांच्या गजरांत दबून गेली. मंत्री व राजस्त्रिया यांच्यासह

तो नावेंतून रवाना होऊन, दुसऱ्या दिवशीं तिसरे प्रहरीं मार्तंडाच्या पायांशीं पोंचला व प्राणरक्षणासाठीं त्याची सुवर्णाची मूर्ति अर्पण करण्याचा त्यानें नवस केला. (७१५).

त्याला पडल्या पडल्या फार पीडा होत होती. हर्षाला भेटण्याविषयीं त्याला फार तळमळ लागली होती. त्याला बोलावून घेण्याबद्दल त्यानें वरचेवर म्हटले, पण त्याच्याकडे त्याच्या सेवकांनीं मुळींच लक्ष दिले नाहीं. त्याची बेचैनी वाढत चालली. हर्षानें रचलेलें एक गीत बाहेर कांहीं लोक गात होते. ते तो मोठ्या आतुरतेने ऐकत होता. तें ऐकून त्यानें दुःखानें दीर्घ निश्वास सोडला.

स्वप्नांत त्वरित हालचालीची शक्ति कुंठित होते. तद्वत, मरत पडलेल्या राजाच्या आज्ञा कुंठित होतात. हे त्याच्या मनाला फारच जांचते व त्यामुळें जास्त त्रास होतो. हा प्रकार पाहून त्याला त्रास व संताप होतो आणि रोग बळावतो व मरणाच्या वेदना अधिकच तीव्र होतात. कलश राजा आपले आश्रित व वडील पुत्र हर्ष यांना कांहीं देणग्या देण्याविषयी उत्कर्षाला सागत असताना त्याची जीभ जड झाली. तो वरचेवर 'हर्ष', 'हर्ष', असें अस्पष्ट म्हणत असतांना नोनकानें आरसा–आदर्श–त्याच्या पुढे केला. ( ७२० ). राजा किंचित हंसत ओंठ चावीत व मान हालवीत कांहींसें पुटपुटत मागें सारला. अडीच दिवस त्याची वाचा बंद होती. शेवटीं प्राण जाताना त्याने मंत्र्यांना खुणावून, स्वतःला मार्तंडाच्या मूर्तीपुढें नेऊन ठेवविलें. त्याला एकुणपन्नासावे वर्ष होतें. तो लौकिक वर्ष ४१६५ (ई. स. १०८९) या वर्षाच्या मार्गशीर्ष शुद्ध षष्ठीला मरण पावला. मम्मानिकाप्रभृति सात विवाहित राण्या आणि जयमती नांवाची उपपत्नी या याच्या बरोबर सती गेल्या. पण त्याची विशेष प्रेमांतील उपपत्नी कय्या इने जणों साऱ्या स्त्रीजातीला बट्टा लावला. ती मोठी कुलीन नव्हती. तेव्हां तिला राजानें अंतःपुरांत दिलेल्या प्रमुखपणाचें विस्मरण पडलें, ते एक असो. पण ती विजयक्षेत्रांतच राहिली व पुढें एका गांवठी कामगाराशीं लागू झाली, याचें नवल व विशेष वाईट वाटते. भूपालोपभुक्त व राजभोग सेवनानें पवित्र व सुंदर झालेलें शरीर तिनें गांवकामगाराला अर्पण केलें! अशा हलकट स्त्रियांना धिक्कार असो.

सारे मंत्री उत्कर्षाच्या अभिषेकांत व्यग्र होते. तेव्हां कृतज्ञ मंत्री वामन यानेंच राजाचे और्ध्वदेहिक कर्म उरकलें. एकीकडे अभिषेकासंबंधीं मंगल वाद्ये वाजत होतीं आणि इकडे प्रेततुर्यादिक शोकप्रदर्शक वाद्ये व आर्तशोक चालू होता ! ( ७३० )

पुढें लौकरच कलश राजा व पद्मश्री राणी यांचा पुत्र विजयमल्ल याचा, त्याचा सावत्र भाऊ उत्कर्ष याच्याशीं बेबनाव झाला. तेव्हां उत्कर्षानें त्याला–कलशराजा हर्षाला नेमणूक देत होता–तितकीच नेमणूक देण्याचें कबूल केले व याला कांहीं सामंत व मंत्री जामीन करून दिले. तसेंच त्यानें कय्याचा पुत्र जयराज यालाहि कांहीं नेमणूक करून दिली.

चंचल स्त्रिया अश्रु गाळीत स्वतःच्या चरितार्थासाठीं अन्य मार्ग पहात असलेल्या व

पुत्र चितेजवळ सुद्धां आपल्याला मिळणाऱ्या मालमत्तेविषयीं वाटाघाट करीत असलेले, दुसऱ्याच्या मरणाच्या वेळीं शंभरदां पहात असूनहि, मूढ माणसें कुकर्मे करून बायकापोरांसाठीं संपत्ति सांठवीतच असतात, हें किती तरी आश्चर्य नव्हे काय ?

( उत्कर्ष काश्मीरचा राजा झाल्यावर लोहरचें राज्य निराळे न राहतां काश्मीरच्या राज्यांत सामिल झालें. ) त्यानंतर त्या नूतन नृपतीनें नगरांत प्रवेश केला पण नागरिकांच्या चित्तांत नव्हे. कारण ते हर्षाच्या उदयाविषयीं उत्सुक होते. यामुळें त्यांना तो राज्याभिषेकाचा दिवस निरुत्साहाचा वाटला. अजारी माणसाला उत्सवदिवस आनंदाचा थोडाच वाटतो.

पिता आतुर होऊन मरण्यासाठीं तीर्थाला निघून गेला त्या दिवशीं हर्षाला नव्या जागीं चौखंबी मंडपांत नेऊन कैदेत ठेवलें होतें. त्या दिवशीं तो उपाशीच राहिला. बरोबरचे सोबती निघून गेलेल्या प्रवाशासारखी त्याची स्थिति दुःखी कष्टी होऊन त्यानें मौन धरलें होतें. दुसरे दिवशीं पाहऱ्यावरील लोहरच्या ठकुरांनीं त्याला आग्रहानें विनंति करून कसें तरी खाऊं घातलें. ' एकाकडेच दोन राज्यें राहणें योग्य नाहीं. तेव्हां आम्ही तुम्हांला आमच्या देशीं नेऊन राज्य देऊं, ' असेंहि त्यानीं त्याला आश्वासन दिलें. अशा रीतीने त्यानीं त्याला सहानुभूति दाखविल्यानंतर, त्याला पित्याच्या मरणाची हकीकत कळली. सबब त्याने त्या दिवशीं उपासच केला. तेव्हांच त्याला उत्कर्ष राजा आल्याचें कळलें. ( ७४० ) तो जणों आपल्या अश्रुजलानेच पित्याला निवापांजलि देत असताना उत्कर्षानें त्याला स्नान करण्याविषयीं, दूताहातीं सांगून पाठविलें. ( मृताजवळ नसलेल्या नातलगांना मरणाची खबर कळतांच प्रेतवाहकांप्रमाणेच स्नान करावयाचे असतें. ) हर्षाला शकुनशास्त्राचे ज्ञान होतें. तो स्नान करीत असतांना, उत्कर्षाच्या राज्याभिषेकासंबंधीं मंगल वाद्यें वाजत जयशब्द होत होता. वीज चमकली कीं घन गर्जित होणार, असें अनुमान करतां येतें, त्याप्रमाणें त्या शुभशकुनावरून आपणाला नृपश्री प्राप्त होणार, अशी हर्षानें मनांत गांठ घातली. आसन्ननृपश्रीक राजपुत्राला सेवक पुढें पुढें करूं लागतात. तसे त्याला भावी उन्नतिद्योतक दुसरेहि अनेक शुभशकुन होऊं लागले. उत्कर्षाने त्याच्याकडे दूताहातीं भोजन करण्याविषयीं निरोप पाठविला. त्याला त्यानें उत्तर सांगून पाठविलें कीं, ' मला बंधमुक्त करून हद्दपार करा. मी तुमच्या विरुद्ध कधींहि वागणार नाहीं. अशी तीर्थ जलपानपूर्वक शपथ घेतों. नाहींतर मी उपास करून प्राण देईन. ' 'आपणाला हें कबूल आहे', असें उत्कर्ष राजानें वकीलाबरोबर खोटेंच सांगून पाठवून, त्याचें समाधान केलें व हर्षाकडून शपथ घेवविली आणि त्याला जेवायाला लावलें. पुढें हर्षानें आपल्या मुक्ततेबद्दल निरोप पाठविले. त्यावर राजानें आज उद्यां, अशी टाळाटाळीं चालविली. तेव्हां हर्षाला शंका आली.

नंतर त्यानें गुप्तपणें, प्रत्ययासाठीं आपलें एक ताटंक-तानवडें बरोबर देऊन प्रयागाच्या हातीं विजयमल्लाकडे असा निरोप पाठविला कीं, 'मी आपला दुर्दैवी वडील बंधु. माझें म्हणणें इतकेंच

की, आपण राजपुत्र-युवराज-व उत्कर्ष राजा असतांना, मी कैदेंत कुजावेंना ?' ( ७५० ) हें ऐकून विजयमल्लाला दुःख झाले. त्यानें बराच विचार करून, ' उत्कर्ष पक्का राजनीतिनिपुण. तो माझें म्हणणें कसलें मान्य करणार ! तरी मी हर तऱ्हेने यत्न करून पाहतों. आपण मात्र सावधपणें स्वतःच्या प्राणाला जपावें, असें उत्तर देऊन प्रयागाला परत पाठविलें व तो उपाय चिंतन करूं लागला.

राज्यप्राप्तीनंतर दुर्दैवानें उत्कर्षाची जणों बुद्धि भ्रष्ट झाली. त्याचें राज्यव्यवस्थेकडे मुळीच लक्ष नव्हते. तो स्वतः कांहीच राजकार्य पाहीना. कंदर्पादि मंत्र्याना त्यानेंच अधिकारारूढ केलेले असूनहि, तो त्याना राज्यव्यस्थेबद्दल कांहींच विचारपूस करीत नसे. त्याचें रोजचे काम काय तर, खजीन्याची सारखी मोजदात, तपासणी व तोलविणें.—खर्च न लागणाऱ्या गोष्टी तो तेव्हांच मंजूर करी. खर्चाचे नाव आलें की कितीं तरी दिवस विचारात घालवी. हे पाहून विचारी व दूरदर्शी लोकांची खात्री झाली कीं, तो नुसता लोभाचा पुतळा आहे. त्याच्या सापत्न माता दाबात राहणें कठिण होतें. त्याना तो शिध्यामध्यें मुगाची डाळ देवूं लागला. ( काश्मीरात मूग फार पैदा होतात व ते बहुतकरून हलक्या लोकांच्या खाण्यात येतात. ) यावरून त्यानी त्याच्या कंजूषपणाचा बोभाटा केला. तो एकाद्या श्रोत्रियाप्रमाणें कंजूष असून, त्याचें वर्तन हलकट असे. प्रजेला सढळ हाताचा व उदार मनाचा मालक आवडतो. म्हणून तो आपल्या कृपणपणामुळें प्रजेला आवडेनासा झाला.

पुढें कांहीं दिवसानी त्या लोभी उत्कर्षाकडून विजयमल्लाला ठरल्याप्रमाणें नेमणूक मिळेना. तसा तो नाराज होऊन निघून चालला. ( ७६० ) आपल्या बचावासाठीं त्यानें जामीनदार मध्यस्थाना म्हटलें, तेव्हा तेहि सज्ज होऊन त्याच्याबरोबर निघाले. नगरातून निघून तो एकरात्र लवणोत्स येथें राहिला, तेथें मध्यस्थाचे सैनिक त्याला मिळाले आणि त्याला हात उभारून म्हणाले की, ' हर्ष कैदेंत आहेच व आपणहि जाता आहां. यात उत्कर्षाचें आयतेंच काम झालें, आपण निदान हर्षाला तरी सोडवून बरोबर न्यावें, हे चागलें.' हे त्यालाहि पसंत पडलें व तो सकाळी सैन्यासह नगराकडे परतला. हें पाहून कांहीं डामरहि त्याच्या सहाय्याला आले.

स्वाराचा सेनापति मधुरावर्त हा एक मध्यस्थ व जामीन होता. त्याने तो राजपुत्र नगराहून निघाला तेव्हा त्याच्या तैनातीस आपला पुत्र नाग याला, काही स्वारांसह दिले होते. नाग हा उत्कर्ष राजाशीं राजनिष्ठ होता. तो त्याच्याकडे जलदीनें पोंचावें म्हणून कांहीं स्वार घेऊन पद्मपुराच्या मार्गानें निघाला होता. पण मार्गात अपशकुन झाल्यामुळे त्याला उशीर झाला. तोंवर शुभशकुनामुळें उत्साह वाढलेला विजयमल्ल, पूर्वीच नगरात जाऊन पोचला व त्याने राजवाड्याला वेढा घातला होता. त्याचे सैनिक बाणाच्या फाळाना पलीते लावून, नगरांतील घरे जाळीत सुटले होते. राजपुत्र जयराज हा लढण्यास निघाला असताना त्या उत्कर्षाला सोडून विजयमल्लाला मिळाला. ( ७७० )

आणि त्या दोघांनीं एकाद्या सुप्रसिद्ध महाकवीच्या काव्याच्या अर्थाविषयीं दोघे तरुण कवी वाटाघाट करीत बसतात त्याप्रमाणें, उत्कर्ष यावर पुढें काय करील याविषयीं विचार चालविला. विजयमल्लाच्या सैनिकांनीं राजाच्या हस्तिशाळा व गोमहिषशाळा जाळून टाकल्या आणि हर्षाला सोडल्याशिवाय आम्ही जाणार नाहीं, असा आग्रह धरिला. थोर व सन्मान्य नागरिकसुद्धां म्हणूं लागलें कीं, ' हर्ष हा थोर व पृथ्वीवर अमृतवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें उदार आहे. त्याला गादीवर बसवावें, या लोभी वाणगट खशाला–उत्कर्षाला–हांकून दिलें पाहिजे. ' याच्या नंतर पुष्कळसे पौरजन चतुस्तंभ मंडपाकडे धांवले व त्यांनीं त्या इमारतीच्या खिडक्यांतून हर्षदेवावर पुष्कळदां पुष्पवृष्टि केली.

ही गडबड उठली असतांना हर्षानें ठकुरांना पाठवून, राजाच्या सैन्याचा पराभव झाला होता त्यांना स्वस्थ राहविलें. कैदेंत असूनहि हर्षानें आपला शत्रु उत्कर्ष याचें असे नुकसान केलें होतें. नंतर त्यानें ठकुरांना म्हटलें, ' हल्लीं मी भयंकर संकटांत आहे. मला लौकर बंधमुक्त करा. नाहीं तर राजाकडून मजवर मोठा अनर्थ गुजरणार आहे. ' यावेळीं त्याला कांपरें भरलें होतें व त्याचें चित्त अतिशय चंचल झालें होतें.

तितक्यांत बाहेरून दारावर धक्के बसले व कोणी दरडावून मोठ्याने म्हटलें, 'या दुष्ट लोकांनीं हा काय राजद्रोह चालविला आहे ? ठकुर लोकहो, दार उघडा तर.' हें ऐकून ते लोक घाबरले. हर्षानें न भीतां धैर्यानें दरवाजा उघडविला. ( ७८० ) त्यावेळीं त्याचा प्राण जणों त्याच्या नेत्रांत येऊन राहिला होता. दार उघडतांच लोहराकडील सोळा वारिक पाहारेवाले–शिपायी–शस्त्रें घेऊन त्याला मारण्यासाठीं आलेले त्याला दिसले. ' हर्षाचें डोकें उडवून बाहेर दाखविलें कीं ही सारी गडबड व भय तात्काल नाहींसें होईल, ' असें नोनक मंत्री वरचेवर उत्कर्षाला सांगत होता. तें ऐकून उत्कर्षानें ते सोळा शिपायी धाडण्याचें ठरविलें. पण तितक्यांत पुनः हर्षाला मारवावा न मारवावा, या विषयीं त्याचा निश्चय होईना. तो जिवंत असला तर कांहीं तरी कामीं पडेल असें वाटून त्यानें शिपायांना निघतांना सांगितलें कीं, 'तुम्ही जाऊन त्या ठकुरांचा पाहारा काढा व तमचा ठेवा आणि मी ही आंगठी पाठवीन तेव्हां हर्षाला ठार मारा. तसेंच ही दुसरी आंगठी पाठविली तर त्याला बंधमुक्त करा. ' असें म्हणून त्यानें त्या दोन्ही आंगठ्या नीटपणें त्यांना दाखविल्या. यामुळेंच त्यांनीं आत जातांच ठकुरांचा पाहरा काढला, पण हर्षाला मारलें नाहीं.

हर्षानें त्यांतील प्रत्येकाला त्याच्या नांवाने संबोधून आपल्या हातानें विडे दिले व आपले समोर बसविलें. हा सत्कार पाहून ते लज्जित झाले. विडे घेतांना त्यांनीं हातांतील शस्त्रें आणि मनांतील, त्याला मारण्याची इच्छा, या दोहोंचा एकदमच त्याग केला.

मधुर वाणी लक्ष्मीची प्राप्ति करविते, कीर्ति वाढविते, पापाचा नाश करते, शत्रूंना मित्र बनविते, अनुकूल मंडळीला प्रतिकूल होऊं देत नाहीं, आणि सर्व अनर्थांचा परिहार करते. अशी ती कामधेनूसारखी, कोणचें म्हणून संकट

दूर करीत नाहीं ? ( याच तऱ्हेचा, ।। कामान्दुग्धे विप्रकर्षत्यलक्ष्मीम् ।। वगैरे श्लोक उत्तररामचरितांत लवाच्या तोंडीं भवभूतीनें घातलेला आहे. कल्हणानें कदाचित हा श्लोक त्याच्यावरूनच घेतला किंवा रचला असेल. लेले. )

त्या शिपायांना हर्षानें म्हटलें, 'अहो , स्वस्थ कां बसला? धन्याची आज्ञा बजावण्यांत सेवकाला दोष लागत नाहीं.' तरी थोडा वेळ थांबला तर, न जाणों, तुम्हाला या चाललेल्या प्रकारात क्षणोक्षणीं होत असलेला फरक व चमत्कार पाहण्यास सांपडेल. आकाशातील लहानलहान अभ्रामध्यें हत्ती, घोडे, गेंडे, हिंस्रपशू, उरग वगैरेंच्या आकृती झालेल्या दिसतात. त्याप्रमाणें माणसांच्या मनोविकारांमध्यें मृदु व तीक्ष्ण, अशा विचाराच्या लहरींचे प्रकार सारखे बदलत असतात. येईल त्या व होईल त्या गोष्टीला व प्रकाराला मी तयार बसलों आहे. तसेंच, तुम्हींहि पुढें कायम रहा. कोण जाणें हे सारे भयंकर प्रकार व फेरफार होताहेत, ते भावी भाग्योदयाचे निदर्शकहि होत असतील.

वर्षाकाळ जवळ येतो तसा ग्रीष्माचा ताप पराकाष्ठेला पोंचत असतो. रात्रीचें तम पहाटें पहाटें अधिकाधिक गाढ होतें. त्याचप्रमाणे उत्तम वैभव व संपत्तीची प्राप्ति निकट आली असताना, नष्ट होत असलेली विपत्ति अधिकच तापद व जाचक होत असते'.

याप्रमाणें त्याच्याशीं बोलत राहून त्यानें त्याना, आपल्यासारख्या सज्जनाना शेवटीं सुख झाल्याबद्दलच्या कथा सांगितल्या. त्याला स्वरोदयाचें चांगलें ज्ञान होतें. स्वतःच्या श्वासोच्छ्वासावरून त्याला शुभाशुभ शकून कळून, आपणाला शुभफल मिळण्याची पक्की खात्री वाटत होती. वेळ मिळविण्यासाठीं त्यानें त्यांना उपन्यास शुद्धि व परिपोष यांनीं पूर्ण अशी पुण्यश्लोक हरिश्चंद्र राजाची कथाहि सांगितली व ती सांगताना, तिच्यांतील मुख्य मुख्य मुद्यांचें स्पष्टीकरणहि केलें. त्याबरोबर तो स्वतःचें रक्षण व बाहेर चाललेल्या प्रकारांचें परिज्ञान, यांच्या विषयींहि त्या शिपायांच्या लक्षात न येऊं देतां खबरदारी घेत चतुरपणाने त्यांचे मनरंजनहि करीत होता.

तोंवर बाहेर त्याच्या संबंधानें शेकडों नवे नवे विचार निघून, त्यांच्यांत राज्यलक्ष्मी व महाकाली यांची जणों सारखी ये जा चालली होती. त्याला ठार मारवावे किंवा बंधमुक्त करावें याविषयी उत्कर्ष राजा आपल्या सेवकाना तसतशी आज्ञा देत होता. ( ८०० ) शेवटी त्याने त्याला मारण्याचीच आज्ञा दिली. पण सुदैवानें तो त्या सेवकाच्या हातीं खुणेची आंगठी देण्याला विसरला. त्या सेवकाचें तोंडी सांगणे त्या पाहारेवाल्यांनीं मानलें नाहीं. तोवर सेवक खुणेच्या आंगठीशिवायच गेलेला पाहून उत्कर्षानें सत्याचा पुत्र शूर याला त्याच्या मागून पाठविलें. तो राजपुत्र सात्विक स्वभावाचा होता. त्याच्या बरोबरहि राजानें विस्मृतीनें व सुदैवानें हर्षाला बंधमुक्त करण्याच्या खुणेची आंगठी दिली.

वृद्धक्षत्र या राजकुलाचा आधार सिंधुराज जयद्रथ याचें शिर जो कोणी जमीनीवर पाडील त्याला, तें शिर खालीं पडतांच, मृत्यू यावा, असा वर त्याच्या पित्यानें मिळविला होता. त्याच्या स्वतःच्याच हातून तें शिर खालीं पडून तो वर त्याच्यांच नाशाला कारण झाला. तसेंच श्रुतायुध राजाची दिव्य गदा त्याच्याच मस्तकावर पडून, तिने त्याचाच वध

केला. ( जयद्रथ व श्रुतायुध यांच्या कथा महाभारतांत द्रोण पर्वांत १४६ व ९२ या अध्यायांत आहेत. )

परित्राण साधन मानलेल्या वस्तूनेंच कधी कधीं नाश होत असतो. त्याप्रमाणे प्रथम अभिज्ञानविषयक विस्मरणामुळे व पुढें गडबडींत त्या साधनांची अदलाबदल केल्यामुळें उलट उत्कर्ष राजाला नाश प्राप्त झाला.

हर्षाच्या थोर व खेळीमेळीच्या स्वभावामुळे लौकरच ते त्याचे लोहरवाले रक्षक त्याचे हितकर्ते झाले व त्यांनीं उत्कर्षाच्या आज्ञा धाब्यावर बसविण्याचे ठरविले.

राजपुत्र शूर आवेशानें व रागारागानें येत असलेला, हर्षाच्या वधासाठीच येत आहे, असे समजून, त्यांनीं शस्त्रास्त्रे सांवरलीं व ते त्यालाच मारण्याला तयार झाले. त्यानी दाराची फळी उघडून पाहिले, तो त्याच्या हातीं बंधमुक्त करण्याची निशाणीची आंगठी दिसली. तेव्हां त्याच्याबरोबर आनंदाने नाचत हर्षाजवळ येऊन, त्यांनीं त्याच्या पायावर डोकीं ठेवली व त्याला बाहेर पडण्याबद्दल विनंति केली. पण हर्षाला विश्वास पटेना. तो किंचित काल विचार करीत राहिला.

इकडे हर्षाला उत्कर्षानें ठार मारविले असें समजून, विजयमल्ल भारी संतापला व त्यानें जास्तच जोरानें लढाई चालविली. (८१०) तो राजवाड्याला आग लावणार, इतक्यात, उत्कर्षाच्या कांहीं सेवकांनी त्याला, 'तुझा वडील बंधु हर्ष जिवंत आहे.' असें कळवून, त्याला मोठ्या कष्टानें थोपविलें. उत्कर्षानेंहि त्याची खात्री पटण्यासाठीं हर्षाची पत्नी सुगला इला हर्षाचें ताटक देऊन विजयमल्लाकडे पाठविलें. तिला पाहतांच त्यानें आग लावण्याचा हात आखडला.

हर्षाला बंधमुक्त केल्यानें हे संकट नाहीसें होईल, असें उत्कर्ष राजाला वाटले. त्यावर प्रशस्तकलश वगैरे मंत्री तिकडे गेले व त्यांनीं हर्षाच्या बेड्या तोडविल्या व त्याला कारागृहांतून–चतुस्तंभ मंडपांतून–बाहेर बोलावलें. तें बोलावणें तरी, प्राणप्रयाणसमयींच्या शेवटच्या श्वासोच्छ्वासाप्रमाणेच जणो, त्यांच्या मुखातून निघालें होतें. पुढें हर्ष बाहेर आला व घोड्यावर बसून निघाला. मार्गांत नागरिकांनी केलेल्या पुष्पवृष्टीनें तो जसा झांकून जात होता. उत्कर्ष अद्यापि लढाई चाललेल्या जागींच होता. तिकडे तो मंत्र्यांबरोबर पोंचला. उत्कर्षाने त्याला भेटून, त्याचें अभिनंदन केलें आणि म्हटलें कीं, ' तूं विजयपालाकडे जाऊन, लढाई थोपवूं या. नंतर पुढची काय ती व्यवस्था करूं. ' त्याप्रमाणें हर्ष रवाना झाला व उत्कर्ष मंत्र्यांसह सुवर्ण रत्नादि मौल्यवान वस्तु खजिन्यांत ठेविल्या होत्या तिकडे, लढाई बंद करून निघून गेला.

प्राणांतिक संकटांतून सुटून हर्षदेव येत असलेला पाहून विजयमल्ल हर्षातिशयानें थोडा वेळ सुन्न झाला. नंतर तो त्याच्या पायां पडला. हर्षानें त्याला एकदम उठवून आलिंगन दिले. नंतर ते उपकारी व उपकृत उभयतांहि कांहीं वेळ प्रेमाने बोलत राहिले. (८२०)

एका विश्वासांतल्या माणसानें विजयमल्लाला हळूंच म्हटलें, ' याला–हर्षाला–प्रथम मारून टाका व नंतर उत्कर्षाला, म्हणजे आपण निस्सपत्न व बिनघोर व्हाल. ' पण

त्या इमानीं राजपुत्रानें ऐकिलें नाहीं. तरी या बोलण्याचा रोंख लक्षांत घेऊन हर्षालाहि भयानें क्षणभर कांपरें भरलें. तो स्वतः यावेळीं एकटाच होता. त्याच्या पक्षाचे असे कोणी नव्हते. दोन प्रतिस्पर्धी ससाण्यांच्या झडपेंत सांपडत असतांना एकाद्या पक्षहीन व झुडुपांमध्यें बचावासाठीं दडूं पाहणाऱ्या पाखरासारखी त्याची स्थिति होती. तो घोडा फेरण्याच्या मिषानें त्याला दौडीत फिरत होता.

भारावलेल्या अभ्रांतून वृष्टि होऊन दावानल शांत होतो तोंच वृक्षाला विद्युत्पाताचें भय प्राप्त व्हावें व समुद्रांत पडलेल्याला नक्रमुखांतून सुटला तरी बुडून मरण्याची भीति असावी, तशी त्याची स्थिति होती. आसन्न शुभफल अधिक गोड लागावें म्हणूनच जणों एका भयाचें निरसन होतें तोंच विधि दुसरें अधिक भय पुढें आणीत असतो.

हर्ष घोडा फेरीत असतांना झालेली हकीकत कळून त्याचे कांहीं पायदळ लोक त्याला येऊन मिळाले. त्यांना बरोबर घेऊन तो विजयमल्लाकडे गेला. तेथें थोडा वेळ मसलत करून तूर्त भांडण थोपविल्याचें कळविण्यासाठीं तो राजाकडे निघाला. तो राजवाड्यापुढें पोंचतो तोंच विजयसिंहानें पुढें होऊन त्याला रोंकलें व म्हटलें, 'मृत्यूच्या दाढेंतून सुटलेले पुनः मरावयाला वेड्यासारखे तिकडेच कशाला जातां? बेधडक चलून सिंहासनावर बसा.' तोंवर सेवकांनीं खजीन्यांतून सिंहासन बाहेर काढून आणलें. तसा तो ताबडतोब त्याच्यावर बसला. तितक्यांत आपल्या धीटपणानें आपला भयंकर अपराध लपवीत, सुगला त्याच्याबरोबर महाराणी म्हणून बसण्याला पुढें झाली. (८३०) अभिषेकाची बातमी कळतांच मेघगर्जनेनें चातक संतुष्ट होऊन धावतात तसें, मंत्री चोहींकडून येऊन जमा झाले. हें ऐकून उत्कर्ष राजा व्याकुळ झाला होता. त्याला त्या चलाख विजयसिंहानें कांहीं मंत्र्यांसह राजवाड्यांतून काढून कैद करून दुसरीकडे पाठविलें. हर्ष राजा राजसभेंत सिंहासनारूढ असतांना, थोड्याशा लोकांबरोबर, राज्यभ्रष्ट व गतश्री असा उत्कर्ष समोरून जात असलेला हर्षानें पाहिला. संपत्ति आणि वैभव कोणाचें सारखें स्थिर राहिलें आहे? उत्कर्षावर पाहऱ्याचा बंदोबस्त करून विजयसिंहानें हर्षाकडे येऊन त्याबद्दल कळविलें.

नंतर हर्षानें कैदेंत मित्र झालेले ठक्कुर व त्यांचे सैनिक यांना बोलावून जवळ ठेवलें. तेव्हां त्याला विजयमल्लाचें भय उरलें नाहीं.

वडील भावाला–हर्षाला–राज्याभिषेक झाल्याचें ऐकून विजयमल्लहि त्याच्याकडे जाण्याला निघाला. पण हर्षाच्या दूतांनीं त्याला मोठ्या आदबीनें, पण जलदीनें त्याच्या वाड्यांत नेऊन पोंचाविलें. पुढें विजयमल्लाचे सैनिक हर्षाकडे आल्यावर, त्यानें कारस्थानानें तात्काल विजयमल्लाला बोलावून घेतलें आणि त्याला हात जोडीत म्हटलें, 'माझे प्राण व राज्य आपलीच देणगी. आपल्यामुळेंच आज माझ्या सर्व क्लेशांचा परिहार व साफल्य झालें. मला दैव अनुकूल झालें तें तरी आपल्याच श्रेष्ठ नीतीचें व धैर्याचें फल होय.' नंतर त्यानें त्याच्या परिश्रमाबद्दल त्याला योग्य इनाम दिलें. तो पुनः सिंहासनावर त्याला बरोबर घेऊन बसला. हर्षाच्या अंगांत अद्यापि कैदेंतलींच वस्त्रें होतीं. तरी तो त्या सिंहासनावर उत्तम शोभत होता. (८४०)

त्या विलक्षण गडबड, क्रांति व साहसपूर्ण दिवशीं सायंकाळीं, हर्षाला एकदांचा आपल्या शिरावरील भारी बोजा उतरल्यासारखें वाटलें. तो अगदीं थकून गेलेल्या हमाला-प्रमाणें शय्येवर जाऊन पडला. पण या संसृतीच्या विलक्षण चंचलपणाचा विचार, त्याच्या मनांत सारखा घोळत राहिल्याने, त्याचे नेत्र मिटलेले असूनहि, त्याला समाधानकारक निद्रा आली नाहीं.

युक्ति व कपट यामुळे कैद झालेला उत्कर्ष, त्या मंत्र्यांना पुढें कसे काय करावें, म्हणून सल्ला विचारूं लागला. त्यानें या संबंधांत कांहीं मंत्र्यांना रागानें फटकारलें होतें. त्याला नोनकाने तिरस्कारानें व रुक्षपणें उत्तर दिलें, 'महाराज, आपण सकाळीं माझें म्हणणे एकलें नाहीं. त्या वेडेपणाचा परिणाम आतां आपणाला कसा काय भोगावा लागणार तें ऐका. आपण कैदेंत असलेल्या हर्षाला आज उष्टें खाणाऱ्याच्या स्वाधीन केलें होतें. तो उद्यां आपणाला श्वपच चांडालांच्या हातीं सोंपील. त्यापेक्षां मरणाहून जास्ती श्रेयस्कर असा मार्ग तो कोणचा असणार ? पण आपण लढाई बंद करून तोहि मार्ग आमच्या हातीं ठेवला नाहीं. आपणाला शक्य तितकें अधिक छळण्यांत शत्रु आपलें चातुर्य दाखवीत नाहीं कां ? व आमची दुःखद दुर्दशा करून आमच्या पराभवाचें अत्यंत कटुफल, तो आम्हांला भोगवीत नाहीं कां ? घातक परिणामाचा विचार न करतां आपण योजलेला उपायच क्षणांत आपल्या सर्व नाशाला कारण झाला आहे. अगदी जीर्ण व फाटकें वस्त्र सुईनें कितीहि शिवून नीट करीत गेलें तरी, तें शंभर जागीं फाटतें, त्याप्रमाणें थोडीशी सुद्धां चुकी वेडेपणानें दुरुस्त करण्यांत अधिकच बिघडते'. हे ऐकून उत्कर्ष राजा, त्यांच्यांतून निघून सहजा नांवाच्या प्रिय राखेसह, आंतल्या अंगास गेला ( ८५० ) तिला त्यानें मी एकीकडे संध्यावंदन करीत बसतों, असें सांगितलें व तो पडद्याआड गेला. त्याच्याजवळ शस्त्र नव्हते. तरी त्यानें एक मोठी कात्री घेऊन तिनें आपल्या गळ्यांतलि मर्म-स्थानांतील धमन्या तोडल्या. कात्री खालीं पडल्याचा आवाज झाला तेव्हां सहजेला शंका आली. तितक्यांत पडद्याखालून रक्त बाहेर आलें. तसें तिनें आंत जाऊन पाहिलें तों, विद्युत्पातानें भंग झालेल्या पर्वताशिखरापासून धातुराग वहात असावा त्याप्रमाणें, त्याच्या लोंबकळणाऱ्या व जखमी मानेंतून रक्त वहात होतें. तें पाहून तिनें जें आचरण केलें, त्यांच्या द्वारें पतिप्रिय स्त्रियाचीं मस्तकें कायमचीं उन्नतीला पोचलीं. चंद्राच्या कला कमी होऊं लागतांच रात्र त्याची साथ सोडते. पण उषा मावळत्या सूर्याला अनुसरते. म्हणून शहाण्यांनीं, प्रेमामध्यें फरक पडण्याचा संभव शेवटपर्यंत असतो, हें लक्षांत ठेवून, स्त्रियांना नितांत निंद्य, किंवा वंद्य, मानूं व म्हणूं नये. कुल व प्रियकराचें प्रेम या बाबतींत कय्या व सहजा सारख्या असूनहि एक निंद्य व दुसरी वंद्य झाली. कय्येप्रमाणेंच सहजाहि देवदासी होती. तिला नाट्यमंडपांत पाहून राजानें अंतःपुरांत घातली होती. तिनें आपल्या प्रियकर कांताचें रक्तरूपी गैरिकानें अंगराग केला व प्रेमनिर्भर अंतःकरणानें अग्नि-प्रवेश करून, स्वतःला सुवर्णाप्रमाणें उज्ज्वल केलें. ती पूर्वी हर्षदेवाचीहि लाडकी होती. म्हणून त्यानें तिला नको म्हटलेलें न ऐकतां तिनें मरणाचा निश्चय तडीस नेला. ( ८६० )

मरतांना उत्कर्ष राजाचें वय सारें चोवीस वर्षांचें होतें व त्यानें केवळ बावीस दिवसच राज्य केलें. त्याचें प्रेत रात्रभर तसेंच होतें. त्याला सकाळीं अग्निसंस्कार करण्यांत आला. त्याच्या विलोलाक्षि राण्या लोहर येथें राहात होत्या. त्यांतील कांहींनीं अग्निप्रवेशाच्या द्वारें सत्वर त्याचा समागम प्राप्त करून घेतला.

हर्षाचे सेवक, उत्कर्षाच्या मंत्र्यांचीं शस्त्रें काढून घेत असतांना, नोनकानें जिवावर उदार होऊन, कांहीं वेळ शस्त्र दिलें नाहीं. तेव्हां त्याच्याच पक्षांतील मंत्री प्रशस्तकलश यानें त्याला म्हटलें, 'आपणाशिवाय राजाला तरी मंत्री कोण मिळणार? तो आपणाला कांहीं दिवसांनी बंधमुक्त करील तेव्हां अशी प्राणाची उपेक्षा कां कराता?' नंतर त्यानें त्याच्याकडून शस्त्र टाकविलें व आपलेंहि टाकले. पुढे हर्षानें नोनक, सिल्हार, भट्टार, प्रशस्तकलश, वगैरे मंत्र्याना बेडया ठोकवून कारागृहांत पाठविलें. याप्रमाणें एकाच दिवसात हर्षदेवानें किंवा त्याच्या सुदैवानें प्रबल विधीनें ही विलक्षण राज्यक्रांती घडवून आणली.

आमच्या या कथेंत येथवर पुष्कळशा राजांचे बरें वाईट वर्णन होत आलें आहे. पण दुर्दैवानें बुद्धीला अगम्य अशा प्रसंगाला ही कथा येऊन पोंचली आहे. या हर्ष राजाच्या कथेंत सर्व तऱ्हेच्या सत्प्रयत्नांचा उदय, तसेंच ते सारे प्रयत्न व्यर्थ गेल्याचेंहि वर्णन करावें लागणार. सर्व प्रकारचे विचारपूर्वक ठरविलेले बेत, तसाच त्या बेतांमध्यें राजकारण व राजनीति, यांचा अभाव, दिसून येतो. तिच्यात राजसत्तेचें अतिरिक्त निदर्शन, तसेंच व्यवस्थितपणाकडे आत्यंतिक दुर्लक्ष झालेलें दिसतें. ती कथा आत्यंतिक औदार्य व त्याबरोबरच परस्वाच्या अपहाराची पराकाष्ठा, यांनीं भरलेली आहे. तिच्यांत अत्यंत कारुण्य, तसेंच क्रौर्यातिशय पाहण्यांत येतो. यामुळें ती सारखीच आनंददायक व खेदजनक झालेली आहे. धार्मिक कृत्यांच्या विपुलतेमुळें ती जितकी मनोहर वाटते, त्याच मानानें पापाचरणाच्या अतिरेकामुळें ती कलंकित, अतएव गर्ह्य वाटते. ती सर्व बाजूंनीं स्पृहणीय, तरी तितकीच निंद्य आणि सर्वथा वंद्य तितकीच तिरस्करणीय आहे. शहाण्यांनीं तिचें जितकें महत्त्व व कौतुक करावें, तितकीच ती उपहास्य व शोचनीय आहे. ती कमनीय तितकीच अपकीर्तिमुळें वीट वाटण्याजोगी आहे.

या हर्षदेवाची घटना खरोखर तेजस परमाणूंनीच झालेली असावी. नाही तर तो थोर थोर लोकांनासुद्धा कसा सूर्यासारखा प्रखर व दुष्प्रेक्ष्य वाटला असता! त्याच्या तोडीची व्यक्ति देवतांमध्यें सुद्धां आढळणें कठिण. विद्वान लोक तपास करतील तर न जाणो त्यांना ती कदाचित दानवेंद्रांमध्यें सांपडलीच तर सांपडेल.

त्याच्या कानांत प्रतिसूर्यप्रतिम दैदीप्यमान कुंडलें असत. आपल्या उत्तुंग उष्णीषावर तो उंचवटसा मुकुट घालीत असे. त्याची दृष्टी सुप्रसन्न सिंहाच्यासारखी असे. त्याची भरदार दाढी लांबवर लोंबत असे त्याचा वर्ण काळसर लाल होता. तो वृषस्कंध, महाबाहु, विशालवक्षा व तनुमध्य असा होता. त्याचा बांधा भरदार असे. त्याचा आवाज व भाषण मेघगंभीर होतें. यामुळें अतिमानुष सत्वाची सुद्धां गाळण झाली असती. अर्जदारांचें म्हणणें स्वतः ऐकून व समजून घेण्यासाठी त्यानें राजवाडयाच्या चारी महाद्वारांवर चार

मोठ्या घंटा टांगविल्या होत्या. वृष्टीच्या द्वारें वर्षाकालीन मेघ चातकांची तृषा तत्काल निवारण करतात. तद्वत् तो त्या अर्जदारांचीं दीन व आर्त गाऱ्हाणीं ऐकतांच, त्यांच्या दुःखांचें निवारण करीत असे. ( ८८० )

त्याच्या दरबारांत कोणीहि उज्वलवेश, सुवर्णालंकार, धीर व उदात्त चर्या आणि पुष्कळसे सेवक, यांच्याशिवाय केव्हांहि पाहण्यांत येत नसे. राजवाड्याचें सिंहद्वार नेहमीं देशोदेशींच्या व नानातऱ्हेच्या लोकांनी गजबजलेलें असें तेथें सर्व देशांच्या संपत्तीचे जणों ढीग पडलेले असत. राजवाड्यांत सोन्याचे कडीं तोडे वगैरे अलंकार घातलेले अगणित मंत्री, प्रतिहार, सामंत व प्रमुख लोक. सारखे वावरत असत.

याप्रमाणें नव साम्राज्यप्राप्तीमुळें हर्षाचें सौंदर्य स्फुरण पावत होतें तरी, तो राजा विजयमल्लाचे मत गुरूच्या सारखें मानीत असे. विजयमल्लाच्या आज्ञा त्या कृतज्ञ राजाच्याच आज्ञा समजून, सर्वजण शिरसामान्य करीत असत. त्याच्याबरोबरहि राजाच्या प्रमाणेंच थाटाचा परिवार असे.

हर्षानें पूर्वापार रिवाज व संस्था चालू राहण्यासाठीं, वडिलांच्या वेळच्या मंत्र्यांनाच अधिकार व कामें दिलीं. तो स्वतःच्या सेवकांच्या नादीं फारसा लागला नाहीं. त्यानें कंदर्प व मदन यांना अनुक्रमे द्वाराधिकारी व कंपनापती नेमून विजयसिंह वगैरेंनाहि त्यांच्या त्यांच्या योग्य कामें दिलीं. त्याचा राग शांत झाल्यावर त्यानें प्रशस्तकलश वगैरे मंत्र्यांना बंधमुक्त करून, त्यांना पूर्वीचीच मोठालीं कामें दिलीं. फक्त नोनक मंत्री व धात्रेय बंधु, यांचे अगणित अपकार ध्यानांत आणून, त्याने त्या दोघांनाहि सुळावर देवविलें. तरी पुढें, प्रसंगविशेषीं, संकटसमयीं व बिकट कामांत, त्याला त्या बुद्धिवान व स्वामिभक्त नोनकाचें स्मरण होऊन पश्चात्ताप होत असे. ( ८९० ) योग्य माणसाच्या हातून अपकार घडलेला असला तरी त्याचा प्रसंगीं उपयोग होत असतो. घर जाळणाऱ्या अग्नीवरसुद्धां स्वयंपाक करून घेतां येतो.

राजसेवकांनी विश्शाविटाच्या बायकोसमक्ष त्याचे नाक कान कापून, नंतर त्याला सुळावर चढविलें.

वसंत ऋतूंत फुललेला वृक्ष, भूविवरांतून किंवा तरुकोटरांतून, निघालेल्या कृष्ण मधुमक्षिकांचे पोषण करतो. त्याप्रमाणें हर्षानें उदयकाळ प्राप्त झाल्यावर कैदेंतून सुटलेल्या स्वतःच्या सेवकांना, आपल्या भाग्योदयाचें वाटेकरी केलें व त्यांना मौल्यवान इनामें दिलीं.

रक्काचा वंशज क्षेम याचा नातु वज्राचा पुत्र सुन्न याला व त्याच्या भावाला राजानें अमात्यांमध्यें प्रमुख केलें. राजा फिरतीवर जाई तेव्हां व इतर प्रसंगींहि प्रत्येक मंत्री प्रति राजासारखा वाटे. आपला कनिष्ट बंधु जयराज याला राजानें सर्व प्रतिहारांमध्ये प्रमुख केलें. तो राजाला प्रामाणिक प्रिय होता. तन्वंगाचा पुत्र धम्मट हा, त्याचे दोघेहि बंधू वारल्यावर, त्याच्या पक्षपाता-

मुळें त्याचे प्राण वाचले होते तें ऋण फेडण्यासाठीं मंगेची यात्रा करून, आपल्या पुतण्यासह परत आला होता. त्याच्या वडील बंधूंनीं आपल्यापायीं प्राण खर्ची घातले होते, हें लक्षांत आणून हर्षानें धम्मट व त्याचे पुतणे, यांचा बहुमान केला.

हर्ष विजयमल्लाला बरोबरीनें वागवीत असे. तरी पुढें लबाड लोकांच्या चिथावर्णानें तो हर्षाशीं द्रोह करूं लागला. ते दुष्ट लोक त्याला म्हणत कीं, 'आपण राज्य जिंकलें तें दुसऱ्याला काय म्हणून दिलें ?' तें परत मिळविण्यासाठीं त्यानें आपला वडील बंधु हर्ष, याला ठार मारण्याचें ठरविलें ( ९०० ) हें काम त्यानें, त्याला आपल्या घरीं बोलावून घेऊन उरकण्याचा बेत केला आणि यज्ञाच्या मिषानें हर्षाला मेजवानीला बोलाविलें. त्याच्या बेताचा हर्षाला सुगावा लागला, तेव्हां त्यानें गडबडीनें आपल्यावर हल्ला झालाच तर बचावासाठीं आपलें सैन्य तयार करविलें. तें तयार होत असल्याचें पाहून, विजयमल्लानें गडबडीनें बाहेर पडून, राजपागेंतून घोडे सोडून नेले आणि राजाचे लोक आडवे येतांच त्यानें त्यांच्यावर शौर्यानें हल्ला केला. आपल्या थोडयाशाच लोकांनिशीं मोठ्या निकरानें लढत, त्यानें नगराबाहेर पडण्याचा प्रयत्न केला. त्याची राणी त्याच्या पाठीमागें त्याच्या घोडयावर बसलेली, बरोबर होती. अशा अडचणींतहि त्यानें अतिमानुष युद्ध केले. त्याच वेळीं अकालीं पर्जन्यवृष्टि झाली व सर्व पृथ्वी धारासारानें झांकून गेली. शेंकडों रणदुंदुभींच्या भीषण आवाजाप्रमाणें झंझावाताचा शब्द होत होता. विजयमल्ल पर्जन्यवृष्टी व बाणवृष्टीनें झांकून गेला होता. त्याचे लोक हळूं हळूं हतवीर्य व कमी कमी होत चालले होते.

प्राणिमात्रांचीं पूर्वकर्मे त्यांना सोडीत नाहींत. त्याप्रमाणें चंडकाच्या पुत्रांनीं त्याला मारण्याच्या इराद्यानें त्याचा पिच्छा पुरविला होता. विजयमल्ल वितस्ता व सिंधू यांच्या संगमावर पोंचला. त्यावेळीं पाण्याच्या पुरामुळें पूल तुटला होता. सिंधूलाहि पूर आला होता. विजयमल्ल मोठा धाडसी व शूर होता. तो घोडयावरून उतरला व पत्नीसह पोहत नदीपार झाला. त्याचा घोडाहि मागोमाग उतरला. ( ९१० ) नंतर तो घोडयावर स्वार होऊन लोहरच्या मार्गानें दरद देशच्या रोखानें रवाना झाला. किशनगंगेच्या खोऱ्याच्या वरील भाग त्यांच्यांत अद्यापिहि दरद लोकांची वस्ती आहे. द्वारपति कंदर्प यानें तिकडील मार्ग अडविलेले होते. तरी एका बिकट पहाडी वाटेनें, त्यानें पहाडांनीं घेरलेलें दरदपुर गांठलें. तेथील राजा विद्याधरशाही यानें त्याचा सत्कार व पाहुणचार केला. ( दरदपूर=हल्लींचें गुरेज नांवाचें गांव. त्याला गिरिगुप्त हें वर्णन यथार्थ लागू पडतें. या शाहि राजाचा मूळच्या काबुल नदीच्या खोऱ्यांतील सुप्रसिद्ध शाही राजघराण्याशीं कांहीं संबंध होता किंवा कसें, तें कळत नाहीं. चित्रल व यासिनचे राजे स्वतःना शाहि म्हणवितात. पण ते मुसलमानी अंमलापूर्वीपासून शाहि होते किंवा कसें याविषयीं शंका आहे. ) कांहीं दिवसांनीं विजयमल्लाचे बरेच लोक येऊन त्याला मिळाले. पुढें डामर वगैरे त्याला मिळून ते या तंटयांत पडत असल्याचें ऐकून, हर्ष राजाचे धाबे दणाणले व त्यानें त्यांच्या प्रतिकाराची योजना चालविली. पण ती फसली. थंडीचे

बहुतेक दिवस दरदपुरांत काढून, डामरांच्या निमंत्रणावरून विजयपाल चैत्रांत स्वारीवर निघाला. तो मानी राजपुत्र पूर्वी अनेक संकटांतून पार पडला होता. पण या स्वारींत तो वाटेंत एका जागीं डेरे देऊन राहिला असतांना, अवचित भयंकर बर्फवृष्टि होऊन तिच्यांतच त्याचा अकालीं अंत झाला!

ज्याच्यासाठीं साहसी लोक उल्हासानें खटाटोप करीत असतात, तें त्यांचें महत्त्वाचें कार्य, विधि यःकश्चित गोष्टीनें पार हाणून पाडतो. तिग्मरुचि सूर्य आपल्या सहस्रकरांनीं —किरणांनीं—ज्याचें, उन्मीलन करीत असतो, त्या पद्मांचे विधाता वक्र होताच एकाद्या करीच्या एकाच करानें—सोंडेनें—उन्मूलन करवितो.

अशा रीतीनें, राजगादीविषयीं तंटा चालण्याच्या भीतीमुळें हर्षाचें राज्यवैभव संकुचितसें झालेलें पुनः उत्कर्ष पावूं लागलें. त्यावेळीं, राजा हा शब्द, इतर राजे हर्षापुढें तृणवत् असल्यामुळें त्यांना व तो उदग्र प्रतापी असल्यामुळें त्यालाहि शोभण्यासारखा नव्हता. (९२०)

त्या हर्ष राजाला कोणाविषयीं हेवा वाटत नसे. त्यानें आपल्या दरबारांत अनेक चांगले चांगले नवे रिवाज व नव्या चाली सुरू केल्या. पूर्वी या राज्यांत राजाशिवाय सारे लोक केस मोकळे सोडीत. डोक्यावर उष्णीष आणि कानांत कुंडलें वगैरे घालीत नसत. पण या राजाच्या कारकिर्दीपासूनच शोभादायक व्यवहारपद्धति इकडे सुरू झाली. वसंत ऋतूंत सर्व वनप्रदेशांत फुलांचा बहार सर्वत्र सारखा प्रगट होत असतो. त्याप्रमाणें त्याच्या साऱ्या राज्याला तेव्हांपासून विलक्षण शोभा आली. पूर्वी एकदां कंपनापती मदन, यानें धम्मिल बांधला आणि मुख्य मंत्री जयानंद यानें झगझगीत रंगाचा अखूड अंगरखा घातला म्हणून राजा त्यांच्यावर नाराज झाला होता. पण या हर्ष राजानें राजोचित वेष सर्वसामान्य सुरू करूं दिला. कांहीं सुरेख, हौसी व डौली अमात्यांनीं चांगले प्रेक्षणीय वस्त्रालंकार घातलेले पाहून, हर्ष राजानें त्याचा हेवा न करितां उलट त्यांना आपल्या दासींच्या हातीं आरत्या ओवाळविल्या!

त्या हौसी व विलासी राजाला दाक्षिणात्यांची पद्धति पसंत होती. म्हणून त्यानें कर्नाटकी तऱ्हेचे गोल टंक चालू केलें (या तऱ्हेचे हर्षाचे सुवर्णाचे थोडेसे टाक उपलब्ध झालेले आहेत.) त्याच्या दरबारांत कर्नाटकांतल्या प्रमाणें ताडपत्राचे पंखे वारले जात. ते लोक कपाळावर मोठे मोठे चंदनटिळक लावीत व सुरेखसे लांब लांब जंबिये बांधून येत. त्याच्या जवळच्या चंचल भ्रूकुटियुक्त स्त्रिया लांब लांब वेण्या पाठीवर सोडीत त्यांच्यांत सुवर्णकेतकी गुंफलेले वैजयंती हार लटकत असत. त्यांच्या कपाळांवर अलंकारांनीं विभूषित अशीं चंचल झुलपें लोंबत असत. त्यांचें अपांग व कर्णप्रांत यांच्यामध्यें त्या अंजनरेखा लावीत. त्यांच्या केसांच्या टोंकाला जरतारी आगवळ बांधलेले लटकत असत. त्यांच्या नेसलेल्या वस्त्रांचे सोगे पायघोळ व जमीनीवर लोळत असत. त्या अंगांत उरप्रदेश झाकणाऱ्या चोळ्या घालीत. त्या चोळ्यांच्या बाह्या कोपरापर्यंतच लांब असत. त्या फिरत असतांना

त्यांचें हास्य जणों कापराचा सुवास फैलावत असल्यासारखें वाटे. (९३०) त्यांनी पुरुषवेष घेतला असतांना त्या मीनकेतन मदनाचें प्रतिबिंबच भासत असत.

सागराच्या प्रभावानें मेघ विश्वाला आनंदप्रद होतात त्याप्रमाणें त्याच्याकडे येणारे याचक इतर याचकांना पोसण्याला समर्थ होऊन जात.

तो राजा मोठा उदार. केवळ कनकवर्षी होता. त्याचा प्रसाद झालेले गायक व वादक राजे लोकांशीं स्पर्धा करण्याइतके श्रीमान झाले. तो स्वतः विद्वच्चूडामणी होता. त्याने विद्वान पंडितांना रत्नालंकारमंडित केलें होतें आणि त्यांना पालख्या, रथ, घोडे, छत्र, वगैरे वापरण्याचे बहुमान अर्पण केले होते.

बिल्हण कवि, कलशाच्या काळीं काश्मीरातून कर्नाटक भूपति परमार्डी याच्याकडे गेला होता. त्याला परमार्डीनें आपल्या दरबारीं विद्यापति नेमून, त्याचा बहुमान केला होता. शिवाय कर्नाटकातील पहाडी प्रदेशांत हत्तीवरून फिरताना, त्यालाच तेवढा , राजापुढें छत्र वापरण्याचा मान मिळालेला होता. औदार्य, दातृत्व व कविबांधवत्व, याविषयींची हर्षदेवाची कीर्ती ऐकून, बिल्हण कवीला तिकडले तितकेहि ऐश्वर्य तुच्छ वाटूं लागलें होते.

( ९३५–३७ या श्लोकांचे महत्व प्रथम डॉ. बुल्हर यांच्या लक्षांत आले. त्यांचा त्यांनीं आपल्या विक्रमाकदेवचरिताच्या प्रस्तावनेंत उल्लेख व तपशीलवार विचार केला आहे. पूर्वीच्या कलकत्ता येथे छापलेल्या राजतरंगिणीच्या आवृत्तींत बिल्हणाच्या जागीं रिल्हण हा अपपाठ असल्यामुळें त्याचा बिल्हणाशीं असलेला संबंध लक्षात येणें शक्य नव्हतें.

डॉ. बुल्हरसाहेबानी आपल्या प्रस्तावनेत बिल्हणाविषयींची सर्व उपलब्ध माहिती दिली आहे.

कर्नाटकच्या चालुक्य राजघराण्याची राजधानी कल्याण येथें होती. तेथील राजा त्रिभुवनमल्ल विक्रमादित्य, याचें परमार्डि हें बिरूद–पदवी–होते तो ई स. १०७६ ते ११२७ पर्यंत गादीवर होता. त्याचेंच चरित्र बिल्हणाने विक्रमाकदेवचरित, या नांवानें वर्णिलें आहे.

बिल्हणाला मिळालेल्या बहुमानाचें त्यानेंच त्या चरित्रांतील १८ व्या सर्गाच्या १०१ व्या श्लोकांत वर्णन केले आहे त्यात त्याने आपणाला चालुक्य राजानें विद्यापति ही पदवी, एक मस्त हत्ती आणि निळें छत्र वापरण्याचा मान दिल्याचें लिहिलें आहे.

बिल्हण काश्मीरातून कलश राजाच्या वेळीं गेल्याचे लिहिलें आहे. तें महत्वाचें आहे. तो काल म्हणजे कलश ई. स १०६३ ते १०८१ पर्यंत केवळ नांवाचा राजा होता तोच धरला पाहिजे. पित्याच्या पश्चात् तो खरा राजा झाला, तेव्हांचा नव्हे. )

त्या हर्ष राजाच्या अनेक राजधान्यांमध्यें कितीतरी गगनचुंबी व शिखरभाग सुवर्णामलकांनी सुशोभित असलेले राजवाडे होते. त्यानें तयार करविलेलीं उपवनें नंदनवनाशीं स्पर्धा करीत. स्वतःच्या औदार्यानें त्यानें कल्पवृक्षांना लाजविलें असल्यामुळें त्या

उपवनांमध्यें, सर्व तऱ्हेचे वृक्ष असूनहि कल्पवृक्षाची तेवढी उणीव होती. त्यानें पंपा नांवाचें एक विस्तीर्ण व सुंदर सरोवर तयार करविले होतें. त्यांच्यांत अथांग पाणी असून, त्याच्या भोंवतालच्या प्रदेशांत नाना जातींचे खग व मृग वास करीत होते. त्याचा विस्तार क्षितीजाला जाऊन भिडला होता. (९४०) ( हें सरोवर हल्लीचे थळलेलें पंबसर नांवाचें सरोवर असावें. तें पटणाच्या पूर्वेस ,ुंड इब्राहीमपर्यंत पसरलेले आहे. )

त्या राजाला अवगत असलेल्या विद्या व कला, यांची नांवनिशी वाचस्पतीला तरी सांगतां आली असती किंवा नाही कोण जाणे. तो स्वतः काव्ये करी. त्यानें रचिलेलीं पदें ऐकत असतांना प्रेमनिर्भर होऊन, त्याच्या शत्रूचे सुद्धा नेत्र सजल होत असत. तो नेहमीं आनंदांत काळ काढी. तो दिवसां दोन प्रहर निजे व रात्रीं जागत काम करी. त्यावेळीं त्याची राजसभा सहस्रशः दीपांनी प्रज्ज्वलित व शोभिवंत दिसे. तेथे तो विद्वान् लोकांच्या बैठकीत, त्यांचा वादविवाद ऐकत, त्यांच्याशीं संभाषण करीत आणि गीत व नृत्य ऐकत व पहात, रात्रीच्या रात्री घालवी. त्या संभाषणाला खळ पडे तेव्हां तेथे तांबूल-चवर्णाचा व स्त्रियांच्या केशकलापांतील शेफालिका पुष्पांचा मनोहर मर्मर शब्द ऐकूं येत असे.

तो राजसभेचा मंडप, वरील वितानामुळे अभ्राच्छादितसा, दीपांमुळें आगीच्या ताटव्या-सारखा, सुवर्णदंडामुळें विद्युक्त, असिलता मंडळामुळें सधूम, कमनीय कांतामुळे अप्स-रांनीं युक्त, मंत्र्यांमुळें सनक्षत्र, विबुधांमुळे ऋषिगणयुक्त आणि गायकांच्यामुळें गंधर्वयुक्त भासत असे. त्या स्थळात धनद व कुबेर व दंडधर यम, यांची जणों कायमची बैठक होती. तेथें दान व भय या दोहोंचें साधारण, असें क्रीडास्थान होतें. तेथील शोभा व वैभव इंद्रसभेच्या वैभवालाहि मागें टाकीत होतें. या सर्वांचे यथार्थ वर्णन बृहस्पतीच्या वाणीला–प्रत्यक्ष सरस्वतीला–हि करतां आलें असतें किंवा नाही कोण जाणें.

त्याकाळीं त्या राज्यांत सर्व व्यवहारांत सोन्या रुप्याच्या दीनारांचाच उपयोग विशेषतः होत होता. तांब्याचे दीनार क्वचितच दृष्टी पडत. (९५०) सुन्न याला दंडनाय-कांचें काम मिळाले होतें. त्याची यावेळीं सर्व तऱ्हेनें भरभराट झालेली होती. तरी तो फारच कंजूष होता. त्यानें बांधविलेलें जयवन, सुर्यमूलक व विजयेश्वर येथील मठ, त्याच्या कृपणतेची साक्ष पटविताहेत. त्यानें त्यांची कांहींच व्यवस्था केली नव्हती. क्षुधित, व्याधिग्रस्त, अनाथ, दीन दुबळे, अशांच्या दुःखाचें निवारण, पद्म याच्या, राजासारख्या संपत्तीच्या द्वारें होत असे. यामुळें ती त्याची संपत्ति कृतार्थ झाली होती. तसेच चंपक हा प्रतिवर्षी सात दिवस नंदिक्षेत्रांत पुष्कळसा खर्च करून, मध्यंतरीं मिळालेली स्वतःची संपत्ति, सार्थकी लावीत असे. तो राजा दुःखी कष्टी लोकाचे कष्ट निश्शेष निवारण करीत असे. त्यानें उभयमुखी–वीत असलेल्या–गायी, कृष्णाजिनें वगैरे दानें देऊन द्विजाचे दारिद्र्य दूर केलें होतें.

शाहि कुलांतील राजकन्या वसंतलेखा राणीनें नगरांत आणि पवित्र अशा त्रिपुरे-श्वरीं, मठ व अग्रहार स्थापन केलें.

याप्रमाणें त्यावेळीं त्या दरबारांत जणों कांहीं अंशीं माहेश्वरी प्रभावाची एक कलाच उद्भुत होत म्हणावयाचें. तरी त्याची कारकीर्द उदात्त कर्मांनीं शोभिवंत झाली होती, असें कांहीं म्हणतां येत नाहीं.

पुढें नवे नवे मंत्री नेमले गेले. ते हळूं हळूं प्रबल झाले. तसे त्यांनीं पूर्वीच्या अमात्यां-विषयीं राजाच्या मनांत अविश्वास व तिरस्कार पैदा केला.

पायाला कुष्ट असलेला शिखी-वेगानें धांवणाऱ्या-अनंतपाद अशा अहींना-सर्पांना-भरतो. सहस्रपाद सूर्याला अनुरु-अरुण-चालवितो. प्रबलांना दुर्बल ठकवितात. आणि असमर्थ लोक सर्व सत्ताधारी समर्थ सचिवांना संभ्रमांत टाकतात. हे सारे दैवाचे खेळ होत. यामुळेंच तो नरेश सर्व शास्त्रें व कला यांच्यांत प्रवीण व प्रौढ असूनहि मूर्ख मंत्र्यांनीं त्याला मोह पाडला. ( ९६० ) त्यानें पित्याच्या वैराचा सूड उगविण्यासाठीं त्या पित्यानें स्थापन केलेले मठ व राजधान्या वगैरे स्मारकें लुटून नाहींशीं केलीं. आपल्या औदार्याच्या भरांत त्यानें, आपल्या लोभी पित्यानें सांठविलेला सारा खजिना दोन्ही हातांनीं उधळला. त्यानें बापाला पापसेन असे नांव दिलें ! त्याच्या बुद्धीला भ्रंश होऊन, त्यानें अंतःपुरांत कसल्या तरी तीनशें साठ स्त्रिया आणून कोंडल्या होत्या. त्यांच्यांत डोंब व चांडाळ जातींच्या स्त्रिया भरती होत नव्हत्या एवढीच कृपा होती !

या सुमारास भुवन राजानें गडकऱ्यांना गुप्तपणें उत्तेजन देऊन, लोहर घेण्याचा उद्योग चालविला होता. तो दर्पितपुरास पोंचला तोंवर द्वारपति कंदर्प आडवा येत असल्याचें ऐकून, तो पुनः दबून राहिला.

याचवेळीं राजपुरीवाला संग्रामपालहि कांहीं कारणामुळें बिथरून उन्मत्त झाला होता. कंदर्प फितलेल्या गडकऱ्यांचा बंदोबस्त करीत होता. म्हणून राजानें राजपुरीवर दंडनायक सुम याला मोठ्याशा सैन्यासह लोहरच्या मार्गानें धाडलें. तेथें तात्काल पोंचणें अवश्य असतांना त्यानें वेडेपणानें लोहरकोटच्या आसपास दीड महिना व्यर्थ घालविला. पुढे शुचि-आषाढ-मासचे उष्णकाळाचे दिवस येऊन ठेपले आणि शत्रूचा जोरहि जास्त दिसला. म्हणून त्यानें त्रासून व भिऊन पुढें वाढण्याचा नाद सोडला. (९७०) राजानें याविषयी विचार न करतां कंदर्प स्वस्थ बसला होता त्यालाच दोष दिला.तेव्हां कंदर्पानें राजपुरी घेतल्यावांचून अन्नग्रहण करावयाचें नाहीं अशी प्रतिज्ञा केली आणि तो सामानसुमानाची विशेष तयारी न करितांच निघाला. पहाडांच्या दऱ्या खोऱ्यांमध्यें त्यानें पांच दिवस उपास काढले व सहावे दिवशीं तो राजपुरीच्या अलीकडे सुमारें एक योजनावर पोंचला. (लोहराहून राजपुरी सूष्ण व ठाण यांवरून चार मजलीवर आहे. ) शत्रूच्या फौजेला दाद न देतां व त्याच्या शस्त्रास्त्रांची पर्वा न करतां, हाण मार करीत तो, सिंह कदली दले चुरडीत वनांत शिरतो, तसा राजपुरींत घुसला. दंडनायकाच्या सैन्यांतून काय तो बुद्ध राजाच्या कुलांतील सेनानायक कुलराज, हाच त्याच्याबरोबर होता. त्यानें मोठा पराक्रम केला व शत्रूचे पुष्कळसे लोक मारले. पण राजपुरींतील राजवाड्यापुढील अंगणांत तो पडला. त्याच्या श्वेत छत्रावरून त्याला शत्रू, कंदर्पच समजले. पण दुपारीं शूर कंदर्प वीस तीस वीरांसह स्वतः राज-

वाडयांत शिरला. त्याच्या तीनशें शिपायांनीं त्या राजवाडयापुढें, शत्रूची पाठ न दाखविणारी, तीस हजार फौज थोंपून धरली होती. त्या लढाईंत काश्मीरी दोनशें व खशांचे चारशें लोक मारले गेले. याप्रमाणें शत्रूचें सैन्य पराभूत झाल्यावर रात्रभर दूरवर प्रेताच्या राशींना अग्नि देण्यासाठीं त्या रणभूमीवर-मृत्यूच्या पाकशाळेंत-चितामींच्या शेकडों भट्टया पेटविल्या गेल्या होत्या. ( ९८० ) त्या शूर कंदर्पानें या रीतीनें आपल्या धन्यानें अविचारानें व रागानें उठविलेला उपालंभरूपी वेताळ, त्या रणभूमीरूपी स्मशानांत, मांस व शोणीत समर्पण करून तृप्त केला. प्रहर दिवस उरला असतांना पूर्वीच्या पराभवानें संतप्त झालेल्या शत्रूनें पुनः कंदर्पावर उठावणी केली. त्यांच्यावर कंदर्पानें औषधियुक्त तेलानें माखलेले नाराच बाण सोडले. ते लागून त्यांचीं वस्त्रें पेटत व चोहींकडे प्रकाश पडे. त्यावरून कंदर्पाला आग्नेय अस्त्र अवगत आहे, असें त्या गांवढळ शत्रु सैन्यांतील लोकाना वाटलें व ते घाबरून पळून गेले. त्यांना आपण व्यर्थ परत हल्ला करण्याला आलों असें वाटलें.

ओज, प्रगल्भ प्रभाव, प्रतिभान, प्रयोगचातुर्य आणि असंभ्रम, हे गुण बिकट प्रसंगीं मोठ्या लोकांना सोडीत नाहींत, यामुळेंच त्यांना धीर राहतो.

कंदर्प राजवाडयांत परत आला तोंवर बाहेरच्या भागांत पुनः पुष्कळ शत्रूचे लोक जमा झालेले दिसले. त्यांच्याशीं लढण्याला तो निघणार तोंच, दंडनायक आल्याचें त्याला कळलें. त्याचे लोक समरभूमीवरील घोर व भयंकर प्रकार पाहून, भिऊन लपून बसले होते. कांहीं लोकांना आपल्या बाजूचे लोक पडलेले पाहून अधिक चेंव येतो तर, कांहींना शत्रूकडील मेलेले लोक पाहून थरकांप सुटतो. मनुष्यस्वभावांतील हा फरक कोणाला कळणार ?

नंतर कंदर्पाने जाऊन दंडनायकाला राजपुरींत आणलें. त्याची भीतिमुळें गाळण उडाली होती. हंसाशीं स्पर्धा करीत समुद्रांत बुडी मारणाऱ्या काकाला, हंसानें बाहेर काढावें तशांतलाच हा प्रकार होता.

प्रजा राजनिष्ठ, सैन्य जय्यत व एक मेळाचें आणि खजीना भरपूर असलेल्या या राजपुरीच्या राज्यावर केवळ स्वतःच्या पौरुषाच्या भरंवशावर चढाई करून जाण्याची कंदर्पाशिवाय दुसऱ्या कोणाची हिम्मत असणार ? ( ९९० )

नंतर राजपुरीचा राजा शरण आला. त्याच्याकडून खंडणी घेऊन कंदर्प एक महिन्यांतच स्वस्थानीं परत आला. त्याला मोठ्या थाटानें व सर्व लवाजम्यानिशीं सामोरें जाऊन, राजानें त्याचा सत्कार केला. हें पाहून दंडनायक व तत्पक्षीय मंडळीचा कपाळशूळ उठला.

परिहासपूर येथील व्यवस्थापक आनंद हा भारी दुष्ट व क्रूर होता. म्हणून तिकडील पारिषद्य ब्राह्मणांनीं त्याला वातगंड हें नांव दिलें होतें. पुष्कळशा लांच खाल्लेल्या मंत्र्याच्या शिफारशीवरून, त्याला राजानें ब्रामन मंत्र्याच्या जागीं पादाग्राचे अधिकार दिले होते. त्याला द्वारपतीची जागा पाहिजे होती. कंदर्पाच्या विरुद्ध असलेल्या मंडळीची त्याला

पुष्कळ मदत होती. लोहराच्या आसपास राजाच्या शत्रूंनीं बंड केलेलें पाहून, राजानें आनंदाच्या प्रेरणेनें, कंदर्पाला तिकडील मंडलेश नेमून पाठविलें. कंदर्प पराक्रमी, तसाच हुषार व कारस्थानीहि होता.

स्वतःच्या उदयाला सवड सांपडावी म्हणून, त्या दुष्ट विरुद्ध मंडळीने त्याला त्या मूढ राजाजवळून दूर केलें होतें. मूढ व अजाण राजे, पोक्त विचार न करतां लबाड व मतलबी लोकांच्या चिथावणीनें विद्वान व वक्ता अशा मंत्र्याला जवळ ठेवण्या ऐवजीं, तो वकीली चांगली करील म्हणून त्याला बाहेर पाठवितात. आपाशीं वाकडे व्हावे लागेल म्हणून शहाण्या माणसांचा त्याग करतात आणि तो आपले राज्य बळकावील म्हणून प्रबल मंत्र्याची साथ सोडतात. अशा त्या मूर्खराजांना लौकरच पस्तावावे व नाश पावावे लागते.

कंदर्प दूर गेल्यामुळें त्याच्यावरील राजाचें पूर्वीपासून असलेलें प्रेम मुठींत धरलेल्या वाळूप्रमाणें गळून गेलें. विरुद्ध पक्षानें त्याला सांगितलें कीं, 'कंदर्प हा उत्कर्षाच्या मुलाला लोहरचा अधिकारी बनविणार आहे.' (१०००) हें खरें मानून, राजानें कंदर्पाला ठार मारण्यासाठीं मंत्री पट्ट आणि तक्कदेशीय असिधर, यांना सैन्यासह पाठविलें. ही गोष्ट कंदर्पाला तिकडून आलेलें एक पत्र चुकून हातीं लागल्यावरून कळली. त्यावरून त्याला कांहीं काळ विस्मय वाटला. ते दोघेहि आले तेव्हां तो सोंगट्या खेळत बसला होता. असिधरानें त्याच्या पुढें नोकराप्रमाणें येऊन, त्याला कैद करण्याची राजाची आज्ञा असल्याचें कळविलें व त्याचा हात धरला. तसा कंदर्पानें त्याचा हात नुसता एका बोटानें रगडला. त्यामुळें त्याचें चामडें सोलून, तो पंख उखडलेल्या पाखराप्रमाणे विकल झाला. त्यांना कंदर्पानें रागानें म्हटलें, 'महाराजांना माणसाची पारख नाहीं. त्याच्यावर दुसऱ्यांचा पगडा आहे. त्यांनी माझी मुलें माणसे मजकडे पाठवावीं, म्हणजे मी हा किल्ला खालीं करून देशांतराला जाईन.' पुढें मुलें माणसें आल्यावर कंदर्प किल्ला स्वाधीन करून वाराणशीला गेला. त्यानें गयेमध्यें, तेथील एका सामंताला—गयावलाच्या मुख्याला—मारून, त्याच्या जागीं दुसऱ्याची स्थापना केली आणि त्या योगाने काश्मीरी लोकाना गयेस श्राद्ध करतेवेळीं गयावळ त्रास देत असत तो त्यांचा त्रास मिटविला. ( अशीच गोष्ट पुढें पेशवाईंत पटवर्धन सरदारांनी केल्याची आख्यायिका आहे. लेले.) तसेंच त्याने तिकडे सैन्यासह जातांना कठिण मार्गांत, चोर व लुटारू यांचे नायक यात्रेकरूंना त्रास देत असत, त्यांचा फडशा पाडून, तो मार्ग मोकळा केला. वाराणशींमध्येहि त्याने एका वाघाला मारून, लोकांची पीडा नाहींशी केली आणि तिकडे अनेक धार्मिक कृत्यें करीत व मठ वगैरे बांधवीत राहून त्यानें त्या पूर्व दिग्भागाला शोभा आणली. ( १०१० )

कंदर्पाला काढून देऊन आपला मतलब साधल्यावर ते दुष्ट मंत्री लौकरच एकमेकांचा मत्सर करीत आपसांत भांडूं लागले. यामुळें राज्यकार्याचा नाश होऊं लागला. यथेच्छ आहार मिळून मातलेले मेंढे शिंगांची खाज जिरविण्यासाठीं परस्पर टक्करा मारीत सुटतात आणि मधल्या खांबाचा चेंदा होतो.' तसे मनसोक्त ताव मारण्याला मिळालेले, ते मतिभ्रष्ट मंत्री अपसात भांडूं लागले. तेव्हां त्या राज्याची त्या खांबासारखीच स्थिति झाली.

पुढें राजद्रोही व राज्य मिळविण्याची इच्छा धरणारा धम्मट, यानें राजाला मारविण्याचा बेत केला. तो फार कुटिलबुद्धि होता. आपल्यावर या राजद्रोहाचा आक्षेप येऊं नये म्हणून, त्यानें पुष्कळसा विचार करून राजाचा खर्चा बंधु जयराज, याला हे काम करण्यासाठीं चिथवून तयार केले. या कामासाठी जय राजाने बिलाव ग्रामाहून कांही-तीक्ष्ण-मारेकरी मागविले, व अंतःपुरांतील दोघी तीघी बायकांनाहि फितविलें. पण त्यांचा तो दुष्ट बेत अमलांत येण्याच्या संधीला, सुदैवाने राजानें धम्मटाला, बहुमानपूर्वक, राजपुरीला वकील नेमून पाठविण्याचें ठरविले. धम्मट शुभ मुहूर्तावर सहस्रमंगलाच्या घरीं प्रस्थान ठेवून रहात असताना, आपला कट व्यर्थ जाणार, अशी शंका वाटून, जयराज धम्मटाकडे गेला. दोघेहि याविषयीं गुप्तपणें बोलत असतांना, त्यांचें तें भाषण, भितीआड असलेल्या प्रयागाच्या एका नोकराने ऐकले व प्रयागकाला आणि त्यानें राजाला कळविलें. तसें राजाने धम्मटाचे जाणें रहित करविले. (१०२०). राजाला आपल्या त्या आप्ताना मारविण्याची भीति वाटली व त्यानें स्वतःच्या रक्षणाची तजवीज कशी बशी केली. यात कांही दिवस गेले. तोंवर जयराजाने आपला बेत फसलेला पाहून, शमालाहून पाज व वाज नांवाच्या शूर व प्रबल डामरांना बोलावून घेतलें. पण त्याचे सेवक फुटले व त्यानीं, तो निघून जाणार असल्याचें राजाला कळविलें. तेव्हां राजानें रात्रींच चोहीकडे पाहारे बसविले.

सकाळीं धम्मट रवाना होण्यासाठीं म्हणून बाहेर पडला आणि जयराजाला बरोबर घेऊन तो राजाकडे चतुष्क मंडपांत गेला. त्याची दारे बंद होतीं म्हणून धम्मट आपला पुतण्या व जयराज यांच्यासह आस्थान मंडपात पोहोंचला. त्याच्या भोवतालीं, राजाच्या आज्ञेनें, प्रयागानें रक्षक आणून ठेवले आणि हळूंच धम्मटाला, जयराजाला कैद करण्यास सांगितलें. यांत त्या चतुर व कारस्थानीं राजाची अशी योजना होती कीं, धम्मट कैद करण्याला गेला असतांना त्याच्या विश्वासावर जयराज बहुधा शस्त्र टाकील. त्यालाच हे नाजुक काम सांगितल्यावरून धम्मटालाहि राजाच्या मनात आपल्याविषयीं शंका आलेली नाही असें वाटेल. कदाचित दोघांचें भाडण झालें व त्याच्यांत कोणीहि किंवा दोघेहि पडले तरी बरेंच झाले आणि तें अपसांत मिळाले तर, त्यांना पकडून ठार मारविण्याबद्दल लोकांना आपणाला नांवें ठेवतां येणार नाहींत.

कटासंबंधांत राजाला आपला संशय नाहीं अशी धम्मटाला खात्री वाटली व त्यानें जयराजाला प्रतिष्ठितपणें म्हटले, ( १०३० ) 'महाराज आपल्यावर नाराज आहेत. आपण खरे निरपराधी असला तर, खात्रीसाठीं आपली तरवार द्या. ' जयराज हा चांगला पटाईत तरवारबहाद्दर व धनुर्विद्येंत निष्णात होता, पण त्यानें दुर्दैवाने, धम्मटाच्या विश्वासावर, सामान्य माणसाप्रमाणें तरवार स्वाधीन केली. त्याची ती विकल स्थिति पाहून, तन्वंगाचा नातु अज्जकाचा पुत्र टक्क यानें त्याचा धिक्कार केला व त्याला कठोरपणानें म्हटलें, 'कलश राजानें कन्येच्या पोटीं पैदा केलेले आपण दिसत नाही. तुम्ही कोणा यःकश्चित क्लीबाच्या बीजाचे असाल. नाहींतर असा नेभळेपणा कधीं करतांना.' टक्क हा धीर, आत्मविश्वासी

व बाणेदार होता. त्याचे हे शब्द जयराजाला, झोंपेंत बर्फाचें पाणी अंगावर टाकल्याप्रमाणें झोंबले.

पुढें त्याला कैद केलें व त्या कटाविषयीं विचारलें गेलें. तेव्हां त्यानें दुस्सह यातना व क्लेश भोगीत असतांनाहि मोठें धैर्य दाखवीत, धम्मटाचें नांव न घेतां, सर्व कांहीं आपणच केल्याचें सांगितलें. त्याला विष दिलें गेलें. पण त्याला विषघ्न मंत्र येत होता. यामुळें तें लागू पडलें नाहीं. तेव्हां त्याला रात्रीं गळफासानें ठार मारविण्यांत आलें. प्रतिहार अध्यक्ष, यानें त्याचा शिरच्छेद केला व त्याचें धड भट्टारनडवलामध्यें टाकलेलें मासाच्या भक्ष्यस्थानीं पडलें. ( भट्टारनडवल हल्लींची ब्रारिनबल नांवाची झील. तिच्यांत मार-महासरित-चें पाणी येतें. ती झील श्रीनगराच्या आग्नेयीस दिलावरखानाच्या बागेसमोर आहे. ) ही गोष्ट लौकिक वर्ष ४१७१ (ई० सं० १०९५) च्या भाद्रपदांत घडली.

नंतर राजानें धम्मटाचा समाचार घेण्याचा विचार चालविला. राजा मोठा पाताळयंत्री होता. लोहरचा ठक्कर कलशराज नांवाचा अप्रतिम शूर व धीट सैनिक होता. त्याला राजानें गुप्तपणें बोलावून घेऊन, त्याच्यावर खूप कृपा केली. ( १०४० ) आणि प्रयागाचा निरोप येताच धम्मटाला मारून टाकण्याचें काम करावें, असें सांगून ठेवलें. प्रयागाला हा बेत नीटपणें पार पडण्याची शंका वाटली. म्हणून त्यानें तेव्हांच निरोप न पाठवितां राजा नाराज झाला होता तरी, हें काम मंत्री लोकांची सल्ला घेतल्यावर करावें, असें सांगितलें. त्याप्रमाणें राजा आपल्या पांच मंत्र्यांसह आस्थान मंडपांत या विषयीं विचार करूं लागला. तेव्हां मंत्री वामन यानें आस्थान मंडपाचीं दारें बंद करविलीं. आणि मुख्य दाराला पाठ देऊन उभा राहून, राजाला स्पष्टपणें म्हटलें, 'हा आपला ठराव व हे आपले मंत्री येथून बाहेर पडण्यापूर्वी तो अमलांत आला तरच, कार्यसिद्धीला अडचण पडणार नाहीं'. तेव्हां राजानें आज्ञा केल्याप्रमाणें प्रयागानें कलशराजाकडे दूताहातीं निरोप पाठविला. त्याप्रमाणें कलशराज व त्याचे दोघे पुत्र धम्मटाचा खून करण्यांसाठीं निघाले. त्यावेळीं धम्मट आपल्या दोन तीन सेवकांसह ससाण्यांना ऊन देववीत बसला होता. कलशराज आपल्या पुढे व त्याचे पुत्र आपल्या मागे हत्यारबंद आलेले पाहून तो भ्याला व साशंक झाला. तो सेवकांना कांहीं सांगणार, त्यापूर्वीच ते त्याला सोडून निघून गेले. तो उठून तरवारीला हात घालतो तोंच कलशराजानें व त्याच्या पुत्रांनी पुढून व मागून त्याच्यावर वार केले. त्याने गडबडीनें कलशराजाच्या वडील पुत्रावर तरवार चालविली. पण दुर्दैवानें त्याची तरवार तुटकी व वाईट असल्यानें त्याला विशेष जखम झाली नाहीं. (१०५०) राजाच्या आज्ञेनें श्वपाकांनीं त्याचें प्रेत उताणें टाकवून कुत्र्यांकडून खावविलें.

त्याच सुमारास राजा खालीं अंगणांत आला व त्यानें तन्वंगाचे नातू रल्हण व मल्हण यांनीं तरवारी खालीं ठेवल्या होत्या, त्यांचें रक्षण केलें. टुल्ल वगैरे लढण्याला तयार होते. ते हल्ला करणार इतक्यांत लबाड उदयसिंहानें तेथें पोंचून त्यांना, तुम्ही माझ्या मुलांसारखे आहां असें बोलून फसविलें. ते त्याला इमानदार समजले व जीव वांचविण्यासाठीं त्याच्यावर विश्वासून त्यांनीं शस्त्रें टाकलीं. त्याच्या सांगण्याप्रमाणें

ते राजाकडे जाऊन आपली सफाई करण्यासाठीं निघाले. तन्वंगाच्या घरींच लहानपणापासून त्याच्या उष्टयावर पोसलेला टुल्लाचा एक छत्रधारी होता. त्यानें त्याला हंसत म्हटले. ' अहो तन्वंगाचे नातू टुल्ल, आपण नुकतेच जयराजाला काय बोलला होता ते विसरलात? आपणावरहि तोच प्रसंग आहे. धैर्य सोडून मूर्खासारखे हे वैक्लव्य तुम्हांला कोठून आले? तुम्ही माझ्या उच्छिष्ट भोजी पित्याच्या पोटचे आणि मी प्रथित यश व वीर अशा कलश महाराजाच्या पोटचा असलो पाहिजे.' नंतर त्याने जणो ज्वलज्ज्वाल खड्गाच्या मंडपांत शिरून युद्ध केले. ( १०६० ) टुल्ल वगैरे राजवाड्याकडे जात असताना त्याना राजसेवकानीं धरून कैदेत टाकले. ते यावेळीं यौवनभरामुळें वासंतिक वृक्षाप्रमाणें प्रफुल्लित दिसत होते. त्याला पाहून राजाला करुणा आली व त्याना जीवदान द्यावे असे त्याला वाटले. पण तक्क देशीय बिबिय याने त्याचे मन फिरविले आणि टुल्ल, कुल्ल, गुल्ल व विजयराज, या चौघाहि तन्वंगाच्या नातवाना एकदमच वधस्थानी नेऊन फांशी देवविण्यांत आले. मेल्यावरसुद्धा ते सुंदर व प्रेक्षणीय दिसत होते. अद्यापिहि पूर्वीच्या गोष्टी सांगत असतांना, वृद्ध वृद्ध लोक त्याच्या मरणोत्तरहि दिसत असलेल्या सौंदर्याची तारीफ करतात तेव्हां त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहिल्यावाचून राहात नाहींत. सतत तांबूलचर्वणाने लाल झालेल्या त्यांच्या दंतपंक्ती, त्या वध्यभूमीत बरेच दिवस, माणकाचे सर विखरल्यासारख्या दिसत होत्या.

राजाने स्वकुलाचा उच्छेद करीत स्वत च वाढविलेला उत्कर्ष राजाचा वडील पुत्र डोंब याला, त्या राजानेच वाढविलें होते, त्याला तसेंच विजयमल्लाचा पुत्र लहानगा, हुषार व चपल जयमल्ल, यालाहि अग्निकणासारखे समजून गुप्तपणे ठार मारविलें.

दुर्दैवग्रस्त राजे आपल्या राज्याला आधारभूत अशा सर्व आप्तांना प्रतिस्पर्धी समजून मारून टाकवितात आणि त्या योगाने राज्य निष्कंटक केले, असे समजतात. पण परिणामीं पुढे ते राज्य भलताच कोणी बळकावतो. ( १०७० ) अश्वत्थ वृक्ष आपल्या गर्द फांद्यांच्या छायेत वाढलेले मोठं थोरलें मधाचे पोळे कोणातरी भाग्यवानाला त्रास न पडता काढता यावें म्हणून त्या फांद्या आपणच हलवूं लागतो आणि त्या पोळ्याचे रक्षण करणाऱ्या मधुमक्षिकाना उठवून आपल्या पडत्या पानाच्या तडाक्यानें मारून टाकतो.

ज्ञातिद्रोहरूपी महापातकामुळे मतिभ्रष्ट झालेल्या त्या राजाला, लुच्चा लफंग्यांनीं, या बाबतींत इतके भारून टाकलें होते की, त्यानें लहान लहान अर्भकेंसुद्धां मारून टाकवून त्याना कीटकांच्या भक्षस्थानीं टाकविले. या गोष्टी कोणा वेड्या खुळ्यालासुद्धा खऱ्या मानता येणार नाहीत.

वामन मंत्र्याचा पुत्र क्षेम यानें, राजाला त्याचा पिता कलशराजा, याची भारी चीड आहे असें जाणून, कलशेश्वराच्या शिखरावरील सुवर्णछत्राचे सुवर्ण काढून घेण्याचें सुचविलें. पण मस्त हत्ती बेफाम होऊन धांवतां धांवतां कड्यावरून पडण्याच्या ऐन सुमारास धीट व हुषार माहुत त्याला रोकतो, त्याप्रमाणें प्रयागकानें एकांतिक भक्तीने व सेवाधर्माला जागून मोठ्या युक्तीनें हा त्याचा बेत हाणून पाडला. नष्टचेष्ट प्रेतांत प्रवेश कर-

ण्यांत बेताल कुशल असतो. त्याप्रमाणें तत्सम अशा राजांच्या चित्तामध्यें प्रवेश करण्यांत, लबाड विटें लोक कुशल असतात, अशांपैकी हलधराचा नातु लोष्ठधर यानें एकदां राजाची मर्जी प्रसन्न पाहून, त्याला अधिकच खुलवीत एकांतात म्हटलें की, ' कलशेश्वराकडे लावून दिलेलें गांव आणि तेथील सुवर्ण व इतर मालमत्ता हरण करा. त्या मंदिराच्या दगडानीं मी वितस्तेवर सुरेख पूल बांधवून देतों. '

मी गगनतलावर सुरेख चित्र काढतो. बिसिनी सूत्राचें–कमलतंतूंचे–उत्तम वस्त्र विणून देतों, स्वप्नांत पाहिलेले सुवर्ण काढून देतों, बर्फाचें भक्कम कोट बांधून देतों, असल्या गोष्टी कोणी धूर्तानें सांगितल्या तर, त्या देखील मूढ व जडबुद्धि राजे खऱ्या समजतात. अशा गोष्टी ज्याला कळत नाहींत व त्यांच्याविषयीं जो योग्य विचारहि करीत नाही, त्यांची बुद्धि अधिक असते व तो फसतो हे योग्यच होय. अशाच तऱ्हेवर त्याच्या राज्यांतलि एका तलावांतून खरी मोत्यें पैदा करवून देण्याचे एका चतुर कामगाराने सांगितलेलें खरें मानून त्या प्रीत्यर्थ लक्ष रुपये खर्चास दिल्याचे एका आधुनिक नांवाजलेल्या महाराजाचें उदाहरण प्रसिद्ध आहे लेले. )

चांगली रुग्णपरिचर्या जाणणारा मनुष्य कुपथ्य करूं पाहणाऱ्या रोग्याचें त्याच्यापासून मन वळवितो त्याप्रमाणें प्रयागानें आपल्या प्रभूचे मन या गोष्टीवरूनहि परावृत्त केले. नंतर एकदां गोष्टीवरून गोष्टी चालल्या असतांना लोष्ठधराने हंसत हंसत राजाला म्हटलें, ' महाराज, एक देव बंदींत पडलेला आहे. त्याला तर बंधमुक्त करा, ( १०८० ) हे ऐकून राजाने किंचित स्मित करीत विचारलें, ' अरे तूं हें म्हणतोस तरी काय ?' त्यावर लोष्ठधरानें पुनः विनंति केली, पूर्वी उदभाडपुरांत भीमशाही नांवाचा राजा होता.त्यानें कलशदेवाच्या राज्यांत भीमकेशव देवाची स्थापना करविली. त्या मंदिरांतील पुरोहित व पारिषद्य यांच्यांमधील वादावरून त्या मंदिराच्या दाराला कुलूप लावले गेलें होते. पुढें वादाचा निकाल झाल्यावर दार उघडून पाहतां देवाचे रुप्याचें कवच चोरीस गेले होते. तेव्हांपासून चोरीच्या भीतीने त्या मंदिराचे दार सारखें बंद आहे व त्याच्यातील खजीना व होमहवनाची व पूजे-अर्चेचीं पात्रें,अद्यापि कुलुपातच आहेत. तेव्हां चोराची भीति असलेले ते जिन्नस काढून घ्या व त्या बिचाऱ्या देवाची कैदेंतून सुटका करून त्याला पुष्पपूजा धूपदीपादिकांचा उपभोग घेऊं द्या. त्याप्रमाणे राजानें लौकरच व्यवस्था केली. त्या मंदिरांतून किती तरी सुवर्ण रत्नादि खजीना राजाला मिळाला. अशा बंद केलेल्या मंदिरांतून व इतकी संपत्ति सांठविलेली, तेव्हां इतर मोठमोठया मंदिरांत ती पुष्कळच असावी, असे त्याला साहाजिकच वाटलें. त्या संपत्तीऐवजी पुरोहित व पारिषद्य यांनीं प्रायोपवेशन करून आपल्यावरील भार वाहून नेण्याची बेगार बंद करवून घेतली.

त्या राजाला सैन्याच्या निरनिराळया विभागांवर अतोनात खर्च करण्याचे जसें व्यसन लागलें होतें, त्यासाठीं मंदिरांतून सर्व संपत्ति लुटून आणण्याची त्याला चट लागली. त्यानें सर्व मंदिरांतून पूर्वीच्या राजांनीं अर्पण केलेली, कल्पनातीत संपत्ति लुटून आणविली ( १०९० ) याशिवाय त्यांच्यातील धातूच्या मूर्तीहि काढून आणविण्याचें काम त्याने देवतोत्पाटण नायक, उदयराज, याला सांगितलें. त्या देवतांच्या मूर्ती भ्रष्ट करविण्यासाठीं उदयराज त्यांच्यावर नाक, कान, पाय, रक्तपितीनें सडलेल्या नग्न भिक्षूंच्या हातून

मलमूत्र विसर्जन करवीत असे. सोनें रुपें व इतर धातू, यांच्या मूर्ती, मलानें भरलेल्या रस्त्यांतून लांकडाच्या ओंडक्यांप्रमाणें ओढविल्या जात होत्या. फुलांच्या ऐवजी त्यांच्या-वर त्या भिक्षुंच्या थुंकीची वृष्टि होत होती. त्यांच्या पायांना दोर बांधून त्या दरादरा ओढल्या जात होत्या !

त्या हर्षरूपी तुरुष्क राजानें राज्यांतील कोणचेहि ग्राम पुर किंवा नगर, यांच्यांतील एकहि मंदिर, तेथील मूर्ती भंग केल्याशिवाय सोडलें नाही. त्याच्या तडाक्यांतून विशेष प्रभाववान म्हणून नगरांतील रणस्वामी आणि इतर पत्तनांतील श्रीमार्तंड या दोनच देवाच्या मूर्ती वांचल्या होत्या. सुदैवानें राजा प्रसन्न व उदार असतांना परिहासपुरांत जन्म-लेला सुप्रसिद्ध गायक कनक आणि श्रमण कुलश्री. यांच्या 'विनंतीला मान देऊन' राजानें बुद्धाच्या प्रचंड अशा दोनच मूर्ती बाकी ठेवविल्या होत्या.

साऱ्या जगाला अद्भुत वाटण्याजोगी संपत्ति प्राप्त झाली असूनहि अधिक मिळवि-ण्याच्या लोभाला बळी पडलेले लोक कोणचीहि दुष्कर्में करण्यात कसर करीत नाहीत.

श्रीपद्मेचे लीलानिवासस्थान, अशीं कमले मिळविण्यासाठी तिचा वाहनभूत हत्ती पुष्करिणीमध्ये शिरुन, त्या पुष्करिणीचा व त्या कमलांचा सत्यानास करण्याचे पातक पदरी बांधून घेत असतो.

हर्ष राजाला, आजा अनंतदेव व पिता कलश यांनी साठविलेली, तसेच बंधु लोहरा-धीश उत्कर्ष याने तिकडून बरोबर आणलेली उमाप संपत्ति मिळाली होती. शिवाय ती वाढवि-ण्यासाठी त्याने पूर्वीच्या राजांनी मंदिरांना अर्पण केलेली संपत्ति, देवस्थाने लुटून आणली होती. तरी त्याने प्रजेवर जुलूम जबरदस्ती करून त्या संपत्तीत आणखी भर टाकण्याची हांव धरलीच होती. ( २१०० ) अशा त्याला धिक्कार असो

त्याची नांवापुरती आज्ञा घेऊन, त्याच्या दुष्ट व नष्ट सचिवांनी नवे नवे त्रासदायक अंमलदार नेमले. त्यांनी नाना प्रकारचे कर वसूल करण्याची काम देऊन त्या अन्वये नांवे दिलेली होती. अशा त्या राजसेवेवर अवलंबून असलेले लोक निवळ वेळ पाहून वागतात. वयोवृद्ध मंत्री गोरक याला अर्थनायकाची जागा मिळाली होती. त्याच्याकडे देवस्थानें व त्यांना लावून दिलेले गांव, यांच्यांतून सर्वस्व लुबाडून आणण्याचे काम होते. समर स्वामीच्या मंदिरांतील पार्षद विजयमल्ल याचा सल्लागार म्हणून सेहल याच्यावर राजाची नाराजी झाली होती. त्याने दुप्पट वसूल केला म्हणून, त्याची राजाकडे पोच झाली. तेव्हा त्यालाहि अर्थ नायकाचे काम मिळाले. याचें आणखी कोठवर म्हणून वर्णन करावें? हर तऱ्हेचे नायक नेमून तो सर्वांनाच लुटीत होता. वसूल वाढविण्यासाठी त्याने पुरीषनायकाचीसुद्धां जागा काढली होती. श्रीगर्भमूलक गर्भश्रीमंतीचे जाडय व काठिण्य अंगीं येऊन, त्या हर्ष राजानें मिळ-विलेल्या त्या संपत्तीचा विनियोगहि तदनुरूपच होत होता. दुर्लभ मृगनयना व अश्व-वाहनें मिळविणें, दुष्ट विटांचीं दुर्वचनें ऐकणे, व वैतालिकांकडून खोटीच प्रशंसा करून घेणें, यांतच बहुतेक राजे लोकांच्या लक्ष्मीचा व्यय होतो प्रियतमाचा कोप व प्रसाद यांविषयींचा तपास व

त्याची समजूत काढणें व सेवकादिकांबरोबर मृगयेसंबंधीं गोष्टी करणें, असल्या पोरकट-पणांत पोरांप्रमाणें तें काल काढीत असतात. विलास, हास, आसन, दान, खात, पानविष-यक त्यांच्या बऱ्या वाईट कृती, बहुतेक परानुकरणरूपच असतात. ( १११९ ) विटांनीं वृथा स्तुति करीत, त्याच्या अंगीं अतिमानुषत्व व पुरुषाधिराजत्व आहे असें म्हटलेलें खरे धरून, ते स्वत ला त्रिनेत्र किंवा चतुर्भुज मानून, प्रत्यक्ष काळाला कस्पटाप्रमाणे मानतात, रात्रीं दारा व दिवसा दिवाणजी, हे त्यांचे नियंत्रण करीत असूनहि ते वेड्यासारखे स्वतःना प्रभु–विष्णु–समजतात ! यापरतें आश्चर्य तें कोणचे ? भूभृत व बालके याचा स्वभाव एक सारखाच. ते मिष्ट भाषण करणाऱ्याला गोड व चांगला समजतात आणि कोणी थुः केले किंवा त्रास दिला की, स्वतः चिडून थू करतात, चिडतात व त्रास देऊं लागतात.

राजे लोकांच्या अंगच्या ज्या ज्या जाड्याचे व मूर्खपणाचे वर त्रोटक वर्णन केले आहे, त्या सर्वांचा या हर्ष राजाच्या अंगीं कळस झालेला होता.

भीमनायक नावाचा एक उत्तम मृदंगवादनपटु होता. त्याच्या वादनावर खूष होऊन राजाने त्याला हत्ती हत्तिणीची जोडी इनाम दिली. चंपकाचा धाकटा बंधु कनक हा गायनकलेंत हर्षाचा शिष्य झाला होता व त्याने या कामीं फारच परिश्रम केले होते म्हणून, प्रसन्न होऊन, राजाने त्याला खुशाल एक लक्ष सुवर्ण दीनार इनाम दिले ! ( हा बहुतेक कल्हणाचा पुतण्या असावा.)

कर्नाटक देशाचा राजा परमार्डी, याची अप्रतिम लावण्यखाणी अशी चंदला –चंद्रलेखा–नावाची एक पट्टराणी होती. तिची तसबीर पाहतांच त्या राजाला तीव्र मदन-बाधा झाली.

नीच व हलकट विट अविचारी राजाना कुत्र्याप्रमाणे चुचकारून वरचेवर चिथावीत व प्रोत्साहन देत असतात.(११२०) अशा रीतीने भरीं भरविलेल्या त्या राजाने भर दरबारात आढ्यतेनें व निर्लज्जपणाने,परमार्डी राजाचा पराभव करून चंदला प्राप्त करून घेण्याची आणि ती पार पडेपर्यंत कच्चा–न शिजविलेला–कापूर सेवन न करण्याची प्रतिज्ञा केली. त्यावरून एका प्रवासी कवीने त्याची व्याजस्तुति, कोणा परस्थाला उद्देशून पुढील अर्थाचे श्लोक रचून, करीत म्हटले की, ' भाषा व वेश यांच्यावरून आपण दक्षिण देशीय दिसता व सुगंधावरून आपल्या हातात कापराचा गोळा असावा असे वाटतें. तो कापूर गळालेला असला तर राजाला नेऊन नजर करा. तसा नसेल तर तो तुमच्यापाशींच राहूं दे. कारण तसला कापूर त्या पलीकडच्या नारळाच्या झाडांतहि सांपडेल. कर्नाटकपति परमार्डीचा वध करून चंदलेची प्राप्ति व तिचें अलिंगन मिळविणें, कल्याणपुरांत घुसून पिप्पलेचे दर्शन घेणें आणि त्या राजाच्या उपवनांत पुरून ठेवलेली अपरिमित संपत्ति हाती आणणें, इतक्या गोष्टी घडून आणीपर्यंत या थोर व वैभवशाली महाराजांनी पोतास कापुराचे चर्वण वर्ज केले आहे.

( कापूर शिजविल्याशिवाय तयारच होत नाही. तेव्हा हर्षाची ही प्रतिज्ञा व्यर्थ व खुळ्यासारखीच केलेली होती ! तरी याचें स्वारस्य लक्षांत येत नाही. )

( परमार्डीने कऱ्हाडचा राजा शीलहार याची कन्या चंदला–चंद्रकला देवी–इला स्वयंवरात जिंकले होतें. तिच्या रूपाचें व त्या स्वयंवराचे वर्णन विक्रमांकदेव चरिताच्या सातव्या व आठव्या सर्गात आहे. (कल्याणपुर–कल्याणी–हा गांव मोगलाईत बेदर जिल्ह्यांत आहे. तेथेंच परमार्डी राजाची राजधानी होती. )

मदन नांवाचा एक लफंगा वीर कंपनापति झालेला होता. त्याने चंदलेची एक तसबीर कोठूनशी मिळविली व त्या चित्रगत चंदलेचा तो प्रतिहार बनला. तिचा थाट-माट व वस्त्रालंकार याच्या खर्चासाठी त्याने राजाकडून पुष्कळशी नेमणूक करून घेतली. या गोष्टीवरूनच त्या विटाचा निर्लज्जपणा व लबाडी आणि त्या राजाचा मूर्ख व लहरी स्वभाव यांची कसोटी पटते. 'ही चंदलेची माता. इला स्वर्गातून आपणासाठी आणविली आहे ' असे सांगून दुसरे कांहीं वीट त्याला फसवीत होते. आणखी कांहीं धूर्तांनी देवता-सुद्धा चंदलेच्या दासी आहेत, असे सागून काही लबाड बटकी राजाकडे आणल्या. त्याने मुक्त हस्ताने द्रव्य व वैभव अर्पण केलें इतकेच नव्हे, तर आपला थोरपणा सोडून तो त्याना देवता म्हणून पुजूं लागला, याचें लोकाना हंसू आले. त्या विटानी शिकविल्याप्रमाणें त्या बटकी मदनसंताप व मंत्रोच्चार वगैरे करून त्या महीपतीच्या मतीला मोह पाडीत असत. ( ११३० ) त्या देवता बनलेल्या बटकींच्या इच्छेअन्वये त्या निभाग्याने त्यांच्याशी अंग-संगहि केला. त्या मूढ राजाला दीर्घ आयुष्य हवे होतें. ते मिळण्याचें त्या देवदासींनी अनेक आशीर्वाद दिले. तसेच एका डोंबाकडून त्याने पिंडसिद्धि मिळविण्यासाठी एक बुध्या तयार करविलेले म्हणून रसायनसुद्धा घेतले.

या राजाच्या मूर्खपणाच्या गोष्टीचे आणखी कोठवर वर्णन करावें ! विटांनीं याचना केल्याप्रमाणे त्याने त्याना शिलकेतील द्रव्य तर हवे तितके दिलेंच. पण त्या द्रव्याप्रमाणेच आपल्या उरलेल्या आयुष्यातील कांहीं अंशसुद्धां आपणाला देता येतो, असें समजून तोहि त्याने दिला.

त्याने बलवृद्धि व सौंदर्यप्राप्तीसाठी म्हणून याहूनहि जे अनेक लाजिरवाणे उपाय योजले, त्याचे वर्णन करणे किंवा ऐकणे, याची सुद्धा कोणच्या भल्या गृहस्थाला इच्छा वाटेल! असा तो दुष्ट, मतलबी मंत्र्यानीं बहकाविलेला व स्वतःच जड आणि मूढबुद्धि राजा, जणो जिवंतपणींच अंधतामिस्र नरकांत पडला होता.

पूर्वी मेघवाहन प्रमुख राजाच्या लोकोत्तर व आश्चर्यकारक अद्भुत कृत्याचें वर्णन केले गेलेच आहे. त्याविषयीं कांहीं कोत्या बुद्धीचे लोक साशंक होत असतात. त्याप्रमा-णेच या राजाच्या विलक्षण दुष्कृत्याचें हे वर्णन कालेकरून कांहीं लोकांना खोटें, निदान अतिशयोक्तीचें वाटल्यावांचून राहणार नाही.

याप्रमाणें त्याच्या अंगीं मूर्खपणा व अविचार सारखा भरलेला होता आणि राजद्रोह व फसवेगिरीहि हवी तितकी चालत होती. तरीसुद्धां तो राजा मरेपर्यंत रंध्रान्वेषी शत्रूच्या तावडींत सांपडला नाहीं. तो रात्रीं नर्तकीना नृत्य शिकवीत, दीपांनीं उज्वलित केलेल्या

जागेत स्वत. त्याचा अभिनय करीत असताना, बाहेरून लोकांना स्पष्ट दिसत असे. अशा एकाद्या प्रसंगीं त्याच्या कोणी वैऱ्यानें त्याला कधीं बाण मारला नाहीं. हें तरी त्याचें आयुष्य अवशिष्ट होतें अथवा त्याच्या प्रजेचे पापाचें फल आडवें येत होतें, यांचेंच निदर्शक होय. ( ११४१ )

पुढें कांहीं दिवसांनी त्या अशुचिनिधि राजाच्या अंतःपुरांत, त्याच्या अधःपाताचें पूर्व चिन्हच असा त्याच्या स्त्रियांच्या चारित्र्याचा कांहीं भ्रष्टाकार उघडकीस आला. तेथील तरुण युवक आणि युवती, यौवनमदाने उद्दाम होऊन व अपसांत कट करून, राजाच्या नाशाला उद्युक्त झाल्या. त्यांच्यातील कांहीं स्त्रिया व त्यांचे जार यांना राजानें पकडून ठार मारले आणि कांहींना देशपार केलें. त्यांच्या दौशील्यामुळें दोष, भाक झालेले सारेच सेवक साशंक होत्साते, त्याचे तळपट होण्याची इच्छा करूं लागले. कलश राजाचाच तो पुत्र तेव्हां त्याचें दौशील्य सर्वातिशायीं होतें यात नवल काय ? बालपणीं त्याला त्याच्या पित्याच्या ज्या पत्न्यांनीं मांडीवर खेळविलें व वाढविलें होतें, त्यांनाच तो रात्रीं मांडीवर घेऊन चुंबनालिंगनादिक करूं लागला ! त्यानें भगिनी वर्गाचाहि संभोग करण्यांत कसर केली नाहीं. त्याची आते बहीण नागा त्याला याबद्दल काही टाकून बोलली म्हणून रागावून, त्यानें तिला पकडून आणवून तिचा जबरीनें संभोग केला !

शंभर शंभर जवान पदरीं असणाऱ्या तुर्की जमादारांना त्याने नोकर ठेविले होते. त्यांना तो हवें तसें धन देत असे. तो जन्मभर गांवठी डुकराचें निषिद्ध मांस खात असे. याप्रमाणें दुर्वर्तनाचा कळस करीत त्याने, विद्वानांच्या सभेला एकादा अक्कलशून्य पशू दूषण आणतो, त्याप्रमाणें या देशाच्या राजांच्या मालिकेला भारी दूषण लावले होतें.

( हे तुर्की लोक बहुतकरून मुसलमानच असावेत. ग्रामसूकराचे मांस खाऊन तो, ते वर्ज असलेल्या म्लेंछाहूनहि हीन झाला होता, म्हणावयाचे. )

राजपुरीच्या राजाकडून ताबेदारींत काही कसूर झाल्यामुळे राजा त्याच्यावर नाराज झाला व त्यानें आपलें प्रचंड सैन्य घेऊन त्याच्यावर स्वारी केली. (११५०) ती मोठी थोरली सेना व बरोबरचा भारी सरंजाम पाहून, इतर राजांना, हर्ष राजा जणों तिच्या द्वारे त्रैलोक्य जिंकील, असें वाटलें. मार्गांत पृथ्वीगिरी नांवाचा एक किल्ला लागला. तो घेण्याचा निश्चय करून हर्ष राजानें त्याला वेढा दिला आणि राजपुरीस जाण्याचे सोडून तो तेथेंच राहिला. महिनाभर वेढा राहिल्यावर आंतील लोकाची धान्य व इतर सामग्री संपत आली व त्याचे हाल होऊं लागले. राजपुरीच्या संग्रामपालाने त्यांना मदत पोंचविण्याची पुष्कळ खटपट केली व राजाला खंडणी व पुष्कळसे सामानसुमान देणें कबूल केले पण हर्ष राजानें हट्टानें भलत्याच शर्ती सांगितल्या, त्या त्याला कबूल करवेनात. शेंवटीं त्याने लोभी दंडनायक सुन्न, याच्याकडे संधान बांधले व त्याला लांच देऊन वळवून घेतलें. दंडनायकानें वेढा उठवून परत जावें, असें सुचविलें. पण तें राजानें ऐकले नाहीं. तेव्हां सुन्हानें हळूंच सर्व सैनिकांना, भरपूर भत्ता मागण्याला सुच-

विले. बहुतेक सैनिक हलक्या प्रतीचे व लुटारू होते. त्यांनीं धरणे दिले व ते राजाला पुष्कळसे टाकून बोलले. राजाचा खजीना तेथून दूर असल्यामुळें फौजेला पैसा मिळाला नाहीं व बेदा झाला. तो शमविण्याचा राजानें प्रयत्न केला. तितक्यांत दंडनायकानें तुर्की लोक हल्ला करणार आहेत, अशी कंडी उठविली. राजाच्या अंगी धैर्य बेताचेच होते. तो भिऊन, गडबडीने वेढा उठवून, सारे सामानसुमान रस्त्यावर सोडून, परत निघून गेला.

कमी दर्जाची तरवार लढाईत दगा दिल्यावांचून रहात नाहीं. त्याप्रमाणें परीक्षेशिवाय वाढविलेला सेवक संकटसमयीं स्वामीच्या सहाय्यास न येतां, उलट त्याला अधिक संकटांत टाकतो. ( ११६० ) राजा मूळचाच अयोग्य. त्याचा मुख्य मंत्रीहि त्याच्यावर ताण. तो दुसऱ्या योग्य माणसाना राजाजवळ जमूं देत नसे. यामुळें एकाद्या भिकार तट्टानें सारी अश्वशाळा बिघडते, तसा राजाच्या वैभवाला बट्टा लागला. त्यावेळेपासून त्या राजाच्या पूर्वीच्या प्रतापचक्रवर्ती या नांवाला ग्लानी आली व त्याला निर्याण किंवा पलायन चक्रवर्ती असे नांव पडले. तो खिन्न व म्लानवदन झाला. आणि जें काम आपणाला सर्व भृत्य हजर असूनहि करतां आले नाही ते कंदर्पानें एकट्याने केल्याबद्दल, तो त्याची प्रशंसा करूं लागला. त्याला परत बोलावून घेण्याचेंहि त्याच्या मनांत आले पण दंडनायकानें त्याला तसें करूं दिले नाहीं. ते त्याचें कपट उघडकीस आले तेव्हां, राजानें त्याला कैदेत टाकलें. तें तरी निरुपाय म्हणून त्याच्या अपराधाच्या मानाने त्याने त्याला शिक्षा केली नाहीं. त्याला एका किल्ल्यात कैदेंत ठेवलें होतें. तेथें तो जीवितसंशयांत होता. तरी, त्या लोभ्यानें सेवक व आप्तइष्ट यांनीं पाठविलेले तांबूल व वस्त्रप्रावरणादिक, जमा करण्याचा सपाटा चालविला होता. पुढें कांहीं दिवसांनीं त्या मूर्ख राजाने तो लबाड व लोभी मंत्री, आपल्या नाशाला कारण झाल्यामुळें वधार्ह असतांनाहि, त्याला बंधमुक्त केले व त्याला पूर्वीची जागा दिली.

घोषयात्रेत मार खाऊन परत आलेल्या दुर्योधनाला कर्णादिकांनी स्तुतिस्तोतारण करून प्रोत्साहन दिले. त्याप्रमाणे या राजाला त्याच्या लबाड विटांनीं स्तुति करून पुनः उत्तेजन दिले.

हरलेला वादी प्रतिवादीला शिव्या देऊन त्याचा पाणउतारा करूं लागतो. शीलभ्रष्ट पत्नी खोटाच कलह करून पतीचें मन त्रस्त व उद्विग्न करते. सर्व वैभव व महत्त्व गमविल्यावर लबाड मंत्री राजाला संकटांत पाडून आपल्या या डावाचा प्रतिकार करूं पाहातो

महत्तम मंत्री सहेल यानें पुष्कळ सरकारी पैसा खाल्ला होता. त्या संबंधी भीतीमुळे त्याने स्वतःच्या बचावासाठीं राजाला चांगलाच गोत्यांत आणण्याचा प्रयत्न चालविला. ( ११७० ) दरदांचें एक रंध्र शोधून काढून, त्याने राजाला लोहरच्या लवन्यांसह दुग्धघात नावाच्या दुर्गम दुर्ग घेण्याचें त्याच्या मनांत भरविलें. तो दुर्ग पूर्वी अनंतदेवाच्या आज्ञेनें द्वारपति जनक याने, तेथील मालक लक्कनचंद डामर याला ठार करून कबजांत घेतला होता. पुढें तो त्याच्या पत्नीनें आग्रहानें कलश राजाला देऊं केला होता. पण तो त्याने घेतला नाहीं. तेव्हा तो दरद राजानें आपल्या कबजांत' घेतला होता व त्याच्या

बरोबरच दरदानीं आसपासची बरीचशी काश्मीरच्या हद्दीतील खेडींहि दाबली होती. तो किल्ला परत घेण्याचा राजाचा विचार ठरला. त्या किल्ल्यांत पाण्याचें टाकें नव्हते. तेथील गडकऱ्यांच्या उपयोगासाठीं बर्फ जमवून सांठवून ठेवीत. तें अवर्षणामुळे संपले असल्याचे हेरांकडून सहेलाला कळले होतें. म्हणून एकदम स्वारी करण्याबद्दल सहेलानें राजामागे तगादा लावला त्या प्रमाणे राजाने त्याच्यावर स्वारी करण्याचे ठरविले. ( हा दुग्धघात किल्ला काश्मीरच्या उत्तर सरहद्दीवरील एका खूप उंच पठारीवर आहे. त्याचे निशाण अद्यापि कायम आहे. वितस्ता व सिंधु आणि दुसरीकडे किशनगंगा या नद्यांच्या खोऱ्यांच्या पाणढाळावर ही पठार आहे. पूर्वी तिच्यावरूनच दरद देशांत जाण्याचा मार्ग होता.

लवन्य या लोकांचा या व पुढील तरंगात पुष्कळदां उल्लेख आलेला आहे. ते लोक मूळचे कोठले, कोण, या विषयीं पक्की माहिती मिळत नाहीं. डामरांप्रमाणेच तेहि, जमीनदार व शेतीवाडी करणारे होते. हल्ली त्यांचा अवशेष 'लून' हा नाममात्र शेतकरी लोकांमध्यें उरला आहे. पण त्यांच्या व इतर मुसलमान शेतकऱ्यांच्या चालीरींतीमध्ये कांहींच फरक दिसून येत नाहीं.)

त्यावेळी तिकडे चंपक हा द्वारपति होता. तो या स्वारीवर निघणार इतक्यांत वातगंड आनंद यानें राजाच्या आज्ञेनें त्याच्यावर अधिकार मिळविला. राजाने त्याला तिकडील मंडलेश नेमले होते. तो तिकडील सर्व द्वारपतींशीं शत्रुत्व करीत होता. त्यानें फौजेत अव्यवस्था करून टाकली होती. तरी चंपकानें मधुमती पार उतरून, त्या किल्ल्याला वेढा दिला. राजानें सर्व सामंतांना चोहींकडून तिकडे धाडले. तो स्वतः सैन्याच्या मागे एक मजल राहात असे (११८०) काश्मीरी सैन्यानें लढाई सुरू केली. दरदांना त्या दुर्गाचा आश्रय होता. त्यांनी वरून मोठाले दगड वगैरे लोटले

गुंगाचा पुत्र मल्लराज आपले पुत्र उच्चल व सुस्सल यांच्यासह प्राजिमठिका नांवाच्या मोर्च्यावर राहून, दरदावर अवचित हल्ले करून, त्याना सारखा त्रास देत होता. त्याचा प्रतिकार करणे त्याना जड जात होते.उच्चल व सुस्सल हे पुढे राजे होतील,असें. ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविलें होते. त्याच्या उमेदीवर ते वीर आपला प्रभाव व पराक्रम गाजवीत होते. वडील बंधू फारच उद्दाम असून राजाचा द्वेष करीत असे. तरी तो भावी अर्थावर लक्ष देऊन या स्वारीवर आलेला होता.

राजाच्या प्रतापामुळे वेढ्याचे काम सक्त चालले होते, त्यामुळे आणि अवर्षणाच्या तापामुळे किल्ल्यांतील दरद लोकांची तोंडे सुकून गेली. ते कसे तरी किल्ला धरून राहिले होते.

इतक्यांत हर्षाचा प्रताप पार धुवून टाकणारे विधिलिखितच अशी तुफान पर्जन्यवृष्टि झाली. सर्वत्र जलमय झालें आणि त्या दुर्गाभोंवतीं दुर्भेद्य व संरक्षक असे बर्फाचे कडेच पडले.

चढलेल्याला पाडीत व पडलेल्याला उठवीत, विधि माणसाशीं जणो कंदुकक्रीडाच

करीत असतो. त्या भयंकर वृष्टीमुळे त्रासलेल्या दुष्ट मंत्र्यांना केव्हां एकदां घर दिसेल असें झाले. त्यांनी पूर्वीप्रमाणेच राजाच्या सैन्यात गडबड माजविली.

धबधब्यांत वर चढून जाणाऱ्या माशाच्या तोंडावर खडकाचा तडाका बसावा, त्याप्रमाणे राजाची स्थिति झाली व जयाची आशा सोडून त्याने तेथून माघार घेतली. ( ११९० ) सारे सैन्य, सामानसुमान, मौल्यवान चीजवस्त, हत्यारें व खजीना वगैरे जागच्या जागीं टाकून पळून चालले. त्याशिवाय त्याला दुसरे कांहींच सुचेना. शत्रूनें त्याचा पाठलाग केला, मार्गातील पूर आलेल्या नद्यानीं त्या वाट फुटेल तिकडे शोक करीत पळत सुटलेल्या राजाच्या सैनिकाना गडप केले. त्या लोकांनीं टाकून दिलेली सणाचीं वस्त्रे मधुमतीच्या पात्रात हंसमालिकेसारखी दिसूं लागली. तसेच ढाली कमलराशीसारख्या, तरवारीचे ढीग शैबालासारखे, अश्व हे पात्रातील खडकासारखे, सुवर्णपात्रे तीरावरील चक्रवाकांसारखीं आणि रौप्यपात्रें त्या पाण्यावरील फेसासारखीं दिसत होती त्यावेळीं विजयी दरद लोकांनीं मारलेले व धरून नेलेले आणि नदीच्या प्रवाहात बुडालेले अशा राजसैनिकांची गणति होणे सुद्धा अशक्य होते.

मल्लराजाचे मानीपुत्र उज्जल व सुस्सल, यांनी या प्रसंगीं पाठ न दाखविता, धैर्यानें पुढे होऊन, त्या धनीधोरी नसलेल्या राजाच्या सैनिकाचा बचाव करण्याचा यत्न केला. त्या सैन्यरूपी विश्वाचे आक्रमण करण्याला जोरानें उच्छृंखलपणे उचंबळून देत असलेल्या दरद सैन्यरूपी सागराला ते दोघेहि बंधू वेलाद्रीप्रमाणें झाले व त्यांनीं त्याना अडविले. याप्रमाणें राजाच्या सैन्याचे रक्षण करून ते परत आले. तेव्हां त्यांची मोठी वाहवा झाली. राज्यश्री जणों त्याच्या तेजाला दिपून जाऊन, उज्वल पतिव्रतेसारखी प्रेक्षणीय दिसूं लागली. तेव्हांपासून सर्व लोकांना खात्री वाटली कीं, त्या भेकड हर्ष राजापेक्षां तेच दोघे, मानधनवार, खरोखर गादीला योग्य होत. एवढी मोठी कामगिरी बजावली असूनहि, त्यानीं राजाच्या भेटीची इच्छा किंवा अपेक्षा ठेवली नाही. ते त्याच्याकडे गेले नाहीत. त्याना इनामाची पर्वा नव्हती. यावरूनहि लोकाच्या वरील समजुतीला बळकटी आली. (१२००) अशा रीतीने शत्रूचा त्रास मिटल्यावर राजा नगरांत परत आला. मल्ल राजाच्या दोघां पुत्रांच्या पराक्रमाची सर्वत्र प्रसिद्धि झाली व त्यांच्या भावी उत्कर्षाला अनुरूप, असे त्यांना सर्व लोक राम लक्ष्मणाची जोडी म्हणूं लागले आणि हर्षाला रावणाची उपमा देण्यात आली.

नंतर त्या मूर्ख राजाची शत्रूची भीति कांहीशी कमी झाली व त्याने निश्शंक व निर्लज्जपणानें पुनः आपल्या दुष्टपणाला अनुसरून, प्रजेला पीडा देण्याचें काम सुरू केले.

थोडयाशा अपराधाकरितांहि नीच मनुष्य जवळच्या सेवकाला मारतो. पण मोठा अपराध करणाऱ्या दूरच्या शत्रूच्या वाटेला जात नाहीं. कुत्रे, अंगावर येऊन पडलेल्या दगडाचे रागारागानें चावे घेतें. पण तो मारणाराकडे तोंड सुद्धां करीत नाहीं.

राजानें मदनाला कंपनेश केलें होतें. राजा परत आल्यावर त्याला कळलें कीं, मदन त्याच्या पराभवासंबंधानें उघडपणे नावें ठेवीत होता. म्हणून तो त्याच्यावर फार नाराज झाला आणि

त्यानें त्याला ठार मारविण्याचें ठरविलें. त्यानें त्याच्यावर महाराणीने धाडलेल्या आज्ञापत्राचें उल्लंघन केलें, असा निराळाच आरोप ठेवला. मडव राज्यांतून परत आल्यावर मदन राजाच्या भेटीला गेला. तेव्हां राजा त्याच्याशी नीट बोलला नाहीं, म्हणून त्याला शंका व भीति वाटली आणि तो टक्कदेशीय मंत्री लक्ष्मीधर याच्या घरीं जाऊन राहिला. दुसऱ्या एका मंत्र्यानेहि त्याची शिफारस केली तरी तिकडे लक्ष न देतां राजानें लौकरच मदन व त्याचा पुत्र याना ठार मारविलें. त्या वेळीं सैनिक लोक ही गोष्ट पाहून हंसत होते.

वृक्ष अकालीं फुलणें, राजाचें रागांत हंसणें आणि वेताळाचा अट्टहास, हे केव्हांहि घातक झाल्याशिवाय रहात नाहींत. राजाचे मोठे प्रेम आहे, या समजुतीने व अभिमानानें लोक निश्शंकपणे त्याची हवीतशी सेवा करतात. त्यांची दशा, आपणांला सापाचा मंत्र येतो तेव्हा आपणाला सर्पदंशाची भीति नाहीं, अशी बढाई मारणाऱ्या मांत्रिकासारखी होते. त्याला तो मंत्र निष्फल होऊन भयंकर मरण येतें. ( १२१० ) असा तो सूर्यमती राणीचा शाप त्या कलश राजाच्या या शेवटचा सल्लागार दुष्ट मदनापर्यंत कार्यकारी झाला.

त्या राजाला शूर वीराची भीति वाटत असे. त्याने शूर मंत्री कलशराज, याला लक्ष्मीधराच्या घरीं कैद करून बेडया ठोकविल्या. तेथे त्याचा अपमान करण्यासाठीं त्यानें त्याचा प्रतिपक्षी उदय, याला त्याची चौकशी करण्याकरता पाठविलें. तो इतका वैभवाला चढलेला व लक्ष्मीच्या मदामुळें उग्र व उद्दाम झालेला पाहून, मानी कलशराज क्रोधाने लाल झाला व त्याने एकाच्या हातून तरवार हिसकून घेऊन सपाटयासरशी उदयाला ठार केलें. उदयाच्या सेवकांनीं त्याला खालीं पाडून त्याचा प्राण घेतला. याप्रमाणे त्या दुष्ट राजाचे दोघे मंत्री एकदमच मारले गेले.

त्यावेळी त्या राज्यात राजामुळे उठलेली अरिष्टें प्रजेला भोगावीं लागत होतीच. शिवाय क्षतावर खार टाकल्याप्रमाणे दुसरीहि अनर्थपरंपरा आली. खुद्द राजवाडयातून दिवसा ढवळ्या सुवर्णपात्रे उपटणारे चोर, निश्शंकपणें प्रजेची लूटमार करूं लागले होते. त्यातच मरकी सुरू होऊन सर्वत्र रडारड आणि प्रेतवाद्यांचा ध्वनि रात्रंदिवस सारखा ऐकूं येत होता. लौकिकवर्ष ४१७५ ई. स. १०९९ या वर्षी साऱ्या काश्मीर मंडळांत सर्व गांव महा पुरानें बुडाल्यामुळें दुर्भिक्ष पडले. एक खारी तांदुळ, पांचशे दीनाराला मिळेनात. दोन पलभार द्राक्षारसाला दोन दीनार पडत, एक पलभार लोंकरीला सहा दीनार पडत. लवण, मिरे, हिंग, वगैरे जिनसा नावाला सुद्धा दृष्टी पडेनात. नद्यांचे पाणी, फुगलेल्या व सडलेल्या प्रेतांनीं झांकून गेलें. त्यांचे ढीग, पहाडावरून तुटून वाहून आलेल्या देवदाराच्या वनासारखे वाटत. त्यांतच, बाहेरून दुरून राजधानी दिसत नाहीं म्हणून, राजानें नगराभोंवतालचे अगणित, फलें व फुलें यांनीं युक्त असे नांदत्या घरांत मुलांबाळांसह राहणाऱ्या गृहस्थांसारखे असलेले, वृक्ष तोडून टाकविले. त्यामुळे त्यांच्या कुटुंबींच अशा मधुमक्षिका, शोकयुक्त झाल्या. अशा रीतीनें संक्षय होत असलेल्या,

नांगर ओढून थकलेल्या दुर्बल व वृद्ध वृषभाच्या डोक्यावर मोठीशी धोंड मारावी, त्याप्रमाणे, त्या प्रजेवर तो राजा अधिकाधिक कराचे ओझे लादीतच होता. त्यामुळे त्याचा दम निघून गेला. त्याने कायस्थ अंमलदारामार्फत, सर्व प्रजेला जसे पिळून काढलें. त्या कराच्या पायीं त्यानें पुरग्रामादिकांमध्ये कराशिवाय माती सुद्धां उरूं दिली-सोडली-नाही.

डामर लोक फार प्रबळ झालेले पाहून, त्याने जणो प्रत्यक्ष यमस्वरूप धारण करून तिकडील मंडलेश्वर आनंद याला, त्यांचा उच्छेद करण्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें आनंदाने प्रथम मडव राज्यातील होलदाच्या पुष्कळशा डामरांना घरटयातल्या पक्ष्याप्रमाणें जागच्याजागीच ठार मारलें. (होलदा=हल्लीचा वूलर नांवाचा परगणा.) तो अशा तऱ्हेने लवन्य डामरांचा संक्षय करीत असताना, भीतीमुळे तिकडील रहदारी बंद झाली. त्यावेळी तिकडे कोणी केश सावरून वर बांधलेला आणि प्रतिष्ठितसा ब्राह्मण सुद्धा त्याने बाकी ठेवला नाहीं. पाथस्थसुद्धा ठार मारले जात होते. यामुळें तो प्रदेश, भैरवाची पाकशाळा किंवा शून्य अरण्य, याच्याप्रमाणे भयाण वाटूं लागला. (१२३०)

त्याने एका लवन्याच्या दुष्ट व कजाग स्त्रीला, क्रूरपणे सुळीं दिलेले पाहून, त्याच्या भीतीने सारे लवन्य वाट फुटेल तिकडे पळून गेले कांहीं म्लेंच्छ देशांत गेले व गोमास खाऊं लागले. कांही पाणचक्क्या, हातचक्क्या, रहाट, वगैरेवर मोलमजूरी करूं लागले. त्या हर्षराजरूपी भैरवाला, भेटीदाखल आनंदाने पुष्कळशा लवन्याच्या अखंड रुंडमाळा पाठविल्या. राजद्वाराशी डामरांच्या नृ करोट्यारूपी घंटांच्या माळा टांगलेलीं तोरणें बांधलेलीं असत. जो कोणी डामरांचीं मुंडकी आणी, त्याला कंकणें व वस्त्राभरणें इनाम देण्यासाठीं नवळच दरवाजावर टांगलेलीं असत. विस्तीर्ण तोरणें व कंगोरे वगैरेवर, डामराच्या रुंडावर ताव मारण्यासाठीं गृध्र, कंक, वायसादि मांसाहारी पक्ष्याच्या झुंडीच्या झुंडी नेहमीं येऊन बसलेल्या असत. राजाच्या प्रत्येक मुक्कामाच्या जागेवर लोक लवन्यांच्या रुंडमाळांचीं मोठालीं तोरणे व प्रशस्तशा कमानी, तयार करीत. त्या स्मशानतुल्य मंडलांत, सडलेल्या प्रेताच्या घाणीने नाक व अखंड शिवारुतांनी कान, यांना दुस्सह त्रास होत असे. त्या क्रूर मंडलेशाने ' वुलरेक प्रपे 'पासून ' लोकपुण्या 'पर्यंत ( लोकपुण्य=अलीकडील लोकबवन. ) रस्त्याच्या दोन्ही बाजूंस सारख्या अंतरावर डामराना सुळावर देऊन, त्या रस्त्याची आंखणी केली होती !

याप्रमाणे मडव राज्यात डामरांची वाट लावल्यावर. क्रम राज्यांतहि तशीच व्यवस्था करण्यासाठीं, त्याने ताबडतोब तिकडे मोर्चा फिरविला. (१२४०) हें पाहून तिकडील डामरांनीं जीवाची आशा सोडली व तें ' लौलाह ' ( हल्लीचा लोलाब परगणा. तो वूलर परगण्याच्या वायव्येस आहे. ) मध्यें मोठा जमाव करून, आनंदाला आडवे आले. ते मोठ्या शौर्यानें लढले व आपल्या पराक्रमानें त्यांनीं त्याला अडकावून टाकलें.

रात्रीं उल्हास, जागरण व दिवसा निद्रा, क्रौर्य, उदग्रता, हलकटपणा आणि यमाला प्रिय अशा गोष्टींचीं आवड, शिवाय असलेच कांहीं विशिष्ट दुर्गुण त्या हर्ष राजाच्या अंगीं

होते, असे तत्कालीन विद्वान लोकांनीं लिहून ठेवलें आहे. त्यावरून या हर्षाच्या रूपानें. एके काळीं तीर्थांनीं मंडित व सुरमुनींनी वंद्य असें हे काश्मीर मंडळ नष्ट करण्यासाठींच, कोणी क्रूर क्रव्याद् अवतरला होता म्हणावयाचें ! दुसरे काय ?

मल्लराजाचा धाकटा पुत्र सुस्सल या वेळी यौवनोन्मत्त होता. त्याला पाहून लक्ष्मीधराची पत्नी त्याच्यावर भाळली होती. तिचा पति कुरूप मर्कटासारखा होता. म्हणून तिचें त्याच्यावर प्रेम नव्हतें, राजपुत्र सुस्सल त्यांच्या शेजारींच राहात होता. त्याच्याशी ती लागू झाली होती. यावरून लक्ष्मीधर भारी संतापला होता. त्यानें रागानें व मत्सरानें राजाला म्हटले, 'महाराज, आपण किती तरी किरकोळ आप्त मंडळी मारून टाकली. त्याच प्रमाणे हे भारी उद्धट, महत्त्वाकांक्षी आणि गादीला पुढे मागे हक्कदार होण्याजोगे राजपुत्र उच्चल व सुस्सल, त्यांना कां नाहीं मारून टाकीत' ? पण राजाच्या मनावर याचा कांहीं परिणाम झाला नाही. किंवा त्याला राग आला नाही. कारण पूर्वी करविलेल्या ज्ञातिवधाचाच त्याला पश्चात्ताप होऊन त्याचें मन त्याला खात होतें. लक्ष्मीधरानें याबद्दल स्वतः व दुसऱ्याकडूनहि त्याला वरचेवर सांगविले. तरी बरेच दिवस राजानें मनावर घेतले नाही. त्या दोघाचे शौर्य व त्यांचा दांडगेपणा, यामुळे, त्याना मारविण्याची त्याला भीति वाटत होती. ( १२५० )

पुढें लौकरच ज्ञातिप्रीति, अनुवृत्ति, उपकृति, सर्व कांही विसरून, मंत्र्यांच्या विचारानें, त्यानें त्या दोघानाहि ठार मारविण्याचें ठरविलें. हा दुष्ट बेत त्याच्याशी लागू असलेल्या चक्रना नावाच्या वेश्येकडून त्या दोघाना कळला. तसेच त्याचा मित्र दर्शनपाल यानें हि त्यांची संशयनिवृत्ति केली. तेव्हां ते रातोरात, दोघांतीघां अनुचरांसह लौकिक वर्ष ४१७६ च्या मार्गशीर्ष महिन्यांत नगरातून निघून उत्रास येथील डामराकडे पोचले. ( उत्रास=हल्लींच्या कुटहर परगण्यातील शामस जवळेंच वुत्रुस नांवाचे गाव. ) तेथून त्याना राजद्रोही लवन्य प्रशस्तराज यानें मन वळवून परदेशी नेले. वडील बंधु उच्चल राजपुरीला गेला आणि धाकटा सुस्सल, कलिंजराला गेला. ( हे कलिंजर मध्य हिंदुस्थानातील कालिंजर किल्ला नव्हे. ते काश्मीरालगतच असावे. )

ते निघून गेल्यावर कोणालाही हर्ष राजाचा भरंवसा वाटेना. राजालाही अपशकून होऊं लागले व त्यांवरून काळजी वाटूं लागली. त्यानें लक्ष्मीधरामार्फत राजपुरीच्या संग्रामपाल राजाला द्रव्य देऊं करून, उच्चलाला मारविण्याविषयी बोलणे लावले. उच्चल प्रथम त्याच्याकडे गेला तेव्हां, संग्रामपालानें त्याच्याकडे फारसें लक्ष दिले नव्हतें. पण ही हर्षाची भीति पाहून, तो उच्चलाचा सत्कार करूं लागला.

दैवयोगानें धैर्यहीन होऊन दुष्ट मनुष्य भीति प्रदर्शित करतो. तेव्हा त्या योगानें तो उदयोन्मुख शत्रूला अधिक महत्त्व आणून देतो. असे या जगात नेहमी आढळते. (१२-६० )

काश्मीरांत गडबड झालेली राजपुरीवाल्यांना मनापासून इष्टच होती. तेव्हा उच्चला-सारखा हर्षाचा प्रबल शत्रु अनायासे मिळल्यावर तेथे कारस्थाने चालू झाली, यांत नवल नाही. उच्चलाने आपल्या पक्षाच्या लोकांमार्फत डामरांना वळाविण्याचा प्रयत्न चालविला. त्यांना नुकतांच हर्षाकडून भारीच जुलूम सोसावा लागला होता. म्हणून डामरांनींही त्याचीं माणसे व दुसरे आपले दूत यांच्या बरोबर त्याला भेटी व नजराणे पाठवून, त्याला काश्मी-रात परत बोलाविलें. सूर्यवर्मचंद्राचा पुत्र जनक, यानेहि हुषार दूत पाठवून असाच प्रयत्न केला. डामरांचे दूत आलेले पाहून, संग्रामपालाने हर्ष राजाचे भय सोडलें व तो मोकळेपणीं उच्चलाचा मानमरातब करूं लागला. त्याने नम्रपणानें त्याच्या मस्तकावर कर्पूर चूर्ण वाहून त्याला अभय असल्याची खात्री पटविली आणि त्याने त्याला स्वारीवर निघण्याला प्रोत्साहन दिले. पण पुढें त्याचे महत्त्व लक्षात येऊन त्याला खेद वाटला.

तितक्यात तिकडीलच एक प्रमुख ठक्कुर कलशराज याला हर्षाने द्रव्य सहाय्य व प्रोत्साहन देऊन संग्रामपालाकडे पाठविले होतें त्यानें त्याला एकातात म्हटलें, 'आपण हर्षराजा सारख्याला सोडून, कामधेनूच्या ऐवजी या उच्चलरूपी शेळीच्या गळीं पडतां हें काय? तो काश्मीरच्या राजाच्या बरोबरीचा का आहे? तो भिकारडा करणार काय? हर्षराजाची मनधरणी करून निर्भय राहिलां तर बरे नव्हे का? या उच्चलाला राजगिरीच्या दुर्गांत नेऊन ठेवा. म्हणजे हर्षालाहि भय राहील व तो आपला कायमचा मित्र होऊन, म्हणाल तसा वागेल.' (१२७०) ( राजगिरी आणि लहूर हे दोन काश्मीरात फारच मजबूत किल्ले स्वतः पाहिल्याचे अलिबरुनीने लिहिले आहे. तो किल्ला कुलार्जक पर्वत शिखराच्या दक्षिणेस असल्याचे त्यानें वर्णिले आहे. ते शिखर व परिपंत्साल पहाडाचें रतकुली शिखर एकच. )

हे ऐकून स्वार्थी व अविचारी संग्रामपालाला लालूच सुटली. त्याला हर्षराजाचेंहि भय होतेच. त्याने ही गोष्ट मान्य केली, पण कलशराजाला स्पष्ट सांगितलें की, त्या प्रबल व उद्दाम उच्चलाला मला कैद करता येणार नाही. मी त्याला युक्तीने आपणाकडे पाठवितो. आपणच त्यांची व्यवस्था करावी. पुढें त्याने उच्चलाला म्हटलें, ' आपण कलशराजाला भेटा, तो इकडील मुख्य अधिकारी आहे. त्याच्यामार्फत आपणाला पुढील अडचणी टाळतां येतील आणि मलाहि आपल्या सैनिकांसह सर्वतऱ्हेनें मदत करता येईल व तुम्हांला प्रतिस्पर्ध्यांचा उच्छेद करण्यासाठीं निघण्याला ठीक पडेल. '

दुसरे दिवशीं उच्चल कलशराजाकडे जाण्याला निघतांना त्याला अपशकुन झाले आणि त्याच्या विश्वासू मित्राकडून त्याला गुप्तपणें दगा असल्याची सूचनाहि मिळाली. तसा तो परत फिरला. हे ऐकून कलशराज रागारागानें, आपल्या पूर्वीच सज्ज करविलेल्या सैन्यासह, उच्चलावर हल्ला करण्यास निघाला. उच्चलानेंहि आपले लोक तयार केले व तो त्याला तोंड देण्यासाठीं सिद्ध झाला. पुढें झगडा सुरू झालेला पाहून संग्रामपाल मध्ये पडला व त्यानें उच्चलाला आपल्या दरबारांत बोलावले. उच्चलाचे सेवक त्याला

'तिकडे जाणें ठीक नाहीं,' असें म्हणत होते. पण त्यानें त्यांना झिटकारिलें व तो सज्ज होऊन त्या खशराजाच्या दरबारांत गेला. त्यावेळीं तो भारी क्रुद्ध झालेला होता. त्याचा अधरोष्ठ थरारत होता. कल्पांतींच्या सूर्याप्रमाणे प्रखर, तेजस्वी व ओजस्वी, अशा त्या शूरवीरापुढें येण्याची कलशराज किंवा संग्रामपाल दोघांचीहि प्राज्ञा नव्हती. ( १२८० ) नंतर पुढे तेथें एकांतांत त्यांचे खलबत झाले. खशराजाने उच्चलाचें सांत्वन चालविलें असतांना उच्चलानें त्या दोघानाहि क्रोधाने, आवेशाने व कठोरपणाने म्हटले, 'फारां दिवसांपूर्वी दार्वाभिसार देशांत नर या नांवाचा, भारद्वाज गोत्री राजा झाला. त्याचा पुत्र नरवाहन व त्याचा फुल्ल. त्याच्यापासून सातवाहन त्याचा चंद्र, चंद्राचा चंदुराज आणि त्याचे पुत्र गोपाल व सिंहराज. सिंहराजाला अनेक पुत्र होते. त्यानें आपली कन्या दिद्दा क्षेमगुप्त राजाला दिली. तिने नवरा मेल्यावर पुत्र जिवंत नसल्यामुळें आपला भाचा व उदयराज नांवाच्या आपल्या बंधूचा पुत्र संग्रामराज याला गादीवर बसविले. तिचा दुसरा भाऊ कांतिराज याला जस्स नांवाचा पुत्र झाला. संग्रामाचा पुत्र अनंत. तसें जस्साचे पुत्र तन्वंग व गुंग. अनंतापासून कलशराज आणि गुंगापासून मल्लराज हे पैदा झाले. कलशराजाचा हर्ष, तसे मल्लाचे आम्ही दोघे असा हा वंशक्रम व संबंध असतांना, आमच्याविषयींच, 'आम्ही काश्मीरराजवंशीय आहोंत काय,' असे कोण मूर्ख विचारतात? या मंडळाचे-पृथ्वीचे-राज्य क्रमभोज्य आहे, असें म्हणण्यांत तरी काय अर्थ आहे? राज्य, प्रबळ असेल त्यालाच मिळत असतें. खऱ्या वीराला त्याच्या दोन्ही बाहूहून दुसरा कोणता साह्यकर्ता हवा असतो? शोचनीय व कींव करण्याला पात्र, असल्या विकिर मंडळींपुढे मस्तकाला हात लावून, मीं आजवर आपल्या कुळाला बट्टा लावलेला नाहीं, हे तरी माझे मोठे भाग्यच. आतां पुढें मात्र माझा प्रभाव व माझें कर्तृत्व पहा.' असे बोलून तो १०० प्यादयासह तेथून विजय मिळविण्यासाठी बाहेर पडला. (१२९०)

त्याला मार्गांत प्रथमच, हातीं ससाची शिकार असलेला शिकारी सामोरा आला. त्या उत्तम शुभशकुनावरून, शत्रूचें राज्य व वैभव हटकून आपल्या हातीं येणार, अशी त्याने मनांत पक्की गांठ मारली. वाटेंत वात्तदेव वगैरे व हद्दपार झालेले डामर, रहाट व पाणचक्क्या, हातचक्क्या वगैरे सोडून त्याला येऊन मिळाले. संग्रामपाल बाहेर छावणींत होता. तेथून उच्चल राजपुरीला आला. तेथें संग्रामपालाच्या राण्यांनीं त्याचे स्वागत व समाधान केले. तेथेंच भोजन करून तो संध्याकाळीं आपल्या बिऱ्हाडीं जाण्याला बाहेर पडणार, तोंच कलशराजाच्या सैनिकांनीं त्याच्यावर हल्ला सुरू केला. हे पाहून त्या राण्यांनीं त्याला बाहेर जाऊं दिले नाहीं. तेथें बरेंच युद्ध झाले. त्यात त्याच्याकडील लोष्ठा-वट्ट वगैरे त्याचे सैनिक मारले गेले आणि मूळांतच कमी असलेले त्याचे सैनिक आणखीहि कमी झाले. हे संकट त्याच्यावर, चैत्री पौर्णिमेला आलें. राजपुरीतील प्रमुख पुरुषांनी मध्ये पडून हे भांडण मिटविले. तो न भितां व न त्रासतां पांचवे दिवशीं-वैशाख वद्य पंचमीलाच पुनः स्वारीवर निघाला. वात्तदेव वगैरेंना आपापल्या मार्गांनीं गडबड व लूटमार करीत व

बंडावा उठवीत येण्यास सांगून, तो स्वतः क्रम राज्याच्या मार्गानें काश्मीरांत शिरण्याच्या तयारीला लागला.

क्षेमराजाचा पुत्र कपिल, याला हर्षराजानें उदयसिंह मरण पावल्यावर, लोहर प्रातांत द्वारपति नेमले होते. त्यानें उच्चलाला आपल्याला हद्दींतून जाऊं दिले. तो सर्वांच्या पुढे हाती ढाल तरवार घेऊन निघाला. पर्णोत्स येथें कपिलाचें राजपक्षीय सैनिक व उच्चलाचे सैनिक यांचा सामना झाला. त्यांच्यात उच्चलाने प्रतिपक्षाला पळवून लावले. ( १३०० )

सुज्जक नावाचा राजाकडील द्वारपति निःशंक बसला होता. त्याला पकडून घेऊन शिकारीवर झडप घालणाऱ्या ससाण्याप्रमाणे उच्चल काश्मीर मंडलावर उतरला. त्याला राजाविरुद्ध असलेले डामर व खाशक लोक बरेचसे येऊन मिळाले. तो जणों आकाशांतून पडावा किंवा भूविरातून वर निघावा, तसा अवचित आलेला पाहून हर्षराजाचा थरकाप झाला. क्रमराज्यातील मंडलेश आनंद याला ठार मारून, उच्चल तेथेच जमून बसतो कीं काय, अशी भीति पडून तो गोंधळून गेला. दंडनायकानें सैन्य जमविण्यात दिरंगाई केलेली पाहून त्याने पट्टाबरोबर पुष्कळ सैन्य देऊन, त्याला तात्काल तिकडे धाडलें. पण न जाणों दैव आडवे आल्याने त्याचे धैर्य गळालें किंवा लबाडीनें पट्टानेहि मार्गांत उशीर केला आणि शत्रूवर हल्ला करण्याची योग्य संधि घालविली. तेव्हां राजानें तिलक वगैरेंनाहि तिकडे पाठविले. ते पट्टापर्यंत पोंचले पण हल्ला करण्याला पुढे वाढले नाहींत.त्याच्यामागून, पाठविलेला दंडनायकहि गोंधळून गेला आणि उच्चलाचा पाय जमत चालला.

तो वराहमूलाला जात असतांना त्याला शत्रूकडील पकडून आणलेला एक सुलक्षणी घोडा मिळाला. तो राजलक्ष्मीचा प्रसादच म्हणून त्याने त्याचा स्वीकार केला. तसेच, त्याच्या मस्तकावर महावराहदेवाच्या किरीटावरील पुष्पमाला पडली. ती जणो काय त्या देवाच्या दाढेवर असलेल्या पृथ्वीने स्वयंवरात उच्चलाच्या गळ्यात घातलेल्या हारासारखी झाली. ( १३१० )

वैद्यकुलांतील काकादिक आडवे आले. ( त्या काक कुलांतील पुरुषांचा, पुढे या व पुढच्या तरंगांत पुष्कळदा उल्लेख आलेला आहे. त्याला वैद्य असें येथेंच एकदां म्हटलेले आहे. एका प्रतींत वैद्याच्या जागीं वैश्य असाहि शब्द आहे. ) तसा तो हुष्कपूर सोडून क्रमराज्याच्या रोखाने चालला. तो येत असल्याचे ऐकून डामराना उत्साह आला व त्यानी मंडलेश्वराकडील यशोराज प्रमुख पुष्कळसे मोठाले वीर मारून, त्याचा मोड केला होता. यामुळे तो मंडलेश्वर गोंधळून गेला होता. त्यानें माघार घेतली व तो हळूं हळूं तारमूलक येथे पोंचला होता. उच्चल त्याच्यामागून येतच होता. त्याला डामर येऊन मिळाले होते. दंडनायक तारमूलक येथें मोठया सैन्यासह पुष्कळ दिवसपर्यंत बसून राहिला व त्यानें उच्चलरूपी प्रलय मेघ व पूर्वेकडील झंझावात, याचा तडाका थोपून धरला. जयश्रीरूपी हत्तीणीसाठीं त्या दोन्ही दळाचा बरेच दिवस बहुतेक बरोबरीचा झगडा चालला होता.

उच्चलाचा मामा आनंद याने डामर जमवून मडव राज्यात गडबड चालविली. तिच्यात, हिवाळ्यानंतर भूविवरातून असंख्य भ्रमर बाहेर निघतात तसे, चोहींकडून डामराचे संघ भराभर येऊन मिळाले. त्यावेळीं तिकडे त्या विभागी राजाकडून कायस्थ महत्तमसुहेल हाच द्वारपति व कंपनेश होता. आनंदानें अनेक वेळ त्याच्यावर हल्ले केले तरी त्यानें मडव राज्य सोडलें नाहीं. ही त्याची कामगिरी महत्त्वाची होती. (१३२०) नंतर अतुल प्रताप प्रकट करीत उच्चलानेहि मोठी फौज जमवून त्या मंडलेश्वराला वेढून टाकलें. ते मंडलेश्वराचे सैनिक सशस्त्र, कवचे घातलेले व तयार असूनहि कसे घेरले गेले, ते त्यांना कळेना. यावेळींहि त्या थोर व राजनिष्ठ मंडलेश्वराने राजाच्या हिताचाच विचार चालविला होता. मानधन माणसाची स्वामिभक्ति मरेपर्यंत बदलत व ढळत नाही. त्याने युक्तीनें उच्चलाकडे सागून पाठविले कीं, 'आपण यावेळी तडक नगरावर चालून जा. अशी संधि पुनः येणार नाही.' यावर उच्चल पुढे वाढला उच्चलाचे लोक मार्गातील गाव व खेडीं जाळून लूटमार करतील व तिच्यामुळें त्याच्यावर लोक आयतेच नाराज होतील, असा मंडलेश्वराचा हेतु होता. उच्चल परिहासपुरास पोचला. पण तेथून बाहेर पडणे फार कठिण होते, कारण, त्याच्या आसपास उंच उतार व पुष्कळशा पाण्याच्या दलदली होत्या. तेथील एका चौकात उच्चल व दुसऱ्यात मंडलेश्वर यानी तळ दिले. त्या दोन्ही चौकाना रात्रीं आग लावून दोघानाहि जाळून टाकण्याला, मंडलेश्वराने आपल्या लोकाना सागितले. पण त्याच्याबद्दलच्या आदरामुळे त्यानीं तसें केले नाही.

मनाप्रमाणेच शरीरहि साहस करण्याला तयार व मजबूत असलेल्या आत्मनिरपेक्ष माणसाला कोणची गोष्ट कठिण असणार? कासव भित्रे व दुर्बल, म्हणून ते आपल्या अंगाभोवतीं नेहमी दुर्भेद्य कवच बाळगतें. पण सिंह नेहमींच क्रूर व शौर्य गाजविणारा, तो कवचाशिवायच निर्भय असतो. वेडा, किंवा अविचारी, विधि नीच व हलकट याच्याविषयी नेहमीं पक्षपात करीत असतो आणि शूर वीराच्या शरीराला चोहींकडून विकल व असहाय्य ठेवतो. अशा त्या विधीला धिक्कार असो.

पुढे मंडलेश्वरानें राजाकडे सागून पाठविले कीं, 'ही उच्चलरूपी कोल्ह्याची शिकार मीं आपल्यापुढे आणून सोडली आहे. आपण येऊन त्याची एकदम शिकार साधावी.' (१३३०) तेव्हा राजा सारे सामंत व सैन्य घेऊन विजय किंवा मरण मिळविण्याच्या निश्चयाने बाहेर पडला. तो प्रसंग मोठा बिकट, प्राणसंशयाचा होता. म्हणून राजाने चोहींकडे सर्वांना माफी दिल्याबद्दल डागोरा पिटविला. शत्रूचे लोक नुकतेच भरतेसतूवर पोचले होते. तेथवर राजाचे स्वार क्षणभरांत दौडत गेले व त्यांनी शत्रूच्या सैन्याचा पराभव केला. तसेच मंडलेशानेहि उच्चलाच्या सैन्याच्या मध्यावर हल्ला करून त्याचा नाश केला.

या पराभवानंतर उच्चलाकडील काही डामर थकले भागलेले, राजविहारांत शिरले व चपल होते ते पळून गेले. त्याचा नायक भिल्लसेन हा आत शिरतांना पाहून त्याला उच्चलच

समजून, शत्रूच्या लोकांनीं त्या विहाराला आग लावली. त्यावेळीं दर्शनपालाचा चुलत सोमपाल याच्यासह तो मानी उच्चल शत्रूच्या स्वारांशीं लढला. त्याला जनकचंद्र वगैरेंनीं त्या मृत्युमुखरूपी रणातून मार्ग परतविलें. तो 'गौरिकाबाल' जवळ वितस्तापार होऊन डामरांसह तारमूलक येथें परत गेला.

या थोड्याशा विजयाने एकाद्या क्षुल्लक द्यूतकाराप्रमाणें संतुष्ट होऊन हर्ष राजा मंडलेशाची तारीफ करीत नगराला परत गेला (१३४०) शत्रू जिवंत आहे हें ऐकूनसुद्धां त्यानें त्याचा पाठलाग केला नाहीं. तेव्हां त्या पराभव पावलेल्या डामरांना नवा दम आला. ते आपापल्या घरीं परत गेले होते. त्याना पुढील ज्येष्ठांत उच्चलानें एकत्र जमविण्याची खटपट चालविली. त्यावेळीं त्या मानी वीराला त्याचे दोन बाहूच काय ते सहाय्यकर्ते उरले होते. त्याला सर्व तऱ्हेनें दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागत होतें. यामुळें त्याच्या उद्योगात बऱ्याच अडचणी येत होत्या.

याच सुमारास राजानें परिहासपुरांतील परिहासकेशवाची मोठी रुप्याची मूर्ति फोडविली. तिला उच्चलानें इतकी अडचण असूनहि हात लावला नव्हता. ती मूर्ति उखडली गेली तेव्हां कबूतराच्या पंखासारख्या कबऱ्या रंगाचा धुरळा उडून त्यानें दाही दिशा भरून टाकल्या. तो धुरळा पुढें तसाच पुष्कळ दिवस-हर्षाच्या अखेरीपर्यंत-कायम होता. त्या मूर्तीची प्रारंभीं स्थापना झाली तोंवर या सर्व मंडलात दिवसांसुद्धां अंधेर असे. तिच्या स्थापनेनंतर त्या मूर्तीच्या तेजानें स्वच्छ प्रकाश पडून तो नाहींसा झाला, अशी दंतकथा होती. तोच प्रकार यावेळीं त्या मूर्तीच्या भंगानंतर पुनः दीड महिना दिसून आला. (ही परिहास केशवाची रुप्याची मुर्ती ललितादित्य राजानें स्थापन केलेली होती. तिचें वजन सुमारें (८४०००) पल किंवा ३३६००० तोळे होतें. तिची किमत हर्षाच्या वेळी तितक्या काश्मीरी रुपयांहून बरीच अधिक होती.

(हर्षाच्या कारकिर्दीच्या शेवटच्या वर्षी एक नैसर्गिक चमत्कार घडून आला होता त्याला अनुलक्षून हें वर्णन आहेसें दिसतें तो चमत्कार परिहासकेशवाची मूर्ति फोडल्यामुळें झाला, अशी लोकांची समजूत होती दीड महिना धूसर धुरळा सर्वत्र पसरला होता व त्यामुळें गाढ अंधकार पडला होता म्हणे. हाच प्रकार ही मूर्ति प्रथम स्थापन केली गेली त्यावेळींहि झाला होता असं कल्हण येथें म्हणतो पण त्यानें चौथ्या तरंगाच्या १९४ ते २०६ श्लोकांत ललितादित्यानें ही व दुसऱ्याहि मूर्ती स्थापन केल्याचें तपशीलवार वर्णन दिलें आहे. त्याच्यांत याच्याविषयीं उल्लेख आलेला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

अवनाह-किंवा टीकेत म्हटल्याप्रमाणें- पौंडुपात्र ग्राम म्हणजे हल्लींचें पाडपावन असावें. तें हूरपुराखालीं, सुमारें पांच मैलांवर आहे.)

शत्रूची गडबड काहींशा कमी होऊन राजाला थोडीशी विश्रांति मिळाली. तितक्यांत सुस्सलानें शूरपुराकडून उठावणी केली तो अवनाह येथें रहात होता. त्याच्या पित्यानें उच्चलाची प्रशंसा करून त्याला नावें ठेविलीं व त्याच्या मनाला झोंबण्याजोगा

निरोप पाठविला. तेव्हां तो उदासीनपणा सोडून जागा झाला व कल्ह राजाकडून त्याला कांहीं घोडे मिळाले होते. ते बरोबर घेऊन निघाला. येथवर तो हर्ष राजाविषयीं निष्ठा बाळगून होता. पण आतां त्यानें ती सोडून दिली. (१३५०) तो मोठा मानी, धीर व कपटी होता. त्याचें राजाशीं बद्ध वैर होतें. तरी शेवटपर्यंत त्याला चकविण्यासाठीं, तो राजाशीं वरवर नरम व सभ्यपणाचचें वर्तन ठेवीत होता.

शूरपुरच्या दुर्गाजवळ–सरहद्दीवरील नाक्याजवळ–त्यानें सेनापति माणिक्य याचा पराभव केला. तेथें त्याला पुष्कळ लूट मिळाली. तिच्यामुळें त्या दैवाच्या लाडक्या सुस्सलाला पुढें साऱ्या मोहिमेत चांगल्या थाटानें राहण्याला साधन झालें. राजानें तूर्त उच्चलाचा नाद सोडून, मंडलेश्वर, पट्ट वगैरेंना ताबडतोब सुस्सलावर पाठविलें. तो भराभर पुढें चालून येत होता. त्यांचाहि त्यानें शूरपुराजवळ पराभव केला. त्यांचे पुष्कळसे लोक वैतरणी नदींत बुडाले ( ही नदी म्हणजे शुपियान जवळचा रेंब्यार नदीचा डोह असलेला भाग असावा.)तेथें द्रोही दर्शनपालानें बराच पराक्रम केला. पण खिन्न झालेली जयश्री त्याच्याकडे फिरकली नाहीं. त्या लढाईतून पळालेले राजाचे सैनिक दुसरे दिवशीं जवळच लोकपुण्य येथें सुहेलाचा तळ पडला होता, त्याच्याकडे पोचले. प्रलयकालरूपी सुस्सल चालून येईल या भीतीनें सुहेल स्वतःच्या व याहि लोकांसह नगराला परत गेला.

याप्रमाणें सुस्सलानें राजाची गडबड उडविली तेव्हां उच्चलाला पुनः हुरूप आला. तो तारमूलक येथें होता. त्याचें डामर सैन्य पायदळ होतें. तें राजाच्या स्वारांना भीत असे. म्हणून त्यांनीं उच्चलाला लोहरच्या बिकट पहाडी मार्गानें राजावर चालून आणलें.(१३६०)

राजानें उदयराजाला द्वारपति नेमून मंडलेश्वराला पुनः उच्चलावर पाठविलें. इकडे उच्चलाचा मामा आनंद पद्मपुराला पोचला होता. सर्व मंत्री भिऊन गेले असल्यामुळें त्यांपैकीं एकहि कंपनेशाचा अधिकार पतकरीना. तेव्हां राजानें खिन्न होऊन व दीर्घ उसासा टाकीत म्हटलें, ‘माझा असा कोणी आहे कां?’ हें ऐकून चंद्रराज यानें त्याच्या हातून कंपनेशाच्या अधिकारपदाची माळ घेतली. या चंद्रराजाचे पूर्वज जिंदुराजवगैरेंनीं कधींच खाटेवर स्वस्थ पडून मरण्याची इच्छा केलेली नव्हती. तेव्हां त्यानें यावेळीं पुढें होऊन आपला थोर कुलीनपणा व्यक्त केला, हे ठीकच झालें. द्रौणि–अश्वत्थाम्याच्या प्रमाणें त्याला ऐन निर्वाणीच्या आपत्काळीं सेनापत्य मिळालें होतें. त्यानें बाहेर पडून पद्मपुराहून शत्रूला पिटाळून लावलें. नंतर तो सावकाश तिकडील प्रदेश व्यापीत चालला. त्यावें श्रावण शुद्ध पंचमीला शत्रूचा कंपनेश आनंद याला ठार मारलें. त्या वेळीं आनंदाची फौज गोवर्धनधराजवळ लढत होती. ती सोडून तो थोड्याशा सेवकांसह जवळच गाणें ऐकण्याचा नादांत बसला असतांना, वितस्तातीरानें येत असलेल्या राजाकडील कांहीं स्वारांनीं त्याला अवचित गांठून ठार मारलें. प्रमत्तांचें भलें कसें होणार ? चंद्रराजानें त्याचें शिर पाठविलेलें पाहून, राजाला पुनः विधि अनुकूल असून आपणाला विजय मिळेल असी राजाला आशा वाटूं लागली.

सिंह जातां जातां वरचेवर मागें पहात असल्यामुळें तो पुनः परततो की काय असा भ्रम पाडीत असतो. त्याप्रमाणें विधि उलट होत असतांनाहि मधून मधून अशी अनुकूलता दाखवितो ( १३७० )

पुढें सैन्य जमा करीत चंद्रराज विजयेश्वर क्षेत्राकडे आपल्या आठराहि सैन्यविभागांसह गेला. वाटेत तो जागजागीं बराच पराक्रम करीत होता. तुलाचव्याप्रमाणेंच विधात्याला दोन्ही पारड्यांचा कमी जास्तीपणा खपत नाहीं. म्हणून त्या दोन्ही सैन्यांचा समतोलपणा भंगणें या वेळीं त्याला पसंत नव्हते.

तिसरे दिवशीं एकदम अकाली पर्जन्यवृष्टि झाली. तिच्यामुळे मंडलेश्वराच्या सैनिकांचे हाल झाले व ते लहर प्रातात पळून गेले. ते शीतवातानें व चिखलांत फसल्यामुळे घाबरले व त्यांनीं हताश पशूं प्रमाणे घोडे, कवचें, हत्यारें, सर्व कांहीं भराभर फेकून दिले. अशा स्थितींत उच्चल कृपाळूपणान त्या मंडलेश्वराचें थोडेसे रक्षण करूं पहात होता. पण त्याला जनक चंद्रादिकानीं ठार मारलें. हर्ष राजाच्या बहुतेक राजद्रोही मंत्र्यांमध्ये स्वतःचे प्राण खर्ची घालून कीर्ति संपादली अशी या मंडलेश्वरानेंच. त्यानें देवशर्मादिकांचें अनुकरण करण्याची इच्छा धरली असावी. असें म्हटलें तर कदाचित उलटे लिहिल्याबद्दल कोणी नावें देखील ठेवतील.

प्रत्येक गोष्टींत यशापयश दैवाधीन असतें. तरी लवन्यांचा पराभव व नाश, शत्रूचे बेत फसविणे, इत्यादि गोष्टीबद्दल त्याची तारीफ करण्यांत कोण कमी करील ?

उदधीच्या पोटांतील तम चंद्रमा हरण करतोचना? सर्व जल गडप करणाऱ्या सागराला भय उत्पन्न करण्याला और्वानल असतो. सागराच्या पोटांतलि और्वानलाचा नाश करणारे कालकूट विष व त्याचा प्रतिकार करणारा धन्वंतरी. असे एकात्र एक प्रतियोगी असतात. यामुळें निष्फळ वाटणाऱ्या सागराला जड म्हणणें योग्य नव्हे. सिद्धि दैवाधीन असते, हें जाणून, त्याची योग्य स्तुति करण्यांतच गुणग्राहकता व्यक्त होत असते.

मंडलेश्वराची माता गज्जा इनें अग्निप्रवेश केला. स्वामिकार्यांत अश्रांत झटणाऱ्या पुत्राला जन्म देणाऱ्या स्त्रियांमध्ये ती पूज्य व श्रेष्ठ होती. असा अग्निप्रवेश करून तिनें स्वतःचा थोरपणा व गौरव व्यक्त केले. (१३८०) आपल्या पुत्रालाच राजा नेहमीं जागजागीं साहसाच्या व संकटाच्या कामावर धाडतो, हें पाहून तिनें पुत्रस्नेहानें त्याला म्हटलें, 'महाराज, मला याच्याशिवाय दुसरी संतति नाहीं. ज्या त्या प्राणसंकटाच्या प्रसंगीं आपण त्यालाच पाठवितां हें काय? ' राजानें उत्तर दिलें 'माई, आपणाला दुसरी संतति नाही, तसाच मलाहि त्याच्यासारखा दुसरा कोणी सेवक उरलेला नाहीं. ' पोटच्या पुत्राविषयीं राजाचा हा गौरव व ही भक्ति पाहून त्या मानवती सतीला भारी समाधान झालें व संतोष वाटला.

त्याच सुमारास उच्चल हिरण्यपुर येथें गेला. ( हल्लीचें ' रनिल ' गांव ) तेथील ब्राम्हणांनीं त्याला राज्याभिषेक केला. या गोष्टी घडत असलेल्या पाहून राजा घाबरून गेला होता. त्यानें विचारल्यावरून, त्याच्या मंत्र्यांनीं त्याला सल्ला दिली कीं, ' यावेळीं आपले

शत्रू प्रबल झालेले आहेत. तेव्हां आपण सर्वांना बरोबर घेऊन लोहरास जावें या नव्या राजाबद्दलची हाव व उत्कंठा पुरेशी होतांच हीच प्रजा आपणाला परत बोलावील, किंवा कांहीं दिवसांनीं आपणाला स्वतःच परत यावयाला सांपडेल.' त्यांना राजानें म्हटलं, 'राण्या, कोश, सिंहासन, वगैरे सर्व सोडून मला एकदम निघतां येणें शक्य नाही' यावर त्यांनीं विनंति केली कीं, 'ही वेळ हयगय करण्याची नाहीं. आपण घोडयावर बसून रवाना व्हा. राजस्त्रिया, खजीना वगैरे आपले स्वार मागाहून संभाळून बरोबर आणतील,' राहिले पूर्वी श्वपाकी कामुक बसलेलें सिंहासन. त्याच्यावर दुसरा कोणीहि बसला तरी त्यांत अवमान कशाचा ?' ( १३९० ) हें ऐकूनहि राजानें आग्रहानें म्हटलें, 'हें राहूं द्याहो. दुसरी कांहीं तोड काढा'. त्यावर ते मंत्री गडबडीनें, आणखी बरेच बोलले व शेवटीं म्हणाले, 'लोकशासकांना दैन्य दाखविण्याचा अवसरच असत नाही. युद्धांत लढतां लढतां मरणें हा त्यांचा उपजत हक्क व हेंच त्यांचें मुख्य कर्तव्य. संकटांत सांपडलेल्या राजाचे खरे शत्रू आप्त, गोत्रज किंवा मंत्री, यांच्या ऐवजीं अनुद्योग, लज्जा, भीति व मंत्रि मंडळाशी तंटे, हे होत. आळसामुळें स्वतः राजकार्य न पाहातां तें भृत्यावर सोंपवणारा राजा व यष्टीचा आधार करणारा अंध, हे दोघे सारखेच. त्यांना पदोपदीं अडचणी व अडथळे यावयाचेच. शत्रू यःकश्चित म्हणून त्याच्यावर स्वतः शस्त्र धरण्याची लाज वाटून, त्याची अवज्ञा करणाऱ्या अदूरदृष्टी मूढ राजाला, लौकरच लज्जित व्हावें लागतें. तो उलटा आपल्या शत्रूला प्रबल करीत असतो.

कालेंकरून महेंद्राचा कृमी होतो व कृमीचा महेंद्र बनतो. अमका श्रेष्ठ, थोर व बद्धमूल, आणि तमका अप्रतिष्ठित, हा अभिमान खोटा. कोणाहि जयेच्छूच्या मनांत भय आलें कीं त्याचा पराभव झालाच. सर्व बाजूनें विकल, अशा शत्रूकडून कधीं कधीं सर्वसाधन संपत्तीने परिपूर्ण असलेल्यालाहि दैन्य प्राप्त होत असतें. सुप्रतिष्ठित, उज्वल विभूतीला पात्र आणि निर्भय, अशा पुरुषाचा दुसऱ्यावर अवलंबून राहणाऱ्यांकडून कसा व का पराभव होऊं शकणार? अमात्यामध्यें अपसांत फुटाफूट व मतभेद असेल तेथें किरकोळ कामांत सुद्धां यश मिळत नाहीं. दोघांनीं दोहींकडे ओढीत असलेल्या वैशाख रज्जूप्रमाणें कार्याची ओढाताण होते, (वैशाख महिन्यांत अलीकडील 'टग ऑफ वार' प्रमाणें दोरी ओढण्याचा खेळ तिकडे पूर्वी चालू होता, असे यावरून दिसतें. ) सर्वांगहीन पण समग्र शक्तीनें युक्त, असा एक माणूस सुद्धां निवळ आशावादी राजाचें सर्वस्व, राज्य व प्राण, यांचा नाश करूं शकतो. (१४०० ) राजाला शत्रु असावयाचेच. तसेंच राज्य एकाच्या हातून दुसऱ्याला मिळत जातच असतें आपण आमच्या सल्ल्याप्रमाणें वागाल तर आपणाला पुनः राज्य मिळेल आणि विधी विरुद्ध असल्यामुळें तें नाहींच मिळालें तर, रणांत पडणाऱ्या हजारों राजांप्रमाणें आपणाला यश व मान मिळाल्यावाचून राहणार नाहीं. वीरांचें नुसतें धडच नाचत असतांना त्याला धनुष्याच्या दोरीचा टणत्कार विण्याच्या तारेच्या आवाजाप्रमाणें साथ देत असतो व त्याच्यापुढे शेवा-कोल्हे आपल्या मुखांतील ज्वालांचें दीप आरत्याप्रमाणें पाजळत असतात. त्यावेळीं अंगांतील अभिमानज्वर शांत होऊन व वीरशयनावर पडून देहाचें सार्थक झाल्याबद्दल

आशीर्वाद व धन्यवाद मिळविणारे ते वीर लोक धन्य होत. उदास व निर्वाणीचे विचार मनांत बाळगून राज्याविषयीं जणो द्यूत खेळणाऱ्या क्षत्रिय लोकांचा द्यूतकाराच्या प्रमाणें कायमचा त्रास मिटतो.'

हे सर्व ऐकूनहि, राजा पुनः याच विषयीं वटवट करूं लागलेला पाहून, त्या मंत्र्यांना दुःख झालें व त्यांनीं दीर्घ उसासे टाकीत मर्यादा सोडून त्या प्रसंगाला अनुरूप असें कठोर भाषण करीत म्हटलें, 'जिवावर उदार होऊन या संकटसमयीं आपण उत्कर्ष राजाप्रमाणें प्राणत्याग करूं शकत असाल तर बरेंच. नाहींतर शत्रूच्या हातून आपणाला निस्संशय मोठी अवमानना प्राप्त होईल, हें उघड आहे'. यावर राजानें उत्तर दिलें, 'आत्महत्या करण्याचे धैर्य मला नाहीं. तेव्हां तसा प्रसंग आलाच तर तुम्हीच कोणी तरी मला मारा.'

एखाद्या हलकटाप्रमाणें भिऊन गांगरलेल्या त्या राजाचे हे शब्द ऐकून, त्या मंत्र्यांचे नेत्र भरून आले. व मोठ्या दुःखानें ते म्हणाले, 'दुर्दैवानें तसा प्रसंग आला व आम्हाला त्याचा प्रतिकार करण्याची शक्ति न उरली तरी, त्यावेळीं आपण म्हणतां तसले कृत्य करण्याला आमचे हात कसे पुढे सरसावतील ?' त्या दीन व हताश झालेल्या राजाचें हें कळवळ्याचें भाषण त्यांनीं ऐकून घेतलें व त्याचा प्रतिकार केला नाहीं, त्या अर्थीं त्यानें खरोखर जणों त्या नरपशूंनाच पोसलें होतें! (१४१०)

युगांतापर्यंतहि टिकलेल्या शरीराला कांहीं कष्ट देऊन विजयी होता येत असतांना त्याचा त्याग करणाऱ्या लोकांना धिक्कार असो! ज्या स्वामिभक्तीचें ध्यान करून स्त्रियाहि सहज अग्निप्रवेश करतात, ती विसरणाऱ्या पुरुषांहून अधिक अधम कोण असेल ? भर्त्याचें दैन्य; शोक, भय, वगैरे स्वस्थपणें तमाशासारखें पाहणाऱ्या लोकांमुळें, ही पृथ्वी सतीर्थ असूनहि अपवित्रच राहते. पुत्र क्षुधेनें व्याकुळ होऊन मेलेला; स्त्री निरुपायानें परगृहीं दास्यासाठीं पाठवावी लागत असलेली, उत्तम मित्र दुःख व दैन्यमग्न, दुभती गाय खाण्यापिण्यावाचून विवश होऊन हंबरणारी, आईबाप रोगग्रस्त व पथ्यापाण्याच्या अभावीं मरणाच्या दारांत बसलेले आणि स्वामी शत्रूनें जिंकून धरून नेलेला. या गोष्टी पहाव्या लागल्यावर, त्या माणसाला नरकामध्यें अधिक यातना त्या कोणत्या भोगाव्या लागणार?

त्या राजानें पूर्वीं उदात्त कृत्यें केलेलीं असूनहि, हल्लीं, जणो भूतसंचारामुळें, त्याच्या हातून अनन्वित चुका घडल्या व घडत होत्या. त्यानें त्या नरपशूंना पुनः म्हटलें, 'अलीकडच्या काळांत मजप्रमाणे विशाल वैभवानें व मनसोक्त असा राज्याचा उपभोग दुसऱ्या कोणालाहि घेता आला किंवा येणार नाहीं. या कलियुगांत, राजाच्या जिव्हाग्रावर यम व कुबेर राहतात, ही म्हण मजविषयींच काय ती खरी होती. रुद्र, उपेंद्र, इंद्र यानाहि नियति वशानें ज्या मार्गानें अवश्य जावेच लागतें, तेथे मजसारख्या मर्त्याची कथाच काय ? पण मला दुःख वाटते तें हेंच कीं, ही कुलवधू पृथ्वी माझ्या दोषामुळें, आतां एखाद्या बाजारबसवीप्रमाणें जबरदस्तीच्या उपभोगासाठीं ओढली जाणार. (१४२०) इतःपर केवळ कारस्थानाच्या द्वारेंच विजयप्राप्ति करूं जाणणाऱ्यालाच, या नष्टप्रभ राज्याची हाव धरतां

येईल. त्याच्यासाठीं मी अलौकिक कृत्यें केलीं तीं व्यर्थ गेलीं, म्हणून आतां उदयास येणारे अल्पसत्व लोक मला हंसतील.

'एकादा उद्योग यशस्वी झाला म्हणजे, तो त्या कालाला अनुरूप होता किंवा नाहीं इकडे लक्ष न देतां, त्याला बहुतकरून कोणी नांवें ठेवीत नाहींत. समुद्रमंथन फलद्रूप झालेलें पाहून त्या कामीं पर्वतांचा पक्षछेद करणारा इंद्र सहाय्यकर्ता व ज्याचा रस-विष-मृत्युप्रद असा वासुकी रज्जू झालेला, असल्या अडचणीवरून मंथा बनलेल्या मंदराचलाला कोणी नांवें ठेवतो आहे कां !

'मी शास्त्रचिकित्सा व विनियोग जाणत असूनहि प्रजेच्या रक्षणासाठींच श्रीगर्भत्व प्रदर्शित करीत होतों, हेंच माझ्या सर्व मूर्खपणाला कारण झालें. चंचलचित्त उच्चलाचें शहाणपण एका अंगुलीच्या टोंकाइतकें आहे. तोहि आतां आपले काळे दांत विचकीत मला हंसूं लागेल. मी हल्लीं इतका विवश झालो आहे, तो अवमानामुळे. भीतीमुळें नव्हे. म्हणूनच मी असल्याहि मृत्यूची इच्छा धरतों आहे आणि, त्या राजाला त्याच्याच लोकांनीं मारलें नसतें तर त्याचें राज्य त्याच्यापासून कोण घेऊं पावतां ? अशी आपली ख्याति राहावी, असें मला वाटतें. पूर्वी अनेक राजांच्या शिरावर तळपत राहिलेल्या मुक्तापीड राजाला शत्रूंनीं संधि साधून प्राण संकटांत आणलें. तो थोडयाशा लोकांनिशीं उत्तरापथामध्यें अनेक मार्गांनीं जागजागीं सैन्य रोकून ठेवून संचार करीत असतांना, त्याचा शत्रू शल्य राजा यानें त्याला एका दुर्गमस्थळीं कोंडलें. त्या शल्य राजाजवळ आठ लक्ष स्वार होते. ( १४३० ) मुक्तापीडाला सामान सुमानाचा मारी तुटवडा पडला होता. त्यानें आपला मुख्य मंत्री भवस्वामी याला त्या प्रसंगीं काय करावें अशी सल्ला विचारिली. तेव्हां त्यानें त्या अप्रतिकार्य अडचणींतून पार पडणें अशक्य जाणून व योग्यायोग्य विचार करून निश्चय ठरविला व म्हटलें, 'कीर्तीचा अभिमान धरणाऱ्यांना त्यांची प्रतिभाच युक्तिप्रयुक्त उपाय सुचविते. लब्ध प्रसिद्धीचें संरक्षण, हेंच शाहाण्या व कर्त्या लोकांचें खरें कर्तव्य होय. साम्राज्योपार्जनरूपी व्यापार त्याला आनुषंगिक असतो. पार्थिव शरीर भस्मसात् झालेल्या प्राण्याचें, कापराप्रमाणे त्याच्या कीर्तीवरून अनुमान होत असतें. शांत झालेला अनंग व यशस्वी वीर. या दोघांना अंगनांचे अपांग व स्तुतिपाठकाच्या जिव्हा, अशीं दोनच अद्भुत व कायमचीं पुनर्जीवनाचीं स्थानें होत असतात. कीर्तीचें संरक्षण हेंच प्राण्याचें कल्पांतरांतील कायमची स्थिति होय. कीर्तिरूप काय कायम राहण्यांतच त्या घटक परमाणूंचें कार्य संपूर्ण होत असतें. विरोधी लोकांमध्यें धीरवीरांनीं नेहमीं सावधान अशा विधीकडे सारखें लक्ष ठेवलें पाहिजे. कारण तोच त्यांची उन्नति होऊं न देतां, नाश करण्याला सारखा झटत असतो. उन्नताला हटकून खालीं पाडणें, हे विधात्याला जणों व्यसनच असतें. तें व्यसन तो, स्वतःचें उत्पत्तिस्थान अशा कमलाच्या कुलांत पैदा झालेल्या पद्मखंडामध्यें सुद्धां दाखवितो. कारण तो, द्विजपति चंद्र मावळतांच, अशुचि अशा मातंगाच्या शुंडाच्या आघातांनीं त्यांचा फडशा करवीत असतो. थुडत असलेल्या कीर्तीचें रक्षण करण्यात उपेक्षा कर-

णारांना रक्षण करण्याचें दुसरें राहिलेंच काय? (१४४०) सद्वंशांत पैदा झाल्यामुळें ज्यांची राजे लोकांत गणना होऊं शकते व त्या प्रतिष्ठेसाठीं ज्यांना वेत्रांकुरांप्रमाणे, जाळून घ्यावें लागतें. त्यांचें क्रुद्ध भूपतीरूपी विधीच्या हातून रक्षण होत नाहीं. 'महाराज, यावेळीं पूर्वी उपभोगलेले सर्व राजभोग पार नष्ट झाले आहेत. तेव्हां आतां फक्त स्वत:ची प्रतिष्ठा कायम राखण्याला नेटानें झटलें पाहिजे. आपण आज, आपणाला एकाएकीं दंडकालसक' हा शीघ्र परिणामी-अतिसारासारखा-रोग झाला आहे असें प्रसिद्ध करावे. पुढे ही आपत्ति टाळण्यासाठीं काय उपाय योजावयाचा तें मी उद्यां सांगेन.' असें बोलून तो घरीं गेला.

त्याप्रमाणें बहाणा करून तो राजा मोठमोठ्यानें, मरणप्राय इवळूं लागला व त्याने डोळे घट्ट मिटले. स्वेदन, संवाहन, वमन वगैरे उपायांनीं त्याला उतार पडेना. तेव्हां आतां हा लौकर खास मरणार, असें लोक म्हणूं लागले. तो उपाय सांगणाऱ्या त्या मंत्र्यानें कृतज्ञता व्यक्त करीत अग्निप्रवेश केला व अशा रीतीनें त्यानें पुढील कर्तव्य, दाक्षिण्यामुळें तोंडानें न सांगतां, युक्तीनें व कृतीनें सुचविलें. याचा मुक्तापीड राजाला आनंद झाला, व त्यानेंहि आपणाला, ही दुस्सह व्यथा सोसवत नाहीं, असें म्हणून अभिमानपूर्वक अग्नि प्रवेश केला. त्या शहाण्या राजानें अशा रीतीनें प्राण देऊन स्वतःसाठी स्वर्गप्राप्तीचें हे जणों सोपानच तयार केलें. याप्रमाणें दृढ निश्चयी राजे स्वतःचा दृढ निश्चय किंवा मंत्र्याची सल्ला याच्या द्वारें, आपणावर विधिला दीत असलेल्या अपयशाचें निवारण करतात. (१४५१)

नंतर हर्ष राजाला त्याच्या मंत्र्यांनी राजवंशाच्या रक्षणासाठीं राजपुत्र भोज याला लोहरकोट येथें पाठवावें, अशी सल्ला दिली. राजपुत्र मंगल प्रस्थान ठेवून निघाला असतांना, दंडनायकाच्या सांगण्याचा मोह पडून राजानें त्याला परत आणविलें. त्यावेळी त्याचा विनाशकाळ जवळ आलेला असल्यामुळेंच जणों, त्याचें शहाणपण धैर्य, दृढनिश्चय, सर्व कांहीं एकदमच नष्ट झालें.

लक्ष्मीरूपी तडिल्लता कीर्तिरूपी बलाका, शौर्यरूपी गर्जित, प्रतापरूपी इंद्रचाप, हे सर्व भागधेयरूपी मेघमालेच्या मागून जात असते. नशीब बलवत्तर असल्यावेळीं आपल्या शौर्य, वीर्य, धैर्यादि गुणांनीं ज्या राजाने एकट्याने इंद्राशीं स्पर्धा करीत नृपश्रीचें आक्रमण केलें होतें, तोचि दुर्भाग्य पुढें उभें राहतांच, अगदीं पंगु, जड, अंध व विमूढ होऊन जातो आणि त्याचें पाऊल या पृथ्वीवर टिकलें तरी कसें, असें लोकांना वाटूं लागतें.

शत्रूवर धाडण्याचें तंत्रि सैन्य नगरांतच असूनहि राजाजवळ भत्ता मागूं लागले. बहुतेक राजसेवकांनीं शत्रूचा आश्रय केला. थोडेसे सेवक नुसते देहाने राजवाड्यांत होते त्यांच्यापैकीं दोघांतीघांनींच शत्रूचा आश्रय करण्याची कल्पनासुद्धां मनांत आणली नाहीं, हें खरें. तरी पण त्यांना लौकरच बायकाप्रमाणें प्राण दिले. तेव्हां त्यांची तरी थोरवी कशाची वर्णावी!

काणश्रावती नांवाची नाटकशाळा होती. तिनें एक अज्ञातकुलांतील जयकतीं नांवाची मुलगी पाळली होती. (१४६०) तिचा मोतुर लागल्यानंतर ती उच्चलाकडे व नंतर

द्रव्यलोभानें मंडलेश्वर आनंद याच्याकडे पोंचली. आनंद मेल्यावर ती पुनः निर्लज्जपणें उच्चलाकडे परत आली. तीच पुढें भाग्यवशांत उच्चलाची पट्टराणी झाली.

राजाचे सेवक निर्भयपणें त्याच्या समक्ष उच्चलाविषयीं हव्या तशा गोष्टी बो लागले. तसेंच ते भाडेकरी सैनिक कोणा तरी शिपायाला आपला म्होरक्या-वकील-म्हणून पुढें करीत. तो 'सारे सेनाधिकारी कुचकामाचें व लोभी आहेत,' असें मोठमोठ्यानें बडबडे व लढाईच्या प्रसंगीं सैनिकांचा हुरूप व धैर्य नष्ट करीत असे तसेंच तो स्वतः निरुपयोगी असतांना दुसऱ्या लोकांची थट्टा व मर्मभेद करीत असे. रसद वाटणीच्या वेळीं विशेष हक्का-विषयीं आग्रह धरून, तो नसते झगडे उठवी आणि आपल्या मालकाच्या औदार्याची तारीफ करण्यांत निपुणता दाखवी. असा प्रत्येकजण फौजेंतील शिस्त बिघडवून, तिची दुर्दशा करीत होता.

श्रीलेखा राणीच्या भाच्याचा पुत्र व्यड्डमंगल याला राजानें त्याच्यावर हल्ला करवून ठार मारविलें. तो मल्लाच्या कुळांतला होता. मल्लाच्या साऱ्याच कुलावर राजाचा भारी राग होता. व्यड्डमंगलाची पत्नी, मल्लाचा मेव्हणा आनंद, याची कन्या व तिची सासू, यांनीं आपल्या घराला आग लावून त्याच्यांत जाळून घेतलें.

यावेळीं राजाच्या पत्न्यांपैकीं शाही घराण्यांतील राजकन्यांनीं राजाला म्हटलें, 'मल्लराज मोठा धार्मिक व मुनिसारखा.पण आंतून तो अंतकालाच साजे असा क्रूर व दुष्ट आहे. मौन वगैरे तापसानुरूप गुणाच्या द्वारें त्यानें आपल्या दरबारी लोकांमध्यें गुप्तभेद चालविला आहे. तो आपल्या पुत्रांना राज्य मिळावे, याविषयीं फारच उत्सुक आहे. त्या आपल्या कट्या शत्रुला खुशाल मारून टाकावें. ' ( १४७० ) हें काम राजानें स्वतः हातीं घेतलें. तो सैनिकांसह त्याच्यावर चालून गेला आणि त्यानें त्याच्या वाड्याला वेढा घातला, त्याचा स्वतः प्राण घ्यावा, अशी त्याला फार उत्सुकता होती, म्हणून तो मल्लाच्या दारापुढें उभा राहिला त्याची इच्छा तृप्त करण्यासाठीं मल्लराज स्वतः पुढें आला.

मल्लराजाचे दोघे पुत्र राज्यप्राप्तीसाठीं बंड करण्यास तयार झाले, तेव्हां त्यांनीं निघून येण्याबद्दल आग्रह केला असूनहि तो तपस्व्याप्रमाणें आचरण करीत, इमानानें राजाच्या पक्षाकडेच राहिला होता. राजाला विश्वास पटावा म्हणून आपल्या श्वेत नांवाच्या दुसऱ्या कुटुंबाचे पुत्र, सल्हण वगैरें यांना जामीन देऊन तो स्वस्थ घरीं स्नानसंध्या करीत राहिला होता. तो जन्मभर अग्नीची उपासना करीत आला होता. अशा त्या मल्लराजाविरुद्ध त्या हतभागी हर्षराजानें ही व्यर्थ उठावणी केली होती.

वाड्याला वेढा पडला तेंव्हां मल्लराज देवपूजेंत होता. तसाच उठून तो बाहेर आला. त्यानें यज्ञोपवीत मालाकार घातलेले, त्याच्या हातांत रुद्राक्ष माळा व बोटांमध्यें दर्भांची पवित्रकें शोभत असलेली, ललाटावर जणों सुहास्यच असे सुरेख भस्म चर्चिलेलें, असा तो प्रति जामदग्न्यच वाटत होता. नुकतेंच स्नान केलेलें असल्यामुळें त्याच्या मस्तकावरील ओलसर व काळ्या पांढऱ्या जटा, जणों त्या मरण्यास तयार झालेल्याच्या शिरावर, प्रयाग

येथील यमुना व गंगा यांच्या पडणाऱ्या सम्मिश्र जलासारख्या भासत होत्या. त्यानें बांधलेला वीरपट्ट उष्णीषासारखा दिसत होता. हातीं ढाल आणि नग्न खड्गरूपी दंड, धारण करून, तो जणों असिधारा तर्थियात्रेलाच निघाला होता. त्याच्या पदरीं उत्तम भोग भोगलेले व मान्यता पावलेले असे त्याचे कांहीं भृत्य, त्याच्या पूर्वींच बाहेर पडून, त्यांनीं स्वर्गांगना भोगप्राप्तीच्या संबंधांत आघाडी मारली होती. त्याच्या बरोबरच रग्यावट्ट व विजय, हे द्विज, त्याचा उपाध्या, कोष्टक नांवाचा पाकशाळेवरील मुख्य व्यवस्थापक आणि सजक नांवाचा शिपायी, हेहि लढतां लढतां मारले गेले व त्यायोगे त्यांनी यश संपादन केलें. ( १४८० )

त्याचा द्वारपाल उदयराज हा जखमी झाला. तो व त्याचा गुमास्ता अज्जक, हे बचावले. त्यांची मरण्याची वेळ आली नव्हती. शत्रूने द्वार अगदीं रोकलेले पाहून मल्लानें बेधडक त्यांच्यावर उडी मारली, खड्गरूपी शैवाल व खेटकरूपी कमलें यांच्यामध्यें यथेच्छ फिरणाऱ्या शुभ्र राजहंसाप्रमाणें तो जरा धवलित वीर क्रीडा करीत होता. पण लौकरज त्याला शतशः तीक्ष्ण शर लागले व तो भीष्मासारखा वीर शरशय्येवर पडला.

त्या मृत्यूच्या दाराशीं पोंचलेल्या राजाचें कोणचें म्हणून कृत्य शोभनीय नव्हतें? त्या दुष्टानें मल्लराजाचा शिरच्छेद करविला आणि उन्मत्तपणानें त्याच्या प्रेताच्या पाठींवरुन घोडा चालविला!

मल्लाची पत्नी कुमुदलेखा राजघराण्यांतली होती. ती व तिची बहीण वल्लभा, यांनीं वाड्यांतच अग्नी पेटवून, त्यांच्यांत आपले देह अर्पण केले, सल्हण व रिल्हण यांच्या तरुण पत्न्या, राज व अवकल्या यांच्या कन्या, राजा व अकल्या, यांनी, तसेंच अंतःपुरांतील सर्व उपभोग भोगलेल्या सहा दुसऱ्या स्त्रिया यांनींहि त्याच अग्नींत प्राण दिले. हा प्रकार वितस्तेच्या डाव्या कांठावरील त्याच्या वाड्यांत घडला, त्या मोठ्या थोरल्या वाड्याच्या आगीनें आणि शोकसंतप्त लोकांच्या अश्रुजलानें वितस्तेचें पाणी तापून गेलें.

भावी राजे उच्चल व सुस्सल यांची माता नंदा मल्लराजाच्या उजव्या कांठावरील वाड्याच्या अंतःपुरांत होती. ती वाड्याच्या सर्वांत उंच गच्चीवरून उत्तरेकडे व दक्षिणेकडे आपल्या दोघांहि पुत्रांच्या सैन्यांतील आगीच्या शेकड्यानी उठलेल्या धुराकडे आतुरतेनें पहात होती. तिनेंहि डाव्या कांठावरील वाड्यांतला क्षेत असलेला प्रकार पाहून, स्वतःला जाळून घेतलें. अग्निप्रवेश करतां करतां त्या सतीनें 'हे माझ्या पुत्रांनो, तुमच्या पित्याचा असा घात करणाऱ्याच्या वंशाचा, थोड्याच दिवसांत तुम्हीं जामदग्न्याप्रमाणें पार उच्छेंद कराल,' असा घोर शाप दिला आणि उभ्या उभ्याच अग्नींत उडी टाकली. त्यावेळीं तिच्या भोंवती अग्नींच्या ज्वाळा तिच्या प्रियसख्यांप्रमाणे सारख्या नाचत होत्या.

तिची दासी चंद्री, आपल्या पोटच्या मुलीसारख्या त्या राजकन्येला निर्वापांजलि दिलेला पाहण्याला असमर्थ झाली व तिनेंहि अग्नींत उडी टाकली. ( १४९४ )

सुदैवानें, दर्शनपालाला मारण्याला राजा घटकोघटकीं उत्सुक असूनहि, त्याचें विलक्षण प्रकारानें रक्षण झालें याचें कारण त्याचें आयुष्य आणखी कांहीं दिवस बाकी होतें. तो पुढें अवमानरूपी कटु फलाचा आस्वाद घेण्यासाठींच जणों आणखी बारा महिने जिवंत राहिला होता.

उच्चल व सुस्सल यांना पित्याच्या भयंकर वधाचें वृत्त भाद्रपद वद्य नवमीला कळलें. तें ऐकून त्यांना भारी शोक झाला. पण तो शोक तदुत्पन्न विलक्षण क्रोधामुळें मागें पडला.

दुसऱ्याच दिवशीं सुस्सलानें क्रोधावेशानें नगरावर चाल केली व मार्गांत लागलेले वन्हिपुरापर्यंतचे गांव जाळून टाकीत तो विजयक्षेत्राच्या रोखानें निघाला. त्याला तोंड देण्यासाठीं चंद्रराज निघाला असतांना, पट्ट व दर्शनपाल वगैरे आपापलें सैन्य घेऊन त्याला सोडून निघून गेले. आपल्याच लोकांनीं असा दगा दिला तरी, चंद्रराजानें बरोबरच्या थोडयाशाच सैन्यासह शत्रूंच्या भारी फौजेशीं लढून पुष्कळ वेळ टिकाव धरला. (१५००)

अश्वीतमल्ल व चचरी वंशांतील मल्ल, हे दोघे राजाच्या घरीं वाढलेले होते. त्यांनाहि अप्सरांचा समागम प्राप्त झाला. तसेंच त्या सम्मर्दामुळें उडालेल्या धुरळ्याला चंद्रराजाच्या चंद्रासारख्या श्वेत छत्रानें जणों उजळा येत असतांना, तो चंद्रराज व त्याचा अनुचर इंदुराज, हेहि देवांगनांना आलिंगनें देण्याला रवाना झाले.

अशा या वीरांच्या मरणामुळें हर्ष राजाच्या आशारूपी कमलिनीच्या गड्ड्याचें, निर्दय विधीनें समूळ निर्दाळण केलें.

सुस्सल विजयेश्वरांत शिरला हे पाहून पट्ट वगैरे घाबरून विजयेश्वराच्या मंदिरांच्या आवारांत शिरले व त्यांनीं त्यांचें महाद्वार घट्ट बंद केलें. तेथील आस्थानीय पद्म हा बाहेरच लढत असतांना मारला गेला व लक्ष्मीधर जिवावर उदार होऊन लढत होता, त्याला डामरांनीं धरून नेलें.

विजयेशाच्या खजीन्याच्या गच्चीवर चढून सुस्सलानें खालीं पाहिलें, तों त्या प्राकारांत ते सारे घाबरलेल्या पशूंसारखे गोळा झालेले त्याला दिसून आले. तो मोठा हुषार व धूर्त होता. त्यानें पट्ट व दर्शनपाल यांना अभय देऊन आपल्याकडे बोलावून घेतलें. दर्शनपाल हा वरवर हर्षाकडचा होता पण गुप्तपणें तो उच्चल व सुस्सल यांचें सहाय्य करीत होता.) त्यांना गच्चीवर चढण्याला जिना किंवा शिडी नसल्यानें सुस्सलाच्या सेवकांनीं सोडलेली दोरी धरून त्यांना वर चढावें लागलें. ते अर्धमेले व अतिशय लज्जित झालेले होते. त्यांनीं देशांतराला जाऊं द्यावें, अशी विनंति केली. ती त्या चतुर सुस्सलानें मान्य केली. त्यामुळें त्यांचें दैन्य तात्पुरतें कमी झालें. त्यांच्याशीं गोड गोड बोलून व त्यांना चमचमित व सुग्रास खायाप्यायाला घालून, त्यानें त्यांची चागली बरदास्त ठेवली. तिच्यामुळें त्यांचें देशांतराला जाण्याविषयींचें औत्सुक्य मंदावलें. ( १५१० )

दुसरे दिवशीं सुस्सलानें कोणी अंगांत संचार केल्यासारखें भयंकर व निर्घृण कृत्य केलें. त्याच्या स्मरणानें जगत्स्रष्टा ब्रह्मदेव सुद्धां रोमांचित झाला असेल. त्यानें मंदिराचे

महाद्वार उघडविलें व तो हातांत नागवी तरवार घेऊन तो एकटाच त्या जमलेल्या लोकांमध्ये घुसला. त्यानें त्यांची यथास्थित निर्भत्सना केली. त्यांच्यामध्यें हर्षाचा मामेभाऊ राजा जासट आणि उमाधर प्रभृति आणखी तीन राजे, राजवंशी, राजपुत्र, सामंत प्रतिष्ठित एकांग स्वार, तंत्री आणि अठरा सैन्य विभागांतील दुसरेहि अगणित लोक होते. ते त्याला शरण आले. तेव्हां त्यानें त्या सर्वांना विजयेश लिंगाच्या साक्षीने अभय दिलें व तो गच्चीवर परत गेला. त्यानें त्या सर्वांचीं शस्त्रे काढून घेवविली आणि त्यांना मुसक्या बांधवून बाहेर काढले व ढोरांप्रमाणें डामरांच्या पाहाऱ्यांत दिलें. त्यावेळी सुस्सल बसलेली ती गच्चीवरील त्याची दरबाराची जागा त्या लोकांच्या हातातील काढून घेतलेल्या तरवारींच्या सोन्यारुप्याच्या मुठींनीं फुलें उधळल्यासारखी दिसत होती. तेथें त्यानें तीन दिवस मुक्काम केला. पुढें तो सुवर्णसानूर येथें पोंचला. (सुवर्णसानूर बहुधा शुकू परगण्यांतील हल्लींचे सुनसामिल गांव असावे. त्यानें डामरांच्या स्वाधीन केलेल्या लोकाचें पुढे काय झालें याचा खुलासा झालेला नाही. त्याच्या कृत्याला कल्हणाने निर्घृण म्हटलें आहे. त्यावरून ते सर्व डामरांच्या हातून मारले गेले किंवा कसे, हें कळत नाहीं) सुस्सलानें पट्ट व दर्शनपाल यांना त्यांच्या मर्जीप्रमाणे परदेशी जाण्याला परवानगी दिली. पट्ट शूरपुराला पोंचला. तेथें त्याला त्याची पत्नी घरून येऊन मिळाली. (१५२०) तसा तो देशांतराला जाण्याचा बेत विसरला. दर्शनपालानें तरी जाण्याचा नुसता आव आणला होता. पट्टाच्या मैत्रखातर त्यानेंहि आपला विचार रहित केला.

सुस्सलाचा विचार स्वतःच गादी बळकावण्याचा होता. म्हणून नगराचा कबजा उच्चलाला प्रथम मिळूं नये याविषयी त्याने योजना चालविली. दोघेहि बहुतेक सारख्याच वयाचे, उद्दाम व हेकेखोर होते. त्यांना वडील धाकटपणाची जाणीव बहुतेक नव्हतीच. सुस्सल कर्ता व उत्साहयुक्त होता. त्याने आसपासचीं बरीच स्थळें दोन तीन दिवसांत काबीज केलीं आणि तो स्वतः राजवाड्यापावेतो येऊन पोंचला. तो कलशपुर जाळणार इतक्यांत युवराज भोजदेव किंवा बप्प हा, त्याच्याशी लढण्याला बाहेर पडला.

आपल्या सारखाच तोहि दुष्ट असेल व आपणाला जाचक होईल, या समजुतीनें हर्षाने त्याला आजवर बलहीन समजून अटकावांतच ठेवले होतें. पण यावेळीं त्याला निरुपायानेच मोकळीक मिळाली होती. त्यानंतर त्यानें किती म्हणून लढायामध्यें पुढाकार घेतला नाहीं? त्याचा पणजा अनंत देव याच्याप्रमाणें त्याला शिक्षण मिळालें असतें तर त्यानें उत्साहानें आपल्या सर्व दायादाचें निर्मूलन करण्यांत थोडीच कसर केली असती.

योग्य योजना व युक्ति सुचत नाहीं असा मनुष्य क्वचित. पण ती योजना अमलांत आणण्यांत हयगय होते. बर्ची, बाण वगैरे कसे मारावे, तें सर्वांना कळतें, पण ते निशाणावर मारूं शकणारा विरळा. शेरास सव्वाशेर भेटावा तशांतलाच हा सुस्सल व युवराज भोज यांच्या सामन्याचा प्रकार झाला. (१५३०) पिता कृतघ्न असल्यावर संतति तशी निपजली तर तिला नांवें कशीं ठेवतां येतील? तीळ किडके असले तरी पुष्पांच्या सहवासानें तेलाला आलेला सुवास थोडाच नाहींसा होतो.

राजानें गौरवानें वाढविलेला द्वेवेश्वराचा दुष्ट पुत्र पित्थ, शत्रुपक्षाला जाऊन मिळाला. पुढें सुस्सलाशीं युद्ध सुरू झालें तेव्हां पित्थाचा पुत्र मिल्ल, याला राजानें आपला तिरस्कार व्यक्त करीत, त्याचा घोडा परत मागितला. त्यावर मिल्लाला वाईट वाटून त्यानें विनंति केली, ' महाराज, माझी खरी योग्यता आज आपणाला कळून येईल. ' नंतर तो नेटानें व धैर्यानें लढाईत घुसला व त्यानें आपल्यावर आलेला डाग खड्गधाराजलानें पार धुवून काढला. हें पाहून व त्याच्या ईमानदारीची जाणीव होऊन, राजाला सर्वस्व नाशापलीकडे दुःख झालें. राजे लोक वैभवामुळें फसत असतात. त्याना आपल्या नोकरांची खरी ईमानदारी व योग्यता यांची जाणीव होऊं लागेते तोंवर, त्यांच्याहाती पोकळ शब्दांशिवाय कांहीं अधिकार रहात नाहीं.

भोजानें सुस्सलाचा पराभव केला तसा तो लवणोत्साला पळून गेला. तेथून तो दोन वेळां येऊन गेला होता. परिश्रम व सूर्याचा प्रखर ताप यामुळें भोज फारच थकलाभागलेला असा परत आला व तो राजा असलेल्या एका उद्यानांत जाऊन त्याच्याजवळच एका पलंगावर विश्रांतीसाठीं पडला. 'तितक्यांत राजवाड्याच्या उत्तरेकडून, नदी पलीकडच्या भागांतून मल्लराजाचा वडील पुत्र उच्चल धांवा करीत येतो आहे, पूल तोडून टाका.' अशी ओरड ऐकूं आली. ( यावरून राजवाडा नदीच्या डाव्या कांठावर होता हे उघड आहे )

' आजच नगराला न पोंचला तर सुस्सलाच्या हातीं गादी जाते, ' असा त्या दुष्ट व कृतघ्न दंडनायकानें उच्चलाला निकडीचा निरोप पाठविला होता. ( १५४० ) म्हणून तो घाईघाईनें व मोठ्या नेटानें धांवा करीत येत होता. वाटेत त्याला नरेंद्रेश्वरानजीक देवनायक आडवा आला. त्याला गांठून उच्चलानें ठार मारलें. ( हा देवनायक म्हणजे देवतोत्पाटननायक उदयराजच होता किंवा कसें, अशी शंका वाटते. कारण या नावाचा पुनः कोठें उल्लेख आलेला नाहीं. )

पुढें नगराधिकारी नाग, हा कांहीं स्वारांची पथकें व इतर सैन्य घेऊन त्याच्याशी लढण्यासाठी नगराबाहेर पडला. त्याच्याजवळच बहुतेक मुख्य फौज होती. तो सुस्सलावर जय मिळवून आला होता. म्हणून राजाची सारी भिस्त त्याच्यावर होती. उच्चलाजवळ थोडेसेंच सैन्य असल्यानें राजाला विशेष भीति वाटत नव्हती. उच्चलाला नागाची कांहींशीं भीति वाटत होती. पण नाग राजाशीं बेइमानी करून उच्चलाकडे गेला व आपलें शिरस्त्राण काढून नम्रपणें त्याला वंदन करीत त्यानें त्याचे अभिनंदन केले. उच्चलाला त्याचा विश्वास आला नाही. न जाणों तोही मंडलेश्वर आनंद याच्याप्रमाणे लबाडी करीत असेल, असें वाटून, त्यानें त्याला आपल्या घरीं परत जाण्याला सांगितलें. त्या राजद्रोही विश्वासघातकी व पापी नागाला स्वामिद्रोहाचें फल या जन्मांत लौकरच मिळालें. कारण पुढें तो या मंडलांतच भिक्षा मागत व विपन्न स्थितीत थोड्या दिवसांनीं मरण पावला.

नंतर हर्ष राजा नदी तीरावर पोंचतो तों त्याला दावानलाने करपलेल्या तरुखंडाप्रमाणें काळे, व विकृत वेशीं डामर पुलावर आलेलें दिसले. त्यांच्यामध्ये कृष्णपक्षी रात्रीं, चमकणाऱ्या शुक्राच्या चांदणीसारखा जनकचंद्र, अंगांत सफेत व चमकदार चिलखत घात-

लेला फडकत होता. राजानें तो मोठा नावांचा पूल स्वतःच्या फायद्यासाठीं व उपयोगासाठीं तयार करविला होता. तो यावेळीं दुर्दैवानें शत्रूच्या कामीं आला.

शत्रू इतका जवळ पोचलेला पाहून राजपत्न्या-शाहीराजकन्या-घाबरल्या. त्यांनीं जीव देण्याच्या निश्चयानें व हातीं अग्निकाष्ठें घेऊन त्या शतद्वार नांवाच्या राजवाड्याच्या एका भागाच्या वरील चतुष्किका नांवाच्या चौखंबी माडीवर चढून गेल्या. ( १५५० ) गांवचे लोक तिऱ्हाईत तमासगिरांप्रमाणें तटस्थ उभे राहून, पुलाच्या टोकावर चाललेले युद्ध, जणों शिमग्यांतला खेळ समजून, पहात उभे होते. राजाला जय मिळेलसें वाटत होतें. म्हणून त्यानें वाड्याला आग लावूं नका, असें राण्याना सांगून पाठवून, पुलाच्या त्या टोकावर लढाई चालविली होती. राजा आपल्या लढाऊ हत्तीवर पुलाच्या तोंडाशीं आपल्या लोकांच्यापुढें उभा होता. त्या हत्तीच्या अंगावर कवच घातलेलें निघून पडलें होतें. त्याच्या मर्मस्थानीं व सांध्यावर जनकचंद्र वगैरेनी खूप जोरानें बाण मारले ते वर्मी लागल्यामुळें राजाच्या दैवाप्रमाणेंच तो गजेंद्रहि उलटला व ची ची करीत मागें फिरून त्यानें आपल्याच फौजेचा चेंदामेंदा चालविला. साऱ्या पायदळाची व स्वारांची दाणादाण झाली. राजा शत्रूच्या सैन्याच्या माऱ्यापुढें सेतूच्या अलीकडे आला आणि कांहीं स्वारांसह घाबऱ्या घाबऱ्या त्या शतद्वार वाड्याच्या चौकांत शिरला. त्या वेळीं त्याची भारी दुर्दशा झाली होती. एकांतांत सुद्धां, उज्वल वेषाशिवाय, जो क्वचितच कोणाच्या दृष्टीस पडावयाचा आणि भोजनाच्या वेळेवांचून ज्याचें मुख कधीं वासलेले दिसत नसे, तो यावेळीं दीन आणि स्वतः व राण्या, याच्यासंबंधानें भयभीत झालेला होता. प्रखर सूर्यतापामुळें व घबराटामुळें त्याचें सर्वांग घामाघुम झालें होतें खांद्यावरून वरचेवर गळत असलेलें कवच सेवक सारखे सांवरीत होते. ( १५६० ) घोड्याला वरचेवर एडी लागल्यामुळें तो उखडूं पहात होता. त्याला रोंकण्यासाठीं तो सारखी लगाम आंखडून धरीत होता. त्याच्या टाळूवेला टक्कल पडलेले होतें. डोक्याच्या बाजूला थोडे थोडे केस होते ते तो तरवार लटकत असलेल्या हातांनीं कानामागें सारीत होता. त्याच्या कानांत कुंडलें नव्हती. त्या कानाच्या लांब पाळी त्याच्या उंच व सुकट मानेवर काळसर्पाप्रमाणें लडबडत होत्या. तांबूल न मिळाल्यामुळें सुकलेले ओंठ लाखलोट्यासारखे व करवडलेले दिसत होते ते तो वरचेवर कष्टानें हलवीत चाटीत होता. बुब्बुळांवर सुद्धां धूळ बसल्यामुळें त्याचा चेहरा रुक्ष व धूसर दिसत होता. तो वर करुन तो हताश होत्साता, गच्चीवर असलेल्या राण्यांच्याकडे पाहात व त्यांना आग न पेटविण्याबद्दल खुणावीत, व्यग्र चित्तानें, त्या वाड्याच्या अंगणांत घाबऱ्यां घाबऱ्यां फिरत असलेला लोकांना दिसत होता.

राजवाड्याजवळच मल्ल राजाचा दुसरा वाडा होता. त्याला जनकचंद्रानें नदी उतरून आग लावली. तिकडून आग जोरानें पेटत येत असलेली पाहून, युवराज भोज याला, राज्य खात्रीनें हातचें गेलें, असें वाटलें व तो दार उघडून शत्रूची गच्च व भयंकर फळी फोडून, तेथून पांच सहा स्वारांसह बाहेर पडला आणि सिंहराजमठाजवळचा सेतु वलांडून लोहराकडे रवाना झाला. तो दृष्टीआड झालेला पाहून राजाचे नेत्र भरून आले व तो

कांहीं स्वारांसह वाड्याबाहेर आला आणि युवराज गेलेल्या दिशेकडे शून्य दृष्टीनें पहात राहिला.

याच सुमारास अग्निप्रवेश करून जीव देऊं पाहाणाऱ्या राण्यांना सोडविण्यासाठीं कांहीं राजसेवक चतुष्किकेला धक्के देऊं लागले. ( १५७० ) ते शत्रूच समजून, शाही राजकन्यांनीं–राण्यांनी–त्या चतुष्किकेच्या वरच्या भागाला आग लावली. ती पाहतांच राजवाड्यांतील नोकर चाकर व डामर मंडळीं दांडगाई व मारामारी करीत आंत घुसले व लुटालूट करूं लागली. त्या गडबडींत पुष्कळांचे प्राण गेले व पुष्कळांचे जन्माचें दारिद्र्य दूर झालें. कांहीं लोकांना त्या लुटींत अपूर्व वस्तू हातीं लागल्या. त्यामुळें त्यांची स्थिति हास्यास्पद झाली. कोणी खडीसाखर समजून कापराचे खडे तोंडात टाकले. आणि तोंड भाजल्यावर त्यानें तें कापराचें भांडें नदींत फेकून दिलें. कांहीं हलकट वेडगळानीं सोनें काढून घेण्याच्या हेतूनें सोन्याचीं चित्रें काढलेलीं व जरीचीं वस्त्रें जाळलीं व नंतर राखेत सोनें शोधण्याला आरंभ केला. अखंड–वेज न पाडलेल्याबारीक मोत्यांचे ढीग बारीक तांदुळाचे ढीग समजून, एके जागीं कांहीं बाया तें तांदूळ भरूं लागल्या होत्या.

याप्रमाणें त्या मूर्खांच्या हातून विटंबना झालेली, या काश्मीर मंडलाच्या राज्यांतील अतुल लक्ष्मी, पुनः तेथें पूर्ववत् कधीं दृष्टी पडली नाहीं. विद्याधरीसारख्या उज्ज्वल वेश केलेल्या सुंदर सुंदर राजपत्न्यांना, दांडगे व क्रूर डामर जबरदस्तीनें ओढून नेत होते. त्यावेळीं वसंतलेखा प्रमुख राण्या व त्यांच्या सुनालेकी मिळून सत्रा जणींनीं, अनन्यगतिक होऊन, अग्निप्रवेश केला. बाकीच्या तेथून दुसरीकडे नेल्या गेल्या.

तो वाडा जळत होता त्यांतील जळणाऱ्या लांकडाचा चटचटा शब्द, प्रखर उष्णतेमुळें कढ आलेल्या आकाशगंगेच्या घोषासारखा वाटत होता. ( १५८० )

श्रीपद्मश्री पाणपोईच्या पाठीमागे उभा असलेला राजा, हा सर्व प्रकार पाहात होता. तेव्हां त्याला पुढील अर्थाच्या प्राचीन श्लोकाचें स्मरण झाले व तो श्लोक त्यानें मोठ्या खेदाकष्टानें अनेकवार म्हटला, ' प्रजापीडनाच्या परितापानें उठलेला अग्नी राजाचे कुल, संपदा, श्री आणि प्राण, यांना निश्शेष जळल्याशिवाय शांत होत नाहीं. '

राजापाशीं अद्यापि कांहीं सैन्य असलेलें पाहून, उच्चल राजधानीला आग लावून डामरांसह पुनः नदी उतरून पलीकडे गेला. राजाच्या मनांतून लढाईंत प्राण देण्याचें होतें पण पायदळ सैन्य एक मतानें लढण्याला तयार होईना. त्यांचे निरनिराळे बेत चालले होते. त्यामुळें राजा गोंधळून गेला. पुढें अनंतपाल व दुसरे राजपुत्र, याच्या विचारानें तो लढण्याला निघणार, इतक्यांत दंडनायक त्याला आड आला.

चंपकाने त्याला ' युद्ध करा, किंवा लोहराकडे तरी चला, ' असें सांगितलें. प्रयागाचें म्हणणें लोहराला जावे असेंच होतें. युवराजाकडील वार्ता न मिळाल्यानें व्याकुल होऊन, राजानें चंपकाला त्याच्या शोधाला जाण्यास सांगितलें. तेव्हां चंपकाने मोठ्या दुःखानें म्हटलें कीं, ' महाराज, असें केल्यानें लौकरच आपल्यापाशीं प्रयागाशिवाय

कोणी उरणार नाहीं. तेव्हां आपण मला तरी दूर करूं नये. ' त्याला राजानें, अश्रु गाळीत म्हटलें, ' आपण कृतघ्न नाहीं हे मी ऐकिले आहे. मग आपण हें माझें म्हणणें कसें ऐकत नाहीं?' पुत्रावाचून मी आंधळा. मला दिवसां उन्हांत सुद्धां दिशाभूल होते आहे. तो आपल्या अंकावर वाढलेला, त्याच्यावर रागावणें आपणाला योग्य नाहीं.' ( १५९० ) त्या मंत्र्याशीं युवराजाचा एका घोडीवरून तंटा झाला होता. त्यावरून राजा, त्याला हें असें लावून बोलला होता. हे ऐकून चंपक मंत्री खजील झाला व युवराजाच्या शोधाला निघाला. तेव्हां त्याच्या बरोबर त्याचे बंधू व नोकर मिळून सुमारें पन्नास स्वार होते. नदीपार होईतों त्यांच्यातून त्याचे दोघे बंधू घोडयावर स्वार शेषाराजाचा पुत्र आणि धनक, असे पाचच बाकी राहिले. शेषाराजाच्या पुत्राचा घोडा वाटेंत मरण पावला. ते पुष्कळ वेळ युवराजाचा तपास करीत भटकले. पण त्यांना त्याचा पत्ता लागला नाही. संध्याकाळीं ते वितस्ता व सिंधु यांच्या संगमावर पोचले. त्याच्याप्रमाणें राजानें आपल्या दुसऱ्याहि कांहीं आप्तांना युवराजाच्या शोधाला पाठविलें होतें. तेव्हा त्याचा पक्ष सोडून जाण्याला त्यांना हे आयतेंच साधन मिळालें.

दंडनायकाने राजपुरी वगैरे ठिकाणच्या लढायांत लांच खाऊन लबाडी केली होती व तो राजाशीं नाराज झालेला होता. त्यानें योग्य अंमलदारावर दात धरून सारी फौज निस्सत्व व निरुपयोगी करून टाकली होती. राजा युवराजाला लोहराला जाऊं देत असतांना तो आड आला होता. राजा दुसरीकडे लढाईत गुंतला असतांना त्यानेच शत्रूला नगरांत बोलावून घेतले होतें. त्यानें यावेळींहि राजाला योग्य कर्तव्य बजावण्यामध्ये आडकाठी आणली.

राजा यावेळी पूर्तांच संकटात फसले असल्यामुळें अगदी भांबावून गेला होता. याला काय करावे याचा पक्का निर्णय करतां येईना. त्याची बुद्धि अस्थिर व चंचल झाली होती. त्याचें धैर्य तुटलें होतें. ( १६०० )

वेणुवाद्यामध्यें साऱ्याच छिद्रांतून एकदम वारा जाऊं लागला तर चांगला सूर कधीं निघत नाहीं. त्याचप्रमाणें नानामतांनीं बाधित असलेल्या सल्लामसलतींत ठाम निश्चय ठरत नाहीं. सामान्य माणूस सुद्धां विचारल्याशिवाय मालकाला हवीतशी सल्ला देण्याचे धैर्य करूं लागणें, हें त्या मालकाच्या आसन्नवर्ती घोर विनिपाताचे पूर्वलक्षण होय.

राजा लढाईला निघाला असतांना त्रैलोक्य नांवाच्या सूतानें त्याच्या घोडयाच्या लगामाला हात घालीत, दंडनायकाची खूप तारीफ केली व म्हटले, 'महाराज, पूर्वी एकदा आपल्या आजोबांनीं एकांग व स्वार घेऊन जय मिळविला होता, तसेंच आपणहि करावे आपण यासाठीं अक्षपटल कचेरीला चलावें व तेथून त्यांना घेऊन शत्रूच्या पायदळप्राय सैन्या-वर पाठीमागून एकदम ससाण्यासारखी झडप घालून त्याचा नाश करावा. ' या गोष्टीला राजा तयार झाला तितक्यांत सैन्यांत एकच गडबड उडाली. आणि तमाशा पहात अस-

लेले लोक पावसाची सर येतांच उधळून जातात, तसें तें विस्काळित झाले. शेयाराज ( हा मागें १५९४ त्या श्लोकांत आलेला शेषराजच बहुधां असावा. ) याचे पुत्र येऊन पोचले. त्यांना युवराजाच्या वाटखर्चीसाठीं राजानें आपल्या गळ्यांतील रत्नांचा हार व इतर राजकीय आभरणें त्यांच्याकडे दिलीं. ते मूळचे काछयाचा धंदा करणारे होते. त्यांना तीं राजरत्नें उतरून दिल्यावर, त्याच्या तेजामुळें वैभवयुक्त व तेजस्वी दिसत असलेला राजा-लोकांना एकदम कलाहीन वाटूं लागला.

त्याचे सैनिक त्याला पदोपदीं सोडून जात होते. तो अक्षपटल व दुसऱ्याहि कचेऱ्या-मध्यें फिरून आला. पण त्याच्याकडे कोणीहि येऊन मिळाले नाहीं. सायंकाळीं तो आश्र-यासाठीं मंत्र्यांच्या घरोघर जाऊन दारांत उभा राहिला तर त्याला कोणीहि आंत बोला-वलें नाहीं. ( १६१० ) प्रायोपवेशनामध्यें मात्र कुशल, अशी नष्ट ब्राह्मण मंडळी, शेवटीं कोणाच्याहि उपयोगी क्वचितच पडते. अशा त्या नीचांवर राजे लोकांनीं विश्वास ठेवणें व्यर्थ होय. याप्रमाणें तो राजा नगरांतील प्रतिष्ठित मंडळींच्या घरोघर हिंडता हिंडतां, कपिल नांवाच्या मंत्र्याच्या घरापुढें पोंचला. तेव्हां तो मंत्री लोहरकोटाला गेलेला होता. त्याच्या पत्नीनें राजाला आपल्या घरीं राहण्याला व पुढें नांवेंतून लोहर येथें जाण्याला म्हटले. पण दैवमोहित झालेल्या राजानें तें ऐकलें नाहीं.

कपिलाचे पुत्र पित्याप्रमाणेंच कृतघ्न होते. सावकारापुढें गरीब ऋणको तोंड लप-वितों, तसे ते तोंड चुकवून राहिले. ते राजाचें संगोपन काय करणार! त्याच्या दुर्वर्तनावरुन लोकांनीं केलेली राजाची निंदा दुष्ट मंत्र्यांनीं त्याच्या कानावर घातली नव्हती. पण आतां त्याला ती स्वतःच ऐकावी लागली. तिच्यावरून त्याला आपण दोषी असल्याची जाणीव झाली. यावेळीं तो सर्व तऱ्हेने हताश झालेला होता जवळच्या माणसांचासुद्धां त्याला विश्वास येईना. शेवटीं तो प्रद्युम्नतीर्थाच्या पाहाडीपाशीं पोचला. तोंवर त्याच्याजवळ कोणी उरलें नाहीं. ( प्रद्युम्न पर्वत श्रीनगरांतील ' शारिका पाहाडी किंवा प्रद्युम्नशिखर. ) आपण छत्तीस कुलांतले आहों, अशी प्रौढी मिरवणारे, तेजस्वी, प्रतापी, सूर्यालासुद्धां स्वतःहून श्रेष्ठ न समजणारे, अनंतपालादिक राजपुत्र आपापला घोडा घेऊन अंधेर पडूं लागतांच त्या राजाला सोडून अदृश्य झाले.

तो जोहिल मठाशीं पोंचून घोडयावरून उतरला. तेव्हां जवळच आपल्या सासुर वाडीस रात्रभर राहातां येईल तर पाहून येतों, असा बाहाणा करून दंडनायक व त्याचा बंधु हे निघाले तेव्हां प्रयागानें त्याच्या बंधूजवळ वाटखर्चीसाठीं त्याची अंगदें—बाहु भूषणें—मागितलीं. पण त्यांच्याऐवजीं त्यानें त्याला थोडासा सत्तू दिला ! पुढें त्या राजा जवळ एक वस्त्रात्मक संपत्ति, एक स्वतःचा जीव आणि एकटाच सेवक प्रयाग, इतके अवशिष्ट उरले. त्याच सुमारास चंपक मंत्र्याचा सेवक जेलक याचा आचारी मुक्त हा सहज त्यांना येऊन मिळाला व तो राजाचा विश्वासू साथीदार झाला. जातां जातां त्यांना जवळच एका खोपटांत राहणाऱ्या स्त्रीनें, पुढील वाट फारच खडबडीत व पूराच्या पाण्यानें वरंघळी पडून

बिकट व खराब झालेली असल्याचें कळविलें. हें ऐकून ते वितस्तेच्या तीरावर बसले. तेथून जयपूरच्या किल्याला जाण्याच्या विचारानें प्रयागानें नाववाल्यांना हाका मारल्या. त्यांना व घाटावरील कांहीं शिपायांना सांगून त्यानें पूर्वीच राजाला भीमदेवाकडे पोंचविण्याचें योजिलें होतें. भीमदेव उच्चलाच्या पक्षाचा होता तरी त्यानें राजा आपल्याकडे आला तर आपण त्याचा पक्ष धरूं, असें सांगितलें होते. नाववाल्यांनीं नाव आणली.पण तो दुर्दैवी राजा, येथवर पाहाण्यांत आलेल्या प्रकारावरून अगदीं गोंधळून गेला होता. म्हणून तो नावेंत बसला नाहीं. विनाशकाल येतो तेव्हां, शरीर धारण करणाऱ्याची बुद्धि विपरीत होते आणि त्याचा प्राणरूपी दीप जणों कालसर्पानें दृष्टी टाकल्याप्रमाणें विजण्याच्या पंथाला लागतो.

राजा असा आश्रय पाहात फिरत असतांना त्याला नीलाश्व डामर बिंब याचें स्मरणच झालें नाहीं. त्यावेळीं सर्वत्र स्वामिद्रोहाचें सुभिक्ष होतें पण बिंब हा एकाद्या थोर कुलवधू-प्रमाणें आपल्या मालकाला सोडून दुसऱ्या कोणाकडेहि न पाहातां पूर्णपणें स्वामिभक्त राहण्यांतच समाधान मानून राहिलेला होता. हें विस्मरण तरी राजाच्या निभार्गी-पणाचेंच फल होय !

इतक्यांत घनदाट अभ्रें आलीं आणि त्या काळयाकुट्ट राजद्रोहानें दूषित झालेल्या क्षमेला–पृथ्वीला- धुवून स्वच्छ करण्यासाठींच जणों, धो धो पाऊस पडूं लागला. निर्जन व भयाण भूमि, संतत व मुसळधार पाऊस, निबिड अंधकार आणि क्षणोक्षणीं शत्रूचें भय अशा कोण कोणच्या म्हणून अनिष्ट गोष्टींचा अनुभव त्या राजाला यावयाचा बाकी उरला होता ?

वास्तविकपणें, त्या वेळी राजद्रोही बनलेल्या कोणाचेंहि स्मरण सुद्धा नको. पण निरु-पायानें कथेच्या ओघांत त्यांच्या नांवांचा उच्चार करावा लागतो आहे.

राजा पोंचलेल्या जागेजवळच एक स्मशान होतें. त्यांतील सोमेश्वराच्या मंदिरात सोमानंद नांवाचा सिद्ध, पूजाअर्चा करीत असे. मंदिराच्या सभोंवार गर्द झाडी होती व त्याच्या प्रशस्त आवारांत एक कुटी होती. तिच्यांत गुण नावाचा एक हीनजातीय भिक्षेकरी राहात असे. तो कुट्टणपणाचाहि धंदा करी. त्याच्या बरोबर भिश्चा नांवाची एक वृद्ध वेश्याहि असे. तिला लोक वृद्ध भुजंगी म्हणत. ही झोपडी प्रतापगौरीच्या मंदिरा-पासून दूर नव्हती. त्या झोपडीकडे मुक्त राजाला रात्रभर आडोशासाठीं घेऊन गेला.राजानें मुक्ताला व प्रयागानें राजाला धरलें होतें. तीघेहि त्या गडद अंधेरात क्षणभर चमकणाऱ्या विजेच्या प्रकाशानें हळूं हळूं चांचपडत रस्ता पाहत चालले होते.

त्या वेळीं राजाचें मस्तक उघडें होतें. भिजलेलीं वस्त्रें अंगाला चिकटलेली होतीं. ( १६४० ) असा तो वरचेवर अडखळत जातां, जातां त्याला प्रयाग व मुक्त या दोघांनीं एकदांचें त्या कुटीजवळ आणलें. त्या प्रसंगीं, उत्पलाला रुद्राचें स्मरण झालें होतें. त्या प्रमाणें त्या राजाला, दुष्ट मंत्र्यांच्या सांगण्यावरून घालवून दिलेल्या आणि सर्व आपत्ती टाळण्याला समर्थ, अशा कंदर्प मंत्र्याचें स्मरण येऊन भारी दुःख झालें.

ते पोंचले तेव्हां गुण बाहेर गेलेला होता. मुक्तानें कोटावरून आंत उतरून आवारांतील दाराचा अडसर काढला. नंतर प्रयाग व राजा हे आंत गेले. दारांतच राजाच्या उजव्या पायाला ठेंच लागली व रक्त निघाले. त्या अपशकुनावरून, आपला मृत्यू सन्निध येऊन ठेपला आहे, असें राजाला कळून चुकलें. कुटीच्या दाराला कुलूप असल्यानें त्यांना रात्रभर बाहेर अंगणांत उघड्यांतच बसावें लागलें. भयंकर अभ्रें येऊन गाढ अंधकार पडला होता. यामुळें ती रात्र अधिकच भीषण वाटत होती. त्यावेळीं राजा चिखलानें भरलेला होता पाऊस थांबल्यावर त्यानें सेवकाच्या जाडयाभरडया झुबक्यानें अंग झांकून घेऊन चिखलमातींत उघडया जमिनीवर उभ्या उभ्या उरलेली रात्र काढली. तो वरचेवर उठतबसत आपल्या दुःस्थितीचा विसर पाडण्याचा यत्न करीत होता. अंतःकरणांतील तीव्र व्यथेपुढें तो ती बसलेली जागा व आपली ती विलक्षण स्थिति या विषयींचे विचार पार विसरून गेला होता. त्याला झोंप कशी येणार? त्याला एकाद्या कडयावरून खालीं पडत असल्यासारखें वाटत होतें. आपण कोण—कोठें आहों—आपणाला कोणी घेरलें आहे, जवळ सेवेत कोण आहेत, यावेळीं आपणाला अनुकूल काय, प्रतिकूल कोणचें, पुढें कसें काय करावें वगैरे विचाराचे काहूर उठून, वरचेवर कापरें भरें. राज्य हरण झालेले, प्रिय पत्न्यांनी अग्निप्रवेश केलेला, पुत्राचा पत्ता नाहीं, स्वतः एकाकी, मित्र व पाथेय विरहित, एका भिकाऱ्याच्या अंगणात लोळत असलेले, अशा एकेका दुःखाचें स्मरण करीत असताना त्याला, इतक्या दुर्दशेला पोंचलेला आपल्यासारखा हतभागी, पुराणांतरींहि कोणी आढळणें कठिणच, असे वाटलें.

इकडे बरोबर उरलेल्या दोन तीन स्वारांसह युवराज भोज नगराजवळ-पासच्या भागांतून निघून हस्तिकर्ण येथें पोंचला. (१६५०) इंद्रदेखील आपला शत्रू असला तरी पांचसहा दिवसांत आपण राज्य परत मिळवूं अशी त्याला खात्री वाटत होती गर्भवासांतल्याप्रमाणेंच पौरुषस्फुरण पावत असलेल्या पुरुषाला काय काय म्हणून करण्याची हाव नसते! पण गर्भाशयांतून बाहेर पडतांच, प्राण्याला व कार्य करण्याला उद्युक्त होणाऱ्या पुरुषाला, पूर्वकर्मरूपी वायु व हतविधि, हटकून स्पर्श करून मोहून टाकतात. युवराजाच्या मातांनीं दिलेलें पाथेय आणण्यासाठीं नागेश्वर गेलेला होता. त्याची वाट पहात भोज हास्तिकर्णाजवळच्या रंगवाट नांवाच्या देवराईंतील एका पडक्या मंदिरांत राहिला होता. (हल्लीं देखील 'गुश' येथें एक आक्रोडाच्या झाडांची जुनीं देवराई आहे. तिला 'रंगबोर' 'रंगवाट' असें नांव आहे.) नागेश्वर आल्याचें वाटून तो मंदिरा बाहेर पडतो, इतक्यात नागेश्वर व त्याचे साथीदार यांनीं त्याच्यावर एकदम हल्ला केला. हा त्यांचा कृतघ्नपणा पाहून त्या क्षात्र धर्मावर कायम असलेल्या युवराज भोजानें केलेला पराक्रम, कोणाला आश्चर्यचकित केल्यावांचून राहील? त्याने सिंहाप्रमाणें लढून त्या हल्ला करणाऱ्यांचा संहार केला. शेवटीं अंगरागा ऐवजीं रक्तानें माखला गेलेला असा तो, वीर शय्येला भूषित करता झाला. त्याच्या बरोबरच त्याचा मामेभाऊ पद्मक आणि त्याचा प्रिय खेळगडी खेल हेहि चांगलें शौर्य गाजवीत मारले गेले.

उच्चल रात्रीं शूरमती देवीच्या मठाला पोंचला. तेथें त्याचा भाऊ सुस्सल रणश्रांत झालेला लवणोत्साहून येऊन दाखल झाला. राजपुत्र भोज मारला जाऊन एकटा हर्षच उरला आहे असें ऐकून, त्या दोघांनाहि काळजांतील तीक्ष्ण शल्य निघून त्याचें एक टोंकच उरलेलें आहे, असें त्यांस वाटलें. त्यांना देशांतर करावें लागलें होतें, त्याचें विस्मरण होऊन, त्यांना एथपर्यंत राजलक्ष्मी मिळाली असूनहि, ती न मिळाल्यासारखीच होती.

सकाळीं मुक्तानें त्या भिक्षेकऱ्याला कोठूनसें हुडकून आणलें. त्यानें राजाला वंदन केलें व त्या कुटीचें दार उघडलें. तिच्यांत किती तरी डांस भरलेले होते. जमीनीवर गवत पसरलेलें होतें. त्याच्यावर मुक्तानें थोडेसें पाणी आणून शिंपडल्यावर राजा आंत गेला, ज्याचे शब्द ऐकण्याचा प्रसंग मिळाला तर राजे लोकांना अहोभाग्य वाटत असे. तो हर्ष राजा या वेळीं भीतीमुळें, त्या गरीब भिक्षेकऱ्याशीं गरीबीनें व लाघवानें बोलूं लागला! तसल्या हलकट भिक्षेकऱ्यालाच शोभे अशी त्याची ग्राम्य बोली, खाणेंपिणें व वर्तनाची तऱ्हा ऐकून व पाहून, राजाला भारी कष्ट झाले.

पुढें प्रयागानें आपलें अंतर्वस्त्र विकण्यासाठीं देऊन, त्याला दुकानांतून शिधा सामान आणण्यासाठीं पाठविलें. त्या भिक्षेकऱ्याचें आपल्या समक्ष हलकट व उद्दाम भाषण व वागणें व त्याच्या मनांत असलेल्या व बहुतेक व्यक्त दिसणाऱ्या कपटाविषयींची भीति, यांमुळें राजाला त्याच्यापासून शत्रूइतकाच त्रास झाला.

दुपारानंतर तो भिक्षेकरी आपल्या सोबतिणीसह परत आला. तिच्या डोकीवर, कांहीं भांड्यांत, कांहीं खाण्यापिण्याचे पदार्थ होते. तिला पाहून राजाला वाटलें, कीं येथवर आपण मुक्त व भिक्षेकरी यांनाच माहित होतों, पण आतां या बाईलाहि माहिती झाली, तेव्हां आपल्या जीविताची आशा तितकी कमी झाली.

नंतर प्रयागानें आणलेल्या अन्नाला, त्यानें, त्याच्या आग्रहावरून नुसता स्पर्श केला. तें त्याने खाल्लें नाहीं, त्यावरून त्याच्या मनाला झालेल्या तीव्र दुःखाचें निदर्शन होत होतें.

प्रयागाने अंगणांत सहज त्या बाईला खबरबात विचारली. तिने आपल्या गांवढळ तऱ्हेनें युवराज भोज मारला गेल्याचें मोकळेपणीं कळविलें, (१६७०) तेव्हां प्रयागानें 'छेः, छे हें खोटें आहे,' असें म्हटलें. हीं भाषणें राजानें ऐकली, तितक्यांत झालेल्या अंगविक्षेपाच्या अपशकुनावरून ती बातमी खोटी नाहीं, अशी राजाची खात्री झाली. त्यामुळें त्या दुःस्थितींत फसलेल्या राजाला इतकें तीव्र व पराकाष्ठेचें दुःख झालें कीं, त्याच्या कट्टया शत्रूला सुद्धां त्याचा उच्चार करता येता ना. त्यानें राजकारस्थानांच्या नादानें त्या पुत्राला बालपणापासून कडक शिस्त लावलेली होती. तिच्या द्वारें आपण त्याच्या जन्मापासूनच त्याच्यावर आफत आणण्याला कारण झालों, असें त्याच्या मनाला वाटलें. तो स्पृहणीय वीरवृत्तीनें मेलेला होता. तरी वात्सल्याति-

शयामुळें राजाला तो आपल्या अंकावर पडलेला, बालपणींच मारला गेला, असें वाटलें. आपल्या यौवनारूढ वक्षस्थळावर तो पडलेला असून, त्या बाळाच्या गळ्यांत मोत्यांचा हार घातलेला आहे, अशी कल्पना करीत व त्याला आशीर्वाद व धन्यवाद देत असतांना, राजाचें मन फारच विव्हळ झालें. संवर्धनीय व होतकरू तरुण पुत्र मारला जाऊन आपण अशा अनुचित अवस्थेंत वृद्धपणीं जीविताचें रक्षण करीत आहोंत, याची त्याला अत्यंत लाज वाटली. याप्रमाणें पुत्रशोकाची अनिर्वचनीय व्यथा अनुभवीत व दुःखातिशयानें गडबडां लोळत, त्यानें त्या कुटींतच दुसरीहि रात्र काढली.

त्याला प्रयागानें भगवान मठाला चलण्याविषयीं म्हटलें. पण तो शोकातिशयानें शून्यहृदय झालेला असल्यामुळें त्याचें तिकडे लक्षच नव्हतें. पुढें रात्र पडली. ती जणों खालावलेल्या चंद्रबिंबांतून दवबिंदूंच्या रूपानें अश्रुबिंदूंचाच वर्षाव आणि चक्रवाकांच्या संतत शोकशब्दाच्या द्वारें दुःखाक्रोशच करीत होती.

सकाळीं आपला मालक क्षुधेने व तृषेनें व्याकुळ झालेला पाहून प्रयागानें त्या भिक्षेकऱ्याला कांहीं खाण्यास आणण्याविषयीं म्हटलें. (१६८०) तेव्हां त्यानें जाऊन गांवांतून दोन चांगलीं वाढणीं आणलीं. तीं त्यानें कोणा गृहस्थाच्या घरीं गोसवाचा उत्सव चालला होता, तेथून आणल्याचें प्रयागाला कळलें. तेव्हां प्रयागानें मोठ्या दुःखानें दीर्घ निश्वास सोडीत राजाला म्हटलें, 'महाराज, स्वामींचा असा वियोग होऊन तो विपन्न स्थितीत असतांनाहि, या लोकांना हे कसे यागादिक उत्सव सुचताहेत पहा!' त्याला राजानें विषण्णवदनानें व हंसतसें म्हटले, 'अरे, असें भावड्यासारखें काय बोलतोस? जो गेला तो गेलाच. त्याच्या जाण्याची दुसऱ्याला काय क्षती? सर्व कोणी स्वतःच्या सुखाची सोय वाहणारे, कोणीहि स्वतःच्या शिवाय दुसऱ्या कोणाच्या दुःखाबद्दल शोक करीत नाहीं. लोकैकचक्षू सूर्य परलोकी गेला असतांना, सारे लोक सुखानें घरीं निजतात. तेव्हां माझ्या मागें हें सारें विश्व कसें कायम राहील, असा विचार दुसऱ्या कोणाला करतां येईल. मलाच पहाना? माझ्या जीविताचें जीवित असा माझा पुत्र, त्याच्यावर माझें अनन्य साधारण प्रेम असलेलें, तो मारला गेल्याचें ऐकूनहि मी हा येथें कायमच आहें! तेथें दुसऱ्याला अशा त्रयस्थपणाबद्दल कशीं नांवें ठेवतां येतील?'

नंतर प्रयागानें त्या भिक्षेकऱ्याला तीं वाढणीं नेऊन, दुसरें योग्य अन्न आणण्याला हकूंच सांगितलें. तेव्हां 'कालच्यांतून पुरेसे पैसे उरलेलें नाहींत, तरी यत्न करून पाहातों' असें बोलून तो खेद करीत निघून गेला.

अल्पसत्व माणसाला पारद-भस्म-पचवितां येत नाहीं. तद्वत हलक्या मनाच्या माणसांना रहस्य पोटांत ठेवतां येत नाहीं. (१६९०)

त्या भिक्षेकऱ्याचा मनोरथ नांवाचा एक आप्त होता. त्याला त्यानें ही हकीकत कळविली. तेव्हां, 'हा उच्चल राजाचा प्रतिस्पर्धी, त्याच्याकडे या राजाला नेऊन सोंपलें तर आपणाला इनाम मिळेल,' असें म्हणून, त्यानें त्या भिक्षेकऱ्याला बेइमान बनविलें. तो द्विज

नसून कोणा नीच दासाच्या पोटचा असावा. कारण सदसत्कर्म व स्वभाव यांचें ज्ञापक-बीजच असतें. राजाची हकीकत त्या दोघांनीं इला राजाला व त्यानें उच्चलाला कळविली. उच्चलानें राजाला पकडण्याचें काम इला राजावरच सोपलें. भिक्षेकरी व तो मनोरथ विप्र, यांना इला राजाकडे भूतिमिश्र नांवाच्या कायस्थानें पोंचविलें, असेंहि कोणी म्हणतात. ही कोणी तरी खोटीच कंडी उठविली असेल असेंहि संभवतें. त्या वेळीं अशा कंड्या उठण्याचा सपाटाच चालू होता. अशी कंडी उठण्याला तरी भूतिमिश्र याचें चारित्र्य व वर्तनच कारण होय. पुढें त्या कायस्थाची श्वपाकांच्या खांद्यावरून धिंड काढविण्यांत आली. त्याच्या नाहीं नाहीं त्या विटंबना झाल्या व तो शेवटीं कारागृहांत मरण पावला. ही शिक्षा त्याच्या निंद्य व कृतघ्न कर्माला अनुरूपच झाली म्हणावयाचें.

हर्षदेव भुकेनें कासावीस झाला होता त्याची प्रयागानें पुष्कळशी प्रार्थना केली. तेव्हां दारुण पुत्रशोकग्रस्त असतांनाहि त्यानें थोडेसे अन्नग्रहण करण्याचें कबूल केलें. पक्ष्याचें पिलूं वरचेवर घरट्यांतून खायाला आणणाऱ्या मातापित्याची वाट पाहात बाहेर डोकावत असतें त्याप्रमाणें तो भिक्षेकरी केव्हां खावयाला आणतो म्हणून प्रयाग वरचेवर खिडकींतून बाहेर पाहात होता. इतक्यांत त्या कुटीभोंवतीं शिपायांनीं वेढा दिलेला दिसला आणि अंगणाच्या दाराचा अडसर काढण्याचा आवाज त्याला ऐकूं आला. (१७००) हा विश्वासघात करणारा तो भिक्षेकरीहि त्या शिपायांमध्येंच होता. तो मुक्ताला बाहेर बोलावीत होता. यावर त्यानें दाराची फळी उघडली आणि राजाने मुक्ताला बाहेर पाठविलें व न भिता कमरेची लहानशी सुरी काढून हातांत घेतली. तोंवर एक धाडसी शिपायी नागवी तरवार घेऊन मोठ्या ऐटीनें चालून आला. त्यानें अंगांत कवच घातलेलें होतें. तशा त्या कुटीच्या अडचणीच्या जागेंतहि राजानें त्याच्यावर हल्ला करून त्याला खालीं पाडलें. पण कृपाळूपणानें त्याला ठार केले नाही. राजा व्यायामकुशल व चांगला न्यायाने लढणारा होता. या पडलेल्या यःकश्चित माणसाला काय मारावें, असा त्याचा अहंकार व तदुत्पन्न कृपा, यावेळीं अस्थानीं झाली. दुसरा एक शिपायी झोंपडीच्या छप्परांतून आत उतरत आणि तिसरा वर चढत होता. राजा शस्त्र उगारून त्या पहिल्या शिपायाच्या पाठीवर वीरासनांत उभा असलेला पाहून त्यांची गाळण झाली व ते खालीं पडले. त्यावेळीं राजा हातांत दंड धारण करून रुरु दैत्याच्या पाठीवर उभी असलेल्या चामुंडेसारखा शोभत होता.

राजाचें हें शेवटचें लढणें, वीराचा सिंहनाद, रणवाद्यांचा उत्साहदायक शब्द किंवा उन्मत्त शस्त्रास्त्रांचा खणखणाट वगैरेनी शोभिवंत झालें नाही. उलट कांहीं शस्त्रधारी डामर हळूंच त्या कुटींत शिरले व एकाद्या उंदराभोवतीं मांजरें जमावी, तसे तें त्या कोंडलेल्या राजाभोवतीं गोळा झाले. पुढे आणखी एकजण छप्परांतून आंत उतरला आणि त्याने प्रयागाच्या खांद्यावर व डोक्यावर जोराने वार करून राजावरहि एकदम हल्ला केला (१७१०) आणि राजानें केलेला वार कांहींसा वांचवीत त्याने राजाच्या छातींत दोन वेळ खंजीर खुपसला. त्याबरोबर राजानें 'महेश्वर, महेश्वर' असे म्हटलें व तो छिन्नमूल वृक्षाप्रमाणें

मरून पडला. तो चक्रवर्ती राजा असतांना, त्याला एकाद्या पळून जाऊन घरांत लपून बसलेल्या चोराप्रमाणें हें मरण आलें.

अलीकडील राजांमध्यें हर्षदेवाच्या तोडीचा प्रबल राजा दुसरा कोणी झाला नाहीं. तसेंच दुसऱ्या कोणाहि राजाला त्याच्या इतपत गर्ह्य व शोचनीय मरण आलें नाहीं. संग्रामविमुख झाल्यामुळेंच त्या थोर मनाच्या राजानें आपलें वैभव व तदंगभूत सुख सर्वथैव बुडविलें. त्याच्या अंगी स्वयंनेतृत्व नव्हतें आणि तो केवळ मंत्र्यांच्या तंत्रानें वागला, म्हणूनच त्याच्या हातून, त्याला सर्वथैव बुडविणारे दोष घडलें, असेंहि म्हणतां येईल. त्या दोषाबद्दलची सर्व जबाबदारी त्याच्या मंत्र्यांच्या पदरी बांधतां येईल. तो लौकिक वर्ष ४१७७ (ई० स० ११००) च्या भाद्रपद शुद्ध पंचमीला मारला गेला. त्यावेळीं त्याचें वय बेचाळीस वर्षें व आठ महिने होतें.

हर्ष राजाच्या जन्मकुंडली अन्वयें, दुर्योधनाच्या प्रमाणें त्याच्या हातून त्याच्या वंशाचा उच्छेद होण्याचा योग दिसत होता. त्याच्या जन्म कुंडलींत जन्मलग्न कर्क होतें. मंगळ व शनी पंचमस्थानीं, बुध व गुरू षष्ठ स्थानीं, शुक्र व सूर्य सप्तमात आणि चंद्र दशमांत होता. त्याच्यासारख्या योगावर जन्म झालेले कौरवादिक कुलनाशक उपजले. असें संहिताकारांनीं म्हटलें आहे. ( १७२० )

( संहिता—बृहत्संहिताकार वराहमिहिर. या कुंडलीप्रमाणें हर्षाच्या जन्माच्या वेळीं ग्रह असलेले, अलीकडे गणित करून पाहातां, शनीचें स्थान बरोबर येत नाहीं. )

या वेळीं तो सारा देश जणों निर्ब्रह्मण्य झालेला होता. म्हणूनच हर्ष राजाचें शिर एकाद्या चोराच्या शिराप्रमाणें कापून, तें त्याचा वैरी उच्चल, याच्याकडे नेलें गेलें. त्या वेळीं समुद्रवलयांकित पृथ्वी कंपायमान झाली व निरभ्र आकाशांतून मुसळधार पाऊस पडला. त्याचें शिर एका उंचशा भाल्याच्या टोंकावर टोंचून, त्याची हालअपेष्टा करीत, चोंहीकडे नाचविलें गेलें. या पापापायीं पुढें त्या पाप्यांना पुष्कळ दुःख भोगावे लागलें. या काश्मीर मंडलांत देवतांच्या मूर्तीचें उच्चाटण करणें व त्या फोडून टाकणें, या गोष्टी या हर्षाच्या वेळेपासूनच सुरू झाल्या. त्याच प्रमाणें भूपतीचा शिरच्छेद होणें, हे तरी त्याच्या शिरच्छेदापासूनच चालू झालें, म्हणावयाचें.

तें शिर उच्चलाकडे नेले तेव्हां भलेपणामुळें त्याला त्याच्याकडे पाहावेना. त्यानें पुष्कळ वेळ शोक केला आणि त्या शिराला अग्नि देवविला.

त्या चक्रवर्ती राजाच्या शरीराला सुद्धां एकाद्या चोराच्या देहाप्रमाणेंच, अग्निसंस्कार देण्यापूर्वी, उच्चलाच्या आज्ञेची वाट पाहावी लागली. हें तरी विलक्षणच. सेवकांनीं टाकलेल्या आणि वंशनष्ट झालेल्या, अशा त्या राजाचें कलेवर गौरक नांवाच्या लांकुडविक्यानें नग्न व अनाथ प्रेताप्रमाणें जाळून टाकलें.

या हर्ष राजाची ही कथा खरोखर कितीतरी दीर्घ व अद्भुत, रामायण व भारत यातील कथेसारखी आहे.

भाग्य हें मेघामध्यें क्षणैक चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें चंचल असतें. अत्युत्कट व अद्भुत वैभवाचे अवसानहि त्याच मानानें विरस व तिरस्करणीय होत असतें. तरी मोहामुळे अंध व हताश झालेल्या लोकांचा या काल्पनिक विभवाच्या अनुभवाविषयींचा अभिमान शांत होत नाहीं, याला काय म्हणावें ?

त्या राजाच्या अंतःपुरांत इतक्या राण्या असून एकीनें सुद्धां त्याच्यासाठीं शोक करून प्राण दिला नाहीं. तसेंच त्याच्या शतशः सेवकांपैकीं एकानेंहि त्याच्या शोकामुळें निर्विण्ण होऊन, प्राणत्याग, निदान तीर्थसेवन, केलें नाहीं. प्रयाग हा त्या कुटींतील मारामारींतच मारला गेला होता. अशा केवळ सुखोपलिप्त लोकांच्या अंतःकरणांतील निःस्नेहतेमुळें लोक अरण्यवासांतील सुखाचें सेवन करीत नाहीत, याला धिक्कार असो.

मूळांत शाश्वत असें कांहींच नसतें. तोच प्रकार शेवटींहि होतो. मध्येच अवचित सुस्थिति व दुःस्थिति यांच्या अनुरोधानें कांहीं तरी कृति, कोणा प्राण्याकडून किंचित्काल घडून आलेली दिसते, व पुनः तो शिर व पाय विहीत नटाप्रमाणें या मिथ्याभासरूपी मत जवनिकेच्या आड होऊन, कोणीकडे जातो हे कांहींच कळत नाही.

हिमाचलाचें सुरचर्चित शृंग सोडून वासर श्रीनें सुरगिरी मेरूच्या दिव्य तटाचा आश्रय करावा, त्याप्रमाणे सातवाहन कुलांतील उदय राजाच्या वंशांतील प्रतिष्ठा सोडून राज्यश्रीनें जबरदस्तीनें कांति राजाच्या कुलामध्यें आपलें आस्थान कायम केलें.( १७३२ ) (आठ्याणव वर्षांत तीनच दिवस कमी, इतक्या काळांत उदय राजाच्या वंशांतील सहा राजे होऊन गेले.-दिद्दा राणी लौकिक वर्ष ४०७९ च्या भाद्रपद शुद्ध अष्टमीला मरण पावली आणि हर्ष राजा लौकिक वर्ष ४१७७च्या भाद्रपद शुद्ध पंचमीला मारला गेला. तेव्हां हा काल बरोबर दिला गेला आहे. असे ठरतें. )

काश्मीरक महामात्य चंपक प्रभुपुत्र कल्हणकृत राजतरंगिणीचा सातवा तरंग समाप्त झाला.

---

# तरंग आठवा.



प्रौढ कंचुकी, श्रेष्ठ व वृद्ध वृषभ, तुषारतुल्य प्रभायुक्त व कुब्ज चंद्र, हा नेहमीचा आप्तपरिवार सोडून देऊन, स्वतः परिपूर्ण भगवान शंकरांनी चारित्र्यचर्येसाठीं जिच्या अर्ध शरीरांत कायमचें स्थान केलें, अशी ती चराचर गुरूची निवासस्थान बनलेली पार्वती सर्व पापांचा नाश करो.

मंथनापूर्वी अमृत व विष अव्यक्त असलेल्या उदधीप्रमाणें त्या नूतन उच्चल राजानें कांहीं काल, कोप व प्रसाद प्रच्छन्न ठेवलें होते. जोराचा वायू व अवग्रह, अभ्रांना वृष्टी करूं

देत नाहींत. तद्वत प्रारंभीं त्यांचा कनिष्ठ बंधू सुस्सल व डामर मंडळी, त्याला अधिकार नीटपणें चालवूं देत नव्हती. सुस्सल यौवनोन्मत्त होत्साता मनसोक्त वागे. यामुळें त्याच्यावरील राजाच्या प्रेमाचा उपयोग झाला नाहीं. तो हातीं नागवी तरवार घेऊन हत्तीवरून फिरे आणि सूर्यतापाप्रमाणें सर्वांना शोषून लुटून घेई. सारे डामर एकत्र जमलेले असतांना, त्यांना ठार करावें, असें त्यानें सुचविलें होतें तें त्या सात्विक राजानें मान्य केलें नाहीं. मंत्री व सामंत चोर, बंधू राजा होण्याला टपलेला व राज्य द्रव्यहीन, अशी कोणची म्हणून संकटपरंपरा राजाला कमी होती! त्यानें सुस्सलाला राज्याभिषेक करवून, लोहरच्य खालच्या प्रांताचें राज्य करण्याला रवाना केलें. तेव्हां तिकडे जातांना सुस्सलानें हत्ती, घोडे, स्वार, पायदळ, शस्त्रास्त्रे, खजीना, मंत्री वगैरे सर्व कांहीं बरोबर नेलें. तरी राजानें बंधुप्रेमानें त्याला नको म्हटलें नाहीं,

लोहर येथील गडकऱ्यानीं हरकत करूं नये म्हणून सुस्सलानें उत्कर्षाचा पुत्र प्रताप याला बरोबर घेतलें होतें आणि त्याला गादीवर बसवून, स्वतः त्याच्या वतीनें राज्य करणार असें प्रसिद्ध केलें. आसपासचे राजे नम्र होऊन त्याच्यापुढें सेवकाप्रमाणे उभे राहूं लागले. ( संदर्भाच्या दृष्टीनें येथें यापुढचे कांहीं श्लोक सुटलेले दिसतात. )

सात दिवस त्याच्या लोकांना मार्गांत अडथळा झाला होता. तोंवर संधी साधून हर्षाच्या मर्जीतला गवई कनक, देशांतराला निघून गेला. पुढें त्यानें वाराणशीत जाऊन दुःखावेदानें प्राण दिला. हर्षाच्या नोकरांपैकीं त्यानेंच अशी आपली स्वामिभक्ति व कृतज्ञता व्यक्त केली.

उच्चल राजा सत्यनिष्ठ व सत्त्वशील होता. त्यानें त्या लबाड व लुटारू डामरांनीं केलेली आपली सेवा लक्षांत घेऊन, चंदन तरू सर्पांना चढूं देतो त्याप्रमाणें, कांहीं काल, त्यांना मोठाले अधिकार दिले. डामर सरदार जनकचंद्र, हा भारीच उन्मत्तपणानें वागत होता. त्याच्यापुढें दुसऱ्या डामर सरदारांचें व राजाचें सुद्धां तेज पडेना.

उरशाचा राजा अभय याची कन्या विभवनर्ता, ही हर्षाचा पुत्र भोज, याला दिलेली होती. तिच्या पोटीं दोन तीन मुले झालेलीं मेल्यावर, झालेला पुत्र जगावा म्हणून, गुरूंनीं त्याला हलकें असें भिक्षाचर-भिकारी-हें नांव दिलें. तो यावेळीं दोन वर्षांचा होता. शत्रूच्या वंशाचा उरलेला अंकुर, या नात्यानें तो अप्रिय असूनही, उच्चलानें, जनकचंद्राचे म्हणणें मानून, त्याला जिवंत ठेवलें व संवर्धनासाठीं राणीला सोंपलें होतें. जनकचंद्राचा बेत त्या मुलाला हातीं ठेवून, स्वतः राज्य करण्याचा होता. पण उच्चलानें तो ताडून चतुराईनें ही योजना केली होती. त्यामुळें जनकचंद्राचा बेत फसला.

इतर डामर सरदार जनकचंद्राचा फार हेवा करीत होते. ते त्याच्यावर संतापलेहि होते. त्याचा अधिकाधिक सत्कार होईल तसा तो जास्त उर्मट होऊन, आपला आशय व्यक्त केल्याशिवाय राहणार नाहीं आणि त्यामुळें इतर डामर अधिकच चिडतील, हें जाणून, राजानें त्याला द्वारपतीची जागा देणार, असें प्रगट केलें. तसें भीमदेवादिक सर्व

डामर नाराज झाले. ती त्यांची नाराजी विकोपाला गेली व त्यांनीं आपला श्रेष्ठपणा ठरविण्यासाठीं युद्धाला आव्हान केलें. तें युद्ध पुलावर व्हावे, असें ठरवून, राजा त्याचा तमाशा पाहण्यासाठीं, मंत्री नको म्हणत असतांनाहि, पुलावरील चतुष्किकेंत गेला. प्रथम दोघे दोघे लढूं लागले. पण लौकरच सारे डामर चिरडीला पेटून हातघाईवर आले. चतुष्किकेच्या दोन्ही बाजूला पुलावर दारुण युद्ध होऊं लागलें. थोड्या वेळानें जनकचंद्राकडील लोकांनीं तीरावरून राजावर बाण मारले. ते सूं सूं करीत राजाला चाटून जाऊन जवळच चतुष्किकेच्या खांबांत रुतून, जणों थरारत होते. तेव्हां राजसेवकांनीं त्या राजाला जबरदस्तीनें दंडाला धरून आंत आडोशाला नेलें व मंडपाचें दार ओढून अडसर लावला. पुढें जनकचंद्र व भीमदेव याचे आश्रित त्वेषानें तरवारी उपसून मंडपांतच एकमेकांवर धांवले.

भीमदेवाकडील पटाईत सैनिक, कालपाशाचा पुत्र अर्जुन याने जनकचंद्राला सुरी मारली. त्यावर, ही कलागत राजानेच उपस्थित केली आहे असें मानून, तो राजाच्या जागेकडे धांवला व त्यानें बंद दरवाजावर लाथ मारली. पण दार उघडले नाही. तेव्हां तो भिऊन एका स्नानद्रोणींत–स्नानाच्या विशेष जागेत–शिरला. तिकडे त्याच्यावर भीमदेव जंबिया घेऊन धांवला. हें पाहून भीमदेवाचा खजानदार एका खांबाआड उभा होता, त्यानें तरवारीच्या झटक्यानें जनकचंद्राचे दोन तुकडे केले. त्याबरोबर त्याचे बंधू गग्ग (गर्गचंद्र ) व सड्ड पळूं लागले. त्यांनाहि त्याने वार केले. त्यांना जबर जखमा झाल्या.

वृक्षाचा भंग केल्यानंतर विद्युत्पात फार वेळ रहात नाहीं. तसेंच भारी शत्रूला मारण्याचें अचाट कर्म केल्यानंतर, मारणारा तेथें आधिक वेळ रहात नाहीं.

हर्ष राजा मारला गेला त्याच वर्षीं दुसऱ्या भाद्रपदात, बरोबर तीन पंधरवड्यांनीं, जनकचंद्र मारला गेला. उपकारी धन्याशी कृतघ्नपणाचें महापातक करणाऱ्या त्याचाहि तात्कालिक शेवट, त्या पापाला अनुरूपच झाला म्हणावयाचें. याचा उच्चल राजाला मनांतून आनंदच झाला. तरी त्यानें शोक झाल्याचें व राग आल्याचें दाखविलें. तेव्हां भीमदेव पळून गेला. गर्गाला त्याचा विश्वास आला व त्याला राजानें उपचारासाठीं लोहरला, पाठविलें आणि दुसरे डामरहि ज्याले त्रासले होते, त्यांना त्यांच्या घरीं परत रवाना केलें. अशा तऱ्हेनें साम व भेद यांच्या द्वारें त्या चोर व शिरजोर डामरांचा त्रास मिटाविल्यावर राजानें आपला अधिकार हळूं हळूं दृढ केला आणि स्थिरता व स्वास्थ्य संपादन केलें. पुढें लौकरच त्यानें क्रम राज्यांतील डामरांकडून सैनिक व स्वार कमी कमी करविले. नंतर मडव राज्यांत जाऊन तिकडे गडबड करणाऱ्या कालिय वगैरे डामरांना त्यानें सुळावर दिलें. इल्लाराज पुष्कळशी जमीन स्वाधीन करून घेऊन, पराक्रमी व प्रबल बनला होता. त्याला त्यानें नगरांतच एकदम छापा घालून ठार मारविलें. जन्मांतरींच्या संस्कारांमुळें किंवा आंतरज्ञतेमुळें त्याचें गर्गावर पुत्रापेक्षां अधिक प्रेम राहिलें. प्रजेवरहि त्याचें फार प्रेम होतें. त्याला केव्हांहि उलट उत्तर खपत नव्हतें. पण गर्गाच्या

सर्व अपराधांकडे तो काना डोळाच करी. बुद्धिमान भीमदेवानें त्याला राज्यव्यवस्थे-संबंधीं प्रारंभीं दोन गोष्टी सांगून ठेवल्या होत्या. त्या गुरुमंत्रतुल्य लक्षांत ठेवून, त्या-प्रमाणें तो वागत राहिला. १ लोकवार्ता मिळविण्यासाठीं सारा दिवस सारखें बाहेर मोकळे-पणीं वागणें व २ शत्रूचें शासन करण्यांत सावध राहून, त्याचें नांव ऐकतांच मध्यरात्रीं सुद्धीं, त्याच्यावर चालून जाऊन भावी संकट टाळणें.

इतर राजांपेक्षां तो अधिक मानी होता. मनांत आणलेली गोष्ट केल्यावाचून तो सोडीत नसे. त्याचें वर्तन शुद्ध असून त्याला लोभाचा डाग लागलेला नव्हता. त्याच्या गुणांच्या गंगाजळ निर्मळ वर्णनरूपी गंगेंत निमज्जन झाल्यानें, येथवरच्या दुष्ट व राक्षसी राजांच्या वर्णनांमुळें या वाणीला लागलेल्या पापाचें जणों क्षालनच होते आहे. त्याला पूर्ती साधनसंपत्ती नव्हती, तरी अनूरु अरुणाप्रमाणें त्यानें सज्जनांच्या दृष्टिआड येणाऱ्या दोषरूपी तमाचें स्वतः निवारण केलें होतें. कोणी प्रायोपवेशन करून मरण पावला तर स्वतः प्राण देण्याचें ठरवून त्यानें धर्माधिकाऱ्यांनीं अन्याय न करण्याची खबरदारी घेतली होती. दीन दुर्बलांचे दुःखाक्रोश ऐकून, तो महात्मा भारी कळवळत असे व त्यापायीं तो स्वतःला मुद्धां वेळेवर शासन करी. अधिकाऱ्यांकडून जुलूम होऊन लोक दुःखी-कष्टी झालेले दिसले तर तो त्या अधिकाऱ्यांच्या आप्त बांधवाना रडवून, त्यांचें शमन करी. याविषयीं तो सतत दक्ष असल्यामुळे अधिकारी गरीब प्रजा, व प्रजाजन प्रबल शास्तेसे झाले होते. तो स्वतः गुप्तपणे घोडयावरून फिरे व लोक स्वतःविषयीं काय म्हणतात, तें ऐकून त्यातील दोष तत्काल टाकून देत असे. त्याची भेट कोणालाहि निष्फल होत नसे. अर्थिजनांसाठी तो एक कल्पवृक्षच होता. तो नेहमीं सुधेप्रमाणें प्रियभाषी व प्रीतिदायक असल्यामुळें प्रजेला फार आवडत होता म्हणून क्रीडास्थानांत सुद्धां सेवक त्याच्याबरोबर असत. नाना कलानिष्णात मंडळीला त्याचें रात्रींसुद्धां तीन चार वेळां दर्शन घडे. तो सेवेबद्दल तेव्हांच इनाम देई. यामुळें इंद्रजालिकानें लावलेल्या वृक्षाप्रमाणें तो सद्यःफलदायी होत असे. गृहस्थांना दुःख झालेलें ऐकतांच तो, पिता पुत्रदुःख निवारण करतो तद्वत, सर्व कामें सोडून, ताबडतोब त्याचें निवारण करी. तो स्वतःचा धान्यसंचय प्रजेला वेळींच कमी मोलानें विकून, दुर्भिक्षाचा प्रारंभींच फडशा पाडीत असे. ( यावरून तेव्हां जमीनमहसूल, पिकाच्या अंशाच्या द्वारें वसूल होत होता, असें दिसतें, ही तऱ्हा अलीकडे बदलली आहे. ) त्यानें दयाळूपणे चोरानाच खजीन्यावर पाहारेकरी नेमून, त्यांना चोरीपासून निवृत्त केलें आणि त्यांना निंद्य उपजीविकेची अवश्यकता ठेवली नाही. दूतांमार्फत राज्यांत कोणाला काय पाहिजे व कोठें संकटनिवारण होणें आहे, याचा सारखा तपास ठेवून, तो खात्री करून घेत असे. अर्थाविषयीं अत्यंत निस्पृहपणा, या थोर गुणामुळें त्याच्या इतर सद्‌गुणांना पालवी फुटून बहार येत होता. प्रजेच्या सुस्थितीसाठीं तो अपराध्यांना दंड करी. पण ते दंडद्रव्य खजन्यिांत जमा कराविण्यांत स्पर्शदोष लागेल, व ते लोक पुनः पापकर्म करूं लागतील म्हणून व त्यांची नीति सुधारण्यासाठीं, तो

दंडाची रक्कम, त्यांच्याकडूनच धर्मकार्यांत खर्चवीत असे. कोणाला कांहीं देण्याचें कबू केल्यावर, तो तसल्या हजार वस्तू देऊन आपलें वचन पाळीत असे.

याचक लोक ' मला द्या, मला द्या, ' म्हणत असलेले ऐकूं येत, त्याहून अधिक प्रमाणांत तो उदार राजा, 'यांना द्या, यांना द्या,' असें म्हणत असे. अनुदारपणानें, उशीरां थोडेसें, असत्कृत, परहस्तें किंवा शिफारसींनें दिलेलें व कामगारांनीं मध्येंच अर्धे लाटलेलें, असलीं दानें त्याच्याकडून कधीच दिली जात नव्हतीं उत्सवप्रसंगीं व दैन्य ऐकल्यानंतर, तो सहाय्य करण्यासाठीं यथेच्छ दाने देई चित्रांतल्या फलभार नम्र वृक्षासारखा, तो कधींही निष्फल राहिला नाही. शिवरात्रीचे वगैरे उत्सव, ग्रहयोग-ग्रहणादिक प्रसंग-अशावेळीं, महेंद्र पृथ्वीचें सिंचन करतो, तद्वत तो प्रजेवर जणों धनवृष्टी करीत असे. महोत्सवांत तांबूलदानाच्या कामी त्याची हर्ष राजाव ताण असे.

त्याला राज्य मिळालें त्या वेळीं तें जसें मातीमोलाचें होतें. तरी त्याने कुबेराहून वर चढ उदारता दाखविली. तो काश्मीरी होता. पण त्यानें व्यर्थ मोठमोठीं मंदिरें व इमारत बांधणें, पाडणें व लुटणें, किंवा घोडेखरेदी, यांच्यात आपलें धन उधळलें नाहीं. प्रा वायूच्या रूपानें अंतरात्मा नाना मार्गांनी देहांत संचरत राहून, सर्वत्र वावरत असतो, तस तो स्वतः सर्व राज्यव्यवस्थेंत वावरून कुशल, राज्यतंत्रज्ञ व प्रजेचा अंतरात्मा बनला होता त्याच्यापासून विप्राना राजोचित भोग, व्याधिग्रस्ताना औषधपाणी व वृत्तिहीनांना उप जीविकेचीं साधनें, मिळत असत. श्राद्धतिथी, ग्रहणें, अरिष्टे व धूमकेतू, वगैरेंच्या शांती, अश प्रसंगीं तो हजारों गायी व अश्व, आणि सुवर्ण यांचें दान देऊन, तो द्विजाचे आराधन करीत असे.

त्याच्या वेळीं सारें नंदिक्षेत्र अवचित जळून गेलें होतें. ते त्यानें पूर्वीपेक्षाही चांगलें नवें बसविलें. त्याला जीर्णोद्धाराचें जसे व्यसनच होतें. त्याने श्री चक्रधर, योगेश, स्वयंभू वगैरेंचा जीर्णोद्धार केला हर्षदेवानें परिहासकेशवाची मूर्ती नेली होती. त्या मूर्तीच्या जागीं, परिहासपुर येथे त्यानें नवीन मूर्तीची स्थापना केली. तो अत्यंत निर्लोभी होता त्यानें हर्षदेवानें लुबाडून नेलेली शुकावली परत देऊन, त्रिभुवनस्वामीला पुनः भूषित केलें. जयापीडानें-कनोजहून-परत आणलेलें व हर्ष, राज्यभ्रष्ट झाल्यावेळीं जळालेलें श्रे सिंहासन, त्यानें नवें बनविलें.

उच्चल राजाचें जयमती राणीवर विशेष प्रेम होतें. म्हणून तिला अर्धा सनाचा बहुमान व महाराणीपद मिळालें. ती सामान्य कुलांतलीच होती. तरी, तिनें स्वतःच्या गुणांनीं, या बहुमानाला उणेपणा आणला नाहीं. ती दयाळू, उदार मधूर, सत्प्रेमी, नय व विनययुक्त, आणि गरीबांविषयीं उत्कट कळकळ बाळगणारी अशी सद्गुणी होती. यामुळें तिची फार प्रसिद्धी झाली. लावण्यवती ललन

ाजवल्लभा होतांच रागामुळें राक्षसीप्रमाणें लोकांना त्रासदायक व तापद होत असतात, शांतली ती नव्हती.

या राजाला प्रजा फार प्रिय होती. त्याच्या निर्लोभपणाहूनहि विशेष असा ाच्या अंगीं गुण हा होता कीं, 'प्रजापीडक व लालची, राक्षसी अधिकाऱ्यांच्या पासून जेचें सतत रक्षण करण्याला राजानें नेहमीं जपलें पाहिजे,' हा मंत्र तो नेहमीं अमलांत ाणी. पूर्वीच्या इतिहास पुराणांतील राजनीती अन्वयें, त्यानें कायस्थांचें उन्मूलन केलें. ारण विशूचिका, शूल, क्षय, मरी, हेच कांहीं प्रजेला घातक रोग नसून, दुष्ट कायस्थ काम- ारहि, त्यांना महामारीहून जास्त प्राणहारक होतात, हें तो चांगलें जाणत होता. खेकडा ीत्याला व वाळवी मातेला मारते. पण कृतघ्न कायस्थ, प्रबळ होऊन, संधी सांपडतांच वेच कुटुंबाचा नाश करतो. कोणी मोठ्या माणसानें कायस्थाला अधिकार व वैभव दिलें ीं, तो वेताळाप्रमाणें उलटून, निर्दयपणें त्यालाच मारतो. विषवृक्ष व कायस्थ कामगार हे ाश्रयस्थान दुर्गम व नष्ट करून टाकल्याशिवाय रहात नाहींत. त्या राजानें, मानखंडना, डतर्फी, कैद वगैरेंनीं त्या दुष्ट कायस्थांना पार दाबून टाकलें. महत्तम सहेल व दुसरे तत्सदृश ामगार, यांना त्यानें बडतर्फ करून कैदेंत टाकलें व तेथें त्यांना सणाचीं वस्त्रें नेसण्यास ेलीं. भूतिभिश्र व त्याची पत्नी यांना त्यानें चारण बनवून डोंब शिपायांसारखे पळाव- ास लावलें. तो उंचटांग्या होता. त्याची दाढी व मिशा लांब लांब होत्या. त्या गुंडाळ- ्न, डोकीवर विचित्र पगडी घालवून, त्याच्या हातीं भाला देवविलेला, अशा वेशांत पत्नी- ह तो मांड्या व गुडघे चिकटत नाचत असलेला पाहून, कोण हंसू आल्याशिवाय राहणार? ांच्यांतील एक कामगार वेश्याप्रिय होता. त्याला राजानें आपल्यापुढें वेश्या व विट यांच्या ोबर गात, नाचत, हावभाव करण्याला लावले. तसेंच दुसऱ्या एकाला नागवा उघडा व र्धे डोकें भादरलेले व बाकांच्यांत शेंदूर घातलेला, असा गाडीला बांधवून त्याची धिंड ाढविली. ते बडतर्फ झालेले कायस्थ कामगार फार बदनाम झाले. त्यांना मडकी ाजवीत, डोक्यावर चमत्कारिक पगड्या व अंगावर मलिन व जीर्ण वस्त्रें घालून व ोक्यावरून तसेंच घुंगट घेऊन, रात्रीं रस्त्यांत भीक मागण्याची पाळी आली. कांहीं वृथा द्ध झालेले, भूर्जपत्राप्रमाणें विद्या सहज प्राप्त होईल या समजुतीनें, पोराप्रमाणें गुरूजीच्या ारीं अध्ययनाला जाऊं लागले. १०० कांहीं कायस्थ, मुलें बरोबर घेऊन सकाळीं मोठ्यानें दीनपणानें गात, बाजारांत भिक्षा मागत फिरत. त्याचा लोकांना चमत्कार वाटे. कोणी ापल्या बायका, बहिणी, मुली, श्रीमंत व सरदार यांच्या घरीं सेवेला पाठवून, कामें िळविण्याची खटपट करीत. कोणी लबाड लोक ज्योतिषांना आपल्या पत्रिका दाखवून व वप्नें, शकुन, लक्षणें, वगैरे पाहाण्याला सांगून, त्रास देत, त्यांतील कांहीं कैदेंत होते. त्यांचीं ोंडें रुक्ष झालेलीं, दाढी व केंस जटा झालेले. पायांत शृंखला पडलेल्या व शरीर कृश ालेलें, असे ते पिशाचासारखे दिसत होते.

त्यांचीं सारीं अधिकारद्योतक चिन्हें राजानें काढून घेतल्यावर, त्यांची धुंदी उत-

रली व त्यांच्या डोळ्यांना, त्यांचे आप्त दिसून, त्यांची ओळख पटूं लागली! तशा स्थितीत कांहींनीं शोकाकुल होत्साते व भारत स्तवराज वगैरेंचे पाठ, आणि दुर्गोत्तारिणीचें जप सुरू केलें. उच्चल राजाच्या कारकिर्दीत त्या दुष्टांना ही दुःखकारक स्थिति अनुभवावी लागली. कारण इतर राजांप्रमाणें त्या श्रेष्ठ व चाणाक्ष राजाला, त्यांना, संधि, भेद, बहुमोल नजराणे व नानाविध खाद्य व पेय पदार्थ, यांच्या द्वारे मोह घालता आला नाहीं. त्या राजानें त्या नीच प्रजाकंटकांना चांगलें दाबांत ठेवण्यासाठीं शुद्धाचरणी व कडक अधिकारी नेमले होते.

शिवरात्रीच्या उत्सवांत, शिवरथ नांवाच्या एका विद्वानानें राजाला पुढील अर्थाचा श्लोक म्हणून दाखविला. 'आपल्या आज्ञेनें जळालेल्या भूतेशाच्या पुरीला पुनः पूर्वीचें वैभव प्राप्त झालें. त्याचप्रमाणें, हे उच्चल महाराज, या आपल्या नगराला, कायस्थ, राजबीजी, त्रासदायक, निर्बंध, लबाड मंत्री आणि प्रायोपवेशन, या पंचाग्नीपासून वाचवावें.' ११० तो श्लोक ऐकून राजानें त्याला आग्रहानें सर्वाधिकारी केलें. त्याला राजव्यवहाराचें ज्ञान नव्हतें, तरी त्यानें विशुद्ध वर्तन व आर्यमार्गाचें अवलंबन करणाऱ्यांना, स्वतःच्या शुद्धाचरणानें कांहीं काल कृतयुगाचें स्मरण करून दिलें.

तो दुष्ट व क्रूर कायस्थाना ताबडतोब तीव्र दंड करी. शहाण्या लोकांना तो फार आवडे. शिक्षेचा योग्य उपयोग जाणणाऱ्या अधिकाऱ्यांनीं अडेलतट्टू, कायस्थ, भूतबाधा झालेले, व शत्रू, यांना शिक्षा करण्यांत कधीं उशीर करूं नये, असें सांगितलेलें आहे. कारण यांत उशीर झाला की, ते शिक्षेच्या भीतीनें शास्त्यांना व शास्त्यांनाच प्राणसंकटात टाकण्याची खटपट करतात.

त्या विचारी राजानें दंड करण्यायोग्य कायस्थ किंवा इतर कोणी यांचे पुत्र, स्त्रिया, मित्र, आप्त, बंधू, या कोणाला कधीं त्रास दिला नाहीं. कानाशीं लागणाऱ्या चुगलखोर लोष्टधर प्रमुख लोकांना त्यानें असें तीव्र शासन केलें कीं, त्यामुळें त्यांना आपली सारी लबाडी पार बंद करावी लागली. गर्भवासांत असल्यावेळची सर्व कर्तव्येच्छा व स्पृहा, बाहेर पडतांच प्राणी विसरतो. तशीच स्थिती राज्यलाभ झालेल्याची होऊन, ते सारे पूर्वसंकल्प विसरत असतात. पण एखाद्या जातिस्मराप्रमाणें या राजाची तशी स्थिती झाली नाहीं. त्यानें पूर्वीचें ध्येय व विचार कायम ठेवले होते. पूर्वीचे शत्रू किंवा आश्रित, यांचें पूर्ववर्तन लक्षांत न घेतां, तो त्यांच्या पुढील, स्वतःशीं, वर्तनानुरूपच त्यांच्याशीं वागत असे. १२० जारिणी स्त्रियांचे जार, तिच्या पूर्वीच्या यारांविषयींचा द्वेष क्वचितच धरतात. तसेंच लबाड सेवकांचा नवा धनी, त्यांनीं पूर्वीच्या धन्याशीं केलेल्या कृतघ्नपणाबद्दल, त्याच्याशीं क्वचितच वैर धरतो.

उच्चल राजा कृत्याकृत्य विवेक जाणून वागत असे. ही विवेचक बुद्धी आणि ही पृथ्वी त्याला जणों शेषनागापासून बरोबरच प्राप्त झाली होती.

एका सावकाराकडील ठेवींच्या वादाचा त्यानें एक चोख निवाडा केला. तो न्यायाधीशाच्याहि लक्षांत आला नव्हता. एका गृहस्थानें एका सावकाराकडे विश्वासानें एक लक्ष

दीनारांचा ठेव ठेवली. त्याच्याशीं त्या सावकाराने, स्वार्थबुद्धीनें पुष्कळ कृत्रिम स्नेह दाखविला होता. तो गृहस्थ त्या ठेवींतून मधून मधून लागेल तसें खर्चास घेत असे. १२५ याप्रमाणें वीस तीस वर्षे गेल्यावर, त्यानें हिशेबानें उरलेली बाकी त्या सावकाराजवळ मागितली. तेव्हां सावकारानें ती ठेव पचाविण्याच्या दुष्ट बुद्धीनें त्याला कांहीं ना कांहीं सबबी सांगून टाळाटाळी केली. नद्यांनीं समुद्रांत नेऊन टाकलेलें पाणी त्यांना मेघांच्या द्वारानें कालांतरानें परत मिळतें. पण वाण्याजवळ ठेवलेली ठेव, कधींच परत मिळत नाहीं. ठेव पचवूं पाहणाऱ्या सावकारावर दावा केल्यावर त्याला वाघा-पेक्षांहि भ्यावें लागतें. कारण तो त्या प्रसंगीं स्निग्धमुख, मित व मिष्टभाषी व नरम होत असतो. दाव्याच्या संबंधांत वरवर बोलण्या चालण्यांत सावकार किर्तीहि हंसत व सख्य दाखवीत असला तरी, तो आपली लबाडी कधीं सोडीत नाहीं. १३०. वेश्या, वणिक, कायस्थ व दिविर–कारकून, हे स्वभावतःच वंचक असतात. ते विषारी बाणापेक्षांहि घातक होतात. कारण त्यांना या विषयींचा जणों गुरुमंत्र मिळालेला असतो.

चंदन चर्चून स्वच्छ व शुभ्र वस्त्र परिधान केलेला व धूपाने सुगंधित झालेला, अशा किरातावर विश्वास ठेवणाऱ्यानें, आपत्ती दूर नाहीं असें खास समजावें. कपाळ, भिवया, कानाच्या पाळी आणि उरस्थळ, या सहा जागीं चंदनतिलक लावलेला वाणी, षड्बिंदु-युक्त विंचवाप्रमाणें तात्काल मारक होत असतो. धूसरवर्ण व बारीक छिद्रे असलेल्या तुंबीच्या तुंबडीप्रमाणें वाणी समांस रक्तशोषण करितो.

त्या सावकाराने प्रथम सर्व प्रकारच्या तोंडी बयादी सांगितल्या तरीहि, त्या गृह-स्थाचा आग्रह चालू होता. हें पाहून, त्याला निरुत्तर करण्यासाठी, रागारागानें व कपाळाला सत्रा आठ्या घालून, त्यानें त्याच्या खात्याचा हिशेब त्याच्यापुढे टाकला आणि म्हटलें, ‘ तुमच्याकडील जमा खपून आतां नावेंची रक्कम वाढली आहे. ही पहा, प्रथम पुलाच्या उतारासाठीं घेतलेले हे सहाशे दीनार–जोडा व चाबूकदुरुस्तीसाठीं चाभाराला दिले शंभर–दासीने पायाच्या फोडासाठीं नेलेल्या तुपाचे पन्नास–मडकीं फुटल्यामुळे रडणाऱ्या कुंभारणीला देवविलेले तीनशे,–ते हे पहा, या भूर्जपत्रावर लिहिलेले आहेत. पाळीव मांजरी व तिचीं पिल्लीं यांच्यासाठीं उंदीर व तुम्ही कृपाळूपणें मत्स्यरस आग्रहाने घेतला, त्याचे शंभर, पायाला लावण्याला लोणी, तसेंच श्राद्धाच्या दिवशीं स्नानासाठीं तांदळाचे पीठ व घृतमाक्षिक घेतलें, त्याचे सातशे १४०. खोकल्याचा त्रास मिटविण्यासाठीं म्हणून तुमच्या लहानशा मुलानें सुंठ व मध नेला, त्याचे शंभर–स्पष्ट बोलतां सुद्धा न येणारें तें मूल, याविषयीं काय सागणार ? हट्टानें वृषणोत्पाटन करण्याची भीति घालणाऱ्या भांडखोर भिक्षेकऱ्याला देववि-लेले तीनशे–भट्टपादांना घरीं आणविल्यावेळी खर्च पडलेले प्रथम शंभर व पुन. दोनशे-शंदामूल, धूप व पलांडू वगैरेबद्दलचे दोनशे—

अशा तऱ्हेनें त्यानें निर्विवाद म्हणून खर्चाच्या रकमा हिशेबांत दाखविल्या. शिवाय व्याजहि आकारून रक्कम फुगविली. वर्ष, मास, ग्रह, तिथी, पुनः पुनः येतच असतात, तशा

तो त्याच्यात्याच रकमा बोटावर मोजीत होता. नंतर दिलेल्या मूळ रकमा व व्याज मिळून आलेला आंकडा दाखवीत, ओंठ पुढें करून, डोळे मिचकावीत, त्यानें सौम्यपणानें म्हटले, 'हा सारा हिशेब नीट पहा, आणि ही माझ्या बरखडींतील—बगलेंतील—शल्यरूपी तुमची ठेव परत घेऊन, खर्चाला दिलेल्या रकमा मला सव्याज परत मिळण्याची व्यवस्था करा.'

हें त्याचें म्हणणें त्या गृहस्थाला प्रथम दर्शनीं खरें वाटलें व तो विस्मित झाला. पण पुढे त्याला तें बोलणें मध लावलेल्या सुरीसारखें वाटलें व त्यानें त्याच्यावर दावा केला. कारण त्या सावकाराचा लबाडीनें ती ठेव पचविण्याचा विचार आहे, अशी त्याची खात्री झाली होती. न्यायाधीशांना त्या दाव्याचा योग्य विचार व निकाल करतां आला नाहीं. तसा तो न्याय राजापुढें आला. त्यानें विचार करून त्या सावकाराला 'मूळ ठेव अद्यापि तशीच असली तर तिच्यांतील कांही दिनार आणा' असें सांगितलें. ते सावकारानें आणल्यावर राजानें नीटपणें पाहून मन्त्र्यांना म्हटलें, ' राजे लोक भावी राजांच्या नांवांचाही शिक्का पाडवीत असतात कीं काय? नाहीं तर कलश राजाच्या वेळी ठेवलेल्या ठेवींत आमच्या शिक्क्याचे दिनार कसे आले? या सावकाराने ठेवींचे लक्ष दिनार वापरले व ठेव ठेवणारानें त्याच्याकडून लागला तसा माल विकत घेतला, हे उघड आहे. तेव्हां मालाच्या रकमेवर व साऱ्या ठेवीवर या गृहस्थानें व्याज घ्यावें व द्यावे. मुद्दल ठेवीबद्दल निराळें सांगणें नकोच. साधारण न्यायी व दयाळु मनुष्य इतकेंच म्हणेल. पण असल्या लबाड सावकाराला त्या प्रथित यशस्कर महाराजांच्या निर्णयाप्रमाणें कडक न्याय मिळणें युक्त होईल. चूकून अन्यायाची गोष्ट घडली असेल तेथें मृदुपणा योग्य, पण विश्वासघाताला जबर दंडच पाहिजे.'

योग्य कालाची प्रतीक्षा करण्याचे महत्त्व त्या राजाला कळत होतें. म्हणून कठिण वादग्रस्त प्रश्नाचा निकाल करण्यांत, तो शांतता व स्वस्थता दाखवी. मर्मस्थळी घुसलेलें शल्य काढण्यांत घाई करून चालत नाही. तो मनूप्रमाणें सावधपणानें, शहाणपणानें व स्वतःच्या बुद्धीनें, काळजीपुरस्सर, प्रजेचें पालन करीत असे. यामुळें त्याची सर्वत्र प्रशंसा झाली. १६०. निरपेक्ष स्नेह, दर्पहीन सामर्थ्य, लोकापवादरहित पातिव्रत्य, सर्वांचे समाधान होणारें व योग्य वक्तृत्व, सामर्थ्यपोषक विद्वत्ता, चांचल्यहीन तारुण्य आणि निष्कलंक राज्यवैभव, या गोष्टी या अंत्य-कलि-युगांत उलट्या दृष्टोत्पत्तीस येतात.

अशा त्या राजेंद्रचंद्रवर्म्याच्या अंगींहि, पुढें, तीव्र मात्सर्यादिक दोष पैदा होऊन, तो दुष्कर्मरूपी भयंकर उल्कावृष्टी करूं लागला. औदार्य, शौर्य, गांभीर्य, वीर्य, धैर्य, तारुण्य, हे गुण दुसऱ्यामध्यें असलेले पाहून, त्याला भारी मत्सर वाटे. त्यापायीं त्यानें अगणित लोकांचे प्राण व मान धुळीस मिळविले. तसेंच त्याच्या कठोर भाषणानें रागावलेले मानी लोक त्याला तशींच उत्तरें देऊन त्याचा अपमान करीत. जिवंत माणसें व प्रसुप्त फणींद्र यांना डंवचून क्रुद्ध केल्यावर ते आपलें तेज प्रगट केल्यावांचून रहात नाहींत, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

या विविध सृष्टींत कुल, शरीर व चारित्र्य, यांना डाग न लागलेला असा एकहि गृहस्थ आढळत नाहीं. सष्टीकर्त्या ब्रह्माची सुद्धां उत्पत्ति पंकजापासून, शरीराचा वर्ण कपिल, शिर खंडित झाल्यामुळें चारित्र्य व यश दूषित झालेलें, अशा स्थितींत दुसऱ्याचा पाडच काय ? असो. असें असूनहि. तो राजा आपल्या आश्रितांचें कुल, वर्तन, स्वरूप, वगैरेंतील दोषाचें नेहमीं उघड उद्घाटन करीत असे. चढाओढीनें वैर पैदा करून. त्यानें पुष्कळशा शूर वीरांना आपसांत द्वंद युद्धें करवून ठार मारविलें. मासिक दरबार, इंद्रोत्सव, पर्वण्या वगैरे दिवशीं या द्वंद्व युद्धांत सामिल होणाऱ्यांना, तो भरपूर पारितोषिकें देई. २७०. राजवाडयापुढील पटांगणांत, अशीं द्वंद्वयुद्धें होऊन रक्तपात झाला नाहीं व हाहाःकार उठला नाहीं, असे उत्सवप्रसंग क्वचितच दृष्टीस पडत अशा दिवशीं घरून उत्साहानें बाहेर निघालेले कुलदीपक, तरुण, शूर, वीर, राजवाडया-पुढील प्रशस्त पटांगणांत द्वंद्वयुद्धें केल्यावर जखमी व लंगडे, लुले झालेले, असे त्यांचे आप्त त्यांना घरीं परत आणीत असलेले नेहमीं दिसत. काळेभोर केंस, दाढी मिशा व उत्तम वस्त्रालंकार यांनीं शोभणारे शूर शिपायी, मारले गेलेले पाहून त्या राजाला, दुःखाऐवजी आनंद वाटे! राजवाड्यांत गेलेले आपले पती सुखरूप परत आलेले दृष्टीं पडतील, तो त्यांच्या पत्नींना सुदिन वाटे.

तो नेहमीं ' बस, मी सांगतो तसें करा. ' असें दर्पानें म्हणे. प्रत्युत्तर न ऐकतां तो हव्या त्या सेवकाचें मंत्र्याला काम करावयाला लावी. मत्सर व हेवा यामुळें त्याचा स्वभाव बिघडून तो वैभवाला चढलेल्यांना अधिकारावरून काढून, त्यांची मानखंडना करीत असे. प्रबल कंपनाधीश मंचक याच्यावर त्याचा राग झाला, तेव्हां तो विषलाटाकडे पळून गेला व तिकडेच खशांच्या हातून मारला गेला. राजानें स्वतःच वाढविलेला व समृद्ध असा रक्क विशेष प्रबल झालेला पाहून त्यानें त्याला दूर केलें. माणिक्य सेनापतीही द्वाराधिपतीच्या जागेवरून काढला गेला. तेव्हां त्यानें वैतागून विजय क्षेत्रीं तीर्थवास पतकरला. काकवंशीय तिलकादिक शूर वीर, कंपनेश वगैरे कामांवर होते. ते राजाला नमून राहिले म्हणून टिकले. १८०. भोगसेन मूळचा गरीब व निराश्रित होता. त्याची एकनिष्ठ सेवा पाहून, प्रसन्न होऊन राजानें त्याला राजस्थानीय किंवा न्यायाधीश केलें. इंद्रद्वादशीच्या उत्सव प्रसंगीं झालेल्या युद्धांत, त्याचा पराक्रम पाहून, प्रत्यक्ष गर्गचंद्र प्रबल सैन्य जवळ असूनहि भिऊन पळून गेला होता. (इंद्रद्वादशी किंवा महाद्वादशीचा उत्सव भाद्रपद शुद्ध द्वादशीला होत असे. त्या दिवशीं वराहक्षेत्राची यात्रा भरत होती. )

सड्ड नावाच्या सामान्य शिपायाचें रड्ड, छड्ड व त्यड्ड नांवांचे तिघे पुत्र होते. त्यांना राजानें मंत्री बनविले. विजयसिंहाचे पुत्र तिलक व जटक यांची दुर्दशा. राजाची नोकरी धरल्यावर नष्ट झाली. कारण राजानें त्यांना अमात्य केलें. यम, एला, अभय, बाण वगैरे लोक, त्या श्रीमान राजाच्या पदरीं द्वारनायक होते. अशांची गणना कोठवर करावी ? त्या राजाची स्थिति विद्युच्चंचल झाली होती. नव्या उपजेच्या कोंवळ्या झुडपांच्या गर्दीत पांच

?ार जुन्या वृक्षांची खोडें उभी असावी, तद्वत, त्या तरुण अमात्य मंडळीमध्यें प्रशस्तकल-?ादिक दोन चार जुनें मंत्री उरलेले होते. कंदर्पाला राजानें बुद्ध्यां बोलावून आणून, त्याला अधिकाऱ्याचें पद देऊं केलें. पण राजाची असहिष्णुता पाहून त्यानें तें मान्य केलें नाहीं.

त्या नव्या राजाच्या वेळीं त्या दरबारात, आस्थान, आचार, भाषण प्रकार, व्यवहार, सर्व कांहीं नवे झाले होते. वशीकरण चूर्ण लावलेल्या वारवनितेप्रमाणे, लक्ष्मी धीर वीरांना सुद्धा मोह घालून कुमार्गगामी करते. नृपसपदा, नृपांना जणों पिशाच्च बनविते व त्यांना आप्त व आप्तपणा म्हणजे शत्रू व शत्रुत्व भासविते. १९०. त्या अन्वयें सुस्सल राजा सर्व सुखसाधनसंपन्न असूनहि त्यानें भावाचें राज्य हरण करण्याच्या इच्छेनें त्याच्यावर चढाई केली व तो एकाद्या ससाण्याप्रमाणे काश्मीरांत वराहवार्त गांवाच्या अलीकडे पोहोंचला. हें वर्तमान राजाला कळलें. (वराहवार्त हल्लींचे बीरु परगण्यांतील वराहगाम, तें नकाशांत वरगाम असे दिले आहे.) तेव्हां त्यानें पुष्कळशा सैन्यासह, सुस्सलाला कोणी बंदोबस्ताचे ठिकाण हातीं लागण्यापूर्वींच, त्याच्यावर जाऊन, त्याचा पराभव केला. तसा सुस्सल पळून गेला. त्याच्या छावणींत सांपडलेलें सामानसुमान व तांबूलाची वगैरे साधन-सामग्री, यावरून, त्याच्या तयारींचा अटकळ होत होती. ते सारे सामान उच्चलाच्या हातीं पडलें. दुसरे दिवशी तो परत निघण्यापूर्वी प्रबल व वीर्यवान सुस्सल, पुनः नेटानें हल्ला करण्यास येत असल्याचे ऐकून राजानें गर्गचंद्राला सैन्य देऊन त्याच्यावर धाडलें. त्यानें सुस्सलाच्या सैन्याचा फडशा पाडला आणि युद्धाचे आयास सोसण्याला असमर्थ व थकलेल्या त्याच्या वीरांना, अप्सराबरोबर, त्याच्या उद्यानतुल्य विमानात विश्राति घेण्याला पाठविलें. त्या लढाईत राजपुत्र सहदेव व युधिष्ठिर यांनीं भर्त्याच्या प्रसादाची फेड प्राण अर्पण करून केली. सुस्सलाच्या सैन्यांतून पळालेले पुष्कळसे चांगले घोडे गर्गाच्या हातीं लागले. ते पाहून पदरीं पुष्कळ अश्व असूनहि, राजाला आश्चर्य वाटलें. उरलेल्या सैनिकांसह क्रमराज्याच्या वाटेवर सेल्यपुर (हल्लींच्या तोषमैदानपासून श्रीनगरच्या मार्गांतील शिल-पुर) येथें जाऊन राहिल्याचें ऐकून, राजानें तात्काल त्याचा पाठलाग केला. २००. तेव्हां सुस्सल थोडयाशा लोकांनिशीं दरद राज्यांत गेला. सेल्यपूरचा डामर लोष्ठक यानें सुस्सलला मार्ग दिला होता म्हणून, राजानें त्याला ठार मारविलें. नंतर तो नगराला परत गेला. त्यानें भ्रातृस्नेहामुळें सुस्सलानें केलेल्या या शत्रुत्वाकडे पुढे कानाडोळा केला.

कालिंजर–कालिंदर–येथील राजा कल्ह निपुत्रिक होता. त्यानें आपला जांवई विजय-पाल याची कन्या मेघमंजिरी–इची आई वारल्यावर–तिला पुत्रापलीकडे प्रेमानें आपल्या घरीं पाळलें होतें. पुढें त्यानें तिचें, प्रख्यात अशा सुस्सलाशीं लग्न केले होते. तो कल्ह राजा प्रबल व प्रतापी होता. त्याच्या दराऱ्यामुळें लोहरांतील यःकश्चित मुलालासुद्धा अपकार करण्याची कोणाला प्राज्ञा नव्हती. पुढें सुस्सल कांहीं महिन्यांनीं दुर्गम पहाडी मार्गांनीं परत आला. असें हें संकट टाळल्यावर, धीर अशा उच्चलावर आणखींहि अशींच दुसरीं संकटें आलीं तींहि त्यानें जणों सहज नष्ट केलीं.

भीमादेवानें कलश राजाचा पुत्र भोज, याला हातीं धरून दरदाचा राजा जग यार्ची मदत मिळविली. हर्ष राजाचा दासीपुत्र सल्ह व दर्शनपालाचा भाऊ संजपाल, हे त्याचे सहाय्यकर्ते झाले. उच्चल राजा धूर्त व कारस्थानी होता. त्यानें दरद राजाला फो व त्याला परत पाठविले. तेव्हां भोजहि आपल्या जागीं परत गेला, सल्हहि दरद राजामा गेला आणि संजपाल सुस्सलाकडे नोकर झाला. पुढे लौकरच भोजाला त्याच्या एका क्रू व नीच नोकरानें द्रव्य लोभानें धरून उच्चलाकडे नेले. त्याने त्याला यःकश्चित चोराप्रम फांशी दिलें. देवदेवेश्वराचा पुत्र पित्थक यानेहि राज्यलोभाने खटपट चालविली होती. उच्चलाने डामरांचे सहाय्य घेऊन त्याच्यावर चढाई करताच तो देशांतराला गेला.

पूर्ण विचार केल्याशिवाय मूढ लोक पशुवत धांवत सुटतात यामुळे त्यांची फजी होते व लोक त्याना हंसतात. मल्लाचा पुत्र रामल हा खाणावळींतला आचारी होता. बराच धूर्त, बडबड्या व लोकांवर छाप बसविणारा होता. उच्चल राजाविरुद्ध असून त्या त्रास देऊं इच्छिणारे आसपासचे कांहीं राजे व सरदार, यांनीं फसून, स्वतः मल्ल राजाचा पुत्र म्हणविणाऱ्या रामलला, धनमानादि दिले पुढे उन्हाळ्याच्या त्रास मुळें तो एकटाच काश्मीरात परत आला असतांना, त्याला राजाच्या सेवकांनीं ओळखलें त्याला पकडून त्याचे नाक कापले पुढें तो तसाच राजाच्या छावणीत आला व आप पूर्वीचा धंदा करूं लागला. त्याला पाहून लोकांना चमत्कार व गम्मत वाटे.

वेडे लोक कुटिल नीतीनें अभ्युदय-प्राप्तीसाठीं झटतात व व्यर्थ कष्टी होतात. दैवा इच्छा अन्यथा करता येत नाहीं. २२०. पुरुषप्रयत्न गवतांतील अग्नीप्रमाणें दैवरूपी वा कोठे विझलासा झालेला पुनः पेटतो, तर कोठे प्रयत्नाने पेटविलेलाहि विझून जातो. पशू च्या पुच्छाला संलग्न झालेल्या कोलतीप्रमाणे कितीहि पलायन केले तरी भवितव्य टाळ येत नाहीं. नियतीने नेमलेले भोग प्राण्याला भोगावेच लागतात. ते केव्हांहि सुटत नाहीं ते भोगल्याशिवाय संतत प्रदीप्त अग्नि, विष, शर. तरवार, वगैरे शस्त्रे, कडेलोट, किंवा ती अभिचार, यांच्या द्वारेसुद्धां त्याचा नाश करतां येत नाहीं.

उच्चल राजाच्या आज्ञेने राजसेवकांनीं भिक्षाचराला जयमती राणीच्या घरून वि स्तेवरील वध्य भूमींत नेऊन, त्याला एक शिळा बांधली व नदींत टाकलें. जोराच्या वाऱ्याम तो लौकरच तीरावर लागला. व तेथे अवाचित एका कृपाळु द्विजाच्या दृष्टी पडला. त्याला दुगदु होती. त्याने त्याला घरीं नेल्यावर तो थोड्या वेळानें शुद्धीवर आला. पुढें त्याने त्याला आप आप्त आसमती इच्या स्वाधीन केलें. तिला (हर्षाच्या राण्या) शाही राजकन्या आदर दिद्दा म्हणत असत. (हल्ली सुद्धां काश्मिरी ब्राह्मणांत घरांतील वडील बाईला, त्या नांवाच्य प्रसिद्ध राणीवरून, आदरानें दिद्दा म्हणण्याचा प्रघात आहे.) त्या चतुर आसमती-दिद्दा त्याला दूर देशी गुप्तपणें नेलें. तिकडेच दक्षिणेत तो लहानाचा मोठा झाला. त्याची ख हकीकत ऐकून माल्वेंद्र नरवर्मा याने त्याला पुत्राप्रमाणें वागवून, सर्व शास्त्रांचे व शस्त्र विद्येचें शिक्षण देवविले. (नरवर्मा हा उदयादित्याचा पुत्र लक्ष्मण याच्या मागून वि. ११६१=ई. स. ११०४-५ मध्ये माळव्याच्या गादीवर होता, असा दाखला आहे.)

कोणाच्या मते जयमती राणीनें दुसऱ्याच एका समवयी मुलाला मारवून, भिक्षाचराला वांचविलें होतें. तसेच खरा भिक्षाचर मेल्यावर दिद्देनें तत्सदृश दुसरें एक मूल आणवून, त्यालाच भिक्षाचर म्हणून प्रसिद्धीस आणलें, असेंहि कोणी म्हणतात.

पुढे देशांतराहून आलेल्या वकीलांच्या तोंडून ही हकीकत कळल्यावर, राजा जयमतीवर नाराज झाला. २३०. त्यानें याचा बभ्रा न करतां, भिक्षाचराला आपल्या राज्यांत न येऊं देण्याविषयी, मार्गांतील राजांकडे बोलणें लावून व्यवस्था केली. मूर्ख लोक स्वतःच पत्नीच्या दुर्वर्तनाचा डांगोरा पिटून व शत्रूविषयी व्यर्थ बोभाटा करून, आपलीच अपकीर्ती व हानी करून घेत असतात.

याप्रमाणे भिक्षाचराला मिळणारी प्रतिष्ठा कमी करण्याला दैवदेखील समर्थ झालें नाही. पूर्वजन्मींच्या कर्मवैचित्र्यामुळें होणारें दैवाचे खेळ, स्वप्न, इंद्रजाल, माया वगैरेंनाहि निर्विषय व आश्चर्यकारक असतात. एखाद्या झुडपातून उठलेली आगीची ठिणगी दुर्दैवानें वृद्धी पावून पुरग्रामादिकाना जाळून टाकते. तसा हा राजवंशी भिक्षाचर, प्रजेच्या भावी नाशासाठीं गुप्तपणें वाढत होता. विषवृक्षाशेजारींच प्रतिकारी वल्लीहि वाढत असते. पावसाने पाणी गढूळ होण्याच्या सुमारासच अगस्त्योदय होत असतो. भूतसृष्टीचा नाश करण्याला समर्थ उपद्रव उदय पावत असतांनाच दूरदर्शी विधी त्याच्या प्रतिकाराची व्यवस्था लावीत असतो. त्याचप्रमाणे याच सुमारास सुस्सल राजाला (लौकिक वर्ष ४१८१=ई. स. ११०५-६ त) पुत्र झाला. तो पुढे विपद्ग्रस्त जगताचा उद्धारक व्हावयाचा होता त्यानें त्याचे पुढे अन्वर्थक, असे जयसिंह हे नाव ठेवलें. तेव्हापासून सुस्सलाला सर्वत्र विजय मिळत गेला. सर्वार्थसिद्ध झाल्याने गौतमबुद्धाचे सर्वार्थसिद्ध हे नाव अन्वर्थक होऊन राहिलें आहे त्याचप्रमाणे जयसिंहाच्या नावाची अन्वर्थकता शब्दार्थाला धरून राहिली आहे. २४०. ही दोन्ही नावे त्या व्यक्तींचींच कायम झालीं आहेत. त्या बालकाच्या कुंकुमवर्ण पदावरील शुभ चिन्हे पाहून उच्चलानें बंधूवरील राग सोडून दिला. त्या पदमुद्रेने उभयतांमधील वैर नष्ट करून तीं दोघांच्याहि राज्यात स्वस्थता व शांतता नांदण्याला साधन झाली.

पुढे उच्चलाने आपल्या स्वर्गवासी पित्याला पुण्य लागावे म्हणून वडिलोपार्जित वाड्याच्या जागेवर एक मठ बांधविला. त्याच्या वास्तुशांतीच्या महोत्सवप्रसंगी त्याने याचकांसाठीं कल्पवृक्ष बनून गायीं, जमीन, सुवर्ण, अन्नवस्त्र, यांचीं उमाप दानें दिलीं. त्यानें मुक्तहस्तानें पाठविलेल्या देणग्या पाहून, दिगंतरांतील मोठमोठे राजे आश्चर्यचकित झाले. राणी जयमतीने भर्तृप्रसादाने मिळविलेली पुष्कळ संपत्ती सार्थकीं लावण्यासाठीं एक विहार व एक मठ बांधविला. राजाच्या कांहीं पूर्व पापामुळे त्या मठाचें नवें नांव बुडून, त्याला नवमठ हेच नांव मिळाले.

तसेच त्यानें आपल्या दुसऱ्या एका वडिलार्जित जागेवर, आपली बहीण सुल्ला, इच्या नांवानेंहि एक मठ बांधविला. पण त्याची योग्य प्रसिद्धी झाली नाहीं. शिरावर

लोंबत असलेल्या मृत्यूच्या तरवारीचा त्यानें वेळेवारी विचार न केल्यामुळे, त्यानें त्यासाठीं कायम खर्चाची व्यवस्था केली नव्हती. ( या सुल्लामठाचें काम पुढे जयसिंह राजानें पुरें करविल्याचे श्लोक ३३१८ मध्यें वर्णन आहे. )

एकेप्रसंगी उच्चल राजा क्रमराज्यांत असतांना, वऱ्हटचक्र गावांतील स्वयंभू ज्वालामुखी स्थानाच्या दर्शनास जाताना, कंबलेश्वर नावाच्या खेडयावरून थोडयाशाच लोकांनिशी चालला होता. ( स्वयंभू ज्वालामुखी–अग्निक्षेत्र–हल्लींचें सूयम्. वऱ्हटचक्र त्याच्या दक्षिणेस सुमारे मैलावरील त्सक्वडर–नकाशांतील शेखवड्ड–हें खेडे असावें. कंबलेलेश्वर=हल्लींच्या मर्छीपूर परगण्यात एका लहानशा पहाडाच्या रांगेच्या पायथ्याशीं असलेलें क्रमभर नांव होय. या पहाडीच्या रांगेपलीकडे, क्रमराज्यातील उत्तर भागांतून स्वयंभूकडे जाणारा रस्ता आहे. तो दृचल खेडयाजवळ पंजतोर नाल्याच्या खोऱ्यांत शिरतो व तेथून तो पश्चिमेकडे वळतो. राजपोर खेडयाच्या वरच्या अंगाला हें खोरें निरुंद होतें व त्याच्यात सुमारें मैलभर गर्द झाडी आहे. उच्चल राजाला दस्यूंनीं गांठलेली जागा बहुधा हीच असावी. ) तेव्हां तिकडील हत्यारबंद चोर चांडालानीं, एकाएकी हल्ला करून, त्याला मारण्याचा विचार केला. पण त्याचें राजतेज व पराक्रम पाहून, त्यांची शस्त्रें गळालीं. तरी त्याला वाट अडविली गेल्यामुळें व चुकल्यामुळे, त्या खोल पहाडी व जंगली खोऱ्यांत, रात्रभर भटकावें लागलें आणि सैन्याच्या छावणींत राजा नष्ट झाल्याची दुर्वार्ता अप्रतिबद्ध पसरून, गडबड उडाली.

गिरिगव्हरातून प्रारंभी अल्पशी उठलेली वावटळ, सपाट वनभूमींत बळावते, तशी ती दुर्वार्ता नगरापर्यंत पोहोंचेतों तिला मोठें महत्त्व आलें आणि तेथेंहि गोंधळसा उडाला त्यावेळी तेथें यशस्काराचा आजा कामदेव, याच्या वंशातील रड्ड वगैरेंचा बंधू छुड्ड हा नगराधिकारी होता. त्याने नगरांतील गोंधळ शांत केला. नंतर तो आपल्या बंधूंसह राजवाडयांतील आयुधागारांत, पुढचा विचार करूं लागला. त्यात, कोणाला राजा करावें, या विषयीं वाटाघाट चालली. तेथे एक सड्ड नावाचा कुटिल कायस्थ होता. त्याने त्यांना म्हटले, ' हे निष्कंटक राज्य आयतेंच हातीं आलेलें–त्याचा तुम्हीच स्वीकार का करूं नये? यावेळीं तुमचे आप्त, सुहृद्सेवक, वगैरे मिळून तुमचा जमाव मोठा व दुर्जय आहे. ' या भाषणावरून त्या साऱ्याच्या मनांत दुष्ट राज्यलोभ उत्पन्न झाला आणि ते लौकरच सिंहासनावर बसण्याच्या तयारीला लागले. २६०. ते थोर अशा यशस्कराच्या वंशांतले आहेत अशी समजूत असल्यामुळे, त्या सर्वांना राज्यप्राप्तीची इच्छा व उमेद होतीच व त्यांचे वर्तनहि दुष्ट होतें. त्यांतच त्या दुष्ट मित्राच्या चिथावणीमुळें त्यांची महत्वाकांक्षा राजद्रोहांत परिणत झाली. सड्ड हा हलक्या व ओझें वाहणाऱ्या लवटांच्या कुलांतला असल्यामुळें त्याच्या सुचनेचा नीचपणा व कृतघ्नपणा त्याच्या लक्षात आला नाहीं. त्याचा पिता क्षेमदेव हा अगदीं सामान्य माणूस होता. पण सड्ड साहसी व क्रूर निघाला. त्याने पूर्वी राजवाडयांतून एक सोन्याची झारी चोरल्याचा त्याच्यावर संशय आला होता. पण त्याच्या गांभीर्यावरून ती गोष्ट कोणी उघडकीस आणली नाहीं. तो नेहमीं शिरोवेष्टन-

हीन व हातीं नागवा खंजीर घेऊन, जणो त्रैलोक्याला तुच्छ समजत, राजपुत्राप्रमाणें ऐटीनें फिरत असे. ( पूर्वी काश्मीरी लोक उघडया माथ्याने फिरत असल्याचा ग्रंथांतरीं दाखला आढळतो. ) तो वरचेवर बोटें चाळवी व विचारात गढलेला दिसे. ते त्याचे विचार भयंकर राज्यतृष्णेच्या रूपानें बाहेर पडले. पण पुढे राजा जिवंत असल्याचे कळले तेव्हा, छुड्ड वगैरेंचे सड्डाच्या प्रेरणेने उठलेले ते क्रूर विचार जागच्याजागींच जिरले. पण त्यांनीं आपली महत्वाकांक्षा कायमची सोडली असे मात्र नव्हे. ती उघड प्रगट होत नव्हती, तरी ती नष्ट किंवा निद्रित मात्र झाली नाही.

पुढें त्याच्यावर राजाची मर्जी फार दिवस टिकली नाहीं. त्याने हळूं हळूं त्याचे अधिकार कमी केले व त्यांना राजस्थानांतून वगळलें.२७०. (येथें राजस्थानिक याचा अर्थ न्यायाधीश असा न घेता सामान्य मंत्री असा घ्यावयाचा आहे. ) राजा बहुतेक सर्वांशींच रुक्ष भाषण करीत असे. तसेच तो त्यांनाही रुक्ष, कठोर व मर्मभेदक बोलूं लागला. त्यांचा पिता हर्षाच्या वेळीं मरण पावल्यावर, ते आपल्या मातेजवळच रहात होते. ती विधवा, तारुण्यानें उन्मत्तशी झालेली होती त्यांच्या शेजारींच मय्यामंतक नांवाचा एक सैनिक त्यांचा मित्र रहात असे. त्याच्याशी ती लागूं असल्याच्या संशयावर, त्यांनी त्याला ठार मारलें होते. त्या जारिणीचेंहि त्यांनी शासन करावयास पाहिजे होते, ते त्यांनी केलें नाहीं. म्हणून राजाने रागानें तिचे नाक कापविलें होते. या गोष्टीचा राजा त्यांच्यासमक्ष उल्लेख करी. तसेच त्याच्याविषयी तपास करवितांना तो 'त्या नकटीचे पुत्र कोठें आहेत ?' म्हणून म्हणत असे.

तो राजा कायस्थांचा जणो कर्दनकाळ बनला. त्याने सड्ड नावाच्या कायस्थाला बृहद्गंजाधिकारी नेमले होते. सड्डाने आपल्या हाताखालच्या रोकडयाच्या—गणनापतीचा—छळ केला. राजाने सड्डाला गंजेशाच्या जागेवरून काढल्यावर त्या रोकडयाने, सड्डाने सरकारी पैसा खाल्ल्याबद्दल चुगली केली. तिच्यावरून राजाने त्याच्याकडील प्रवेशभागिकाचे कामहि काढले. तेव्हा रागावून त्या नीचाने पूर्वीच वर्णन केल्याप्रमाणे रड्ड व छुड्ड वगैरेंना राजसिंहासन आक्रमण करण्याची प्रेरणा केली होती. त्याप्रमाणेंच त्याने आता त्यांना पुनः चिथावले. त्या मंडळीनें राजाला ठार मारण्याचा बेत केला व त्या कटात हंसरथादिकांनाहि मिळवून घेतले होते. सर्व कटवाल्यांनी परस्पर आणभाक केली होती. ते योग्य संधीसाठी टपले होते. पण ती त्यांना चारपाच वर्षे मिळाली नाही. २८०.

या नीच कटांत पुष्कळ लोक सामील होते व तो पुष्कळ दिवस कायम टिकला होता. त्या लोकांचे अनेक विचार व बेत चालू होते. तरी प्रजेच्या कमनशीबामुळे तो कट उघडकीस आला नाही, हें तरी विलक्षणच होय. ते एकमेकांना, 'राजा तुम्हांला नेहमी वर्मी बोलतो व सारखा मर्मभेद करीत असतो, याचा सूड तुम्ही कां घेत नाही ?' असें म्हणून चिडवीत असत आणि या द्वारें ते राजाविषयींचे वैर दृढमूल करीत असत. छाती, बगला, पाठ वगैरेंवर नेहमी न दिसे असें, चिलखत घालून राजाला ठार मारण्याची संधी पहात ते त्याच्या मागे मागे फिरत असत.

पूर्वी त्या राजाचें जयमती राणीवर फार प्रेम होतें. तिच्यावाचून त्याला क्षणभर करमत नसे. तिला खुष करण्यास्तव तो, राजा असूनहि, सामान्य माणसाप्रमाणे हवें तें करण्यास तयार असे. पण पुढे त्याच्या भावी विनाशाचे पूर्व चिन्हच जणों, असा त्याच्या स्वभावात विलक्षण फरक पडला. त्याने तिरस्कार करून दोन वर्षांत तिचे नांवसुद्धा घेतले नाहीं. कोणाच्या मते, याचे कारण, जयमतीनें भिक्षाचराचें रक्षण केले म्हणून व दुसऱ्याच्या दृष्टीने प्रेम हें निसर्गतःच विद्युलतेप्रमाणे चंचल असते. हे होते.

यानंतर वर्तुल नावाच्या प्रदेशाच्या राजाची कन्या बिज्जला, इच्याशी राजाने लग्न केलें. (वर्तुल=भरतुल, हा बहुतेक चीनाब नदीच्या उत्तर तीरावरील व विषलाटाच्या ईशान्येकडील पहाडी प्रदेश असावा. तेथील राजा सहजपाल याचा पुढें उल्लेख आला आहे.) तिच्यावर त्याचे प्रेम पूर्ण होते. या सुमारास राजा संग्रामपाल मरण पावला व त्याच्या वडील पुत्राला चाकिकानी द्वेषाने अयोग्य ठरवून व कैद करून, धाकटा पुत्र सोमपाल, याला गादीवर बसविले. हें उच्चल राजाला आवडले नाही व त्यानें राजपुरीवर रोष धरला. पण पुढे त्यानें सोमपालाला आपली कन्या दिली. हा विवाहसमारंभ मोठ्या थाटाचा झाला. २९० (ही कन्या सौभाग्यलेखा असावी.) त्याच्यात तो अर्थि लोकाचा जणो चिंतामणी बनला व त्याने नाना तऱ्हेचा खर्च फारच सढळ हाताने केला. यामुळे तो प्रजेला फार प्रिय झाला. तोच त्यानें केलेला शेवटचा महोत्सव व समारंभ होय.

जांवई परत गेल्यानंतर त्या राजाने यःकश्चित कारणावरून रागाच्या सपाट्यात सर्व तंत्री लोकाना बडतर्फ केले. पण द्रोही मंडळी तशीच ठेवली. त्याचवेळी त्याने भोगसेनाला द्वाराधिकारावरून दूर केले. यामुळे तोहि त्याचा वैरी बनला. त्याने कामावर असतांना सर्व डामरांना जिंकून सुस्सल राजाला जिकण्यासाठी लोहरावर स्वारी करण्याची तयारी केली होती. तो निघणार इतक्यांत राजाने त्याला मनाई केली. कारण त्याच्या मनात सुस्सलाविषयींच्या वैरापेक्षां बंधुप्रेमाचे प्राबल्य अधिक होते. याचा भोगसेनाला राग आला व तो राजाला याविषयीं लागून टाकून बोलला. याचा अर्थातच राजाला राग आला होता. रड्ड, व्ड्ड, प्रमुख कटवाल्यानी त्या राजाच्या खरा हितकर्त्या भोगसेनाला आपल्यांत मिळवून घेतले. यमद्वारी पोहोचण्याच्या इच्छेनेच जणों राजानें सर्वांचा अपमान केला असूनहि, त्यांना हद्दपार केले नाहीं. कटवाल्याच्या मोठमोठ्या उमेदी असतांना, त्याच्या चरितार्थाचे साधन नष्ट झाले होते. ते मोठे महत्वाकांक्षी होते. सड्डाला, भोगसेन हा शूर व सरळमार्गी असल्याचे कळून आले होते. तरी त्या दुष्ट व कुटिल माणसाने भोगसेनावर विश्वास ठेवल्याबद्दल प्रमुख कटवाल्याना खूप नावे ठेवली आणि निक्षून सांगितलें की, 'कांही होवो. प्राण गेला तरी पतकरले. पण राजाला आजच्याआज ठार केलेंच पाहिजे, नाहींतर हा साधाभोळा भोगसेन आपला मात्र भेद करील' हेहि कांही खोटे नव्हते. कारण, भोगसेनाने राजाला 'मला महाराजाना कांहीं एकातात विनंति करावयाची आहे,' असे म्हटले असताना, राजाने तुसडेपणानें 'कांही सांगितलेंत तरी तुम्हांला द्वाराधिपती पुनः केव्हांहि नेमणार नाहीं,' असे बोलून, त्याला झिटकारलें होते. तसा तो त्या कटांत पुर्तेपणी सामिल झाला होता.

उन्हाने त्रासून गाढ झोपी गेलेला जणो नियानिवश होत्साता, स्वतःला जागे करणाऱ्याचा द्वेष करीत असतो.

पुढे तंत्री लोक आपल्या सज्ज व सशस्त्र सोबत्यांसह पाळीप्रमाणे पाहऱ्यावर आले. त्यांनी काही चौकीदार चांडालाना फितविले व 'रात्रीं आपण ज्याला मारूं त्याला तुम्हींहि मारावे,' असे सांगून त्यांच्याशीं संकेत ठरविला व त्याना एका मंडपांत आणून बसविले.

राजा भोजनोत्तर थोडा वेळ स्तब्ध बसला. तोवर कटवाल्यांनीं बाह्य मंडपांत राहून राजा रागात असल्याचे मागून, राजसेवकाना तेथून लावून दिलें. पुढे लौकरच राजा मद-नालस होऊन, त्रिजला राणीकडे जाण्यास निघाला. त्याच्यापुढे मशालची व बरोबर थोडेसे सेवक होते. तो मध्यमंडपात पोहोचला तसा सङ्गाने मार्गील मंड-पाचे द्वार बंद केले. तेव्हा तिकडून कोणी येण्याजाण्याची भीति उरली नाही. ते सारे जण उठून त्यांनी राजाला गराडा घातला व एकानें राजापुढे काही विनंति कर-ण्याच्या मिषाने गुडघे टेकून त्याची वाट अडविली. तितक्यात दिन्न द्विजाचा पुत्र तेज, याने राजाचे केस धरून ओढले व त्याला खंजीर मारला. त्या बरोबरच कांचनगौर सुमेरु शृंगात चपल नागिणी घुसाव्या तद्वत राजाच्या कांचनगौर शरीरात दुसरेहि पुष्कळांचे खंजीर खुपसले गेले. ३१०. तेव्हां राजाने 'द्रोह, द्रोह,' असे ओरडत, आपले केस सोडविले, आणि दातांनी जवळच्या लहानशा खंजीराचे तो बंद तोडूं लागला. त्याच्यावर हल्ला झालेला पाहताच त्याची कटयार जवळ ठेवणारा सेवक सुजनाकर हा पळाला होता. त्या, लहान मुलाच्या हातींच योग्य अशा, खंजीराच्या मुठींचे बंद मोठ्या कष्टांनेच सुटले व त्याने तो बाहेर काढला व गुडघ्यात धरून केसांना गाठ दिली. तोवर त्याची आतडी बाहेर पडली होती. तरी तशा स्थितीतहि त्याने मोठ्याने गर्जना करून, तेजाला वार केला. (कटार=हल्लींची कट्यार एक मोठासा दुधारी जांबिया. हा शब्द संस्कृतात बराच पूर्वी आलेला दिसतो.) त्या जोराच्या वाराने तेज खाली पडला. यङ्ग हा मागून वार करात होता. त्यालाहि राजाने खंजीर मारला आणि सिंहगर्जना करीत पुनः वळून त्याने व्यङ्गाचे विदारण केले. तसेच त्याने आणखीहि एका कवच घातलेल्या कटवाल्यावर वार केला. तसा तो थोडा वेळ तडफडला व मरण पावला. नंतर राजा निसटून जाण्या-साठी धांवत असताना, बंद केलेल्या मंडपाच्या द्वाराजवळील रक्षकांनी त्याला न ओळख-ल्यामुळे द्वार उघडलें नाही. तसा तो दुसऱ्या दाराकडे वळला. तोच ह्लुङ्गाने, 'आतां कोठें जातोस,' असे म्हणत त्याला तरवार मारली त्यावेळी भोगसेन, दाराआड, भिंतीकडे तोंड करून, भिंतीवर कायसे लिहीत होता. ३२०. त्याला राजाने जाता जाता, 'भोगसेना, असा त्रयस्थासारखा का उभा आहेस.' असें हटकले. तेव्हां तो थोडा लाजला व त्याने कायसं अस्पष्ट उत्तर दिलं.

रथ्यावट मशालची, निरशस्त्र होता. तरी त्यानें आपल्या पितळी दिवटीनेच हाण-

मार केली. पण कटवाल्यांनीं त्याला ठार केलें. चंपा येथील एक राजपुत्र, सोमपाल यानेंही शौर्य दाखविलें व स्वतःकडे निंद्यपणा येऊं दिला नाहीं. पण तोहि कटवाल्यांच्या हातून मारला गेला थोर अशा शूरपालाचा नातू व राजकाचा पुत्र अज्जक हा आपला जंबिया कुत्र्याच्या शेपटीप्रमाणें खालीं दावून पळून गेला. पुढें राजा धांवत धांवत कठड्याजवळ गेला. तो त्याच्यावर चढणार तोंच चौकीदार चाडालानीं त्याच्या गुडध्यावर वार केले; तेव्हां तो खालीं पडला. ३२५. श्रृंगार नावाचा एक स्वामिभक्त सेवक त्याच्यावर आडवा पडला. त्याला कट-वाल्यांनी जखमी करून एकीकडे ओढलें. राजा उठूं लागला तेव्हां कालीने जणो त्याच्या-वर नीलकमलाचा हार टाकावा त्याप्रमाणे कटवाल्यांच्या शस्त्रावलीने त्याला झाकून टाकले. 'हा नष्ट मोठा धूर्त आहे. न जाणो मेल्याचें सोंग घेऊन पडला असेल' असे म्हणत सड्डाने त्याचा गळा कापला. 'ज्याला तूं बडतर्फ केलेस तोच मी' असें बोलून त्याने त्याचीं बोटें तोडून रत्नजडित आंगठ्या ओढून घेतल्या. एकाच पायात जोडा उरलेला, केसावरून पुष्पहार गळून पडलेले व केसांनी तोंड झाकलेले, असा तो दीर्घबाहु राजा, हात पाय ताणून जमीनी-वर निजल्यासारखा दिसत होता. ३३०.

त्या ओजस्वी राजाने शेवटीं जें शौर्य व वीरवृत्ती दाखविली त्यांनी, त्याने लोकावर केलेल्या क्रूरपणाचा दोष कांहीसा धुवून टाकला म्हणावयाचें.

शूरट नांवाचा राजसेवक बाहेर पडून या भयंकर राजद्रोहाविषयीं ओरडत होता. त्याला भोगसेनाने त्वेषाने ठार मारलें. याप्रमाणें उच्चल राजा आपल्या प्रिय पत्नीच्या मंदिराकडे निघालेला दुर्दैवानें मोहित होऊन मार्ग चुकून जणो कालीच्या मंदिरीं पोहोंचला !

राज्यरूपी उपवनांत नृपतिरूपी मधुप भोगरूपी किंजल्कावर लुब्ध होऊन, नानाविध वसन कुसुमांच्या श्रेणींनीं स्वतःला प्रसन्न करीत व नटवीत असतात. पण त्यांची स्थिती बहुतेक दृष्टनष्ट अशीच असते. अशा त्या दोघानाहि विधिरूपी तरल वायु साऱ्या वन-राजींतील वल्लींनाच हाणून पाडून, नाहींसे करीत असतो ही गोष्ट कितीतरी कष्टकारक आहे ! हाय हाय !

त्रिभुवनविजयी लंकापतीचा, तिर्यक् वनचरांकडून नाश झाला निखिल नृपसत्तम कुरुपती दुर्योधनाला मस्तकावर लत्ताप्रहार सोसावा लागला. मोठमोठ्याना मान व गर्व-हारक परिभव पावून, शेवटीं त्याची सामान्य माणसाशी बरोबरी होत असते, तेव्हां कोणाचाहि 'मी मोठा' असा अहंकार कसा कायम राहणार !

शत्रू निघून गेल्यावर त्या राजाचें ते नागडे उघडे प्रेत, दोघां छत्रधाऱ्यानी, हात व पाय धरून दहनासाठी ओढून नेलें. त्याची मान लोंबकळत होती, केस उडत होते व सर्व शरीर रक्तबंबाळ झालें-होतें असे ते, जणों अनाथ प्रेत, त्यांनीं धावऱ्या धावऱ्या वितस्ता व महासरित, याच्या संगमावरील बेटातल्या स्मशानांत नेऊन, तेथे त्याला भडाग्नी दिला. ( महासरित-हल्लीची मार नदी-दल्सरोवरांतून निघून, शेरगड राजवाड्यासमोर, व पहिल्या पुलाच्या थोडी खालीं, वितस्तेला मिळते. या दोन्ही नद्यांच्यामध्ये माक्षिक

स्वामीचें=हल्लीचें मायसुम नांवाचें मोठें बेट आहे. पहिल्या पुलाच्या किंचित वरच्या बेटाच्या भागांत सुमारें ५०१६० वर्षाखालीं स्मशान होतें. तें फार प्राचीन असावें, असें यावरून दिसतें. ) त्याचे मरण तसेंच त्याच्या प्रेताचा अग्निसंस्कार, इतर कोणी पाहिला नाहीं. तो जणो आकाशांत उडून गेल्यासारखा, एकदम नष्ट झाला. ३४० तो लौकिक वर्ष ४१८७ ( ई. स. ११११ ) यावर्षी पौष शुद्ध षष्ठीला, मारला गेला. तेव्हा त्याला बेचाळीसावे वर्ष होते.

स्मशानातील वधशिळेवर वेताळ चढून बसावा, त्याप्रमाणे, तरवार व कवच धारण केलेला खुनी रड्ड सिंहासनावर बसला खरा. पण त्यामुळें त्या उपटसुंभ्याला थोडीच शोभा आली ? (येथें अर्धा श्लोक सुटलेला आहे. कदाचित आधिक श्लोक सुद्धां सुटलेले असतील. त्यांच्यात गर्गचंद्राने येऊन त्या कटवाल्यांवर हल्ला केल्याचें वर्णन असावे. ) नंतर त्यानें त्याच्यावरून उतरून आपले आप्त इष्टमित्र, यांच्यासह, स्वतःविरुद्ध झालेल्या लोकांचा सामना केला. त्या लढाईत त्याचे बंधू व सेवक वगैरेनीं, त्याच्यासमक्ष पुष्कळसा पराक्रम करीत देह ठेवून, त्या समरभूमीला शोभा आणली. वट्ट व पट्ट नांवाचे दोघे तंत्री, त्याचे आप्त, तसेच कत्त व सूर्य वगैरे वीर, सिंहद्वारावर मोठ्या शौर्यानें लढतां लढता मारले गेले. रणशूर रड्ड हा हातीं नग्न खड्ग घेऊन राजवाड्याच्या पटांगणांत रणभूमीवर नाचणाऱ्या नटाप्रमाणे नाचत, शत्रूचे खंडन करीत होता. तो फार वेळ क्षणोक्षणीं शत्रूला विजयाविपर्या साशंक करीत लढला व त्यानें किती तरी शत्रू मारले व शेवटी तो रणात पडला. तो मेल्यावर गर्गानें अमर्याद क्रूरपणाने राजद्रोहाचे शासन म्हणून, त्याच्या प्रेताची दुर्दशा करविली, हे योग्य झालें नाहीं. व्यड्ड पळून जात असताना गांवच्या लोकांनीं ह्रिद्दा मठाजवळ, त्याच्यावर दगड व राख फेकून त्याला ठार मारलें व त्याचें शिर एका संडासाच्या मोरींत खुपसले. दुसऱ्या कांहीं राजद्रोही लोकांना गाववाल्यानीं पायाला दोऱ्या बांधून रस्त्यांतून ओढीत नेले व सर्व ठिकाणी त्यांची छीः थूः केली. हे त्या कटवाल्यांच्या नीच कृतीला अनुरूपच शासन मिळाले. ३५०. हंसरथादिक पळून जाऊन स्तुड्डाला मिळाले. तिकडे त्यांना बरेच दिवस मरणप्राय विपत्ती सोसावी लागली.

भोगसेनाचा भाऊ मारला गेला. त्या सुमारास गर्गाचा पराजय झाला असें त्याला वाटून, तो मोठ्या घमेंडीत होता. पण वरील खरी व भारी दुःखद वार्ता ऐकन त्यानें लढण्याचा विचार केला व तो परत फिरला. त्याचे सैनिक त्याला सोडून पळून गेले. तेव्हां त्यालाहि भिऊन त्याचेच अनुकरण करावे लागले. एकट्या गर्गचंद्रानें, स्वतःच्या हिम्मतीवर, अशी ही सारी राजद्रोही मंडळी मारून पळवून लावली होती. त्या प्रतापी वीराच्या तोडीचें सत्व, साहस व सिद्धी इतिहासांत दुसरी क्वचितच वाचण्यात येते.

त्या राजद्रोही रड्डानें एक रात्र व प्रहर दिवस इतकेंच राज्य केलें. त्यानें शंखराज हें नाव घेतले होतें. त्याला, दुष्कर्मी लोकांना योग्य अशी दुर्गती प्राप्त झाली. ही राजद्रोही मंडळी आपणाला यशस्कराच्या कुळांतील म्हणवीत असल्यामुळेंच रड्डाला हें क्षणभर राज्य करण्याला मिळालें होते.

दावानल पेटवून व क्रूर यंत्रें लावून सिंहादिकांचा प्राण घेणारे किरात, स्वतः अवचित गंडशैल पडून वनामध्ये नाश पावतात. वास्तविकपणें सर्वच प्राणिमात्र एका मृत्यूच्या मार्गानें सारखे धावत असतात. मी मारणारा व हा मारला गेलेला हा भेद फक्त क्षणमात्रापुरता असतो. स्वतःच्या विवाहमहोत्सवात सुंदर ललनांची मंगळ व प्रेमळ गीतें मोठ्या आनंदानें ऐकली असणाऱ्यांना, अंतक्षणीं दीन व दुःखी दयितांचा विलापहि ऐकावा लागतो. शत्रूला ठार केले म्हणून कांहीं काल हर्ष मानणारा, उद्यां स्वतःचा वध करणाराचा प्रमोद पाहातो अशा या मोहांधतेला धिक्कार असो. त्या राजद्रोही कटवाल्यांचे हें साहस सायंकाळीं लावण्याचा विचार झालेल्या, व रातोरात फळाला येऊन, ते फळ दुसरेच दिवशीं पिकून घात झालेल्या वृक्षाप्रमाणे झाले. ३६०.

गर्गानें त्या राजद्रोही मंडळींचा फडशा पाडून झालेल्या अत्याचाराचा दोष धुवून काढल्यावर, तो सिंहासनाजवळ जाऊन फार वेळ आपल्या वध झालेल्या मालकाबद्दल शोक करीत राहिला. हें पाहून साऱ्या पौरजनांनाहि त्या लोकप्रिय राजाविषयीं निर्भयपणे शोक करण्याला अवसर सांपडला.

राणी जयमती चतुर होती. तिला जगण्याची इच्छा होती तिनें गर्गाला आपल्याविषयीं कीव येऊन प्रेम वाटावे म्हणून, त्याच्याकडे आपली संपत्ती पाठविली आणि त्याला 'आपण माझी व्यवस्था ठरवावी,' असा निरोप पाठविला. गर्ग सरळ व सात्विक वृत्तीचा होता. त्याला तिचे म्हणणे खरे वाटलें व त्यानें तिच्या सहगमनाची तयारी करविली.

विपुल केशकलापातील कुटिलपणा, नेत्रांतील चांचल्य व कुचकुंभांतील काठिण्य भरले असलेल्या गूढहृदयी योषितांचे यथार्थ ज्ञान कोणालाहि होत नाहीं. दुश्शील व वल्लभाचाहि घात करणाऱ्या स्त्रिया सुद्धा सहज लीलेनें अग्निप्रवेश करतात. तेव्हा त्यांच्याविषयीं कोणी काय खात्री द्यावी ?

जयमती राणी मेण्यांत बसून चितेकडे चालली. तिला वाटेंत थोडा उशीर लागला. तितक्यांत बिजला राणीनें जलदीनें अघाडी साधून तिच्यापूर्वी चितेत उडी टाकली. जयमती राणी चितेकडे जात असतांना तिच्या अंगावरील आभरणे ओढून घेण्यास हापापलेल्या लुटारू–ब्राह्मणांनीं–तिला लुबाडल्यामुळे, तिला बराच त्रास झाला. दोघींहि राण्या छत्रचामरादिकांसह चितेत जळताना पाहून, सारे लोक शोकाकुल झाले त्यांचे नेत्र दुःखाग्नीनें जसे पोळत होते.

सर्व लोकांनी गर्गचंद्राला सिंहासनारूढ होण्याची प्रार्थना केली. पण ती त्यानें मान्य केली नाहीं. अशी निष्ठा दाखवून त्यानें आपल्या मनाचा मोठेपणा अधिक उज्वल व पवित्र केला. ३७० उच्चलदेवाच्या अल्पवयी पुत्राला, सहस्रमंगलासारख्या कोणा योग्य माणसाला पालक करून, अभिषेक करविण्यासाठीं त्यानें तपास केला. पण ते सफल झाला नाहीं. अशा लोकांपैकीं कांहीं जणांच्या अंगचे गुण पाहून लोक हंसत व

त्याच्यामध्ये एखाद्या भिक्षेकऱ्याइतकीहि योग्यता नाही, असे ते समजत असत, हे मात्र खरें.

मल्ल राजा व श्वेता राणी यांच्या तिघा पुत्रांतील वडील सल्हण व कनिष्ठ लोठण जिवंत होते. मधला पुत्र मागेच मेलेला होता. त्यांना मारण्यासाठीं शंख राजाने त्यांचा तपास चालविलेला पाहून, ते भिऊन नवमठाला गेले होते. पुढे काही तंत्री, स्वार, सचीव निर्लज्जपणानें त्या पराभूत कटवाल्यांना सोडून, एकत्र जमले व त्यांनी सल्हणाला बोलावून आणविले. दुसरा कोणी राजपदायोग्य न मिळाल्याने गर्गानें त्यालाच राज्याभिषेक करविला.

याप्रमाणे एका पिढी इतक्या कालात सामान्यतः व्हावयाचे तीन राजे चार प्रहारात होऊन गेले. ही किती तरी लाजिरवाणी व विलक्षण गोष्ट आहे! संध्याकाळीं उच्चल नृप, सत्री रड्ड राजा आणि मध्यान्हीं सल्हण सिंहसनाधिष्ठित, अशा तीन राजांचे, तेच तेच सेवक आढळत होते! या विचित्र दैवलीलेला काय म्हणावे!

सुस्सल राजा लोहरकोट येथें होता. तेथें त्याला दीड दिवसानीं उच्चलाच्या वधाची वार्ता कळली. ती ऐकून त्याच्या मनाला मोठा धक्का बसला. गर्गाचा पहिला दूत त्याच्याकडे पोचतांच तो रडत रडत त्याच्या पाया पडला, तेव्हां त्याला ही वार्ता कळली. तसा तो मोठ्याने शोक करूं लागला. त्या दूताने त्याला उच्चलाच्या वधापर्यंतचीच हकीकत कळवून, त्याला ताबडतोब निघून येण्याविषयी गर्गाची विनंति असल्याचे सांगितले. गर्ग घराहून निघताच त्याने त्या दूताला पाठविले असल्याने त्याला पुढील हकीकत माहित नव्हती. त्यावेळी गर्गाला, शत्रूचा इतका लौकर पाडाव करतां येईल, अशी कल्पना नव्हती. ३८२. सुस्सलानें रात्रभर शोक केला व तो पहाटे तांतडीने, सैन्य जमा होण्याची वाट न पाहताच, काश्मीराला रवाना झाला. वाटेत त्याला गर्गाचा दुसरा दूत भेटला व त्यानें त्याला सविस्तर हकीकत कळविली आणि 'आतां आपण येऊं नये. आपण जवळ नसल्यामुळे, आपला धाकटा बंधू सल्हण याला गादीवर बसविलें गेले आहे व कटवाल्याचा तत्काल नाश केला गेला आहे, तेव्हां आपण येऊन उपयोग काय?' असा गर्गाचा दुसरा निरोपहि कळविला. त्यावर, सेवकांनी पुढें जाण्याला का कूं केली. त्यांना रागाने दटावीत व हंसत सुस्सलाने म्हटले, 'हे राज्य आम्हाला वडिलोपार्जित मिळालेले नव्हे तसे असते तरी, पूर्वीच्या राजाच्या मागून, त्याचा धाकटा भाऊ वारस असतोच. हे राज्य माझा वडील बंधू व मी यानी स्वपराक्रमाने मिळविलेले आहे. तें कोणी आम्हाला दिलेलें नाही. ते आम्ही ज्या साधनानीं मिळविलें, ती साधनें कोठें नष्ट झाली आहेत कीं काय?' नंतर तो तसाच पुढें चालला. गर्गाला मिळवून घेण्यासाठीं त्यानें दूत पाठवून बराच प्रयत्न केला. तो काष्ठवाटाला पोहोंचला तोवर सल्हणाचा पुरस्कर्ता गर्गहि, नगरांतून निघून हुष्कपुरावर छावणी करून राहिला होता. ३९०.

सायंकाळी सुस्सलाला गर्गाकडे पाठविलेल्या दूतांनीं कळविलें कीं, गर्गाचें बोलं सामाचे असलें तरी, त्याच्या मनांत शत्रुत्व आहे. पण सुस्सल या कामांत पडलाच अस ल्याने, त्यानें आपल्या दार्याचा पुत्र हिताहित याला गर्गाकडे पाठविलें. त्याच सुमा रास बिल्ववनांतील काही खाषक-खश-लोकांच्या मध्यस्तीनें भोगसेन, दैवविमोहि होत्साता, सुस्सल राजाकडे आला. त्यानें कर्णभूती शिलेदाराला त्याच्याकडे पाठवून ' आपण गर्गाला सहज जिंकू, ' असा त्याला लोभ दाखविला.

आपल्या भावाशी द्रोह करणाऱ्यांचे तात्काल शासन न करिता, सुस्सल त्यासाठं योग्य संधीची वाट पहात राहिला, हें कोणालाहि आवडले नाहीं. ' ज्यांनीं आपल्य बंधुशी द्रोह करून त्याचा घात केला, अशीं माणसें आपल्याजवळ असतांना, मी तुम्हाल कसें मिळावें ? असा दूतां हाती उलट निरोप पाठवून, गर्गानेंही त्याला खिजविलें. त्याव भोगसेन रातोरात पळून जाईल म्हणून, सुस्सलानें तितका विलंब केला व उजाडता त्यानें त्याच्यावर हल्ला करून त्याला व त्याच्या भावाला मारलें. त्या मारामारीत कर्ण भूतीनें चांगलें यश मिळविलें. तसेच त्याचा सावत्र भाऊ तेजसेन, यानेंहि खूप शौ गाजविलें. पण तो व अश्वपती लवराजाचा पुत्र मरीच, हे पाडाव झाले. त्यांना राजाच्य आज्ञेनें सुळी देण्यांत आले. सुस्सल राजा धैर्यवान व निग्रहानुग्रह समर्थ होता तरी, त्याचे सैन्य कमी असल्यामुळें त्याला स्वस्थ जागच्या जागीं राहूनसुद्धां स्वतःचा बचाव करत येणें कठिण होतें. ४००. सुस्सलानें संजपालाला स्वारासह पुढे पाठविलें होते. तो संध्या काळीं येऊन मिळाल्यानें त्याच्या सैन्याला कांहीं प्राबल्य आलें होते. पुढें गर्गाचा सेना पती सूर्य, बऱ्याच मोठ्या फौजेनिशी त्याच्यावर हल्ला करण्यास येत असलेला पाहून, सुस्स लाला त्याच्या विश्वासातील लोकांनीं मोठ्या मुष्कीलीनें कवच घालवून घोड्यावर बसविले कारण तो त्यावेळी उत्सेकामुळे मूढसा झालेला होता. आकाशांत टोळधाड येते तद्व शत्रूनें त्याच्यावर शरवृष्टि चालविली. त्या बाणांचा सोसाटा हाच राजद्रोहप्रदर्शक शब्दा सारखा होत होता. उभय पक्षाचे तुंबळ युद्ध झाले. त्यांत राजाच्या छावणींतील सर्वांना त्या तीक्ष्ण शरवृष्टीनें हाणून पाडलें. त्याचे सैनिक मारले गेले, जखमी झाले व नाश पावले तसा तो साहसी राजा एकटाच शत्रूची फळी फोडून त्वरेनें पळाला आणि घोड्यावरून एका झुल्याच्या पुलावरून पार गेला. पुलाखालीं नदीचें पाणी जोराने गर्जत व उचंबळत होतें. तो पूल सारखा हेलकावे खात होता. यामुळें त्याच्यावरून पाखरांना सुद्धा जाणे कठिण होतें. (झुलें किंवा दोरांचे झुलते पूल यांचा-काश्मीरांत व हिमालयाच्या बहुते भागांत-नद्या नाले उतरण्याला, प्राचीन काळापासून उपयोग होत आला आहे ते तीन तीन दोराचे करतात. वाऱ्याच्या जोरानें ते हलत असतांना, त्यांच्यावरून उतरू जाणें कठिण व धोक्याचें असते. त्यांच्यावरून सहसां घोडीं व जनावरें उतरूं पावत नाहींत त्याच्यामागून संजपाल व दुसरे कांहीं स्वार कसे तरी पार गेले. त्यांनीं पाठलाग कर णाऱ्या शत्रूला जागजागीं मागे वळून, अटकाव चालविला होता. शेवटीं सुस्सल तीरानव

येथें खस लोकांची वस्ती होती, तेथवर पोहोंचला. तेव्हा त्याच्याबरोबर वीसतीस माणसे होती. तोंवर शत्रूनें त्याचा पाठलाग बंद केला होता. ( वीरानक-वितस्तेच्या खोऱ्यातील बुल्यास किंवा बोल्यासक यांच्यासमोरील हल्लींचें वीरन नांवाचें गांव ) ते अन्नवस्त्रहीन असूनहि त्यानें विलक्षण पराक्रम करून, त्या खशांची खोड मोडली. ४१०. नंतर हळूंहळूं हिमवृष्टि सुरूं झाली. रस्ते दुर्गम व संकटयुक्त झाले. तरी कच न खातां तो सुदैवानें लोह-राला पोहोंचला. वाटेत त्याला पदोपदीं मरणप्राय अडचणी आल्या. पण त्याचे आयुष्य अवशिष्ट होतें म्हणूनच तो वांचला. पुढेहि काश्मीर हातीं आणण्याचा त्याचा विचार सारखा चालला होता.

गर्गानें व्यर्थ वैर धरून बिचाऱ्या हिताहिताला हातपाय बांधून द्वारसेतूवरून वितस्तेत बुडविलें. ( हा सेतू वराहमूलाजवळचाच असावा. ) त्यावेळीं हिताहिताचा सेवक क्षेम यानें त्याच्यापूर्वीच नदींत उडी मारली व त्या अधःपतनाच्या द्वारे उच्च पदाची प्राप्ती करून घेतली.

याप्रमाणें राज्य मिळवून व निष्कंटक करून दिल्यामुळें, गर्ग, वरील कामगिरी उर-कून परत आल्यावर, त्याची राजावर अधिकच छाप बसली. ती राज्यप्राप्ती मंत्रिपराधीन होती. सल्हण राजाजवळ चांगले सल्लागार नव्हते व त्याच्या अंगीं दृढनिश्चयहि नव्हता. त्याचें मन चक्रासारखें फिरूं लागले. त्याच्यामध्यें मंत्र, पराक्रम, कौटिल्य, सरळपणा, दातृत्व, लोभ यांपैकीं नांवाजण्यासारखा असा एकहि गुण नव्हता. त्याच्यावेळीं राजवाड्यांत सुद्धा भर दोन प्रहरीं, चोर व लफंगे लोक, लोकांना नागवीत होते. तेव्हां राज्यांतील इतर मार्ग व भाग यांतील रहदारीच्या सुस्थितीचें वर्णनच काय करावें ? पंगू अशी अंगना दिद्दा राणी, इनें सुद्धां ज्या गादीवर पुष्कळ दिवस नेटानें अधिकार गाजविला. तेथें तो पुरुष असूनहि, भागूबाई बनला होता. त्यानें आज उपभोग घेतलेल्या स्त्रीचा दुसरे दिवशीं त्याचा भाऊ लोठण उपभोग घेत असे. अशा रीतीनें ती राज-लक्ष्मी व राजगादीचा उपभोग ते दोघेहि बरोबरच घेत होते. ४२०. त्या सल्हणाला माणसाची पारख नव्हती. तो वरचेवर प्रमाद करीत असे, ते पाहून सर्व विचारी लोक त्याच्या सर्वच वर्तनाला हंसत असत.

लोठणाचा मेव्हणा ऊजसूह तापस मंडळींत खपण्यासारखा होता. त्याला सल्हण राजानें, पराक्रमी पुरुषालाच योग्य अशी, द्वारपतीची जागा दिली. कारण सल्लामसलतींत त्यानें, सुस्सलाकडील सर्व संकटें, तो चालून येतांच, आपल्या मंत्राचा एक लक्ष जप पुरा करून, त्याच्याद्वारें निवारण करण्याची हमी घेतली होती !

तो राजा विश्वासघातकी होता. त्याने गर्गाच्या प्रेरणेनें त्याचा शत्रू नीलाश्व डामर याला दगड बांधून वितस्तेत बुडविलें. राजावर उपकार केल्याचा फायदा घेऊन गर्गानें आपले पुष्कळसे शत्रू निरनिराळ्या उपायांनीं मारून टाकविले, त्यांतच त्यानें हालहा येथील डामरांना कपटानें विषयुक्त अन्न देऊन घात करविला. तो राजा एक यःकश्चित

कुचकामाचें बाहुलें बनला होता. यामुळे सारें अंतर्बाह्य दरबारी, जीवित व वित्त याच्या संबंधांत सर्वथैव गर्गावर अवलंबून होते. एकदा गर्ग लहराहून परत राजाकडे आला असतांना नगरांतील सर्व लोक घाबरून गेले व क्षुब्ध झाले. कारण त्यावेळीं गर्ग राजाच्या सर्व नोकराना नावात नेऊन मुळी देणार आहे, अशी अफवा उठली होती. त्या भयंकर अफवेमुळें दोनतीन दिवस सर्व लोक जसे संज्वरित झाले, व गर्भिणीचे गर्भपात झाले होते म्हणे.

यावरून तिलकसिंह वगैरे जिवावर उदार झाले. त्यानीं राजाच्या आज्ञेची अपेक्षा न ठेवतां एकदम गर्गाच्या वाडयावर हल्ला केला. ४३०. सारे नागरिक त्रस्त व उद्विग्न होत्साते, शस्त्रें घेऊन तिकडेच धावले. गर्ग त्यांना मुळींच भ्याला नाहीं, किंवा त्याने त्यांची कांहीच पर्वा केली नाहीं. दिल्ह, भट्टारक, लक्कक वगैरे लोक गर्गाच्या वाड्याच्या आसपास घोडयावरून निर्लज्जपणें फिरत होते. त्यांना राजानें रोकले नाही. उलट त्यांची पिछेहाट होत असलेली पाहून, त्यानें त्याना उत्तेजन येण्यासाठी लोठणाला तिकडे धाडले. गर्गाच्या वाडयाचे रस्ते, त्याच्या सैनिकांनीं अडविलले असल्यामुळे, लोठणालाहि त्याच्यावर हल्ला करण्याला किंवा त्याला आग लावण्याला साधले नाहीं. त्यावेळीं लोठिका मठाचा मठपती केशव, यानें गर्गाच्या लोकांवर बाण मारून त्यांना पुष्कळ त्रास दिला. संध्याकाळ होऊन अंधार पडला तेव्हां राजाच्या पक्षाचे लोक विखरले.

त्यानंतर गर्ग घोडयावर बसून आपल्या सेवकांसह लहराला जाण्याला निघाला. तेव्हा त्याला कांही अडचण आली नाहीं. ऊजसूह त्रिपुरेश्वराच्या मंदिरात अजारी म्हणून राहिलेला होता. त्याला गर्गानें पकडून बरोबर नेले. पण पुढे 'या भिकाऱ्या बैराग्याला घेऊन काय करावयाचें आहे,' असें म्हणून दुसरे दिवशी, त्यानें त्याला सोडून दिले. त्यावेळीं सुस्सलहि त्याचा वैरीच होता म्हणून त्यानें सल्हणाला पदच्युत करण्याचा प्रयत्न केला नाहीं. गर्ग केव्हां परत उलटेल कोण जाणे, या भीतीनें गाववाले चिंताग्रस्त होते. ते नेहमी दारें बंद करून, अडसर लावून, दिवस काढीत होते. राजाहि फार त्रासला व भ्याला होता. त्यानें गर्गाची समजूत करण्यासाठी महत्तम सहेल याला त्याच्याकडे लहराला पाठविलें ४४०. त्यानें जाऊन कसेतरी एकदांचे गर्गाला प्रसन्न केले. गर्गानें राजाला आपली कन्या देण्याचेहि कबूल केले. पण, 'अशा पिशाच्चतुल्य राजाशी त्यानें आप्तपणा करावा,' हे त्याच्या आश्रिताना आवडले नाहीं. पुढे त्यानें सुस्सलाशी मेळ करण्याची खटपट केली. सल्हणाशीं त्यानें सख्य केले नाहीं.

या प्रमाणे साऱ्या काश्मीरात गडबड चालली असतांना सल्हण राजानें गुप्तहेरामार्फत, सड्ड, हंसराज व नोनराज, याना पकडून सुया टोचून व जिवंत जाळून, हालहाल करून, ठार मारविलें. भोगसेन लपून राहिला होता. त्याची पत्नी मल्लामला त्याच्याकडे जाऊन राहाण्याची इच्छा करीत होती. तिला त्यानें परवानगी दिली हे चागलें केले. स्वतः दुःख अनुभविलेले असूनहि राजानें दिल्लभट्टार याला गुप्तपणे विष देऊन मारविलें. तो एक

सामान्य माणूस, मोठा पराक्रमी, किंवा राजबीजीहि नव्हता. त्याचा असा गुप्तघात करण्याचे त्या दुष्ट राजाला कांहीं कारण नव्हते. त्याच्या बहिणीनें त्याची षंढ म्हणून निर्भर्त्सना केली होती. तिनें अग्निप्रवेश करून, आपला कुलीनपणा व्यक्त केला. अशी ती त्याची अल्पकालिकहि कारकीर्द, एखाद्या भयंकर रात्रीं फार वेळ पडत आलेल्या दुष्ट स्वप्नाप्रमाणें सर्व प्रजेला फारच दुस्सह त्रासदायक झाली.

सुस्सल ही सर्व परिस्थिती पूर्णपणे ओळखून होता. त्याने गर्गाशीं मेळ केला होता तरी, तो त्याच्याविषयीं साशंकच रहात होता. त्याचा काश्मीरावर डोळा होता म्हणून त्याने संजपालाला तिकडे धाडलें होते. ४५०.

सल्हण राजानें लक्ककाला द्वारपती नेमलें आणि खर्चाची चांगली तरतूद केल्यावर तो एकदांचा निघून कसाबसा वराहमूलक येथें पोहोचला. त्यानें पूर्वी गर्गाच्या वाड्यावर हल्ला केला होता, हे गर्ग विसरला नव्हता. म्हणून त्यानें लक्ककाच्या मागे लागून त्याच्या सैन्याचा नाश केला. तसेंच त्याची छावणी व वराहमूल गांव दोन्ही जाळून टाकले व त्याला पळवून लावले. लक्ककाच्या सैनिकांनी स्वतःच्या पार्थिव देहांनी भूमीला व दिव्य देहांनी दिव्यांगनांना, आलिंगने दिलीं. मेरुमणी पडल्यावर मालेतील मोतीं गळून विखरतात त्याप्रमाणे नायक पळून गेल्यावर, त्याच्या लोकांची स्थिती झाली. त्यांच्यांतील शुद्धवृत्ती व सद्वंशी उप्प व ढुड्ड वगैरेनीं ती रणभूमि भूषित केली.

लक्ककाचा आश्रय सुटला होता. पण संजपाल येत असलेला पाहून त्याचें भय कमी होऊन त्याला धीर आला व तो सुस्सलाच्या पक्षाला जाऊन मिळाला. पुढे संजपाल दूरवर प्रतिपक्षाचा पाठलाग करीत गेला असताना, सुस्सल राजाला येऊन मिळालेल्या पौरजन व डामर मंडळींनी त्याला उत्तेजन दिल्यावरून, तो संजपालाकडे जाऊन मिळाला.

सहेल महत्तम सल्हणाला, सुस्सलाशीं मेळ करून देण्याचे सांगून निघालेला सुस्सलाकडे पोहोचला. तेव्हा, सल्हणाला सोडून सर्व लोक सुस्सलाच्या पक्षाला मिळाले व चातक मेघाची अपेक्षा करतात तद्वत सर्व नगरवासी लोक तो परत येण्याची मोठ्या उत्सुकतेनें अपेक्षा करीत होते.

गर्गाची पत्नी आपल्या दोघी कन्या घेऊन सुस्सलाकडे आली व तिने त्याला त्या कन्याशीं लग्न करण्याविषयीं विनंति केली. तेव्हा सुस्सलाने वडील कन्या राजलक्ष्मी इच्याशीं स्वतः लग्न केले व धाकटी, गुणलेखा, इचा सून म्हणून स्वीकार केला (गुणलेखा ही जयसिंह राजाची एक राणी झाली. तिचा पुढे श्लोक १६०७ मध्ये उल्लेख आलेला आहे.) ४६०.

संजपाल पुढे वाढून गेला होता. त्याने सल्हण व लोठण यांना राजवाड्यांतच वेढा दिला होता. लौकरच सुस्सल राजाहि राजवाड्याच्या सिंहद्वारावर पोहोचला, तोंच त्याच्या अंगावर एका राजसेवकाने खंदकावरील दार खालीं पाडले. पण त्यानें सुस्सलाला इजा झाली नाही व त्या विरुद्धपक्षीय राजसेवकाचा हेतु सिद्ध झाला नाही.

सल्हण राजा सैन्यासह वाड्यांत वेढून पडला होता. गर्ग बाहेरून येऊन हल्ला करील, या भीतीमुळें वेढा घालणाऱ्या सुस्सलाच्या सैन्याची गाळण झाली होती. गर्गानें आपल्या मुली दिल्या असूनहि सुस्सलाच्या सैनिकाचा त्यावर विश्वास नव्हता. गवताची काडी हलली तरी त्या साऱ्या सैनिकांना पदोपदीं भय वाटे. ते तेथे कसे तरी निरुपायाने त्रस्त व भयभीत होऊन संध्याकाळपर्यंत राहिलेले होते. सुस्सलाने आप्तप्रेमवश होऊन शत्रूला मजबूत आश्रयस्थान झालेल्या अशा त्या राजवाड्याला आग लावली नाही. पुढे लौकरच संजपालानें एका खिडकीचीं कवाडे फोडली व तो आंत शिरला आणि अंगणात पुष्कळसे सैनिक होते त्यांच्याशीं तो एकटाच नेटानें शौर्यानें लढूं लागला. त्याच्यामध्यें त्यानें पतंगाप्रमाणें उडी मारल्याचें पाहून लक्कक त्याच्या मागोमाग त्याच मार्गाने आत गेला. तो पूर्वी दरदांवरील स्वारींत व काष्ठवाट येथील घोर युद्धातहि हजर होता. शिवाय मठपती केशव हा त्याच्या बरोबरीनें आंत शिरला. सिंधुराज, जयद्रथ याच्या शोधासाठीं कौरवसेनेच्या प्रचंड व्यूहांत पार्थ शिरला असतांना, त्याचा शोध करून त्याला मदत करण्यासाठीं शैनेय सात्यकी व वायुपुत्र भीम हे त्याच्यामागे कौरवसैन्यात शिरले होते, त्याचेंच या दोघांनी जणो यावेळी अनुकरण केले होते. त्यांनीं कशाचीहि पर्वा न करतां मंडपातून बाहेर पडून मोठ्या कष्टाने धक्के मारमारून प्रागणाचें दार उघडले. त्यानंतर तो शूर सुस्सल राजाहि आत पोचला. ४७०. तोंवर त्या दोन्ही पक्षाचे बहुतेक मारखेच युद्ध चालले होते. तेथे त्याच्यात पुष्कळसे सैनिक मारले गेले. सल्हणाचा सचिव, पतंग गावचा राहणारा ब्राह्मण, अज्जक यानें त्या युद्धात अप्सरासंभोगसुख प्राप्त करून घेतले. रुद्र नांवाचा कायस्थ-गंजाधिकारीहि त्या रणात देह ठेवून आपल्यावरील स्वामीच्या कृपाप्रसादाचा उतराई झाला.

एखाद्या वृक्षावर सायंकाळीं येऊन बसलेल्या पक्ष्यांच्या किलकिलाटामुळे तो वृक्ष शाब्दित होत असतो. पण त्याच्यावर कोणी दगड मारताच ते सर्व पक्षी एकदम उडून जातात व तो वृक्ष निःशब्द होतो, त्याप्रमाणे लढणाऱ्यांच्या तुमुल शब्दांमुळें निनादित झालेल्या त्या प्रांगणांत सुस्सल राजा घोड्यावर बसलेला पोहोंचला तोंच त्याच्या दराऱ्यानें व भीतिमुळे ते सर्व लढणारे लोक एकदम चित्रासारखें स्तब्ध झाले. तो अंगणात असून सिंहासनारूढ होण्यापूर्वीच ' सुस्सल महाराजांचा जयजयकार असो.' हे जयशब्द आणि तदनुरूप मंगल रणवाद्यें यांचे ध्वनी उठले. मल्लराजाच्या वंशांतील सल्हण व लोठण यांच्याइतकी दुसऱ्या कोणाचीहि या राजवाड्यांत दुर्दशा व अवहेलना झाली नाहीं. ते कवचें घालून सशस्त्र व घोड्यावर बसून आले होते. त्यांना धूर्त व चतुर सुस्सलानें, 'तुम्ही अद्यापी मुलें आहांत,' असे म्हणून आलिंगन दिलें व त्यांच्याकडून शस्त्रें ठेवविलीं आणि त्यांना दुसऱ्या एका मंडपांत नेऊन प्रतिबंधांत ठेविले. नंतर तो आस्थानमंडपांत गेला.

सल्लणाने सारे तीन महिने सत्तावीस दिवस राज्य केले. तो लौकिक वर्ष ४१८८—ई. सं. १२१२—या वर्षी राघ किंवा वैशाख शुद्ध तृतीयेला सुस्सलाच्या हातून पराभव पावून प्रतिबंधांत टाकला गेला. ४८०.

सूर्य नभस्थळीं येतांच सागराचा क्षोभ बंद होतो, तद्वत सुस्सल राजा सिंहासनावर विराजमान होतांच सर्व गडबड शांत झाली. व्याधांवर नेहमीं तोंड वासून राहणाऱ्या मृगेंद्राप्रमाणें सुस्सलराजा द्रोहाचा प्रतिकार करण्यासाठीं सारखा हातीं नागवी तरवार घेऊन सज्ज असे. त्याच्या बंधूशीं द्रोह केलेल्यांना त्यानें हळूं हळूं हुडकून काढून, त्यांची मुले माणसे सुद्धां मारवून, त्यांच्या कुलांचा उच्छेद केला. त्या लोकांचा दुष्टपणा पाहून तो फार चिडला व संतापला होता. त्याला अद्यापि पूर्तेपणी राज्य साधन करावयाचे होतें. म्हणून तो बाह्यतः तेवढी दया दाखवीत असे. तो मूळचा दयाळू होता. पण क्रूर लोकांना दाबांत ठेवण्यासाठीं, त्याला भिंतीवरील चित्रातल्या भयंकर सर्पासारखें उग्र रूप धरावे लागे. तो अप्रतिम समयज्ञ योग्य प्रसंगीं मुक्त हस्तानें त्याग करणारा, इंगितज्ञ व दूरदर्शी होता. त्याचा स्वभाव त्याच्या वडील भावाच्या सारखाच, पण कांही बाबतींत थोडा कमी जास्ती होता. उभयतांचा क्रोध सारखाच असला तरी, वडील भावाचा खुळया कुत्र्याच्या प्रमाणे व याचा मधमाशीच्या प्रमाणे, अनुक्रमें उशीरा व तत्काल, अनुभवास येत असे. त्याला आपल्या प्रजाजनांच्या वेशवासांचा—वस्त्रालंकाराचा—मत्सर वाटत नसे. पण नोकर व आश्रित यांनीं कोणताहि फाजीलपणा केलेला खपत नसे. द्वंद्व युद्धाची युक्ती योजून मानी माणसांना मारविण्याची त्याला इच्छा नव्हती, इतकेच नव्हे तर, तशा लोकांनीं चुकून एखादा असा प्रमाद केलेला पाहून त्याला त्यांची कींव वाटे. ४९०. उच्चल राजाचे भाषण मनस्वी कठोर व टोचक असे. ते ऐकणारांना त्रास व काळजी वाटे. पण याचे भाषण नेहमीं साधे व खेळीमेळीचें असून त्याच्यापासून दुसऱ्याला त्रास होण्याची भीति नव्हती. त्याला धनसंचयाची फार आवड होती. त्याप्रमाणे त्याने खजीन्याची चांगली भर केली. त्याचा खर्च व त्याच्या देणग्या व्यवस्थित व परिमित असत. त्याला नव्या नव्या इमारती बांधविण्याची व पुष्कळसे उत्तमोत्तम अश्व बाळगण्याची हौस असल्यामुळें, दैशिक कारागीर, गवंडी आणि घोडयाचे सौदागर, यांचे दारिद्र्य दूर झालें. दुस्सह संकटाच्या प्रसंगीं तो हरप्रयत्नानें त्यांना तोंड देण्याला डगमगत नसे. त्यापायीं तो स्वतःची संपत्ति सढळ हातानें खर्ची. इंद्रद्वादशीच्या उत्सवांत तो पुष्कळ व मौल्यवान वस्त्रालंकार इनाम देत असे त्याच्या वेळच्याप्रमाणे तो उत्सव पूर्वी कधीहि झाला नव्हता.

उच्चल राजा हवा तेव्हां व वाटेल त्याला मोकळेपणानें भेटत असे व सेवकांशी तो गोडपणानें वागे. पण सुस्सल राजाची भेट त्याच्या नोकरांना सुद्धां मुष्किलीनेंच होत असे. दुसऱ्या कोणाहि राजाला उच्चलाइतकें घोडयावर बसण्याचें व्यसन नव्हतें, हें खरें. पण त्या कामांत सुस्सलाइतकें चातुर्य इतर कोणाच्याहि अंगी असल्याचें प्रसिद्ध नाहीं. दुर्भिक्षांचीं चिन्हें दिसूं लागतांच उच्चल त्यांचें शमन करी. पण सुस्सलाच्या कारकिर्दीत

दुर्भिक्षाचें दर्शन दुर्लभ असे फार काय वर्णन करावें, औदार्य, अर्थाविषयीं निस्पृहपणा आणि सुलभप्रापता, या तिन्ही शिवाय बाकीच्या सर्व गुणांमध्यें तो उच्चलाहून श्रेष्ठ होता.

उच्चलाच्या पुत्राचा पालक म्हणून गर्गानें सहस्र मंगलाला गादीवर बसविण्याची योजना केली होती. त्याला सुस्सलानें रागानें हद्दपार केलें होतें. ५००. तो भद्रावकाश येथें रहात असतांना, त्याचा पुत्र प्रास यानें द्रव्य खर्चून तिकडील डामर मंडळींशी संधान बांधलें. सुस्सलानें उच्चलाच्या अल्पवयी पुत्राला स्वाधीन करण्याविषयी गर्गाला मागणी केली. ती त्यानें मान्य केली नाहीं व तो प्रतिकूळ झाला. तसें राजानें त्याच्यावर सैन्य धाडलें. पण दावाग्नि तृणाचा फडशा पाडतो, तसा त्याचा गर्गानें नाश केला. तसेंच त्याचा शालक देवसरस येथील विजय, यानें बंड केल्यावरून, राजाने त्याच्यावर सैन्य धाडलें होते. त्यालाहि गर्गानें मारून टाकले.

ही सारी गडबड राज्यप्राप्तीनंतर सुमारें महिनाभरांतच झाली. तरी तो धीर सुस्सल राजा व्याकुळ झाला नाही. अमरेशाचें स्थान आणि वितस्ता व सिंधू या नद्यांचा संगम असलेल्या सुरेश्वरी क्षेत्री गर्गानें राजाच्या सैन्याचा पराभव केला. ( भद्रावकाश= चीनाब नदीच्या दक्षिणेकडील किश्तवारला लागून असलेला हल्लींचा भद्रवाह नांवाचा प्रदेश. देवसरस=हल्लींचा देवसर परगणा. हा विशोका किंवा विशव नदीच्या वरच्या भागात आहे, ) त्या युद्धात अमात्यभृंगार व कपिल, आणि तंत्री कर्ण व शूद्रक हे सख्खे बंधू मारले गेले. तेथे मारले गेलेल्या वीर लोकांच्या ढिगांत दबून गेल्यामुळें अशा मोठ्या माणसांची प्रेतमुद्रां कोणाला शोधून काढतां आली नाहींत.

राजाचा मामेभाऊ कंपनेश हर्षमित्र याचा विजयानें, विजयेश्वराजवळ पराभव केला त्याच रणात राजवंशी मंगलराजाचा पुत्र निल्ह व दुसरेहि तंत्री मारले गेले. ५१०.

राजाच्या सैन्यात संजपाल हाच शूरवीर म्हणून कायम राहिला. त्याच्याजवळ थोडेच सैनिक होते. गर्गाजवळ पुष्कळ फौज असूनहि, त्याला संजपालाचा पराभव करतां आला नाहीं. राजानें लक्कक वगैरेंना पाठवून पराभूत सैन्याची कांहींशीं स्थिरस्थावर केली, आणि तो शूर राजा स्वतः नेटानें गर्गावर चालून गेला. जातां जातां त्याने गर्गाशीं झालेल्या लढाईंत मेलेल्या सैनिकांचीं प्रेते शोधून काढून, त्याना अग्नि देवविला. त्या प्रबळ राजाचा दबाव सारखा पडत गेला तसा गर्ग आपले वाडे जाळून टाकून, हलाह प्रांतातील रत्न-दुर्ग किल्याच्या आश्रयाला गेला. तेथें त्याचे घोडे मेले व बरेचसे अनुयायीहि निघून गेले आणि राजानें त्याच्याभोंवतीं कांहीं अंतरावर वेढासा दिला. संजपालहि येऊन राजाच्या सहाय्याला हजर झाला. हें पाहून त्यानें निरुपायाने उच्चलाच्या पुत्राला, सुस्सलाच्या स्वाधीन केले.

त्या किल्ल्याच्या जवळच कर्णकोष्ठकाचा पुत्र मल्लकोष्ठक,हा रहात होता त्याचें व गर्गाचें

नीट नव्हतें. त्याला राजानें आवरलें. तेव्हां गर्गाला विश्वास आला. पुढें राजानें गर्गाला क्षमा केली. नंतर विजय वगैरेचा निकाल लावून व सर्व बखेडा मिटवून आणि गर्गाची ताबेदारी मान्य करून, तो सावकाश नगराला परत गेला.

पुढें कांहीं दिवसांनीं तो लोहराला गेला. त्यानें सल्हण व लोठण यांना तेथेंच प्रतिबंधांत ठेवलें. तिकडेच सोमपाल व कल्ह वगैरे राजांनीं येऊन त्याचें अभिनंदन केलें. ते मान्य करीत तो तिकडेच कांहीं काल आनंदांत राहिला. पुढें काश्मीरांत परत आल्यावर त्यानें अनेक प्रकारानें कृपा करून व अधिकार देण्याची लालूच दाखवून गर्गाला पुनः आपल्या पदरीं नोकर करण्याचा प्रयत्न चालविला. ५२०.

त्या राजाचा प्रताप व वैभव ग्रीष्म ऋतूंतील सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें प्रखर व तेजस्वी होते. त्याची महादेवी राणी, व कुमार जयसिंह हे त्या प्रखर सूर्य तापांत गर्द वृक्षांची छाया आणि शीतल वनवायू, यांच्याप्रमाणें आनंददायक होत असत.

देवसरस येथील विजयाचे आप्त बृहतटिक्क व सूक्ष्मटिक्क डामर हे राजाचा आश्रय मिळविण्याची संधी पहात होते. राजा लोकपुण्य ( हल्लींचें देवसर परगण्यांतील लोकबवन, ) येथें गेला असतांना, ते आपल्या बडबड करणाऱ्या अनुयायांसह तेथें पोहोंचले. गर्गाच्या संबंधानें राजाची विजयावर कृपा होती. त्यानें दुष्टपणानें त्या दोघां डामरांना याष्टिक किंवा चोबदारांकडून वेत मारविले. तसें ते मानी डामर व त्याचे अनुयायी, चिडून त्यांनी राजाच्या प्रबल सैनिकांची पर्वा न करतां मारामारी केली. अंत्यज अभोगदेव यानें राजावर खंजीराचा आणि धीट अशी गज्जकानें तरवारीचा वार केला. सुदैवानें दोन्हीं वार व्यर्थ गेले. राजा बसलेला घोडा मारला गेला व स्वारांचा नायक बाणवंशी भृंगारसिंह, हा वार चुकविण्यासाठीं मध्यें आलेला ठार झाला. राजाच्या सैनिकांनीं बृहतटिक्क व अभोगदेव यांना कापून काढलें. सूक्ष्मटिक्क निसटून पळाला व त्यानें पुढें बराच धुडावा केला. गज्जक वगैरे राजद्रोही लोकांना राजानें सुळीं देवविलें. गर्गावर लोभ ठेवल्यामुळें राजाला असें हें प्राणसंकट प्राप्त झालें होतें. ५३०.

वेळ आल्याशिवाय विद्युत्पातानेंहि मरण येत नाहीं व ती आल्यावर एखादें फूल सुद्धां मारक होतें. पयोनिधीच्या पोटांतील और्वानलाच्या धगीला दाद न देणारीं मोत्यें तरुण कामिनीच्या कुचोष्म्यानें झिरतात.

पुढें त्या राजाला कोणाचाहि उत्कर्ष व ताठा सहन होईना. संजपालादिकांची सेवा विसरून त्यानें त्यांना व काकवंशीय यशोराज यालाहि हद्दपार केलें. यशोराज संपन्न व प्रबल अशा सहस्रमंगलाकडे गेला. त्यानें त्याला व तशाच दुसऱ्या बऱ्याच समदुःखी मंडळींला आश्रय देऊन राजाविरुद्ध उठावणी करण्याचा विचार चालविला. त्याचा पुत्र प्रास हा, कांडच्या मार्गानें काश्मीरांत शिरतांना, राजाच्या सैनिकांशीं झालेल्या झटापटींत यशोराज जखमी झाल्याचें कळल्यावरून, भिऊन परत फिरला. राजाच्या विरुद्ध व हद्दपार झालेले लोक येऊन मिळाल्यानें सहस्रमंगळाचें प्रस्थ बरेंच वाढलें.

ही गडबड चालू असतांना चंपा (हल्लींचें चंबा) येथील जासत, बब्बापुर येथील वज्रधर, आणि 'वर्तुळ' येथील सहजपाल, हे तीन पहाडी राजे व बल्ह आणि आनंदराज हे त्रिगर्त व बल्लापूरचे युवराज, असे पांचजण एकत्र जमून कांहीं बेत ठरवून पुढें कुरुक्षेत्र येथें गेलें. ( हें प्राचीन व सुप्रसिद्ध क्षेत्र ठाणेश्वराजवळ आहे. त्यावेळीं तेथें मुसलमानी अमल होऊन शंभर वर्षे झालेली होतीं. ) ५४०. तेथे भिक्षाचराला नरवर्म्यानें भरपूर द्रव्य सहाय्य देऊन, आसमतीसह पाठविलेले होते. त्याला ते भेटले. जासताचा आप्तसंबंध असल्यानें त्यानें भिक्षाचराची चांगली व्यवस्था ठेविली. ( जासत हा हर्षाचा मामेभाऊ होता. ) तेथून भिक्षाचर बल्लापुराला गेला. बिंब प्रमुख हद्दपार झालेले लोक तेथें त्याला मिळाल्यामुळें, त्याची बडेजाव वाढली व सहस्रमंगलाला कोणी विचारीनासे झाले. 'भिक्षाचर हर्षाचा नातू असतांना भलत्यानेच राज्याचा उपभोग का घ्यावा?' असे म्हणून लोक सहस्रमंगलाला सोडून त्याच्याच आश्रयाला गेले. राजपुत्र दुर्यक याला राजानें घालवून दिले. तसा तोहि राजाचा आप्तपणा विसरून, भिक्षूकडे आश्रयाला गेला.

सुस्सलानें भोजाचा भाऊ, कुमारपाल, याला पुत्राप्रमाणे वाढविले होते. बल्लापूरचा राजा पद्मक यानें युवराज बल्ह आणि जासत, यांच्या सूचनेवरून आपली कन्या भिक्षाचराला दिली. तिकडील एक ठक्कुर विजयपाल, यानें आसपासचे पुष्कळसे ठाकूर जमवून, भिक्षूला हर्षाच्या गादीवर बसविण्याचा बेत केला. हे ऐकून राजा व्याकुळ झाला होता. त्याच सुमारास प्रबल अशा गयापालाला, त्याच्या आप्तांनीं मारविलें. म्हणून पल्लक तिकडे त्याचा सूड उगविण्याला गेला असतांना, तो व दुर्यक दोघेहि तिकडेच मरण पावले. ते भिक्षूच्या सैन्याचे धुरीण व त्याचे प्रमुख सहाय्य कर्ते होते, यामुळें, अवृष्टीनें अडविलेल्या अभ्राप्रमाणें भिक्षूचा आधार नाहींसा झाला. आसमती मरण पावली व आणलेली वाटखर्चीहि सरली, त्याचा सासराहि पुढे त्याच्याकडे दुर्लक्ष करूं लागला. नंतर चार पांच वर्षे तो जासताकडेच कसें बसें अन्नाच्छादन मिळवीत राहिला होता. त्याला पुढे त्याचीहि पंचाईत पडूं लागली. त्याला चंद्रभागातीरावर राहणारा ठाकूर डेंगपाल यानें आपली बप्पिका नांवाची कन्या देऊन, आपल्याकडे नेले. तिकडे तो बराच बेफिकिर व सुखासमाधानात राहिला. तिकडेच त्याचे दैन्य व त्याचे बाल्य, हीं बरोबरच संपलीं.

सहस्रमंगलाचा साहसी पुत्र प्रास या सुमारास उन्मत्तपणें फिरत रहात असल्यानें राजाचा त्याच्यावर रोष वाढत चालला होता. तो सिद्धपथाच्या ( हल्लींचें विशोका नदीच्या वरच्या खोऱ्यांतलें सिदौ गांव. ) मार्गानें कारमीरांत बंडावा उठविण्यास जात असतांना, त्याच्या कृतघ्न सेवकांनीं त्याला पकडून राजाच्या स्वाधीन केलें.

या अडचणीच्या प्रसंगीं संजयपालानें प्रशंसनीय सत्यनिष्ठा दाखविली. त्याचें नुकसान झालेलें होतें. तरी तो गडबड न उठवितां देशांतराला चालता झाला. त्याच्या अशा शौर्याच्या थोरपणाचें कोठवर वर्णन करावें ! यशोराजहि पर राज्यांत गेला होता तिकडे त्याचीही शूर व धीर म्हणून प्रसिद्धी झाली. ती वाजवीच होती.

राजाने महत्तम सहेल वगैरे जुने मंत्री घरीं बसविले आणि गौरक कायस्थाला सर्वाधिकारी नेमले. ५६०. गौरक हा विजयेश्वर येथील एका गरीब तपस्व्याचा आप्त होता. राजा लोहर येथें असतांना तो त्याच्या चांगला उपयोगी पडला होता. म्हणून राजा त्याच्यावर प्रसन्न होता. गौरकानें सर्वाधिकारित्वाला निराळेंच स्वरूप आणलें व राज्यकारभारपद्धतीत फेरबदल केला. त्यानें सर्व राजोपजीवी कामगारांच्या खायक्या बंद केल्या आणि राजाच्या खजीन्यांत सारखी भर टाकली. तो वरून सौम्यपणानें वागे. यामुळें त्याचा क्रूरपणा व दुष्टपणा नजरेस येत नसे. मधुर विषाचा प्राणहारकपणा क्वचितच लक्षांत येत असतो. राजाच्या खजीन्यात आजवर विशुद्ध असेंच द्रव्य जमा झालेलें होतें. पण नवें हिम जुन्याचा सत्यानास करतें, तद्वत्, राजाच्या पूर्वार्जित सुकृताचा नाश करणारें हें दूषित द्रव्य, त्यांत टाकले गेलें. अशा वित्तानें विटाळलेला राजकोश बहुशः चोर किंवा वैरी, हेच लुटतात. राजाला भारी लोभ सुटला होता. त्यानें द्रव्यसंचय करण्याचा सारखा सपाटा लावला होता व तें सर्व तो लोहरगिरीवर पोहोंचवीत असे.

वट्ट, पंजक वगैरे गौरकाचे हस्तक कामगार महोत्पाताप्रमाणें सर्व मंडळ निस्सार करीत होते. या कामगारांवर पूर्वी उच्चल राजाचा कडक दाब असे. तो निघाल्यावर ते पुनः शिकारी कुत्र्यासारखे रयतेला त्रास देऊं लागले. त्यांनाच राजानें पुनः नेमलें होतें.

प्रशस्तकलश कायस्थाचा पुतण्या कनक, यानें त्याच्या पश्चात् त्याच्या न्यायार्जित विपुल संपत्तीचा योग्य विनियोग केला. ५७०. त्यानें जागजागीं संतत छत्रें घातलीं. तेथे चोहोंकडून आलेल्या दुकाळ पीडितांना मदत करण्याची कायमची व्यवस्था केलेली होती.

त्या कामगारांपैकींच तिलकसिंह याला राजानें द्वारपती केलें आणि त्याचा एकाक्ष बंधु जनक, याला राजस्थानीयमुख्य न्यायाधीशाची जागा दिली. ( हा टिळकसिंह विजयसिंहाचा पुत्र होता, तो अर्थातच काकवंशीय टिळकाहून निराळा होता.) राजाच्या प्रौढ प्रतापानें टिळकसिंहानें उरशाच्या राजावर स्वारी करून त्याला जेरीस आणलें. काकवंशीय टिळकाला राजानें कंपनेश केलें व त्या योगानें त्यानें शत्रुरूपी वृक्षांचा झंझावाताप्रमाणें थरकाप उडविला. राजाच्या प्रतापानें राजस्थानीय डोड कामगार सज्जक यानें पुष्कळशा शत्रूंचा पाडाव केला. सज्जक हा एक साधा गांवढळ शिपाई होता.

अक्षमेलक याला काकवंशीयांचा आश्रय मिळाल्यामुळें, त्याचा राजाकडे प्रवेश झाला होता व त्याला मंत्रिपद मिळाले होतें.

याप्रमाणें सुस्सल राजानें कांहीं काळ बरेचसे मंत्री त्यांच्या गुणावरून आणि स्वतःचा आग्रह व आढ्यता न दाखवितां नेमले.

त्यानें नंतर वितस्ता पुलिनांत स्वतः पत्नी व सासू याच्या नांवानें तीन मोठालीं मंदिरें बांधाविण्याचें काम सुरू केलें आणि उदारपणानें पूर्वी अवचित जळालेला द्दिाविहार नवा बांधाविला. ५८०.

राजा एकदा अट्टालिका येथें गेला होता. (हाच हल्लीचा अटोलीगांव लोहरगडाखाली आठ मैलावर आहे. त्याच्याजवळच मंडी हें मोठेसें खेडें आहे.) त्यावेळी त्याच्याबरोबर कलिंजरचा राजा कल्ह व इतर विश्वासू स्नेही होते. त्यांनीं गर्गाचा कांटा काढून टाकण्याविषयीं राजाचें कान भरले गर्गाचा पुत्र कल्याणचंद्र हा स्वारी शिकारीत नेहमीं त्यांची अप्रतिष्ठा करीत असे. तो सदां सर्वदां स्वतःच्याच तोऱ्यात असे. यामुळे ते त्यांचा द्वेष व मत्सर करीत असत. 'गर्ग हा सर्वांहून वरचढ झालेला, फार शेफारला आहे. त्याची खोड मोडलीच पाहिजे,' असे वरचेवर म्हणून, त्यांनी अखेरीस राजाचे मन कलुषित केले. राजा आपणाला कैद करून लोहराला पाठविणार आहे, असें गर्गाला एका राजसेवकाकडून व एका राजाकडूनहि, कळल्यावरून, तो भ्याला व आपल्या पुत्रांसह स्वस्थानीं निघून गेला. नंतर राजाहि काश्मीर मंडळात परत आला.

असा त्या दोघाचा बेबनाव झालेला पाहून, खटपटी लोकांनी त्यांच्याकडे खेपा घालून, त्यांचें वैर विकोपाला नेलें. गर्गाचा शालक विजय, याच्यावर राजाची कृपा होती. म्हणून त्यानें त्याला निघून जाऊं दिले. पण याचा राजाला लौकरच पश्चात्ताप झाला. गर्गाचा शत्रू मल्लकोष्ठक याला त्यानें पूर्वी प्रतिबंधात ठेवले होते. त्याला त्याने यावेळी कैदेतून सोडलें आणि त्याच्याकडून कांही डामराशी विवाहसंबंध करविले. तोहि इतर डामराप्रमाणे प्रबल झाला. नंतर राजाने गर्गावर आपले सैनिक धाडले. गर्गानें त्याच्याशीं अमरेश्वराजवळपास लाढाई करून, त्याचा बराच फडशा पाडला. ५९०. राजाच्या वतीने शमालाचा शूर व प्रबल डामर पृथ्वीहर खूप शर्थीने व शौर्याने लढला. गर्गाने द्वारपती टिळकसिंह, याचा पराभव करून, त्याला पळवून लावले होते. यावरून त्या द्वारपतीच्या शौर्याचा लोकांत उपहास झाला. त्याचे सैनिक जखमी होऊन पडले होते. त्यानी शस्त्रास्त्रे व वस्त्रे भूषणे काढून दिल्यावर, गर्गाने त्या बिचाऱ्याना प्राणदान दिले. राजाच्या अगणित मृत सैनिकांना, त्यानें, रणांगणींच पुष्कळशा चिता पेटवून अग्निसंस्कार करविला. पुढे राजानें पुनः आपलें सैन्य जमवून आणले. त्याने गर्गाचा वाडा जाळविला होता. गर्ग लोहर येथून निघून धुदावनच्या पहाडीच्या आश्रयाला गेला. राजाचें सैन्य त्या पहाडीच्या पायथ्याशीं पडलेले होते. त्याच्यावर रात्री व घाटयामध्ये, वरचेवर छापे घालून, गर्गानें त्याला भारी त्रासवून सोडले होतें. अशा एका छाप्यांत त्रैलोक्यराज वगैरे कांही प्रमुख तंत्री ठार झाले. फाल्गुनांत भयंकर हिमवृष्टी झाली. राजासारखा प्रबल शत्रू छातीवर होता. तरी गर्ग थोडेसे निवडक लोक बरोबर घेऊन लढतच होता. त्याने धैर्य सोडलें नाहीं. काकवंशीय शूर कंपनेश टिळक, याने शेवटी गर्गाला त्या पहाडांत मेटाकुटीस आणले. तेव्हां गर्गाने भार्या व पुत्र यांना राजाकडे पाठविले व त्याची मर्जी व कृपा संपादन केली. राजानें त्या प्रसंगीं आपला राग मनांत ठेवून त्याच्यावर कृपा केली. असा तह करून राजा तेथून परत निघून गेला. ६००.

राजानें मल्लकोष्टाला अधिकाधिक प्रबल होऊं दिलें. तो गर्गाहून कमी दर्जाचा असल्यानें, गर्गाला यांत आपला अवमान झाला, असे वाटे. तो त्यानें लहर येथे दोन तीन महिने असतांना, निरुपायानें सोसला. पण त्याला त्याचा भारी मत्सर वाटत होता. राजा गर्गाच्या विरुद्धच होता. त्यानें गुप्तपणे गर्गाच्या सैनिकांत भेद केला आणि त्याचे कर्ण वगैरे हस्तक फोडले. आपल्याहून हीन दर्जाच्या आप्तांप्रमाणेंच राजा आपणाला लेखतो असे पाहून, गर्गाला फार दुःख झालें व वाईट वाटले. म्हणूनच तो आपले कुटुंब व पुत्र, यांच्यासह दीनपणे राजाकडे पोहोंचला होता.

एकदां राजा स्नानद्रोणीवर असतांना गर्गहि जवळच उभा होता. त्याला राजानें यथेच्छ दूषणे देऊन, त्याच्याकडून शस्त्र खालीं ठेवविले. तो स्वतःच्या शौर्याविषयीं भारी अभिमान बाळगीत असे. अशा गर्गानेंमुद्धां यावेळीं, इतका अपमान झाला असतांना, भित्र्याप्रमाणे असा नामर्दपणा केला, तेव्हा पडत्या प्रसंगीं खात्रीनें शौर्य गाजवील अशी हमी कोणाविषयीं देतां येणार? ज्यानें हवेतसे राजे गादीवर बसविले, किंवा पदच्युत केले, त्याचा त्या वेळचा तो अभिमान कोणीकडे आणि या वेळचे हे हलकट वर्तन कोणीकडे! खरोखर माणसाला विवश करून दैव हवें तसे नाचवीत असते.

लढाईत ज्याच्या भुजदंडाकडे पाहण्याची ज्याना प्राज्ञा नव्हती, अशा राजच्या कांही अंतरंगी सेवकांनीं त्याच्या मुसक्या बांधल्या व त्याला बेड्या घातल्या. त्याचा पुत्र कल्याण, सुप्रसिद्ध अशा संग्राममठाजवळ एका घरांत रहात होता. राजा त्या मठाच्या अंगणांत गेला. तेव्हां कल्हणानें लढणें बंद केलें. गर्ग अद्यापि जिवंत आहे, असे ऐकून व राजाचा समेटाचा निरोप येतांच, गर्गाचा पुत्र विदेह याने मोठ्या कष्टानें आपले शस्त्र ठेविलें. ६१०. राजाने गर्ग व त्याची बायकामुलें, याना राजवाड्यातच कैदेंत ठेवलें व तेथे तो त्यांना राजाच्या आप्तांना योग्य असे खाद्यपेय धाडीत असे. गर्गाचा पुत्र चतुष्क घरातून पळून गेला होता.त्याला कृतघ्न कर्णाने कैद करून राजाला सोंपले. दृढ पण झाकलेला कोप धरणाऱ्या राजाची मर्जी व आंतून भरून न आलेला व्रण, याचा भरंवसा कोणी धरावा?

पुढें दरदांचा राजा मणिधर याच्या परत भेटीला सुस्सल राजा जाण्यास निघण्या-पूर्वी त्याने सेवकाकडून गर्गाला ठार मारविले. गर्ग व त्याचे पुत्र दोनतीन महिने प्रति-बंधांत होते. त्या सेवकांनीं एका रात्रीं त्याला व त्याच्या तिघां पुत्रांना गळफासानें ठार मारलें आणि त्यांच्या गळ्यांत धोंडे बांधून त्यांची प्रेतें नदीत टाकून दिली. पूर्वी गर्गानें बिंबाची अशीच वाट लावली होती. ही गोष्ट लौकिक वर्ष ४२९४-ई. सं. ११७८-च्या भाद्रपदांत घडली. तिच्यापासून आपल्याला निश्चिंती वाटेल व सुख होईल, असे राजाला वाटलें होतें. पण तितक्यांत त्याला सांसारिक दुःखानें घेरलें. कालिंजरचा राजा कल्ह व महादेवी मरण पावल्यानें त्याला शोक झाला. ६२०.

सोमपालाचा बंधू नागपाल यानें आपला वडील सावत्र बंधू प्रतापपाल याचा खून करविला आणि तो भिऊन सुस्सल राजाच्या आश्रयाला आला. राजानें सोमपालाचें

समेटाचें बोलणें मान्य न करितां, रागानें त्याच्यावर स्वारी करण्याचे ठरविलें. सुस्सल राजा कांहीं केल्या वळत नाहीं असें पाहून, सोमपालानें राजाचा प्रतिस्पर्धी भिक्षाचर याला बल्लापुराहून बोलावून घेतले. याचा राजाला अधिकच राग आला व त्याने एकदम राजपुरीवर मोठ्या नेटानें स्वारी करून त्या गांवाला वेढा घातला. सोमपाल पळून गेला. नंतर राजाने नागपालाला गादीवर बसविलें व तो तिकडील शत्रूचा थरकांप करवीत, तिकडे सात महिने राहिला.

त्या वज्रधरतुल्य पराक्रमी राजानें बल्लापूरचा राजा वज्रधर वगैरेंना आपले ताबेदार केले आणि त्यांच्यावर स्वतःच्या मर्जाविरुद्ध कृपा केली त्याचे सैनिक चंद्रभागादि नद्यांच्या तीरावर यथेच्छ संचार करीत होते. त्यांच्याकडे ढुंकून पाहण्याची मुद्धा कोणा शत्रूला ताकत नव्हती. कंपनेश तिलक हा त्या राजाच्या फौजेच्या अघाडीस चालत असे. मार्गरक्षणाचे काम पृथ्वीहर डामराकडे होते. या स्वारींत त्या राजानें धार्मिक बुद्धीनें शत्रूच्या हद्दींतील ब्रह्मपुऱ्या व मंदिरें यांचें संरक्षण करून, जणो त्यांच्या नवीन स्थापनेचें फल मिळविलें. त्या महेंद्रतुल्य प्रतापी व संपन्न राजाच्या साधनसंपत्तीचे कोठवर वर्णन करावे? आपल्या स्वारांच्या घोड्यांचा चंदी चारा सुद्धां तो स्वतःच्या हद्दींतून आणवीत असे. त्याच्याबद्दल रयतेला त्याने उपसर्ग लागूं दिला नाहीं.

त्या दिवसात सुजनवर्धनावर राजाची मर्जी होती. त्याने गौरकाविरुद्ध राजाचे मन कलुषित केले. ६३०. गौरकाला राजानें राज्याच्या बंदोबस्ताकरितां मागे ठेवलें होतें. त्याच्याविरुद्ध कागाळ्या ऐकून राजाला तो सरकारी-द्रव्याचा अपहार करतो, असे वाटलें व त्यानें याबद्दल नगराधिकारी जनक यालाहि नांवे ठेवली. याचा जनकाचा बंधू तिलकसिंह याला विषाद वाटला. त्यावरून राजानें नाराज होऊन, त्याला कामावरून काढले आणि पर्णोत्स येथील अनंताचा पुत्र आनंद याला द्वारपती केले.

या प्रसंगी सोमपालाची प्रजा त्याच्याशीं राजनिष्ठेने वागली. सुस्सल राजा तिकडे बद्धमूलसा झाला असतांनाहि तिने त्याला कांहीं मदत केली नाहीं. यामुळे ते लोक प्रशंसेला पात्र झाले.

लौकिक वर्ष ४१९५–ई स. १११९–च्या वैशाखात, राजा आपल्या राज्यांत–काश्मीर मंडळांत–परत आला. त्या पूर्वीच नागपाल राज्यभ्रष्ट झाला होता. तोहि त्याच्याबरोबर गेला. पुढे राजाला भारी लोभ सुटला. त्यानें प्रजेकडून जबर दंड वसूल केला व खर्चांतहि भारी काटकसर केली. त्याने गौरक व त्याच्या हाताखालचे अंमलदार याना शिक्षा केली. हें पाहून, सारे मंत्री बेदिल झाले. राजानें नवे मंत्री नेमले. ते निरुपयोगी होते. या एकदम बदललेल्या राज्यकारभारामुळें त्याचें मनस्वी नुकसान झालें. त्यानें, जमविलेल्या खजीन्याच्या सोन्याच्या विटा बनवून, त्या लोहरगडावर पाठविल्या व तेथें त्यांच्या मेरुशृंगतुल्य राशी घातल्या. (६४०)

गज्जक हा पूर्वी गर्गाच्या विश्वासांतला होता. राजाने त्याला गर्गाच्या दुसऱ्या अनुयायाचें पारिपत्य करण्यासाठीं लहर येथील दंडाधिकारी नेमलें. हें पाहून ते अनुयायी भिऊन मल्लकोष्ठाला मिळालें. मल्लकोष्ठानें विश्वासघातानें गज्जकाला ठार मारविलें.

लहर येथें हें बंड उद्भवलें तेव्हां राजानें मल्लकोष्ठाचा वडील सापत्न बंधू अर्जुन, हा त्याच्याजवळ होता, त्याला कैद करविलें व सङ्खचंद्राचा पुत्र (बहुधां गर्गाचा पुतण्या) हस्त याला कैद करवून बिट्ठकादि स्वतःच्या पक्षाला राहील असे केलें. त्याचप्रमाणें पूर्व वैर स्मरून, त्यानें सूर्य व त्याचा पुत्र, आणि आनंदचंद्र वगैरेंनाहि अन्यायानें कैदेंत टाकलें. पुढें मल्लकोष्टक लहराहून पळून गेला. तेव्हां त्याने त्याचा बंधू अर्जुनकोष्ट याला सुळीं देवाविलें. नंतर सैन्य मागें सोडून, तो नगराला परत गेला. त्याच्या या मित्रद्रोहामुळें सारे डामर त्याच्याविरुद्ध उठले याचा राजाला राग आला आणि त्यानें आजवर उत्तम उपयोगीं पडत आलेल्या पृथ्वीहिरावर सेनापती व इतर मंत्री यांना अवचित छापा घालण्यास सांगितलें. त्यांनीं त्याला वेढा घातला. त्यांच्यांतून तो मोठ्या शर्थीनें निसटला व जयंती प्रांतांत (हा प्रांत बहुधा मडव राज्यांत असावा) राहणाऱ्या वृद्ध तरी तरतरीत, अशा क्षीर नांवाच्या आप्ताकडे आश्रयाला गेला. पुढें तो बंडखोर अवंतिपुर वगैरे गांवातून दिवसां ढवळ्या मोकळेपणी फिरे. पण त्याला अडविण्याची कोणाची छाती झाली नाहीं. राजानें वेडेपणानें असे हे शत्रू उलटविले. यामुळें साऱ्या प्रजेला फार त्रास झाला. आणि एखादा क्रूर वेताळ उठाविल्याप्रमाणे पीडा झाली. ६५०.

क्षीरानें शमांगासा नांवाच्या प्रदेशांत पृथ्वीहराशिवाय आणखी सत्रा प्रबल डामर जमविले. हे पाहून राजा घाबरला. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं तो विजयेश्वर येथें गेला व त्यानें सेनापती तिलक याला ताबडतोब त्या डामरसंघाचा पाडाव करण्याला पाठविलें. तिलक अप्रतिहत शूर होता. त्यानें त्यांच्यावर हल्ला करून, पूर्वेचा झंझावात अभ्र मंडळ उडवून देतो तद्वत, त्यांची दाणादाण केली. त्यांना जिंकून तो परत आल्यावर त्याचा सन्मान व अभिनंदन करण्याऐवजीं, राजानें त्याची भेट सुद्धां न घेतां, त्याचा अवमान केला. राजा नगराला गेल्यावर तिलक आपल्या घरीं जाऊन स्वस्थ बसला. पुढें त्यानें राजाच्या तर्फेनें कांहींच उद्योग केला नाहीं. तो उदासीन झाला होता.

कोणा राजसेवकाची योग्यता घटवावी, त्याला हलक्या लोकाबरोबर लेखावें, त्याच्या बरोबरीच्या सेवकांबरोबर त्याला अधिक अधिकार व वेतन वगैरे देऊं नये, त्याला शत्रूशीं लढण्यापुरतें पुढें करावें व समेट होतांच त्याला विसरून जावें, राजकार्यांत उत्तम कर्तबगारी दाखविल्यावर ते काम होतांच त्याला मसलतींतून वगळून त्याचा पाणउतारा करावा, असा अनुभव येत असलेले राजसेवक, नाराज होऊन त्या राजाला लौकरच सोडतात. गृहस्थ लोक सर्पाकीर्ण गृह तत्काल सोडून जातात, तशीच त्यांची स्थिती होते.

तिलक घरीं बसलेला पाहून डामरांनीं पुनः उठावणी केली आणि राज्यांतलि सरकारी कोठारें लुटलीं. अकालीं अभ्रें येऊन पिकें बुडावीं तशी स्थिती झाली. सर्वत्र बुडालें

असलेल्या विप्रांनी उद्विग्न होऊन, जागजागी प्रायोपवेशनें केलीं आणि यज्ञामध्यें स्वतःच्या घोर आहुती दिल्या. दैवी उपसर्गामुळे घोडे व खेचरें नाहींशी झालीं. आसन्नवज्रपात अशा झंझावाताने कापणाऱ्या वृक्षसमूहाप्रमाणे सर्व लोकांची अवस्था झाली होती. ६६०.

लौकिक वर्ष ११९६ (सं. ११२०) वर्षाच्या प्रारंभीं तीव्र रविकिरण संतप्त वर्फाच्या कडप्याप्रमाणे डामर लोक पुढे घसरूं लागले. दिवसेंदिवस येथून बंडाला सुरुवात झाली. तें पुढें फुटलेल्या गळवाप्रमाणें चरत वाढत चालले. प्रबल अशा विजयाने टिक्क वगैरे आप्त डामराचा एक मोठा संघ जमविला. नंतर त्यानें राजाच्या सैन्यावर जाऊन हल्ला केला. ते सैन्य कायस्थ नागवट्ट याच्या हाताखाली एके जागीं तळ देऊन राहिले होते. त्याने त्या सैन्याला वेढा घातला. नागवट्टाने हा वेढा बरेच दिवस कसातरी सहन केला. पुढें राजाने मिनतवारीने तिलकाची समजूत केली. राजाच्या दुष्ट वर्तनामुळे त्याचें मन विटले होतें. तरी यावेळी त्यानें राजाचे म्हणणे मान्य केले. तो बाहेर पडल्यावर त्याची व विजयाची लढाई जुंपली. विजयाने दुर्गमस्थळीं तळ दिला होता. त्या लढाईत पुष्कळदा त्याची जयाशा, किंबहुना त्याचा प्राणही, धोक्यात पडला होता.

ल्हर येथे मल्लकोष्ट प्रबल झालेला पाहून, राजा वैशाखात, थल्योरक येथे गेला. ( हे गाव सिंध नदीच्या उजव्या तीरावर, तिच्या खोऱ्याच्या तोंडाशी गांद्रबालच्या समोर असलेलें थेद्दूर गाव असावें. ) शत्रूनें रात्री त्याच्या सैन्याला पुष्कळ त्रास दिला. त्या मुळें, मरणोन्मुख माणसाना घोर स्वप्नें पडून त्याची त्रेधा उडते, तशी त्याची स्थिती झाली होती. सुस्सल राजा सर्व प्रकारें श्रेष्ठ व समर्थ होता. त्याने स्वतःच्या हिंमतीनें हल्ला करून, हर्ष राजालासुद्धा परास्त केलें होते. आपल्या पराक्रमाने त्याने हे मंडळ अनेकवार जिंकून, सर्व पृथ्वी पादाक्रात करणाऱ्या जामदग्न्याप्रमाणे आपले विलक्षण साहस व्यक्त केले होते. असा तो सुस्सल राजा, या प्रसंगीं प्रतिकूल दैवामुळे, विजयलक्ष्मीला विमुख झाला. त्याला हार खाऊन तेथून पळून जावे लागले. तो गेल्यावर पृथ्वीहराने अवचित हार्दीग्रामाच्या सुरक्षित तळावरून, एकदम चालून येऊन हल्ला केला व शूर सज्जकाला पळवून लावलें आणि त्याचा थेट नगरापर्यंत पाठलाग करून नागमठ जाळून टाकला. पुढे तो व इतर क्रूर व साहसी डामर यानी, राजा व त्याचे आश्रित, यांचे कुरणांत चरत असलेले घोडे चोंहीकडून हाकून नेले. याचा राजाला भारीच क्रोध आला व त्याने फारच क्रूरपणे व निर्दयतेनें लोकांना छळण्यास सुरवात केली. दुर्दैवाने घेरलेला मनुष्य दुर्वर्तनाला प्रवृत्त होतो. त्यानें पृथ्वीहराला जामीन असलेल्या डामराला मारून, त्याच्या प्रेतावर बिसतंतू टाकून, तें प्रेत पृथ्वीहराकडे भेटीदाखल पाठविले. ( काश्मीरांत मासाबरोबर बिसतंतू आवडीनें खाण्याच्या प्रघात आहे. ) तसेंच विद्दकाचा बंधू हंब याचीहि त्याने तीच व्यवस्था केली व त्याचे प्रेत विद्दकाकडे पाठविलें. दुसऱ्या कांहीं डामरांकडेहि त्यानें अशींच, त्यांचे बंधू व पुत्र याचीं प्रेते पाठविलीं. जय्यक हा सिफिन्ताग्रामांत रहात होता. त्याच्याकडे त्यानें त्याच्या आईला, तिचें नाक, कान

कापून पाठविले. तसेच त्याने क्रोधावेशाच्या सपाटयांत सूर्यक व त्याचा पुत्र यांना नगरांत सुळी दिलें व पुष्कळचशा वध्य व अवध्य लोकांचे प्राण घेतले. तो असा कृतांतकालाप्रमाणे चेकाळलेला पाहून दरबारांतील आंतर व बाह्य सारेच लोक भ्याले व बेदिल झाले. ६८०. हर्षानें ज्या मूर्खपणाच्या वर्तनानें राज्य गमावलें होते, त्याला तो नावे ठेवीत असे आणि त्यानेहि तोच मार्ग स्वीकारला.

युद्धांत मग्न, गहन, कविकर्माविषयीं प्रेमी, द्यूतासक्त आणि राज्यभाराक्रात यांना, जो सर्वगुण परिपूर्ण असून वर लिहिलेल्या प्रसंगी कधी चुका करीत नाही, अशा त्रयस्थालाच नावे ठेवतां येतील.

राजा मधूनमधून अश्रात परिश्रम करी. या द्वारे त्याने मल्लकोष्ट व त्याचे साथीदार याचा दिमाख बराच कमी केला होता.

पुढे विजयाने भिक्षाचराला विषलाटाच्या वाटेनें हळूंहळू आणवून घेतले. त्यानें नंतर देवसरसवर स्वारी केली. तिकडे जात असताना कंपनेशाने त्याला गांठलें व त्याचा पराभव केला. तेव्हा त्याला पळून जावें लागलें. पुढें तो एका श्वभ्रा-कडया-वरून पडला. त्याला ओळखून लोकांनी त्याला ठार मारलें. कंपनेशानें त्याचे शिर-जणो जयवृक्षाचे फलच-राजाकडे पाठविले. पण त्या कृतघ्न राजाने अशा अभिनंदनीय कृत्याबद्दलहि कांहीच समाधान व संतोष न दाखवितां, सत्काराच्या ऐवजी त्याला तिरस्कार द्योतक निरोप पाठविला कीं, विजयाचा प्राण श्वभ्ररूपी कंपनेशानें घेतला, यांत तुमची बडेजाव ती कसली ? यावरून राजा कृतघ्न शिरोमणी आहे असे जाणून, तिलक नाराज झाला व हळूंहळूं तो त्याचा द्रोह करूं लागला. तो तटस्थ राहता तर सज्जन त्याला दोष देतेना. पण त्याच्या राजद्रोहामुळे त्याचें नांव घेणे मुद्धा गैर झाले आहे.

विवेकी लोक निरनिराळ्या प्रसंगी सौम्य व वेळ मारून नेणारे वर्तन करतात व तें चांगलं असेंहि म्हणतात. पण मानधन सज्जन, कृतज्ञ मालकानें केलेली स्तुती ऐकून, त्याचें, प्राणाच्या निरपेक्ष हित साधीत असतात. जळत असलेले वस्त्र, सांप चावलेली त्वचा, शत्रूला कळलेला मंत्र, पडण्यास झालेलें जीर्ण गृह, सेवा न स्मरणारा अकृतज्ञ राजा आणि संकटसमयीं विमुख होणारा स्नेही, यांचा तत्काल त्याग न केला तर, कसल्याहि धीर वीराचा, प्रारंभीच अवसानघात व शक्तिपात होतो. न्याय्य व योग्य उपाय सोडून, एकाएकी रागावून, राजद्रोही बनणाऱ्याहून, अधिक महापातकी कोण मिळणार? मातापितरांचा उपकार एक वेळ जन्म देण्यापुरतांच, पण प्रभू सर्वकाल उपकारी असतो, म्हणून प्रभुद्रोही हा पितृघ्नाहूनहि अधिक महापातकी होय.

विजय मारला गेला तरी इतर शत्रूंचे प्रयत्न हाणून पाडणें, अवश्य होतें. यामुळें त्यावेळी कोणा विचारी माणसाला स्वस्थता वाटत नव्हती. बंड थोडे दिवस दबलें. पण लौकरच त्याने पुनः उचल खाल्ली. यामुळें लोकांना भारी ताप व पीडा झाली. एडका मागें सरून पुनः जास्त जोरानें टक्कर देण्याला धांवतो, तशांतली स्थिती झाली होती. मल्लकोष्टानें

भिक्षाचराला परत आणण्यासाठीं विषलाटाला पुनः आपले लोक पाठविले. कंपनेश तिलक राजाशीं नाराज होता. तरी त्यानें याविषयीं राजाला सांगून पाठविलें. पण राजानें रागानें त्याचा निषेध करीत, भिक्षाचराला वाटेंत त्रास न देतां पुढें येऊं द्यावें म्हणजे, शिकारींत रनिघालेल्या कोल्ह्याप्रमाणें आम्हीच त्याचा समाचार घेऊं, असा त्याला निरोप पाठविला. राजद्रोहाचा परिणाम चागला कळत व भोगलेला असूनहि, राजानें यावेळीं दुर्दैवानें कर्तव्य विसरून, अशी ही घोडचूक केली.

राजाचीच अशी आज्ञा आल्यावर, त्या कृतघ्न तिलकानें डामरांकरवीं भिक्षाचराला दुर्गम पहाडी घाटांतून खुशाल अलीकडे येऊं दिलें. तेथपासून मार्गांत जागजागीं लोकांच्या तोंडून भिक्षाचराविषयीं अनेक विलक्षण गप्पा पसरूं लागल्या. त्यामुळें राजाला भीति पडली. भिक्षाचर असंस्कृत शब्द तोंडांतून काढीत नाहीं, एकाच बाणानें दहा शिलांचा भेद करतो, न दमता शंभर योजनें प्रवास करून परत येतो, असल्या गप्पा, सफेत दाढी मिशावाले वृद्ध कर्पीसुद्धां सांगत फिरत. त्यामुळे लोकांना त्याचे कौतुक वाटे व त्याचें स्तोम वाढत चाललें. राजकारणाशीं काडीभर संबंध नसलेल्या व्यक्तीसुद्धां भिक्षाचराविषयीं बातमी विचारीत व सांगत फिरत. जणों काय त्यांना त्याच्या हक्काचें अर्धे राज्य मिळावयाचें होतें. नदीकांठी स्नानगृहात स्नान करणारे, घरीं बसलेलें वृद्ध कामगार, राजवाड्यांत रहाणारे नामधारी राजपुत्र व राजवंशी, स्वभावतःच दुष्ट व उंच घोड्यावर बसण्यासाठीं स्वारांमध्यें भरती होऊं इच्छिणारे उमेदवार सैनिक, शिष्यांकरवीं पाठी खाजवून घेत बसलेले शिक्षक उपाध्याय, मंदिरांमध्ये राहणाऱ्या हक्कदार वृद्ध नाटकशाळा व नर्तकी, ठेवी पचवून मोठ्या उत्सुकतेने पुराण श्रवणाला बसलेले सावकार, प्रायोपवेशकुशल द्विजपरिषदांमधील ब्राह्मण मंडळी, नगराच्या आसपास राहणारे शस्त्रधारी, तरी खरे शेतकरी डामर वगैरे, राजद्रोहाच्या गोष्टी सांगत व ऐकत फिरत काळ काढणारे, असले लोकच या काश्मीर मंडळांत राजावर आपत्ती आल्याचा आनंद मानीत असतात. ७१०. ( हे वर्णन हल्लींसुद्धां श्रीनगरातील गप्पाष्टकी मंडळीला चांगलें लागूं पडण्यासारखें आहे. )

भिक्षाचर येण्याची बातमी खरी होत असल्याचे पाहून लोक भयानें कांपूं लागले. व राजाची काळजी वाढली. त्यावेळीं पराक्रमी पृथ्वीहर, एका दाट झाडी असलेल्या पहाडी घाटींत दडून बसलेला, एकाएकीं बाहेर पडला व त्यानें राजाच्या फौजेचा फडशा पाडला. अनंत, व काक वंशांतील दोघेहि द्वारनायक आनंद आणि तिलकसिंह,या तिन्ही मंत्र्यांना त्यानें पळवून लाविलें. ज्येष्ठ शुद्धांत विजय मारला गेला आणि आषाढ शुद्ध षष्ठीला हा राजाचा पराभव झाला. तेव्हां तो घाबरून गेला. गाई उड्या मारूं लागणें, सांप झाडावर चढणें, मुंग्या आपली अंडीं दुसरीकडे घेऊन जाऊं लागणे, या गोष्टीवरून पर्जन्यकाळ जवळ आल्याचें कळतें तसे, होत असलेल्या अपशकुनांवरून आपणावर घोर आपत्ती येणार, असें राजाला वाटूं लागले. ( पाऊस येण्याची ही चिन्हें बृहत्संहिता अध्याय २८ श्लोक ७ यांत दिलेलीं आहेत. ) त्यानें त्याच्या प्रतिकाराची योजना

ाठविली. त्यानें पोक्त विचार करून पुत्र, पत्नी व कुटुंबांतील आणखी कांहीं मंडळीं ांना लोहरकोटाला पाठविलें. त्यांच्या मागून निघालेला लोष्ठ नांवाचा ब्राह्मण व दुसरे ांहीं लोक, वाटेंत वितस्तेचा पूल तुटून बुडून मेले. या अपशकुनामुळें राजाला खेद झाला. आणि त्यांच्या पाठोपाठ तो पुष्पपुरापर्यंत जाऊन दोन दिवसांनीं नगराला पुनः परत आला. पुत्र व पत्नी गेल्यावर त्याच्या वृत्तींत फरक पडला व त्याचें भाग्य व वैभव त्याला सोडून गेली असें वाटूं लागलें. अशा बिकट संकट समयीं कुटुंबांतली माणसे लोहराला पाठवेण्याची त्याला सुबुद्धी झाली हे चांगले झाले. त्यामुळें त्याला भारी उद्वेग झाला खरा, पण त्याला पुढे पुनः उत्तम दिवस पाहाण्याचें व आपल्या पुत्राच्या रूपानें हल्लीसुद्धां या मंडळांत राज्याधिकार चालविण्याचें साधन झालें. हा अनर्थ त्यानें हर्षाप्रमाणे स्वतःच ओढून आणला होता.

श्रावणात लहरच्या सैनिकांनीं भिक्षाचराला मडव राज्यातील प्रबल डामर संघाकडे आणून पोहोंचविलें. त्यांनी त्याला, एखाद्या जांवयाला समारंभाने सासऱ्याच्या घरीं नेल्याप्रमाणे लहराला नेलें. तेथें मल्लकोष्ठ वगैरे सरदारांनीं त्याचा सादर पाहुणचार करून, त्याला ठेवून घेतले व त्या प्रबल डामरांना कंपनेशाला त्रास देण्यासाठी, आपापल्या स्थळीं परत पाठविले.

याप्रमाणे शत्रूचा फांस घट्ट बसूं लागलेला पाहून, राजानें मनस्वी पैसा खर्च करून, पायदळाची भरती चालविली. सढळ हातानें पैसा मिळत असलेला पाहून, कारागीर, शिल्पी व गाडीवान सुद्धां शिपायी बनले. नगरांत रस्तोरस्ती सेनापती लोक, लोहकवचें घातलेल्या घोडेस्वारांच्या कवाइती करवीत लढाईच्या तयारीला लागले.

भिक्षाचर मयग्रामीं असतांना, लहरच्या लोकांनीं, अमरेश्वर येथें तळ देऊन राहिलेल्या राजाच्या सैन्यावर चालून जाऊन हल्ला केला. हिरण्यपुराजवळ लढाई झाली. (हल्लीं लारहून श्रीनगराला येण्याच्या मार्गावरील रण्यिल गांव असावें.) तिच्यांत राजाचा प्रसिद्ध सेनापती विनायकदेव व दुसरेहि सेनानायक पडले. ७३०. लढाईच्या प्रारंभीच राजाच्या सैन्यांतील एक उत्तम अश्व शत्रूच्या हातीं पडला. तेव्हा नृपश्रीच हातीं आली असें त्यांना वाटलें.

राजवाड्याजवळच्या क्षिप्तिका नावाच्या कालव्याच्या कांठावर लढाई करून पृथ्वीहरानें पुष्कळ शूरवीर मारले (क्षिप्तिका-हा कालवा वितस्तेंतून काढलेला आहे. तो जुन्या राजवाड्याजवळून वहात पुढें सातव्या पुलाजवळ, दीड मैलावर परत वितस्तेला मिळतो.)

तिलक विजयेश्वर येथें होता. तरी खडुवी व होलडा येथील डामरांनी महासरितेच्या तीरावर जाऊन हल्ला केला. (खडुवी विही परगण्यांतील झऱ्याच्या तीर्थाजवळचें हल्लीचें खुब गांव.त्याच्यावरून साऱ्या परगण्याला हें नांव पडलें होतें. होलदा-हल्लींचा वुलर परगणा.) तसेंच त्यांनीं नगरालाहि वेढा घातला आणि जागजागीं जाळपोळ लूट मार व आरडाओरड सारखी सुरूं ठेवली. रणवाद्यांच्या आवाजांत राजाच्या फौजेच्या तुकड्या नगराबाहेर

पडणें, जखमी लोक परत आणणें, रणांत पडलेल्यांचा आप्तांचा शोकाक्रोश, पराभूत सैनिकांची पळापळ, तमासगिरांची धांवपळ, बाणांची घनदाट वृष्टी, चिलखतांची ने आण, घोड्याची खेचताण व प्रेतांबरोबरच्या गर्दीनें उठलेला खूप धुरळा, इत्यादिकांनी सारे रस्ते पुष्कळ दिवस सारखे गजबजलेले होते. रोज सकाळीं शत्रू जैय्यत तयारीनें नगरावर चढाई करी 'तेव्हां आज राजाचा खास निकाल लागतो.' असें सर्वांना वाटे. अशा वेळीं सुस्सल राजाशिवाय दुसऱ्या कोणाची शत्रूला तोंड देण्याची ताकत होती ? अशा या राज्यावरील बिकट व भीषण अरिष्टांतमुद्धां त्याचें धैर्य खचलें नाहीं. तो जखमी सैनिकांसाठीं पट्ट्या, औषधें व पथ्यपाणी पुरविणें व बाणाची घुसलेली फाळें काढविणें, तसेंच योग्य इनामे देणे, यासाठीं मुक्त हस्तानें सारखा खर्च करीत होता. ७४०. सैनिकांना इनामें व प्रवास वेतन किंवा भत्ता व औषधपाण्यासाठीं मदत यांच्यांत राजानें खर्च केलेल्या रकमेची गणती सुद्धां करणे कठिण होतें. त्या युद्धांत ठार होऊन जखमी होऊन घरीं येऊन मेलेले, असे सहस्रावधि नरतुरंग यांचा सारखा नाश चालला होता. राजाचें सैन्य बहुतेक स्वारांचे होते. त्याच्या हल्ल्यामुळें मल्लकोष्ठादिक लहरच्या बंडवाल्याच्या उद्दामपणाला व उत्साहाला आळा पडत होता. पण अभ्यंतरातील कांहीं दरबारी यांनी फितूर होऊन सुचविल्याप्रमाणें त्यांनी भिक्षाचराला पायवाटेनें सुरेश्वराला पाठविलें. त्याच्याबरोबर तीरकमठेवाल्याचा भरणा होता. तेथें सरोवराच्या निरुंद बांधावर लढण्यांत त्या तीरंदाजांची सरशी असून राजाच्या स्वारांचें त्यांना भय उरलें नव्हतें. तिकडून हल्ला करून त्यांनी जय मिळविला.

इकडे राजद्रोही कंपनेश तिलक विजयेश्वर येथें रहात होता. तो उत्साहानें लढला नाहीं. यामुळे डामर जोरावले. आपण निघून जाताना आपण निर्बल आहोत असें त्या लवन्याना वाटूं नये व निघतांना त्याना आपल्या पिछाडीला त्रास देता येऊं नये म्हणून व आपलें शौर्य दाखविण्यासाठीं त्याने विजयेश्वर येथें पोहोंचलेल्या अज्ज राजाच्या सैनिकांवर चालून जाऊन, त्याचे अर्धाचश लोक मारल्यावर, तो परत आला. नंतर विजयेश्वर सोडून तो नगराला गेला. थ्यालेल्या डामरांनीं त्याचा अर्थातच पाठलाग केला नाहीं. नुसती आरडाओरड करीत पहाडावर चढून गेले व त्यांनी त्याला सर्व मार्ग मोकळे सोडले. तो परत आला तेव्हां राजा संकटांत होता. तो फारच उदासीन व खिन्न झालेला होता. त्यानें तिलकाचा सत्कार केला. पण तिलकाला त्याच्या पूर्वीच्या वर्तनाचे स्मरण असल्यामुळे हंसू आलें. पुढे इतर मंत्र्यांप्रमाणे तोहि या मोहिमेवर गेला पण त्यानें आपल्या योग्यतेला शोभे असें काहीं युद्धकार्य केले नाही तो केवळ तटस्थवृत्तीने राहिला होता.

यापुढे मडव राज्यातील साऱ्या डामर लोकांनी चढाई करून महासरितेच्या काठच्या प्रदेशाचा कबजा केला ( हा प्रदेश हल्लींचा चिनारबाग होय, ) राजाने साम दाम भेदादि उपाय केलेले त्याच्या दरबाऱ्यांच्या फितुरीमुळें व्यर्थ गेले. राजानें पूर्वी अनेक राज्यावर स्वाऱ्या करून जय मिळविले होते, तरी पण नगराच्या संरक्षणाच्या कामीं त्यानें जे साहस व शौर्य दाखविले. त्याची त्या सर्वांवर ताण होती.

द्वारपती राजपुत्रांसह अमरेश्वरानजीक होता आणि राजस्थानीय आणि दुसरे कांहीं मंत्री राजानवाटिकेच्या जवळपास होते. तरी ते सारे दूर परदेशीं मोहिमेवर गेल्याप्रमाणें राजाकडून जबर भत्ता उकळीत होते. (राजानवाटिका=हल्लींचा राणवोर नांवाचा श्रीनगराचा भाग.) पण त्यांनी लढाई कोठेंहि केली नाही. शत्रूच्या इतर सेनापतींना कधीं कधीं पराजय प्राप्त होत असे. पण पृथ्वीहर सतत विजयच मिळवीत राहिला. मधुपानमत्त व क्रुद्ध वेताळाप्रमाणें, साऱ्या समरभूमीवर धिंगाणा घालीत राहून, त्यानें राजाच्या सैन्यांतील बहुतेक उत्तमोत्तम वीरांचा फडशा पाडला. त्याच्याशीं युद्ध करण्यांत काय ते इच्छती कुलांतील तरुण वीर उदय याचेंच शौर्य व तेज अप्रतिम चमकले. ७६०. त्याने मोठ्या ईर्षेनें पृथ्वीहराशीं द्वंद्वयुद्ध करून त्याची दाढी उपटली व तरवार खेचून घेतली.

बाहेर लढाया चालल्या असतांना नगरांत बाण लागून बायकामुले मरत होतीं. असा घोर संग्राम वाढत चालला असतांना राजाला विलक्षण निरुत्साहाची स्थिती प्राप्त झाली. त्याला बाहेर मुद्दा पडवेना. तो असा घेरला गेला असताना सोमपालानें अट्टालिका लुटून जाळून टाकली. गजाशीं लढण्यात सिंह व्यग्र असल्याविळेशिवाय पोकळ पौरुष दाखवीत. त्याच्या गुहेकडे जाण्याला गावढळ खोकडाना दुसरी कोणची संधी सांपडणार?

दोन्ही राज्यावर अशी विलक्षण व एकदम गर्दी चाललेली पाहून राजाला भारी दु:ख झाले व लाजहि वाटली. त्याला स्वतःकडे सुद्धा पाहवेना. सर्व तऱ्हेच्या संकटांमुळें त्याला तो काल भारी दुःखाचा व त्रासदायक झाला होता. तरी तो धैर्य धरून राहिला होता. त्यातच राजानवाटिका येथील द्विजांनी त्रासून राज्याच्या हिताच्या उद्देशाने प्रायोपवेशन केले पण तें उलटें अनहिताचेच झालें. त्यानी राजाला विनंति केली की, आपले सारे मंत्री युद्धाच्या कामी अगदीं उदासीन आहेत त्यांच्याकडून जामीन घेऊन त्या जामीनांना लोहरगडावर पाठवा. नाही तर हे हल्लींचे संकट असेच कायम राहून लौकरच हातीं—पदरी पडावयाचे--यावयाचे शरद् ऋतूंतले—रब्बीचे—सारे पीक शत्रू कापून नेतील व ते आम्हाला मुळींच मिळणार नाही. ७७०. अशी त्यानी मंत्र्याच्या उदासनितेबद्दल उघड गिल्ला केली तोवरची परिस्थिती पाहून राजाने त्यांची उपेक्षा केली होती. ही गिल्ला केलेली ऐकून ते सर्व मंत्री घाबरले. पुढें त्या नष्ट द्विजांनी विनवण्या करकरून राजाकडून भलभलत्या गोष्टी करविल्या. पूर्वी त्यांना राजाचें काडीभरमुद्धा वाकडें करवितां येत नव्हतें. राजाच्या सभोवतीं पारिषद्य व पुरोहित वगैरे लोकांची प्रति शत्रूसेनेसारखी, गर्दी जमली. त्याचे सांत्वन करण्यात नाना तऱ्हेच्या चुका झाल्या. त्यामुळे सारें राज्य व्याकुळ झाले व सर्वत्र भारी लूटमार सुरू झाली. ज्यानी पूर्वी कधी राजसभा पाहिलीहि नव्हती व ज्याना सरकारी कामकाजाचा गंध नव्हता अशाचें तो सांत्वन करीत असताना, ते त्या बिचाऱ्याला हवे तसे बोलत.

लवन्याच्या बंडाव्यापेक्षाहि हे ब्राह्मणाचे बंड राजाला अधिक तापद झालें. पादरोगाहून कंठरोग जास्त दुःख देतो. याप्रसंगीं राजानें त्यांच्यांतील प्रमुख गडबड्याना द्रव्य देऊन वळवून घेतले आणि मोठ्या प्रयासानें त्या सर्वांची कशी तरी समजूत केली.

भिक्षूचा सेनापती वर्णसोमाच्या वंशांतील विजय, हा कांहीं सैनिकांसह जबरदस्तीनें नगरांत घुसला होता. त्याला राजाच्या स्वारांनीं ठार मारलें. तो नगरांत घुसला. तेव्हांच राजक्रांती व्हावयाची. लवन्यांमध्यें पृथ्वीहराचें सामर्थ्य व वजन कांहींसें कमी झाले होतें. हें पाहून राजानें त्यांच्यामध्यें फूट पाडण्याचा प्रयत्न चालविला, त्याच्याकडे पृथ्वीहरानें समेटाचें बोलणें लावलें. तो सर्वांत प्रबल व यशस्वी. त्याची ही कृती पाहून उभय पक्षांच्या सैनिकांना बंड शांत झालें, असें वाटलें. त्याला नागमठाजवळ घेऊन येण्यासाठीं राजानें आपले तीन विश्वासू मंत्री पाठविले होते. त्यांच्यावर कपटानें हल्ला करून पृथ्वीहरानें त्यांना ठार मारविले. त्यांच्याबरोबरच तिलकसिंहाचे सेवक व धात्रेय मम्मक, गुंगाद्विज, व राम नांवाचा वारिक-पाहारेवाला-हेही मारले गेले. तसेंच राजानें ओलीस पाठविलेला गौरक, शंकरार्चे ध्यान करीत असतांना मारला गेला. या लोकांच्या आप्त इष्टांनीं आरडाओरड केली. तिच्याकडे लक्ष न देता शत्रूंनीं निर्दयपणें त्याना मारून टाकलें. हा पृथ्वीहरानें केलेला भयंकर विश्वासघात एकून साऱ्या राज्यांतील लोकांना त्वेष आला व ते बेदिल झाले आणि त्यांनी दिलेल्या शिव्याशापानें सारा राजवाडा जणों हादरून गेला. ही गोष्ट पौष शुद्ध चतुर्दशीला घडली. तो दिवस राजाला फारच कष्टाचा गेला. त्याला फार दुःख झाले. आतां धडगत नाहीं असे त्याला वाटूं लागले. स्वतःच्या विचारावरचा सुद्धां त्याचा भरंवसा उडाला आणि तो यःकश्चित परक्या माणसाला सुद्धां, 'पुढे कसे करावे, काय करावें,' असे विचारूं लागला. हे पाहून लोक त्याला हंसू लागले. याचा बहुतेकांना आनंदच वाटला. असली संकट परंपरा तो निमूटपणे सोशीत असताना, त्याचे सेवक शत्रूला मिळूं लागले. कंपनेश तिलकाचा सापत्न बंधु त्रिंब शत्रूला मिळाला. त्याला त्यानीं द्वारपतीचे काम दिले. ७८०.

तिलकसिंहाचा बंधू नगराधिकारी जनकसिंह, याने गुप्तपणें दूत पाठवून आपली पुतणी भिक्षूला देऊं केली. राजाचे सैनिक घोडे, शस्त्रें, कवचें, वगैरे हातीं लागेल ते सामान घेऊन, दररोज भिक्षाचराकडे चाललेले दिसत होते. फार काय? दिवसां राजाजवळ बसलेले लोक, रात्रीं निर्लज्जपणें भिक्षूकडे पोहोंचलेले पाहण्यांत येत होते. इतक्या निकृष्टावस्थेला राजाचा अंमल पोहोंचला होता! लोक इकडे व तिकडे कोणी अटकाव न करिता जाऊं येऊं लागले होते. त्यांतच आणखी एक नवें संकट उद्भवलें. हिंवाळी पीक डामर लोकांनीं पार लुटून नेलें. तेव्हां लोक घरेंदारें टाकून देशोधडीला लागले. 'सुस्सल राजा गेला तरी भिक्षाचर साऱ्या काश्मीर मंडळाला सुवर्णभूमी बनवील,' अशी लोकांची भलतीच समजूत झालेली होती. लोक गतानुगतिक असतात. भिक्षेकरी कधीं तरी उदार होतो कीं नाहीं, याचा त्याना विचार रहात नाही. किंवा 'भिक्षाचराला तरी संपत्ति मिळणार कशी व कोठून, हे त्यांनी लक्षांत घेतलें नाहीं. शून्य अंबरानें-आकाशानें-परिवृत नूतन शशिकला थोडावेळ दिसते न दिसतें पण तिलाच अंबरार्थी-वस्त्रप्राप्तीची इच्छा करणारे लोक-नमस्कार करून अंबराची याचना करतात! अशा सद्सद्विचार सोडून वागणाऱ्या लालसेला धिःकार असो.

राजाची बाजू विजयी झालेली ऐकून लोक उद्वेगानें व खेदानें मान खालीं घालीत आणि भिक्षाचराचा विजय होतांच त्यांचा आनंद पोटांत मावत नसे. यावेळीं राजा व डामर या दोन्ही पक्षाच्या सैनिकांचा परस्परांच्या भीतीमुळें वहाणीतल्या एकमेकाला भिणारे ब्राह्मण व कुत्रा यांच्यासारखी स्थिति झाली होती. यामुळें युद्ध कांहींसें थांबलें होतें. ८८०. स्वतःचे सेवक सुद्धां विश्वासघात करतील, या भीतीमुळें राजा पळून जाण्याला तयार झालेला होता, तर इकडे त्याच्या प्रतापाच्या भीतीनें डामर गांगरले होते. हा प्रकार परस्पर खरी स्थिति न कळल्यामुळें झाला होता आपले आप्तबंधू सुद्धां केव्हां दगा देतील कोण जाणे, असें वाटत असल्यामुळें राजाला तेथेंच मार्गप्रतीक्षा करीत राहावें, कीं पळून जावें, याची, किंवा स्वतःच्या जीविताविषयींहि खात्री वाटेना. अशा त्या विलक्षण संकटाच्या प्रसंगीं तो वस्त्रें, भूषणें, आणि सुवर्ण याचा ऊर्मी वर्षाव करीत असूनहि, ते घेणारे लोकच त्याचे आभार मानण्याऐवजीं त्याला नावें ठेवीत.'हा राजा मोठा नष्ट आहे, त्याचें धडगत नाहीं,' वगैरे निर्भय व निर्भीडपणें बोलत. तें ऐकून, वैद्यानें असाध्य म्हणून सोडलेल्या रोग्याच्याप्रमाणें, त्याचें चित्त भारी चंचल व कष्टी रहात असे. त्याची जरूरीची आज्ञा, त्याचे सेवक, कशी बशी मानीत असताहि, त्याच्याकडे ऐटीनें व तिरस्कारानेसें पहात. तो राजा इतर प्रकारे व प्रसंगीं मोठा साहसी होता तरी दुर्दैवानें यावेळीं तो अगदीं सामान्य माणसासारखा झाला होता वाड्यांतून बाहेर पडण्याची सुद्धा त्याला भीति वाटत होती.

अपसांतील कलहामुळें डामर मंडळी परत जाण्याच्या बेतात होती, तर इकडे, राजाचे सैनिक त्याला दीन व हताश करीत होते. ते भत्ता वसूल करण्यासाठीं शस्त्रें उपसून राजद्वारें रोंकीत जागजागीं धरणें देऊन बसत. राजानें कितीहि द्रव्य दिलें तरी तें त्यांना पुरेसें न वाटतां त्यानें आणखी द्यावें असें त्याना वाटे. त्यांच्या मनात त्याच्याविषयीं प्रेम किंवा आदर मुळीच नव्हता. ते पदोपदीं त्याचा अवमान करीत. मरण्यासाठीं तीर्थवासाला निघालेल्या रोगग्रस्ताला त्याचे सावकार कर्जाच्या फेडीसाठीं अडवेनात, तसे ते निर्लज्जपणें त्याला अडवून पैसा मागत. ८९०. स्थानपाल किंवा मंदिरातील पुरोहित, यानीं सुद्धा प्रायोपवेशनें आरंभिलीं व त्याच्याकडून अडवून सुवर्ण पात्रादिकाचे तुकडे करून वाटवून घेतलें. नगरांतील लहानथोर सारे लोक प्रक्षुब्ध सागराप्रमाणें उद्दाम झाले त्याचें त्याला समाधान करतां येईना. एके दिवशीं सकाळीं इतर सैनिक राजद्वार अडवून बसले असतांना, सारें नगर प्रक्षुब्ध झाल्याचें ऐकून, त्यानें नगराधिकारी जनक याच्याकडे नगरात फिरून त्यांना शांत करण्याविषयीं निरोप पाठविला व तो स्वतः बाहेर निघून जाण्याला सवड पाहूं लागला त्यानें त्या सैनिकांची दानमानादिकाच्या द्वारें समजूत काढली व तो अंतःपुरातील स्त्रियांना बरोबर घेऊन राजवाड्यांतून प्रवासाच्या तयारीनें स्वार होऊन वाड्याच्या अंगणातून— लौकिक वर्ष ४१९६–ई. स. ११२० च्या मार्गशीर्ष वद्य षष्ठीला, तिसरें प्रहरीं बाहेर पडला, तोंच ५ुद राजवाड्यांत चोरांनीं लुटालूट माडली तो राज्य सोडून निघालेला पाहतांच, कोणी सैनिक शोक करूं लागले, कोणी आरडाओरड चालविली आणि कांहीं त्याच्या नोकरांना लुटूंलुबाडूं लागले! निघताना तो लज्जित, क्रुद्ध व भयभीत, झालेला होता. त्याच्या

बरोबर पाच सहा हजार सैनिक निघाले त्यांतून पुष्कळसे लोक पदोपदीं घोडे व इतर सामान घेऊन, त्याला सोडून जात होते. त्या रात्रीं तो प्रतापपुराला पोहोंचला. तोंवर त्याच्या जवळ थोडेसेच लोक उरले होते. ८२०.

तेथें तिलक पूर्वींच पुढें गेलेला, त्याला येऊन भेटला. तेव्हा राजानें त्याला बंधु-प्रेमानें वागवून, त्याच्याजवळ पुष्कळसा शोक केला. नंतर, तोच दगा न देवो, म्हणून दुसरेंच दिवशीं तो ...कपुराला, त्याच्या घरीच जाऊन उतरला. तेथें त्यानें स्नानभोजनादि उरकल्यावर, तिलकाच्या मार्फत सैन्यभरती करण्यासाठीं क्रमराज्यांत जावें, पुनः जय मिळविण्याविषयीं खटपट करावी, असे त्याच्या मनांत आलें. पण तिलकानें लढण्यास तयार असलेले व.ल्याणवाड वगैरे डामर, यांना गुप्तपणे आणविलें. त्यामुळें राजाचें धैर्य व लढण्याची इच्छा नष्ट झाली व तो आपोआप तेथून पुढे रवाना झाला. या युक्तीनें तिलकानें त्याला आयतेंच आपल्या घरातून काढले.

मार्गांत राजाला कांहीं डामर दस्यूंनीं अडविलें. तेव्हा त्यानें द्रव्य देऊन त्याचा अटकाव दूर केला. तो पुढे रवाना होतांच तिलकानें त्याचा साथ सोडला पण त्याचा बंधु आनंद हा स्वामिभक्तीनें एक मुक्काम त्याच्याबरोबर राहिला. वाटेत राजाचें कांहीं सेवक त्याला सोडून गेले आणि पुनः दस्यूंनीहि त्रास दिला, तेव्हा कांहींना द्रव्य देऊन व कांहींना धाक दपटशा देऊन, त्यानें पिटाळून लावले. त्याचें आयुष्य अवशिष्ट असल्यानेंच तो सुखरूप निघाला.

गगनचुंबी वृक्ष व प्रचंड पहाड यानीं व्याप्त अशा गहन अरण्याचें रक्षण करणाऱ्या सिंहाचीं नखें कालांतरानें पोराच्या गळ्यात बाधलीं जातात. जे हत्तीचे दात त्याला दुसऱ्याबरोबर लढतांना प्रहार करण्याला साधन होत असतात, त्यांनाच फासे बनून द्यूतकाराकडून द्यूत खेळतांना इकडे तिकडे फेंकलें जाणें सोसावें लागतें. शौर्याला कायमचें वैभवस्थान क्वचितच लाभत असतें. कोणाचेंहि पराक्रम, औदार्य, यश, प्रज्ञा इत्यादि गुण, या संसारामध्यें स्थिर राहूं पावत नाहींत. अशीच या संसाराची चाल विचित्र असते. सूर्य सुद्धा प्रतिदिवशी खूप प्रखर व पुनः मृदु होत असतो तेव्हां माणसांच्या प्रभावाची कथाच काय ? त्याचा विश्वास कोणी ठेवावा ? ८३०.

शत्रूनें अ...लिका गांव जाळला होता. तिकडे दृष्टी न देतांच तो लोहरगिरीवर गेला. त्याचे सैनिकहि एक अक्षर बोलले नाहींत, पण त्यांना मनातून भारी क्रोध आला होता. तेथें त्याला बायका मुलांना पाहण्या भेटण्याची सुद्धां लाज वाटे तो अहोरात्र पलंगावर तडफडत पडून राही. तो दिवसां सुद्धां दिवे लावावे लागणाऱ्या अंधेऱ्या दालनांतून बाहेर पडत नसे. दाक्षिण्यामुळें अनुयायांना भोजनसमयीं मात्र त्याला तोंड दाखवावें लागे विलेपन, अश्वारोहण, नृत्यगायन, सुखालाप, आनंददायक समागम, हें सर्व त्यानें वर्ज केले होते. मूर्खपणा, तारतम्य, तैक्ष्ण्य, द्रोह, दगा वगैरे प्रगट केलेल्या प्रत्येक माणसाचें स्मरण करकरून संतापानें तो तत्संबंधीं हकीकत, रात्रीला एकांतात असे. देशत्याग करून त्याला

साथ दिलेल्या लोकांच्या दाक्षिण्याची कदर व प्रशंसा करून, त्या श्रीमान राजानें त्यांची सप्रेम वाहवा केली आणि त्या त्यांना चांगलीं इनामें दिलीं.

तो निघून गेल्यावर सारे मंत्री सैन्यासह जुन्या राजवाड्यापुढें जमले. नगराधिकारी जनकसिंह यानें इतर मंत्री, स्वार, सामंत, तंत्री व नागरिक यांच्याशीं पूर्वींच संधान बांधलेलें होतें. तो त्यांचा प्रमुख बनला. भिक्षाचरांचे मल्लकोष्ठादिक दोस्त व आप्त, त्याच्याकडे येत जात होते. त्यांनीं विश्वासासाठीं जनकसिंहाकडून त्याचा नातू व पुतण्या, यांना आपल्याकडे ओलीस मागवून घेतले. त्या अराजक स्थितींत त्या वेढा पड-लेल्या नगरांतील सर्व लोकांना हुस्सल राजा निघून गेल्यानंतरची ती रात्र, सर्वभूत भयंकर गेली. बरींच निराश्रित माणसें मारलीं गेलीं, कित्येक लुटले गेले व कित्येकांचीं घरें दारें जाळलीं गेलीं.

दुसरे दिवशीं भिक्षाचराचा समारंभानें नगरप्रवेश झाला. त्यावेळीं त्याच्याबरोबर पुष्कळसे स्वार होते आणि त्याच्या सैनिकांनीं सर्व नगरमार्ग रोंकून टाकले होते. त्या सैनिकांची आरडाओरड सारखी चालू होती. भिक्षाचरानें सिंदुरारुण कुंकुम चर्चिलें होतें. त्यानें हातीं धरलेली कदलीदलतुल्य तरवार, सारखी चमकत होती. त्याच्या सतेज देहा-कडे कोणाला पाहवत नव्हतें. त्याच्या दर्शनानें लोकांना भुजगेंद्र दर्शनाप्रमाणें भय व कौतुक वाटे. त्याचे तारुण्यामुळें सतेज व वीरपट्टानें थोडेसे आवळलेले काळेभोर केंस, जयश्रीच्या बंधन शृंखलेप्रमाणें, त्याच्या पाठीवर मोकळे सुटले होते. त्यानें कानांत दैदीप्य-मान कुंडलें धारण केलीं होतीं. त्याची दृष्टि स्निग्ध धवल व फांकलेली होती. दाढी व मिशा यांना सुरेख चंदन लावलेलें होतें. लाल अधर आणि श्रीसान्निध्य, यांना अधिकच खुलणारें त्याचें मुख पाहून शत्रूंना सुद्धा त्याच्याविषयीं आवड व आदर वाटता. त्याच्या नाचणाऱ्या अश्वाच्या आयाळीचे, त्याच्या हातांतील नागव्या तरवारीच्या धारेंत, विलस-णाऱ्या श्रीवर जणों चामर ढळत होतें. तो पदोपदीं घोडा आडवा करून सामंतांनीं केलेली स्तुती ऐकत होता. न्याडशा मुलामागील धात्रीप्रमाणें मल्लकोष्ठ त्याच्याजवळच मागे राहून त्याला माहीती करून देत होता. 'हा आपल्या वडिलांना फार प्रिय होता.' 'याच्या मांडीवर आपलें लालन झालें.' 'हा या राज्याचा जणों आधारस्तंभ व पाया आहे, असें तो निरनिराळे वीरपुरुष दाखवून' त्याचें वर्णन करीत होता. ८५०.

तो प्रथम कन्यालाभासाठीं जनकसिंहाच्या घरीं गेला व नंतर राजलक्ष्मीच्या प्राप्ती-साठीं त्यानें वाड्यांत प्रवेश केला. त्याच्या घराण्याला सोडून गेलेल्या राजलक्ष्मीचें त्यानें पुनरुत्थापन केलेलें पाहून, भोळ्या भाबड्या स्त्रियांनीं आपल्या गर्भस्थ अर्भकांविषयीं विलक्षण उमेदी मनांत आणल्या तर आश्चर्य काय! भिक्षूचें हें विलक्षण चरित्रचित्र पाहून महत्वाकांक्षी माणसांना, शत्रूच्या चित्राची सुद्धां भीति वाटली तर नवल नाहीं. हुस्सल राजा प्रतिकुबेर संपत्तिमान होता. तो मागें सोडून गेलेला संपत्तीचा अंश याच्या कम-णुकीचें साधन झाला. राजकीय भांडागारांत व तबेल्यांत अश्व, कवचें, आयुधें, शाले

वगैरे विपुल सांठविलेली होतीं. त्यांची भिक्षाचर राजा, उन्मत्त उच्छृंखल मंत्री व दस्यू-डामर-यानीं आपसांत वाटणी करून घेतली, त्या लोकांवर कोणच्याहि प्रकारचा दाब उरलेला नव्हता. त्या नगरांत त्यावेळीं, गिरिगव्हरांतील पिशाच्यांच्या गर्दीला स्वर्गीय भोगांचा आस्वाद मिळावा, तशी त्या लुटारूंची स्थिति झाली होती. वास्तविक त्यांची योग्यता गांवढळ भोगप्राप्तीची होती. भिक्षाचर राजाभोंवतीं नेहमीं तसले ते गांवढळ व उत्सवप्रसंगींहि लाब रुंद घोंगडी पांघरणारे लोक असत. यामुळें राजसभेत-दरबारात-त्याची फारशी शोभा रहात नसे. त्याच्या अद्भूत प्रादुर्भावामुळें डामरांनीं तो अवतारी आहे, असेंहि प्रसिद्ध केले होतें. राजकार्यांत तो पदोपदी चुके, ती कार्यें दुसऱ्यानें केलेलीं देखलि त्यानें कधीं पाहिलेलीं नव्हती. दुसऱ्याच्या हातून क्रिया घडलेली न पाहिलेल्या वैद्याची औषधोपचारासंबंधांत, नेहमीं फजीती होते. तशी त्याची स्थिति होती.

जनकसिंहानें त्याला आपली पुतणी दिल्यावर कंपनेशानेंहि त्याला आपली कन्या दिली व दोघानी त्याचा पक्ष स्वीकारला.

राजपुरीवाल्याचा कटकवारिक अमलदार झुंग, याला पादाग्राचा अधिकार मिळाल्यावर त्यानें मालकाचे हितसाधन सोडून स्वतःची तुंबडी भरणे सुरू केले. सर्वाधिकारी बिंब हाच खरा राज्याधिकारी असून, भिक्षाचर निवळ नांवाला राजा होता. बिंबानें आपली सारी सत्ता वेश्यांच्या हातीं सोंपविली होती. तो भारी हलकटपणानें वागे. तरी सज्जन दुर्जनाची त्याला पारख होती दुर्यकाचा सापत्नबंधू ज्येष्ठपाल हा विलक्षण बलवान होता. तो राजाच्या अंतर खासगींतील मंडळीत प्रमुख झाला त्या राजाचा आजा हर्ष याच्या वळच भूतिमिश्र वगैरे बरच लोक, भृंगाप्रमाणें त्याच्या राजलक्ष्मीरूपी कमलावर लोलुप झाले राजा साधा भोळा, मंत्री चालढकली आणि दस्यू-डामर-दाडगे, अशा स्थितींत ती नवीन कारकिर्द मूळापासूनच पतनशील झाली होती. नित्य नवीन युवती व मनधुराद स्निग्ध खानपान, याचा उपभोग व सुखानुभव घेत पडलेला भिक्षाचर राज्यकार्याकडे कशाला ढुकून पाहील? त्याच्यामुळें तो महत्त्वाकाक्षाहीन व दिवांधसा झालेला, प्रावृट कालीन मेघमालेप्रमाणें भारावलेला व पतनोन्मुख झाला होता. त्याचे मित्र त्याला राजसभेत जबरदस्तीनें ढकलीत. तेव्हां तो तेथे मद्यप्राशनानें सुस्त होत्साता पेंगू लागे. कोणी सचिव, दर्पानें किंवा अनुकंपेनें त्याला टोंचून बोलला तरी, त्याला चेव अथवा राग येत नसे. उलट तो भोळसरपणानें त्याला वडिलाप्रमाणें मानून त्याची मनधरणी करी. भोंवतालचे हलकट व वश्याची उष्टी चाटणारे विट, त्याच्याकडून बाजारांतील अशिक्षित गर्भदासासारखें वर्तन करवीत. ८७०.

त्याच स्थैर्य पाण्यावर ओढलेल्या लकीरीप्रमाणें आणि भाषण अगदीच अधिकारशून्य असल्यामुळें, त्याच्या प्रेमातले लोक सुद्धां सर्व कामांत त्याच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करूं लागलें सचीवांनीं विचारलेल्या प्रश्नांचा नुसता तो पुनरुच्चार करी. त्याच्या तोंडातून कांहींच उत्तर बाहेर निघत नसे. जणों काय तो आंतून अगदींच पोंकळ होता. त्याचे नीच

स्वीव त्या खुळ्याला घरीं नेऊन मेजवान्या देत व पोरक्या श्रीमान पोराला धूर्त व लफंगे लोक लुटतात व नागवितात, तसे ते त्याला लुबाडीत असत. एखादी घोडी वळू घोड्या-पुढील चंदीचारा ओढते, तद्वत शिंबाची पृथुनितंबिनी पत्नी त्याच्याकडे पोहोंचून, त्या प्रियकर यारापुढून घास काढून घेत असे. ती आपल्या पतीची नजर चुकवून त्याला डोळे मारी आणि नेत्र, भृकुटी, कुच व कक्षादिकांचे विक्षेप करून, त्याचे चित्त भ्रमवून सोडीत असे.

पृथ्वीहर व मल्लकोष्ठ यांची आपसांत भारी चुरस होती. आपल्या तीव्र तंटयांनींहि ते राजवाडा दणाणून सोडीत. राजानें स्वतः दोघाच्याहि घरीं जाऊन, त्यांची समजूत पाड-ण्याचा प्रयत्न केला आणि त्यांच्या मुलांमध्यें शरीरसंबंधहि जुळविला. तरी ते दोघेहि महत्त्वाकांक्षेच्या पायीं वेडे झालेले, आपसांतील द्वेष व रोष सोडीनात. पुढे राजानें पृथ्वी-हराच्या कुटुंबांतली एक मुलगी केली. त्याचा मल्लकोष्ठाला क्रोध आला व तो उघडपणे राजाचा पक्ष सोडून गेला.

तसेंच एकाक्ष जनक हा राजाचा श्वशुर होता तरी, तो आप्तपणा विसरला व त्यानें राजाशीं द्रोह चालविला आणि आजानंदादि ब्राम्हण मंत्र्यांना बेदिल केलें. या भांडणांत राजा तटस्थ राहिला. तो दुष्ट, द्रोही, दुर्बुद्धी, अशा सेवकांच्या तंत्रानें वागत असल्यामुळें, त्याचा सारा व्यवहार विस्कळित होऊन त्याला लोक भारी शिव्याशाप देऊं लागले. ८८०.

डामर सर्वांचे धनी असलेले, आणि विप्रस्त्रियांना श्वपाकांच्या हातून विटंबना पावावी लागत असलेली, अशा त्या काळांत त्या प्रजेला कोणचें म्हणून दुःख व अडचणी सोसाव्या लागल्या नाहींत! तेथें अराजक अथवा बहुनायक स्थिती झालेली तेव्हां सहजच सर्व व्यवहारपद्धति सुटून गेली होती. जुन्या दीनारांचें चलन बंद पडून नवे भिक्षूचे दीनार चालू झाले. ते शंभर जुन्या दीनारांना ऐंशीं मिळत.

पुढें भिक्षाचर राजानें वेडेपणानें लोहर येथें सुस्सलावर हल्ला करण्यासाठीं, बिंबाला सैन्य देऊन राजपुरीच्या रस्त्यानें रवाना केलें. त्याच्याबरोबर सोमपालहि गेला. त्यानें तुरुष्क सरदार—सालार-बिस्मय-इस्माईल-याच्या हाताखालच्या तुरुष्क सैन्याची मदत घेतली. प्रत्येक तुरुष्क स्वार, ' मी आपल्या या हातांतील पाशानें सुस्सलाला ओढून आणीन, ' असें ऐटीनें म्हणत होता. काश्मीरी, खश, व म्लेंच्छ सैन्याचा हा संघ वाटेल त्याचें उत्पाटण करील, असें कोणालाहि वाटलें असतें.

शिंब जातांच भिक्षाचराच्या मागचें अंकुश निघालें व त्यानें कोणचा एक म्हणून अनाचार करावयाचें बाकी ठेवलें, असें नाहीं. बिंबाची जारिणी पत्नी-अवरुद्धा-वेश्या-त्याला आपल्या घरीं नेऊन त्याला खानपान व भोग देऊन, यथेच्छ रमवीत असे. तिच्या समागमामध्यें त्याला राजकार्याची पर्वा उरली नाहीं. तो लौकरच नाश पावणार होता. तेव्हां त्यानें लोकवार्तांची तरी कां पर्वा करावी? ८९०. तिच्या घरीं तो निर्लज्जपणानें

ग्राम्य कामुकाप्रमाणें आधाशासारखे यथेच्छ खातपीत आणि कुंभ कांस्यपात्रें व इतर वाद्यें, वाजवीत बसे. हळूंहळूं लोकांच्या मनांतील त्याचें महत्त्व नष्ट झालें. पुढें संपदा संपल्यावर त्याला वेळेवर खाण्यापिण्याला मिळण्याची सुद्धां पंचाईत पडूं लागली.

हुस्सल राजा अनन्वित लोभी व क्रूर म्हणून, लोक त्याला निंद्य व नकोसा मानीत. तेच आतां त्याची प्रशंसा करूं लागले. ज्यांनीं बेदिल होऊन त्याचें धन, मान व राज्यपद, यांचा नाश केला होता व जे त्याच्याशीं अत्यंत बिथरले होते, तेच लोक आता त्याच्या पुनरागमनाविषयीं तितकेंच उत्सुक झाले होते. या गोष्टी आमच्या प्रत्यक्ष पाहण्यांतल्या आहेत. तरी, लोक त्याच्यावर इतके रुष्ट कां झाले होते व पुनः त्यांचा तो राग शांत कसा झाला, याचे अद्यापि आम्हांला राहून राहून आश्चर्य वाटतें! बहुतेक लोक सामान्यतः पशुवृत्ती असतात. त्यांना रुष्ट किंवा प्रसन्न होण्याला फारसा वेळ किंवा कारणहि लागत नाहीं.

मल्लकोष्ट, जनक वगैरेनीं दूत पाठवून, राज्य सोडून गेलेल्या सुस्सलाला, ते मिळविण्याविषयीं पुनः खटपट करण्याला सुचविलें पुढें तिलकाच्या लोकांनीं 'ऊक्षोसुव अग्रहार लुटला. तेव्हा तेथील विप्रांनीं राजाविरुद्ध प्रायोपवेशन चालविलें. इतर अग्रहारांतील विप्रहि विजयेश्वरीं जमल्यावर, राजानवाटिकेंत प्रायोपवेशन सुरूं झालें. तसेंच ओजानंदादि प्रमुख विप्रांनीं चिथविलेल्या विप्र परिषदांनींहि गोकुल येथें तोच प्रकार चालविला. ९००. अशा तऱ्हेचा पारिषद्य पुरोहितांचा जमाव यापूर्वी कधीं पाहण्यात आला नव्हता.

या प्रायोपवेशामध्यें, गोपुलाच्या प्रागणात सर्वत्र छत्र चामरें लावलेल्या पालख्या किंवा रथ, यांच्यांतून इष्टदेवताच्या मूर्तींच्या मिरवणुकी मोठ्या समारंभानें काढण्यांत येत होत्या व तो सर्व प्रदेश कांस्यताल व वाहलादि वाद्याच्या गजरानें दुमदुमून गेला होता. राजदूत तेथें जमलेल्या लोकांचें सांत्वन करीत असताना, ते मोठमोठ्याने बोलत व ओरडत, गर्वानें म्हणत होते कीं, त्या लंबकुर्चाच्या—हुस्सलाच्या-शिवाय आमची गती लागणें शक्य नाहीं. त्यावेळीं सर्व लोक हुस्सलाला थट्टेनें लंबकुर्च—लांब दाढीवाला—म्हणत व त्याला आपल्या हातातील एक बाहुलें समजत होते. प्रायोपवेशनें पाहण्यासाठी प्रत्यही पुष्कळसे पौरजन जात असत. त्यांच्याशीं त्या पारिषद्यानीं कोण कोणचे म्हणून बेत केले नाहीत?

ते पारिषद्य व पौरजन यांना, न जाणो राजा केव्हां येऊन हल्ला करील, असें भय वाटत होतें. म्हणून ते त्याच्याशीं धीटपणें लढण्याला सज्ज असत.

त्या वेळीं सारें नगर जनकसिंहाच्या कच्छपीं होतें. त्याच्या मतें, ते सारे सुस्सल राजाचा परत स्वीकार करण्याला तयार झालेले होते. तिलकानें भिक्षाचराला 'सर्व डामर ठार मारवा,' असें म्हटलें. पण त्या वेळीं भिक्षाचर न्यायप्रवण असल्यानें त्यानें तें मान्य केलें नाहीं. ही गोष्ट पृथ्वीहर व इतर लवन्य सरदारांना राजाच्या तोंडून

कळली. तेव्हां त्यांना राजाचा विश्वास आला पण ते तिलकाला भिऊ व पाण्यांत पाहूं लागले. ९१०.

प्रयागाचा भाचा लक्ष्मक याच्यावर राजा रागावला व त्यानें त्याला कैद करविण्याचा विचार केला, तेव्हां तो पळून सुस्सलाकडे गेला पुढें भिक्षाचरानें नगरांत जाऊन त्याच्या मते व्यर्थ बेदिल झालेले, नागरिक जमविले व त्यानें त्यांची समजूत पडेल असे भाषण केले पण लोकांनी दुष्टाव्याने ते सर्व व्यर्थ दवडलें. बंडखोरांपुढे कांहीं उपाय चालत नाहीं.

तोंवर इकडे सोमपाल, बिंब वगैरे मिळून लोहर येथें असलेल्या सुस्सलाशीं लढण्यासाठीं पर्णोत्स येथे पोहोचलें. कालिंजरच्या कल्हाच्या कुलांतील पद्मरथ राजा सुस्सलाचा आपल्या कुलाशी असलेला पूर्वापार संबंध स्मरून, त्याच्या महाय्याला गेला. पुढे वैशाखी त्रयोदशीला प्रबल प्रतिस्पर्धी आणि मानधन सुस्सल यांची पर्णोत्सजवळ विलक्षण व घोर लढाई झाली. ती स्वतः पाहिलेल्या लोकांनीं तिचें केलेलें वर्णन अद्यापि प्रसिद्ध आहे. त्यावेळीं सुस्सलानें त्या रणरूपी प्रखर अनलांत, आपल्या झालेल्या अवमानाचें प्रथम क्षालन केलें या पुढे त्यांच्या अंगीं त्याचे पूर्वीचें विलक्षण शौर्य स्फुरण पावलें व त्या योगाने तो जणों उतरलेला पुनः पूर्ण तेजाला चढला. मृगेंद्र परत येऊन वनभूमीला पूर्ववत आक्रमण करून टाकतो, तशी त्यानें ती समरभूमी गर्जवून सोडली. त्या पराक्रमी वीराने थोडयाच अवकाशात त्या तुरुष्क स्वारांकडून त्यांनी आणलेले पाश टाकून, त्यांना काळपाशाची गाठ घालून दिली. त्या लढाईत त्यानें सोमपालाच्या मामाला वितोला नदीच्या तीरावर वेताळाप्रमाणें ग्रासून टाकले. (वितोला हल्लींची वितर नदी, सुद्रन प्रांतातून येऊन तौशी=तौसी नदीला मिळते ) ९२०. फार काय सांगावे–त्याने आपल्या लहानशाच फौजेनें त्या शत्रूच्या अफाट सैन्याला गारद करून उधळून दिलें पण हा उत्कृष्ट पराक्रम एका मालकाविरुद्ध व दुसऱ्याच्या वतीनें लढणाऱ्या व पराभव पावणाऱ्या काश्मीरी लोकांनीं कांहीं दाखविला नाहीं.

सोमपाल तुरुष्कांसह मागे फिरतांच त्याच्या पक्षाचे काश्मीरी लोक निर्लज्जपणे बिंबाला सोडून सुस्सलाला मिळाले. त्या लोकांनी आदले दिवशीं ज्याच्या विरुद्ध धनुष्यें ताणलीं होतीं, त्याच प्रभूपुढें दुसऱ्याच दिवशीं मस्तकें नमविण्याची त्याना कांहीच लाज वाटली नाहीं. नंतर तो मिळण्यासाठीं पुढे आलेले नागरिक व डामर यांच्यासह दोन तीन दिवसात काश्मीराकडे जाण्याला निघाला. सहदेवाचा पुत्र कल्हण यानें पुढें वाढून, क्रम राज्यांतील डामर जमा केले. पूर्वी सुस्सलाच्या सैन्यांतून बिंब हाच प्रथम भिक्षाचाराकडे मिळाला होता. तोच आता भिक्षाचराला सोडून परत सुस्सलाला मिळाला.

जनकसिंहाच्या पक्षांतील इतर मंत्री व तंत्री ही निर्लज्जपणें परत सुस्सलाकडे पोहोंचलेले दिसत होते.

भांगील नांवाच्या उजाड बागांत कांडीलक्षेत्र येथें जन्मलेला एक सुलक्षणी

सैनिक ठाणें जमवून बसला होता त्यानें सुस्सलाकडे जाणाऱ्या लोकांना न अडवितां पुढें जाऊं दिलें होतें. २३७. त्याचें शासन करण्यासाठीं भिक्षाचर पृथ्वीहरासह निघाला होता. त्याचा पराभव केल्यानंतर त्यानें रागारागानें जनकसिंह, सुस्सलाकडे जाण्याची तयारी करीत होता, त्याला मारण्याचा बेत केला याचा सुगावा लागतांच त्यानें नगरातील स्वार व तंत्री एकत्र करून भिक्षूविरुद्ध उठावणी केली. तो गादी बळकावतो असे समजून भिक्षू पृथ्वीहरासह मोठ्या त्वरेनें नगराला परत आला जनकसिंह युद्धाच्या तयारीनें सदाशिवाच्या मंदिरापुढील पुलावर आपल्या लोकांनिशी सज्ज राहिला त्याच्याशी समेट करण्याचा भिक्षाचराकडून यत्न झाला पण तिकडे त्यानें दुर्लक्ष केलें. त्याचे लोक कांहीं वेळ निकरानें लढले. पराजयाची भीति त्यांना मुळींच वाटत नव्हती. मुहूर्तभर चांगलेंच रण माजलें पण पृथ्वीहरानें आपला पुतण्या अलक याच्यासह दुसऱ्या एका पुलावरून नदी उतरून त्यांच्यावर मागून माग केला तेव्हां ते पराभव पावले व तंत्री. स्वार, नागरिक सर्व पळाले. जनकसिंहहि रातोरात आपल्या आप्तांसह लहराला पळून गेला. सकाळीं भिक्षाचर व पृथ्वीहर त्याच्यामागें लागले. तसे ते निलाजरे स्वार व सैनिक पुनः त्याच्या पक्षाला मिळाले. पारिषद्य विप्रहि प्रायोपवेशन सोडून, देवाच्या प्रतिमा बगलेत मारून पळून गेले. त्यांतील कांहीं लोक रिकामे रथ व पालख्या राखीत राहिले. त्यांनीं प्रायोपवेशन बंद केल्याचें कळविलें. तेव्हां भिक्षाचरानें त्यांना छेडलें नाहीं. २४०. आपल्या चिप्पाड घोड्यावर बसून त्यांना ऐटींत दवडणारे तंत्री, आज जनकसिंहाच्या सैन्यात मिसळलेले, दुसऱ्या दिवशीं भिक्षाचराच्या फौजेंत मिळालेले पाहून, आम्हाला सुद्धां अद्यापि भारी नवल वाटतें आहे.

याप्रमाणें भिक्षाचराला पुनः राज्याधिकार प्राप्त झाला. त्यानें आपला मेव्हणा, तिलकसिंहाचा पुत्र, याला त्याच्या चुलत्याचें-जनकसिंहाचें-पद दिलें. तसा तो थोडे दिवस चमकला व लौकरच भिक्षूच्या त्या नूतन राज्यवैभवाबरोबरच अस्तंगत झाला. जनकसिंह गेल्याकर भिक्षाचराला प्रतिपक्षीयांचीं घरेदारें व अश्व वगैरेंचा नाश करण्याला चांगली संधी सांपडली.

तोंवर इकडे सुल्हण व लिव वगैरेंनीं पुष्कळशी फौज जमवून, तिलक वगैरेंचा हुष्कपुराजवळ पराभव केला होता. मल्लकोष्ठ, जनक व दुसरे सामंतसरदार, सैन्यासह सुस्सलाकडे पोहोंचले होते. त्यांनीं लहराच्या वाटेनें दोन तीन दिवसांत सर्व मंडल व्यापून, शत्रूला न कळत एकदम नगर गांठलें. नगरींतील बाजार व राजमार्ग यांच्यात कांहीं बेइमानी स्वार व सैनिक सुस्सलापुढें नुकतेच येऊन पोहोंचले होते. त्यांना त्यानें एकदम निर्भयपणें तोंड दिलें. तसेंच दुसऱ्या कांहीं लोकांना व स्वतःच्या पराभूत लोकांनाहि त्यानें खूप दटावलें. त्यावेळीं त्याचा चेहरा मोठ्या थोरल्या दाढीनें वेष्टिलेला होता. भ्रुकुटी वक्र झालेल्या, नेत्र कोपानें आरक्त व चंचल झालेले आणि नाकपुड्या फेंदारलेल्या होत्या, उन्हानें त्याचें शरीर काळवंडल्यामुळें तो प्रक्षुब्ध कालाप्रमाणें भासत होता. नगरवासी जन त्याला मोठ्यानें आशी-

र्वाद व धन्यवाद देत, त्याच्या मार्गात फुलें उधळीत होते. त्यांचें पूर्वीचें उद्दाम वर्तन लक्षांत आणून तो त्यांच्याकडे तिरस्कारानेच पाहात होता. ९५०. त्यानें आपलें कवच सहज एका खांद्यावर टाकलें होतें. त्याच्या शिरस्त्राणाखालून बाहेर पडलेले केस व त्याच्या भिवया यावर धुरळा उडालेला होता. तो ऐटीनें घोडा उडवीत आपल्या स्वारांसह चालला होता. त्याची म्यानांत असलेली तरवार त्याच्या बाजूला लटकत होती. बरोबरच्या स्वारांच्या हातांतील नागव्या तरवारींची सारखी रांग लागलेली होती पाहावें तिकडे त्याचे सैनिक सिंहनाद करीत फिरत असलेले दिसत होते. त्या आवाजांतच रण-भेरीचे प्रचंड ध्वनी मिसळले होते. अशा थाटानें सुस्सलानें लौकिक वर्ष ४१९७ ई.स. ११२१ च्या ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीला नगरांत पुनः प्रवेश केला. तावर त्याला निघून गेल्याला सहा महिने बारा दिवस झाले होते. राजवाड्यात पाय ठेवण्यापूर्वी त्यानें भिक्षूचा तपास करविला. त्याला लोकांनीं लवन्यांच्या बरोबर वितस्तेच्या कांठावर पाहिलें होतें. शत्रू नदीतीरावर पोहोचतांच तो पृथ्वीहरासह पळाला, पण पुढें दुसरे कांहीं लवन्य येऊन मिळाले. तसा तो परतला होता. सुस्सलानें त्याच्याशीं लढून त्याला पुनः पिटाळून लावले. त्या लढाईंत पृथ्वीहराचा एक आप्त सिंह हा तरवारींच्या वारांनीं जखमी होऊन पडला होता. त्याला पकडून घेऊन सुस्सलाने राजधानींत पुनः प्रवेश केला नुकत्याच पिटाळून लावलेल्या भिक्षूच्या उपभोगामुळे दूषित झालेली ती राजधानी, त्या मानी वीराला परोपभुक्त वेश्येप्रमाणें तिरस्करणीय वाटली.

पृथ्वीहर वगैरे मंडळीसह भिक्षू काश्मीर सोडून सोमपालाच्या अमलांतील पुष्याणनाड येथ गेला. ( पुष्याणनाड=हल्लींचें पुशियाण. तें ८३०० फूट उंचावर पीर-पंत्साल घाटाच्या दक्षिण बाजूला आहे. नाय=नाड–नाला. )

तो गेल्यावर सुस्सल राजानें सर्व डामरांना आपल्या पक्षाला मिळवून घेतलें त्यानें वट्टाचा पुत्र मल्ल याला खेडी येथील अधिकारावर व हर्षमित्र याला कंपनेश नेमलें. ९६०. पूर्वीचा अपकार ध्यानांत असूनहि देशकालाकडे नजर देऊन त्यानें पूर्वीच्या विरोधी लोकांवर तात्पुरती कृपादृष्टीच ठेवली. त्याला भिक्षूच्या संपर्काचा वाससुद्धां खपेना. म्हणून त्यानें भिक्षू बसलेल्या जुन्या सिंहासनाचे तुकडे करवून ते सेवकांना वाटले. अन्या-यानें मिळविलेली संपत्ती सोडण्याला डामर लोक तयार नव्हते. त्यांना त्या क्रूर राजाची फार भीति वाटत होती. यामुळें त्यांनीं आपला पूर्वीचा राजद्रोहाचा उपक्रम सोडला नाहीं.

इकडे राज्यभ्रष्ट झालेला भिक्षू त्याचा आश्रयदाता सोमपाल याच्याकडे रहात होता. तेथ त्यानें दानमानादिकांनीं पुनः सैन्य उभारलें. बिंब हा सहाय्य मिळविण्या-साठीं विस्मयाकडे गेला होता. विस्मयाला त्याच्या शत्रूंनीं कैद केलें होतें. त्याच्यासाठीं शौर्यानें लढत असताना बिंब मारला गेला. त्यावर भिक्षूनें बिंबाच्या पत्नीला निर्लज्जपणें आपल्या अंतःपुरांत घालण्याचें दुष्कर्म केलें.

पुढें शूर व प्रबल पृथ्वीहरानें थोड्याशाच सैनिकांसह वट्टाच्या पुत्रावर शूरपूर येथें

अवचित हल्ला केला व त्याला पळवून लावलें आणि भिक्षूला परत आणलें. त्याच्यासह तो मडव राज्यांतील डामरांना वळविण्यासाठीं गेला. तिकडील जय्य व मंख वगैरे डामरांना मिळवून घेऊन त्यानें कंपनेश हर्षमित्र याच्याशीं लढण्यासाठीं विजय-क्षेत्रावर चाल केली. तेथें लढाई झाली. तिच्यांत हर्षमित्राचें सैन्य मारलें गेलें व तो स्वतः भिऊन विजयक्षेत्र सोडून, अवंतिपुराला गेला. ९७०. तेव्हां विजय-क्षेत्रांतले व आसपासचे लोक घाबरून, चक्रधर विष्णूच्या मंदिरांत आश्रयाला गेले. तेथें राजपक्षीय सशस्त्र सैनिक व स्वार, बायकामुलें, पशू, धनधान्य वगैरेंची भारी गर्दी झाली होती. भिक्षूनें क्षितीजावेरी पसरलेले सैनिक, त्यांना लुटण्याला उत्सुक, होत्साते त्या लोकांच्या मागून तेथें चढून गेले व त्यांनीं त्या मंदिराला वेढा घातला.

त्या मंदिराला भक्कम लाकडाचा कोट व मजबूत दरवाजे होते. ते बंद केलेले होते. यामुळें वेढा घालणाऱ्यांना आंत शिरून आंतील लोकांना मारतां येईना.

बाहेरच्या लोकांत कटिस्थळीं येथील जनकराज नावाचा एक दुष्ट डामर होता. त्याचा एक कर्पुर नांवाचा वैरी आंत होता. त्याचा नाश करण्यासाठीं त्यानें मूर्खपणानें तो असलेल्या कोटाच्या भागाला आग लावली. तिच्यामुळें त्याच्या हातून निर्दयपणें किती तरी भयंकर प्राणिसंहार झाला. आग पेटत चाललेली पाहून, आंतील घाबरलेल्या मंडळींतून हाहाकार उठला. आगीच्या यममहिष-तुल्य भयंकर धुरा लोटाच्या तापानें व भयानें, घाबऱ्यांनीं अघाडया पिछाडया तोडल्या व ते त्या, सूईला सुद्धा रीघ नसलेल्या प्रांगणांतील गर्दींत उधळले. त्यामुळें पुष्कळच लोक ठार झाले. नंतर क्रूर पिशाच्याच्या पिंगट जटा, दाढी व मिशा, यांचें अनुकरण करणाऱ्या प्रचंड धुराच्या व ज्वाळाच्या लोटांनीं सारें व्योम व्याप्त झालें. थोडया वेळानें धूर नाहींसा होऊन अग्नीच्या प्रखर ज्वाळा, उन्हानें फुटलेल्या सुवर्णाच्या अभ्राप्रमाणें पिवळ्याजर्द दिसूं लागल्या. ९८० त्या आकाशांत संचार करणाऱ्या देवांच्या मस्तकांवरील लालभडक, फेटयाच्या सोगयासारख्या, फडकत होत्या. मोठाल्या लांकडां तुळवटांतील गांठी फुटून, चटचटा शब्द होत होता. तो प्रखर सूर्यतापानें वितळून वाहाणाऱ्या अभ्रगंगेच्या घोषा-सारखा ऐकूं येत होता. आगीनें त्रस्त झालेल्या प्राण्याची गगन-व्योम-मार्गांत भारी गडबड दिसूं लागली. घरटयातून बाहेर पडणें अशक्य होऊन जळत असलेलीं पिलें पाहून, वर आकाशांत पक्षी किलकिलाट करीत होते. माणसाचा घोर शोकाक्रंद चालला होता. बंधू, पती, पिते, पुत्र, यांना मिठ्या मारमारून निर्भर आक्रंद करणाऱ्या व भयामुळें डोळे मिटलेल्या अगणित स्त्रिया त्या आगींत जळत होत्या.

जे थोडे लोक त्या ज्वालांच्या तडाक्यांतून साहसानें बाहेर पडत, त्यांना क्रूर यमदूता-सारखे डामर ठार मारीत. त्या ठिकाणीं त्या वेळीं आगींत जळून मेल्याइतके, किंबहुना अधिकच, लोक गुदमरून व घामाघूम होऊन घाबरून मेले.

आंतले लोक सर्व मेल्यामुळें व बाहेरचे मारणारे तृप्त होतांच त्या जागीं एकदम साम-

सुम झालें. ज्वाला कमी झालेल्या अग्नीचा कड्कड्हा शब्द व जळत कढत असलेल्या प्रेतांचा सिमसिम शब्द मात्र ऐकूं येत होता. रक्त, मांस, चर्बी व मेद, यांच्या शेकडो धारा वाहूं लागल्या आणि जळत असलेल्या प्रेतांची घाण बरींच योजनें पसरली. ९९०. पूर्वी सुश्रवस नागाच्या कोपामुळें व आतां या दस्यु डामरांच्या बंडामुळें, असा, चक्रधराच्या मंदिरांत दोन वेळ भयंकर अग्निप्रलय झाल्यानें, जो भूतग्रामाचा घोर संहार झाला, तसा त्रिपुरदाह किंवा खांडववन दाहाच्या वेळींच कदाचित झाला असेल, तर नकळे. हा घोर प्रकार भिक्षूच्या सैन्याच्या हातून श्रावण शुद्ध महाद्वादशीला घडला. त्यादिवशी नागाच्या यात्रा भरतात व मोठा उत्सव होत असतो. त्या क्षणापासून भिक्षूचें भाग्य व राज्यलक्ष्मी कायमची नष्ट झाली. तेथें जी अगणित गृहस्थ मंडळी व त्यांचीं कुटुंबें जळालीं व मारलीं गेलीं, त्यामुळें आसपासच्या शेकडों पुरग्रामांतील घरें ओस पडलीं. तसल्या त्या घोर व हृदयद्रावक प्रसंगींहि तेथें नौनगर येथील मंख नांवाचा नीच व निर्घृण डामर कापालिकासारखा प्रेतांवरील मौल्यवान वस्तू शोधीत फिरत होता.

त्या नंतर भिक्षू विजयक्षेत्रावर उतरला व त्यानें नागेश्वराला पकडून त्याचे हालहाल करून, त्याला ठार मारलें. भिक्षू आपला आजा हर्षराजा याच्या मंडळांत असेपर्यंत त्यानें कोणचे म्हणून अनन्वित प्रकार व दुष्कर्में करण्याचें बाकी ठेवले नव्हतें तरी त्यानें आपल्या पित्याचा वध करणाऱ्याला असें हें देहांत प्रायश्चित्त दिलेलें पाहून मात्र सर्वांना समाधान झालें.

हर्षमित्र आपल्या पत्नीला सोडून पळून गेला होता. ती विजयेश्वराच्या मंदिराच्या पटांगणांत पृथ्वीहराच्या हातीं लागली.

हा घोर प्रजासंहार घडून येण्याला आपण कारण झाल्याबद्दल, सुस्सल राजाला फार वाईट वाटलें. पुढें तो शत्रूशीं लढण्याला निघाला. नंतर लौकरच जनकराज अवंतिपुराजवळ मारला जाऊन, आपल्या घोर पापाचे योग्य फल भोगण्यासाठीं नरकाला गेला १०००. ज्याच्यासाठीं पारलौकिक सुखाला अंतराय आणणारें पाप केलें जातें, तें शरीर किती सहज व सुलभापाय आहे, याचा खरा विचार लोक करीत नाहींत, हें किती विलक्षण आहे !

राजानें तिबाला सेनापती केलें आणि डामर लोकांना विजयक्षेत्र वगैरे ठिकाणाहून हुसकून लावलें. पृथ्वीहर मडव राज्यांतून निघून आपल्या शमाला प्रांतांत गेला. पण लक्ष्मकोष्ठानें त्याचा पराभव करून त्याला तिकडूनहि हांकून लावलें.

पुष्कळशीं प्रेतें वितस्तेंत वाहविलीं गेलीं व बरींचशीं, तेथून न काढता येण्याजोगीं होतीं, तीं चक्रधराच्या मंदिराच्या पटांगणांतच जाळून टाकण्यांत आलीं.

सिल्हणानें क्रमराज्यांत कल्याणवाड वगैरेंचा पराभव केला. तिकडे अनंताचा पुत्र आनंद हा द्वाराधीश नेमला गेला. प्रबल अशा पृथ्वीहरानें सुळावर दिला गेलेल्या

सिंहाचें प्रेत काढून बरोबर घेतलें तो निघून जात असतांना त्याची शिबिका तीरावर जनक-सिंह वगैरें बरोबर लढाई झाली.

या काश्मीरी मंडलांत भाद्रपद महिन्यांतील एका दिवशीं मंडळी मृतांच्या अस्थि घेऊन तीर्थाला रवाना होतात. तेव्हां चोहोंकडून स्त्रियांचा शोकाक्रोश ऐकूं येत असतो. त्या प्रकार पृथ्वीहराशा चाललेल्या लढाईच्या प्रत्येक दिवशीं साऱ्या नगरांत चालत होता. ( भाद्रपद शुद्ध अष्टमीला पूर्वीच्या बारा महिन्यांत मरण पावलेल्या काश्मीरी-ब्राह्मणांच्या अस्थि, हरमुकुट नावाच्या हिमाच्छादित पर्वत शिखराखालीं असलेल्या गंगा सरोवराच्या तीर्थयात्रेच्या प्रसंगीं तेथें नेऊन टाकण्यासाठीं नेतात. ही चाल अद्यापि सुरू आहे. यात्रेकरू शुद्ध चतुर्थीला निघतात. त्या दिवशीं मृताच्या घरीं शेजारच्या स्त्रिया जमून पुष्कळसा शोकाक्रोश करतात. )

यशो राजाचा शालक शूर असा श्रविक देशांतराहून परत आला. त्याला राजानें खेरी येथें द्वाराधिकारी नेमलें. त्यानें लवन्याविरुद्ध किंवा लवन्यांनीं त्याच्याविरुद्ध कांहीं खटपटी न करता, ते परस्पर अंतस्थ मित्रत्वानें वागत होते. १०१०.

आश्वयुज महिन्यांत राजा पुनः शमाला प्रांताकडे गेला असतांना, मनिमुष, नांवी शत्रूनें त्याचा पराभव केला. युद्धकलेच्या नित्याभ्यासानें भिक्षाचराचें युद्धनैपुण्य-विशेष वाढलेलें असल्यानें, त्यानें तेथें उत्तम पराक्रम गाजविला सुस्सलाचे सैनिक अवचित भयंकर पर्जन्यवृष्टीमुळें हैराण झाले असतांना, त्यांच्यांतील टुक्क नावाचा ब्राह्मण व इतर लोक, यांना भिक्षू व पृथ्वीहर यांनीं ठार मारलें. त्या लढाईत दोन्हीं पक्षांकडे पुष्कळ बलवान लोक होते. पण भिक्षू रणांगणात संचार करीत असतांना, त्याला तोंड देण्याजोगी कोणाहि वीराची प्राज्ञा नव्हती. या साऱ्या युद्धांमध्यें भिक्षाचर व पृथ्वीहर या दोघांच्या जवळ कादंबरी आणि पताका नांवाच्या दोन उमद्या घोड्या होत्या. त्या जर्दा व पांढुरक्या रंगाच्या होत्या. या लढायांमध्यें पुष्कळसे घोडे मारले गेले, पण त्या घोड्यांना कधीं जखमा झाल्या नाहींत, किंवा त्या कधीं थकल्या भागल्या नाहींत.

सैन्य संकटात असताना त्याचें परित्राण करणारा, स्वतःची प्रौढी कधी न मिरविणारा, परिश्रमाची पर्वा न करणारा, व हवेतसे क्लेश सहन करणारा, भिक्षाचराच्या जोडीचा एकहि वीर नव्हता.

सुस्सलाचें सैन्य उधळलें तर त्याला सांवरणारा कोणी नसल्यामुळें, त्यांच्यांतील पुष्कळसे लोक मारले जात. भिक्षाचररूपी गजेंद्र हा डामर सैनिक व नवीन भरतीचे शिपायी, यांना पराजयाच्या प्रसंगीं हत्तीच्या छाव्यांप्रमाणें बचावीत असे. त्या दिवसांत पृथ्वीहराइतका दुसऱ्या कोणीहि धैर्य व जागरूकपणा दाखविला नाहीं. तो रात्रीं नेहमीं भिक्षाचराच्या शेजारीं निजे. १०२०. श्राद्धातील विश्वेदेवाप्रमाणें महाभट भिक्षाचर हा सर्व लढायांत आपल्या फौजेचा सर्वत्र व सर्वप्रकारें संरक्षक बनत असे. तो लढाईमध्यें नेहमीं खूप साहस करीत व आपलें अढळ धैर्य कायम राखीत असे. आपल्या अनुयायांपुढें तो आपल्या कृतीचें असें प्रदर्शन

करी की, ' मी हा प्रयत्न निवळ राज्यप्राप्तीच्या इच्छेमुळे करतो आहे असें नाहीं. माझ्या वडीलधाऱ्यांच्या कृतीला लागलेलें घोर अपयश धुवून काढण्यासाठींच मी झटतों आहे. त्या प्रजापालकांना अखेरच्या प्रसंगीं कोणी परित्राता उरला नव्हता, म्हणून त्यांना असा परित्राता असलेल्या लोकांचा हेवा वाटणें साहजिक होतें. त्यांना आपला नष्टांश झाला असेंहि वाटत होते. या विचारापायींच मला इतके कष्ट सोसावे लागत असूनहि, मी दृढनिश्चयानें हें काम हातीं धरलें आहे. मी जसे दररोज दुःख पावतों आहे, तसेच तें मी माझ्या दायादांनाहि देतों आहे. वेळ आल्यावांचून कोणीहि मरत नाहीं हें जाणणारा, महत्त्वाकांक्षी व साहसप्रिय गृहस्थ, कसा स्वस्थ बसेल ? कुटिल नीति अवलंबिलेली परिस्फुट झाली तर, ती आपलें कार्य साधण्याला कशी उपयोगी पडणार ? मी आर्ष मार्गानेंच चालण्याची प्रतिज्ञा केली आहे, तेव्हां ती बोलून दाखविण्यांत हरकत कोणती ? '

भिक्षूच्या उत्कर्षप्रवण पौरुषावरून डामरांना शंका वाटल्यामुळेच त्यांनीं त्याच्या प्रतिस्पर्ध्याचा—सुस्सलाचा—पूर्ता नाश केला नव्हता राज्यप्राप्तीपूर्वीं बहुतेक राजवंशी लोकांना दुसऱ्या राज्यकर्त्यांच्या वर्तनाचें अवलोकन करूनच हळूंहळू तद्विषयक शिक्षण मिळत असतें. पण भिक्षाचराला आपला पिता व आजा याचें काहींच ज्ञान नव्हतें. यामुळें तो गादीवर आल्यानंतर अगदीं मोहून व गुंगून गेला. १०३०. त्याला दुसऱ्या कोणच्या वेळीं राज्यप्राप्ती झाली असती तर, त्याला राज्यभ्रष्ट करण्याचा विचारच कशाला पुढे येतां आणि दैव तरी त्याच्याकडे वक्र व तिरस्काराच्या दृष्टीने कशाला पाहतें !

लवन्य लोकांची लबाडी त्याच्या लक्षांत आली नव्हती असें नाहीं, तरी तो समाधानात काळ काढीत होता. कारण आपला प्रतिस्पर्धी मारला गेल्यावर आपणाला पुनः राज्य मिळेल अशी त्याला उमेद होती.

ही दस्यूंची—डामरांची—मनाची स्थिति आपणाला पथ्याचीच आहे, असे सुस्सलाला वाटत होतें. जयप्राप्तीविषयीं उत्सुक होऊन, तो कुटिल नीति आणि पराक्रम, दोन्हींचा प्रसंग पडेल तसा, उपयोग करण्याला तयार होता. पूर्व वैर लक्षांत ठेवून, तो आपल्या पक्षाच्या लोकांचा विशेष परामर्ष घेत नव्हता. म्हणून ते लोकहि त्याच्यावर फारसा विश्वास ठेवीत नसत. यामुळें त्याला विजयप्राप्ती होत नव्हती. अशा या उभय पक्षांकडील भेदाभेदांत राज्याच्या सुस्थितिकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें. तेव्हा साहजिकच राज्याची स्थिती फारच खराब व शोचनीय झाली.

ज्याच्या संबंधामुळें वनांतील वृक्षराजींना, त्याच्या निग्रहाच्या कामांत व्यग्र असलेल्या वनचर व्याधाकडून आग लावून घ्यावी लागते, त्याच वनगजांकडून त्या वृक्षराजींना पुढें उन्मूलन प्राप्त होत असते, याला काय म्हणावें ? दुर्दैव हात धुवून पाठीस लागलेल्या लोकांना स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या कर्तृत्वानें कोणच्याहि चांगल्या गोष्टीचा लाभ होत नाहीं.

याप्रमाणे राज्यसत्ता वाटली गेली असतांना, अकस्मात् बर्फवृष्टि होऊन भिक्षूच्या सैन्याची दुर्दशा उडाली तशांतच सुस्सल राजानें तिला गांठून तिचा पराभव केला. तेव्हां भिक्षू व पृथ्वीहर पुनः पुष्याणनाड, येथें गेले आणि इतर लवन्यांनीं सुस्सल राजाला शरण जाऊन त्याला करभार देण्याचें कबूल केलें.

त्याचप्रमाणे शूर सेनापती सिब यांनींहि डामरांचा पराजय करून साऱ्या मडव राज्यांतील बंडावा नाहींसा केला. शत्रूचें इतपत शासन झाल्यावर सुस्सल राजाला थोडी उसंत मिळतांच त्यानें आपल्या पक्षांतील लोकांवर, पूर्वी दाबून ठेवलेलें वैर प्रगट केलें १०४०.

राजा आपणाला मारविणार आहे असे मल्लकोष्ठाला उल्हणाकडून कळतांच तो पळून गेला त्याला राजानें हद्दपार केलें द्वाराधिकारी अनंताचा पुत्र आनंद याला कैद करून त्यानें त्याची जागा राजवंशी प्रज्जी नावाच्या सिंधुरेशीयाला दिली. नंतर सुस्सल राजा विजयक्षेत्राला गेला. तिकडून परत आल्यावर त्यानें विश्वासू व इमानदार मंत्री सिब याला कैदेंत टाकलें. त्या राजाचा क्रोधाग्नि त्या राजसेवकाना जाळून टाकीत असताना तो पूर्व स्मरणरूपी महावाताने प्रज्वलित होऊन, त्यानें त्याचें क्षमारूपी जल, पार सुकविलें होते क्रोधावेशानें वेडावून जाऊन, त्या राजानें सिब व त्याचे बंधू सिंह व थकसिंह, या तिघांनाहि सुळीं देवविले नंतर त्यानें श्रीबकाला सेनापती केले तसेंच जनकसिंहाला कैद करून, प्रज्जीचा बंधू सुज्जी याला राजस्थानीय—न्यायाधीश—नेमले. यापुढें त्याचे सारे अंतरंगी व मंत्री परदेशीच राहिले. व त्याच्या बरोबर लोहर येथे पोहोचलेले तेव्हढेच स्वदेशी शिल्लक उरले. यामुळें सर्वच लोक त्याला भ्याले आणि त्यानी त्याला सोडून शत्रूचा आश्रय केला. राजधानीमध्यें शेकडा एखादाच कोणी क्वचित राजाचा आश्रित उरला होता. अशा प्रकारें त्यानें शांत झालेलें बंड या नव्या उपद्रवाच्या व अनर्थाच्या द्वारें जणों पुनः उपस्थित केलें तें काही पुन्हां सुधारलें किंवा शमन झालें नाही

एकाच्या अधिक्षेपानें दुसरेंहि भृत्य साशंक होऊं लागतात तसें अपराध घडला असूनहि, शहाण्या राजाला त्याची उपेक्षा करावी लागते तरच तो प्रशंसेला पात्र होतो १०५०

लौकिक वर्ष ४१९७ ई. स. ११२१–२२ च्या माघ महिन्यात मल्लकोष्ठ वगैरेनीं गोळावल्यावरून भिक्षू व पृथ्वीहरादिक, शूरपुरच्या मार्गानें परत आले वितस्तेनें खंदकाप्रमाणें वेढलेलें नगर शत्रूला दुर्गम होईल, असें समजून, राजानें राजवाडा सोडला व तो नवमठाला गेला. लौकिक वर्ष ४१९८ ई. स. ११२२ च्या चैत्रांत डामर लोक लढण्याला तयार होऊन आले. मल्लकोष्ठानें स्वारांसह पुढें वाढून प्रथम लढाई सुरू केली. तो स्वतः रणरांत घुसून लढत असतांना, अंतःपुरांतील राजस्त्रिया भयभीत व व्याकुळ होत्सात्या, राजवाड्याच्या गच्चीवरून ती लढाई पहात होत्या श्रीरामचंद्रानें वानरदळाचा तळ

सागरतीरावर दिला होता त्याप्रमाणें भिक्षूनें आपल्या सैनिकांची छावणी क्षिप्तिकेच्या कांठावर करविली होती.

डामर लोक सरकारी बागेंतील झाडें तोडून स्वयंपाकासाठीं सरपण नेत. तसेंच तेथील हिरवा चारा कापून आपल्या घोडयांना घालीत. पृथ्वीहरानें विजयक्षेत्रांत राहून मडव राज्यांतील दस्यू-डामर-यांची भरती करून, सैन्य वाढविण्याचें काम चालविलें होतें. इकडे राजानें प्रज्जी वगैरेंना मल्लकोष्ठाशीं लढण्याला सांगितलें व स्वतः वैशाखांत एकदम साहसानें डामरांवर हल्ला केला. या अवचित झालेल्या हल्ल्यामुळें पृथ्वीहराचे लोक घाबरून पळाले व त्यांनीं शर्थीनें पूल वलांडून प्राण वाचविले व तेवढ्यांतच समाधान मानलें. प्रज्जी मल्लकोष्ठाबरोबर लढण्यांत मग्न असतांना, पृथ्वीहराचा कनिष्ठ बंधू मनुजेश्वर, यानें सुज्जीचा पराभव करून नगरांत प्रवेश केला. १०६०. पण पूल पडल्यामुळें त्याला वितस्तेपार उतरता आलें नाहीं. तेव्हां त्यानें नदीतीरजवळचीं घरें जाळलीं व तो क्षिप्तिकेवर पोहों-चला. लवन्यांनीं नगर घेतलें असें समजून राजा कष्टी होत्साता विजयक्षेत्रांतून सैन्य उठ-वून परत आला. त्याचे लोक गडबडीनें गंभीरानदीच्या पुलावरून जात असतांना, तो पूल पडला. (गंभीरा नदी=विशोका नदी रेंब्यार संगमापासून वितस्तानदीच्या संगमापर्यंतचा भाग. हें नदीचें पात्र चांगलें खोल आहे.) त्यादिवशीं ज्येष्ठ वद्य षष्ठी होती. पूर्वी चक्रध-राच्या मंदिराच्या आंगणांत आगीनें लोक जळून मेले तसेच अगणित सैनिक नदींत बुडून मेले. राजा त्यावेळीं हात उभारून ओरडत सैनिकांना थोपवीत होता. त्याच्यामागून पळत येणाऱ्या लोकांचा खूब दाब बसून तो नदींत पडला आणि मोठ्या मुष्कीलीनें पैलपार उतरला. मध्यंतरीं पोहतां न येणाऱ्या लोकांनीं कित्येकदा त्याला बिलगून खालीं ओढलें होतें व पार जाणाऱ्याच्या हातांतील शस्त्रांनीं त्याला जखमाही झाल्या होत्या. त्याचे सामंत, सरदार व बहुतेक सैन्य, उतरावयाचें मागें उरले. फारतर एक सहस्रांश सैनिकच त्याच्याबरोबर राहिले. तो अगणित सैन्य मागें सोडून आला होता तरी, त्यानें हिम्मतीनें नगरांत प्रवेश केला आणि मल्लकोष्ठादिकांशीं लढाईचें तोंड दिलें.

विजयाची माता 'शिला' इनें तें राजा सोडून गेलेलें सैन्य, विजयेश्वराहून देवसरस येथें नेलें. त्यावरून पृथ्वीहरानें तेथें पोहोंचून तिला ठार मारलें व सैन्याला पळवून लावलें. १०७०. त्या प्रसंगीं झालेल्या लढाईंत सर्व लोक पळून गेले, पण व्यायामविद्याकुशल म्हणून प्रसिद्ध असलेला कल्याण नांवाचा ब्राम्हण, तोंड देऊन लढत राहिला व अखेर मारला गेला. राजाच्या त्या सैन्यांत सामंत, मंत्री व डामर एकत्र झालेले होते. त्यांच्यां-तून पृथ्वीहरानें कितीतरी धरून कैद केले. तसेंच त्यानें त्या पळून चाललेल्या सैनिकांचा, वितस्तेपर्यंत पाठलाग केला. त्या पाठलागांत त्यानें ओजानंद ब्राम्हण वगैरेंना पकडलें व सुळीं दिलें. जनक, श्रीवक, वगैरे मंत्री व कांहीं इतर राजपुत्र, पहाडापार विषलाटा प्रांतांत पोहोंचले व तेथें त्यांनीं खश लोकांना शरण जाऊन, त्यांचा आश्रय केला

याप्रमाणे पृथ्वीहरानें जय मिळविला आणि डामर लोकांना बरोबर घेऊन तो भिक्षाचरासह जय मिळविण्याच्या उमेदीनें व ऐटीनें नगराला परत आला.

तेव्हां नगराला पुनः पूर्वीप्रमाणें वेढा पडला व लढाई जाहली. तिच्यात दोन्ही-कडच्या माणसें व घोडीं याचे थोकच्या थोक नाश पावले राजवाड्याच्या बाजूनें हल्ला केल्यानें नगर लौकर हस्तगत होईल असें समजून पृथ्वीहरानें तिकडून मडवराज्यांतील डामर सैनिकांसह उठावणी केली. त्या डामर सैनिकाना सामंत कुलांत पैदा झालेले अनेक शूर काश्मीरी वीरहि सहाय्य करीत होते. त्याचा पराजय करणे फार कठिण होतें. भिक्षूच्या पक्षाला काकवंशी शोभक वगैरे हजारों प्रख्यात काश्मीरी व रत्नासारखें दुसरेहि लोक होते. त्या सर्वांनीं आपलें शौर्य चांगलें गाजविलें. आपल्या सैन्यातील रणवाद्यांचा तुमुल आवाज होत असलेला ऐकून पृथ्वीहरानें सहज कौतुकानें रणवाद्यांची-भाड्यांची-हजिरी घेतली. १०८०. तेव्हां तुर्यादिक पुष्कळशी मोठाली भांडी व वाद्यें सोडून देउनहि श्वपावाच्या दुंदुभीच बाराशेवर आढळून आल्या!

सैन्याचा असा भयंकर नाश झालेला असतांनाहि सुस्सलानें पंचवीस तीस राजपुत्र व स्वदेशी लोक याच्यासह शत्रूसमोर नेटाने टिकाव धरला होता. इछती कुलांतील सरदार उदय व धन्यक, चंपा व वल्लापुर येथील अधिपति उदय व ब्रह्म जज्जल, हरिहडौकस येथील मल्हण, हंसाचा सरदार ओज, क्षत्रिकाभित्तिका येथील सव्यराज, भाटुकवंशीय बिज्जलाचे पुत्र नील वगैरे आणि रामपाल व त्याचा तरुण पुत्र सहजिक व दुसऱ्या अनेक कुलांतील वीर, संग्रामव्यग्र होत्साते नगराला वेढा घालणाऱ्यांना चोहीकडून मागे हटवीत होते रिल्हण हा जणों राजाच्या पुत्राप्रमाणे मेहनत करीत होता. तसेच विजया-दिक शिलेदार त्या लढाईमध्यें प्रमुखत्वाने झटत होते. राजाचेही अश्रांत परिश्रम चाललें होते प्रज्जी व हज्जी हे युद्धात बरोबरीनें शौर्य गाजवीत होते. त्यांना सुस्सल राजा स्वतःचे डावे उजवे बाहू समजत होता व त्यांचें तो स्वतः कवचासारखे रक्षण करीत होता तो त्या दोघांनाहि जणो राज्याचे भागीदार मानून, राज्याच्या उत्पन्नांतून त्यांना भाग देत असे. त्या घोर संकटप्राय प्रसंगीं त्यानीं मोठ्या एकनिष्ठेनें राजाला साथ दिली होती.

भाजिक शरत्, भासिन गुम्मुनी, संगत, कलश वगैरेंनीं शत्रूचा विध्वंस करण्यात चांगलेंच कौशल्य प्रगट केलें. १०९०.

लवराजाचा बलशाली पुत्र कमलिय हा टक्क नांवाच्या प्रांतांत अधिकारी होता. तोहि राजाच्या सैन्याच्या अघाडीस होऊन लढत होता. तो रणांगणामध्यें मत्त हस्तीप्रमाणें वावरत असतांना, त्याच्यावर राजचिन्हभूत चामरें ढळत होती. त्याच्या माऱ्यापुढें शत्रूच्या स्वारांचें कांहींच चालत नव्हतें; अर्जुनाच्या पार्श्वरक्षक पांचाल राजपुत्रांप्रमाणें. त्याचा बंधू संजिक व पुतण्या पृथ्वीपाल, हे दोघे त्याचे पार्श्वरक्षक होते. यावेळीं सारें राज्य नाराज होऊन उलटलेलें असतांना, त्या सुस्सल राजानें अशा या भृत्यरत्नांच्या

ाणि पुष्कळसे सुवर्ण खर्चून खरेदी केलेल्या उत्तमोत्तम अश्वांच्या सहाय्यानेंच विजयप्राप्ती रून घेतली. गृहमेधी यजमान, यज्ञ महोत्सवांत, निरनिराळ्या यज्ञमंडपांतून समाचार घेत ारखा फिरत असतो, त्याप्रमाणे तो राजा या वेळ्याच्या वेळीं व्यवस्थितपणें जागजागीं धीर ेत व मदत करीत फिरत होता.

तो राजा मोठा बुद्धिमान होता. त्याला संकट येऊन पडतांच प्रारंभी काय त्रास डेल तेवढाच पण पुढे तें संकट वाढत जाईल तसतसें त्याचें धैर्य वृद्धिंगत होत असे. प्रारंभीं वचित प्राप्त झालेल्या धोक्यामुळें, मन अधीर होतें, पण त्याच्या मध्यंतरीं ते तितकें तापद टत नाहीं. थंड पाणी हातावर पडतांच गार लागतें, तितके ते बुडी मारल्यावर वाटत ाहीं. शत्रूचें काळे कभिन्न सैन्य नजरेस पडेल तेथे, तो राजा तात्काळ सैन्यासह चंदिके-माणें पोहोचून त्या सैन्यरूपी तमाचा नाश करी. एकदा डामर लोकांनीं एक जुटीने महा-रित उतरून नगरावर हल्ला चढविला. ते आंत घुसतात तोंवर राजाचें सैन्य नगरांत जाग-ागीं फाकलेलें होतें सबब, त्यानें जवळपास थोडेसे स्वार होते, ते बरोबर घेऊन, स्वतःच याना तोंड दिलें व पळवून लावलें. ११००. त्या डामर सैनिकांना त्याच्या समोरा-मोर येऊन सामना करण्याचें सामर्थ्य राहिले नाहीं. हेमंतांतील वावटळ पर्णराशी उडवून ाकते, त्याप्रमाणें तें सैन्य उधळून गेले.

डामर सैन्यामध्ये काक कुलांतील श्रीयानंद व लोष्ट, शाही अनल, वगैरे प्रसिद्ध ोक लढत होते. त्याना राजाच्या सैनिकांनीं ठार मारले, राजाच्या अनुयायांनीं बऱ्याचश-ामराना धरून धक्के मारीत त्या क्रुद्ध झालेल्या राजापुढें आणून, त्यांचा चांडालाप्रमाणें वध ला. भिक्षूच्या फौजेतील पुष्कळसे लोक भिऊन गोपगिरीवर चढून गेले तेथें त्यांना विरुद्ध क्षाच्या लोकांनी वेढा घातला. तेव्हां ते जणों मृत्यूच्या–काळाच्या–दाढेंत सांपडले होते ण त्यांच्या बचावासाठीं, मानी भिक्षूनें पक्ष्यांनीं सुद्धां पोहोचणें कठिण, अशा ठिकाणी ापला घोडा घातला. त्यावेळी पृथ्वीहराच्या मानेंत बाणाची जखम झाली होती, तरी ानें व दुसऱ्या दोघा तीघां वीरांनीं त्याच्या मागे आपले घोडे दवडले व त्याचा सांथ ोडला नाही. उचंबळणाऱ्या समुद्राला किनाऱ्यावरील उंच खडक थोपवितात, त्याप्रमाणें ांनीं शत्रूचे सैन्य थोपविले व ते हळूंहळूं गोपगिरी सोडून, पलीकडे दुसऱ्या पहाडावर ेघून गेले. त्याच सुमारास राजाच्या सैन्याच्या डाव्या बाजूला चारी दिशांना क्षोभ त्पन्न करणारी मल्लकोष्टाची स्वार व पायदळ फौज येऊन पोहोंचत असलेली दिसली ्यावेळीं राजा शत्रूचा पाठलाग करण्यात व्यग्र होता. तो आपलें सैन्य मागें टाकून दूर पुढें ढलेला होता. तिकडेच तो खास मारला जातो, असें सर्वांना वाटले. मल्लकोष्टाच्या या ाकस्मिक आगमनामुळें तो मागें हटून येत असतांना दुसरीकडून प्रज्जी व त्याचा कनिष्ठ-्रू समरांगणांत सैन्यासह येऊन धडकले. त्या दिवशीं, आषाढ वद्य तृतीयेला, घनघोर ढाई झाली. ११११. तिच्यात स्वारांच्या तरवारींचा प्रचंड खणखणाट, हाच त्याच्या धन्य-ादाचा द्योतक जयशब्द होत होता.

समीरणप्रेरित दावानलाला भाद्रपदांतील पर्जन्यवृष्टी शांत करते तद्वत्, सुज्जी व प्रज्जी या दोघांनी पृथ्वीहर व त्याचा पुत्र यांचा पाडाव केला. त्या दिवसांत पुष्कळशा लढाया झाल्या पण त्या दिवशीच्या सारखी वीर्य व शौर्य यांच्या खऱ्या कसोटीची लढाई पूर्वी कधीं झाली नव्हती. लहरची फौज थोडी उशीरा आल्यामुळें बंडवाल्यांना तिच्याशीं मिळून राजाच्या पक्षाचा पाडाव करता आला नाहीं. त्या संकटप्राय दिवशीं राजा व भिक्षू दोघांनीहि एकमेकांच्या सामर्थ्याची खरी पारख करून घेतली.

नंतर मडव राज्यवाल्या सैनिकांना पूर्वीच्याच जागी लढत ठेवून पृथ्वीहरानें क्षिप्तिका कालव्याच्या बाजूनें हल्ला केला.

यशोराज देशांतराला गेलेला यावेळीं परत आला. त्याला, शत्रूवर विजय मिळण्याला प्रोत्साहन मिळावें म्हणून राजानें मंडलेश्वर बनविले. राजाने त्याला कुंकुमालेपन, छत्र, घोडे, वगैरे बहुमानाचीं राजचिन्हें अर्पण केली आणि सर्वांकडून त्याचें राजाप्रमाणें अभिनंदन करविलें. तो, खेरी येथें कामगिरीवर होता, तेव्हां लवन्यांनी त्याचा पराक्रम पाहिलेल होता. यामुळें तो रणांत परत आलेला पाहून त्याचा थरकांप झाला. या लढण्या झगडण्याचं अरिष्ट इतके दिवस सारखें सोसावे लागल्यामुळे, लोक त्रासले व हताश झाले होते. त्यांन कधी एकदा स्वस्थता मिळेल असें वाटत होते. यामुळें रोग्याला नवीन वैद्यापासून उमे वाटतें त्याप्रमाणें यशोराजाच्या ठायी त्यांनी उमेद ठेवली. ११२०.

गर्गाचा बाकी राहिलेला वडील पुत्र पंचचंद्र याची राजाने मल्लकोष्ठाविरुद्ध योजन केली. तो अद्यापि लहानच होता, त्याची आई ठुड्डा हीच त्याची पालक होती. बापाच्य वेळचे जुने सेवक त्याला हळूं हळूं येऊन मिळाले व त्याने बराच लौकिक मिळविला.

राजानें यशोराजाची मदत घेऊन डामराचा पराभव केला तेव्हा कांहीं डा पळून गेले व कांहीं त्याला मिळाले. पृथ्वीहर भिक्षूसह आपल्या वेशनाला–छावणील परत गेला. आणि राजा मल्लकोष्ठाचा समाचार घेण्यासाठीं अमरेश्वराला गेला. तितक्य मल्लकोष्ठाने रात्री चोरांना चिथवून सदाशिवाच्या मंदिराजवळच्या रिकाम्या राजवाड्या आग लावविली.

पृथ्वीहरानें क्षिप्तिका काठांवर वरचेवर हल्ले चालविले. त्याच्यांशीं प्रज्जीव सु वगैरेंनी खूप लढाया केल्या. तो राहून राहून नगरांत घरें जाळवीत होता. त्यामुळें वितस्तेच्य कांठचा नगराचा सुरेखसा भाग पार जळून गेला.

राजानें एक मोठे सैन्य जमवून त्याच्यासह लहर प्रांतावर स्वारी केली व जागज घनघोर लढाया केल्या. सिंधूला पूल नसल्यामुळें त्याला सैन्यासह हती–मसकां–वरून उतरावें लागलें. तसें करण्यांत त्या हती फुटून त्याचे अनुयायी, कंपराज वगैरे पा० पडून, यमाच्या घरीं पोहोंचले. यमराज सर्वांना सारखेंच लेखतो. याप्रमाणें राजानें सा पिच्छा पुरविल्यामुळें मल्लकोष्ठ दरद देशात गेला. नंतर ठुड्डा व तिचा पुत्र लहरांत पूर्वपदारूढ झाले. ११३०. लवन्य जग्यक, यानें जनक, श्रीबक, वगैरेंना विषलाट

ाकडे आणलें. उन्हाळा लहरच्या मोहिमेंत काढून पावसाळ्यांत राजा शमालाकडे गेला.
वीहराच्या हल्ल्याने उधळलेल्या राजाच्या सैन्याला, थोपवीत असतांना सज्जाचा पुत्र
बि हा मारला गेला. पुढें सुवर्णसानूरग्राम, शूरपूर, वगैरे जागीं राजानें पुष्कळशा
ाया व झटापटी केल्या. त्यांत त्याला जयापजय मिळत होता.

पृथ्वीहरादिकांनीं श्रींबकाचा कल्याणपुर येथे पराजय केला. त्या प्रसंगीं नागवट्ट
रे मारले गेले. पृथ्वीहरानें पौष महिन्यांत ट्रिक्काला सुवर्णसानूराहून गर्गाची पत्नी,
ड्डा इला मारण्यासाठीं पाठविलें. त्याप्रमाणे जाऊन ट्रिक्कानें तिच्यावर एकाएकीं हल्ला
ा. हुड्डानें पूर्वी स्वतःच्या व राजाच्या सैनिकांनिशीं त्याचा पराभव केला होता.
तु यावेळीं झालेल्या हल्ल्यांत ती मारली गेली. याप्रमाणे त्या पापी ट्रिक्काच्या हातून
दुसरी स्त्रीहत्त्या घडली पशू, म्लेंच्छ: तस्कर व राक्षस, यांच्यामध्यें फरक थोडाच
सतो. आपली अबला मालकीण मारली जात असतांना तिला सोडून पळून जाणाऱ्या
तुल्य लहरांनीं पुनः शस्त्र धारण करणें, विलक्षणच होय !

नुकतीच शांतता झालेल्या मडव राज्यात पुनः बंडावा उठल्याचें ऐकून राजा
जयेश्वर येथें गेला. १०४०.

मल्ल राजाच्या पुत्राची जिव्हा भारी दुष्ट असे. तिच्यापायीं त्यांचा राज्याधिकार
ष्ट होणार, हे ठरलेलेंच होतें.

अलीकडील भृत्याची चाळणी करून पाहिली तर, ते बहुतेक चारित्र्यहीन व दोषरूपी
ाचे बनलेले आढळून येतात. सुस्सल राजाला लहानपणापासून अश्लील व रुक्ष भाषण
ण्याची दुष्ट संवय लागलेली होती. त्याच्या भाषणांत गौरवाचा गंध नसे. त्याच्यामुळें
णारांची नेहमी मानखंडना होत असे यशोराजाशींहि तो तसेंच भाषण करी. यामुळें
राजाशीं नाराज झाला होता. त्याची राजानें सैन्यासह अवंतिपुराम नेमणूक केलेली
ती. तेथेच तो रहात असे. तेथून निघून तो राजाच्या प्रतिस्पर्ध्यांना जाऊन मिळाला.
व त्याचे जय्यत सैन्य शत्रुपक्षाला मिळालेले पाहून राजाला फार दुःख झालें व खेद
टला आणि तो विजयक्षेत्राहून परत फिरला. त्याला राज्यापायीं मार्गांत आपले प्राण,
र व चांडालप्राय लोकांकडून अवमान पावूनहि रक्षण करावे लागले. अशा त्या राजाला
क्कार असो.

तो माघमासीं नगरांत परत आला. त्या नंतर त्याचा सेवक वठ हाहि बेइमान
ला. तेव्हां त्याला जणों स्वतःच्या शरीरावरील केसांचा सुद्धा भरंवसा धरतां येईना ! पुढें
त्या काश्मीरी लोकांविषयी त्याचा भारी गैरविश्वास झाला आणि त्यानें प्रज्जींच्या
डावर जणों आपलें मस्तक पूर्णपणें ठेवून दिले.

शौर्य, औदार्य, शहाणपणा, सत्यनिष्ठा, वगैरे सद्गुणाच्या योगानें प्रज्जीनें पूर्वी
श्मीर मंडळांत येऊन गेलेल्या, रुद्रापीडादिक परकी राजांच्या कारकीर्दींना मागें टाकलें
तें. या मंडळांत तरवार आणि विद्या—काली व सरस्वती—यांच्या नैसर्गिक योग्यतेला

तत्कालीन दुष्टपणामुळें धक्का बसलेला होता. त्यांना आपल्या:निष्कलंक यशानें त्यानेंच सांव-रून धरलें होते. ११५०.

भिक्षूने यशोराज भेटल्यावर त्याला म्हटलें कीं, 'आपल्या पराक्रमाला भिऊन,डाम-रांनीं आम्हाला राज्य मिळवून देण्याची आपली इच्छा व प्रयत्न सोडून दिला होता. आता आपण येऊन मिळाला आहा. आपल्याजवळ सैन्यबल व योग्यताहि आहे. तेव्हां आपण आम्ही मिळून पुन. गडबड उठवून राज्य परत मिळविण्याची खटपट करून पाहूं. ती सफल न झाली तर देशत्याग करूं.'

त्यांचा हा विचार चाललेला असताना छुड्डा मारली गेल्याचे ऐकून मल्लकोष्ट दर-दपुराहून परत आला व त्याने आपलें ठिकाण हस्तगत केले.

यानंतर, मोठे खडतर व सर्वभूत भयंकर होणारे म्हणून भविष्य केलें गेलेलें, लौकिक ४११९ ई. सं. ११२३–२४, हें वर्ष सुरू झालें. त्या वर्षाच्या वसंतामध्ये सर्व डामर पूर्व प्रमाणें आपआपल्या मार्गांनीं आले व त्यांनीं राजाला नगरांत पुनः वेढा घातला. तसा शूर सुस्सल राजा फिरून रात्रंदिवस युद्धाच्या तयारींत व सारख्या झटापटींत गढून गेला. त्य वेळीं राजद्रोह,लूटमार, लढाया, इत्यादि कामात निपुण, अशा डामरानी पूर्वीपेक्षाहि अधिक जोराचे व भयंकर बंड उठविलें. यशोराज, भिक्षाचर, पृथ्वीहर, वगैरे वीर महासरितेच्य तीरावर येऊन दाखल झाले व त्यानीं तिकडून नगरात अप्रतिहतपणे प्रवेश करण्याचा प्रयत्न केला. कांही दिवस पुष्कळशा झटापटी चालू होत्या. त्यापैकीं एका झटापटींत यशोराज आपल्याच पक्षाच्या एका स्वाराच्या हातून शत्रू समजून चुकीने मारला गेला. तो सुस्सला कडील कय्याचा पुत्र विजय याच्याबरोबर लढत होता. दोघाचे घोडे व अंगातील कवचें बहुतेक सारखीं दिसत होतीं, यामुळे फसून, यशोराजाकडील एका शिलेदारा गडबडीने त्याला भाला मारमारून ठार केलें. ११६१. तो भिक्षूला राज्य मिळवू देण्याला समर्थ असून, तसें केल्यावर तो आपला नाश करील, अशा भीतीमुळें डामरानीं त्याला ठार मारलें,असेहि कोणी म्हणतात.त्यानें आपल्यावर विश्वास व पूर्णलोभ ठेवणाऱ्य मालकाला अवचित दगा दिला होता. त्याचप्रमाणे त्याला असें हें युद्धामध्यें अवचि मरण आले !

पुढें पृथ्वीहरानें डामरांना जागजागीं लढण्याला पाठविलें व तो स्वतः क्षितिकेच्य तीरावर हल्ला करण्याला परत आला. तेथें चाललेल्या लढाईत भिक्षूकडील नगरांती सैनिकांनी, त्याच्या स्वतःचा पराक्रम व हर्षामर्ष यांवरहि ताण केली. त्या दिवसा आगी व घोर वीरसंहार, वगैरे संकटांमुळे प्रत्येक दिवस अधिक अधिक भयाव जात होता. सूर्याचा ताप दुःसह प्रखर व भयंकर होत असून, वरचेवर भूकं होत होते. मोठमोठे वृक्ष व पर्वत शिखरें यांचें उन्मूलन करणारे झंझावात अकस्मात् सुटत वाऱ्यानें उडालेल्या प्रचंड धुळीच्या लोटाचे आकाशाला जणों उंचच उंच आधारस्तंभ उ होत असत. ज्येष्ठ शुद्ध एकादशीला घनघोर लढाई चालली असतांना डामरांनीं काष्ठी

त्यांतील-एका घराला आग लावली. ती आग वाऱ्याच्या सपाट्यानें साऱ्या नगरांत कदम भडकली. ती केवळ वाऱ्याच्या सपाट्यानें चेतली किंवा विद्युत्पातानें लागली नकळे. १७०. त्यावेळीं, माक्षिक स्वामींच्या सेतूजवळून निघालेला वनगजाच्या मोठ्या थोरल्या रूपाप्रमाणें धावत येणारा प्रचंड धुराचा लोट, बृहत्सेतूवरून दिसतो न दिसतो तोंच, ाकडे इंद्रदेवीभवन विहारावर तो एकदम भडकला आणि क्षणभरांत साऱ्या नगरांत सर्वत्र ागीच्या ज्वाळा उठल्या. धुराच्या लोटामुळें सर्वत्र अंधार पडला आणि न भूमी न दिशा आकाश, कांहींच दिसेना. ढोलक्याच्या तोंडावर मढविलेल्या चामड्याप्रमाणें सूर्यबिंब सते न दिसतें असें झालें होतें. त्या अंधकारांत क्षण मात्र भडकलेल्या अग्नीच्या ज्वाळां- ठे, घरें किंचित्काल व्यक्त दिसून, कायमचींच नष्ट होत होतीं. दुथडीचीं घरें पेटून वित- चें सारें पात्र कृतांताच्या हातांतील दोन्ही बाजूनें रक्तानें माखलेल्या प्रचंड खांड्यांप्र- णें लालभुंज दिसूं लागलें.

ब्रह्मांडाच्या वरच्या कटाहाच्या सीमांताला स्पर्शणाऱ्या व तेथून उलटलेल्या ालांच्या कलापांनीं आकाशांत जणों सुवर्णछत्रांचें वनच लागलेलें दिसत होतें. उंचच त्र ज्वालारूपी शृंगांनीं शोभणारा अग्नी व त्यांच्यांवरील निबिड धुराचें पटल नीलवर्ण त्राच्छादित मेरूच्या सुवर्णशिखरासारखें भासत होतें.

वेडावून गेलेल्या गृहस्थाना ज्वालाच्या योगानें स्पष्ट दिसलेलीं घरे जळत नाहींत पे वरचेवर वाटे व त्यांच्या मनाला किंचित धीर येई.

वितस्तेच्या पात्रांत जळालेलीं घरें पडून त्यांच्या आगीनें तिचें पाणी तापलें. तेव्हां ला सरित्पती सागराला और्वानलाच्या योगानें होणाऱ्या ताप व क्लेश यांच्या वेदनांचा ुभव आला.

आगीमुळें प्रकाशित झालेल्या पंखांनीं युक्त असे पक्षी आणि उद्यानांतील वृक्षांचे ठालेलें कोंवळे पल्लव, बरोबरच आकाशांत उडून जात होते. ११८० स्वच्छ चुना दिलेलीं देरें ज्वालांनी व्याप्त होऊन, तीं प्रलयकालीन संध्याभ्रांनीं व्याप्त झालेल्या हिमगिरीच्या खराप्रमाणें दिसूं लागलीं. घरासारख्या नावा व-मज्जनवास-किंवा नदीवरील बंद स्नान- '-आणि नावांचे पूल, आगीच्या भीतीनें लोकांनीं काढून नेल्यामुळें, नदीचे ते ते भाग व ग अगदीं शून्य दिसूं लागलें. फार काय सांगावें. क्षणमात्रांत सारें नगर, मठ, देवालयें, देरें, घरें, बाजार, यांनीं वियुक्त व दावानलदग्ध वन भूमी सारखें झालें. त्यांच्यांत धुरा- ऽ काळी झालेली व निरास्पद अशी उंचचउंच बुद्धांची एकटी प्रचंड मूर्ती, झाडाच्या ठक्या खोडासारखी उभी असलेली दिसत होती.

बहुतेक राजाचे सैनिक जळत असलेल्या घरांचें संरक्षण करण्याला गेलेले होते. या- ऽ राजाजवळ काय ते शेसव्वाशेच लोक उरले होते. वितस्तेवरील पूल तुटला असल्यामुळें ला तिच्या पारहि जातां येईना. हें पाहून त्याला मारण्यासाठीं टपलेले शत्रूचे लोकहि ीं साधून त्याच्या सभोंवार जमले. नगर जळत असलेलें, स्वतःची दुःखीकष्टी स्थिती,

प्रजा विलक्षण संकटांत निमग्न, अशा स्थितींत त्या निर्विण्ण झालेल्या राजाला, लौकर मरण आलें तर बरें, असें वाटलें. तो तेथून मागें परतणार इतक्यांत कमालिया त्याच्यासमोर आलेला त्याच्या दृष्टी पडला. कोणीसें त्याचें लक्ष राजाकडे वळविलें होतें. राजा परत जाऊं इच्छितो आहे, तेव्हांच ध्यानांत आलें. तेव्हां त्यानें 'महाराज, कोणीकडे चालला ?' असें विचारलें. तें ऐकून त्या धैर्यशील राजानें मोठ्या सरंभानें आपल्या घोडा आवरला आणि आपलें चंदनचर्चित मुख फिरवून, किंचित् हंसत, त्याला उत्तर दिलें. ' या भूमीसाठीं तुमचे मानधन थोर आजोबा महाराज भिज्ज यांनीं हम्मीराशीं–महंमद गजनवी याच्याशी–स्वदेशाभिमानानें जें कार्य पूर्वी केलें, तें आतां आम्ही करणार. ११९०. (यासंबंधाची खात्रीलायक कथा हल्ली उपलब्ध नाहीं.) ठाव ठिकाण अज्ञात असा भिक्षाचर हा आमचा दायाद व प्रतिस्पर्धी, हें गोष्ट मान्य केली तरी, आम्ही व आमच्या बंधूंनीं जी काय कामागिरी केली, ती हर्ष आमच्या पुढून पळून गेला त्यावरून दृष्टोत्पत्तीस आलेलीच आहे. वाघ अखेरीस आपले चामडें रक्तानें माखल्याशिवाय सोडीत नाहीं. त्याप्रमाणें मानधन लोकांच्या पंक्तीमध्यें प्रविष्ट झालेला, असा निर्वाणीच्या प्रसंगीं मायभूमीला स्वतःच्या रक्तानें माखल्याशिवाय कोण सोडील?' असे बोलून तो लगाम सोडून, तरवार उगारीत, जणों घोड्याच्या डोक्याला स्पर्श करूं लागला. जेव्हा कमलियानें घोड्याची लगाम धरून त्याला अडविलें व विनंति केली कीं, 'भृत्य कायम असतांना मालकांनीं पुढें वाढून जावयाचें नसतें.' या आणिबाणीच्या प्रसंगीं जखमी झालेला असतांनाहि, एकटा पृथ्वीपाल राजाकडे आपल्या घरातून आग्रहानें निघून येऊन पोहोंचला होता. हे पाहून राजानें त्याच्या कुलीनपणाची व स्वामिभक्तीची प्रशंसा केली. अशा या सेवेच्या द्वारें त्यानें आपण त्याच्यावर केलेल्या उपकृतीचा योग्य मोबदला दिला, असें त्याला वाटलें.

तोंवर शत्रूनें त्याला तिहेरी वेढा देऊन त्याच्यावर बाणांची वृष्टी चालविली होती, तेव्हां राजाच्या डावीकडून सारे स्वार निकरानें लढण्याला व मार्ग काढण्याला तयार झाले राजानें अशा अडचणीच्या प्रसंगींहि घोडा पुढें काढला. त्याच्या जवळ थोडेसेच लोक उरले होते. अगणित शत्रू येऊन पोहोचले. त्यांच्या नागव्या तरवारींच्या पात्यामध्यें असंख्य प्रतिबिंबें पडली होतीं. त्यांच्या योगानें तो विष्णूच्या विश्वरूप अवतारा सारखा शोभत होता. कलविकाच्या थव्याला श्येन–ससाणा–किंवा कुरंगांच्या कळपाला केसरी, एकटाच पळवून लावतो, तसें राजानें त्या असंख्य शत्रूंना उथळून दिलें १२००. त्याच्या बरोबरच्या स्वारांची एकच गर्दी उडाली. ते उलटून मागें पायदळावर पडले. त्याचे घोडे, आड येणाऱ्या लोकांना तुडवींतच टापा मारीत होते. मरणारे व मारणारे, सारेच योद्धे त्या आगीच्या प्रकाशांत रक्तानें न्हाल्यासारखे लालभडक दिसत होते.

याप्रमाणें शत्रूचा नाश करून, तो अस्तमानी परतला तेव्हां, नगरांतील भयाण देखावा पाहून त्याच्या डोळ्यांतून टिपें टपकलीं. कारण आगींतून बचलेला नगराचा भाग केवळ नष्टप्रभ होऊन गेला होता. त्याचा पराभव झालेला नव्हता, हे खरें, तरी त्या सुरेखशा

नगराच्या त्या झालेल्या नाशामुळे त्याला शत्रूवर जय मिळविण्याविषयीं अथवा आपल्या प्राणाविषयीं सुद्धां, काळजी करण्याची पर्वा व इच्छा उरली नव्हती. त्यानंतर तो राजा, जागा, निजलेला, फिरत, उभा, स्नान, खान, पान, करीत किंवा शत्रूवर चालून जात असतांना पाहून, नेत्रांत अश्रू आले नाहींत, असा कोणीही मनुष्य क्वचितच आढळत असे. आगीनें नगरांतील सारीं धान्यांचीं कोठारें जळून खाक होऊन गेल्यामुळें, सर्वत्र दुस्सह व घोर दुर्भिक्ष सुरू झाले. लोकाची सारी पुंजी व बचत, फार दिवस सारखी गडबड चालू राहिल्यामुळें, नाहींशी झाली होती आणि डामरांनी त्यांचे सारें पीक लुटून, रहदारी बंद पाडली होती. राजा व राज्य, विधुर झाल्यामुळें, धन किंवा धान्य, यांची मदत न मिळाल्यानें, राजाश्रित सरदार व सामंत लौकरच उपाशी मरू लागले. आगीच्या तडाक्यातून वाचलेलीं घरें बुभुक्षित अन्नार्थी लोकांनीं धान्याचा शोध करतांना पटविल्यामुळे दररोज जळून चाललीं होतीं. नदीवरील पुलांजवळ पात्रांतलें पाणी प्रेतांच्या राशींनी अडल्यामुळे, प्रवाह बंद होऊन तिकडून दुर्गंधीमुळे नाकाला पदर लावल्याशिवाय वावरतां येत नव्हतें. तीं प्रेते पाण्यात पडून, फुगून सडलीं होतीं. १२१०. साऱ्या जमीनीवर हाडांचे शुष्क सांपळे व नरकपालें पडून, ती पांढरी झाल्यानें तिनें कापालिक व्रत घेतल्यासारखे दिसत होते. मोठ्या कष्टानें व उन्हाळ्यांत फिरल्यामुळे काळवंडलेलीं व अग्नीच्या तापानें सुकून निवळ अस्थि पंजर उरलेलीं माणसे, जळक्या खांबासारखी दिसत होती.

पुढें कोठेशा झालेल्या एका लढाईंत पृथ्वीहर बाण लागून मरण पावला, अशी अफवा उठली. राजा त्यावेळीं जबर जखम लागून निरुपाय होऊन पडला होता. ही गोष्ट लोकांनीं बाहेर प्रगट केली नव्हती. त्याला ही पृथ्वीहरासंबंधीं बातमी ऐकून आनंद झाला. थोडयाच दिवसांनीं त्यानें पुनः जोरानें युद्ध सुरू केलें. एखाद्या चवचाल वेश्येप्रमाणें विजयश्री त्याला लटकेच औत्सुक्य दाखवून झुलवीत होती. पण ती त्याला वश झाली नाही.

विधी नेहमी नितांत कुटिल असतो. तो खोटीच अनुकूलता दाखवून पुढील दुःख अधिक कष्टकारक करतो. पर्वतावरील प्रज्वलित महौषधींचा नाश करण्यासाठीं विद्युत्पात करून नंतर नव मेघ सर्व पर्वत प्रदेश अंधकारानें व्याप्त करून टाकतो, त्याप्रमाणें त्याची कृती असते.

या तऱ्हेनें दीर्घ दुःख अनुभविल्यावर शेवटीं आपणाला त्या जणों दीर्घ तपश्चर्येचें फलच अशी राणीची भेट होऊन आनंद होईल, अशी राजाला मनापासून भारी आशा होती. ती आशाहि महादेवी मेघमंजरी, याच सुमारास मरण पावल्यानें, एकाएकी नाहींशी झाली. राजावरील अनेक संकटांविषयींच्या बातम्या ऐकून, ती उत्सुकपणानें काश्मीर मंडळांत येण्याला निघाली होती. ती वाटेंतच फुल्लपुराजवळ मरण पावली. तिचें प्रेम खरें व कळकळीचे होतें. तिचें भाषण प्रतिष्ठित, पोक्त आणि आनंददायक असे. तिच्या नैसर्गिक शहाणपणाला अनुभवाची उत्तम जोड मिळालेली होती. तिचे सर्व गुण परस्परांना पोषक असे होते. तिच्या दर्शनाविषयी आतुर असलेल्या त्या राजाला, ही तिच्या अवचित

मरणाची दुर्वार्ता ऐकून, अधिकच शोक व दुःख झालें आणि त्याच्या मनाची भारी चलबिचल झाली. तिच्या मरणाने त्याला सारें जगत् निस्सार वाटू लागले. आता आपल्या लोकाना कोणच्याहि तऱ्हेचें सुखसमाधान उरलें नसून ते जीवाला कंटाळले आहेत, हें जाणून त्यालाहि राज्य आणि स्वतःचे प्राण, यांचें कांहीच महत्व अथवा पर्वा उरली नाहीं.

महाराणीनें त्यांच्याशीं कधी कठोरपणा केला नसल्यामुळे, तिच्या चौघी सख्यांची तिच्यावर दृढभक्ती बसलेली होती. त्यांनीं तिच्याबरोबरच प्राण दिले. तसेच तिचा तेज नांवाचा आचारी, ती मेली तेव्हां हजर नव्हता. तो दुसरे दिवशीं आला. त्यानेही आपली निस्सीम भक्ती प्रकट करीत, तिच्या चितेजवळ पोहोचताच, जवळच्या एका शिळेवर डोके आपटलें व नंतर नदींत उडी टाकली. या योगानें त्याने भृत्यवर्गांमध्यें श्रेष्ठ व वंद्य पद प्राप्त करून घेतलें.

या सुमारासच राजाला शत्रूनी युद्धाचे आव्हान केलें त्यांच्या संभ्रमामुळें त्याला झालेल्या या दारुण शोकाचें विस्मरण पडले. ते पाचारण जणो या संबंधांत त्याला पथ्यावरच पडले. तो फारच उदास झाला होता. त्यानें लोहराहून आपल्या पुत्राला राज्य सोंपण्याच्या हेतूनें आणवून घेतले. तो पुत्र नुकताच बाल्य दशेतून बाहेर पडलेला होता. प्रज्जीचा पुतण्या भागिक याला राजाने लोहर येथें मंडलेश्वर नेमून, तेथील भारी खजीना व आसपासचे राज्य संभाळण्यासाठीं पाठविलें. राजपुत्र वराहमूल येथे पोहोचला तेव्हां मोठ्या प्रेमाने सामोरे जाऊन, राजाने त्याला आलिंगन दिलें. त्यावेळी त्याला आनंद व शोक, या दोन्हींचाहि एकदमच अनुभव आला. तो राजपुत्र तीन वर्षांनीं काश्मीर मंडळांत परत आला होता. राजा दुःखीकष्टी व फारच अस्वस्थचित्त असल्याचे पाहून, त्याला फार वाईट वाटले १२३०.

राजानें नगरांत प्रवेश केला तेव्हां त्याने शोकामुळें मस्तक खालीं घातलें होते. नगर जळून खाक झालेले होते. त्याच्याकडे त्याच्यानें पाहवेना. दावाग्निदग्ध वनभूमीवर जलपूर्ण मेघमंडळाची घटा उतरावी, तशी त्याची स्थिती झाली होती.

राजानें त्याला आषाढ शुद्ध प्रतिपदेला राज्याभिषेक करविला व त्याला राज्यकारभाराची माहिती करून दिल्यावर सद्गदित कंठाने म्हटलें, 'तुझे चुलते व वडील थकून गेल्यामुळे तेहि राज्यधुरा वाहण्यायोग्य उरले नाहीत, ती तूं शूर पुत्रा, आता खांद्यावर घे. हा भार आतां तुझ्यावर आला आहे', यावेळी दुर्दैवाने राजाने त्याला साम्राज्यपदाचा पोकळ मान मात्र दिला. राज्याधिकार कांहींच दिला नाही. हा अभिषेक होतांच नगराचा वेढा, दुर्भिक्ष रोग, वनचरावराहांदिकांचे उपद्रव सर्व शांत झाले. सर्व भूमी चांगली पिकली व श्रावण महिन्यांत दुर्भिक्ष पार गेले.

तोंवर राजपुत्र जयसिंह मोहिमेवर जाऊन तिकडे शत्रूचा फडशा पाडीत होता. पण चुगलखोरानी तो पितृद्रोही आहे, अशी राजाची भलतीच समजूत करून दिली. राजानें

ऱ्या खोटयाचा विचार न करितां कण्याचा पुत्र विजय याला राजपुत्राला पकडून कैद करून आणण्याला पाठविलें. याची अगोदर खबर लागल्यामुळें राजपुत्र राग गिळून हंसत मुखानें विजयाकडे आला. विजयाने त्याच्यावर परभारे पाहऱ्याची व्यवस्था करवून, राजाची आज्ञा अमलात आणली. त्यादिवशी राजपुत्राला भारी दुःख झाले. त्यानें अन्न-ग्रहण केले नाही. दुसऱ्या दिवशी राजाची खात्री करण्यासाठी विजय राजपुत्राला घेऊन राजाकडे जाण्याला तयार झाला. १२४०. राजाच्या मनांत शंका होती. राजपुत्र सज्ज व सावध असल्याने त्याच्यावर आरोप करण्याची ती वेळ नव्हे, असें पाहून राजानें मंत्र्याच्या हातीं कांही तरी थापा देऊन त्याला मार्गातून परत पाठविलें पण त्याला पकडण्याचा निश्चय त्याच्या मनांत रात्रंदिवस घोळत होता.

ज्याच्यापायीं पिता व पुत्र परस्पर साशंक होऊन रात्रंदिवस सुखानें शयन करूं शकत नाहींत, अशा त्या राज्याला धिक्कार असो. ज्यांना पिता, पुत्र, पत्नी, मित्र भृत्य; सारेच शंकास्पद वाटतात, अशा त्या राजाना विश्वास पात्र तरी कोण वाटतो, कोण जाणें!

साह्य नांवाच्या एका लहानशा खेडयांत स्थानक नावाचा एक खळे राखणारा चौकीदार रहात होता. त्याच्या उत्पल नांवाच्या पुत्राला, बालपणी डामरांच्या मुलांनीं गुरे राखण्याला ठेवून वाढविले होतें. पुढे तो शिपायाचे काम करूं लागला आणि टिक्काच्या पदरीं राहिला. त्यानें त्याला प्रारंभीं राजाकडे दूत म्हणून पाठविले. राजा आपल्या शत्रूं-मध्ये फितूर करविण्याच्या खटपटींत होता. त्याने उत्पलाला त्या कामांत आपला गुप्त हेर केला. नंतर त्याला पुष्कळसें इनाम व अधिकार देण्याची लालूच दाखवून, प्रथम भिक्षा-चराला व नंतर टिक्काला ठार मारण्याविषयी सांगितलें. तें कबूल केल्यावरून, त्याने त्याला राजपतीची जागा दिली. भोगेच्छाव लोभ आणि स्वामिद्रोह, यांच्या विचारामुळे त्याच्या मनाची चलबिचल झाली होती. अंगिकारलेले कार्य करावे न करावे. याचा निश्चय होईना. १२५०.

या सुमारास त्याची बायको बाळंतीण झाली. राजाने आपला हेतू मनांत ठेवून, तेच्या बाळंतपणाची सर्व व्यवस्था, तिच्या माहेरच्या माणसांप्रमाणें, सर्व सामान व बाळंतविडा वगैरे पाठवून, थाटानें केली. हा अत्यादर व फाजील उपचार पाहून तिला शंका आली. तिनें त्याबद्दल उत्पलाला खोदखोदून विचारलें. तेव्हा त्याने तिला खरी हकीकत कळविली. त्यावर तिनें, ‘हे स्वामिद्रोहाचें महत्पाप करूं नये. ते केल्यावरहि सुस्सल राजा तुम्हाला द्रोही म्हणून ठार मारल्याशिवाय राहणार नाहीं. यापेक्षा त्यालाच मारावें. आपल्या जुन्या मालकाचाच विश्वास ठेवणें बरें. सुस्सलाला मारल्यानें आपला मालक, त्याचा पुत्र व त्याची सर्व मंडळी, आपणाला अधिक चाहतील व संपन्न करतील,’ वगैरे तिने त्याची पुष्कळ प्रकारानें समजूत केली. तसा त्यानें आपला निश्चय फिरविला. त्यानें टिक्काला ही सर्व हकीकत कळविली व बायकोच्या म्हणण्याप्रमाणेंच करण्याचें ठर-विले. पुढे तो राजाकडे व टिक्काकडेहि पूर्वीप्रमाणे जात येत राहिला. टिक्काकडे त्याचें

विशेष जाणें येणें असूनहि, तो दैवविमोहित राजा, त्याच्यावर सुतनिर्विशेष विश्वास ठेवूं लागला. खुद्द पुत्राविषयीं दुष्टबुद्धी व अविश्वास आणि वैऱ्याच्या आश्रितावर दृढविश्वास ! ज्याचें दैव उलटलें त्याच्या हातून कोणचें म्हणून दुष्कृत्य घडत नाहीं ? मधासाठीं हापापलेले लोक मधमाशांपासून होणाऱ्या पीडेची पर्वा करीत नाहींत, तसे स्वार्थसाधनीं रत असल्यामुळें अंध झालेले हलकट लोक, अंगीकृत कार्यांत येणारे अनर्थ व आपत्ती, यांचा विचार करीत नाहींत.

टिक्काला प्रज्जी पीडा देत होता. राजानेंहि हट्ट धरला होता. म्हणून उत्पलानें टिक्काकडून त्याच्या पुत्राला ओलीस देवविलें व त्याला राजाला शरण जाण्यास भाग पाडलें.

राजानें देवसरस जिंकून घेतलें. तिकडून तो कार्तिक महिन्यांत खेडी प्रांतांतील बाष्टक येथें गेला. १२६०. कल्याणपुराच्या आसपास त्याने अनेक झटापटींमध्ये भिक्षू व कोष्ठेश्वर, वगैरेंची पूर्ती फजीती केली. त्यांतच सुज्जीनें काककुलोत्पन वीर शोभक, याला भिक्षू व त्याचे सैनिक, यांच्यामधून जिवंत पकडले. भावकाचा पुत्र विजय याचा राजानें पराजय केला व कल्याणपुराजवळची त्याचीं घरें जळलीं. वदोसक गावहि जाळले गेले. तेव्हा आश्रयस्थान न राहिल्यामुळे भिक्षाचर शमाला प्रांतांत काकसह येथे गेला. विजयाचा कनिष्ठ बंधू मिळून राजाकडे गेला, पण त्या कठोर हृदयी राजाने त्याला बेड्या घालून कैदेंत टाकलें.

राजानें रिल्हणाला मोठ्याशा फौजेसह शूरपूरास ठेवले. तेव्हां राजपुरीवाल्यानाहि हल्ला होण्याची भीति पडली. अशा उच्चंड वृत्तीनें त्यानें डामरांची खोड मोडल्यावर, शत्रूला पूर्तेपणी जिंकण्याचे काम थोडेसेच उरले आहे, असे त्याला वाटले.

सैन्याचा नाश झालेला पाहून, भिक्षाचर व लवन्य त्या प्रबल शत्रूला भिऊन देशांतराला जाण्याचा विचार करूं लागले. कारण त्यांच्या पक्षाचे लोक जिवंत असूनहि दुर्दैवानें व येथवर आलेल्या अपयशामुळे निर्माल्य व मृतप्राय झालेले होते.

सोमपालाची लबाडी राजा विसरला नव्हता. बर्फ वितळल्यावर राजपुरीची राखरांगोळी करण्याचें ठरवून तो नगराला परत गेला. राज्यांतील बहुतेक अरिष्टें शांत झालीं होतीं. यामुळे त्याला आता सागरांतापर्यंत विजय मिळवितां येईल, असे कोणालाहि वाटलें असतें. पण आजवरच्या घोर विप्लवामुळें यावेळी त्या मंडलांत शेकडा एक दोन माणसें उरलीं होतीं. त्यांना त्याच्या कारकीर्दीचे एकेक वर्ष युगासारखे दीर्घ वाटत होतें. दैन्य, दुःख, प्रियनाश, दारिद्र्य, वगैरे आपत्तींमुळे त्याची सारी कारकिर्द सर्वांना फारच दुस्सह व तापद झाली होती.

विधात्याच्या वृत्तिवैचित्र्यावरच कार्य सिद्धी अवलंबून असते. तेव्हां पौरुष नैपुण्य अथवा शाठ्य यांच्या द्वारें मनुष्य काय करूं शकणार ? विधीच्या साऱ्या कृतींत चवचालपणाच दिसून येतो. त्याच्यापुढें अगडबंब उभा राहणाऱ्याला तो तमोराशीप्रमाणें

टाळतो. कोणी त्याला बाजू देऊन जाऊं लागला तर तो सिंहाप्रमाणें मागें वळून, त्याच्याकडे पाहतो आणि जवळच्या माणसां-लोकां-वरून, तो मंडूकप्लुति करीत कोणीकडे-तरी निघून जातो.

राजा सुस्सल, उच्चल वगैरे राजे विश्वास ठेवल्यामुळें मारले गेले म्हणून, त्यांना नांवें ठेवीत असे. तो नेहमीं सशस्त्र, सज्ज, सावध व साशंक राही. विदूरथ राजासार-ख्यांच्या पुराण्या कथांचे दाखले ध्यानांत ठेवून, तो स्त्रियांशीं खेळ, प्रणय प्रसंग व भोजनादिकाच्या वेळींसुद्धा अविश्वास दाखवीत, दुर्मुखलेला राही. ( विदूरथ राजाला त्याच्या राणीनें आपल्या वेणींत कट्यार लपवून ठेवून, एकांतांत ठार मारले. अशी कथा आहे. ) असा तो सुस्सल राजा उत्पलाला बंधूप्रमाणें मानून त्याच्यावर निस्सीम विश्वास ठेवीत होता. त्याला इतका मोह दुष्ट विधीवाचून दुसरा कोण पाडणार ?

राजा अथवा सुज्जी कोणीहि मारला गेला तरी एकच. सारखीच कामगिरी बजावली गेली, असे टिक्क वगैरेंनी उत्पलाला सांगितले होते. सुज्जीचा त्याच्यावर विश्वास नव्हता. उत्पल हा राजाला मारण्याला सारखा टपलेला होता पण त्याला योग्य संधी सापडली नव्हती.

कबूल केल्याप्रमाणे काम केले नाही म्हणून राजा रागावला. तेव्हां त्याची खात्री पटण्यासाठीं उत्पलाने देवसरस येथून आपल्या पुत्राला जामीनादाखल व व्याघ्र आणि प्रशस्तकलश वगैरे स्वतः सारख्याच साहसिकांना मदतीसाठीं, बोलावून घेतलें आणि ' त्यांच्याद्वारें आतां हटकून कार्य करतो,' अशी राजाची खातरजमा केली. तसेच पुढें तो एकदां सैन्यांतून तीन चारशें शूर व धाडशी प्यादे निवडून घेऊन, कामगिरीवर म्हणून निघाला. तो राजाजवळ सारखा संधी पहात टपलेला होता. राजा त्याच्याकडे वरचेवर उत्तमोत्तम खाद्यपेय पदार्थ पाठवून त्याला राजी ठेवीत होता.

राजाचा मंदुराचक्रवर्ती नांवाचा आवडता अश्व अजारी झाला होता. त्याला प्रति-हार कय्याचा पुत्र लक्ष्मक आणि बरेचसे दुसरे नोकरलोक बरोबर देऊन, राजाने उपचारासाठी परगांवी पाठविलें होतें. यामुळें त्याच्याजवळ यावेळीं फारसे सेवक नव्हते.

लक्ष्मकाचा पुत्र शृंगार याला विश्वासू माणसांकडून उत्पालाचा राजाला मारण्याचा कपटाचा बेत कळला होता. तो त्याने राजाला कळविला. बळी देण्यासाठीं तयारीनें चाल-विलेल्या पशूप्रमाणें आसन्न मरण माणूस शत्रूला मित्र समजत असतो.

गांधारीचा व क्रुद्ध ऋषीचा शाप, होत असलेले अपशकून व उत्पात, स्वतःची दिव्य दृष्टी इत्यादिकावरून कौरव-पांडव-कुलांचा क्षय होणार हे दिसत असतांनाहि, श्रीविष्णू कृष्णाला त्यांचें परित्राण करितां आलें नाहीं. तेव्हा भवितव्यतेच्या उलट कोण काय प्रयत्न करूं शकतो ?

शृंगाराचें बोलणें ऐकून, राजानें रागानें त्याचा धिक्कार करीत म्हटलें, 'तूं म्हणतोस तें सारें खोटें आहे.' त्याच्याकडे बोट करून तो हजर असलेल्या उत्पल वगैरेंना म्हणाला.

१२९०. 'हा पहा त्या राजद्रोही माणसाचा पुत्र, तुमच्या हातून माझें भलें झालेलें याला पाहावत नाहीं. उत्पला, हा स्वतःच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या तरी प्रेरणेनें, तूं लबाड व विश्वासघातकी आहेस, असें मला सांगतो आहे.' त्यावर आपली भीती व घाबराट हंसऱ्या चेहऱ्याखाली लपवीत उत्पलाने धिटाईनें उत्तर दिले, 'महाराज, याला आमचें उत्तर आपणच दिलें आहे.'

ते गेल्यावर, किंचित साशंक होऊन राजानें द्वारपालाच्या हातीं, दोनतीन भले व खबरदार सैनिक बोलावून घेतले. त्याचें मन बरेच चंचल झालें होतें. तो चिंतेनें व्याकुळ होऊन, दीर्घ निश्वास सोडूं लागला. त्याच्या नेत्रांत आंसू आले. नृत्यगीतादिकांत त्याचे मन रमेना. त्याला भ्रमसा होऊन तो आप्त सुद्धां परकां समजूं लागला. पुण्यक्षयामुळे स्वर्गांतून खालीं पडणाऱ्या वैमानिकासारखी त्याची स्थिती झाली.

राजाची ही अवस्था पाहून अंतरंगांतील मंडळीने आणखीहि कोणी सहाय्यक बोलावण्याचें मनांत आणलें.

ज्याला काल स्ववश करूं पहातो, तो कळत असूनहि वेडे वेडेचार करूं लागतो. भांबावून गेलेल्या उत्पलादिकांनाहि पुढें काय करावे तें सुचेना. त्यांनीं दोन दिवस मोठ्या काळजींत काढले. तिसरे दिवशीं सकाळीं राजानें, स्नान करून पूजेच्या वेळेपर्यंत त्या लोकांना आग्रहानें स्नानभोजनासाठीं आपापल्या घरीं पाठविलें. नंतर त्यानें स्नान केले व देवपूजेपर्यंतचे आन्हिक आटपले. दुपारी त्याने दूत पाठवून उत्पलाला मोकळेपणीं एकांतांत भेटण्या बोलण्यासाठीं बोलावून घेतलें. १३००. त्यावेळीं राजवाड्यांत फारशी ये जा नसे. यामुळे उत्पलाला चांगली संधी मिळेल, असे वाटलें. तो साशंक असाच राजाजवळ पोहोंचला. त्याच्या बरोबरच्या लोकांना द्वारपालांनीं बाहेरच रोकले. त्यांच्यापैकीं उत्पलाचा भाऊ व्याघ्र, याला राजानें आत बोलावून घेतलें. बाकीच्या सर्वांना त्यानें आपल्याजवळून बाहेर जाण्यास सांगितलें. कांहीं विश्वासांतील मंत्र्यांनीं बाहेर जाण्याला उशीर लावलेला पाहून त्याला राग आला व त्यानें रागानें 'द्रोही असतील तेव्हढेच येथे राहूं देत,' असे म्हटलें आणि पोक्त असा तांबूल देणारा व संधिविग्रहक विद्वान मंत्री राहिला या दोघांनाच आत राहूं दिलें. त्यावेळीं टिक्काचे दूत अर्घदेव व तिश्य वैश्य हे दोघे सहज तेथे आलेले व उत्पलाच्या बेताविषयीं अजाण, असे हजर होते.

यापूर्वी उत्पलानें वडोत्सचा राहणारा सुखराज डामर, याला त्याच्या कांहीं सज्ज व सशस्त्र सैनिकांसह स्वतःच्या बचावासाठीं जवळच आणून ठेवलें होतें. तो महाराजांचें दर्शन घेऊन, ठरल्याप्रमाणें काम करण्यासाठी-भिक्षू व टिक्क यांना मारण्यासाठी-जाईल, असें राजाला सांगितले. तसेच प्रशस्त राजाचेहि काम आहे असें सांगून, त्याला गडबडीने आत आणलें. येतां येतां बाह्य मंडप रिकामा पाहून त्याने कोणाला नकळत, त्याचें द्वार बंद करून त्याला कडी लावली.

राजा नुकतांच स्नान करून परत आला असल्यानें त्याचे केंस ओलसर होते. थंडी

वाजत असल्याने त्याने पायघोळ झुब्बा घेतला होता. हातांतील जंबिया जवळच खाली काढून ठेवून तो आसनावर बसला. १३१०. अशी संधी पुनः मिळणार नाहीं, तेव्हां महाराजांना विनंति करावी, असें व्याघ्राने म्हटल्यावरून, उत्पलानें उठून कपटानें राजाला प्रणाम करण्याच्या मिषानें, तो खालीं वांकला आणि तो जंबिया त्याने हळूंच उचलला व म्यानांतून बाहेर काढला. तसा राजा कावराबावरा होऊन 'अरे हा काय विश्वासघात! धिक्कार,' असे म्हणतो तोंच उत्पलाने त्याला त्याच्याच जांबियानें डाव्या खांद्यावर सपाटून वार केला. तसेंच प्रशस्त राजानें त्याच्या मस्तकावर आणि व्याघ्राने त्याच्या छातीवर तरवारी मारल्या. त्या दोघानींहि पुनः वार केले पण उत्पलाने, आपल्या पहिल्याच वाराने राजाच्या फसळ्या तुटून आंतड्याचे बंद मोकळे झाले, तेव्हां त्याचा प्राण जाणार, हे जाणून, पुनः वार केला नाहीं. राहिल खिडकीशी जाऊन ओरडणार तोंच त्याच्या पाठीवर व्याघ्रानें वार केले. पण त्याचा प्राण जाण्याला दोन तीन नाडिका लागल्या. ताबूल देणारा अज्जक घाबरला. त्याच्या हातातून कंकोळ वगैरे सामान खालीं पडले व तो पळून जाउं लागला. त्याला उत्पलाचे लोक मारूं लागले पण उत्पलानें त्या गरीबावर दया केली.

आंत ही गडबड चालली असतांना बाहेर टिक्काचीं माणसे शस्त्रे उपसून गर्दी व लूटमार करूं लागले. उत्पलाला राजानें मारले असेल, अशा समजुतीने राजाचें सैनिक उत्पलाच्या लोकांना मारूं लागले. १३२०. ती गडबड मिटविण्यासाठीं उत्पलानें राजाचें प्रेत व त्यात घुसलेला जंबिया खिडकींतून बाहेर लोकांना दाखविला ' आणि मी राजाला मारलें आहे, त्याच्या सेवकाना सोडूं नका.' असें तो मोठयानें ओरडला. ते दुःखकारक भाषण ऐकताच राजाचे लोक भ्याले व एकदम वाट फुटेल तिकडे पळाले. राजद्रोही लोक राजवाडयाच्या अंगणात बंदोबस्ताने उभे राहिले. मारेकरी मंडपातून बाहेर पडतात तों राजसेवक नागक हा नागव्या तरवारींनिशी, आंत येत होता. त्याला त्यानीं ठार मारलें राजाचा शय्यापालक त्रैलोक्य, याचा एक सेवक त्यांना दूषण देऊं लागला. त्याला व एका द्वारपालालाहि टिक्काच्या माणसानीं मारलें. राजाच्या सत्त्वहीन सेवकांमध्यें ढाल तरवार घेऊन; भाउक वंशभूषण, सहजपाल धांवून आला. त्याला पाहून मारेकरी एका बाजूच्या दारानें निसटून गेले. सहजपाल जखमी होऊन त्यांतील कांहींच्या हाती पडला. ज्या राजपुत्रांनीं दुष्कीर्तिरूपी डाग लावून घेतला, त्यापैकीं सहजपालानेंच काय तें स्वतःच्या रक्तानें आपल्यापुरतें त्या दुष्कीर्तीचे व लाजेचे क्षालन केलें. विद्वान ब्राह्मण नोनक, परदेशासारखा दिसत होता. तो पुढे आलेला पाहून त्याला त्या मारेकऱ्यांच्या नोकरानीं, राजपुत्र समजून मारलें. पुढे त्यांना कांही अडचण न पडतां ते जवळच्या एका खेडयाला गेले. कोणी सैनिकांनीं त्याचा पाठलाग सुद्धां केला नाहीं. जणों काय ते सारे सैनिक रागामुळे किंवा भिऊन चित्रासारखें होऊन गेले होते.

नंतर राजाच्या कृपेनें पोसलेले पुष्ट आप्त येऊन त्या राजवाडयाच्या अंगणांत जमा झाले. १३३०. आम्ही हर्षदेवाच्या वेळेपासून निरानिराळ्या लबाड व शठ लोकांविषयी

वर्णन व चर्चा करण्याचा भार वाहण्याला निर्धावलेले असलो तरी, त्या नीच व दुष्ट आप्त-मंडळीचें वर्णन करणें आम्हाला कष्टप्रद होत असल्यानें आम्ही त्यांची नांवें घेऊं इच्छीत नाही. त्यांतील कांहीं प्रमुख असे राजाचे नष्ट आप्त तेथवर येण्यांत आपण मोठें शतकृत्य व पौरुष केलें असें दाखवीत, बाहेरच्या मंडपांत चढून गेलें. तेथें त्यांनीं राजाचे प्रेत पाहिलें. त्यावेळीं त्या प्रेताच्या चर्येवरून असें वाटत होतें कीं, राजा जणों आपल्या या अशा अंताबद्दल खेद करीत, दांतओठ खातो आहे. त्याच्या अधरोष्ठांतून थोडेसें रक्त टपकत होते, यामुळे तो किंचित हलल्यासारखा दिसत होता. 'हाय, मी कसा फसविला गेलो,' अशा विवेचनमुळेच जणों मरताना त्याची दृष्टी निस्पंद झालेली, तशीच होती. जखमांतून वाहिलेल्या रक्तानें त्याचें शरीर काळे पडत चाललेलें होतें. ते त्याच्या अंतस्थ शांत होणाऱ्या क्रोधरूपी अग्नीने उठविलेल्या धूमपटलाप्रमाणें भासत होते. रक्ताने रंगलेला त्याचा चेहरा लाखेचा लेप लावल्यासारखा दिसत होता. त्याच्यामुळें त्याच्या कपालावरील केशर व चंदन पुसून गेलें होतें. रक्तानें भरलेल्या त्याच्या केसांच्या जटा बनल्या होत्या. तो जमिनीवर उघडा पडला होता. त्याचे हातपाय अस्ताव्यस्त पसरलेले होते. मान खाद्यावर लकटली होती. अशा त्याला पाहून, त्या दुष्ट नरपशूंनीं त्या समयाला उचित असे कांहीं करण्याऐवजीं, 'आपल्या तुसडेपणाचें योग्य फल भोग,' असे म्हणत, आळ्यतेनें त्याची उलट निंदा चालविली. पुढें ते आपले प्राण वांचविण्यासाठी गडबडीनें निघून गेले. त्यापूर्वी त्यानीं ते प्रेत घोड्या-वरून किंवा गाडींतून स्मशानांत नेऊन, त्याला अग्नि देण्याची काहींच व्यवस्था केली नाहीं. या कामाला उशीर लागता म्हणून ते एक राहो. पण त्यांनी त्याला निदान जागच्या जागीच चुलवणातील जळकीं लांकडे टाकून, किंवा जवळच असलेला अग्नी घेऊन, त्या घराला आग लावून, त्याला तेथेंच भडाग्नीसुद्धा दिला नाहीं. १३४०. ते सरकारी तबेल्यातल्या घोड्यावर स्वार होऊन परत पळून गेले.

राजाचे सैनिक खेड्यापाड्यातून पळत असताना त्यांना डामरांनीं लुटलें. त्या दिवसात भारी थंडी पडत होती. त्यांच्यापैकीं कोणीहि वाटेंत लुटला, मारला किंवा ठोकला जात असतांना, पित्यानें पुत्राची किंवा पुत्रानें पित्याची देखील काळजी केली नाहीं. शत्रूची दरडावणी ऐकतांच स्वाभिमानानें वस्त्रें किंवा शस्त्रें एकदम न टाकणारा, निदान तसे करण्यांत थोडा तरी अवकाश लावणारा सुद्धां, कोणी सैनिक त्यांच्यामध्यें निघाला नाहीं. त्यांच्यामधील लवराज व यशोराज हे युद्धकलाकुशल द्विज आणि कांद येथील संस्थानिक हे तिघेच काय ते शौर्यानें लढत असताना मारले गेले.

पळून जाण्यापूर्वी उत्पालादिक, जवळपास कोणी नाहींत, असे पाहून, राजाला मारलेल्या मंडपात पुन: गेले व त्यांनी राजाचें शिर तोडुन बरोबर घेतलें आणि धडही बाहेर नेऊन टाकलें.

ते दिवसरसाला गेले. वाटेंत एखाद्या शिरच्छेद केला गेलेल्या चोराच्याप्रमाणें त्या राजाच्या शिराचा गांवोगांव तमाशा दाखविला जात होता.

तो राजा लौकिक वर्ष ४२०३ ई. स. ११२८. यावर्षी फाल्गुन शुद्ध प्रतिपदेला मारला गेला. तेव्हा त्याला पंचावन्नावें वर्ष पुरें झालेले होतें.

जयसिंहदेव सुखशय्येवर पडलेला असतांना त्याला त्याचा धात्रेयभाऊ प्रेम यानें ही दुःखप्रद बातमी कळविली. त्यावेळीं तो निश्शस्त्र व (बहुधा प्रतिबंधांतच) होता. ती ऐकतांच त्याला पितृवात्सल्यामुळे सशस्त्र असल्याप्रमाणेंच भारी चेव आला व त्याचें मन प्रक्षुब्ध झाले. १३५०. तो थोडा वेळ देहभान सुद्धां विसरला. शुद्धीवर आल्यावर त्यानें अधीरपणानें एकेक आपत्ती मनात आठवून, मोठ्याने शोक करीत म्हटले, 'महाराज, आपण हे राज्य मजसाठींच निष्कंटक करण्याच्या प्रयत्नांत स्वतःचे प्राण व्यर्थ का बरें शिणविलेत ! आणि एकां नीचाच्या तावडींत सांपडून धोक्यांत आलांत व शेवटीं वैर शमविण्याकरिता निश्शस्त्र स्थितींत त्याला भेटत असतांना दग्यानें मारला गेला ' आपण त्या नीचाना मान व विश्वास यांना पात्र समजला. आपले स्वर्गवासी वडील व बंधू, याना आपण त्यांच्या वैऱ्याचा सूड घेतलेला पाहून आनंद झाला. पण आता आपणाला त्या बद्दलचा द्वेष व राग अनुभवावा लागतो आहे. त्याचा सूड उगविण्याला थोडासा अवधी लागेल. तोवर आपण अनरण्य, कृप, द्रोण, व जमदग्नी, यांचा हेवा करूं नका. आपल्या रागाबद्दल मला खेद होतो आहे. तो नाहीसा करण्याची मला मुळींच शंका किंवा अडचण वाटत नाहीं. त्यासाठीं मी अवश्य पडलें तर साऱ्या त्रिभुवनाशीं लढेन. ( कृपाचार्याचें मरण केव्हां कोठे व कसें झालें ? उलट ते चिरंजीव असल्याविषयी, अश्वत्थामा 'बलि या श्लोकात उल्लेख आहे व त्याबद्दल त्याच्या पुत्रानें केव्हा व कसा सूड उगविला आणि त्याचा पुत्र कोण होता, याचा कोठें उल्लेख आढळत नाहीं. तो पुत्र भारती युद्धात नव्हता. तसेच, रघुवंशी अनरण्य राजाला, रावणाने मारले. त्याचा सूड त्याच्या पुत्राने घेतला नसून, पुढे काही पिढ्या गेल्यावर, रामानें घेतला आहे. तेव्हां या ठिकाणीं अनरण्यरच्या उल्लेखाचें औचित्य व स्वारस्य दिसत नाहीं. )

'माझ्या दर्शनाने आपणाला आनंद होऊन आनंदानें वैं पुत्रवात्सल्याने प्रफुल्लित व मधुर मधुर भाषणामुळें प्रिय वाटणारें आपलें मुख, जणो पूर्वीप्रमाणेंच यावेळींहि मला डोळ्यासमोर दिसतें आहे.'

' अशा दुसऱ्या अनेक गोष्टी आठवीत त्यानें बराच वेळ शोक केला. पण पुढें त्यानें आपला गंभीरपणा सोडला नाहीं. तितक्यात त्याच्या पित्याचे कांहीं मंत्री लज्जा, शोक, व भय, यामुळे स्तब्ध आणि अधोवदन होत्साते आपल्याकडे येत असलेले पाहून, त्याला भारी राग आला. पण तो विवेकानें आवरून, त्याना कांहींसे झिडकारीत व निष्ठुरपणानें तो म्हणाला, आपण मद्वंशात उत्पन्न झालेले, म्हणून बाबांनी–महाराजांनी–अनेक तऱ्हेनें संपत्ती व मान देऊन, आपले पोषण व सत्कार केला. पण त्यांच्या अंतकाळीं आपलीं शस्त्रें उलटीं फिरलीं. आपणाला धिःक्कार असो. १३६०. आमचे चुलते मारले गेले तेव्हां, त्याच्या उच्छिष्ट भोजा सेवकानीं जे काम केले, ते देखील आपणासारख्या थोर व मानी माणसानी केलें नाहीं त्यावर दोघातिघां अमात्यांनीं त्याला पुढील कर्तव्य सुचवीत म्हटले, की, 'मैथून

राज्य सोडून एकदम लोहर गांठावें नाहीं तर भिक्षू उजाडतां येऊन पोहोचल्यावर, काय होईल कोण जाणें. दुसऱ्या कांही मंत्र्यांनी थोडें जास्त धैर्य दाखवीत सुचविलें कीं, 'गर्गाचा पुत्र पंचचंद्र याला लहराहून बोलावून घेऊन त्याच्या सहाय्याने, राज्यासाठीं नेट धरून लढावें.' पण सुस्सल राजा मारला गेल्यानें भिक्षूला प्रतिबंध करणें शक्य नसून, तो हवा तेव्हां जणों स्वतःच्या घरांत परत आल्याप्रमाणे, नगरावर चालून येऊं शकत होता, हे कोणीहि लक्षांत घेतलें नाहीं.

मंत्र्यांना आपला विश्वास नाहीं, हे पाहून राजपुत्र कष्टी झाला. 'पुढे कर्म काय करावयाचें तें उद्यां तुम्हांला कळून येईल,' असें सांगून त्यानें त्याना निरोप दिला. वेळ प्रसंग पाहून त्यानें पित्याच्या मरणाने झालेलें दुःख बाहेर दाखविले नाही. त्यानें खजांना वगैरेंच्या संरक्षणासाठी चांगल्या चौकी पाहऱ्याची व्यवस्था केली.

त्या रात्रीं पुष्कळसे लोक मोठ्यानें आरडत ओरडत, रस्त्यातून फिरत, सारे नगर निनादित करीत होते. ती वेताळ उठल्यासारखी व काळरात्रींप्रमाणे भयंकर पिशाच्चें वावरत असलेली रात्र, सर्व प्राणीमात्राना फारच भयावह गेली. निर्वात स्थळातील निस्पंद दीपा-प्रमाणें राजपुत्र चिंताक्रांत व निश्चल बसला होता व त्या दिव्याच्या प्रकाशानें अस्पष्टसे दिसत असलेले मंत्रीं त्याच्या सभोंवार बसलेले दिसत होते. राजपुत्राच्या मनात विचार चालला होता कीं, १३७०. 'आपण या वेळी सर्व तऱ्हेने निराश्रित आहो व बाबाचे प्रेत निर्द्वार, जोरानें वारा वाहात असलेल्या व अंधेऱ्या एकांत जागेत पडलेलें आहे. या दुस्सह दुःखाचें क्षालन करीपर्यंत मला मानधन माणसाच्या मुखाकडे कसे पाहता येईल, किंवा त्याना आपलें मुख दाखवितां येईल? मार्ग बर्फ पडून दुर्लंघ्य झालेले आणि मध्यंतरी शत्रूंची हद्द आलेली. तेव्हां सेनानायक सैन्य घेऊन कसे व कधी येऊन पोहोचणार?' त्याने ती रात्र कशी तरी अशा दुःखाकष्टांत काढली.

सकाळींच तो चतुष्किकेंत पोहोचला व त्याने पौरजनांचे आश्वासन करून, पळून गेलेल्या सैनिकांच्या शोधासाठी स्वार पाठविले. त्या दिवशीं घनदाट अभ्रे आलीं व अतिशय हिमवृष्टी झाली आणि सारे रस्ते भरून गेले. पाठविलेल्या स्वारांनीं पुष्कळसे परिश्रम घेऊन तपास केला, पण त्यांना त्या पळून गेलेल्या सैनिकांचा पत्ता लागला नाहीं तसे ते परत आले. तेव्हां राजानें थोडा वेळ विचार करून नगरांत दवंडी पिटविली की, 'ज्या कोणी ज्या काहीं सरकारी वस्तू नेल्या असतील त्या त्यांनीं ठेवाव्या. त्या त्यांना बहाल आहेत. तसेंच जे कोणी निरुपायानें व द्रोहामुळे शत्रूला मिळाले असतील, त्यांना त्याबद्दल अभय आहे.' ही दवंडी ऐकून सर्व लोक त्याला आशीर्वाद व धन्यवाद देऊं लागले व त्याच्यावर अनुरक्त झाले. ही युक्ति त्याच्यापूर्वीं होऊन गेलेल्या राजांच्या वर्तनाच्या अगदी विरुद्ध व अपूर्व होती. तरी पण तिचा उत्तम परिणाम तत्काल अनुभवास आला. १३८०. पूर्वी त्याच्यापाशी शंभरसुद्धां सैनिक नव्हते. पण यामुळें त्याच्यावर अनुरक्त झालेल्या लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्याच्याकडे भरती होण्यासाठीं ताबडतोब येऊं लागल्या.

मिष्ट भाषण व प्रीतिदाय यांच्याद्वारें लोकांना वश करून घेण्याची कला लक्ष्मकाला उत्तम अवगत होती. तिच्या द्वारें तो मुख्य मंत्री बनला होता. याप्रमाणें राजा लोकांचें समाधान करीत असतांना भिक्षू नगरांत प्रवेश करण्यासाठीं दोन प्रहराच्या सुमारास निघाला. त्याच्याबरोबर पुष्कळसे स्वार व भारी मोठी पेढारगर्दी होती. तिच्यांत डामर, दस्यू, पौरजन व पायदळहि होते. आपला शत्रू सुस्सल मारला गेल्याचें ऐकून भिक्षाचर नगराला येण्याला निघाला. तेव्हां त्याला काकाचा पुत्र तिलक यानें राजाप्रमाणे मानून विनंति केली की, ' सुदैवानें सुस्सल राजा मारला गेला आहे. तो सर्वांना फारच अप्रिय झालेला होता. पण त्याचा पुत्र गुणवान आहे त्याचा पक्ष प्रजाजन सहसा सोडणार नाहीं. तेव्हां आजच नगराला जाण्याची घाई न करितां आपण पद्मपुराला जावें व आम्ही शत्रूच्या फौजेचे नगरांत जाण्याचे मार्ग रोकतों. सुज्जी वगैरे प्रमुख वीरांजवळ फारसें सैन्य उरलेलें नाहीं. तें हिंम्या करून आलेच तर परभारें सैन्य व स्वार यांच्यासकट अडविलें गेल्यानें चारपांच दिवसांतच लढण्याची अवश्यकता न पडता, नगरवासी लोक स्वतःच प्रार्थना करून आपणाला नगराला नेतील. '

हें ऐकून भिक्षू व कोष्टेश्वर वगैरेंनी हंसून त्याची थट्टा करीत म्हटले. ' असल्या म्हातारपणींच्या सल्ला पुरेत.' १३९०.

भिक्षाचराच्या लोकांना आतां त्याचेच राज्य झाले, असें वाटलें व ते त्याच्याकडून अनेक शासनपत्रें—सनदा—करून घेण्यासाठीं आग्रह करूं लागले. यामुळें उशीर झाला. तितक्यांत हिमवृष्टीमुळें त्याच्या सैन्याला भारी त्रास होऊं लागला. म्हणून तें नगराजवळ येऊन पोहोंचलेले होते. तेथेंच कांही दिवस थांबले. या अवकाशांत पंचचंद्र सैन्यासह येऊन पोहोंचला तेव्हां त्या असहाय्य राजाला धीर आला.

सुस्सल राजाला त्याच्या जवळच्या राजपुत्रांनीं ऐनवेळीं सोडल्याची भारी लाज वाटत होती. ती बदनामी धुवून टाकण्यासाठीं ते पंचचंद्राबरोबर मोठ्या उत्सुकतेनें व शौर्यानें, शत्रूशीं लढण्यासाठीं बाहेर पडले. हा असा प्रकार अवचित घडेल, अशी भिक्षाचराला कल्पना येण्यापूर्वीच पंचचंद्राने लढाई सुरू केली. भिक्षूकडील बरेचसे लोक लौकरच पडलेले पाहून, त्याच्या फौजेंत चोहींकडे गडबड उडाली व त्याचा पराभव झाला आणि त्याचे लोक पळूं लागले. भिक्षू व पृथ्वीहर यांनीं त्यांना आवरण्याचा प्रयत्न केलेला व्यर्थ गेला आणि त्यांनाहि यःकश्चित सैनिकांसारखें पळून जावें लागलें. तेव्हांच राजाचे लोक त्यांचा चांगला पाठलाग करते तर त्यांच्यांतून कोणीहि बचावला नसता.

भिक्षूच्या सैन्यानें अशी पाठ फिरविल्यावर त्या नव्या राजाच्या प्रभावानें पुष्कळ दिवसांनीं त्या नगराला विधीचें प्रसन्न मुख दृष्टी पडलें. लोकांची समजूत एक तऱ्हेची होती तर दैवानें दुसरीच तजवीज केली. यामुळें भिक्षू व जयसिंह यांना अनुक्रमें अपयश व विजय यांची प्राप्ति झाली. १४००.

पुराच्या पाण्याचा लोंढा एका नदीकांठाला वाहवितो व दुसऱ्याला जमवितो.

त्याप्रमाणें कल्पनातीत व विचित्र करणी करणारा विधाता, क्षणभरांत जमलेल्याला पाडतो व पडल्याला सांवरतो. दुस्सह दावानल दग्ध पहाडी वनप्रदेश शांत होतांच, त्याच्यांतून थकला त्रासलेला नाग बाहेर पडावा त्याप्रमाणें, सुज्जी अनेक आपत्तींतून पार पडून त्या दिवशीं सायंकाळीं येऊन पोहोंचला. त्याचा तळ मेघाचक्रपूर (हें बहुधा मडवराज्यांत असावें.) येथें असतांना त्याला तेथें राजा मारला गेल्याचें कळलें. बरोबरच्या लोकांच्या सल्लेनें तो रात्रीं तेथेंच राहिला. रिल्हण वगैरेंच्या छावण्या शूरपूर इत्यादि जागीं होत्या. ते आल्यावर त्यानें सर्वां-बरोबरच, आडकाठी न घेतां नगरांत जाण्याचें ठरविलें. त्यांना अंधेऱ्या रात्री खूण पटण्या-साठीं, त्यानें आपल्या राहत्या इमारतीच्या माडीवर आगटी पेटवून ठेवविली होती. त्या सेनानायकांच्या लोकांनीं त्याच्या आज्ञा न जुमानतां, ते मनसोक्त भटकले व रात्रींच त्याच्या तळावर येऊन पोहोंचले नाहींत. सुज्जी तेथून पहाटें निघाला. डामर लोक त्याच्या मागें लागले व त्यांनी त्याच्या पिछाडीवर हल्ले चालविले. त्यांनीं त्याला फार त्रास दिला. बरोबरचे बहुतेक वृद्ध, स्त्रिया व बाल, यांना पुढे घालून, पशुपाल कळपाचें रक्षण करीत असतो त्याप्रमाणें, त्यानें त्यांचें रक्षण चालविलें होतें. पन्नास स्वारांनिशी तो वरचेवर मागें वळून त्या हल्ला करणाऱ्यांना तोंड देत असे. याप्रमाणें त्यानें त्यांचें कांहीं वेळ रक्षण केलें. मार्गांत जागजागीं दाट झाडी व द्राक्षाचे मळे होते त्यांच्यामुळे अडचण होत होती. शत्रू त्याला निर्भयपणें त्रास देत होते यामुळें पदोपदीं त्याचे बरेच लोक पडले. १४१०.

आपल्या मालकाच्या उपकाराचे उतराई व्हावें व त्याच्या पुत्राला संकटसमयीं कामीं यावें, म्हणून तो फार धडपड करीत होता. पण त्याला यावेळीं स्वतःचाच बचाव करतां करतां पुरेवाट झाली. हिंस्रपशूप्रमाणें योग्य संधीची वाट न पाहतां व प्राणाचीहि पर्वा न करतां, झांपा घालणाऱ्यांपासून बचावून तेथें पोहोंचण्याचा त्याचा विचार होता.

खडूवी प्रांतांतील दुष्ट व क्रूर डामर त्याला अडवून ठार मारण्यासाठीं पद्मपुराजवळ टपून बसलेले होते. श्रीव्रक हा पुष्कळशा सैनिकांसह खेडी तलालशाह येथून निघून, त्याच मार्गानें येत होता. श्रीव्रक हा यशोराजाचा मेव्हणा होता. त्याला देशत्याग करावा लागला होता (तो यशोराजाबरोबरच भिक्षूला मिळाला होता.) त्यालाच सुज्जी समजून त्या डामरांनीं त्याच्या सैन्यावर हल्ला केला व त्याचे कांहीं शिपायी मारले व लुटले. त्या झटापटींत मेरू व सज्जन नांवांचे शिलेदार मारले गेले व वट्टाचा पुत्र मल्ल, जखमी होऊन कांहीं दिवसांनी मरण पावला. त्या ठिकाणीं उदीप पुरवाल, नांवाचें स्थान होतें. तेथें पूराच्या पाण्यामुळें भारी दलदल झालेली होती. ती पार उतरण्याला मोठें अवघड झालें होतें. श्रीव्रक लढत लढत पद्मपुराच्या बाहेर पडला. त्याला जागजागीं डामर अड-वीत होते. अशा स्थितींत त्याच्या मानेंत एक तीर घुसला. त्यामुळें तो विवश झाला. तेव्हां तो सुज्जी नसल्याचें डामरांना कळलें. तरी त्यांनीं त्याला लुटण्याला कमी केलें नाहीं. पण पूर्वपरिचय स्मरून त्यांनीं त्याला ठार मारलें नाहीं.

या लुटींत मिळविलेली संपत्ती घेऊन जाण्यांत बरेच डामर गुंतल्यामुळें सुज्जीला पुढें मार्गांत अडचण पडली नाहीं. तो पुढें निघून गेला. १४२०.

अरण्यांत भटकत असतांना सुदैवानें कोणी, सापळा व यंत्राचें बाण वगैरे काढून टाकल्यामुळें, एखाद्या सिंहाचें आयुष्य अनायासें व आपोआप वाढावे, तशांतलाच हा प्रकार झाला. सुज्जी सैन्यासह पद्मपुरांतून आपल्या सैन्यासह निःशब्द निघून, त्या दलदलीला पोहोंचल्यानंतर, तो गेल्याचें डामरांना कळलें. त्यांनीं त्याच्या कांहीं प्याद्यांना लुटून, त्यांचीं वस्त्रें व शस्त्रें काढून घेतलीं. पण तिकडे लक्ष न देतां, ती दलदल वलांडून, तो स्वारांना सोयी वार अशा घट्ट जागेवर पोहोंचला. पुढें त्याला शत्रूचें भय उरलें नाहीं. त्यांना तो दुरूनच धाक दाखवून व त्यांची निर्भत्सना करून वाटे लावीत होता. या गडबडींत डामरांनीं लुटींतून टाकलेलें आपलें छत्र घेऊन, तो जलदीनें नगरांत राजाजवळ पोहोंचला. त्यावेळीं त्याचे डोळे भरून आले होते. त्याला वडील भावाप्रमाणें मानून राजानें दुःखोष्ण अश्रू आणि शत्रूची भीतीहि, एकदमच टाकली.

त्याच दिवशी महत्तम अनंताचा पुत्र आनंद, हा लोचनोद्धार येथे मार्गांत डामरांच्या हातून मारला गेला त्याने मंगलकार्ये वगैरेवर त्रासदायक कर बसवून, लोकांना फार नाडले होते, यामुळें त्याच्या मरणाबद्दल कोणाला वाईट वाटले नाहीं.

सुज्जीचा हस्तक भास लोकपुण्य येथून निघालेला, थकून वाटेंत अवंतिपुर येथें अवंतिस्वामीच्या मंदिराच्या आवारात राहिला होता. तसेच कंपनोद्ग्राहक क्षेमानंद पूर्वीच तेथे पोहोचला होता. त्या दोघांनाहि होलदा येथील क्रुद्ध झालेल्या डामरांनीं घेरलें होतें. १४३०. कुलराजाच्या कुलांतील सेनापती इंदुराज याला ध्यानोद्धार येथें टिक्कानें वेढा घातला, तेव्हां तो बाह्यतः त्यालाच मिळाला. पिंचदेव वगैरे इतर सेनानायकांनाहि डामरांनीं क्रमराज्यांत जागोजाग रोंकून टाकले होते.

मोठा वृक्ष उन्मळून पडल्यावर त्याच्या कोटरांतून बाहेर पडून मेलेल्या पक्ष्यांच्या पिल्लासारखी राजाच्या अनुयायांची जागजागीं वाताहत झाली. बर्फांतून अनवाणी चालत असतांना त्यांच्यांतलि पुष्कळांचे पाय गळाले व पुष्कळसे भुकेनें मेले. त्यावेळी नगराच्या मार्गानें चाललेली माणसें नुसतीं तृणाच्छादित आढळत होती. पुढे लौकरच महाअमात्य झालेलें, चित्ररथादिक लोक, यांना सुद्धां निरुपायामुळें अंगावर तृणाचें आच्छादन घ्यावें लागलें होतें.

दुसरे दिवशीसुद्धां सारखी हिमवृष्टी होत राहिली. तिच्यामुळें पक्षी देखील बाहेर पडत नव्हते. या सुमारास भिक्षू वनग्राम (हल्लींचें शमाला–हमल–परगण्यांतलि वनग्राम) येथें होता. तेथून आपले सैनिक तेथेंच सोडून, धन्य हा जयसिंहाकडे आला. भिक्षूकडील सैनिकांचा राजाकडून सत्कार झालेला ऐकून, भिक्षूचे बहुतेक आश्रित नगराकडे जाण्याला तयार झाले.

शत्रूचा त्रास कांहींसा मिटल्यावर सुस्सल राजाच्या चार राण्या सती गेल्या. शत्रूचा हल्ला होण्याची भीती व घनदाट हिमवृष्टी, यांच्यामुळें लोकांनीं निरुपायानें त्या राण्यांना दूरच्या स्मशानांत न नेतां, गडबडीनें राजवाड्यानजीक स्कंदभवनाच्या बाजूला चिता पेटवून दिल्या. त्यांच्यांत चंपाची अप्रतिम सुंदर राजकन्या राणी देवलेखा व तिची बहीण तरल-लेखा, यांनीं जोडीनें प्रवेश केला. देवलेखा राणीला निर्माण करण्यांत विधीच्या रूपनिर्माण चातुर्याचा कळस झाला होता. बल्लापूरवाली गुणोज्ज्वला राणी जज्जला व गर्गाची कन्या राजलक्ष्मी, यांनींहि तेथेंच अग्निप्रवेश केला.

डामरांच्या मतें आपला राजा भिक्षू याला राज्यप्राप्ती न होता जयसिंहाला झाली ती, त्यावेळीं झालेल्या हिमवृष्टीमुळें. बर्फ वितळल्यावर ती पुनः भिक्षूलाच मिळणार म्हणून त्यांनीं जयसिंहाला हिमराज असें नांव ठेवलें होतें.

सुस्सलाचें शिर भिक्षूपुढें येतांच त्यानें त्याच्याकडे भारी तिरस्कार व संतापपूर्ण दृष्टीनें, जणों त्याला जाळतो कीं काय, अशा तऱ्हेनें पाहिलें. त्याशिराची योग्य व्यवस्था लावण्याचा व त्याला अग्नि देण्याचा कोष्ठेश्वर व ज्येष्ठपाल वगैरेंनीं विचार केला. पण तो भिक्षूला खपला नाहीं. जवळचे दुसरे कांहीं लोकहि भिक्षूच्याच मताचे होते. भिक्षूनें त्यांना मना केलें.

हिमवृष्टी थांबतांच तो नगरावर चाल करणार होता. पण अनुयायी तटस्थ किंबहुना प्रतिकूल पाहून त्यानें म्हटलें, ' पृथ्वीहर जिवंत असला तर मी हटकून राज्य मिळवीन, अशी मला आशा होती. तो मारला गेला तर सुस्सलाच्या पश्चात तरी, मींच मालक होईन असें मला वाटत होतें, पण यावेळीं दैवगतीनें माझा तो शत्रू मारला जाऊनहि माझी राज्यप्राप्तीची आशा नष्ट झाली आहे. १४५०. राज्य हें निवळ भोगोप-योगी. त्याला घेऊन तरी काय करावयाचें, माझ्याप्रमाणें दुसऱ्या कोणच्या जयेच्छूची इच्छा सफल झाली आहे! माझ्या वडिलांचीं शिरें सुस्सलाने जमीनीवर पाडविलीं तर, त्याचें शिर आज माझ्या सिंहद्वारीं लोळतें आहे. त्यानें माझ्या वडिलांचें सुख दहा महिने उच्छिन्न केलें तर मीं त्यालाहि दहा वर्षे सारखी नानातऱ्हेचीं काळजी व दुःखें भोगण्याला लावलें आहे. मी आपल्या कर्तव्यांतून मुक्त झालों आहे. म्हणून आतां माझें मन शांत व निस्संताप झालें आहे. आतां मला माझे उरलेले दिवस समाधानांत काढतां येतील.'

नंतर तो टिक्काकडे गेला. टिक्कानें त्याला नम्रपणें प्रणाम केला. त्यानें प्रसन्न होऊन त्याला प्रेमानें सुवर्ण भृंगार, श्वेत छत्र व दुसरींहि बहुमानाचीं चिन्हें आणि इतर इनामें दिलीं. टिक्कानें त्याला पुष्कळसा भरंवसा दिला. त्याच्या मदतीनें पुनः राज्य मिळविण्याच्या आशारूपी पिशाचिकेनें त्याला पछाडलें व त्याच संबंधानें तो विचार करीत राहिला.

लवन्यांनीं सुस्सल राजाच्या प्रेताची आणखींहि दुर्दशा करावी म्हणून त्याच्यावर पाहारा ठेवला होता. त्यांच्यापैकींच सज्जक नांवाच्या एका शिपायाला हें पसंत पडलें

नाहीं. तो सहज त्या प्रेताचा तपास करीत त्याच्याजवळ पोहोंचला. त्यानें पहारेवाल्यांना हांकून दिलें व त्या कलेवराला अग्नि दिला.

सुस्सल राजाला लौकिक वर्ष ४१९४-पासून जणों भूतबाधा झालेली होती. तिच्यामुळें त्यानें सारखा प्रजेचा संहार चालविला होता. १४६०. याविषयीं कोणी देवतेनें संचार केलेल्या देशिकानें पूर्वीच भविष्य केलें होतें, अशी अफवा होती. तें भविष्य खरें होऊन, त्या अन्वयेंच त्याचें शिर, नीचपणें जागजागीं नाचविणाराहि तसाच निजल्या निजल्या मरण पावला, असें म्हणतात.

भिक्षूनें हलकटपणाचें वर्तन करीत उत्कट त्वेषानें तें शिर राजपुरीस पाठविलें तेथें उच्चलाची कन्या सौभाग्यलेखा राणी होती. तिनें तें शिर आणणारांना स्वतःच्या माणसांकडून ठार मारविण्याचा यत्न करविला. तशी राजपुरींत गडबड उडाली. हें पाहून, तिचा पती सोमपाल कोठें दुसरें स्थळीं रहात होता तिकडे तें शिर पाठविलें गेलें. सोमपाल राजा फारच मद्यपी व गांवढळ-ग्राम्य-झालेला, केवळ पशुतुल्य होता. त्याची स्थिती कींव करण्यासारखी होती. तो अगदींच दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणारा बनला होता. त्याच्या मंत्र्यांची स्थिति भारी शोचनीय होती.त्यांनीं आपापल्या बुद्धिप्रमाणें त्या शिराची व्यवस्था करण्यासंबंधानें विचार सुचविले. त्यावेळीं सोमपालाचा भाऊ नागपाल, हा भावांशीं समेट करून, त्याच्याजवळ राहूं लागला होता. त्याच्यावर सुस्सलाचे उपकार झालेले होते. त्याच्या शिराचा असा अवमान होत असलेला, त्याला बरा वाटला नाहीं. 'या पायीं काश्मीरवाल्यांकडून शेवटीं आपणाला त्रास झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी तेथील बहुतेक दूरदृष्टी व सभ्य लोकांना भीती होती म्हणून, त्यांनीं त्या वरिष्ठ राजाच्या शिराचा सत्कार करणें अवश्य होय,' असें सोमपालाला सांगितलें.

दैव उलटून, हलकटांचे प्राबल्य होतें तेव्हांच, जंबूक सिंहाशीं स्पर्धा करतांना आढळतात. १४७०. नंतर त्यांनीं त्या शिराला गोपालपुर येथें कालागरू व चंदनकाष्ठांनीं अग्नि दिला.

त्याला दोन वेळ राज्यपदप्राप्ती व राज्यभ्रंश योग घडले होते. त्यानें समरांगणांत अनेक वेळ जयापजय मिळविले होते. त्याला नाना प्रकारच्या संकटादिकांचे अनुभव आलेले होते. त्याचप्रमाणें त्याच्या मरणाचाहि अद्भुतच प्रकार झाला. शिर एका स्थळीं व धड दुसऱ्याच दूरच्या जागीं जाळलें जाण्याचा प्रसंग दुसऱ्या कोणालाहि घडलेला प्रसिद्ध नाहीं.

टिक्क वगैरे अवंतिपुराच्या मार्गानें नगराकडे निघाले. त्यांनीं, पूर्वीच भासादिक तेथें वेढले गेले होते, त्यांचा नाश करण्याचें ठरवून, तेथें मुक्काम केला. त्यांनीं तटाचा भेद व नाश करण्यासाठीं, आग, शिलावृष्टी व खोदाखोदी वगैरे नाना उपाय व यत्न केले. पण ते सर्व व्यर्थ गेले. मंदिराच्या भक्कम दगडी कोटामुळें आंतील लोकांचा उत्तम बचाव होत होता. ते लोक वरचेवर बाहेर पडून हल्ले करीत व प्रतिपक्षाचे लोक ठार मारीत. यामुळें वेढा घालणाऱ्यांना तेथें राहातां किंवा सोडून जातांहि येणें कठिण झालें.

सवडी सवडीनें त्या चतुर जयसिंह राजानें खडुवीच्या डामरांना द्रव्य देऊन फितविलें व त्यांच्याकडून थोडे लोक ओलीस घेऊन, नंतर सुज्जी व पंचचंद्र वगैरेंना, भासाची सुटका करण्याला पाठविलें. ते अवंतिपुराला पोंहोंचण्यापूर्वीच अघाडीवर गेलेला कथ्याचा पुत्र विजय व दुसरे सेनानायक, यांना पाहून, टिक्क वगैरे भिऊन वेढा उठवून पळून गेले. तमें भासादिकांनीं बाहेर पडून, शत्रूच्या पिछाडीच्या लोकांना मारलें व ते सुज्जीला जाऊन मिळाले.

कंपनेश विजयी होऊन नगरांत परत आला. पुढें इंदुराजहि आपल्या फौजेसह टिक्काला सोडून परत आला. नंतर राजानें चित्ररथाला पादाग्राचा अधिकार दिला व श्रीबकाला खेडीं येथें द्वारपती केलें आणि भासालाहि दुसरें कांहीं महत्वाचें काम दिलें. सुज्जीकडे पूर्वीप्रमाणेंच अधिकार राहिले पण त्यालाहि प्रतिहार लक्ष्मक याच्या तोंडाकडे पहात रहावें लागे. तेव्हां इतर मंत्र्यांची कथाच काय ? प्रतिहार बहुतेक डामरांना प्रिय होता. त्यानें त्यांना अपसांत फितूर करून आपल्याकडे वळवून घेतलें होतें यामुळें राजालासुद्धां त्याच्याच तंत्रानें राहावें लागत होतें. त्याच्याद्वारें राजाकडे न जाणारा, किंवा त्याच्या आश्रयाची अपेक्षा न ठेवणारा, असा शत्रूच्या सैन्यांत कोणीच नव्हता.

राजानें यावेळीं धूर्तपणानें आपलें महत्व व योग्यता झांकून ठेविली होती. प्रतिहाराच्या मताबाहेर तो अन्नगृहणसुद्धां करीत नसे. या योगानें त्यानें प्रथम नगरांत आपली छाप बसविली. पुढें वाव मिळाल्यावर आपल्या या जणों आढीला घातलेल्या नीतिरूपी फलाच्या पक्कदशेची तो वाट पहात राहिला होता.

भिक्षूनें आपल्या पक्षाचे सर्व डामर विजयेश्वरी एकत्र जमवून, शिशिरऋतू–माघ फाल्गून–संपतांच नगरावर चढाई केली. त्याच्या फौजेचा तो अदृष्टपूर्व जम व थाट पाहून डामरांना वाटलें कीं, भिक्षूला निःसंशय राज्यप्राप्ति होणार. म्हणून ते कांहींसे साशंक झाले. त्यांच्यापैकीं प्रत्येकाचें धैर्य व शौर्य, आणि शत्रुत्व व मित्रत्व, यांचा भिक्षूला अनुभव आलेला होता. तेव्हां राज्य मिळतांच तो आपल्यावर उलटल्याशिवाय राहणार नाहीं, असें मनांत आणून त्यांनीं, सोमपालाशीं गुप्तपणें बोलणें चालवून, त्याला राज्य देऊं केलें. त्यानेंहि त्यांच्याकडे आपला वकील पाठविला. सोमपालाचें वर्तन व स्थिति निवळ पशुतुल्य असल्यानें, सर्व राज्यभोग व अधिकार आपल्याचकडे राहतील, असें त्या डामरांना वाटत होतें. या लालसेला बळी पडून व औचित्य दूर झुगारून देऊन, त्यांनीं या काश्मीर मंडळावर अदृष्टपूर्व आपत्ति आणणारें हें घोर पातक करण्याचें योजिले होतें. पण त्यांच्या या बेताला विधीच आडवा आला. ही कल्पनातीत राजगादीची अवनती व विटंबना बाजूला ठेवली तरी, दासभावालाहि अयोग्य असा तो थोडे दिवसहि गादीवर बसणें कसें योग्य झालें असतें ! पलाल पुरुष–बुजगावणें–आपल्या भाजक्या मडक्याच्य तोंडानें चिमण्यांना भिववून साळीच्या शेतांचें संरक्षण करींत असतें, पण तें गहन वनाच्या राखणीला ठेवलें तर, ते वृक्ष तुडवून त्यांचें उन्मूलन करणाऱ्या वनराजांचा कसा प्रतिकार करणार ?

सोमपालाचा वकील भिक्षूजवळ त्याचें अभिनंदन करीत नेहमीं रहात होता. त्यानें गुप्त-पणें डामरांकडून कांहीं माणसें ओलीस ठेवण्याचें कबूल करविलें.

पुढें सुज्जीनें वैशाखांत मोहीम सुरू केली. एकदम नगरांतून निघून त्यानें तात्काळ गंभीरा नदीतीर गांठला. भिक्षूच्या प्रचंड वीरसंघावर त्यानें एकट्यानें जाण्याचें पत-करलें, या बद्दल त्याची तारीफ करावी तितकी थोडीच आहे. दैवाच्या मदतीनें एखाद्या आणीबाणीच्या प्रसंगीं एकटा साहसी वीर, लाख माणसांना भारी होतो. किंवा ते लाख वीर उलटे त्याला हाणून पाडतात. यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

त्या नदीला पूल नसल्यानें सुज्जीला पार उतरतां येईना. दुसऱ्या तीरावरून शत्रू बाणवृष्टी करीत चालले होते.१५००. परस्पर माऱ्याच्या जागा शोधीत, दोन्ही दळें दोन्ही तीरांवर सज्ज व टपून, दोन तीन रात्री राहिलीं होतीं. सुज्जीनें, अवंतिपुराहून नावा आणवून, पूल तयार करविला. नंतर तो आपला घोडा व कांहीं सैनिक यांच्यासह नावेंतून पार उतरला. तेव्हां वाऱ्यानें हलणाऱ्या वृक्षराजीप्रमाणें शत्रूंची चलबिचल झाली. तो तात्काल पैल तीरा-वर चढून गेला. पूल तयार होतांच सर्व फौज पलीकडे गेली आणि तिनें शत्रूंची दाणादाण केली. पळणाऱ्या सैनिकांपैकीं एखादहि शस्त्रधाऱ्यानें मागें वळून सुद्धां पाहिलें नाहीं. घोड्याचें खोगीर सैल झाल्यामुळें, तें सांवरण्यासाठीं कोष्ठेश्वर व कांहीं स्वार क्षणभर थांबले व त्यांनीं तें घट्ट कसलें, इतक्यांत सुज्जीचे सैनिक पाठलाग करीत आलेले दिसतांच ते, झंझा-वातानें उठविलेल्या धुरळ्याप्रमाणें, एकदम नाहींसे झाले. शत्रूंचे सैनिक मारले, लुटले व उध्वस्त केले गेले होते. ते थोडे थोडे ध्यानोद्धर वगैरे गांवीं जमा झाले.

भास पुढें वाढून गेला होता.त्यानें विजयेशासमोरील सेतूनें वितस्ता उतरून, शत्रूला आणखी दूरवर पळवून लावलें. ( विजयेशाच्या समोरच्या पुलाच्या जागीं हल्लींहि एक सेतू आहे. ) कंपनेश रात्रीं विजयेश येथें वस्तीला राहून दुसरे दिवशीं पुढें आलेला पाहतांच, शत्रू ध्यानोद्धार सोडून निघून गेले. १५१०.

तेथें थोडे दिवस राहून कंपनेश देवसरसाला जाण्याला निघाला. त्याच्याकडे टिक्काचे बरेच आप्त, त्याचा पक्ष सोडून, येऊन मिळाले. भोजकाचे पुत्र जयराज व यशो-राज, यांना त्यानें टिक्काच्या ठिकाणीं कायम केलें. असा पाठलाग झाल्यामुळें भिक्षू कांहीं लोकांसह शूरपुराला गेला आणि कोष्टेश्वर व त्याचे साथीदार व सैनिक आपापल्या प्रांतांत परत गेले व विखरले. ही गडबड पाहून सोमपालाचा वकील घाबरला व आपल्या मालकाला नांवें ठेवीत त्यानें ' मला त्यानें वेड्यासारखें या कसल्या कामगिरीवर पाठविलें आहे ? त्यांची ही महत्वाकांक्षा सफल होणें म्हणजे, कोल्ह्यानें सिंहाची स्पर्धा करणेंच होय,' असें म्हणण्याला सुरुवात केली.

त्याच्या मालकानें दांडगाईच्या व दुराग्रही वर्तनानें गमाविलेलें राज्य सुज्जीनें याप्र-माणें थोड्याच दिवसांत त्याच्या पुत्राला परत मिळवून दिलें. नंतर राजानें शमाला वगैरे-कडील डामर, तसेंच भिक्षूला चिकटून बसलेले पौरजन, यांनाहि साम व दान, यांनीं

आपल्याकडे वळवून घेण्याची तजवीज चालविली. राजाचें सामर्थ्य आजमावून नंतर काय तें करावें, अशा विचारानें त्या सर्वांनीं मिळून लढाई चालू ठेवली. तेव्हां दामोदर येथें धुळीच्या जवनिकेच्या आड, वीररूपी नटांचें घोर युद्धरूपी तांडव नृत्य झालें. त्याच्यांत अगणित वीरांचा संहार झाला. त्या युद्धांत सहजपालानें, आपला पिता जखमी होऊन कोष्ठेश्वराच्या हातीं पडला होता, त्याला सोडविलें आणि स्वपक्षाला यशप्राप्ती करून दिली. १५२०. तेथें राजा व भिक्षाचर दोघांनीहि भारी परिश्रम केले. भिक्षूचा न भूतो न भविष्यति असा पराजय झाला. पुढें त्याच्या सैनिकांपैकीं, सकाळचा संध्याकाळीं किंवा आजचा उद्यां, जवळ नाहीं, अशी स्थिति झाली. बहुतेक डामर व नागरिक त्याला सोडून भराभर राजाकडे मिळू लागले. तो त्याचा योग्य आदर करून इनामें देऊं लागला. तेव्हां मनुजेश्वर व कोष्ठेश्वर यांनाहि लालूच सुटून राजाकडे जावें असें वाटूं लागलें. हें पाहून, आपले खाजगी सेवक व अनुयायी यांच्यासह भिक्षू काकरुह सोडून देशांतर करण्याला निघाला. तेव्हां कांहीं प्रमुख डामरांनीं पूर्वपरिचय व प्रेम लक्षांत घेऊन, त्याचें सांत्वन चालविलें. पण त्याचा राग गेला नाहीं व तो थांबलाहि नाहीं.

कोष्ठेश्वर स्वैरिणी पुत्र, त्याला शील मुळींच नव्हतें. त्याची भिक्षूच्या सुंदर राण्यांवर पापदृष्टी होती. पण सिंहाच्या सटा, नागाचा फणा मणी, अग्नीच्या ज्वाळा आणि त्या ओजस्वी भिक्षूच्या पत्न्या, यांना, त्याच्या हयातींत हात लावणें, सारखेंच होतें. त्यांना स्पर्श करण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती.

सोमपालानें जयसिंहाशीं समेट केलेला होता सबब त्यानें आश्रयाखालीं आलेल्या भिक्षूला आपल्या अमलांत आश्रय दिला नाही. उलट त्याच्या प्राणावर बेतेल अशा खटपटी चालविल्या. हें पाहून भिक्षू चोहीकडून कचाटींत सांपडला. शेवटी तो त्या देशाच्या सरहद्दीवरील दुर्गम भागात असलेल्या सुल्हटी नांवाच्या गांवाला गेला.

त्रिगर्त देशांत देवांना देखील दया, चंपामध्ये शील, मद्रमंडलांत औदार्य आणि दार्वाभिसारामध्यें भलेपणा, यांचा अभाव असतो, हें प्रसिद्धच आहे. ( मद्रमंडल=बियास व जेहलम नद्यांमधील पंजाबच्या मध्यभागाचें प्राचीन नांव. )

भिक्षूच्या मंत्र्यांनीं त्याला म्हटलें, 'आपण निघून गेल्यावर राजा डामरांना त्रास देईल. म्हणजे ते स्वतः होऊन आपणाला राजा होण्याविषयीं प्रार्थना करतील. सबब तूर्त थोडे दिवस आपण नरवर्म्याच्या आश्रयाला जाऊं.' पण ही योग्य सल्ला त्याला रुचली नाहीं. पुढें त्याच्या सासऱ्यानें त्याला थोडयाशा परिवारासह, आपल्याकडे येऊन राहण्याला बोलाविलें. तेव्हां त्याला बाकीचे सैनिकहि सोडून गेले.

नंतर थोर थोर प्रबल डामरांनीं नगरांत प्रवेश केला. तेव्हां, सुलभ व शुभलग्नावर जणों त्यांच्या वरातीच निघत होत्या. प्रत्येक डामराचा थाट राजाच्यावर ताण होता. त्यांच्यावर छत्रें धरलेलीं होतीं. त्यांच्याबरोबर स्वारीचे व सामानाचेहि कितीतरी चांगले चांगले घोडे होते. हा त्यांचा थाट पाहून, लोकांना, सुस्सल राजानें त्यांच्या विरुद्ध दाखविलेलें धैर्य व शौर्य

यांचें अधिकच कौतुक वाटलें. त्या डामरांमध्यें रूप व वेश यांनीं विलक्षण शोभत असलेला कोष्ठेश्वर हा स्त्रियांच्या डोळ्यांत विशेष भरत होता. देशांतील गडबड शांत झाली होती. यामुळें रणवाद्यांच्या गजरांत, डामरांच्या अनेक टोळ्यांच्या मिरवणुकी चोहीकडे निघालेल्या दिसत होत्या.

मडव राज्यांतील सेनासमूहामुळें भयंकर व प्रबल अशा क्षीर वगैरे डामरांना लक्ष्मकानें राजाकडे वळवून घेतलें. त्याच्यावर राजाची पूर्ण मर्जी होती. यामुळें सर्व राजसेवकांना सुद्धां त्याच्या घरीं प्रवेश मिळणें बहुमानाचें वाटत होतें. १५४०. लवन्यांच्या हातून गांवचे गांव लुटलें व जाळले गेले होते. यामुळें, तो राजा कुबेराप्रमाणे संपन्न समजला जात होता तरी, त्याला अतोनात खर्च करावा लागत असलेले ते दिवस, दुष्काळांतील दिवसांप्रमाणें काढावें लागत होते. त्यानें विदेशी बाह्य दरबारी लोक कमी केले आणि योग्य अशा डामरांना आंत–दरबारांत–सामिल करून घेतलें, सुस्सल राजाचा घात करणाऱ्या तिष्य वैश्य अर्धदेव वगैरेंच्या आप्तइष्टांना, त्यानें, राजद्रोहाला उचित असें देहांत शासन केलें. पित्याच्या मरणापासून चार महिन्याच्या आंतच त्यानें सारे राज्य स्वतःच्या ताब्यांत आणलें. पण यावेळीं नगरांत कांहीच कळा उरली नव्हती. लोकामध्यें अगदी त्राण नव्हतें. सर्वत्र डामर मंडळी पुंडराजासारखी, सतत धुमाकूळ घालीत होती. सर्व त्रास व भार सहन करण्यालायक शत्रू भिक्षू जवळच होता. मंत्री, सामंत, आंतर व बाह्य दरबारी, बहुतेक शत्रूला अनुकूल होते. राजाकडे कोणीहि योग्य मंत्री सल्ला मसलत देणारा नव्हता. सारे राजसेवक द्रोहवृत्तीनें व अधर्मानें वागत होते. जयसिंह राजाच्या कारकिर्दीच्या प्रारंभींची ही स्थिति, पुढील गोष्टी वर्णितांना व वाचतांना ध्यानांत ठेवली पाहिजे; तरच विवेकी लोकांच्या लक्षात त्यांचें खरें रहस्य येईल.

या ठिकाणींच या राजाच्या अंगच्या अनेक चांगुलपणांचे वर्णन करणें बावगे होणार नाहीं. पुढेंहि त्याचें तें वर्णन जागजागीं येईलच. पूर्वापार संबंध, कथा व दृष्टांत लक्षांत ठेवून व त्याचा दाखला घेऊन लिहिलेलें थोरांचें चरित्रच वाचण्या योग्य होत असतें. १५५०. पण राजाच्या अंगीं खरोखर असलेल्या गुणांचें यथावत वर्णन प्रत्यक्ष पाहून केलें असलें तरच ते निःपक्षपाताचें होत असतें. सामान्य राजपुरुषांच्या अंगच्या गुणांचें यथार्थ ज्ञान करून घेणें देखील अशक्य असतें. अशा स्थितींत, या जयसिंह राजासारख्या, अतिमानुष गुणांनीं युक्त राजासंबंधीं तें ज्ञान कोण प्राप्त करून घेऊं शकतो? स्वतःच्या निंद्य आचरणामुळें न्यायबुद्धि दूषित झाली असेल त्याला, खऱ्या पतिव्रतेचें निरपवाद श्रेष्ठ व मनोहर महत्व कळणें अशक्य असतें. खऱ्या पतिनिष्ठ पत्नीचें थोर महत्व, उन्नतींत व अवनतींतहि सारखा टिकणारा मित्र, उत्तम वर्णनशैली आणि प्रतिभा यांनीं युक्त अशा कवीची खरी योग्यता आणि साऱ्या प्रजेचा मित्र असा राजा, यांचें महत्व कोणालाहि कळणें कठिणच होय. तेव्हां या असामान्य गुण व अवगुण दोहोंनीं युक्त अशा राजाच्या विलक्षण स्वभावाचें यथार्थ ज्ञान प्रत्येक माणसाला कसें होणार? त्याच्या अंगीं बरे, तसेंच वाईट गुण व दोषहि होते. पण त्या सर्वांच्या एकंदर परिणामाकडे लक्ष देऊन पाहतां, लोकांनीं त्याला दोषयुक्तच मानलें

आहे. अभ्राची अशी एकहि गोष्ट नसतें की जिच्यापासून दुसऱ्याला फायदा नाहीं. त्याच्यांतील विजेची चमक नेत्रांना पीडा करते, तरी तिच्यापासून कांहीं वनस्पतींची पुष्पें उमलतात. त्याच्या दीर्घ व कर्णकटू शब्दांमुळेहि दुसऱ्या कांहीं वनस्पती पैदा होतात. तरी वेडे लोक त्यांच्यापासून पर्जन्यवृष्टीशिवाय दुसरा कोणचाहि फायदा व गुण नाहीं, असें प्रतिपादित असतात.

या राजाच्या अंगी श्रेष्ठ व सर्वातिशायी गुण होते, असें त्याला प्रत्यक्ष पाहिलेल्या लोकांनीं लिहिलेले वाचून, तसे गुण पूर्वीच्या राजांच्या अंगीं असल्याविषयीं लोकांची खात्री पटेल.

दिग्गज आपलें चर्म हलवितो तेवढ्यानेंच जागजागीं भूधर कंपायमान होतात. तसा तो राजा बसल्या जागींच नुसत्या भूभंगानें, इतर भूभृत राजाना कांपवीत असे. सागर और्वानलाची आग पोटांत दाबून ठेवतो. तसे इतर राजेलोक त्यांच्या भयामुळें होणारें दुःख मनांतच ठेवीत असत आणि त्यांच्या फौजा सागरगामी नद्यांच्या ओघाप्रमाणें शब्द करीत येऊन, त्याच्या सेनेंत सामील होत असत. तो राजा प्रतिसूर्याप्रमाणे तळपत असे. त्याच्या प्रखर तेजापुढें पूर्वकालीन अनेक राजचंद्रांचें तेज फिकें पडलें होतें. १५०० उत्तम कारागिराने घडलेली शिवमूर्ती, नेहमीं पाहणाऱ्याकडेच दृष्टी दिलेली दिसत असते. तसे त्या राजाकडे पाहणाऱ्या प्रत्येक माणसाला तो आपल्याकडेच पाहातो आहे असें वाटे. त्याचा कृपाप्रसाद स्थिर होता. दिलेली वस्तू तो कधीं परत घेत नसे. शरण आलेल्या शत्रूचें सर्व भय तो नष्ट करी. त्याच्या हातांतील तलवारीच्या पात्यांत पडलेल्या त्याच्या प्रतिबिंबाकडे, त्याच्या शिवाय दुसऱ्या कोणाची पाहण्याची प्राज्ञा होती ? त्याच्या मेघगंभीर आवाजाची सर काय ती त्याच्याच प्रतिध्वनीला येत असे. तो रागांत सुद्धां कटु व कठोर बोलत नाहीं. कृपाणाला एकच कायम धार असते तसा त्याचा शब्द सारखा कृपार्द्र व कुशल परिणामीं असतो.

हा अकुजन्मा राजा नेहमीं मंगलप्रद असतो. कुज मंगळाप्रमाणें त्रास देत नाहीं. त्याचा आश्रयास आसरणारे–अकुजन्म–भूमीवर पैदा न होणारे–अशा कल्पतरूंच्या नित्य नव्या व प्रफुल्लित कोंबाप्रमाणें प्रबल सतेज व जोमदार असतात.

त्याच्या विलक्षण बुद्धिमत्तेची त्याच्या मंत्र्याना प्रत्यही साक्ष पटत असे. तो त्यांची सल्ला नेहमीं लक्षपूर्वक ऐकत असे. एश नांवाचा वृक्ष स्वतःच्या शेजारीं इतर झाडें वाढूं देत नाहीं. त्याप्रमाणें लक्ष्मक अमात्यानें अधिकार हातीं येतांच इतर मंत्र्यांना पुढे येऊं दिलें नाहीं. त्यानें हळूं हळूं सर्व मंत्र्यांना कट्ट तृणाप्रमाणें उपटून टाकलें. फक्त जनकसिंहापुढें त्याचें प्रथम कांहीं चाललें नाहीं. कारण तो लहानपणापासून राजाबरोबरच वाढलेला, त्याचा प्रिय बालमित्र असून, चांगला कर्तृत्ववान होता. त्याचे पुत्रहि तरुण व कर्ते होते. त्यांच्याशीं शरीरसंबंध करून अपसांत मेळ करण्याची लक्ष्मकानें खटपट केली. पण जनकसिंहाचा पुत्र छड्ड, हा मोठा उन्मत्त होता. त्यानें त्याचा तिरस्कार केला. १५७०. त्या-रागावर लक्ष्मक त्याचा सूड उगविण्याची संधी पाहूं लागला. त्यानें राजाजवळ कागाळ्या

कर करवून त्याच्या मनांत, जनकसिंह व त्याचे पुत्र यांच्याविषयी गैरसमज व द्वेष पैदा करविला.

जनकसिंहाचे दोघे पुत्र राजाच्याच वयाचे होते. राजा गादीवर आल्यानंतरहि ते आपल्या आईच्या वशील्यावर त्याच्याशीं अश्व, पालख्या, वगैरे वाहनें व इतर सरंजाम आणि स्नान, पान, खान, इत्यादिकांत, खुद्द राजवाड्यांत राजकीय थाटानें वागत व राजाची जणों स्पर्धा करीत. यामुळें त्यांच्या कागाळ्या होण्याला जागा झाली होती.

गादीवर बसल्यानंतर पूर्वीच्या बरोबरीच्या लोकांशीं राजानें सलगी कायम ठेवणें ठीक नसते. कमळें उमलल्यावर त्यांच्यावरून बेडकांनी उड्या मारीत राहणें अर्थातच अवमानकारक होतें.

जनकसिंहाच्या प्रतिस्पर्ध्यांना आपल्या कुशळ चित्रकर्माला अशी ही आयतीच भिंत सांपडली. त्यांनीं खोटी नाटी निंदा करून त्या सर्वांविषयीं राजाचें मन फारच कलुषित केलें व तो त्या तिघांचा तिरस्कार करूं लागला.

राजा कृतज्ञ होता सेनापती सुज्जी विजय मिळवून आला होता. त्याचा बहुमान करण्यासाठीं तो श्रावणांत विजयेश्वराला गेला. तोंवर शूरपूराचा द्रंगाधिपती पिंचदेव यानें उत्पलाला दुर्गम पहाडांत गांठून ठार मारले होते उत्पल पुष्याणनाडहून बंड उभारण्यासाठीं परत येत होता. पिंचदेव सहज आपल्या घोड्याचा तपास करीत असतांना त्यानें अवचित उत्पलाला गांठलें. उत्पलाच्या गुडघ्याला बाण लागून तो पडला होता. तरी त्यानें शत्रूच्या एका शिपायाचा, तो जवळ येतांच, समाचार घेतला होता. (काश्मीरांतील पहाडांत आषाढ, श्रावण व भाद्रपद या उन्हाळ्याच्या महिन्यांत घोडे व तट्टे, यांना उंच बर्फाच्छादित पर्वतप्राय प्रदेशाखालीं असलेल्या मर्ग किंवा कुरणें यांच्यामध्यें मोकळेपणीं चरावयास नेऊन सोडण्याची जुनी चाल अद्यापि चालू आहे.)

सुज्जीचा बहुमान करून परत येतांना, राजानें अवंतिपुरास मुक्काम केला असतांना, द्रगाधिपानें उत्पलाचे शिर त्याच्या द्वारापुढें अर्पण केलें. १५८०. पिंचदेव आपल्या दाढीला गांठ देत असे. (द्राटिका=दाटी या अर्थानें हा शब्द मनुस्मृती अध्याय ५, श्लोक २८३, यांत उपभोगांत आलेला आहे.) तो शत्रूचीं शिरें फोडण्याचा जणो भारी हातोडाच–घणच–होता उत्पलाला मारून त्यानें जणों राजाच्या हृदयात सारखें सलत असलेलें शल्यच नष्ट केलें होतें. या स्वारींत, राजानें आपल्या प्रथमच पुढें आलेल्या शत्रूचा, असा फडशा पाडलेला पाहून तो आपल्या साऱ्या शत्रूंचें खास उन्मूलन करील, अशी लोकांना खात्री वाटली.

राजानें नगरांत परत येतांच जनकसिंह वगैरेंना कैदेंत टाकलें. हें पाहून दुसरे विरुद्ध पक्षी लोक पळून गेले. त्यांतील कांहींनी कोष्ठेश्वराच्या मनांत राजाविषयीं भीति पैदा केली. तसा तो व दुसरीहि कांहीं मंडळी राजाविरुद्ध झाली. त्या थोर व निरलस राजानें कार्तिक मासांत शमाला प्रांतांत जाऊन जागजागीं नेटानें व त्वेषानें लढणाऱ्या पुष्कळशा शत्रूवर

हल्ले केले. सुस्सल राजा व त्याचे पराक्रमी वीर, यांचा पूर्वी हाडिग्राम येथें पराभव झाला होता. तो गांव सुज्जीनें जाळून टाकला.

राजाचा जोर पाहून कोष्ठक वगैरेंनीं भिक्षाचराला परत बोलावलें. तसा तो राज्य-तृष्णेंमुळें एका दिवसांत पंधरा योजनांची मजल मारून शिलिकाकोट्ट नांवाच्या पहाडी गांवी पोहोंचला. महत्वाकांक्षेनें प्रेरित असल्यामुळें त्याला या दीर्घ प्रवासांचे परिश्रम, क्षुधा, तृषा, शत्रुभय, कांहींच जाणवलें नाहीं. तो मोठा धीर वीर होता. उलटया वाऱ्यानें रथा-वरील पताका मागें उडत असते तद्वत, दैव प्रतिकूल असेल त्या महत्वाकांक्षी पुरुषाला विज-यश्री विमुख राहाते. १५९०. एखाद्याला नुसता कार्यारंभ पुरे होतो, तर दुसऱ्याचे सर्व दीर्घ व उत्साहयुक्त प्रयत्न व्यर्थ होतात सागरमंथनसमयीं मंदराचलाचा नुसता स्पर्श होतांच अमृत निघालें. पण हिमवानाचा पुत्र–मैनाक–त्याच सागरांत सारखा बुडून बसला आहे तरी व्यर्थ. नदी उगमापासून निघाल्यावर थेट सागराला जाऊन मिळते. तेथें भरती-मुळें तिच्या पाण्याने उलट खाल्लेली दिसलीं तरी तो निवळ भ्रम होय. दैवानें खालीं पाड-लेल्याची पुन. उन्नती होत नाहीं.

भिक्षूने बल व स्थैर्य दाखविण्याची कमाल केली. तरी प्रारंभापासून त्याला दैव प्रति-कूलच राहिलें. पृथ्वीहराचा धाकटा भाऊ मनुजेश्वर, याचा भिक्षू येण्यापूर्वीच पराभव होऊन, त्यानें आपली अंगुली कापून घेतली व तो राजाला शरण गेला होता. ( अंगुली कापून नजर करणें हें बिनशर्त शरण जाण्याचें चिन्ह होतें. याचा जागजागीं उल्लेख आलेला आहे. कैद झालेल्या माणसालाहि अशा रीतीनें हक्काने जीवदान मागतां येत होतेसें दिसते. )

भिक्षू आल्याचे कळताच कोष्ठेश्वर व मनुजेश्वर हे त्याच्याकडे गेले. पण ते मंत्र घातलेल्या सापाप्रमाणें निर्जीव झालेलें होते. त्यांच्या हातून कांहींच कार्य होण्याजोगें नव्हतें. या दीर्घ प्रवासानंतर त्यांनीं त्याला दुसऱ्या एका स्थळीं विश्रांतीसाठीं जाण्यास सांगितलें. तसा तो कर्कोटद्रंगाच्या मार्गानें सुल्हरी येथे गेला. कर्कोटद्रंग तोस मैदानाच्या मार्गानें लोहरला जाण्याच्या वाटेवर होता. हल्लीं तेथें बिरु परगण्यांतील द्रग नांवाचें लहानसें खेडें आहे. तिकडे तो बरेच दिवस काश्मरिावर स्वारी करण्याचा उत्कट इच्छेनें धडपडत होता. उत्कट आत्मविश्वासामुळे त्याचे बाहु स्फुरण पावत होते. पूराचें पाणी बाहेर पडण्यासाठीं मार्ग व अवकाश पहात असतें, तद्वत तो काश्मीरांत शिरण्यासाठीं सोईवार संधी पहात होता. इकडे राजा नगरांत पोहोंचून त्याच्या प्रतिकाराची योजना करीत होता.

लक्ष्मक अमात्य सर्वांत श्रेष्ठ व अद्वितीय होता. त्याला सुज्जीचा गर्व व उद्दामपणा सहन होईना, म्हणून त्यानें त्याच्याविरुद्ध जोरानें खटपट चालविली.

धंन्याचा वडील बंधू उदय हा गंगास्नानास जाऊन देह पुनीत करून आला होता. त्याच्यावर त्या चंचलचित्त राजाचें प्रेम व दृढविश्वास बसला. १६००. त्याच्या आप्त

मंडळीशीं राजाचा पूर्वीपासून चांगला घरोबा होता. तो त्यांना फार मानीत असे. त्यांना सरकारी कामें व अधिकार न मिळाल्यामुळें ते नाराज होते. जयसिंहानें वडिलाच्या वेळच्या मंत्र्यांवर सर्व राज्यकारभार सोंपला होता. या वेडगळ मंडळींना आपली पाळी येईपावेतों दम धरवेना. सुज्जीचा पाडाव करण्याच्या खटपटींत गुप्तपणें गुंतलेल्या लक्ष्मकानें त्या कामीं या मंडळींचा बरा उपयोग होईल म्हणून, त्यांच्याशीं बुद्धया नवीन मेळ केला व त्यांना आपल्या पक्षांत मिळवून घेतलें.

पुढें थोडया महिन्यांनीं राजाला दुर्दैवानें एकाएकीं लुता-देवीचा-रोग झाला व तो पुढें वाढतच गेला. त्याच्या सर्वांगावर फोड उठले. अतिसार, अपचन वगैरेहि सुरूं झाले. तो बरा होण्याची आशा कमी दिसूं लागली आणि राज्यांत गडबड सुरूं झाली.

राजाची अशी अवस्था झालेली, मागें दुसरा कोणी वारस नाहीं, शत्रू प्रबल झालेले, अशा स्थितींत, शत्रुपक्षीय डामरांना तें राज्य नष्टप्राय वाटूं लागलें.

या प्रसंगीं कांहीं तरी योग्य तजवीज करणें अवश्य होतें म्हणून सुज्जीनें, राजा जयसिंह व श्रेष्ठ अशी राणी गुणलेखा, यांचा पांच वर्षांचा पुत्र परमांडी याला गादीवर बसविण्याचा विचार केला आणि परमांडीचा मामा गर्गाचा पुत्र पंचचंद्र, याच्याशीं मसलत चालविली. ही संधी साधून लक्ष्मकानें आणि त्याच्याच चिथावणीनें धन्य वगैरेंनीं सुज्जीविरुद्ध राजाचे कान भरले. त्यांनीं त्याला म्हटलें कीं, 'आपण अशा आसन्न मरण स्थितींत असतांना, सुज्जी व त्याचे पुत्र, यांनीं आपला द्रोह करीत पंचचंद्राशीं सारखें खलबत चालविलें आहे.' राजाला हें खरें वाटलें. १६१०. विधात्याप्रमाणे अपूर्व, असें वस्तु तत्वाचे वर्णन करून, तज्ञ लोक कौतुक उत्पन्न करीत असतात. राजे लोक बहुतेक कोत्या बुद्धीचें व दुसऱ्याच्या नादाने वागणारे असतात. त्यांच्या चित्तवृत्तीचा कांहींच भरंवसा नसतो. जवळ राहाणारे, स्वतःचे वजन कायम ठेवूं इच्छिणारे, कपटी व लबाड, गर्भदास विट लोक एकांतांत, विलासस्थानीं, व निःशस्त्र स्थितींत, त्यांना घेरून व जणों त्यांच्या अंगांत पिशाच्चसंचार करवून, त्यांना भारून टाकतात. अशा मोहित झालेल्या राजाकडून कोणाचेंहि कसें कल्याण होणार ? हे लबाड विट, सहज हंसत, राजाजवळ येतां येतां त्याच्या नजरेस पडतांच त्याने त्यांना प्रेमानें व प्रफुल्ल दृष्टीनें 'कां कसें काय,' म्हणून म्हटलें कीं, ते ऐटीनें मित्रांना-किंबहुना मान, धन, प्राण, गुण व थोरपणा, या सर्वांनाच-पीळ देत, कांहीं तरी टोंचक उत्तर देऊन, त्या सर्वांवर पाणी पाडीत असतात. ते मोठ्या गडबडीनें येरझारा घालीत, राजाच्या कानात कांहीं तरी कुजबुजून, त्याची आपल्याकडे वळलेली दृष्टी पाहताच, ते साऱ्या जगाकडे अवज्ञेची दृष्टी फेकूं लागतात. त्यांना स्वतःची मुखविक्रिया अनुग्रह वाटते. असले नृपवल्लभ सर्व लोकांना भारी दुस्सह होत असतात. धूर्त व लबाड लोकांच्या हातचें कळसूत्री बाहुलें बनून, त्यांना हवें तसें न नाचणारा, स्थिर बुद्धी, राजा एक तरी कोठें कधीं पाहण्यांत येतो कां ? सेवकांची योग्य परिक्षा करण्याची अक्कल नसल्यामुळें राजेलोकांच्या हातून घडणाऱ्या विलक्षण घातक परिणामांचे यथार्थ वर्णन कोण करूं शकतो ? ही स्थिति, प्रजेचें पाप व दुर्भाग्य यांच्यामुळें, अद्यापिहि कमी झालेली नाहीं.

सुज्जी नेहमीप्रमाणें राजाच्या समाचाराला राजवाड्यांत गेला. तेव्हां त्याचा अविश्वास करून, राजद्वारावर पाहारेकरी ठेवलेले होते. त्याला त्यांनीं रोंकलें. यामुळें त्याला फार वाईट वाटलें. राजाच्या मनांत आपल्याविषयीं दाक्षिण्य व प्रेम असावयाचें, त्याच्या ऐवजी ही विषमता आलेली पाहून, तो खिन्न व उद्विग्न झाला. आरशांत प्रतिबिंब उलटें दिसतें. तशांतलाच हा प्रकार होता. त्याचें राजवाड्यांतलें जाणें येणें कमी झालें. तेव्हां त्या लबाड मंडळीला त्याच्यावरील राजाचें प्रेम पार नष्ट करण्याला, आयतीच चांगली सवड मिळाली.

आस्थानद्विज मंत्र्याचा चित्ररथ नांवाचा कपटी पुत्र, सुज्जीचा एक आश्रित होता त्याच्या खटपटी व मसलतीमुळें राजाचें नुकसान होतें, या सबबीवर, ती मंडळी त्याच्याशींहि विरोध करूं लागली. १६२०. पुढे राजा बरा झाल्यावर त्याच्याविषयीं आनंद प्रदर्शित करीत सुज्जीनें राजवाड्यांत मौल्यवान बक्षिसें वाटली. त्यावेळी राजा आपलें स्मरण करील असें त्याला वाटलें होतें. पण तसें घडलें नाही. राजानें उलट त्याचा पाडाव करण्याचा विचार चालविला. सुज्जीच्या हातांखाली प्रबल फौज होती त्याच्याकडील सरकारी कामें काढून घेतली म्हणजे, त्याच्याकडून विशेष लाभाची उमेद न राहिल्यानें, त्याचे आश्रित अर्थातच त्याला सोडून जातील, अशा विचारानें राजानें लौकरच त्याची कामे दुसऱ्याला दिली. राजस्थानाच्या किंवा मुख्य न्यायाधिशाच्या कामाची माळ धन्याला व सेनापतीचें पद उदयाला मिळालें. खेरी येथील अधिकार रिल्हणाला दिला गेला. याप्रमाणें राजाची नाराजी उघड झालेली पाहून सुज्जीकडे थोडेच आश्रित उरले. तेव्हां तो मानी गृहस्थ, कांहीसा गडबडला आणि सुस्सलाच्या अस्थि घेऊन गंगेच्या यात्रेला निघाला. राजवाड्याजवळून जातांना तरी आपणाला थोपविलें जाईल, असें त्याला वाटलें होते. पण राजा किंवा राजसेवक यापैकीं कोणीच त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं.

त्याला घालवून दिल्याचा लक्ष्मकाला मोठा अभिमान वाटला. तो व्यक्त करीतच जणों, त्यानें आपला पुत्र श्रृंगार याला सुज्जीबरोबर जाणाऱ्या रखवालदार सैनिकांवर अधिकारी नेमून पाठविलें. त्यावरून तो यात आपलें निग्रहानुग्रह सामर्थ्य व्यक्त करीत आहे, असें मनांत येऊन सुज्जीला फार वाईट वाटलें. श्रृंगार हा पीरपंत्साल या घाटापासून परतला आणि तो निष्कपटी सुज्जी हळूहळू पर्णोत्स येथे गेला. सुज्जीचा पुत्र भागिक हा लोहरकोट्ट येथे किल्लेदार होता. त्याला त्यानें तिकडून उतरून घेऊन. १६३०. तो किल्ला लक्ष्मकानें धाडलेल्या, राजाचा धात्रेयबंधू प्रेम याच्या हवाली केला आणि त्यानें राजाच्या मनांतील एतद्विषयक भीति नाहींशीं केली. त्या भागांत उन्हाळ्याचे दिवस ज्वराच्या साथीमुळें वाईट व त्रासदायक असतात. ते त्यानें राजपुरी येथें काढले.

लक्ष्मकानें डामरांना चांगलें दाबात ठेवलें होतें. तो इतर सर्व मंत्र्यांना चेंडू-प्रमाणें वर खाली उडवी पाडीत असे. यामुळें त्याची बरीचशी प्रशंसा झाली. सुज्जीला

प्रतिस्पर्धी म्हणून, त्यानें त्याचा हस्तक, राजवंशी व शूर असा **राजमंगल** याला द्वाराधिकार दिला. आपण त्याला द्रव्यसहाय्य करूं व त्याच्या बलावर तो **सुज्जी**चें नांव पार बुडवील, असें त्या हेवेखोर **लक्ष्मका**ला वाटत होतें. सारीं सरकारी कामें निघाल्यामुळें, **सुज्जी**ला एक-ट्याच नोकरासह व दुःखी कष्टी स्थितींत रस्त्यांतून दीनवाणे फिरण्याचा प्रसंग आला.

मूर्खांना शहाण्याच्या जागीं कोणीहि नेमील. पण पंचमहाभूतांना देखील, योग्य माणसाचे गुण तशा मूर्खांच्या अंगीं घालतां येत नाहींत. श्री**शंकरा**चें शरीर श्रीखंड–चंदन–चर्चण्याला योग्य असतांना, त्याच्यावर ते गडबडीनें अयोग्य असें चिताभस्म उधळतात. पण त्या भुवनत्रयोत्पादन व संहार करण्याला समर्थ **सांबा**लासुद्धां त्या चिताभस्माला चंदनाचा परिमल देतां येत नाहीं.

**सुज्जी**चीं थोरवी व प्रताप यांना पोहोंचण्याजोगी **राजमंगला**ची मुळींच योग्यता नव्हती. हें पाहून **लक्ष्मका**नें **संजपाल**, हा परराज्यांत गेला होता, तिकडून त्याला परत आणण्यासाठीं दूत धाडले. राजाला **कोष्ठेश्वर** आवडत होना असें नाहीं. तरी राज्यकारभा-राच्या महत्वाच्या मानानें राज्यांत कोणी योग्य व प्रबल माणूस नाहीं, असें पाहून त्यानें त्याला अंतरंगांतील मंत्र्यांत घेतलें होतें. १६४०. पुढें त्याने राजाचा विश्वास संपादन केला. राजाचें त्याच्याविषयीं समाधान झालें. तसे त्याला अनेक इनामे देऊन राजानें त्याला खुष केलें. तो **नगरां**त रहात असतांना त्यालाहि लूता रोग झाला होता.

राजकार्याच्या अनुरोधानें राजा आपल्या वर्तनाला बराच आळा घालीत होता. इकडे अवमानामुळे रागावलेल्या **सुज्जी**ला **सोमपाला**दिक राजाविरुद्ध चिथवीत होते. तो मोठ्या ऐटीनें 'अः, आपण नुसत्या एका काठीनें **काश्मीर** मंडळ सहज हस्त-गत करूं,' असें म्हणे. तें राज्य घेऊन **सोमपाला** देण्याचें त्यानें वचन दिलें. **सोमपाला**नें त्याला आपली कन्या व भाची देण्याचे ठरविलें. ते विवाह त्यांनी तात्काळ उरकून घेतले नाहीत, ही त्याची मोठी चूक झाली कारण **जयसिंहा**ने शहाणपणानें सामदामादि उपाय चालविले होते. ते सफल करण्याला प्रतिपक्षाला फुरसत मिळाली. **जयसिंहा**च्या तजविजी आणि **सोमपाला**ला झालेले अपशकुन यांमुळें **सोमपाल** **सुज्जी**कडे दुर्लक्ष करूं लागला.

प्रतिहार **लक्ष्मका**नें **राजपुरी**ला जाऊन, त्या राजकन्यांच्या विवाहाची वाटाघाट करण्यासाठी **सोमपाला**ला सरहद्दीवर बोलावून घेतलें व त्याला **जयसिंहा**ची **कल्हणिका** राणीच्या पोटची कन्या, **अंबापुत्रिका**, देऊन लग्नसमारंभ उरकून घेतला. लग्न उरकून **सोमपाल** परत गेल्यावर, त्या धूर्त व चतुर **लक्ष्मका**नें **सोमपाला**ची भाची, **नागलेखा**, इचें राजाशीं लग्न जुळवून आणलें. या लग्नामुळे **सुज्जी**चा डाव फसला व तो हेमंतांत–मार्गशीर्ष पौषांत–**गंगे**ला जाण्याला निघाला. १६५०.

त्याला **जालंधर** येथें **ज्येष्ठपाल** भेटला. नुकत्याच झालेल्या अवमानामुळें **सुज्जी** अगदीं बिथरला होता. **ज्येष्ठपाला**नें त्याला **भिक्षु**ला मिळण्याचा आग्रह करीत म्हटलें कीं,

'आपण व भिक्षाचर सेनानायक असल्यावर इंद्र व उपेंद्र देखील आपल्यापुढें टिकणार नाहींत. आपणामुळें राज्य मिळालें, त्याचा तसेंच ज्याच्या हद्दींत असतांना आपला अवमान झाला त्याचा, असा त्या दोघांहि राजाचा आपण खूप सूड उगवूं.' हें ऐकून सुज्जीलाहि चेव आला व तो भिक्षूकडे जाण्याला सिद्ध झाला. त्यावेळीं भिक्षू डेंगपालाकडे रहात होता. पण भागिकानें सुज्जीचा निषेध केला व स्पष्ट सांगितलें कीं यजमानाच्या अस्थी गंगार्पण केल्याशिवाय, असें करणें आपणाला योग्य नाहीं.' नंतर सुज्जीनें तीर्थजलावर शपथ घेऊन, 'सुरनदी-गंगेचें-स्नान करून येतांच, मी तुम्हाकडे अवश्य येईन,' असें कबूल केलें व तो तिकडे निघून गेला.

राजा जयसिंह यानें सर्व राज्यकारभार प्रतिहारावर सोंपला होता. पण डामरांवरील मोहिमीं नेटानें चालल्या नसल्यानें राज्याची कायमची सुस्थिती झाली, असें त्याला वाटत नव्हतें. राजाविरुद्ध उठावणी करणाऱ्या प्रत्येक माणसाला, प्रतिहार सामदामानें वश करीत होता व यांत आपण राजावर मोठे उपकार करीत आहो, असेंच तो दाखवीत असे.

सेनापतीनें कालिय डामराचा पुत्र प्रकट याला विश्वासघातानें मारविलें. तसेंच लक्ष्मकानें पुढें सर्व उद्दाम व बेभरवशाच्या डामरांवर सेनापतीकडून हल्ले करविले. १६६०.

डामर मंडळी राजाच्या विरुद्ध झालेली कळताच ती संधी बरी समजून भिक्षाचर हिंवाळ्याच्या प्रारंभाच विषलाटाला पोहोंचला आणि त्यानें सुज्जी गंगेहून परत येण्या-पूर्वीच काश्मीरांत गडबड करण्याची खटपट चालविली पण प्रतीहारानें डामरांना दाबांत ठेविलें आणि लौकरच कडक हिंवाळा सुरूं झाला. यामुळें भिक्षूला काश्मीरावर स्वारी करतां आली नाही. त्याला टिक्कानें बोलाविलें होते. सुस्सलाच्या खूनाच्या पायीं टिक्क व जयसिंह याचें जणों हाडवैर पडलेलें होतें सर्व प्रमुख डामरांकडूनहि भिक्षूला उत्तेजन मिळालें होतें. सुज्जी परत येतांच तो आपणाला खास गादी मिळवून देईल, असें भिक्षूला वाटत होते. त्याची वाट पहात तो बाणशाळा नांवाच्या एका मध्यमशा किल्ल्यांत जाऊन राहिला. तेथून हेर पाठवून सर्व डामर उठविण्याची त्यानें खटपट चालविली.

( बाणशाळा-हल्लींचें बानहाल-ह्यावरून एका घांटीला तेंच नांव पडलें आहे. ती घाटी समुद्राच्या सपाटीपासून ९२०० फूट उंचीवर आहे. काश्मीरच्या पूर्वेकडून दक्षिण भागांत उतरण्याला हीच घाटी कमी उंच व सोपी आहे. या घाटीच्या आसपासच्या प्रांताला पूर्वी विषलाटा म्हणत असत.)

नंतर मित्रांना आनंदवीत व शत्रूला त्रासवीत सुज्जी गंगास्नान उरकून परत आला. जयसिंहानें भिक्षूला त्रास दिला होता. तो व सुज्जी एक होण्यांत स्वतःला व सोमपाला सारखेंच भय आहे, असें पाहून, त्यानें सुज्जीला फितविण्याविषयीं सोमपालाला सुचविलें. या वेळा सोमपाल भ्यालेला होता. सोमपालानें युक्तीनें, आपला वकील जालंधराला पाठविला. तेथें मुक्कामास असलेला सुज्जी, दुसरे दिवशीं सकाळीं भिक्षूकडे जाण्यास निघण्यापूर्वीच, तो वकील त्याला भेटला व त्यानें त्याला सोमपालाचा निरोप कळविला. १६७०.

तो ऐकून त्यानें ज्येष्ठपालाच्या सल्लेनें भिक्षूकडे जाण्याचा बेत बदलला. पण भागिक याच्या विरुद्ध होता. सोमपालानें सांगून पाठविलें होतें कीं, 'माझ्या शिफारसीवरून राजा आपणाला प्रवासांत झालेलें कर्ज फेडील व आपणाला सरकारी काम देईल. सोमपालाचा वकील ही गोष्ट रोज सुज्जीला सांगत असे. त्याचा परिणाम होऊन सुज्जीने भिक्षूकडे जाण्याचा विचार कायमचा फिरविला व तो सोमपालाकडे जाण्याला निघाला.

सेनापती उदय यानें वैशाखांत घांटी वलांडली आणि भिक्षूच्या खश सैनिकाशीं युद्ध सुरू केलें. प्रारंभी त्याची फौज कमी होती. ती हळूहळू वाढलेली पाहून भिक्षूनें बाणशाळा किल्याचा आश्रय केला. तेथें उदयाने त्याला वेढिलें. तोंवर राजा विजयेश्वराला आला होता. तेथून त्यानें उदयाच्या मदतीला फौजेच्या दुसऱ्या टोळ्या पाठविल्या. राजाच्या सैन्यांतील लोक उल्हाट यंत्रांनीं किल्यांत दगडाची व बाणांची वृष्टी करीत होते. त्याचा आंतील लोक दगड खालीं लोटून प्रतिकार करीत होते. राजाचें सैन्य पुष्कळ होतें तरी त्याला या दगडांच्या व भिक्षूनें आपलें नांव घातलेल्या बाणांच्या वृष्टीमुळें खुद्द किल्यावर हल्ला करतां येईना. महिनाभर लढाई चालल्यावर सैन्यानें किल्याच्या पायथ्या-पर्यंतची वाट आपल्या ताब्यांत मिळविली व त्याच्या जवळचे पाण्याचें कुंड व झरा, हस्त-गत केला. आंतील लोकांवर मारा चालेना. पण ते लालची दिसले. त्यांच्यावर राजानें सामदामाचे उपाय चालविले. तेव्हां ते भिक्षूला दगा देण्याला तयार झाले. १९८०.

या मोहिमेचा शेवट लावण्यासाठीं राजानें डामर सरदार मंत्री व राजपुत्र यांच्या-सह प्रतिहार लक्ष्मकाला धाडलें. तसेंच इकडे या भयंकर कोंडीतून भिक्षूला सोडविण्यासाठीं कोष्टेश्वर, त्रिल्लक वगैरेहि निघाले. ( या त्रिल्लकाविषयीं पुढे जागजागी महत्त्वाचे उल्लेख आलेले आहेत. कोष्टेश्वराचा भाऊ तुष्क याची कन्या त्याला दिलेली होती. )

प्रतिहार बानहाल घांटीवर पोहोंचला. तेथून त्याला खालच्या भागांत असलेला बानसाळचा लहानसा व बैठा किल्ला दिसला. त्याच्या जवळपास राजाची भारी फौज पसरली होती. तीहि त्यानें पाहिली. तेव्हां त्याला आपण तो किल्ला सहज घेऊं असें वाटलें. पूर्वीच्या व लक्ष्मकाबरोबर आलेल्या लोकांनीं मिळून मोठ्या उत्साहानें किल्या-वर हल्ला चालविला. पण किल्यांतील लोकांनीं दगडांचा असा जोराचा मारा केला कीं, त्या सर्वांना फजीत होऊन परतावें लागलें व असल्या हल्ल्यानें तो किल्ला हातीं येत नाहीं, अशी त्यांची खात्री झाली. दगडांच्या मारामुळें रक्तबंबाळ झालेलीं हल्ला करणाऱ्या लोकांचीं शिरें, झाडांवरून दगड मारून पाडलेल्या व भोंवतालीं मधमाशा उडत असलेल्या लहान लहान मधाच्या पोवळ्यांसारखीं शोभत होतीं.

त्यावेळीं कोष्टेश्वरानें अवचित मूर्खपणा केला. त्यामुळें तो, भिक्षू व लवन्य, यांचा नाश झाला. आपण अद्वितीय शूर वीर आहों हें दाखविण्यासाठीं त्याने मोठ्या ऐटीनें लढाई चालविली. पण त्यायोगानें भिक्षूचें मरण अलीकडे ओढवलें. त्या संकटसमयीं भिक्षूचा त्या लवन्य कोष्टेश्वरावर विश्वास नव्हता. तरी तो मनाची समजूत करीत होता कीं, आपण

व कोष्ठेश्वर एक आहेत. इतर शत्रूकडील डामरही त्याच्यावर अवलंबून आहेत. तेव्हां डामराचें जमलेलें सारें सैन्य शेवटीं आपल्यालाच अनुकूल होईल. पण वस्तुस्थिति अगदीं उलट घडून आली. १६९०. भिक्षाचर त्या लबाड व कृतघ्न कोष्ठेश्वरावर विश्वास ठेवून आहे. तेव्हां त्याला दुसऱ्या कोणाची उमेद असणार असें ते लोक म्हणूं लागले.

लक्ष्मक मोठा धूर्त व चतुर होता. त्यानें यावेळची परिस्थिति लक्षांत घेतली आणि टिक्कानें सुस्सल राजाचा विश्वासघातानें खून करविला होता. तरी तिकडे दुर्लक्ष करून त्याला पूर्वीचे पद व अधिकार देतों, असें वचन दिले. तसेंच, खशांचा सरदार भागिक, याला मोठालें गांव व सुवर्णादि मौल्यवान देणग्या यांची लालूच दाखविली आणि त्याला भिक्षूचा नाश करण्यास प्रवृत्त केलें. याकामीं भागिकाचा मेव्हणा आनंद हा मध्यस्थ होता. त्यानें शेवटीं टिक्काला लक्ष्मकाकडे नेले तेव्हां त्यानें त्याला त्याचे पूर्वीचे पद देवविलें. टिक्क व लक्ष्मक यांचा हा मेळ पाहून, कोष्ठेश्वर व इतर डामर यांना कळून चुकलें कीं, यांत भिक्षूचें मरण होणार. यामुळें गडबडून जाऊन त्यांनीं भिक्षूला सोडविण्यासाठीं भागिकाकडे दूत पाठवून त्याला सुवर्ण व दुसऱ्या देणग्या देण्याचें आमिष दाखविलें. त्यावर भागिकानें विचार केला कीं, आपण लाच घेऊन भिक्षूला जाऊं दिलें तर, कोष्ठेश्वर वगैरेनींच आपली सुटका केली, असें तो समजेल व या रागावर राज्य मिळाल्यानंतर तो किंवा, डेंगपाल आपला प्राण घेईल. तेव्हां यावेळीं जयसिंगाचा पक्ष धरणेंच श्रेयस्कर होय. त्याप्रमाणें त्यानें उत्तर पाठविलें. तसेंच भिक्षूला निरोप पाठविला कीं, 'शौचकुपात गेल्यावेळीं तेथील एक फळी काढून निसटून जावें,' असे करण्यांत घाण लागणार व कुत्र्यासारखी दुर्दशा होऊन लोकांमध्यें दुर्लौकिक होणार म्हणून त्या मानी भिक्षूनें ही सूचना मान्य केली नाहीं. १७००.

लक्ष्मकाला सावकाश व युक्तीनें काम साधणें ठाऊक होतें. त्याने दुसऱ्या दिवशीं कोष्ठेश्वराला मिळवून घेतलें. नंतर कोष्ठेश्वर सैनिकामध्यें गडबड उडविण्यासाठीं गुप्तपणे त्यांच्याशीं अपमानाचें वर्तन करूं लागला. भागिकाकडील ओलीचे लोक येऊन पोहोंचतांच, लक्ष्मकाच्या सैनिकांनीं उजाडल्या पासून भिक्षूचा पाडाव करण्याचा नेटानें उद्योग चालविला.

राजाचा मुक्काम विजयेश्वरीं होता. तो वरचेवर मोठ्या आतुरपणाने लक्ष्मकाच्या दूतांना, तिकडील हकीकत विचारीत होता.

'मोठ्या महाराजांना दहा वर्षें आटोकाट यत्न व तितक्याच लढाया करूनहि ज्याचा पाडाव करतां आला नाहीं, त्या भिक्षूचा हा बाल राजा व त्याचे हे तरुण मंत्री नाश करणार, हें घडेल तरीं कसें? खश लोक क्षणभरांत धांवून येतील, आणि सहज हंसत खेळत मिळेल तें लुबाडतील. ही मंडळी शत्रूकडून पाडाव होऊन लुटली जाणार, हें खास कोष्ठक त्र्यस्थ व भिल्लक त्याचाच आप्त. तसेंच, हे राजाचे दरबारी लोक भिक्षूच्य उष्ट्यावर पुष्ट झालेले. राजाचे हित साधील असा यांच्यांत नवा कोण आला आहे. खरो खर ही सर्व सामग्री शत्रूसाठींच जमा झालेली आहे.' राजाकडील लोक तंबूंत असें बोल

होते. तोंवर लक्ष्मकाच्या लोकांनीं नागव्या तरवारी हातीं घेऊन त्या किल्लयाला वेढा घातला. तसे तेच लोक पुनः म्हणूं लागले, 'इतके दिवस सारखा त्रासच भोगीत आलेल्या त्या बिचाऱ्या एकाकी भिक्षूचा, आतां हे असा प्राण घेणार! एकट्याच्या भोंवतीं या साऱ्या मोठ्या फौजेनें वेढा घालण्याची यांना लाज कशी वाटत नाहीं'. १७१०. सारें सैन्य सागरासारखें स्तब्ध होतें. त्यांच्या नागव्या तरवारी त्याच्या लाटांप्रमाणें चमकत होत्या. सैनिकांचे चंचल नेत्र त्यांच्यातलि माशासारखे दिसत होते. सारे लोक गोंधळले व घाबरले होते. त्यांना वाटे कीं, भिक्षू कां हवेंत उडून जातो, कां हरणाप्रमाणे या सैन्यापलीकडे पार उडी मारून निघून जातो, कां शेवटीं निर्वाणीला हातीं तरवार घेऊन विलक्षण उत्पातकालीन मेघाप्रमाणें प्रलय वृष्टी करून या सर्वांचा एकदम फडशा पाडतो, काय करतो कोण जाणें.

येथपर्यंत मंत्र्याच्या पक्षाचीच सरशी होती. पण पुढें अडचण उभी राहिली. ती पार पडून यश मिळालें तें, राजाच्या प्रताप व प्रभावामुळेंच. सारे सैनिक वर डोळे करून भिक्षू बाहेर निघण्याची मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात होते. तितक्यांत हातीं नागवी तरवार धरलेला एक वीर किल्लयांतून बाहेर पडला. त्याच्या भोंवतालीं बऱ्याच स्त्रिया होत्या त्या सारखा शोक करीत होत्या. त्यांच्या मागून केशरी रंगाचीं वस्त्रें परिधान केलेले कांहीं लोक होते. त्यांना पहातांच, 'हा पहा भिक्षू किल्ला सोडून निघाला आहे,' असें लोकांनीं म्हटलें. पण तो भिक्षू नसून टिक्क आहे, असें कळले. त्यानें भिक्षूशीं कृतघ्नपणा केला होता. त्याच्या हातून, किंवा हाणामारी सुरू झाल्यावर राजाच्या सैनिकाच्या हातून, मारला जाण्याची त्याला भीती होती. म्हणून तो किल्लयांतून निघाला होता. आपण निरपराधी आहों हें दाखविण्यासाठीं त्यानें तरवार आपल्या पोटांत खुपसण्याचा यत्न केला. पण त्याच्या माणसांनीं त्याला आवरलें. तो आपल्या मंडळींसह निघाला होता. त्याला राजाच्या सैनिकांनीं मधून वाट दिली. त्यांच्यांतून तो जवळच एक पहाडी झरा होता त्यावर गेला. १७२०. किल्ल्यांतून निघून तो एकदाचा तेथें पोंचला तेव्हां त्याचा जीव खालीं पडला. पुढें डामरांनीं आग्रह केल्यावरून तो पुनः आपले खेळ खेळूं लागला. त्यांना चकविण्यासाठीं तो म्हणाला, 'आतां सूर्यास्ताचा समय आहे. भिक्षू थोडावेळ सुरक्षित राहूं दे, कीं डामर लोकांनीं वेढा उठविलाच.' पुढें शस्त्रधारी किल्लयावर चढूं लागले. त्यांच्याबरोबर ओलीसाठीं आलेले लोक होते, तरी त्यांच्यावर किल्लयांतील खशांनीं दगड लोटले. तसे ते थबकले तेव्हां मंत्री गडबडलेले पाहून, लोकांनीं टाळ्या पिटीत व ओरडत त्यांना म्हटलें, 'राजाचे शत्रू या अडचणीच्या व आणीबाणीच्या प्रसंगांतून निसटून गेले आहेत. तेंव्हां या शहाण्यांनीं शत्रूला इतकें द्रव्य चारलें त्याचा फायदा त्या शत्रूला राज्यप्राप्ती करून घेण्यालाच होणार.'

याप्रमाणें सूर्याच्या अस्ताबरोबरच राजपक्षाच्या आवेशाचाहि अस्त होत असतांना लक्ष्मकानें मागें ओलीस राहिलेल्या आनंदाला हें कसें काय, असा प्रश्न केला. त्यानें उत्तर दिलें, 'मी तेथें नसल्यावेळीं एखादी पाणी भरणारी-कुंभदासी सुद्धां असले बेत ढासळवूं शकेल. आतां मी त्या खशांना तोंड कसें दाखवूं'? त्यावर लक्ष्मकानें त्याला स्वतः जाऊन ती अडचण दूर करण्यास सांगितलें. याचें दुसऱ्या मंत्र्यांना हसूं आलें.

राजा मोठा दूरदर्शी होता. भिक्षूला विषलाटाहून डेंगपालाकडून जलदीनें मदत येण्याची भीति होती. म्हणून आपल्या नीतीचें जाळें दूरवर पसरीत त्यानें किल्लेदाराचा मेव्हणा व एक प्रमुख सरदार असा आनंद यालाहि पूर्वीच फितविलें होतें. त्यामुळें अशा गडबडीच्या प्रसंगींहि लक्ष्मक स्वस्थ होता. आनंदाला मोकळा सोडला तरी तो पाळीव पक्ष्याप्रमाणें परत येण्याची त्याला खात्री होती. मंत्री हंसलेले पाहून लक्ष्मकानें त्यांना म्हटलें, 'हा बेत फसला तरी, माझ्या पोक्त योजनेची हेटाळणी करणें ठीक नाहीं. सर्वच बेत फसल्यावर आनंदाला ठेऊन ठार मारण्याचा फायदा काय?

राजाच्या सुदैवानें आनंद सुखरूप वर पोचला व त्यानें किल्यांतील आड येणाऱ्या लोकांना मार्गे परतविलें आणि त्या सशस्त्र सैनिकांना वर बोलावलें. ते वर चढूं लागलेले पाहून, डामरांचे प्राण कंठाशीं आले. मंत्री साशंक झाले आणि अप्सरांची कामेच्छा उत्कट झाली.

भिक्षाचराचे अनुयायी प्रारंभीं, त्याला शेवटपर्यंत साथ देण्याच्या तयारीनें कंबरा बांधीत होते. भिक्षूप्रमाणेंच त्यांनींहि आपल्या नांवाचे बाण मारून प्रौढी मिरविली होती. त्यांनीं विडे खाऊन ओठ रंगविले होते व दाढी मिशा साफ केल्या होत्या. पण भिक्षूचें मरण खास ओढवलेलें पाहतांच त्यांनीं ताबडतोब प्राणरक्षणासाठीं कोष्ठेश्वर वगैरेंच्या डेऱ्यांकडे धांव घेतली.

लक्ष्मकानें फुटकळ सैनिक पाठवून हळूं हळूं टिक्काला घेरविलें होतें. हें पाहून टिक्क घाबरला व त्यानें आपलें बोट कांपून घेतलें. किल्यांत त्याच्यावर खशांनींहि सक्त नजर ठेवली होती, यामुळें त्याला कांहीं दिवस उपास पडले होते.

भिक्षाचर लढण्याला उत्सुक झालेला होता. शत्रूचे सशस्त्र सैनिक येण्याला उशीर लागल्यानें तो त्रासून फाशांनीं सोंगट्या खेळत बसला होता. १७४०. त्या जागेच्या अंगणांत ते शत्रूचे शस्त्रधारी व त्यांचे साथीदार त्याला मारण्यासाठीं शिरले. तसा तो संपत आलेला डाव संपवून, कोणी प्रेमी गृहस्थ आपल्या प्रिय पत्नीशीं खेळत असतांना, आलेल्या मित्राला भेटण्यासाठीं स्वस्थ मनानें उठावा, तसा तो स्वस्थपणें उठला. त्याची चलबिचल मुळींच झाली नाहीं. आज व्यर्थ अधिक माणसें कशाला मारा म्हणून तीरकमान टाकून तरवारच हातीं घेऊन तो बाहेर पडला. पुष्कळ दिवसांच्या काळजीमुळें त्याचे काळे केस विरळ व विस्काळित झालेले होते. त्याच्या वीरपट्टाचे सोगे चमकदार फराऱ्यासारखे उडत होते. कानांतील शंखाकृति मणिकुंडलाची कांती त्याच्या गालांवर पडली होती. कपाळावरील चंदनतिलक दर्पयुक्त हास्यासारखा भासत होता. तरवार नेत्र व अंगांतली तंग वस्त्रें वन्हिशिखेसारखी चकाकत होतीं. तीं वस्त्रें आपल्या फार दिवसांच्या उपयोगाच्या शेवटी त्याच्या पायांत अडखळून जणों त्याच्या पाया पडून त्याचा निरोप घेत होतीं. त्यांच्या कांपत असलेल्या मुखाचे दीर्घ प्रांतभाग त्याच्या लाल अधरोष्ठापुढें आलेले होते. यामुळे त्याचा चेहरा प्रचंड सिंहाच्या सारखाहि दिसत होता. त्याच्या मानेवर पसरलेले त्याचे

केस त्या सिंहाच्या झुबकेदार सटेसारखे शोभत होते. विलक्षण पवित्र्यांवर फिरतांना त्याचें चित्त, नेत्र व हात पाय, एकतानतेनें हलत होते. सहज गंभीर, स्थिर व थोर चालीनें, तो जणों प्रौढपणाची प्रौढी प्रत्यक्ष मानाचे भूषण व प्रभाव, यांचें कायमचें व प्रेक्षणीय दृश्यच बनला होता. त्यावेळी त्याच्या समीप आलेल्या मृत्यूचें एकहि चिन्ह दिसत नव्हतें. असें हे त्याचें स्वरूप, तो बाहेर पडला त्यावेळीं तेथें आलेल्या लोकांच्या दृष्टीस पडलें. १७५०.

त्याच्या पाठोपाठ राजबीजी मधूचा शूर नातू, वीर असा कुमारिय आणि ज्येष्ठपालाचा भाऊ रक्तिय, हे पुढें सरसावले. शत्रूचे लोक जवळच्या लहानमोठया उंच सखल जागांवरून आडून हल्ला करण्याला येत होते, त्यांना भिक्षूचा आश्रित गार्गिक, यानें एकटयानेंच बाण मारमारून थोपविलें होतें. पूर्वेच्या वाऱ्याबरोबर येणाऱ्या गाराच्या सपाटयाला भिऊन हत्तींचा कळप पळूं लागतो, तशी त्या बाणांच्या वृष्टीनें त्या लोकांची गत झाली. पुढे त्या दुष्ट खशांनी दगडाच्या माराने गार्गिकाला जखमी केलें व त्याचें धनुष्य तोडलें. तेव्हां तो मागें परतला. नंतर ते लोक चोहींकडून भिक्षू व त्याचे दोघे सोबती यांच्यापाशीं पोंचले. एक धिप्पाड भालेकरी, भिक्षूचा एकटाच तरवार ठेवणारा नोकर होता, त्याच्यावर धांवला. त्याचें धैर्य तात्काल लक्षांत येण्याजोगें नव्हतें. त्याच्यावर भिक्षूची विशेष मर्जी होती. म्हणून, त्यानें एकदम त्याच्या मर्दतास जाऊन त्या भालेकऱ्याच्या भाल्याची फेंक अडविली व त्याचे केंस धरून त्याला वार केला. तसा तो भारी मोठी जखम होऊन पडला. त्याला कुमारिय व रक्तिक यांनींहि वार केले. तो पडतांच शत्रूच्या लोकांनीं भिक्षू व त्याचे सहाय्यक यांच्यावर जुटीनें हल्ला केला. त्यांनीं निरनिराळीं शस्त्रें धारण केली होती. त्यांसह त्यांनीं त्यांच्यावर उलट मारा केला. तशी त्यांची गाळण झाली. एखाद्या वृक्षाच्या ढोलींतून निघालेला मोठा सर्प पहातांच पोंवळ्यावरील मधमाशा गोंधळून तो वृक्ष सोडून एकदम उडून जातात, त्याप्रमाणे त्या हल्ला करणारांची अवस्था झाली. १७६०. त्यांना भिक्षू व त्याचे दोघे साथीदार, यांना तरवारी वगैरेंनीं मारतां येईना, तेव्हां ते मागें फिरले व त्यांनी दुरून बाणांचा मारा सुरू केला. सिंह पिंजऱ्यातून बाहेर पडतो तसा त्या शरजालांतून भिक्षू बाहेर पडूं पहात असतांना, खशांनीं त्याच्यावर वाडयाच्या गच्चीवरून मोठाले दगड लोटले. त्यांनीं त्याच्या मस्तकाला जखमा झाल्या. तो धावूं लागला तोंच एक बाण त्याच्या बगलेंतून यकृतांत घुसला. तरी तीन पावलें पुढें टाकून तो खालीं पडला. तेव्हां जणों पृथ्वी कंपायमान झाली. तसाच, तोंवर होत असलेला शत्रूचा उत्कट थरकापहि बंद झाला. कुमारियाच्या कुल्ल्यांत एक बाण जोराने घुसून त्याला प्राणांतिक जखम झाली व तो मालकाच्या पायापाशीं पडला. रक्तिकालाहि एक बाण मर्मी लागून, तो निश्चेष्ट पडला. त्या दोघां थोर व कुलीन वीरांसमवेत पडलेला तो भिक्षाचर, विद्युत्पातानें पडलेल्या, विकासित पुष्पयुक्त वृक्षांनीं व्याप्त, अशा पर्वतशिखरासारखा शोभत होता. याप्रमाणें भिक्षाचरानें अगणित

राजे लोकांच्या मालिकेंत सन्मान्य स्थान मिळविलें, अवमानाचें नव्हे. त्याला दैव सारखें प्रतिकूलच राहात गेलें. म्हणून त्याचा नेहमीं पराजयच झाला. तरी त्यानें आपलें अकुंठित शौर्य व प्रताप यांच्या द्वारें अंतकालीं त्या दुर्दैवाला दाद दिली नाहीं. पूर्वीच्या सुसमृद्ध राजाच्या मानानें तो नांवाप्रमाणें भिक्षूच होता नव्हे काय? तरी श्रेष्ठ व वीरांना उचित मरणाच्या बाबतींत ते सारे त्याच्या मानाने दरिद्रीच ठरतात. १७७०.

ते सैनिक आपणाला कृतार्थ मानीत जवळ आले, तेव्हां जखमांनी हताश झालेला कुमारिय हातांतील सुरीनें त्यांच्यांशीं लढूं पहात होता. त्याचें सामर्थ्य पाहून ते सैनिक भ्याले व दूर गराडा देऊन उभे राहिले आणि तेथूनच त्याला व त्या दोघांच्या प्रेताला वार करूं लागले. तसें खशांनीं, त्यांची थट्टा करीत त्यांना म्हटलें, 'अरे मूर्खांनो, या मुडद्यांवर वार करणें पुरें नाहीं कां झालें ?' तरी त्यांनीं भिक्षूच्या प्रेतावर वार चालविलेच होते. रक्तिकाला जबर जखमेमुळें तीव्र वेदना होत असून शस्त्र चालवितां येत नव्हते. तशा स्थितीतच त्या नीचांनीं त्याचा शिरच्छेद केला.

भिक्षाचर राजा लौकिक वर्ष ४२०६–ई. स. ११३० च्या ज्येष्ठ वद्य दशमीला मारला गेला. तेव्हां त्याचें वय तीस वर्षें नऊ महिने होतें.

ज्यांना त्याच्यामुळें दीर्घकाल व भारी त्रास व सर्वत्र नाश सोसावा लागला होता, अशांनीं सुद्धां त्याच्या शौर्याची वाहवा केली आहे. त्याचे डोळे फिरत होते, भिवया हलत होत्या व मुखावर हास्य दिसत होतें. यामुळें त्याचें शिर कांहीं घटकांपर्यंत सजीवसें वाटत होतें. त्याचा तेजस देह स्वर्गांत अप्सरांकडे व दुसरा पार्थिव जलमय जड देह इकडे अग्नींत प्रविष्ट झाला. दुसरे दिवशीं मंत्र्यानीं त्या तिघांचीहि शिरें राजा जयसिंह, विजयेश्वर येथें होता, त्याच्याकडे नेलीं.

लक्ष्मी, कौस्तुभ, ऐरावत, उच्चैश्रवा, चंद्र, अमृत, वगैरे अनमोल रत्नें काढून देऊन सागरानें स्वतःचे वैभव प्रगट केलें. त्या प्रमाणेंच राजा जयसिंहानें आपल्या अद्वितीय स्वभावाचा प्रभाव, नाना तऱ्हेनें प्रगट केला आहे. त्याचें यथार्थ मानववर्णन कोणाच्या हातून होणार? १७८०.

'माझ्या पित्याला ज्याचा पाडाव करतां आला नाहीं अशा या भिक्षूला मी मारला,' असे म्हणत त्यानें अभिमान व्यक्त केला नाहीं किंवा हा राजांच्या कुशींत सारखा सलणारा कांटा एकदांचा निघाला म्हणून त्यानें आनंद मानला नाहीं. त्याच्या अंगीं लबाडीचा लेश नव्हता. तो औदार्याचें जणों आगर होता. यामुळें भिक्षूचें शिर पाहतांच रागानें, 'यानेच माझ्या वडिलांचे शिर देशोधडी नाचविलें होतें,' असेंहि त्यानें मनांत आणलें नाहीं. त्यानें विचार केला कीं, 'प्रत्येकाने स्वतःच्या प्रमाणेंच दुसऱ्याच्या अंगच्या नैसर्गिक थोरपणाकडेच दृष्टी द्यावी, त्यांच्यांत द्वेष व मत्सर यामुळें आलेल्या विकाराकडे नव्हे.' सूर्यकांताची स्वच्छता कायमची असते. सूर्यतापामुळें त्याच्यापासून होणारा दाह आगंतुक असतो. हाय हाय, उत्कर्ष राजापासून एकाहि राजाला स्वस्थपणें मरण आलें नाहीं. या राजाच्या विशेष लोभांतले लोक-

सुद्धां या वेळीं त्याच्या भिन्न व अवशिष्ट–शिराकडे–अगदीं तिराइताप्रमाणें पाहताहेत ! असा दुर्मिळ व थोर विचार करून त्यानें त्या शत्रूच्याहि शिराचा योग्य व सन्मानपूर्वक अंत्य संस्कार केला जावा, अशी आज्ञा दिली. त्याला रात्रीं झोंप येईना. भिक्षूचा विलक्षण उदय व अस्त आणि या संसाराची विलक्षण चंचल स्थिति, यांच्या विषयीचे विचार त्याच्या मनांत सारखे घोळत होते. आतां हजार वर्षेपर्यंत या राज्यांत राजपुरुषांच्या परस्पर द्वेषामुळें व मत्सरामुळें होणारीं युद्धें व झगडे बंद राहतील, असें सर्व लोकांना वाटूं लागलें.

दैव शुष्क व विरळ तृण जाळून त्याच्या जागी दाट व ताजी हिरवळ पैदा करते. तसेंच प्रखर व दुस्सह उष्ण दिवसाच्या अंती थंडगार पर्जन्यवृष्टी करवितें. असल्या विलक्षण व चंचल दैवविलासितावर कांहीच विश्वास ठेवतां येत नाहीं. १७९०. कोणी पराक्रमी वीर, पुष्कळशीं साहसकर्में करून विश्रांति घेणार तोंच, त्याच्यावर पुनः दैव दुसऱ्या साहसाचा भार टाकीत असतें. एखाद्या अश्वाला चाबुकस्वारानें सारखा पुष्कळ वेळ फेरफटका करून थकविल्यावर, त्याचा पाय एका रिकाबीतून निघतांच व त्या खोगरावरील भार हलका झाल्यानें थोडीशी विश्रांती मिळेल अशी त्याला आशा वाटूं लागते तोंच, त्याच्या दुखत असलेल्या पाठीवर दुसऱ्या रिकाबींत पाय देऊन, दुसऱ्याच स्वारानें स्वार व्हावें, असली विलक्षण कृती दैव करीत असते.

याला अनुसरून, तें काश्मीर मंडळाचें राज्य शत्रूच्या त्रासापासून कोठें एक रात्रभर सुटतें न सुटतें तोंच, राजापुढें एक दीर्घ प्रवासानें थकलेला व कष्टी दूत, दत्त म्हणून उभा राहिला. त्याला पाहून मंत्री गोंधळून गेलें. त्यांनीं विचारल्यावरून त्या दूतानें कळविलें कीं, 'ज्याच्या वैरामुळें इतकीं संकटें उद्भवलीं होतीं, त्या भिक्षाचराचा अंत झाला त्याच दिवशी, लोहरकोट्टास बंड झालें. त्या बंडवाल्यांनीं रात्रीं सुस्सल राजाचा पुत्र लोठण वगैरेंना बंधमुक्त करून, लोठणाला गादीवर स्थापन केलें आहे. (लोठन व त्याचा बंधू सल्हण यांना सुस्सल राजानें पुष्कळ वर्षांपूर्वीच लोहरगडावर कैदेंत टाकलें होतें. वडील बंधू सल्हण कांहीं वर्षांपूर्वी इ. स. १११२ त मरण पावला होता. ते सुस्सलाचे सावत्र बंधू होते. लोठणाला दिल्ह नांवाचा एकच पुत्र होता. त्याच्या पुतण्यापैकीं भोजाचा–सल्हणाच्या पुत्राचा–पुढें पुष्कळदां उल्लेख आलेला आहे. त्याचाच दुसरा पुत्र मल्लार्जुन. आणखीहि एक राजपुत्र विग्रहराज, हा सुस्सलाचा दासीपुत्र होता.) लोठण त्याचा पुत्र दिल्ह व त्याचे तिघे पुतणे असें पांचहि राजपुत्र मोकळे झाले आहेत. ते मोठे मानी आहेत. त्यांचा इरादा काश्मिरची गादी मिळविण्याचा आहे व तेथील सारा खजीना त्यांच्या हस्तगत झाला आहे.'

या वेळीं नुकत्याच निमालेल्या दीर्घ संकटपरंपरेतून जयसिंह राजा मोकळा होऊन, त्याला कोठें थोडीशी उसंत वाटत होती. तितक्यांत ही भयंकर विद्युत्पातसदृश वार्ता त्यानें ऐकली. तिच्यामुळें तो दुःखाग्नीत होरपळून जातो, बेशुद्ध होऊन पडतो, शोकाकुल

होतो, हातपाय पसरून जमीनीवर घालून घेतो, किंवा विस्मयमूढ होउन नुसता डोळे ताठून पहात राहतो किंवा काय करतो, हे पाहण्यासाठी सर्व दिक्पालांनीं त्याच्याकडे सूक्ष्म दृष्टी लावली असती तरी, त्यांना त्याच्या चेहऱ्यावर कांहीं एक विकार दिसला नसता. १८००. आजवर आरंभापासून दुसरा कोणीहि राजा अशा संकटपरंपरेत क्वचितच फसला असेल, किंवा तिला अशा तऱ्हेनें न डगमगतां त्याला तोंड देतां आलें असेल. त्या सर्वांनां ती संकटपरंपरा नितांत दुस्सह झाली असती. त्याच्या पित्यानें गेलेले राज्य स्वपराक्रमानें परत मिळविले होतें व त्याने स्वतः पित्याचें सिंहासन शत्रूपासून सोडविले होतें. अशा स्थितींत आतां तो लोहरकोट येथील सर्वस्वाला मुकला होता. एका अप्रसिद्ध, एकाकी व द्रव्य आणि मित्रहीन अशा मुलानें–भिक्षूनें–गादीवर हक्क सांगितल्यामुळें वर्षानुवर्ष संपत्ती, प्रजा व राजवैभव, यांचा फडशा पाडणारी आपत्ती चालू राहिली होती. असल्या व कलहप्रिय काश्मीर मंडलात, त्या एका शत्रूचें निमूर्लन होतें न होतें तोंच, मित्र, दुर्ग, व भरपूर संपत्ती यांनीं युक्त असे सहा शत्रू उठले. शिवाय खुद्द काश्मीरांतील प्रजा बेदिल असून खजीना खालीं झालेला होता.

या राजानें मनोधय दाखविण्यांत, अशा कठिण कसोटीला उतरून थोरपणा व्यक्त केलेल्या राघव–रामचंद्राला–देखील जणो मागे टाकले होते. रामाच्या पित्यानें त्याच्या गुणाची गणना केली. तेव्हां त्याला दिसून आले कीं, 'यौवराज्याभिषेकाला बोलावलें असतांना व तसेच वनवासाची आज्ञा केली असतांना, त्याच्या चित्तवृत्तीत काडीभर फरक पडला नाहीं. नंतर दशरथानें त्याला पत्नी सीता व बंधू लक्ष्मण, यांच्यासह रमणीय वनप्रदेशांत नियमित काल राहून परत आल्यावर पुनः राज्य देण्याचें कबूल केलें होते. याप्रमाणे त्या दोघांनाहि एकाएकीं अत्यंत सुखावस्थेंतून निघून, दुखावस्थेचा अनुभव घ्यावा लागला. तरी दैवगतीमुळे त्यांच्यामध्ये शेवटीं पुष्कळच फरक पडला. १८१०.

या वेळीं दुष्ट विधीने, जयसिंह राजाचीं विजयप्राप्तीची सर्व साधनें नष्ट करून, त्याचा प्रभाव व प्रताप तसल्या साधनसंपत्तीवर मुळींच अवलंबून नव्हता, असें सर्वांच्या जणो प्रत्ययाला आणून दिले म्हणावयाचें. ती साधनसंपत्ती तशी विपुल असती तर त्याच्या विलक्षण पराक्रमाचा इतका गौरव तरी कोण करतां ? त्याचा निर्धार सागराप्रमाणें अगाध होता. त्यानें त्या दूताला तपशीलवार माहिती विचारली. तेव्हां त्यानें कळविलें कीं, 'किल्ला स्वाधीन करून भागिक रवाना झाल्यावर, किल्लेदार मंडलाधिपती, प्रेम, यांनीं मिळालेल्या भाग्याने निश्चित होऊन, किल्ल्याच्या बंदोबस्ताची काळजी घेण्यांत कसर केली. ते ऐषआराम, नटणें, पोषाक, खानपान व स्त्रियाशीं विलास, यांच्यांत गर्क झाले. तसेंच त्यांनी अत्यंत उद्दाम वर्तनाने हाताखालच्या लोकांचीं मनें दुखविली. कैदेंत असलेल्या राजवंशीय पुरुषांना डोळे काढून किंवा अन्य रीतीने निरुपद्रवी करण्याची त्यांची सूचना महाराजांनीं, निकट आप्तपणा लक्षांत आणून, मंजूर केली नाही. तेव्हांपासून त्यांनीं त्यांच्या बंदोबस्ताची खबरदारी घेतली नाहीं. खटपटी, लबाड, महत्त्वाकांक्षी असा

कायस्थ उदयन, प्रतिहार माणिक, आणि भीमाकराचा पुत्र इंदाकर, या मंत्र्यांनीं द्रोह चालविला. प्रेम, हे स्वतःला या जागीं कायम झाल्याचें समजत होतें. त्यांचा खून करण्याचा त्यांनीं पुष्कळदां इरादा केला. पण योग्य संधी सांपडली नाही. पुढें एके दिवशी प्रेम कांहीं कामानिमित्य किल्ल्यांतून उतरून खालीं अट्टालिका येथें गेले.

लोठणांना गादीवर बसविण्याचा आपला विचार त्या कटवाल्यांनीं त्याच्या कुटुंबाला कळविला. किल्ल्यांतील लोकांची खात्री पटण्यासाठीं त्यांनी महाराजांकडून आलेले म्हणून एक खोटेंच आज्ञापत्र तयार केलें. १८२०. त्याच्यांत, 'महाराज मरणोन्मुख असून, त्यांनीं लोठनांना गादीवर बसविण्याची आज्ञा केली आहे,' असें लिहिलें होते. नंतर ते लोठणाकडे गेले. त्यांनीं त्यांना बंधमुक्त केलें व रातोरात किल्ल्यांतून विष्णुसिंह राजस्वामींच्या मंदिरांत नेऊन, तेथें त्यांना राज्याभिषेक केला. तेथें त्यांना सुस्सल महाराजांच्या शारदा राणी साहेबांनीं सहाय्य केलें. ( विष्णुसिंहराज स्वामींचें मंदिर दिद्दा राणींने आपला पिता सिंहराज याच्या नांवानें बांधविलें असावें. त्याची नक्की जागा ठरवितां येत नाहीं. पण तें लोहरगडाच्या पूर्वेस, त्याच्याच पठारीवर, हल्लींच्या चंनन गाझीच्या मशीदीच्या जागीं असावें.) शारदा राणीकडून मिळालेल्या लोहदंडांनी त्यांनीं खजीन्याचीं कुलुपें तोडलीं. तेथील चांडाल जातीच्या चौकीदारांना त्यांनीं द्रव्य देऊन समजाविलें होतें. नंतर त्यांनीं त्या खजीन्यांतून बहुमोल जवाहीर, संपत्ती व दुसऱ्या पुष्कळशा वस्तू काढून नेल्या. या कटांत सेवकांसुद्धां सारे सातच इसम होते.

किल्ल्यांत नगारे व रणभेरी वाजूं लागल्या तेव्हां लोक जागे झाले. अदृष्टपूर्व व राजोचित वस्त्रालंकारानी विभूषित व राजमंत्र्यांनीं वेष्टित अशा लोठनांना मशालींच्या उजेडांत बसलेले पाहून, लोक आश्चर्यचकित झाले. ती शुभ्र चांदणी रात्र उजाडतांच, त्या कटवाल्यांना हल्ला होण्याची भीतीहि उरली नाहीं. प्रेमाचे धाकटे चिरंजीव हे चर्मन व मासिक नावांच्या दोघां ठक्कराजवळ रहात होते. त्यांच्याकडे बरेच हत्यारबंद अनुयायी होते. त्यांना घेऊन तो हल्ला करण्यास येण्याचा संभव होता. म्हणून कटवाल्यांना ही भीती वाटत होती.

शेवटीं सकाळीं ही दुर्वार्ता ऐकून दुःखीकष्टी व दग्ध हृदय झालेले प्रेम ही बंडाळी मोडून टाकण्यासाठीं आले. ते प्रतोलीजवळ पोंचून पुढें जाणार तोंच, प्रतिपक्षाने किल्ल्यांतून पाठविलेल्या सैनिकांनी अटकाव केल्यामुळें त्यांना परतावें लागलें. तेव्हांच मी महाराजाकडे रवाना झालों.'

हें ऐकून राजानें तात्काल लोहर येथील एक मंत्री लुल्ल व आनंदवर्धनाचा पुत्र द्वारपती उदय, यांना तिकडे रवाना केलें. ते तिकडेच जन्मले वाढले असल्यानें, त्यांना तिकडची चांगली माहिती होती. ते किल्ल्यावर चांगली नजर ठेवतील व त्याच्यांत धान्यसामग्री पोंचूं देणार नाहींत आणि आंतील सामग्री संपल्यावर त्यांना तो किल्ला सहज घेतां येईल असें, राजाला वाटलें.

राजा नगरांत परत आला तेव्हां कांहीं शिपायी भिक्षूचें शिर रस्त्यांत दाखवीत लोकांकडून इनामें उपटीत असल्याचें त्याला दिसलें. तेव्हां त्यानें त्यांना खूप धमकावलें व त्या शिराला एकदम अग्नि देण्याची आज्ञा दिली. त्याला–मुख्यतः स्त्रियांनीं त्याच्या आजाच्या हर्षाच्या–स्मशानांत नेऊन अग्नि दिला व त्याच्या साठीं पुष्कळ शोक केला. राजाच्या आज्ञेवरून त्यांना त्या बद्दल कोणी हटकलें नाहीं.

त्या वेळीं उन्हाळा थोडा अगोदर सुरू झाला व मोसम चांगला नव्हता. म्हणून तात्काल यश मिळण्याची खात्री नव्हती, तरी राजानें रिल्हणाची लोहराकडे रवानगी केली. रिल्हण, धैर्य, स्वामिभक्ति, निस्पृहपणा, वगैरेबद्दल प्रसिद्ध होता. लोहर ताबडतोब परत घेण्याची राजाला फार उत्सुकता होती. रिल्हण निदान हें काम तात्काल सुरू करील, अशी त्याला उमेद होती.

या वेळीं न जाणों दुष्ट विधीच्या प्रेरणेनें किंवा लबाड मंत्र्यांच्या मतलबी सल्लेनें फसून, राजा धडधडीत अयोग्य उपाय योजीत होता. त्याच्याजवळ साधनसंपत्ती, मजबूत गड व किल्ले, अथवा योग्य सल्लागार, या सर्वांचा अभाव होता. तरी आपल्या अंमलदारांनीं असल्या कठिण व प्रखर गरमीच्या मोसमांत, आपल्या आज्ञा व त्यांहि न हलविल्या गेलेल्या शत्रू विरुद्ध–एकदम अमलांत आणल्या पाहिजेत, अशी तो भलतीच इच्छा करीत होता.

कंपनापती उदय एकटाच राजाच्या पक्षाला त्याच्यापाशीं राहिला. बाकीचे सारे मंत्री प्रतिहार लक्ष्मक याच्या बरोबर गेले होते.१८४०. लक्ष्मकाच्या सैन्यांत राजपुत्र, डामर तंत्री, स्वार, वगैरेंचा खूपच भरणा होता. त्याच्यापाशीं सामानसुमानाचा पुरवठाहि भक्कम होता. तें सैन्य अल्लालिकेनजीक एका प्रशस्त मैदानावर तळ देऊन राहिलें. लक्ष्मकानें सर्व मार्ग रोंकून शत्रूला शरण आणण्याचा प्रयत्न चालविला होता. लुल्ल वगैरेंनीं किल्ल्यालगत फुल्लपुर येथें तळ दिला होता. त्याच्या सैन्याची तयारी पाहून शत्रूला थरकांप सुटला होता. किल्ल्यांतील लोक अपसांत भांडत होते. उभय पक्षांच्या वरचेवर चकमकी उडत असत.

सुस्सल राजानें लोठणाला कैदेंत टाकल्यानंतर लोठणाची कन्या पद्मलेखा, इला बहुस्थळाचा मांडलीक शूर, याला दिलें होतें. तो आपल्या सासऱ्याच्या सहाय्याला आला. त्याचे लोक वरचेवर राजाच्या फौजेवर हल्ले करीत होते. तो सर्व प्रदेश राजाची फौज व अंमलदार यांनी व्यापलेला पाहून, लोठणाचें चित्त चंचल झाले व तो घाबरून, राजाला शरण जाऊन, तो करील तें शासन भोगण्यास सुद्धां तयार झाला होता.

'आजवर आम्ही इतकीं कामें केलीं आहेत, या खराब मोसमांत याहून अधिक कामागिरी होणें दुरापास्त आहे. सबब आतां परत फिरलेलें बरें. त्यांत कांहीं अवमान आहे असे नाहीं. पुढें पावसाळ्यानंतर मोसम चांगला झाल्यावर जास्त जोरानें मोहीम करून, कसेंहि झाले तरी यश मिळवूं.' असें लक्ष्मक प्रत्यहीं म्हणे, पण तें म्हणणें राजानें व दुसऱ्या कपटी मंत्र्यानीं कबूल केले नाहीं.

उदयन हा लोहर येथें मुख्य मंत्री होता. त्यानें आपला मालक लोठण याच्या मदती-

साठीं पुष्कळचशी संपत्ती देऊं करून, सोमपालाला बोलावणें पाठविलें. १८५०. या वेळीं राजा अनेक संकटांखालीं दबलेला पाहून, त्या नीच व लालची मांडलिकानें, आप्तपणा बाजूस सारून, राजाविरुद्ध कारस्थान चालविलें. त्यानें उदयनाचें म्हणणें मान्य केलें व मनाची अशी समजूत केली कीं, 'लोठणाकडून अधिक लाभ होत असला तर आपण जयसिंहाच्या आप्तपणाकडे काय म्हणून लक्ष द्यावें? त्याच्या अभावी आपण राजाच्या पक्षाचे असल्याबद्दल जाहीर करूं.'

या लढाईंत सुज्जीचें थोडे अंग होतें राजानें सोमपालाला मध्यस्थ घालून त्याच्याकडून भिक्षूला मिळण्याचा विचार रहित करविला होता. राजाच्या वकीलाजवळ त्यानें ठरावाप्रमाणें कर्जाच्या फेडीसाठीं रक्कम मागितली असतां, भिक्षाचर मरण पावला असल्यानें आतां सुज्जीचा उपयोग राहिला नाहीं असें जाणून, त्या वकीलानें उन्मत्तपणानें सुज्जीला झिटकारलें होतें व रक्कम मिळणार नाहीं, असें उत्तर दिले होतें. भिक्षाचर मरण पावला तेव्हां आतां राजाला आपली गरज नाहीं, हें मनांत घेऊन, सुज्जीला कांहीं दिवस भारीच दुःख झालें. इतक्यांत त्याला लोहराकडील भयंकर गडबडीची बातमी कळली. तेव्हां त्याला पुनः पूर्वीचा मान आला. तो फार रागावलेला होता. त्यानें त्या वकीलाला, 'आता पहा राजाचीं व लोठणाची सल्ला करवून देतो.' आणि सोमपालाला 'तुम्हाला लोठणाकडून ठरलेली मोठी रक्कम देववितों' असें सांगितलें. त्या सर्वांच्या बलाबलाचा व परिस्थितीचा उपयोग स्वतःच्या फायद्यासाठीं करण्याचे त्यानें ठरविलें. १८६०. तो आपले थोडेसे लोक बरोबर घेऊन, सोमपालासह घोरमूलक येथें गेला. (घोरमूलक—हें गांव राजपुरीच्या पूर्वेस रत्नपीर नांवाच्या पठारीच्या बाजूला असावें. अभिनंद कृत 'न्याय मंजरी' ग्रंथांत, गौरमूलक असें नांव आले आहे. तें व हें घोरमूलक एकच दिसतें.) तो फौजेंतून निघून गेलेला कोणाच्या लक्षांत आला नाहीं. भौतिक सुखाच्या लालचीनें त्यांनीं आपली सत्यनिष्ठा सोडली व स्वतःच्या विमल यशावरहि असभ्यतेची धूळ उडवून घेतली, म्हणावयाचें! शुभ्र बर्फानें थंडगार झालेलें पाणी प्याल्याने काश्मीरातील स्वादु व पौष्टिक खाद्यपेय सहज पचतें. तें सोडून बाहेरची भुसकट जवाची कोरडी रोटी खाणे त्याला आवडलें नसावें! म्हणून तो हरप्रयत्नाने काश्मीरांत परत जाऊं इच्छित असावा.

या झगडयाचा अंत केव्हां व कसा होणार याचा काश्मीरी सैनिकांना पत्ता लागेना. ते उन्हाळ्यामुळें जणों भाजत होते. सुज्जी एकाएकीं—हल्ला करण्यास—येत असल्याचें ऐकून ते गोंधळून गेले. घरीं लक्ष्मकाबरोबर सुरेखसे कबाब खाण्याला व पुष्पपरिमलानें सुवासित झालेलें थंडगार मधुर मद्य पीण्याला सवकलेले ते लोक, मोठ्या आढ्यतेनें बडबडत होते कीं, 'आतां आपण लौकरच सुज्जीला लढाईत गांठून, त्याची दाढी धरून त्याला ओढीत आणूं!' पण पुढें त्यांनीं कितीहि परिश्रम केले तरी, त्याच्यापुढें त्यांना मुळींच टिकाव धरवला नाहीं. त्यावेळीं सुज्जीबरोबर थोडेसेंच काश्मीरी आणि पुष्कळसे खश व सैंधव

लोक होते. ( सैंधव=सिंधुतीरचे किंवा कदाचित सैंधवारण्यवासी, म्हणजे सैंधव व मीठ निघणाऱ्या पहाडी प्रांतांत, राहणारे लोक असावेत. )

सोमपालानें लोठणाला अधिक पैशाबद्दल तगादा लावला तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, ' यापेक्षां सर्व थोर व मान्य राजे लोकांचा मुगुटमणी, अशा जयसिंह राजाला-माझ्या पुतण्यालाच-असा करभार देणें काय वाईट ? ' याप्रमाणें तिरस्कृत होतांच सोमपाल थोडासा राजाच्या पक्षाकडे झुकला. १८७०. आणि त्यानें सुज्जीला कांहींसे रागानें म्हटलें कीं, 'जयसिंह महाराज माझे श्वशुर. त्यांचे सैन्य त्यांच्या शत्रूशीं सारखें लढत असून,त्यांची मी मदत करण्याच्या तयारीत आहे. तुम्ही माझे आश्रित व अनुयायी, त्यांच्यावर हल्ला करण्याला टपला आहा हें काय ? ' याचीं किंवा दुसऱ्या कशाची व कोणाची त्या मानधन सुज्जीनें मुळींच पर्वा न करितां, राजाच्या फौजेवर हल्ला करण्याची तजवीज केली.

पुढें आषाढांतील भयंकर शीतज्वराच्या सपाटयामुळे लक्ष्मक घाबरून जाऊन रातोरात फौजेसह परत निघाला. फौज गारत होत आहे. हें कळविण्यासाठी त्याने राजाकडे कांहीं शिपायी पुढें धाडले होते. ते सुज्जीकडे पोहोंचले. त्याच सुमारास राजाचे सैनिक त्या घांटीच्या एका बाजूनें व त्यांचे शत्रू दुसऱ्या बाजूने निघाले. तुटलेल्या कडयामुळे रस्ता दुर्गम झालेला होता. त्या सैनिकांनीं शारंबरचा रस्ता शत्रूच्या कबजात होता म्हणून तो सोडून कालेनक घांटीनें स्वदेशीं परत जाण्याचे ठरविले आणि निघालेल्या दिवशीच कांही अडचण न येतां, ते त्या वाटेतील वणिकाबास गांवीं पोहोचले. त्याच्याबरोबर सर्व प्रकारचे लोक निघालेले होते. त्यांच्या मागून निघालेले लोकहि जवळपासच्या खेडयापाडयांत आश्रयाला जाऊन राहिले. तेथें खाणें पाणे उरकून त्यांनीं पूर्व रात्र कांहीं धोका न होतां काढली.

पुढें सुज्जी त्यांच्यावर एकाएकीं चालून गेला. आपण आल्याचें कळण्यासाठी त्यानें रणदुंदुभी वाजविल्या. त्यांचा आवाज ऐकून राजाच्या सैनिकांमध्ये मोठीच गडबड उडाली. सैनिक व अंमलदार सारेच ताबडतोब रात्रीच्या वेळीं पहाडी वाटांनीं धूम पळत सुटले. १८८०. उजाडल्यावर सुज्जीच्या लोकांनीं त्या मंत्र्यांच्या फौजेची लुटालूट चालविली. मंत्र्यांचे सर्व चांगलें व मौल्यवान वस्त्रालंकार लुटून घेतले. भूकंपाने मोठाले कडपे तुटून पडावे व त्यांच्यांतून मौल्यवान जवाहिराचे पाट फुटावे, तशी त्या सैन्याची अवस्था झाली. त्या लुटालुटीच्या प्रतिकारार्थ कोणीहि शस्त्र उगारलें नाही. जो तो स्वतःच्या रक्षणाची तजवीज पहात होता कांहीं सैनिक तांबडया चड्डया नेसलेले, पहाडांत दगडावरून उडया मारीत पळत होते. ते लाल तुंगणाच्या माकडासारखे दिसत होते.कांही वस्त्रावांचून उघडेच होतें. त्यांचे पिंवळट देह, झंझावाताने कोलमडणाऱ्या हरताळाच्या ढेप्यासारखे दिसत होते. कित्येक लठ्ठ भारती सैनिक त्या पहाडी प्रदेशांत हातांतील भाले बरच्या टेकीत व धापा टाकीत, चढत, असलेले कळकांच्या बेटामधून फिरणाऱ्या करिकरभकांसारखे भासत होते. कोणाचीं नांवें कशाला घ्या. पण धैर्य पार सोडून पशुप्रमाणें पळत सुटला नाही असा तेथें एकही मंत्री नव्हता.

प्रतिहार लक्ष्मक गोंधळून गेला होता. तो एका सेवकाच्या पाठीवर बसून पळून चाललेल्या शत्रूच्या शिपायांना दुरून दृष्टी पडला. त्याच्या अंगात वस्त्रें नव्हतीं. त्याची बाहुभूषणें उन्हांत चमकत होतीं. कांहीं शिपायांनीं लागलीच त्याचा पाठलाग केला. सेवकाला दगड लागतांच त्यानें लक्ष्मकाला खालीं उतरलें. त्याला ही एक दगड लागला. तो गुपचिप उभा असतांना त्याला कांहीं शिपायांनीं दौडत येऊन पकडले. तो शरीरानें कृश होता. नुकत्याच पकडलेल्या व आपल्या स्थितीबद्दल शोकप्रदर्शक किलकिलाट करणाऱ्या सारिकेसारखा तो घाबरला होता. त्याच्या किलकिल्या नेत्रांत अश्रू आले असून, त्याचा चेहरा व नेत्र वाघुळासारखे दिसत होते. १८९०. आपण सुज्जीचें धन व मान हरण केलेले. त्याच्या तावडींत आपण सांपडलों. तेव्हां तो आपणाला शक्य तितकी आपत्ती भोगावयास लावल्यावाचून राहणार नाहीं, असें त्याला साहजिकच वाटले. त्या शिपायांनीं त्याला उचलून सुज्जीकडे नेलें. वाटेत तें हंसत खिदळत त्याची थट्टा करीत होते. त्यांनी त्याचा झुब्बा व सर्व अलंकार हिरावून घेतले.

सुज्जी फार थोर मनाचा होता. लक्ष्मकाला तसा आणलेला पाहतांच, त्यानें तोंडावर पदर घेतला आणि 'भद्र राजाचें स्वागत असो,' असे म्हणून, नम्रपणे त्याचें स्वागत केले. नंतर त्याला घोड्यावर बसवून, आपल्या बरोबर, मोठ्या समारंभानें त्याला तो सोमपालाकडे घेऊन गेला. त्यावेळीं त्यानें लुटींत मिळालेले घोडे, तरवारी वगैरे शस्त्रें व तऱ्हेतऱ्हेचे मौल्यवान सामान, खश लोकांच्या डोईवर देऊन बरोबर घेतलें होतें.

आकाशांत मेघरूपी विधीला अनुसरणारें विद्युच्चंचल दैव, मनसोक्त नाच नाचत असतें. तें कोणाजवळ तरी कधीं स्थिर राहिलें आहे ? थोड्याच दिवसांखालीं सोमपाल वगैरे राजे लक्ष्मकांपुढें सेवकांप्रमाणें आदबीनें भोजनादिक करीत असत व त्याला स्वतः केशराच्या उटण्या लावणें मोठ्या मानाचें मानीत असत. त्याच लक्ष्मकाला पांचसहा महिने, त्याच सोमपाला पुढे तसें उभे राहावें लागलेलें लोकांच्या पाहण्यांत आले !

मंत्री लुल्ल याच्या काळ्यासांवळ्या तोंडाभोंवतीं करडी दाढी होती. तिच्यामुळे तो वृद्ध वानरासारखा दिसे. तोही शत्रूच्या हातीं सांपडला. त्याला त्याचें फार वाईट वाटलें व त्यानें मौन धरलें होते.

सुज्जीनें लक्ष्मकाला, सोमपालाला सोंपलें तेव्हां, त्याला सारें काश्मीर मंडळ आपल्या हातीं आले, असें वाटलें व तो आपल्या देशाकडे परत निघाला. १९००. त्याच्याकडे लोठणाकडून शूर असा माणिक व इतर लोक पोहोंचले व त्यांनीं त्याला पुष्कळसें द्रव्य देऊं करून लक्ष्मकाला आपल्या स्वाधीन करण्याविषयीं विनंति केली. लक्ष्मकाच्या सल्लेनें वागले तर आपणाला काश्मीरांत सहज शिरतां येईल, असें बहुतेक साऱ्याच डामर विहंगांना वाटत होतें. सोमपाल भारी लोभी होता. तरी त्यानें त्यांची विनंति ऐकली नाहीं. लक्ष्मकाच्या तंत्रानें सारें राज्य आक्रमण करण्याची त्याला आशा वाटली. शिवाय त्याच्याबद्दल राजा हवा तितका दंड भरील, अशीहि त्याला उमेद होती.

मंत्री हताश व पराभूत परत आले व प्रतिहार लक्ष्मक हातचा गेला, तरी राजा डगमगला नाहीं. त्यानेंच पूर्वी सुस्सल राजानें भरती केलेले; भिक्षाचराच्या झगड्यांत, काम केलेले व सुस्सल राजाला सारें राज्य उलटलें असतांना नेट धरण्याला साधन झालेले अशा सैनिकांपैकीं दहा हजार लोक शीतज्वरानें मरण पावले होते. त्या दिवसांत साऱ्या राज्यभर रात्रंदिवस मृत आप्तांविषयीं शोकाक्रोश व तत्संबंधी वाद्यांचा ध्वनी, क्षणभरसुद्धां खळला नाहीं. प्रखर उन्हाचा तडाखा अनुभवावा लागल्यामुळें सारा देश थकून जणों मृत-प्राय झाला होता आणि सर्व व्यापार व व्यवहार बहुतेक बंद पडला होता. फक्त लोहर येथें खूप राजकीय डामडौल दिसत होता. तिकडे निरनिराळ्या प्रांतांतून काश्मीरी लोकांची जशीं रीघ लागली होती. या वेळीं लोठणाला कावळा व ताल वृक्ष यांच्या गोष्टींतील फळ पडल्याप्रमाणें—काकतालीय न्यायानें—कल्पनातींत राजवैभव प्राप्त झालेलें होते व तो प्रति-कुबेर बनला होता. त्याच्या बरोबरच दुःख व कष्ट सोसलेले त्याचे पुतणे, पुत्र, सेवक वगैरे सर्वजण, यावेळी त्याच्या सुखांत व ऐश्वर्यांत भागीदार होते. तो यावेळीं पोक्त व बहुतेक वृद्धच होता. यामुळें त्या राज्यावर असताना त्याला आपली तरतरी दाखवितां आली नाहीं तरी, त्यानें अयोग्य माणसांना संपत्ती देऊन, तिचा अपव्यय केला नाहीं, किंवा योग्य माणसांविषयीं कंजूषपणाहि केला नाहीं.

अंधकार स्वतंत्र पाहण्यांत येतो. पण प्रकाशाच्या नैसर्गिक गुणानुरूप त्याच्या सभोंवार शेंकडो निरनिराळ्या छाया दिसत असतात. दुर्दैव स्वतंत्रपणे असूं शकते. पण सुख अनंत दुःखांनीं बाध्य आसल्यामुळे, त्याला कमीपणा येत असतो.

असें यश व वैभव प्राप्त झाल्यावर, एक महिन्याच्या आंतच लोठणाचा एकुलताएक पुत्र दिल्ह हा मरण पावला आणि पुत्रशोकाच्या धक्कयाने त्याची माता मल्लादेवी-इचें हृदय विदीर्ण झाले. गुणी, सुशील व प्रेमळ पुत्र आणि भार्या याच्या मरणानें लोठणाला तें सारें राज्यवैभव व्यर्थ वाटूं लागलें.

राजे लोकांमध्यें बहुतकरून कौटुंबिक प्रेमाचा अभावच असतो. त्यामुळे किंवा दैवाच्या अंगी वैभवाच्या द्वारें माणसांला फसविण्याची शर्थ नेहमीं दिसून येते, तिला अनुसरून लोठणाला पुढें कांहींसें सुख मिळण्यांत कसर पडली नाहीं.

या बिकट प्रसंगाचीं राजाला पूर्ती जाणीव होती. त्यावेळीं त्याच्याजवळ साधन संपत्तीहि नव्हती. तरी त्यानें छत्तीस लक्ष-दीनार-दंड भरून वृद्ध लक्ष्मकाला सोडवून आणलें. तो परत आला तेव्हां लोकांनीं त्याच्यापुढे रस्त्यावर आनंदानें पुष्पवृष्टी केली. कारण त्याच्या बरोबरच राजाचे भाग्य परत आले, असें सर्वांना वाटल्यावांचून राहिलें नाहीं. सुदैवानें त्याचा पराभव झाला होता त्याचें सर्वांना विस्मरण झालें व तो लौकरच पूर्ववत् अधिकारारूढ व निग्रहानुग्रह समर्थ झाला.

सुज्जी लोभवश होऊन जयसिंह राजांविषयींची निष्ठा पार विसरून गेला आणि लोठणाचा इमानी मंत्री बनला. त्यानें भागिकाची कन्या लोठणाला देऊन, स्वतःविषयींचा

त्याचा अविश्वास व त्याचें पत्नीवियोगजन्य दुःख, एकदमच नाहींसें केलें. तसेच त्यानें चतुरपणानें पद्मरथ राजाचें मन वळवून, त्याची कन्या सोमलदेवी, ही लोठणाला देवविली. याप्रमाणें मोठ्याशीं आप्तपणा जोडून, त्यानें लोठणाचा अधिकार मजबूत व स्थिर करण्याचा प्रयत्न केला आणि लोठणानें त्याच्याकडे जो पूर्ण अधिकार सोपला होता,त्याचा उपकार फेडला. नंतर लोठणाच्या प्रेरणेला व डामराच्या निमंत्रणाला मान देऊन त्यानें काश्मीरावर स्वारी करण्याची तयारी चालविली. या थरास आलेल्या शत्रूच्या तजवीजी व त्यानें जवळपासच्या राजवाड्याशीं बांधलेलीं संधानें हाणून पाडण्यासाठीं, द्वारपती उदय याच्या सल्लेनें राजानें उपाय चालविले. त्या उपायांच्या संबंधानें उदयाची शहाण्या लोकांकडून प्रशंसा झाली. उदय निस्सीम स्वामिभक्त होता. त्याच्या जवळ साधनसामग्री फारच कमी होती. शत्रूकडून त्याला संपत्ती व मानमरातब यांची भारी लालूच दाखविली गेली. तिचा अव्हेर करून, तो स्वामिसेवेंत तत्पर राहिला. लोहरकोटाजवळच वनप्रस्थ येथें छावणी ठेवून, त्यानें सारखे हल्ले करीत, शत्रूच्या सैनिकांना त्रास देण्याचें काम चालविलें होतें.

माणिक, इंदारक व कांहीं दुसरे लोक, यांच्याविरुद्ध सुज्जीनें लोठणाला कांहीं योजना सुचविली होती. तिच्यामुळें ते लोठणाला भीत होतें.११३०. सुज्जीवर लोठणाचा अतिशय विश्वास बसला होता. त्याच्या सूचनेवरून लोठण आपणाला खटपटी म्हणून घालवून देणार आहे, अशाविषयीं त्यांना भीती वाटत होती. त्या लोकांकडे जयसिंहानें कपटानें निरोप पाठविला कीं, 'किल्लेदार प्रेम याच्या वेळेप्रमाणेंच तुम्ही लोठणाला एकदम कैद केलेंत तर, आम्ही तुमच्या मर्जीनुरूप, सुस्सल देव आणि सहजाराणी, यांचा पुत्र मल्लार्जुन, याला लोहरच्या गादीवर बसवून देऊं.' लोहर किल्ला कसा तरी हातीं यावा, एव्हढाच यात जयसिंहराजाचा हेतू होता. याला त्यांनींहि याच तऱ्हेच्या कपटानें होय म्हटलें.

मल्लार्जुन कांहीं कटांत सामिल आहे, असें पाहून लोठणानें त्याला व त्याच्या साथीदार अशा इतर पुतण्यांनाहि कैदेंत टाकलें व सुस्सलदेवाचा दासीपुत्र विग्रहराज याच्यावर त्याचा विश्वास होता त्याला प्रतिहाराचें काम दिलें.

पुढें लौकरच त्या चतुर व धूर्त जयसिंह राजानें आपला चुलता लोठण याच्याशीं वरवर समेट व तह केला आणि त्याच्याकडील राज्याचा भाग परत मिळविण्यासाठीं अनेक योजना चालू ठेवल्या.

सुज्जीच्या अश्रांत उद्योगामुळें लोठण आपल्या गादीवर निश्चित व कायम होऊन बसला. त्यानें बहुस्थळाचा राजा शूर, याला परत जाऊं दिलें. पुढें त्याला कांहीं महिने चांगली स्वस्थता लाभली.

सुज्जीनें पद्मरथ राजाची कन्या लोठणाला देण्यासाठीं आणली होती. त्या लग्नासाठीं तिची प्रबल व कर्ती माता, तेजलादीना येत असल्याचें ऐकून, लोठण तिला दर्पितपूर येथें सामोरा म्हणून गेला. ११४०. ही संधी साधून माणिक वगैरे मंडळी कैदेंतून बाहेर पडली व

त्यांनीं कट करून मल्लार्जुनाला लोहरकोट्टाखालच्या राज्याच्या गादीवर बसविलें आणि पूर्वीप्रमाणें आसपासच्या ठक्कुरांना मदतीला बोलावून, जयसिंह राजाचे सैनिक तोंवर किल्ल्यांत शिरण्याच्या हेतूनें प्रतोलीपर्यंत पोहोंचले होते, त्यांना तेथेंच अटकाव केला.

लोठण साधाभोळा होता, तो जसा अकस्मात राजा झाला होता तसाच लौकिक वर्ष ४२०९ ई. स. ११३१ च्या फाल्गुन शुद्ध त्रयोदशीला पदच्युत झाला. त्याच्या या दुर्दैवामुळें ती लग्नासाठी आणलेली कन्या व त्यानें नाममात्र किंचित्काल उपभोगिलेली राज्यलक्ष्मी, प्रतिपक्षाच्या हातीं पडली, याबद्दल त्याला दुःख झाले. पुढे असहाय स्थितींत फिरत असतांना त्यानें सुज्जीच्या सहाय्यानें अट्टालिका वगैरेंतून खजीन्याचा काही अवशिष्ट भाग हस्तगत करून घेतला.

जयसिंहाच्या सैनिकाना माणिकानें बोलाविलें होतें. त्यांना धुडकारून देऊन, त्याने मल्लार्जुनाला पूर्णपणें राज्याधिकारी केलें. तो तरुण व फारज उधळ्या होता. एकदां तर त्यानें सुपारीच्या ऐवजी मोत्येंच भरून घालून विडे वाटले! रतिसुखाप्रीत्यर्थ त्यानें हलकट कुंटण मंडळीवर सुवर्णवृष्टी केली. असल्या या उदारपणाला सर्व विचारी लोकांनी नांवे ठेवलीं. सुस्सल राजानें प्रजेला पीडा देऊन सांठविलेल्या संपत्तीचा या राजाने हा तिच्या प्राप्तीला अनुरूप असाच उपयोग केला, म्हणावयाचे. तो मनाचा हलका-भारी विषयलंपट होता. त्यानें सत्यनिष्ठ व सद्गुणी सज्जन सोडून, वेश्या, भांड, हलकट नट, लुच्चेलफंगे जवळ केले. १९५०.

राजे लोकांनीं प्रजापीडनानें जमा केलेली संपत्ती, त्यांचे दावेदार, शत्रू किंवा अग्नी, यांच्या वाट्याला गेलीच पाहिजे. जयापीड राजाने प्रजापीडनानें संपत्ती जमा केली ती उत्पल वगैरे दासीपुत्रांनीं त्याच्या नातवाला मारून उडविली. शंकरवर्म्यानें लोकांना निर्दयपणें छळूनच द्रव्य साठविलें होतें. ते त्याच्या राणीचे जार प्रभाकरवर्मादिक यांनीं उपभोगिले पंगू किंवा निर्जितवर्मा यानें दुष्टपणा करून गोळा केलेली धनदौलत, त्याच्या प्रेमांध राण्यांनीं, त्यांचा भोग्या सुगंधादित्य याला अर्पण केली. यशस्कराजानें मिळविलेली अपरंपार संपत्ती, त्याच्या चांडाळाला भाळलेल्या राणीनें खपवून टाकली. पर्वगुप्त किंवा क्षेमगुप्त यानें पूर्वीच्या राजांपासून परंपराप्राप्त झालेला खजीना, मरतांना मागें सोडला. तो तरी जणों त्याच्या राणीचें प्रियकर यार तुंग वगैरेंसाठींच. संग्रामराजा एकसारखा संपत्ती सांचविण्यांत गढलेला होता. त्याची ती सारी संपत्ती, त्याची राणी श्रीलेखा इचें मुखकमलचुंबी व्यड्डसूह वगैरें मधुपांनीं लुटली. अनंत राजाच्या निष्काळजीपणामुळें त्याची प्रजा नाश पावली आणि त्यानें सर्व पृथ्वीतलावरून एकत्र केलेला कोशसंचय, अग्निमुखी पडला. त्याच्या पुत्रानें कुपात्रीं दान करून व पत्नीनें आपल्या यारांना देऊन उरलें सुरलें धन द्रव्य नष्ट केले हर्षाची द्रव्यसंसपादनाची इच्छा कधीच कमी झाली नांहीं. त्याची सारी संपत्ती, त्याचा राजवाडा व त्याच्या राण्या बरोबरच भस्मसात झाल्या व त्याचा पुत्रही मारलागेला. १९६०. चंद्रापीड, उच्चल, अवंतिवर्मा वगैरे न्यायी, सज्जन व दक्ष, राजांनी योग्य साधनांनीं मिळविलेली संपत्ती मात्र, अयोग्य रीतीनें नष्ट झाली नाहीं.

मल्लार्जुन गादीवर बसून फार दिवस झाले नाहींत तोंच, चोर, धूर्त व खटपटी लोक आसपासचे सरदार आणि वेश्या व विट, यांनीं त्याच्या खजिन्याची लयलूट चालविली.

आपला बेत फसलेला पाहून जयसिंह राजाला विषाद वाटला. त्यानें चित्ररथाला द्वारपती व पादाग्र हे दोन्ही अधिकार देऊन, त्याला एकदम लोहरकोट्टावर हल्ला करण्याला धाडलें. तो पुष्कळशी फौज व सरदार यासह निघाला व त्यांने फुल्लपूर येथें डेरे दिले. मल्लार्जुनाचें सैन्यहि बरेंच मोठें होतें व त्याला किल्ल्यांतून मदत होत होती. म्हणून चित्ररथाला त्याचा पाडाव करण्याला सवड झाली नाहीं. राजाच्या मर्जीतला, चित्ररथाचा सेवक संवर्धन हा किल्ल्यांत भेद करण्याला गेलेला होता. त्याला मल्लार्जुनाच्या माणसांनी ओळखून रात्रीं ठार मारलें.

राजाच्या शत्रूंना किल्ल्याचा चांगला आसरा होता. राजाच्या सैनिकांना तो किल्ला एकदम हल्ला करून घेतां येण्यासारखा नव्हता. तरी चित्ररथाच्या मदतीला कोष्ठेश्वर आलेला पाहून, आंतील लोक घाबरले आणि मल्लार्जुनानें राजाला खंडणी देण्याचे कबूल करून तह केला. या कामासाठीं व चित्ररथाचा योग्य सन्मान करण्यासाठीं त्याच्याकडे मल्लार्जुनाची विधवा आई गेली. तेव्हां तिनें विशेष थाटाचा नव्हे तरी, राजस्त्रियांना उचित असा पोषाख केला होता. तिने चंचलचित्त कोष्ठेश्वराला मोहून टाकलें.

ती परत आल्यावर मल्लार्जुनाला विश्वास आला आणि त्यानें चित्ररथाकडे ठरलेली खंडणी पाठवून दिली. ११७०. पुढे कोष्ठेश्वर राजमातेच्या दर्शनाविषयीं उत्सुक होऊन, किल्ला पाहण्याच्या बाहाण्याने थोड्याशा लोकांसह तिच्याकडे जाऊन आला. नंतर तो व चित्ररथ खंडणीची रक्कम घेऊन राजाकडे गेले. त्यानंतर द्वारपती उदय याला अधिक लोभ सुटला होता, त्याच्या विचाराने शत्रूचा पाडाव करण्यासाठीं राजाने नवीन तजवीज चालविली.

तोंवर लोठणही पद्मरथाकडे निघून गेला. तेव्हां कोणाकडून हल्ला होण्याची भीति उरली नाहीं आणि मल्लार्जुनाला पाय पसरण्याला थोडीशी सवड सापडली. पद्मरथाची कन्या सोमला इच्याशी लग्न केल्यानंतर त्याचा प्रभाव वाढला व त्याने नागपालाच्या कन्येचेंहि पाणिग्रहण केलें. मल्लार्जुन आपल्याच वैभवात गर्क होता. इकडे त्याच्या विरुद्ध सोमपाल वगैरेंच्या खटपटी चालूच होत्या. तरी ते आपले ताबेदार आहेत अशा समजूतीनें तो त्यांना वेतन देतच होता. कवी, गायक, कथ्थक, लढवय्ये, फिरस्ते नट व तमाशेवाले, वगैरे बनून बरेच लुच्चे लफंगे लोक त्याला लुटूं लागले. त्याच्यात काही राजवंशीहि होते. तो नेहेमीं उर्मटपणाने व मोठ्यानें ओरडून बोले. त्याच्यावरून तत्समान मूर्ख मंडळी, त्याला मोठा हुषार व थोर मनाचा मानीत. लहानपणापासूनच त्याची बुद्धी अपक्व राहिली होती. त्याची चर्या मोहक व प्रसन्न दिसे. पण त्याच्या त्या धूमकेतूसदृश चमकदार पण नतद्रष्ट, चेहऱ्याशिवाय त्याच्यांत चांगलें असें कांहींच नव्हतें.

शूर व वीर अशा सुज्जीला न जाणों मल्लार्जुन मिळवून घेईल या भीतीनें जयसिंहानें सुज्जीकडे संधान बांधलें. ११८०. त्याला कामावर घेणें किंवा काढून टाकणें प्रतिहाराकडे होतें. त्यानें या प्रसंगीं मोठें चातुर्य व उत्साह दाखविला. त्याचा तात्काल उपयोग झाला. राजाच्या प्रेरणेनें त्यानें सुज्जीला राजस्थानाचा-किंवा मुख्य न्यायाधीशाच्या कामाशिवाय सेनापतीच्या पदाची माळ व इतर प्रमुख पदाच्या अधिकाराच्या माळ देऊं केल्या होत्या. पण त्यांनीं सुज्जीचें समाधान झाले नव्हतें. सुज्जी सोमपालाबरोबर त्याच्या घरीं गेला असतांना, दोघाविषयींहि भारी आदर प्रदर्शित करून, लक्ष्मकानें, एकदम आपल्या डाव्या हाताने आपली अधिकारद्योतक माळ आपल्या जटाजुटावरून ओढून काढून, ती सुज्जीपुढे केली, त्या योगानें सुज्जीचें समाधान झाले आणि त्याच्या मुखावर त्याच्या भाग्यवृक्षाची जणों नवी लावणी झाली व त्याला पालवी फुटून टवटवीं आलेली दिसली.

सुज्जी पुनः अधिकारारूढ होण्याला रिल्हणानें हरकत केली नाहीं. शिवाय राजकार्य लक्षांत घेऊन, त्यानें धन्य व उदय याच्याशींहि संबंध ठेवणे सोडून, राजानें सुज्जीला परत बोलावलें व त्याचा बहुमान करण्यासाठीं तो त्याला सामोरा गेला. त्याच्या सांगण्याप्रमाणें त्यानें धन्य व तत्पक्षीय इतर लोक याना राज्यातून दूर केलें, मनातून नव्हे.

राजानें संधी साधून कोष्टेश्वरावर मारेकरी घालण्याचा बेत केला. हें ऐकून तो पळून गेला. पुढें राजानें मनुजेश्वराला मिळवून घेऊन त्याच्यावर हल्ला केला, तेव्हा स्वकीयच उलटलेले पाहून कोष्टेश्वर असहाय्य व हताश होऊन देशांतराला गेला.

लोठण बप्पनील येथें रहात होता. त्यानें काही टक्करांचें सहाय्य मिळवून मल्लार्जुनावर हल्ला केला. तो स्वतः पराभूत व पदच्युत होता, तरी तो नेहेमी राज्यारूढ मल्लार्जुनाचा पराभवच करीत असे. यावरून त्याचें अलौकिक शौर्य व प्रताप दिसून येतो. ११९०. त्यानें मल्लार्जुनाचे घोडे धरून नेले, अट्टालिकेचा बाजार लुटला आणि मार्गावरील द्रंगगढ्या यांची नासधूस केली. राजराज नांवाच्या लवन्य डामराच्या निमंत्रणावरून त काश्मीरचें राज्य मिळविण्याची खटपट करण्यासाठीं क्रम राज्यात शिरला. त्यावेळ चित्ररथ जवळच होता. त्याला याचा सुगावा लागला तेव्हा त्यानें राजराजाला पकडून फाशीं दिले. तसा लोठण परतून बप्पनील प्रदेशात गेला. याप्रमाणें तो वरचेवर ह करीत असतांना मल्लार्जुनाला लोहरांतून बाहेर पडून अट्टालिकेपर्यंतसुद्धां जाता ये नव्हतें.

कोष्टेश्वरानें जयसिंहाविरुद्ध उठावणी करण्याची तयारी चालविली. मल्लार्जुनाला लोठणाला पुष्कळसें द्रव्य द्यावें, या शर्तीवर त्याने त्या दोघांचा समेट केला. याप्रमा लोहर येथें पाय पक्का जमवून राजाशीं सामना करण्यासाठीं त्यानें लोठणासह काश्मीरा प्रवेश केला. त्याला मार्गांत फारशी अडचण आली नाहीं, पहाड वलांडून त्यानें काकों द्रंग येथें तळ दिला. ( द्रंग ही सरहद्दीवरील द्वारस्थानें व जकातीचीं नाकीं असत. तें

जकात दिल्यावर त्या मालावर विवक्षित निशाणी करीत तो प्रघात अद्यापीहि तेथें व दुसऱ्या संस्थांतूनहि चालू आहे. ) दुसरे डामर येऊन त्याला मिळ-ण्यापूर्वींच राजानें सत्वर तेथें पोहोचून स्वतःचा प्रताप प्रगट करीत प्रारंभींच त्याचा पराजय केला. तितक्यांत प्रतिहार लक्ष्मक एकाएकीं अजारी पडून मरण पावला. अल्पपुण्य लोकांना आलेलें वैभव फार दिवस भोगावयाला मिळत नाहीं. सर्व द्वारें बंद करून, विधीची पर्वा न करितां स्वस्थ घरीं बसून राहिले तरी, अप्रतिकार्य विधी कोणाला, कशा तऱ्हेनें, त्वरेनें व कोठें गांठील याचा नेम नसतो, हें सुदैवामुळें बुद्धिभ्रंश झालेल्याच्या लक्षांत येत नाहीं. २०००.

लक्ष्मकाची पत्नी त्याला त्रास होईल म्हणून समाचाराला आलेल्यांना घरांतून बाहेर घाल-वीत होती. पण निजल्या निजल्याच त्याचा प्राण गेला होता, हें तिला कळले नाहीं. त्याला ज्वर येत होता, तो येऊन निघाल्यावर त्याला झापड पडली. तेव्हां तो स्वस्थ झोंपला आहे, असें सर्वांना वाटलें. पण त्यांतच त्याला मृत्यूनें गांठले. हे कोणाच्या लक्षांत आलें नाहीं.

कोष्ठक, लोठण व मल्लार्जुन, हे निघून गेल्यावर लोहर येथें त्यांच्यापैकीं कोणचि गादीवर उरला नाहीं. उदयन मल्लार्जुनाकडे होता. त्याला त्यानें दग्याने ठार मारविलें. यामुळें त्याला जामीन असलेला कोष्ठक मल्लार्जुनावर फार रागावला. त्याने कोष्ठकाचे समाधान केले नाहीं. म्हणून त्यानें आपलें व लोठणानें कांहीं स्वार घेऊन त्याच्यावर चाल केली व पयो–रो-ष्णी नदी उतरून मल्लार्जुनाच्या सैनिकाचा परा-भव केला. ते यावेळीं बेसावध होते. त्या लढाईत बरेचसे खश व सैंधव लोक मारले गेले. मल्लार्जुन सुद्धां मरावयाचा, पण कोष्ठकाला जयसिंहाविषयी भारी तिरस्कार वाटत अस-ल्यामुळें त्यानें त्याला जिवंत सोडलें. तो किल्ल्यावर परत गेला. तेव्हां त्याचा राज्याधिकार व वैभव नष्ट होऊन, त्याची सत्ता संपुष्टांत आली होती. म्हणून त्यानें पुनः कोष्ठकाची मनधरणी चालविली. यामुळें तो लोठणाचा पक्ष सोडून, कांहीं दिवस तटस्थ राहिला, पण मल्लार्जुनाकडून, ठरलेली रक्कम आली नाहीं, तसा तो पुनः त्याच्यावर उलटला. त्यानें द्रंगावरील नाकेदारांना कैद केलें व त्या घाटाने येणाऱ्याजाणाऱ्या मालावरील जकातीचा स्वतःच वसूल चालविला. तो राजाप्रमाणे जणों त्या मालावर स्वतःच्या पंजाची शेंदरी निशाणी करूं लागला. २०१०. डिंकानें डकविलेल्या काचेच्या कुपांच्या तुकड्याप्रमाणें त्यांचा समेट व स्नेह वरचेवर तुटत व जडत असे.

लोहराधीश मल्लार्जुन व्यर्थ कठोर भाषण करून, कोष्ठेश्वराचें मन दुखवीत असे व कोष्ठेश्वर आपल्या बेसुमार आढयतेनें त्याला दुखवीत होता. शेवटीं कोष्ठेश्वरानें छापा घालून मल्लार्जुनाचें उत्तम उत्तम अश्व व मौल्यवान् शस्त्रास्त्रे लुटलीं. त्यामुळें मल्लार्जुनाची फौज हलकी पडली. असे करण्यांत त्या कोष्ठकानें वेडेपणानें आपल्या सामर्थ्याचा दुरुपयोग केला व त्याबरोबरच राजाच्या शत्रूचें-स्वतःच्या पक्षाचें-सामर्थ्य तितकें कमी केलें.

पुढे मल्लार्जुनानें आपला मुख्य मंत्री व सासरा माणिक, याला ठार मारविण्याची

योजना केली. कारण तो तरुण, चंचल व उत्साही असून मल्लार्जुनाच्या मातेचा उघडपं
प्रिय जार झालेला होता. तो भोजन करीत असतांना मल्लार्जुनाच्या सूचनेनें अन्ययें मारेकऱ्यांन
त्याला ठार केलें. तसा मल्लार्जुनानें वीरपट्ट बांधला व हातांत नागवा असिपट्ट घेऊन भारी
आरभटी–गडबड–माडली. त्यानें माणिकाच्या सैनिकाना लुटले. या राजद्रोहांत इंदाकराच
संशय आला होता. पुढें राजानें त्यालाहि विष देवविलें.

अशारीतीनें सुदैवानें शत्रूंची फाटाफाट झाली. तेव्हां जयसिंहानें कोष्ठकाला स्वतःच्य
पक्षांत मिळवून घेतलें आणि सुज्जीला लोहर घेण्याला पाठविलें. २०२०.

तो लोहराहून प्रहर भराच्या वाटेवर पोहोंचला. तोंवर कोष्टकाने पूर्वीच घोडे लुट
नेऊन घोटाळ्यांत टाकलेल्या व अंतस्थ कलहामुळें त्रासलेल्या मल्लार्जुनाला, त्याचा प्रतिका
करण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें. म्हणून तो तें राज्य सोडून व बरोबर किल्ल्यांतील बहुते
खजीना वगैरे घेऊन अवनाहकडे निघाला. वाटेत त्याला चोरांनीं लुबाडलें. तरी मोठ्
शर्थीनें त्यानें बराच खजीन्याचा भाग वाचविला ! लौकिक वर्ष ४२०८, ई.स. ११३५
वैशाख वद्य द्वितीयेला आपल्या वयाच्या अठराव्या वर्षी तो पदच्युत झाला.

चंद्रशेखर शिवाला अमृत दिलें असूनहि त्या शिवाच्या हातूनच लढाईंत तें अमृ
देणाराचें शिर उडविलें गेलें. ही गोष्ट खुद्द शिवानीं केली तेव्हा उपकारकर्त्याची निं
कोण म्हणून करणार नाहीत? कमलाच्या पाकळ्याना चिकटलेले जलबिंदू मौक्तिक समज
जातात व राजे लोकाच्या आगचीं जडता त्यांच्या बुद्धिमत्तेचे लक्षण मानतात. हेंच कम
व राजे लोक यांच्या वैभवाला चिकटून राहणाऱ्या विलक्षण फसवणुकीचे निदर्शन हो
कांहीं प्राणी वनप्रदेशांत आवेशानें व जोराचा आघात करून मारतात, तर काही आप
नाक, डोळे व जिव्हा, यांच्या द्वारें प्राणहारक होतात. पण नुसत्या भाषणानें सत्याना
करणारें दुष्ट व नीच लोक, राजे लोकांजवळ व राजवाड्यात असतात. राजाचा सेव
राजाच्या दृष्टीसमोर असेपर्यंत, दुष्ट लोक, त्याचें कांहीं वांकडे करूं शकत नाहींत. सूर्या
मोर सूर्यकातापुढे ठेवलेल्या इंधनाचा सूर्यकिरणांनीं दाह होत नाही. पण तेच मागें ठेव
कीं, त्याना जाळण्याला सूर्यकांताला संधि मिळते.

सेनापती सुज्जीनें, कपिलाचा पुत्र हर्षट याला लोहर येथें अधिकारी कायम क
ण्यासाठीं बरोबर आणलें होतें. तो कांहीं काळ किल्ल्याकरिता नवी शिबंदी भरती कर
व तिकडची स्वस्थता व समृद्धी होण्याच्या योजना करीत राहिला असतांना २०३०. म
त्याच्या विरुद्ध असलेल्या काही लबाड लोकांनीं संधी साधून, त्याच्या विरुद्ध राजाचें म
कलुषित केलें. अशा या हुषार राजाला सुद्धा नीच लोक पोराप्रमाणें नाचवूं शकले. ते
स्वतःच्या बुद्धीनें व हिम्मतीवर, स्थिरचित्ताने काम करणारा दुसरा कोण राजा मिळणार
भोवतालच्या मूर्खप्राय भृत्यांनीं बाळपणीं अंगीं मुरविलेली जडता, पोक्तपणी जात नाह
रत्नाच्या अंगचे दोष पुढें नष्ट होणें अशक्य असतें. तशातलाच तर हा प्रकार नसेल ? र
लोकांना सेवकांची खरी परीक्षा करण्याची शक्ती नसल्यामुळें, बिचाऱ्या साऱ्या राष्ट्रावर, ह
हाय, कशा आपत्ती कोसळत असतात ?

लोहरकोट काबीज करण्याला सुज्जीलाच पाठविण्याबद्दल राजाचें मन त्याच्या सल्लागारांनींच वळविलें होतें. तें काम त्याच्या हातून पार न पडतां, लक्ष्मकाप्रमाणें त्याचीहि फजीती व्हावी हा त्याचा हेतू होता. पण तें कठिण काम त्यानें सहज पार पाडलें. तेव्हां त्या दुष्टांनीं त्याच्या विरुद्ध हटकून कार्यकारी असें चाहाड्याचें ब्रम्हास्त्र सोडलें. सुज्जी परत आला तेव्हां राजानें प्रेमळ गोड भाषणाखालीं मनांतील राग लपविला होता. म्हणून तो सुज्जीला दिसून आला नाहीं. सुज्जी मनाचा थोर व सत्यवादी होता. शिवाय त्यानें या वेळी उत्कृष्ट नोकरी बजावलेली होती. तेव्हां त्याला राजाची भीति किंवा अविश्वास कां वाटावा, पुढें राजाला सुज्जीच्या चांगल्या कृतीचाहि आनंद वाटेनासा झाला. लबाड चहाडखोरांच्या मतलबी भाषणांनीं मन विटून गेलेल्या प्रियकरासारखी त्याची स्थिती झाली होती.

हातचीं गेलेलीं दोन राज्यें आपण या राजाला परत मिळवून दिलीं, या ऐटीवर व उपजत मानी स्वभावला अनुसरून, तो योग्य वाटेल तसा वागत असे. २०४०. त्याचें आप्त व आश्रित, लोकांचीं घरेंदारे जबरदस्तीनें बळकावीत त्रास देत व जुलुम करीत, यामुळें लोक त्याच्यावर चिडले होते.

कोष्ठेश्वराला आपल्या दुष्ट कृत्यांची जाणीव होती राजा त्याच्यावर नाराज असतांना त्याचा चुलता मनुजेश्वर त्याच्या विरुद्ध वागला होता. म्हणून कोष्ठेश्वराचा त्या दोघांवरहि विश्वास नव्हता. चित्ररथ प्रजेवर जुलुम करीत व तिला लुटीत होता विवाहाच्या द्वारें त्याचा व सुज्जीचा आप्तपणा झाला हाता. त्याच्यावरहि राजा नाराज होता. राजपुरीस असलेले धंन्य व उदय याच्यावर राजाला सुज्जीमुळें उघडपणे कृपा करतां येत नव्हती. पण गुप्तपणें त्यांना त्याची मदत होती. त्या दोघांचेहि सैनिक शीतज्वरानें मरण पावले असल्यानें, ते मल्लार्जुनाला चिकटून राहिले होते. तो राज्यभ्रष्ट झाला होता तरी, त्याच्या हातीं उमाप द्रव्य लागलेलें होतें.

या सुमारास संजपाल राजपुरीस आला. त्याला सुज्जीच्या द्वेषामुळें लक्ष्मकानें यापूर्वी दूत पाठवून परत बोलावलें होतें. पण सुज्जी व चित्ररथ यांच्या आग्रहावरून, राजानें लक्ष्मकाच्या इच्छेप्रमाणें त्याला नगरांत परत येण्याला परवानगी दिली नव्हती. मल्लार्जुनाने त्याच्याकडे माणसें पाठवून त्याला बोलाविलें. वाटेंत त्याचा एका सरदाराशीं सहज झगडा झाला त्यांत त्याला जखम झाली व त्याची सर्व मालमत्ता लुटली गेली. अशा विपन्न स्थितींत मल्लार्जुनाने बरीच संपत्ती देऊं केली असूनहि, संजपाल त्याला मिळाला नाहीं, याचें लोकांना आश्चर्य वाटलें.

त्यावेळी राजाची सारी भिस्त रिल्हण वगैरेंवर होती त्यांनीं संजपालाला आदराचें व प्रेमपूर्वक निमंत्रण पाठविलें. तसा तो ताबडतोब निघून धीटपणें नगराला आला.२०५०. वाटेत शत्रू आपला कोठें घात करतील न जाणों अशी त्याला सारखी भीती वाटत होती.

कान्यकुब्ज गौड वगैरे देशाच्या राजांनीं संजपालाचा अधिकाधिक सन्मान केलेला होता. पण स्वदेशीं आल्यावर मंत्री विरुद्ध राहिल्यानें राजानें त्याचा योग्य सन्मान ठेवला

नाहीं. याबद्दल त्यांला वाईट वाटलें व राजवाड्यांतल्या लोकांच्या डोळ्यांना पाणी आलें पुढें मंत्र्याचें न ऐकतां राजानें त्याची भेट घेतली व त्याला स्वतः तांबूल देऊन, त्याचा बहुमान केला. त्याच्यापाशीं साधनसंपत्ती कांहीं नव्हती, तरीं त्याच्या लौकिकावरून लोक त्याच्यामागें लागले होते. तो वरचेवर राजवाड्यांत जाऊं लागलेला पाहून त्याच्या प्रतिपक्षांना थरकांप सुटला. सुज्जीला माणसाची उत्तम पारख होती संजपालाची चर्या व वागणूक लक्षांत भरण्यासारखी होती. त्याचें बोलणें चालणें पाहून सुज्जी मनांत कांहींसा दचकला. त्याला तो विलक्षण उत्पाती व घातकसा वाटला आणि त्याचा व आपला या राज्यांत कसा काय मेळ बसतो व निभाव लागतो, कोण जाणें असें त्याला वाटलें त्यानेंहि परदेशात अनेक शूर वीर मानधन लोक पाहिलेले होते. पण संजपालाची त्या सर्वांवर ताण असल्याचें प्रथम दर्शनींच त्याला वाटलें.

त्याच सुमारास सुज्जीच्या घमेंडीमुळें किंवा त्याचे दुर्दैव ओढवलें म्हणून, त्याच्या हातून बऱ्याच आक्षेपार्ह गोष्टी घडल्या. तो मडव राज्यांत असतांना त्याच्या सेवकांनीं नाडलेल्या एका ब्राह्मणानें त्याला बरीच नांवें ठेवलीं. तेव्हां त्यानें नाराज होऊन त्या ब्राह्मणाची एखाद्या कोल्ह्या कुत्र्याप्रमाणें बाण मारून शिकार केली. २०६०. त्यामुळें तिकडील लोक बरेच प्रक्षुब्ध झाले होते, नगरांत परत आल्यावर तो व त्याचे सेवक यांची जुलुम जबरदस्ती व दांडगेपणा, यांवरून नगरांतील लोक त्याच्यावर संतापले होते. त्यांतच कमलिय वगैरेंनीं उद्दामपणानें आपल्या एका भिकार आप्ताला राजाकडून मोठ्या अधिकाराची जागा देवविली. याचा सुज्जीला विषाद वाटला. त्याला त्यावेळीं भारी गर्व झाला होता 'माझ्याशिवाय अशा तऱ्हेने राजाकडून दुसरा कोण प्रसाद करविणारा आहे पाहतों.' असे म्हणून त्यानें एका गरीब पोटभरू नटाला तसलीच अधिकाराची व हक्काची जागा दिली.

कमालिय वगैरेशीं रिल्हणाने विवाहद्वारां आप्तपणा जोडला होता आणि तो बराच प्रबल झालेला होता तो एक आपल्या कुशींत दुस्सह कांटाच आहे असें सुज्जीला वाटूं लागलें. किरकोळ कारणांवरून त्याच्या व इतर मंडळीच्यामध्यें वैर पडलेलें, त्या लबाड लोकांच्या चहाड्यामुळे लौकरच शतशाखी वृक्षाप्रमाणे फैलावलें. तशाच त्या जात्याच उद्दाम सुज्जीला सहदेवाचा पुत्र उल्हण यानें भरी भरून व वाईट सल्ला देऊन अधिकच गर्विष्ठ केल होतें आणि या वैरांमध्यें पुरें गुरफटून टाकलें होतें. तो राजावरहि रागावून 'हा कृतघ्न राजा हलक्या लोकांना माझ्या बरोबरीने वागवितो व वागूं देतो,' असे वरचेवर मोकळेपणीं बोलून दाखवी. इकडे राजानें त्याच्या भीतीमुळें, आपल्या खाजगी सल्लामसलती, स्नेहाचें बोलणें चालणें व विश्वासाच्या गोष्टी, या सर्वांतून रिल्हणाला वगळलें व तो त्याला सामान्य बाह्य दरबाऱ्याप्रमाणें वागवूं लागला रिल्हण धूर्त व हुषार होता. हें मालकाकडून होत असलेले अवमान तो निमूटपणें सोसून मनांत ठेवित आणि स्वतःच्या वर्तनानें आपल्या पक्षांच्या लोकांमध्यें धैर्य व शत्रुपक्षामध्यें भय उत्पन्न करीत होता. भेटी व नजरनजराणे पाठवून त्यानें संजपालाचा स्नेह संपादन

केला. संजपाल कर्तृत्ववान व उत्साही असल्यानें तो आपल्याकडचा असावा, असें दोन्ही पक्षांना वाटत होते. २०७०.

दोन्ही पक्षाचें लोक वाड्यांत हत्यारबंद जात. तेथें त्यांचीं वरचेवर भांडणें होत. सुज्जी गर्विष्ठ व भांडखोर झालेला होता. त्यानें प्रतिपक्षी व खुद्द राजा, यांचा अपमान करण्याकरितां, महिमानच्या सभारंभांत जमलेल्या लोकांमध्यें बुध्ध्या दंगा सुरू करविला. (महिमान उत्सव सभारंभांत फाल्गुन शुद्ध अष्टमीला देव व पितर यांच्या नांवानें बर्फावर दिवे लावित व दुसरें दिवशी सर्व लोक मोठा उत्सव करीत. त्यांत मद्य घेणारे मद्य पीत व ब्राह्मणभोजनें होत असत.हल्लीं या दिवशीं नुसते दिवेच लावतात. माघशुद्ध अष्टमीस लघुमहिमान नांवाचा उत्सव हात असे तो हल्लीं बंद आहे.)

सुज्जीच्या खांद्यावर सहज हात ठेवीत द्वारपालानें त्याला त्याच्या नांवानें हटकलें. याचा सुज्जीला भारी राग आला व तो त्याला अपशब्द बोलला आणि त्याने त्याला एक दगडहि मारला. त्या वेळीं प्रतिपक्षीं आपल्या मालकाच्या संरक्षणाचा विचार करूं लागले राजानें सुज्जीला बोलावून घेतलें व आपल्याजवळ जागा दिली. तो त्याच्याशीं सामोचारानें बोलूं लागला आणि तो लबाडीने किंवा मनापासून प्रतिपक्ष्याच्या लोकांना म्हणाला, 'हे स्वामिभक्त व विश्वासपात्र आहेत. त्यांच्यापासून मला मुळींच भय नाहीं.' पण याविषयीं तो मनांत विचार करीत राहिला असावा.

पुढें मडव राज्यांतील विप्रांनीं सुज्जी कंपनाधिपती नको म्हणून प्रायोपवेशन सुरू केलें. रिल्हण मोठा कावेबाज होता. त्यानें प्रतिपक्षांवर दबाब टाकण्याकरितां रातोरात सुज्जीचा प्रतिपक्षी पंचचंद्र, याला त्याच्या जय्यत फौजेसह बोलावून घेतलें. सुज्जीला पंचचंद्र व संजपाल या दोघाचीच काय ती भीति होती. दुसऱ्या कोणाचीहि त्याला पर्वा नव्हती. हें रिल्हणाला माहीत होतें. हल्ल्याच्या भीतीनें सुज्जी आपले स्वार सज्ज करून बाहेर पडला व त्यानें सारी रात्र तर काढली. पण त्याच्यावर त्या रात्रीं हल्ला झाला नाहीं. त्यावेळीं सुज्जीनें राजाच्या विरुद्ध असलेल्या कोष्टेश्वराशीं मेळ केला. २०८०. मनुजेश्वरानें राजाविरुद्ध उठावणी केली नव्हती म्हणून कोष्टेश्वरानें त्याला ठार मारले. यामुळें राजा त्याच्यावर अधिकच रागावला होता.

सुज्जीनें त्या रात्रीं स्वतःच्या संरक्षणासाठीं केलेल्या सर्व तजवीजी त्याच्या प्रतिपक्षानें त्यानें राजद्रोहामुळेंच केल्या होत्या, असें उठाविलें.

स्वतःच्या चुकीनें व वेडेपणानें खरें खोटें न जाणणाऱ्या राजाचे बेत सिद्धीस न जातां, त्याला दुर्दैवानें दुःख सोसावें लागतें. विचारशून्य लोक, चमकदार रत्नाला अग्निकण समजून टाकून देतात व कोणी इंदीवराक्षीनें दुसऱ्याच कोणावर टाकलेले नेत्रकटाक्ष स्वतः-लाच उद्देशून आहेत, असें मानतात. अशांनीं सर्वच खरा प्रकार खोटा व खोटा खरा मानला तर नवल काय ?

ही आपत्ती सुज्जीच्या मरणावाचून टळणार नाहीं असें पाहून राजानें त्या प्रतापी

सुज्जीला मारण्याचें काम संजपालाकडेच सोंपलें. तो शूर व धीरवीर होता. यःकश्चित मारेकऱ्याप्रमाणें सुज्जीला दग्यानें खून करणें त्याला योग्य वाटलें नाहीं. म्हणून तो पुष्कळ वेळ अनेक स्थळीं त्याच्यावर उघडपणें हल्ला करूं पहात होता. दोघांच्याहि परस्परांविरुद्ध खटपटी चालल्या होत्या. यामुळें राज्यांत वरचेवर गडबड उडत होती. हल्लयाच्या भीतीनें सुज्जीला रात्रीच्या रात्रीं जागावें लागे. तीच स्थिति राजवाड्यांतील पाहारेवाल्यांची होती. साऱ्या राजवाड्यांत त्यांची सारखी गर्दी असून, ते सज्ज व सावध राहात होते.

सुज्जीनें रिल्हणाला हद्दपार करण्याविषयीं आग्रह धरला. तो निरुपायानें राजानें मान्य केला. रिल्हण राजाचा निरोप घेऊन निघाला तेव्हां धूर्त अशा उदयानें राजाला कळविलें कीं, 'या जुलुमामुळें लोक बिथरले आहेत.' तसें राजानें पुनः त्याला त्याच्या जागीं कायम केलें. २०९०.

सुज्जीच्या इच्छेवरून संजपालानें त्याच्याशीं स्नेह ठेवण्याची तीर्थोदकावर शपथ घेतली. नंतर त्याच्या सल्लेनें रात्रीं राजाकडे जाऊन विनंति केली कीं, ' महाराज, उल्हण वगैरेंच्या चिथावणीनें व स्वतःच्या उन्मत्तपणामुळें सुज्जीला कोणी प्रतिस्पर्धी खपत नाहीं. त्याचें म्हणणें, मी एक विश्वासू व हितकर्ता सेवक आहे, अशी महाराजांनीं खात्री ठेवावी. माझ्यामतें त्यांनीं रिल्हणाला हद्दपार करावें व धनाढ्य चित्ररथाला कैद करावे, म्हणजे मी लोहरच्या मोहिमेंत गेलेले घोडे व खजीना त्याच्याकडून परत आणतों व योग्य साधन सामुग्री जुळतांच दुष्ट कोष्ठकालाहि ठार करतों. मी राजकार्यांत आड येणारा आप्तपणा वगैरे कांहीं मानीत नाहीं. महाराजांच्या सेवेंत स्वामिभक्तिमुळे मीं स्वतःचे प्राण सुद्धां तृणप्राय लेखतों. प्रतिस्पर्धी राजे व इतर शत्रू यांचा पाडाव करण्याचा मी पतकरा घेतो आणि तरुण महाराजांनीं स्वस्थ चित्तानें राजोचित भोग व ऐश्वर्य, यांचा यथेच्छ उपभोग घ्यावा. आपल्याला पूर्ते सहाय्य व्हावें म्हणून, उल्हणाला द्वारपती नेमावें आणि रिल्हणाकडील सर्व कामें व अधिकार मला द्यावें, अशीहि त्याची विनंति आहे. शिवाय त्यानें मला असेंहि म्हटलें कीं, 'उल्हण, तुम्ही व मी मेळानें वागलों तर, गादीवर कोण आहे याचा विचारच कशाला ? राजा जयसिंह हें कबूल न करील तर आपण येथें आहोंच. दुसऱ्या कोणी आप्त प्रतिस्पर्ध्याला आणून गादीवर बसवूं.'

हें ऐकून राजानें दीर्घ उसासा टाकला. तो उत्तर देऊं लागला तेव्हां त्याच्या दंत-पंक्तींतून बाहेर पडत असलेले किरणजाल, काहीं तरी बांधून ठेवण्यासाठीं पसरलेल्या रज्जूंच्यासारखे भासत होते. २१००. तो म्हणाला, ' होय, सुज्जी म्हणाला तें खरें आहे. त्या उद्दाम माणसाच्या अंगीं, पेचपाच, आळस, कर्तव्यशून्यता, वगैरेंचा स्पर्श नाहीं. त्याला ठार मारविण्याचें ठरलेलें आहे. तेव्हां हल्लींचें त्याचें निर्विवाद प्रभुत्व नष्ट करणें किती कठिण आहे याचा विचार कशाला. तो भारी निष्कपटी आहे. त्याला मारविण्याचें ठरविलेलें आहे. तें रागाच्या सपाट्यांत किंवा न्याय्य म्हणून कसें कां असेना ? आतां तें अमलांत आणलेंच पाहिजे. हें माझ्या मनाला खातें आहे. आपण याची चर्चा

हलक्या व चारित्र्यहीन माणसांपुढें केलेली. त्यांना लालूच दाखवून सुज्जी त्याचा सुगावा काढल्यावाचून राहणार नाही. आम्हांला हलकट लोकांना जाणूनबुजून जवळ करावें लागतें. ते त्यांच्या जबरदस्त पूर्वपुण्याईचें फल असो, किंवा आमच्या मूढपणामुळें असो.'

राजे लोक मूर्खांना सेवेत ठेवतात. त्यांचा मूर्खपणा व गैरवर्तन यांचा परिणाम त्यांना भोगावा लागतो, हें त्याबद्दलचे त्यांना प्रायश्चित्तच मिळतें. त्यांच्याजवळ राहणाऱ्या विटांना, सांडांप्रमाणे भूमिभृन्मार्ग-राजे लोकांचे मार्ग-व पहाडी पायवाटा यांनीं जणों दुष्कर असते. लबाड लोक व कुत्री, यांना योग्य वर्तनाचा कंटाळा असतो. तें नेहमीं परान्नपुष्ट राहतात. ते आपल्या जिभेला खळ असा पडूं देत नाहीत.

' अशा लोकांच्या त्रासामुळें केलेला हा दुष्ट बेत आता आपणाला त्याच्या भीतिमुळें सोडतां येत नाहीं. पण याबद्दल पुढे आम्हाला पश्चात्ताप होईल.'

पुढे सुज्जीला ठार मारण्याच्या केलेल्या निश्चयामुळे, राजाला रात्रीच्या रात्री जागरणें पडूं लागली. त्याला झोंप येईना. २११०.

'या बेताची बातमी लागून सुज्जी खबरदार झाला असून तो उलट आपला वध करण्याच्या खटपटींत आहे.' असें कांहीं सेवकांनी राजाला कळविलें. ते खरें वाटून, तो घाबरला. पुढें तो स्वतः, सुज्जी व रिल्हण, यांच्याकडे गेला आणि त्यानें त्यांचा समेट होण्यासाठीं अपसांत विवाहसंबंध जुळवून आणण्यास त्यांना सांगितलें याप्रमाणें संशय दूर करण्याचा प्रयत्न करून पाहिल्यावरहि, त्याला सुज्जीला ठार मारविण्याची संधी मिळेना म्हणून, तो फार खिन्न होत्साता, रात्रंदिवस आपल्या निरुपाय स्थितीचा विचार करीत, पलंगावर पडून तडफडत होता.

संजपालाचा एक आप्त मेल्यामुळें कांही दिवस तो राजाकडे येऊं पावला नाहीं तेव्हां हें साहस सिद्ध होणार नाहीं, अशी त्याला भीति पडून अधिकच त्रास झाला.

राजाच्या फौजेंत कुलराज नांवाचा एक अंमलदार होता. तो मोठा हुषार युद्धकलानिपुण म्हणून प्रसिद्ध होता. त्याचे कल्याणराज वगैरे बंधू रणांगणीं पडले होते. त्यांच्यावर सुस्सल राजाची कृपा होती. तिचें उतराई होणें राहून गेलें. ते प्राणव्ययानें सुद्धां फेडण्याच्या इच्छेनें त्यानें राजाला त्याच्या काळजीचें व दुःखाचें कारण विचारिले त्याला राजानें म्हटलें, 'सेनापती सुज्जीशी समेट किंवा त्याचा नायनाट करणें दोन्ही जुळत नाहीं. यामुळें अप्रतिकार्य व अपरिहार्य अडचण पडली आहे.' तें ऐकून कुलराजानें विनंति केली कीं, 'अः ही एक यःकश्चित गोष्ट, एकाच्या जीवाच्या हानीनें साध्य होणारी, यांत काय आहे?' असें म्हणून त्याने त्या साहसाचा अंगिकार केला.

पुढें सेनापती दोन दिवस घराबाहेर पडला नाहीं. यामुळें कुलराजाला मरण किंवा वैभव मिळविण्याला सवड झाली नाहीं. तिसरे दिवशीं शृंगार नांवाच्या विश्वासू राजसेवकानें सुज्जी एकटाच पलंगावर पडलेला पाहून आल्याचें राजाला कळविलें. २१२०.

सुखांत असलेल्या राजाला नेहमीं हवे तितके सेवक सांपडतात. पण त्याला धोक्याची

नोकरी परक्याकडूनच करवून घ्यावी लागते. कामारिशंकराच्या हातीं शोभेसाठीं नेहमीं गदा दिलेली असते. पण त्रिपुरयुद्धाच्या प्रसंगीं त्याला त्यावेळीं प्राप्त झालेल्या मंदराचला-लाच धनुष्य बनवून काम काढून घ्यावें लागलें.

कुलराज जात्याच मोठा धीट असून त्याच्या चेहऱ्यांत केव्हांहि फारसा फरक पडत नसे. राजानेंहि त्याला आपल्याकडून तांबूल नेऊन देण्याच्या मिषानें सुज्जीकडे पाठविलें. त्यावेळीं त्यानें त्यालाहि तांबूल देऊं केला. पण त्यानें, 'मरण पक्कें ठरलेलें. काम केल्या-वांचून मी परत येत नाहीं, तेव्हां मी हा तांबूल आतां कसा घेऊं?' असें म्हणून तो घेतला नाहीं.

राजाचे कोणी कोणी सेवक प्राणाचीहि पर्वा न करतां राजाचे संकट दूर करण्याचा अंगिकार करतात. पण ते शेवटास नेत नाहीत.

'आता सुज्जी मंडळींत, एकटा, कसाहि असला तरी त्याचा मी खात्रीनें वध कर-णार. नंतर महाराजांनी सुखाने झोंप घ्यावी.' असे सांगून तो रवाना झाला.

या साहसकर्मांत यश आले नाहीं तर त्याला पळून जातां आले असतें, असें कोणा-लाहि वाटलें असतें. या स्वामिकार्यावर जातांना त्याने दोन सेवक बरोबर घेतले होते. त्यांनीं आपलीं शस्त्रे लपवून घेतली होती.

तो महाराजाकडून तांबूल घेऊन आल्याची द्वारपालाने वर्दी दिल्यावर, कुलराज आंत सुज्जीकडे गेला. नोकर दाराबाहेर राहिले. त्यावेळीं मोठ्या हत्तीभोंवतीं छावे असतात तद्वत, सुज्जीजवळ त्याचे थोडेसे खासगी नोकर असलेले कुलराजाला दिसले. २१३०. राजाकडून आलेला तांबूल सुज्जीनें आदराने गृहण केला आणि हंसत हंसत 'महाराज कसे काय आहेत, काय करीत आहेत, वगैरे चौकशी केली व थोड्या वेळानें त्याला निरोप दिला. पुढे न जाणों अधिक माणसें आंत येतील या भीतीनें सहज संधि सांपडल्या-सारखें दाखवीत, कुलराजानें त्याला विनंति केली की, 'माझ्या पदरच्या एका कैवर्त शिपा-यानें कांहीं आगळीक केली आहे त्याला आपले लोक धरणार आहेत, त्यांना मनाई करून आपण मजवरचा लोभ व्यक्त करावा.' यावर हा त्याचा अतिप्रसंग ठीक नाही हें स्पष्ट करीत सुज्जीनें उर्मटपणे उत्तर दिले, 'छे:, तसे कांहीं मी करणार नाही.' तें ऐकून कुलराज नाराजसा होऊन परत जाऊं लागला. तेव्हा सुज्जीला सेवकांनीं त्याचे समाधान करीत सुज्जीला विनंति केली कीं, 'यांना आपण आदराने वागवावें हें बरें.' व त्यांनीं कुल-राजाला परतविले. तसा तो म्हणाला, 'माझे दोन नोकर बाहेर आहेत त्यांना आंत आण-ण्याची आज्ञा व्हावी, ते सर्व हकीकत निवेदन करतील.' तेव्हां सुज्जीनें कांहींसें नाखुषीनेंच त्यांना आणविले. तें मदतीला जवळ असलेले पाहून कुलराज हल्ला करण्याला तयार झाला सुज्जीनें त्याला 'आज जा, उद्या मी हें काम पाहीन,' असे म्हटलें व तो त्याच्याकडे पाठ फिरवून कुशीवर निजला. कुलराज निघाला पण पुनः खंजीर उपसून त्यानें एकदम परतून त्याच्या डाव्या कुशींत जोरानें वार केला सुज्जी, 'हाय, हाय, दगा.' असें म्हणत त्या खंजिराला हात घालतो तोवर त्या तिघांनींहि त्याला वार केले. २१४०.

सुज्जीला धोका आहे, हें तेथील सेवकांच्या ध्यानांत येण्यापूर्वी बराच वेळ त्याचा प्राण सुद्धां गेला होता. तेव्हां ते सारे सेवक घाबरले व स्वामिभक्ति विसरून पार पळून गेले. फक्त पिंचदेवानें तरवार उपसली व हाणामारी केली पण त्याला त्या तिघांनी जखमी केलें. तसें त्याला त्या जागेतून रक्तबंबाळ होऊन बाहेर पडावें लागले. कुलराज व त्याचे नोकर यांनीं दार लावून अडसर ओढला त्यांना ठार मारण्यासाठीं सुज्जीच्या नोकरांनीं दुसरीं दारें व खिडक्या बाहेरून बंद करून, त्यांना गराडा दिला आणि मुख्य दारावर मारा चालविला. कुलराज व दोघे सेवक यांनीं खिडक्यांशीं झगडा चालविला व सुज्जीखालचा पलंग दाराआड उभा केला. सुज्जीच्या माणसांनीं त्यांच्यावर चोहोंकडून शस्त्रास्त्रे व दगड मारमारून त्यांना गोंधळून सोडलें. तो मारा वाढत चाललेला पाहून त्यांचा उत्साहभंग करण्यासाठीं कुलराजानें सुज्जीचें शिर तोडून त्यांच्यांत बाहेर चौकांत फेकले. तें पाहतांच त्या सेवकांची भारी गाळण झाली व ते मोठमोठ्याने शोकाक्रोश करीत पळून गेले.

त्या शिराचे डोळे व कान वहात असलेल्या रक्तानें चकचकित दिसत होते. नाकपुड्या बसलेल्या व मिशांनीं झाकल्या होत्या. पुढे आलेल्या बुबुळांमध्यें पडलेल्या प्रतिबिंबावरून तीं किंचित हलल्यासारखीं दिसत होती. मान खडबडित कांपल्यामुळें तिच्या वळ्यामधील जमलेली चरबी ओल्या हळदीसारखी पिवळी दिसत होती.२१५० कपाळावरील कुंकुमतिलकावरूनच तें शिर सुज्जीचे असे ओळखूं येत होतें. दाढीच्या केसांवर धूळ बसली होती. तें शिर आडवें पडल्यामुळे दंतपंक्ती विस्कळित दिसत होत्या.

कुलराज रवाना झाल्यावर राजाला फारच काळजी पडली. त्याचें चित्त व्यग्र झालें. थोड्या वेळांत बाहेर लोकामध्ये गडबड उडाली. तिच्यावरून काम फत्ते झाल्याचें त्याला कळलें. सुज्जी मारला जावो न जावो, तरी लष्करी लोक तयार ठेवणें अवश्य समजून, त्यानें ते तयार करविले व सुज्जीच्या घराला त्याचा वेढा घालविला. सुज्जी निसटल्याची खोटीच बातमी ऐकून त्याच्याहि अंगात चेव आला. तो खास मारला गेल्याचें ऐकून राजाच्या सैनिकांनीं त्याच्याकडे राहात असलेल्या शिवरथाला कैद केलें. त्याच्यावर सारेच लोक त्रासले व रागावलेले होते. सुज्जीच्या भावाचा मेव्हणा हिल याचा पुत्र कलश यानें दाखविलेल्या शौर्याच्या व प्रतापाच्या वर्णनानें हें काव्य पावन होते आहे. भिक्षू वगैरेंनीं शेवटीं वीरोचित वर्तन केलें, तें त्यांच्यावरच हल्ला झाला तेव्हांच. पण कलशावर तसा कांहीं प्रसंग नव्हता ! तो स्वस्थ व सुरक्षित असतांना, ही सुज्जीच्या खुनाची वार्ता राजवाड्यांत त्याच्या कानीं आली. तसा तो इतरांप्रमाणें पळून न जातां, तडक आपल्या मालकाकडे प्राण देण्याला धांवून गेला. त्यानें त्या बंद दारावर जोरानें धक्के मारले पण तेथून क्रूर अशा राजाच्या सैनिकांनीं त्याला घालविलें. तरी त्या दुःख प्रसंगी तो माघार न घेतां दुसऱ्या मंडपांत गेला. २१६०. तेव्हांच कुलराज वगैरेंना काहींसा दम घेण्याला सांपडलें व नंतर ते राजाकडे गेले.

कलश जबरदस्तीनें आंत शिरला व त्यानें एका बलिष्ट शिपायाला ठार मारलें. पण पुढें त्याला शत्रूनीं दुरून बाण मारून पाडलें. नंतर नगरांत गडबड झाली. तोंवर संजपाल

पोहोंचला होता. त्याला व रिल्हणाला राजानें ताबडतोप उल्हणाला मारण्याला पाठविलें तो आडवाटेनें निसटला असेल, असें समजून, रिल्हण गडबडीनें क्षिप्तिकेपर्यंत जाऊ परत आला. तोंवर उल्हण आपल्या घराच्या दाराबाहेर पडतो इतक्यात, संजपाल येऊ पोहोंचला होता. त्यानें त्याचा मार्ग अडवून काहीं लोक मारले होते. तितक्यांत संजपालाच्या उजव्या दंडावर एकाची तरवार जोराने लागून हाड व मास तुटलें आणि त्याच हात नुसत्या कातडयावर लटकूं लागला. संजपालानें आपलें कुल खालावल्यानंतर स्वपराक्रमावर स्वपरदेशांतहि पुनः उत्तम लौकिक संपादन केला होता. तो चांगला सद्गुणी होत त्याला त्याच्या कर्तबगारीचें योग्य फल मिळणाऱ्या ऐन वेळींच त्याचा अधिकाधिक पराक्रम करून दाखविण्याचें साधनभूत, त्याचा उजवा हात, दुर्दैवानें तुटला. या विधीच्या दुर्विलसिताला धिक्कार असो. त्याच्या भाग्योदयाचा कळस होण्याच्या वेळींच त्याचा तो हात न तुटता तर, त्यानें आपल्या आशा व उमेदी कशा विलक्षण रीतीने सफल केल्या असत्या ते लोकांच्या नजरेस आलें असतें.

अमृतपान करतो तोंच राहूचें शिर धडापासून न तुटतें. तर, त्या प्रबल उग्र ग्राहाच्या मनांत फारांदिवसांपासून काय काय इच्छा व उमेदी होत्या, त्याचा साऱ्या जगाला अनुभव आला असता. २१७०.

सहदेवाचा पुत्र उल्हण हा जखमी झाला होता. त्याच्या समक्षच त्याचा वृद्ध चुलता शील, हा ठार मारला गेला. याचें उल्हणाला फार वाईट वाटलें. तो दुःखीकष्टी होत घरीं परत चालला असतांना, त्याचा निरुपम सेवक व रक्षक जज्जल, आणि दोन शिपायी व एक चांडाल चौकीदार, वाटेंतच मारले गेले. तो घराच्या अंगणांत पोहोंचून आपल्या मुलाकडे पहात बसला असताना, रिल्हणाने त्या घराला आग लावविली. झालेल्या जखमेमुळें त्याला लढतां येत नव्हतें व धुरामुळें दिसत नव्हतें. तसाच त्याला काहीं सैनिकांनीं बेडया घालून बाहेर काढलें. पण कांहीं नीच शिपायांनीं त्याला दारांतच ठार मारलें. त्याच्यामुळें राजाच्या बऱ्याच प्रमुख मंत्र्यांचा नाश झाला होता, म्हणून त्याचें शिर पाहून सुद्धां राजाचा राग कमी झाला नाहीं.

राजाच्या सैनिकाच्या हल्लयाच्या वेळीं सुज्जीच्या बऱ्याच सेवकांनीं चांगलें शौर्य व इनामदारी दाखविली. सुज्जीचा धाकटा भाऊ लक्ष्मक याला बेडया घालून राजाकडे जाण्याचा अवमान सोसावा लागला व राजाची दृष्टादृष्ट झाल्यावर त्याला राजवाडयाच्या अंगणांतच काहीं निर्दय शिपायांनीं ठार मारलें. सुज्जीचा चुलत भाऊ संगत यानें राजांगणरूपी रंगभूमीवर कांहीं वेळ नटाप्रमाणें लढून, शौर्य गाजवून थोरपणानें प्राण दिला. त्याचाच वेडसर भाऊ मुम्मु घरीं आश्रयासाठीं पळून गेला. पण तिकडेच त्याला कांहीं ब्राह्मण कुलांतील दुष्टांनीं मारून टाकलें. सुज्जीचा मेव्हणा चित्रिय हा थोर कुलांतला होता. त्यानें सारें आयुष्य चैनींत घालविलें होतें. तरी अखेरीस त्यानें शौर्य गाजवून थोरपणाला उचित असें मरण मिळाविलें.२१८०. त्याचा द्वारपाल सांजिक जखमी झाला व पुढें मरण पावला. त्यांचे दुसरेहि

बरेच आश्रित अन्यत्र मारले गेले. त्यांच्यापैकीं वीरपाल व दुसरे दोघे तिघे चपल अश्वा-वर स्वार होऊन जलदीनें कोष्ठेश्वराकडे पोहोंचले म्हणून वांचले. संगताचा भाऊ शारदीय हा घोडयावरून चालला असतांना त्याला सुभटा मठाजवळ, हलकट लोकांनीं अडविलें. यामुळें त्याला प्रतिबंधात पडावें लागलें. सुज्जाचा एक पुत्र सज्जल व वडील भावाचा पुत्र श्वेतिक आणि उल्हणाचा पुत्र यांनाहि कैदेंत टाकण्यांत आलें. हा निर्घृण प्रकार लौकिक वर्ष ४२०९ म्हणजे ई. सं. ११३२ च्या आषाढ शुद्ध पंचमीला घडून आला. त्याचें कारण राजा व मंत्री लबाड व चहाडखोराच्या पाशात फसले होते, हें होय.

या राजाजवळ चांगलीं चांगलीं माणसें आहेत तरी अद्यापिसुद्धां त्याला, त्या कोणच्याहि कामीं अकुंठित मति व कृति सुज्जी मंत्र्याचें स्मरण होऊन दुःख झाल्यावाचून राहात नाहीं.

वेताळ उठविणे, कडयावरून उडी मारणें, विषचर्वण व सर्पांशीं खेळणे, या सर्वांहून राजसेवा किती तरी भयंकर असते. ज्याचे गुणगण दुसऱ्यावर अवलंबून असतात, असा राजा व ज्याच्या दोऱ्या दुसऱ्याच्या हातीं अवलंबून असतात असा रथ, यांच्या-पुढे विश्वसून उभा राहणाराचा नाश झाल्यावाचून कसा राहणार?

सुज्जीला मारविलें हें वाईट झालें असें राजाला वाटत होतें. पण त्यांतच लोकांना त्याची विलक्षण कर्तबगारी वाटली व ते त्याना पसंत पडलें!

नंतर राजानें संजपालाला सेनापती केलें व कुलराजाला नगराधिपति—कोतवाल नेमलें. २१२०.

धन्य व उदय मल्लार्जुनाला सोडून नगराला परत आले. ते पूर्वीप्रमाणे राजाचे प्रमुख नर्म सचिव झाले. इतर सर्व आश्रय सुटल्यावर चित्ररथाला दैवानें हातीं धरलें. त्यानें जुलूम जबरदस्ती करून त्या प्रांताला भारी त्रास दिला होता. त्याच्याकडे मनसोक्त अधि-कार होता व राजाचा त्याच्यावर मुळींच दाब नव्हता. तरी त्याला तिकडे शांतता करता आली नाहीं. गधर्वान येथील किल्लेदारानें टिक्काला मारून त्याचें शिर राजाकडे पारेविशोक येथें पाठविलें

पुढे लोठण थोडयाशा लोकांनिशी एकाएकीं एकारात्रीं हाडिग्राम येथे दाखल झाला. सारखे दूत पाठवून कोष्ठेश्वरानें त्याला प्रोत्साहन दिलें होतें. कोष्ठेश्वराचें पूर्वीपासूनच राजाशीं वैर होते त्यातहि राजानें अलीकडे अनेक विजय व ख्याती मिळविल्यामुळें त्याला स्वतःचा जास्तच अवमान झाला, असे वाटत होतें. बाकीच्या बहुतेक प्रमुख डामरांशीं राजाचा चांगला मेळ झाला होता हें पाहून या वेळीं त्या लवन्य कोष्ठेश्वरानेंहि त्याच्याशीं नुकताच समेट केला होता सबब त्यानें लोठणाला पुष्कळशा थापा देऊन, आला तसाच परत पाठविलें. उच्चल वगैरेसारखे आपणहि पुनः राज्य परत मिळवूं अशी लोठणाला उमेद होती. पण त्याचे सर्व प्रयत्न फसत. म्हणून त्याला लोक हंसत असत.

पुढें राजानें, कोष्ठेश्वरावर मारेकरी घालून, त्याचे लोक फितवून, अथवा असल्याच अन्य उपायांनीं, त्याचा नाश करण्याचा विचार चालविला. त्यानें त्याच्यावर मारेकरी पाठविले. त्यांना पकडून, कोष्ठेश्वरानें रागानें त्यांचे डोळे काढले आणि राजाशीं समेट ठेवण्याचा नाद सोडून, त्याच्याशीं बरोबरीनें लढण्याची तयारी चालविली. २२००. तेव्हां राजानें आपल्या जागजागच्या सेनापतींना सैन्यासह कोष्ठेश्वरावर स्वारी करण्याची आज्ञा केली. त्यानें स्वतःहि फौजेसह, त्याच्यावर चाल केली व एकदम हल्ला केला. त्यावेळीं राजा थोडयाशाच लोकांनिशीं पुढें वाढून आल्याचें कळल्यावरून कोष्ठकानें त्याला अवचित गांठून, घेरण्याचा यत्न केला तो फसला. चित्ररथाजवळ मोठी फौज होती. तिची व कोष्ठेश्वराच्या सैन्याच्या एका विभागाची गाठ पडली. तेव्हां झालेल्या लढाईंत दुर्दैवानें तिचा पराभव झाला. तो, चित्ररथाच्या पुढें झालेल्या अनेक अपजयांचा ओनामाच झाला व त्याचें धैर्य प्रत्यहीं कमी कमी होत गेलें.

रिल्हणादिकांशीं लढल्यानंतर कोष्ठेश्वरानें संध्याकाळीं आपलें सारें सैन्य एकत्र करून व पसरून संजपालाच्या फौजेवर हल्ला केला. त्याच्यापुढें बहुतेक सैनिक पळून जाऊन, संजपालाजवळ नुसते शंभरहून कमीच शिपायी उरले. पर्वत हत्तींच्या कळपाच्या टक्करा संथपणें सोसतो, त्याप्रमाणें त्यानें तेवढ्याच लोकांनिशीं शत्रूच्या साऱ्या फौजेचा मारा सोसला.

ज्या नर व्याघ्राचें शरीर लढाई अधिकाधिक रंगांत येईल तसे जणों कवच फोडूं पहात फुगत जातें, त्याचें कोठवर वर्णन करावें ! त्यानें अढळ धैर्यानें शत्रूचे नेटाचे अनेक हल्ले, अशा रीतीनें थोपविले असताना, त्रिल्लक वगैरे लवन्य आपापल्या सैनिकासह त्याला येऊन मिळाले. त्याना आपला प्रतिपक्षी आप्त कोष्ठेश्वर याच्याविषयीं आदर वाटत होता. म्हणून ते प्रत्यक्ष लढाईंत सामिल झाले नाहींत. तरी या बिकट प्रसंगीं त्याला त्यांचा थोडा बहुत उपयोग झाला. शेवटीं संजपालानें स्वतःचीच हिम्मत व प्रताप यांच्या योगानें शत्रूला मागें परताविलें.

वेळेवारी तयार राहून, सैन्यांतल्या लोकांना प्रेमाचीं व उत्साहजनक भाषणें बोलून, रात्रीं खबरदारी ठेवून, माऱ्याचीं स्थळें शोधून काढून, तीं सोय पडेल तशीं हातीं घेऊन, किंवा सोडून देऊन, शत्रूला पळवून लावणें, वगैरे गोष्टी या यशस्वी सेनापतीला अद्वितीय व प्रशंसनीय रीतीनें करता येत होत्या. तेव्हां त्याच्या हल्ला करण्याच्या तऱ्हेची निराळी तारीफ करण्याची आवश्यकता नाहीं. २२१०.

अनुयायानीं दगा दिला व शत्रूचा आवेशानें हल्ला होत असलेला पाहून, कोष्ठेश्वराचें मन निरुत्साह व चंचल झालें व तो त्या पहाडावरून उतरून पळून जाण्याचा इरादा करूं लागला. पण अवचित हिमवृष्टी होऊन, रस्ते बंद झाले होते व शत्रूनें पाठलाग चालविला. यामुळें त्याच्या स्वारांना निसटून जातां येईना. पुढें राजाचा भारीच दबाव पडला. या दुर्दशेमुळें तो फार दुःखीकष्टी झाला आणि थोडयाशा लोकांनिशीं गंगास्नानाला निघून गेला. ती दुर्दशा त्याच्या मनाला फार डंवचत राहिली.

सोमपालाचा पुत्र भूपाल यानें बापाला फारच त्रास दिला व स्वतः राजा होण्याची सारखी खटपट चालविली. म्हणून त्रस्त होऊन सोमपाल या सुमारास राजाच्या आश्रयाला आला होता. त्यानें नागपालाच्या दोघां पुत्रांना ओलीस दिल्यावर राजानें त्याला आश्रय दिला. शरणागतांवर तो नेहमीं कृपा करीत असे. त्याचा स्वभाव निष्कपटी व उदार होता. सोमपालानें दगा दिल्यामुळेच बृहद्राज लक्ष्मक, याला अपयश आलें होतें. या गोष्टीकडे राजानें या वेळीं लक्ष न देता, आपले सैन्य त्याच्या सहाय्याला दिलें. त्या सैन्यानें जाऊन भूपालाचा पराभव केला व सोमपालाला पुनः गादीवर बसविलें.

कोष्ठक पावन असें गंगास्नान करून परत आल्यावर त्यानें मल्लार्जुनाचा पक्ष धरून पुनः बंडाचा प्रयत्न चालविला होता. मल्लार्जुन सूर्यग्रहणानिमित्य कुरुक्षेत्राला गेला होता. ( हें सूर्यग्रहण ता. १३ जुलई सन ११३४ ई. रोजीं झालें व तें ठाणेश्वर व कुरुक्षेत्र या भागात दिसले होतें. ) तेथे कोष्ठेश्वराची व त्याची भेट झाली. तेव्हा त्याला निरुपायानें कोष्ठेश्वराशीं झालेलें पूर्वीचें वैर विसरावें लागलें. १२२०.

याच्यापूर्वीच डामरानीं बोलावल्यावरून, लोठणहि तेथें पोहोंचला होता. तो मल्लार्जुन व कोष्ठेश्वर यांचा मेळ झालेला पाहून कष्टी होऊन परत गेला.

सोमपालानें श्रीविजयेश लिंगाची शपत घेतली असूनहि नीचपणानें राजाच्या प्रतिस्पर्ध्यांनीं योजलेल्या स्वारीकडे दुर्लक्ष केलें. पण भूपालानें राजाची खुषामत करीत, मार्गांतील ठक्कराना चिथावून त्याच्याकडून कोष्ठेश्वर त्याच्या हद्दींत शिरताच त्याला लुटविण्याची व्यवस्था करविली.

इकडे चित्ररथानें कर वाढविण्याच्या बाबतींत दुराग्रह धरल्यामुळें अवंतिपुर येथील द्विजानीं नाराज होऊन प्रायोपवेशन केलें. तो उर्मट मंत्री राजाचीहि पर्वा करीत नव्हता. त्याला त्या द्विजांची मुळीच कींव आली नाहीं तेव्हां त्यांतील कांहींनीं अग्निकाष्ठें भक्षण केलीं. त्याच्या नोकरानीं गोमातेचीं गायरानें सुद्धां जप्त केलीं. तेव्हा एका गुराख्यानें त्या गायींची दया येऊन अग्निप्रवेश केला.

भट्ट उद्भट याच्या वंशांतील पृथ्वीराज, याच्या विजयराज नांवाच्या तरुण पुत्रानें गरीबीला कंटाळून आपल्या कनिष्ठ बंधूसह परदेशीं जाण्याचें ठरविलें होतें. त्यानें दुःखाकष्टानें सद्गदित होऊन त्याला म्हटलें, 'हा दुष्ट मंत्री, या बिचाऱ्या दीन प्रजेला पहा कसा छळतो आहे ! तरी राजाची त्याच्यावर सारखी कृपा आहे. लोकांच्या हालअपेष्टेकडे त्याचें मुळींच लक्ष नाहीं. मंत्र्यावर सर्वस्वी विसंबून राजा प्रजेच्या दुःखाकडे दुर्लक्ष करील तर त्या दुःखाचें निवारण दुसरा कोण करणार ? २२३०. अशा स्थितींत दंडय माणसाला कोणी तरी पुढें होऊन शासन करणें प्राप्त व योग्य असलें पाहिजे. त्यांत त्याच्यावर आपत्ती आल्यास आणखी कोणी त्याचें रक्षण केलें पाहिजे. कधीं कठिण पोलाद भारी दगडाचा फडशा पाडतें तर कधीं दगडच त्या पोलादाचा पाडाव करतो. राजा सर्व सद्गुणांचें आगर आहे. त्याला नांवें ठेवण्याला मुळींच जागा नाहीं. त्याच्या अंगीं कांहींच दोष नाहीं. या त्रासाला चित्ररथाच्या वधाव्यतिरिक्त उपायच दिसत नाहीं.'

सर्वांच्या हितार्थीत्यर्थ एकाचा नाश करणे न्याय्य असते, असें म्हणतात. प्रत्यक्ष जिन-बुद्ध-देवानें देखील, एका प्राणिहिंसक दुष्ट सर्पाला ठार मारलें होतें. त्या दुष्टाचें शासन केल्यानें कोणी धीट व उत्साही पुरुष आपलें शासन करील, या भीतीनें पुढे दुसरा कोणी अधिकारी, पुनः लोकांवर जुलूम करणार नाही. या देहाची आहुती देऊन अगणित लोकांना सुखी करतां आलें तर, तो एक उत्तम सवदान्न नव्हे काय ?' त्याला कनिष्ट बंधूची संमत्ती मिळाली. नंतर त्यानें तीर्थजलावर त्यांच्याकडून शपथ घेवविली आणि तो चित्ररथाचा वध करण्यासाठीं त्याच्या पाळतीवर राहूं लागला.

या कलियुगांत धर्मप्रबंध दुर्बल झाले आहेत, असा त्याला डाग लावला जातो. तरी हल्लींसुद्धां भूदेवाचें अप्रतिहार्य व प्रखर तेज मधून मधून प्रत्ययास येत असतें. पूर्वार्जित सर्व सुकृत संपलें असल्याशिवाय कोणीहि दुराग्रहानें ब्रह्मद्वेष करूं लागत नाही. सुर्जानें द्विजांना चेंव आणला होता. तो कोपलेल्या द्विजांच्या हातूनच मारला गेला. तसेंच द्विजाचा छळ व अवहेलना करणाऱ्या चित्ररथाला एका द्विजानेच ठार मारलें. २२४०.

खरें पाहता त्या तरुण ब्राह्मणाने स्वतःचा प्रत्यक्ष हितसंबंध मुळींच नसतांना, आपला प्राण बळि देऊन त्या चित्ररथाचा प्राण घेण्याचें ठरविलें. तो जणो त्या त्रस्त ब्राह्मण समाजाच्या विपत्तीमुळें क्षोभून गेला होता म्हणूनच त्या ब्राह्मणांनी अग्निकाष्ठें भक्षण केलीं, त्याच सुमारास चित्ररथाचें कांही अनुयायी अपसांतील भांडणांत मारले गेले.

आपला बेत पार पाडण्यासाठीं चित्ररथाजवळ पोहोंचून संधि मिळविण्याला, त्या दोघां ब्राह्मणांना रात्रीच्या रात्री जागरूक राहावें लागलें. कारण चित्ररथाबरोबर नेहमीं पुष्कळसे शिपायी रहात असत. तो बाहेर फिरावयाला निघे तेव्हां रस्त्यात दूरवर मोठ-मोठ्या माणसांची गर्दी असे. तिच्यांत तो केव्हांच दृष्टिआड होत असे. तरी विजय राजाची चिकाटी जबरदस्त होती. तो सारखा त्याच्या मागें असे. शेवटीं एकदां चित्ररथ राजवाड्याच्या पायऱ्या चढत असतांना, त्यानें मागून धावत जाऊन त्याला गाठलें. चित्ररथ एका खांबाजवळ उभा होता व त्याच्या भोंवतीं कांहीं सरदार उभे होते. तेथेंच विजय राजानें त्याच्या डोक्यावर सपाटून खंजीर मारला. त्या आघातानें तो घाबरला व त्याची मृतप्राय स्थिती झाली. तो बेशुद्ध व निस्सत्व होऊन पडला. त्याचे डोळे फिरूं लागले. ही गोष्ट राजाज्ञेनेंच झाली आहे, असे समजून, त्याच्या नोकरांची गडबड उडाली. तो मेला या समजुतीनें विजयराजानें पुनः वार केला नाहीं. तोंवर त्याचा भाऊ दुसऱ्या जिन्यानें येऊन पोहों-चला होता. त्यालाहि त्यानें थोपाविलें. सारे मार्ग मोकळे असूनहि तो पळाला नाहीं. उलट त्यानें मोठ्यानें ओरडून 'चित्ररथ राजाज्ञेनें मारला गेला आहे.' असें सांगितलें. २२५०. ते ऐकतांच चित्ररथाबरोबर रोज मिष्टान्न व राजभोग झोडीत असलेले त्याचे सारे आश्रित व सेवक घाबरून पळून गेले. त्याचा वडील बंधू लोष्ठरथ हा भिऊन एका वेश्येचा घरीं लपला आणि त्यानें तिचा स्तन तोंडांत धरून आपलें मस्तक तिच्या पदराखालीं घातलें. ( शरण आल्याची द्योतक अशी ही चाल या पहाडी लोकांत तसेंच कांहीं जातींच्या अर-

बांमध्येंहि जारी होती, चित्ररथाला जबर जखम झाली होती. तसेंच त्याला राजाकडे नेलें. तेव्हां त्यानें त्याला, 'भिऊं नका, तुम्हाला कोणी वार केला?' असें विचारून आश्वासन केलें आणि त्या खून करणाऱ्याचा तपास करण्याची आज्ञा दिली. तसा तपास चालू झाला तेव्हां विजयराजाने पुढें होऊन, 'हा मी खून केला.' असें सांगितलें. पुढें तो मोठ्या शौर्यानें लढला व वीस तीस शिपायी मारून आपलें उत्कृष्ट धैर्य व शौर्य दाखवीत असतांना पायावर वार लागून पडला व मारला गेला. त्याच्या दंडावर एक कागद बांधलेला मिळाला. त्याच्यांत हा खून करण्याचें कारण, 'परित्राणाय साधूनाम् विनाशायच रक्षसाम्॥ धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे॥' या गीतेतील श्लोकाच्या रूपानें दिलें होते. (असाच गीतेतील श्लोकाचा उपयोग पुढें ८०० वर्षांनी वंगभंग प्रसंगानें उद्भवलेल्या कांही, आततायी अराजकांनीं केला. पुण्यास प्लेगच्या अश्रुतपूर्व धामधुमीच्या वेळीं चाफेकर बंधूनीं र्‍यांड. साहेबांचा खून केला, त्यावेळीं तेही या विजय राजाच्याप्रमाणें धडाक्यानें पुढें होऊन 'आपण अमुक अमुक कारणासाठीं त्याला मारले,' असे सांगून टाकले असते तर, त्यांचाही चांगला लौकिक होऊन, पुणेकरांना त्या खुनामुळें पुढे सोसावा लागलेला त्रास व सरकारचा त्यांच्यावरील अविश्वास पुष्कळ कमी झाला असता. लेले) या श्लोकाच्या द्वारें प्रदर्शित केलेल्या विचारांमुळे विजयराजाला साधुत्व प्राप्त झाले.

चित्ररथाची जखम भरली पण कपाळाच्या कवटीचे सांधे तुटल्यामुळे त्याला अन्नद्वेष व भारी क्लेश झाले व शेवटीं वेड लागले. पांच सहा महिने त्याचा शुष्क देह मोठ्या कष्टात अंथरुणावर तळमळत होता

कोष्ठेश्वराने मल्लार्जुनासह दाट अरण्यातील एका विस्तीर्ण पहाडी दुर्गाचा आश्रय केला होता. ११६०. तेथून त्याची बंडाची खटपट चालूच होती. तिच्यासाठीं तो आपल्या बाजूचे लोक जमवीत फिरत असताना, लोकांत बरीच गडबड उडाली. त्यांना अद्यापि पूर्वीच्या धामधुमीचे विस्मरण पडलें नव्हते. पुनः गादीसाठीं झगडा होणार, अशी त्यांना भीती पडली. अकस्मात हिम पडल्यानें पुढें कधीं कधीं तीव्र व कडाक्याची थंडी पडते, त्याप्रमाणें ही शत्रूची टोळधाड आलेली पाहून, ते सारे फार घाबरले आणि धैर्य व उत्साहहीन झाले.

त्या दुर्गा भोंवतालच्या प्रदेशांतील जंगलातले गाव, आपल्या मंत्र्याकडून ताब्यांत घेववून, राजानें त्याला चोहोंकडून वेढा देवविला. संजपाल यवनाबरोबर–हे बहुतेक मुसलमान असावेत–छावणींत पोचतांच, निर्वात स्थळी वृक्ष स्तब्ध होतात, तशी शत्रूची सर्व हालचाल बंद झाली. धंन्यानें आपले सैनिक शिलिकाकोट्ट येथें नेऊन ठेविले. सिंहाला हत्तीचा गंध सुद्धां खपत नाहीं, तद्वत् त्याला शत्रूचें नांव सुद्धां त्रासदायक वाटे. राजानें रिल्हणाला फौजेसह गोवांस येथें ठेवले होतें. तेथून तो साऱ्या जंगलाची दौड करीत असे. सूर्यापुढे घुबडें तोंड लपवितात, तशी त्याच्यापुढें शत्रूची स्थिति झाली. त्या उत्साही राजानें अशी व्यवस्था केल्यामुळें, कोष्ठेश्वराला तीन चार महिने बाहेर तोंड काढतां आलें नाहीं. त्या

परकी देशांत त्यांची मोठी दुर्दशाच होती. शेजारच्या राजानींहि त्याची उपेक्षा केली होती. त्याचे अनुयायी सोडून जात होते. राजाच्या मंत्र्यांनीं त्याचे सारे प्रयत्न हाणून पाडले होते.

कोत्या बुद्धीमुळें त्याला राजाचे मार्ग कळत नव्हते. त्याचा पाय टिकेना. आपण केलेले अपराध विसरून त्याने राजाची मनधरणी चालविली. राजाचा राग घालवून त्याला प्रसन्न करण्याला कोष्ठेश्वर उत्सुक आहे असें पाहून, संजपालानें त्याला व्यर्थ नावें न ठेवतां, स्वतःच्या निस्सीम स्वामिभक्तीला स्मरून व राजाचें हित लक्षांत घेऊन, त्याचें म्हणणें मान्य केलें. २२७०. व त्याच्याशी समेट करण्याला तो तयार झाला. कोष्ठेश्वरानें त्याला दुःख दिले होते. त्याचा बदला घेण्याचें त्याच्या मनांत सुद्धां आले नाहीं. पृथ्वीहराच्या पुत्रांनीं कोष्ठेश्वरावर कृपा केली यांत आश्चर्य नाहीं. संजपालाने कोष्ठेश्वराला राजाकडे नेलें. तेव्हां त्याने आपले बोट कापून घेऊन शरण आल्याचें व्यक्त केलें. त्याच्यावर राजानें कृपा करावी म्हणून संजपालानें आपली पगडी गळ्यांत घेतली व योग्य संधीची वाट पाहून, अत्यन्त नम्रपण विनंति केली. तरी राजाचा राग शांत झाला नाहीं. कारण कोष्ठेश्वरानें कांहीं राजचिन्हें धारण केली ती व त्याच्या कांही आज्ञा अमान्य केल्या होत्या आणि उन्मत्तपणें राजाच्या बरोबरीचा थाट व डामडौल ठेवला होता.

तितक्यात मल्लार्जुन पकडला गेल्याची खबर आली. भाग्यवंताला एकामागून एक भाग्य प्राप्त होत असतात. मल्लार्जुन त्या दुर्गांतून पळून गेला होता. त्याला जलद चालण्याची संवय नव्हती. प्रवासाचे परिश्रम सोसवेनांत सबब सेवक लोक त्याला खांद्यावरून वाहून नेत होते. वाटेंत आलेल्या अनेक अडचणीतून कसा तरी निभावून तो लोहरकोटच्या राजाच्या हद्दींत सावर्णिक या गांवीं पोचला. (सावर्णिक-हल्लींचें सूरन नावाचें मोठेंसें खेडे. प्रन्स तोहिच्या खोऱ्याच्या वरच्या अंगास आहे. तेथून लोहर दोन मुक्कामावर आहे.) तेथें त्याला जाग्गिक नांवाच्या ठक्करानें अडविलें. त्याच्यावर पाहारा ठेवून जाग्गिक स्वतः वर्दी देण्याला आला असल्याचें राजाला कळलें. मल्लार्जून पूर्वी दुर्गांतून निसटतानांच धरला जावयाचा, पण सुदैवानें बचावलेला आतां या शत्रूच्या हातीं पडला. दैवाच्या कचाटींतून कोण सुटणार ? गंगा स्वर्गांतून बाहेर पडलेली, सागराच्या कुक्षीचें पूरण करते तोंच, तिला त्या सागरासहित दुसऱ्या एका ऋषीनें–अगस्तीनें–गडप केले ! होण्यमरन कोणालाहि टाळतां येत नाहीं. २२८०.

जाग्गिक मल्लार्जुनाला बंदोबस्तानें ठेवीत व आणीत होताच, तरी राजानें या कामावर द्वारपती उदय याला पाठविलें. अडचणीच्या व महत्वाच्या प्रसंगी त्याच्या इतका निश्चयी, धोरणी, विचारी, उत्साही व नेटस, मंत्री राजाच्या दृष्टीनें दुसरा कोणी नव्हता. मार्गातील पहाडी रक्षक लोक, मित्र व शत्रू सर्वांकडून पैसे उकळीत असत. यामुळें तो मार्ग पांथस्थांना दुर्गम व त्रासदायक होत असे. त्या मार्गानें उदय सावर्णिक येथें पोहोंचला तेव्हां मल्लार्जुन एका खिडकीशीं उभा होता. उदयन जवळ आल्यावर तो

त्याला भेटला. दोघाचे अनेक गोष्टीवर बरेच बोलणें झालें. त्यांत मल्लार्जुनानें उदयनाची पुष्कळशी तारीफ केली व आपलें धैर्य कायम आहे, असें बाह्यत: दाखवीत, बरेंच धिट्टाईचें सोंग आणून, तो त्याला म्हणाला, ' आपण शहाण्या लोकांचे अग्रणी व निस्सीम स्वामिभक्त. आपणाला लोभाच्या पाशांत फसलेल्या माणसांनीं येथें आणलें आहे. आपणासारखा रक्षामणी नसल्यामुळेंच मला माझ्या तरुणपणीं राज्यकारभारांत पुष्कळशा खटपटी होऊन वाईटपणा घ्यावा लागला. अधिकारावर असतांना राजे लोकांकडे जाणें किंवा त्याच्याकडे पाहणेंसुद्धां दुष्कर असतें. पण तेच दुर्दैवाच्या फेऱ्यांत फसले असतांना, हिवाळ्यांतील मंदरश्मी-सूर्यबिंबासारखे होतात व वाटेल त्याला त्यांच्याकडे पाहतां येतें. उदय व अस्त दोन्ही वेळीं आरक्तबिंब दाखविणाऱ्या सूर्याप्रमाणें, कारकिर्दीच्या प्रारंभीं व शेवटींहि सारखाच प्रताप पसरणारा व पौर स्त्रियांच्या उत्सुक व आनंदी मुखकमलांच्या प्रदर्शनानें राज्यारोहण शुभोदर्क झालेला व अंतसमय अप्सरागणांना उत्कट प्रेमप्रदर्शनानें गोड केलेला राजाच, खऱ्या प्रशंसेला पात्र, अभिनंदनीय, आणि खरा थोर होय.

कोणी महाकवि पद व अर्थ प्राप्त होऊनहि पद्य पूर्ते करण्याच्या कामीं गोंधळावा, तद्वत थोरपणामुळे योग्य व श्रेष्ठ पद मिळून बराच अर्थ साधल्यावर शेवटीं माझी वृत्ति गोंधळून गेली आहे. २२९०. मला आपण एका गोष्टीविषयीं आश्वासन द्यावें. तें देणे आपल्या शक्तीबाहेर नाहीं'. नंतर त्यानें एक स्फटिकलिंग काढून त्याच्यापुढें ठेवलें व त्याला स्पर्श करून त्यानें ते आश्वासन द्यावें, असें सुचविलें. हा मानी राजपुत्र, आपणाला कोणा योग्य वीराशीं युद्ध करण्याची सवड मिळावी, असें आश्वासन मागणार असेल, या समजुतीनें, उदयनानें त्या शिवलिंगाला स्पर्श करून आश्वासन दिलें. त्यावर मल्लार्जुनानें म्हटलें, 'माझे डोळे न काढतां, मला न मारतां व जखमी न करतां, राजाकडे न्यावें, याबद्दल मला आश्वासन पाहिजे. ' हें त्याचें दीन व भित्रेपणाचें भाषण ऐकून सर्वजण लज्जित व सुन्न झाले. पावसानें नमलेल्या वृक्षांच्या शेंड्याप्रमाणें त्यांनीं मस्तकें खालीं केलीं. पुढे विचार करतां, त्यांना भिक्षूच्या अंताचें स्मरण आलें. तेव्हां त्यांचीं अंत:करणें आनंदानें खुलून गेलीं.

उदयानें त्याला मेण्यांत घालून रवाना केलें. त्यावेळीं तो आपले अनुयायी व आश्रित, यांच्याकडे निर्लज्जपणें व तटस्थ वृत्तीनें पहात होता. वाटेंत तो पशूप्रमाणें सारखा खात, पीत, व झोंप ताणीत होता. दुसरा कसलाहि विचार त्याच्या मनाला शिवला सुद्धां नाहीं. अशा स्थितींत त्याला पाहऱ्यांत व बंदोबस्तानें नेत असतांना, लोकांना त्याची कींव वाटे. ' राजा, याचा वडील भाऊ, त्यानें या पोरक्या कनिष्ठ बंधूशीं असें क्रूर वागणें व त्याच्यावर दया न करणें, त्याला शोभत नाहीं. या नीलोत्पलसदृश सुरेख तरुणाला, कष्ट देऊन विरूप करण्याइतका निष्ठुर कोण असेल'. असें ते राजाला नांवें ठेवीत. पण पूर्वीच्या त्याच्या गोष्टी व त्यांचे परिणाम, त्यांनीं लक्षांत घेतलें नाहींत. किंवा त्याचा परस्पर संबंध त्याचे दोष व त्यानें केलेले अपराध, वगैरे सर्व ते लोक विसरून गेल्यामुळेंच तेहीं नांवें

ठेवीत असावेत. लहान मुलें व अविचारी लोक, यांच्या भाषणाचा विचारच काय करावयाचा ' मोठमोठ्या माणसांचें विचार व भावणें सुद्धां नेहमीं योग्य व एकसारखीं असत नाहींत '

कपट द्यूतांत पांचाल राजकन्येच्या केशाकर्षणाच्या वगैरे गोष्टी ऐकून, लोकाना पांडवापेक्षां धार्तराष्ट्रांचा अधिक त्वेष येतो. तसेंच भीमानें केलेलें दुःशासनाचें रुधिरपान आणि मांडी मोडून पडलेल्या दुर्योधनाच्या मस्तकावर केलेला लत्ताप्रहार, याचें वर्णन ऐकल्यावर, तेच लोक पांडवावर रागावलेलें दिसून येतात. कोणचीहि गोष्ट घडत असतांना, तिच्या गर्दीत हजर असणाऱ्याला, तिचीं कारणे व परिणाम, यांचें जसे ज्ञान होतें, तसें तें इतरांना होत नाहीं. तमासगिरांचे मनोविकार व विचार तो तमाशा चालला असतांना अर्थातच बदलत असतात.

मल्लार्जुन मेण्यांत बसून आणलेला सायंकाळीं नगरांत पोहोंचला. त्याला पाहून लोकांचे नेत्र भरून आले. त्यानें आपली अंगुली कापून एका मडक्यांत बरोबर घेतली होती. लौकिक वर्ष ४२११ ई. स. ११३५ च्या आश्विन शुद्ध पौर्णिमेला राजाने त्याला नवमठात कैदेंत ठेवविलें. तेथें त्याने पाच सहा दिवस फार दुःखाकष्टांत काढले व त्यानें अन्नग्रहण केलें नाहीं. राजाचा पादस्पर्श करण्याची परवानगी मिळण्याविषयीं, त्याच्या सारख्या विनवण्या चालू होत्या, शेवटीं राजा कृपा करून त्याच्याकडे गेला. २३१०. व त्याने त्याला अभय दिलें. नंतर मल्लार्जुनाने त्याला म्हटलें कीं कोष्ठेश्वर व चित्ररथ दोघेहि मोठे लबाड व राजद्रोही आहेत. त्यांना जिवंत ठेवणें योग्य नाहीं. '

यावेळीं कोष्ठेश्वर आपल्या घरीं गेला होता. त्याला कैद करण्यासाठीं राजानें रिल्हण व इतर पांच सहा मंत्री, याना आज्ञा केली. ते सारे घाबरलेसे दिसले. तेव्हां राजाने ते काम स्वतःच अंगावर घेतलें. तिमिंगल तिमी माशाला खातो तसें, रिल्हणाने राजाबरोबर कोष्ठेश्वराच्या घरीं जाऊन त्याला स्वतः घट्ट आंवळून धरलें. त्याची तरवार काढून घेतली गेली. निजलेल्या माणसाला पिशाच्चानें पछाडावें त्याप्रमाणें तो रिल्हणाच्या मगरमिठीत अडकला होता. त्याला कांहीच धडपड करतां येईना. तितक्यात कुलराजाचा पुतण्या भिख्खराज, यानें राजाच्या आज्ञेनें त्याच्या मानेवर खंजीर मारला. पृथ्वीपाल राजपूत त्याच्या डोक्यावर फरस मारूं लागला तेव्हां, राजानें रागाने त्याला मना केलें. खंजीर मानेवर जोराने लागला होता त्यामुळें कोष्ठेश्वर रक्तबंबाळ होऊन जमीनीवर निपचित पडला. तसेंच त्याचा भाऊ चतुष्क याला कमालिय वगैरे दांडग्या माणसांनीं, हत्ती लांकडाचा ओंडका जमीनीवर फेकतो, त्याप्रमाणें धरून खालीं पाडलें. त्याचा आश्रित मल्लक नांवाचा ब्राह्मण, हा आपले दोन्ही मालक असे असहाय पाडाव झालेले पाहून, नागवीं तरवार घेऊन धावला व त्यानें कांहीं राजसेवकांना जखमी केलें. तसे दुसरें राजसेवक त्याच्याकडे धांवले. २३२०. त्यांतच कुलराजहि होता. त्याच्या हातीं नुसता खंजीर होता. तो शस्त्रविद्येंत मोठा निपुण होता, त्यानें मल्लकावर हल्ला करून त्याला भिंतीकडे रेटीत नेले. मल्लकहि पटा-

ईत तरवार बहाद्दर होता. त्यानें चपलतेनें कुलराजाचे वार चुकविले. कुलराजाला मल्लकाला ठार करतां येईना किंवा तेथून निसटतांहि येईना. त्याला स्थिर व जोराचा वार करण्याला अडचण पडूं लागली. तो मल्लाचे वार चुकवीत होता. मल्लक रागारागानें व त्वेषानें हातपाय आपटीत, व मोठ्यानें ओरडत होता. पद्मराज त्याच्यावर धांवून येत होता, तिकडे त्याची नजर गेली. ही संधी साधून कुलराजाने त्याच्या छातीवर खंजीर मारला. पण हात मागें घेतां घेतां मल्लकानें त्याचा आंगठा छाटला. तोंवर उद्दाम अशा विजराजानें मल्लकावर वार केला. मल्लक उलट वार करतो तोंच, कुलराज व पद्मराज यांनींहि त्वरा करून त्याला वार केले. मल्लक त्या तीघापासूनहि निसटला व राजा चतुष्किकेच्या दारांत शिरत होता, त्याच्यावर धांवला. तो तेथें पोहोंचण्यापूर्वीच कुलराजानें आवेशानें त्याच्या मागून धांवत जाऊन त्याच्या फऱ्याच्या हाडावर वार करून त्याला थोपविले. पुढें त्याला साऱ्या शिपायांनी घेरलें. तसे त्यानें काही शूर व कांहीं भित्रे शिपायी ठार केले व तो शूर वीर मल्लक वीर शय्येवर पडला. त्यावेळीं त्याच्यावर वाहत्या रक्ताचें जसे प्रावरण झाले होतें. आपल्या दुर्दैवी, जखमी पण जिवंत, मालकांसमक्ष, त्यानें असे शौर्य गाजविलें व कोणालाहि स्पर्धा वाटेल असे योग्य मरण मिळविलें. तेव्हां त्याची वीर लोकांमध्ये गणना होणें अवश्य व वाजवीच आहे. २३३०

कोष्ठेश्वराचे सेवक पळून गेले. त्यापैकीं जनकचंद्र डामरानेंच, आपण भागूबाई नाहीं, असें सिद्ध केलें. तो निश्शस्त्र होता. पण त्यानें एका राजसेवकाच्या हातचा परशु खेंचून, स्वतः येत असल्याची अगाऊ वर्दी देण्यासाठीं, पुष्कळांना पुढें यमलोकीं पाठविले. तो वीरोचित मरणाच्या द्वारें सूर्यमंडलाचा भेद करण्याला झटत असताना, चंद्रकला सुषुम्रा-नाडीच्या द्वारें सूर्यरश्मीचें ग्रहण करण्याला उत्सुक असते, तद्वत त्याच्या हातातलि परशु शत्रूच्या सुषुम्रा धमनींचा छेद करण्याला उत्सुक होता. पुढें त्या जखमी कोष्ठेश्वराला कारागृहात नेऊन टाकले. त्याची पत्नी मोठ्या हौसेनें सती गेली. अशी गोष्ट पूर्वी कधीं घडलेली, ऐकण्यापहाण्यांत नाहीं. कारण तिला आप्तानीं ' आपला पती बरा होऊन आप-णाला भेटेलहि, ' असें सांगून तिची समजूत करण्याचा यत्न केला. पण तिकडे मुळींच लक्ष न देता, तिनें अग्नि प्रवेश केला आणि सतीलोक मिळविला. पूर्वी अग्नीनें सप्तर्षि-पत्न्यांना स्पर्श करण्याची इच्छा केली होती. यामुळें त्याला पाप लागलें होतें. तें त्याचें पाप या सतीच्या पादस्पर्शानें घालवून अग्नी पावन झाला. ती धन्य व उदय याचा बंधू वसंत यांची श्रेष्ठ कुलोत्पन्न कन्या होती. तिला डामर पत्न्यांच्या चालीरीति पसंत नव्हत्या. लवन्यांच्या विधवा द्रव्यलोभास्तव आपल्या सुरेख काया, सामान्य गृहस्थ व ग्रामाधिकारी यांच्या उपभोगासाठा खुशाल अर्पण करीत. ती व तिचे अनुचर मल्लक व जनकचंद्र, या तीघांच्या थोर वर्तनाचा कोष्ठेश्वराच्या मनावर परिणाम झाला व त्याचें मानसिक व्यथेमुळें आलेलें दैन्य दूर होऊन, त्याला आपलें शिर अभिमानानें उन्नत कर-ण्याला जागा झाली. त्याची जखम भरून आली, पण कांहीं पूर्वार्जित पापामुळे त्याच्या

अंगांत किडे पडले व त्याला बरेच दिवस तळमळत पडून तीव्र क्लेश भोगावे लागले. शेवटीं तो कारागृहांतच मरण पावला. २३४०.

चित्ररथ वाळून कोळ झाला होता. आपल्याविरुद्ध राजाला मल्लार्जुनानें चिथावल्याचें ऐकून, तो फार घाबरला व त्याला मोठें दुःख झालें. त्याचे वैभव व प्रताप यांचा मुख्य आधार व अधिष्ठान अशी त्याची प्रिय पत्नी सूर्यमती नुकतीच परलोकवासी झाली होती. असाध्य रोगानें शरीर नित्राण झालेलें, गृह गृहिणीविरहित आणि मालक शत्रु झालेला, यामुळे त्याला कशांतच समाधान उरलें नाहीं. तीर्थवासाला गेलें तर आपल्या अपराधी स्थितींतहि राजा बहुधा त्रास देणार नाहीं, असें वाटून, तो सुरेश्वरी येथें मरण्याच्या इच्छेनें जाऊन राहिला. त्यानंतर त्या अति कुबेर धनिकानें जागजागीं जमा करून ठेवलेली संपत्ती राजानें जप्त केली. त्याचें सामानसुमान, शस्त्रें, घोडे, वस्त्रें, सुवर्ण, जडजवाहीर व इतर मौल्यवान पदार्थ, यांची आपापल्या मौल्यवानपणांत जणों परस्पर चढाओढ लागली होती.

लोहर येथील बंडाळ्याच्या उष्ण झळीनें कोमेजलेल्या राज्यवैभवरूपी वृक्षाला, चित्ररथाची संपत्तिरूपी पहाडी निर्झरोदकाचें सिंचन झाल्यानें चांगलीच टवटवी आली.

भवाचा पुत्र विजय याच्या घरीं जणों प्रतिबंधांत पडलेलें पण सदैव जागरूक असें राजाच्याहूनहि अधिक श्रेष्ठ संपत्तीचें अधिष्ठान होतें. त्याला काळजीमुळें आलेली प्रभा श्वेतछत्राच्या प्रभेसारखी दिसत होती. सर्व संकटें व गडबड नष्ट होऊन बराच काळ गेला तरी त्या जंगलांत राहणाऱ्याला साहजिकच भीति वाटत होती. म्हणून शाल्व-राजा हरिश्चंद्र-सौत्रपुर सोडीत नव्हता तद्वत् विजय आपलें वैभवसंपन्न कल्याणपुर सोडीत नव्हता. त्याला मारण्यासाठीं राजानें आनंदाला पाठविलें. त्याला ओळखून विजयानें ठार मारलें. पण त्यांतच तोहि आनंदाकडून ठार झाला.

राजा जयसिंह काळजीपूर्वक प्रजापालन करीत असे. त्याचा सारा दिवस याच कामांत उत्साहानें परिश्रम करण्यांत जात होता.

चित्ररथ तीर्थवास करीत होता. त्याचे प्रसिद्ध खटपटी सेवक श्रृंगार व जनक हे पादाग्रपदाच्या प्राप्तीसाठीं सारखे झटत होते. श्रृंगारानें राजाला पुष्कळसा नजराणा देऊन जनकावर मात केली व चित्ररथाचे सारे अधिकार व वैभव मिळविलें. उदयाकडून द्वारपतीचें पद बरीच वर्षे निघालें होतें. शुष्क नद्यांच्या तीरांना वर्षाऋतू विपुल जल मिळवून देतो, त्याप्रमाणें राजानें ते त्याला पुनः दिलें. पुढें आठ महिन्यांनीं चित्ररथ आटपला त्याला मरतांना, केलेल्या पापांचें अवश्य फलच. असे फार क्लेश भोगावे लागले.

सहवासाचें परिणाम अतर्क्य असतात. त्यांचे कोठवर वर्णन करावें ? त्यांच्यामुळें पूर्वीचे मनोविकार पार बदलतात. कुरूप रूपवान वाटूं लागतो. घामटाची सोबत खपूं लागते आणि पक्क्या मूर्खाचीहि सल्ला मसलत घेण्याला मनुष्य प्रवृत्त होतो !

राजाला लहानपणी भारी जिज्ञासा होती व सेवकांनीं त्याला बरेंच बिघडविलें होते. त्या दिवसात सज्जकाचा दुर्व्यसनी पुत्र शृंगार, यानें द्यूतादि गर्ह्य व्यसनांच्या द्वारें त्याची मर्जी संपादली होती. राजा सार्वभौम पद पावल्यावर; त्यानें त्याला चित्ररथाकडे तांबूल नेण्याचे काम सागितले होते. त्या निमित्तानें तिकडे जातां येतां त्याच्या हातीं निरोप जात येत. त्यावरून त्याला राज्यकार्याची चांगली माहिती झाली होती व तो एक विश्वासू सल्लागार बनला होता. चित्ररथ मरत पडला असतांना शृंगारानें त्याच्या खजीन्याची माहिती असलेल्या नोकराना राजाकडे नेलें होते. पुढे दरबारांत कोणी वजनदार सरदार व मंत्री उरले नव्हते, अशा वेळी, त्याला महा अमात्याचें पद मिळाले. २३६०. त्याची बुद्धी क्षुद्र व दृष्टी कोती होती. तो औदार्याचा नुसता आव आणी. तरी त्याचे दान सत्पात्रीं होत असे. त्यानें धनाचा अपव्यय केला नाही. तो आपल्या ब्राह्मण गुरूंना उदारपणे तंदुल दान करी. आपण व आपलीं बायको मुलें यांना पुरे इतके अन्नवस्त्र मिळाले तरी पुरे, तेव्हढ्याने आपण संपन्न आहों, असें त्याला वाटत असे. त्याने स्वतःच्या द्रव्याने सुरेश्वरीचे रुप्याचे पीठ तयार करविले, तें अद्यापि कायम आहे. त्याच्यामुळे तो मोक्ष मिळण्याला पात्र झाला होता. आषाढी पौर्णिमेच्या उत्सवासाठीं त्यानें नंदिक्षेत्रांत पुष्कळसा खर्च करून, सर्व सामानाचा उत्तम पुरवठा केला. तसा अलीकडील राजे लोकाकडूनहि होणे कठिण आहे, त्याची धर्मकृत्याकडे चंपक वगैरेनींच प्रवृत्ति केली होती, तिच्या मुळे पुढे पाच सहा वर्षे त्याची उत्तम भरभराट राहिली. तो प्रारंभीं राजाचा एक खेळगडी म्हणून यःकश्चित समजला जात होता. पण तो अधिकारी झाल्यावर त्याने राजाच्या दृढ भक्तीच्या द्वारें पुष्कळ विलक्षण कामें केलीं.

त्रिपुरहर शंकराच्या कंठांत वासुकी नुसता भूषणभूत असतो. प्रिय व तरुण पत्नी पार्वतीच्या कंठाश्लेषसमयीं तिच्या नखाग्रांनीं त्याची त्रेधा होईल, असें श्रीशंकराला वाटे. असे. पण मंदराचल धनुष्य बनला तेव्हां तोच वासुकी श्रीशिवाच्या आज्ञेनें त्याची रज्जू होऊन खूप ताणला गेला. तरी तो तुटला नाही! थोर मालकाच्या आज्ञेने हवा त्याला अलौकिक शक्तींचा प्रभाव दाखवितां येणे कठिण थोडेंच आहे?

शृंगार व जनक हे द्वारपती शृंगार आणि रिल्हण व धन्य यांना अनुक्रमे लांच देऊन आश्रय संपादीत व एकमेकांस अधिकारावरून काढून टाकवीत होते. एकदा शृंगारानें जनकाला सकुटुंब कैदेंत टाकवून त्याचें नेत्र व त्याचा खजीना यांच्यांतून अश्रुबिंदू व मौक्तिक यांचीं वृष्टी करविली. पुढें जनकानें कारागृहावरील दांडग्या अधिकाऱ्यांना लांच देऊन, त्यांच्याकडून शृंगाराचा संभोग करवून याचा सूड उगविला. २३७०. पुढें शृंगार पुनः अधिकारावर आला तेव्हां त्यानें पुष्कळसे वेडे वेडे चार करून, आपलें हंसें करून घेतलें. तो बोटांतली अंगठी आंगठ्याच्या नखानें घाशी. बोलतांना वरच्या ओंठाचा डावा भाग वर चढवी, डोळे मिचकावी व कपाळावरील सुरकुत्या मागे पुढें व वर खाली करी. तसाच जनक अधिकारपन्न असताना अस्पष्ट, कठोर व अपशब्दयुक्त भाषण करी व त्याबरोबरच त्याचे डोळे मिटणें, मोठ्यानें खेंकसणें. हंसणें, टाळ्या वाजविणें, वगैरे प्रकारहि चालू असत.

असल्या या मूर्ख, पण अधिकारी, बनविले गेलेल्या माणसाचें स्मरण होऊन, त्यांच्या अस्सल स्वभावाची प्रतीती पटते तेव्हां चांगलेंच मनरंजन होतें.

हा सर्व काल व हीं सर्व माणसें बहुतेक नीच व तृणप्राय होतीं. त्यांच्यात धारा-धांश शृंगारच काय तो अपवादात्मक होता.

जयसिंह राजाची बुद्धी तीव्र, व्यापक व स्थिर असून त्याने स्वधर्माचरण व पुण्य-कर्म यांच्या द्वारें सज्जनांमध्यें अग्रस्थान मिळविलें आहे. किंबहुना बोधिसत्व बनून तो शत्रूला सुद्धां संकटांत सहाय्य करीत असतो. अरण्य पेटविणाराला सुद्धां स्वतः जळत असतांना चंदन तरू सुगंध व छाया देऊन संतोषवीतच असतो. सर्व सत्पात्र गुरु, विद्वान, ब्राह्मण, निराश्रित वगैरे गरजू लोकांच्या घरी तो दानें पोहोचवितो. तो संपन्न व तितकाच धार्मिकहि आहे. विजयेश शिव व इतर देवता यांचीं मंदिरें बांधवून व त्यांना चुना देववून त्यानें त्यांना प्रति कैलास बनविलें आहे. त्याला जीर्णोद्धाराचा भारीच नाद आहे. म्हणून मठ, मंदिरें, उद्यानें, तलाव, तीर्थें व कालवे, वगैरेंची काळजीपूर्वक दुरुस्ती करविण्यांत त्याचे लक्ष सारखें वेधलेलें असतें. २३८०

त्याचा स्वभाव असा असूनहि एकदां त्याच्या हातून ब्रह्मचाऱ्याच्या तोंडांच्या सन्मान्य माणसाशी क्रूरपणाचे वर्तन घडलें, म्हणून मूढ लोक त्याला निव्वळ क्रौर्याचा पुतळा म्हणतात.

सर्व जगाचें पोषण, सप्त सागरांचें पूरण, ब्रह्मादि देवतांचा संतोष, इत्यादि थोर व पावन कृत्यें स्वर्गंगेनें केलेलीं असून तिच्या हातून कोठें एकदां सागराच्या हजारों पुत्रांच्या रक्षेला स्पर्श झाला. या दोषावरून तीं सारी सत्कृत्यें व्यर्थ होऊन, एखाद्या स्मशानभूमी प्रमाणें, ती केवळ अस्थि टाकण्याला योग्य समजली जात आहे!!

याच सुमारास भारी लबाड, खटपटी, चाक्तिक, कायस्थ अधिकारी शिवरथ हा गळफांस लावून घेऊन मरण पावला.

अशा प्रकारें राजा जयसिंहानें बहुतेक शत्रूंची वाट लावल्यानंतर, प्रजेचें हित करण्याचा निश्चय केला आणि त्यानें राज्याच्या भरभराटीला आड येणाऱ्या सर्व अडचणी नाहींशा केल्या.

सूर्यकिरण मेघमंडळांतून सुटका करून घेतात, तेव्हांच त्यांचा प्रताप व प्रखरपणा वाढतो. त्याचप्रमाणें शत्रूरूपी अंतराय दूर केल्यावरच राजे लोकांना एकांतिक प्रभुत्व प्राप्त होतें. द्राक्षासव जुने व पक्व होतें तशी त्याची माधुरी व किंमत वाढते. त्याप्रमाणेंच हे राजरत्न पोक्त झाल्यानंतरच त्याला खरा चांगुलपणा आला.

तो राजा नेहमीं यज्ञयाग करवी व त्यांच्यांत उमाप दानें दक्षिणा देई. विवाह, यात्रा, महोत्सव, यांच्यासाठीहि तो पुष्कळशा देणग्या देई. यामुळें त्यांना अधिक शोभा येत असे. उंच पर्वतावरील वनस्पतींना चंद्र आपला प्रकाश देतो. त्याप्रमाणें श्रद्धाळु धार्मिकांचे यज्ञ याग व इष्टी वगैरेंसाठीं तो सर्व सामग्री पुरवीत असे तसेंच नागरिकांकडील पुत्रोत्सव, विवाह,

देवस्थापना, वगैरे प्रसंगी तो स्वतःच लवाजमा पाठवीत असे. जंगलांतील लाकडाचें सारें उत्पन्न ( हल्लीप्रमाणेंच ) सरकारजमा होत असे. ते त्यानें नगरांतील लोकांना माफ करून, सारें नगर नवे वसविलें. २३९०.

राजकार्यांत निमग्न असतांना सुद्धा तो एखाद्या मुनीप्रमाणें, मोठ्या मनोभावानें व भक्तीनें महादेवाच्या महापूजेंत मग्न होत असतो. याचें सर्वांना भारी आश्चर्य वाटतें. योग्य व अनुभवी लोकांची सल्ला घेतल्याशिवाय साऱ्या दिवसांत त्याच्या हातून एकहि कृत्य घडत नाहीं. मेघमंडलांतून मधून मधून विद्युत्तेज चमकावें त्याप्रमाणें, सर्वत्र फैलावलेल्या अज्ञानरूपी गाढ तमामध्यें जयापीड वगैरे राजांची विद्वत्ता चमकत असे. पण जयसिंह राजानें आपल्या सद्-गुणाच्या विचित्र व विलक्षण चित्राला लक्ष्मीची स्थिर व कायमची जोड करून दिली आहे. त्यानें विद्वान लोकांना वंशपरंपरा आग्रहचंद्रार्क कायम, वसतीचे व लागण झालेली जमीन असलेले अनेक अग्रहार करून दिले आहेत. त्यानें विद्वान लोकांसाठीं बांधविलेले वाडे इतके उंच व सुरेख आहेत की, त्यांच्या दर्शनासाठीं जणों सप्तर्षि मंडळ उतरत असतें. त्याची उपजत बुद्धि व मिळविलेलें ज्ञान, यांना अनुसरणारा मार्गच, निदर्शक समजून विद्वान लोक त्यालाच आपला म्होरक्या मानतात म्हणून त्यांना आपल्या सुरक्षितपणाची मुळींच काळजी राहात नाहीं

आर्य राजाला निजल्यावेळीं लिंगार्चनविषयक वाहणाऱ्या जलाचा कर्णमधुर शब्द फार प्रीतिकर होत असे. तसें या जयसिंहराजाला निजतेवेळीं वेणुवीणादि वादन व गायन, यांच्या ऐवजीं संत, सज्जन व विद्वान लोक, यांच्या तोंडून ऐकलेल्या गोष्टींवर विचार करीत राहण्याचा विशेष आनंद वाटत असतो.

ललितादित्य, अवंतिवर्मा वगैरे सुप्रसिद्ध व यशस्वी राजाच्या कारकिर्दींत सुद्धा मंदिरांची रचना वगैरे धर्मकृत्यें घडून आलीं नाहींत तीं याच्या वेळीं प्रत्यहीं घडताहेत. २४००. त्यानें स्वतः बांधविलेली मंदिरें व मठ यांची शाश्वत खर्चाची व्यवस्था करून ठेवली गेली आहे.

या राजाला राणी रत्नादेवी फार कायमची प्रिय होती. तिनें रत्नादेवी विहार बांधविला. त्याची व्यवस्था अप्रतिम केली होती. धर्मकृत्यें करण्याच्या कामांत सद्गुणी व सज्जन असा रिल्हण मंत्री, हा दुसऱ्या सर्व मंत्र्यांना मुख्य मार्गदर्शक झाला. तो मोठा सत्वशील होता. त्याला त्याच्या खासगी बैठकींत देखील तपस्वी, विद्वान, धर्मशास्त्रनिपुण, अशांचा सहवास अधिक आवडे. तो जन्मभर पुण्यसंचयासाठीं ब्राह्मणांना कृष्णाजिनें, सवत्स धेनु, सालंकृत कन्या, वगैरे दानें देत होता. तसेंच अग्निहोत्र्यांना लागणारी सारी सामग्री उदारपणें पुरवून, त्यांचीं यज्ञकर्में निर्विघ्न व यथासांग पार पाडण्याची व्यवस्था करीत असे. त्याला दुष्टपणाचा स्पर्श माहित नव्हता. त्यानें एक मोठा थाटदार यज्ञ केला व त्याच्यांत चौसष्ट जातींना सुग्रास भोजन घातलें. याचें सर्वांना कौतुक वाटलें. उभयतां प्रवरसेनांनीं वसविलेल्या

नगरामध्ये, त्यानें मठ, सेतू, बंधारे वगैरे बांधवून, त्याना फार शोभा आणली व त्याच्या कायमच्या व्यवस्थेंसाठीं अनेक सुसंपन्न अग्रहार दिले. पहिल्या प्रवरसेनाच्या पुरामध्ये त्यानें विलक्षण व चिरस्थायी असें रिल्हणेश्वराचें शिवालय बांधविलें.

त्याची प्रियपत्नी सुस्सला मरण पावल्यावर तिच्या नांवाने त्या पुण्यशीलानें भालेरकप्रपा नांवाच्या झऱ्याजवळ एक विहार बांधाविला. त्या सुस्सलेजवळ एक मांजरी होती, तिचे सुस्सलेवर भारी प्रेम असें. २४१०. सुस्सला जाईल तेथें ती मांजरी नेहमी बरोबर व पुढें चालावयाची. सवतीमत्सरामुळें तिचा पतीशीं बेबनाव झाला तेव्हां, ती मांजरी प्रियसखीप्रमाणें सारखी तिच्यापाशीं हजर राही. सुस्सलेच्या नांवानें बांधलेला तो विहार त्या मांजरीच्या नावानेच प्रसिद्ध होता. सुस्सला देह ठेवण्यासाठीं तीर्थवासाला निघाली तेव्हांपासून ती मांजरी सारखी ओरडत होती. पुढे ठेवलेल्या अन्नाला न शिवता शेवटीं तिने सुस्सलेच्या शोकाने प्राण सोडला !

महाराण्यामध्यें दिद्दा, तशी मंत्रि पत्न्यामध्येहि सुस्सला, यानीं आपल्या पुष्कळशा धर्मकृत्यांनीं अग्रगण्यता मिळविली होती.

चंकुण विहाराचें नाव सुद्धां बुडाले होते. त्याचा या थोर सुस्सलने जीर्णोद्धार कराविला व तेथें राहण्यासाठीं एक दगडी इमारत बांधविली. शिवाय तिनें ब्रह्मचाऱ्यांसाठीं धर्मशाळा बांधविणे वगैरे अनेक धर्मकृत्ये केली. हा विहार पूर्वीच्या वाड्याच्या चौथ्यावरच बांधलेला होता. त्याच्यामुळें साऱ्या नगराला शोभा आली व ते फार प्रेक्षणीय झाले. या विहाराची प्रतिष्ठा केल्यानंतर ती सुप्रसिद्ध सुरेश्वरी क्षेत्रात क्षयरोगाने मरण पावली. यामुळे तिला खचित मोक्ष मिळाला असावा.

मंत्री धन्य याने आपल्या पत्नीच्या नावाने स्थापन केलेला मठ व अग्रहार तिच्या नावाने कायम राहिले नाहीत. यश तरी पूर्वपुण्याईशिवाय थोडेच मिळतें.

सेनापती उदय यानेहि मठ व अग्रहार स्थापन केले. ते त्याच्या जिवंतपणीच त्याच्या नावाने प्रसिद्ध झालें. २४२०. द्वाराध्यक्ष उदय याने बांधविलेला भव्य मठ व त्याच्या बरोबरच ब्रह्मपुऱ्या याच्या योगानें पद्मसराचा प्रांतभाग फारच सुरेख दिसत होता. (पद्मसर-वूलर सरोवर.) त्याचा वडील भाऊ शृंगार हा तंत्रपती असून मोठा सज्जन होता. त्याने श्रीद्वार नांवाच्या पहाडीपाशीं एक मठ, एक उपवन आणि एक चौकोर पुष्करिणी, तयार करविली (श्रीद्वार-दलसरोवराच्या पूर्वेकडील पहाडाची रांग. तिच्या पश्चिमेस सुरेश्वरी तीर्थ असल्याचा उल्लेख आहे. मंखकवीनें आपल्या श्रीकंठचरित काव्याच्या तिसऱ्या सर्गांत ४५ ते ५१ श्लोकांमध्यें, आपला वडील भाऊ शृंगार याला राजाकडून बृहत् तंत्रपती-मोठा न्यायाधीश--या पदाची माला मिळाल्याचा उल्लेख केला आहे. मंखांचा वडील भाऊ अलंकार हा राजस्थानीय किंवा मुख्य न्यायाधीश असून, मोठा वैय्याकरणी होता, असें मंखानें म्हटलें आहे. त्याचा पुढें पुष्कळदां उल्लेख आला आहे. तो सुस्सल व जयसिंह या दोघांहि राजाच्या वेळीं संधिविग्रहक मंत्री होता. तें काम पुढें कांही काळ मंखाकडेहि होतें. त्याचे परिपाठातलें नांव लंकक, असेंहि मखानें दिलें आहे.)

अलंकार हा बृहद्गंजाधिकारी किंवा मुख्य खजीनदार असून मोठा बुद्धिमान होता. त्यानें स्नानगृहें, मठ, ब्रम्हपुऱ्या, सेतू व बंधारे, वगैरे बांधवून, त्या प्रांत भागाला चांगली शोभा आणली. त्याचा बाप फार, हुषार व चतुर वैद्य होता. तो औषधौपचारानें नेहमीं लोकांचे रोग व आर्ति, हरण करीत असे. औषधींचा पोषक चंद्र याचा पुत्र बुध याचाच जणो तो अवतार असून, तो कविराज म्हणून प्रसिद्ध असे. तो दानवत्वामध्ये सर्वांत श्रेष्ट होता किंवा त्याने कवि–शुक्राचार्या–प्रमाणे तपोबलानें दानवत्वापासून स्वतःची सुटका करून घेतली होती. तो अदृष्टपूर्व असा विष्णूचा एकांतिक भक्त होता. त्यानें उमाप अन्न, वस्त्र, सुवर्ण, यांचे दान केले. त्याच्यापासून कधीं कोणाला इजा झाली नाही. त्याने विष्णूच्या वराहावताराच्या उत्सवात पुष्कळशा गायी दान दिल्या.

सागरतीरावर बांधलेल्या कूपाची फारशी ख्याती होत नाहीं. त्याप्रमाणे भट्ट शृंगार याने भट्टारक मठाशेजारी बांधविलेल्या मठाची प्रसिद्धी झाली नाहीं.

दार्वाभिसार येथील राजाचा संधिविग्रहक मंत्री जल्ल नावाचा होता. त्याला धार्मिक कृत्ये करण्याची फार भक्ति होती. त्यानें एका शिवलिंगाची स्थापना केली. स्वयंभू ज्योतिर्लिंगाला प्रिय अतएव भाग्यवान पुष्पे पुष्कळशीं पैदा करण्याचा मान साऱ्या वृक्षामध्ये काय तो करवीर वृक्षालाच मिळालेला आहे.

जल्लाचा कनिष्ठ बंधू भुत्त फारच योग्य असल्यामुळे राजाने नेमलेल्या साऱ्या मंत्र्याहून त्याची अधिक मानमान्यता झाली होती.

बालकेश्वरलिंग स्वयंभू, स्वयंप्रकाश व स्वयंप्रसिद्ध आहे. वसिष्ट ऋषी हे ज्येष्ट रुद्र नांवाच्या स्वयंभू लिंगाची नेहमी उपासना करतात, त्याप्रमाणे तो भुत्त मंत्री त्या बाल-केश्वर लिंगाची पूजाअर्चा करीत असे. २४३०. तेथे त्यानें विहार, मठ व मोठाले वाडे यांनीं शोभिवंत केलेले भुत्तपुर वसविले. त्यानें नगरातहि भूतेश्वराची स्थापना करविली. व मडवा ग्रामांत एक धर्मोजल तलाव तयार करविला

रत्नादेवीने आपल्या विहाराजवळच वैकुंठमठ व दुसऱ्या धार्मिक इमारती बांधविण्यांत आपली बहुतेक संपत्ती खर्चून टाकली. त्यांच्या पैकीं रत्नापूर येथील मठ फारच भव्य व सुरेख होता. त्याला पुष्कळशीं दारे असल्याने तो जणो धर्मकृत्येंरूपी हंसासाठी बन-विलेला एक विस्तीर्ण व सुरेखसा पिंजराच वाटे. (रत्नापूर=हल्लींचें ब्राथ परगण्यातील रतनपूर. श्वेतद्वीप=श्वेत नांवाच्या राजासाठीं श्रीशंकरांनीं तयार केलेलें अमर असे स्थान.)

तिने मृत्युंजय शंकराची एक मोठी मूर्ति तयार करवून ती एका मंदिरात स्थापन केली. त्या मंदिराला सुधालेप करून चांगली शोभा आणलेली होती. तें पाहून मनुष्याच्या नश्वरत्वाचा नाश करणारे श्वेतद्वीपच प्रत्यक्ष अवतरलें आहे, असा त्रास होत असे. तिनें एक गोकुल तयार करविले. शूरवर्म्यासारखे पूर्वीचे गोकुरें स्थापन करविणारे, तिच्या गोकु-ळांत राहून घास खाण्यायोग्य वाटूं लागले. तेथे गायींनीं यथेच्छ चरण्यासाठी विस्तीर्ण कुरणें होतीं व वितस्तेच्या पाण्याचा विपुल पुरवठा केलेला होता. यामुळें गायींना आनंदांत, मोकळेपणीं व निरोगी राहतां येत होतें. तेथें गोवर्धनधारी श्रीविष्णूची सुरेख व प्रेक्षणीय

मूर्तीहि स्थापन केलेल्या आहे. तशी मूर्ती विश्वकर्म्यालासुद्धा क्वचितच घडता आला असती. तसेंच तिनें नंदिक्षेत्रांत एक मठ कायम केला व ती तेथेंच जाऊन राहिली. शिवाय तिनें जयवन वगैरे जागीहि सुरेखसे मठ बांधविले. दार्वाभिसार प्रातांत तिनें राजाच्या औदार्याचें आगर व इंद्रपुरीशींहि स्पर्धा करणारें, असें नगर आपल्या नावानें वसविलें. ती सेवकांना मोठ्या प्रेमानें वागवी. तिचा प्रतिहार वगैरे चांगले सेवक मेले तेव्हां तिनें त्याच्या नांवानेंही अनेक स्थापना करविल्या.

याप्रमाणें राज्यांत जागजागी शोभा आणल्यावर त्या निगर्वी राजराजेश्वरानें सर्व अलंकारांमागून तिलक दिला जातो तसा, स्वतःचा एक सिंह मठ बांधविला. त्याला त्यानें बरेचसे गाव लावून दिले. त्या मठात थोर थोर व प्रसिद्ध पुरुष राहूं लागले. त्यांच्या द्वारें त्या सिंहमठाची फार प्रसिद्धी झाली.

कारापथाच्या राजाच्या कन्येच्या पुत्रानें सिंधुदेशीय, तसेंच पूर्वी सिद्धछत्र येथे रहात असलेले बरेचसे द्राविड ब्राह्मण आणून तेथें वसविलें. साऱ्या काश्मीर मंडळाला ज्यानें पूर्ववत सर्व गांव व नगरें प्राप्त करून देवविलीं, त्यानें बांधविलेले मठ व इतर इमारती यांचें वर्णन करण्यांत विशेष काय? त्यानें या दीन, हीन नष्ट, व जीर्णारण्य झालेल्या मंडळाला, संपत्ती, लोक वस्ती, घरें, वाडे, गांव, वगैरे सर्व कांहीं पुनः आणून दिले. ( सिंहपूर हें जयवनाजवळ वितस्ता तीरावरील हल्लीचें सिंपोर होय. कारापथ=वायुपुराण व विष्णुपुराण यांच्यात याचा उल्लेख आहे. त्याची राजधानी अंगडी येथे होती, असे वर्णन आहे रघुवंशाच्या पंधराव्या सर्गातील नव्वदाव्या श्लोकांतही याचें नाव आलेले आहे. )

राजानें प्रारंभीच लागेल ते सामान पुरविण्याची व्यवस्था केली असल्यामुळें, बऱ्याच जागीं त्याच्या कृपेनें कारागीर कामकरी माणसानीं सुद्धां मंदिरें व मठ बांधविले. प्रजाजन अनेक उत्सव व समारंभ करीत. त्याच्यासाठीं द्रव्य, अलंकार, वस्त्रें, वगैरेंचे मुक्त हस्तानें साहाय्य करून, राजा त्यांना आनंदवीत असे. अकाली हिमवृष्टी, महापूर, किंवा इतर भौतिक संकटांनी पीक बुडाले तरी सुद्धा त्याच्या राज्यांतील सुबत्ता कमी होत नसे. तसेंच भूत वेतालादिकांची नुसती नांवें येत व धूमकेतूसारखे अपशकुन होऊनहि प्रजेचा नाश झाला नाहीं. हे आश्चर्यच होय. २४५०.

कोष्ठेश्वराचा कनिष्ठ बंधू छुड्ड यानें बंडावा आरंभिला. त्याला राजानें उघड युद्ध व गुप्त भेद करून यमाच्या दरबारीं पोहोंचविलें. तसेंच बल्लापूरचा राजा विक्रम, याला पदच्युत करून, राजानें तेथें गुल्हणाची स्थापना केली. इतर कांहीं प्रांताचाहि त्यानें असाच बंदोबस्त केला.

कान्यकुब्ज देशाच्या राजाच्या हाताखाली अनेक सुसंपन्न मांडलिक राज्यें होती. यामुळें तो चांगला प्रबळ झालेला होता. ( जयसिंहाच्या वेळीं कान्यकुब्ज देशाचा राजा गोविंदचंद्र व कोंकण प्रांताचा अपरादित्य, यांचे वकील सुहल व तेजकंठ. हें अलंकार

मंत्र्याच्या विद्वत्सभेत हजर होते, असें मंख कवीने वर्णन केलें आहे. या दोन्ही राजांचे शिलालेख उपलब्ध आहेत.)या, तसेंच तत्तुल्य इतर प्रबल राजांनाहि या राजकवीनें स्वतःच्या स्नेहाच्या द्वारें थोरपणा दिला होता.

याप्रमाणे यशस्वी व अकुंठित प्रतापानें तो राज्य करीत असताना, दरदांचा राजा यशोधर मरण पावला. तो आमरण जयसिंहाचा स्नेहीच राहिला. पण पुढें त्याचा पुत्र अल्पवयी व मंत्री प्रबल झाल्यानें, राजाला काळजी वाटूं लागली. तेथील राज्यकारभार विद्दसिंह अमात्य पाहूं लागला. त्यानें यशोधराच्या विधवा राणीचें प्रेम संपादन करून लबाडीनेंच राज्यकारभार बळकावला होता. सारें राज्य स्वतःच्या तंत्रानें चालावे, त्या बालराजाचा नाश व्हावा व स्वतःच राजा व्हावे, अशी त्याची खटपट चालली होती. तितक्यांत पर्यूक नावाच्या दुसऱ्या मंत्र्यानें यशोधराच्या दुसऱ्या पुत्राला वारस उभा करून, विद्वसिंहाशीं विरोध मांडला. त्यात जयसिंहाची मदत राहील, अशी पर्यूकाला उमेद होती. या कामी संजपाल वगैरे मंत्री योग्य सल्ला देऊन, ती पार पाडण्याला तयार असतांना व स्वतःच्या अंगींहि तितके कर्तृत्व असतांना, जयसिंहानें गैरसमजुतीनें किंवा छांदिष्टपणानें, शृंगाराचा पुत्र सज्ज याची सल्ला पसंत केली.त्याचा पर्यूकाशी स्नेह होता. त्या अन्वयें सज्जकानें आपल्या अप्रबुद्ध धाकट्या भावाला या कामगिरीवर पाठविलें ७४६०. त्यावरून शृंगाराला सर्वाधिकारीपणा मिळाल्यामुळे तो गर्वानें फुगला आहे, अशी राजाची खात्री झाली. कोणच्याहि देशावर प्रथमच मोहीम करताना अनुभवी, यशस्वी, हल्या त्या प्रसंगाला तोंड देणारा, समर्थ व हुषार, असा मंत्री आणि अल्पवयी, अननुभवी निवळ बडबड्या, नवा अधिकारी, यांच्या कर्तबगारीमध्ये किती तरी फरक पडावयाचाच.

राजे लोकाच्या दुष्ट व तुच्छ स्वयंमन्यतेमुळे भयंकर यशोहानी होते. ते आपल्या सेवकाच्या हातून शत्रूचा दर्प दबवूं पाहतात. पण ते सेवक त्यांच्या इष्ट हेतूविरुद्ध वागत असतात. ते देशस्थिती, सैनिक, दुर्ग, उत्पन, वगैरे गोष्टी लक्षात घेत नाहींत. शेजारचे राजे मंत्र्यांच्या योग्यतेप्रमाणे त्यांची सल्लामसलत मानीत असत. ज्याचे सल्लागार वरून स्नेही पण आतून हितशत्रू असतात, त्यानीं त्याच्याविषयीं प्रत्यक्ष उघड शत्रू पेक्षांहि अधिक जपले व भ्याले पाहिजे. शत्रूच्या व सहाय्य कर्त्यांचा कपटानें भेद करण्यांत मूर्ख व कार्यज्ञ यांच्यामध्ये मोठाच फरक असतो. अशीं कामे मोठ्या कारस्थानानेंच साधतात.

मंत्र्यांच्या आपसांतील कलहामुळें दरदांची राजगादी व सत्ता खालावलेली होती. तरी ती दुर्बळाकडून पाडाव होण्याजोगी नव्हती. महापूरानें नदींत वाहून येऊन पडलेलें झाड हलक्याशा लोंढ्याने पुढें ढकललें जात नाहीं. शृंगाराचा भाऊ सज्ज याच्याकडून पर्यूक हा मिळेल तितकी मदत घेण्याला उत्सुक व तयार होता. पण सज्जाचे काम फारच दीर्घसूत्री होते. त्याला दुग्धघात सुद्धां घेतां आले नाहीं व तो शेवटीं आला तसाच परत गेला. यामुळें विद्दसीह जयसिंह राजावर फार नाराज होऊन त्यानें पर्यूकाशीं समेट केला.

याच सुमारास, कांहीं थोडे दिवस सर्वाधिकारी राहिलेला शृंगार मरण पावला.

माकडाला कांहीं काळ उंच वृक्षावर चढण्याचा, सुयोग यावा तशातलीच ही तात्पुरती शिराळशेटी उन्नती झाली होती. २४७०. लक्ष्मकाच्या वेळेपर्यंत हें पद मोठया मानाचे व महत्त्वाचें होतें. पण पुढें त्याची, कारंजांतून शतश· धारांनी पडणाऱ्या पाण्यासारखी स्थिति झाली होती.

राजाच्या कृपेनें अधिकारी झालेले दुसरेहि काही मंत्री याच सुमारास दुर्दैवानें मरण पावले. त्याच्या जागीं राजानें त्यांच्या अन्वयी पुत्रांना नेमलें. यांत राजानें त्यांच्यावर कृपा केली, हे खरे. तरी अशा कृपेचें समर्थन किंवा प्रशंसा कशी करावयाची? त्या मंत्र्याच्या सेवकांनी आपल्या मालकाची मालमत्ता आपली स्वतःचीच समजून, निर्लज्जपणानें उपभोगात आणली. ती त्यांनीं नांवाला राजापुढे आणली व पुनः त्या मालकाच्या मुलाबाळांच्या तरतुदीची व्यवस्था लावण्याच्या बहाण्यानें परत नेऊन, स्वतःच लाटली. त्यांच्यामध्यें खजीनदार विश्व याच्या मागें त्याचा नोकर, सहज यानें एकटयानेंच काय तें, स्वामिनिष्ठ व स्वतःचें सत्व व शीलवंत,अशा नोकराचें ब्रीद कायम राखले. राजानें आग्रह केला तरी त्यानें आपल्या मालाकाची जागा पतकरली नाहीं. उलट त्यानें त्या मालकाच्या तिष्ट नांवाच्या मुलाला त्याचें काम शिकविलें. हातांखालचे लोक स्थिर व स्वस्थ चित्ताचें राहात नाहींत, हें पहात असूनहि, त्यांना वरिष्ट अधिकारी, अधिकाधिक बढतीच्या पदावर नेमीत जातात, हें किती खेदजनक आहे!

गंगेचें जल सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाच्या कमंडलूंत असतांना त्याच्या मुखमार्जनादि कामीं येत होते वामनावतारीं–असुरारि–श्रीविष्णूच्या पदाना त्रैलोक्याचें आक्रमण करण्याचा परिश्रम व शीण पडला होता. त्या पदांचें त्यानेंच धावन करून श्रमपरिहार केला. तेंच पादोदक पुढें श्रीशंभूनें मस्तकीं धारण केलें. कोणी मालकानें कोणा मूर्ख माणसाविषयीं आदर व आवड व्यक्त केली कीं, पुढें त्याचे दुसरे मालकहि, त्याच्याविषयीं जणों डोळे मिटून, अधिकाधिक आवड दाखवीत जातात,

या राजाचीं दुष्ट कारस्थानं रूपीवृक्ष, सुज्जीच्या हद्दपारीपासून वाढीला लागला होता त्याचें शृंगाराच्या मूढपणामुळे संगोपन झालें व तो आतां फळाला येत चालला होता २४८०.

विड्ढसीह नाराज झालेला होता. त्यानें दोन तीन वर्षे दूत पाठवून लोठणाच्या महत्वाकांक्षेला उत्तेजन दिलें होतें. लोठण हा, शूर राजाच्या आश्रयानें आपल्या आप्त मंडळी सह शेतीभाती व व्यापार यांच्यावर निर्वाह करीत होता. त्याची राज्यलालसा कमी झाली नव्हती. तो पूर्ववत उत्साही, दक्ष व कार्यक्षेम होता. त्यानें अलंकारचक्र डामर वगैरेंशीं परभारे कारस्थानें चालू ठेवलीं होतीं. ते डामर दरदांच्या मंत्र्याचे आप्त बनलेले होते. लोठण त्या पर्वतप्राय प्रदेशांतील किल्लेदाराकडे जाण्यास निघणार तोंच, त्याचा मित्र जनकचंद्र मरण पावला. तो भारी लबाड व नीच होता. तो कर्णाट– प्रांतांतून निघाला असतांना, तिकडील कांहीं मंडळी, आतांच उठावणी करावी म्हणत होती

व कांहीं याच्या विरुद्ध होती. ( कर्णाढ=कर्णाव हा प्रांत क्रमराजच्या पश्चिमेकडे आहे. त्यांच्यांत किशन गंगेच्या खोऱ्याचा व कर्णा नदीच्या खोऱ्याचाहि भाग येतो. कर्णाव नदी दक्षिणेकडून येऊन किशनगंगेला मिळते. त्या प्रांतांत खश लोकांची वस्ती होती.) लोठणासारखा प्रबल व उत्साही शत्रू सावकाश व चतुरपणानें चढाईची तयारी करीत असतांना, राजा जयसिंह चैनींत व आळसांत निमग्न होता. त्यानें लोठणाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. बंडाचा फैलाव व गडबड यांतच हित समजणाऱ्यांच्या सहाय्यानें बंड बरेच वाढलें. तेव्हां कोठें राजानें द्वारपती उदय याला तें मोडून टाकण्याला रवाना केलें. उदय हा शंकरवर्मापुरांत सैन्य जमवूं लागला. तेथें असतांना त्याला बातमी लागली कीं, लोठण अलंकारचक्राला मिळाला असून, त्यांच्याबरोबर सुस्सलाचा दासीपुत्र विग्रहराज व सल्हणाचा पुत्र भोज हेहि आहेत. त्यानें त्यांना प्रारंभींच हाणून पाडण्याच्या हेतूनें तांतडीनें कूच केलें व पुष्कळ दिवसांचा मार्ग एकाच दिवसांत आक्रमिला आणि लोठणावर हल्ला केला. २४९०. अलंकारचक्रानें इतर डामरांना दिलेल्या थापा व्यर्थ गेल्या होत्या. ते त्याला येऊन मिळाले नाहींत. त्यांची हालचाल बंद पडूं लागली. तसा तो असहाय होत्साता पळून गेला. पुढें तो लोठण वगैरे मंडळीसह जवळच शिन्हशिला नांवाच्या किल्ल्याच्या आश्रयाला गेला. शिन्हशिला प्राचीन शारदा व हल्लाच्या शारदीच्या मंदिराजवळ किशनगंगेच्या कांठानजीक असलेला किल्ला. तो सिंध किंवा कृष्णगंगा, मधुमती, व मुक्ताश्री या नद्यांच्या मध्ये आहे )

द्वारपती उदय दूरच्या भागांत फिरत असल्यामुळें त्याला अलंकारचक्र किल्ल्यात पोहोचला किंवा आसपासच्या निबिड अरण्यांत कोठें लपला आहे, याचा तपास ठेवता आला नाहीं. पुढें तो किल्ल्यांतच असल्याचें कळलें, तेव्हां आतां राजाच्या सैन्याचा खास पराभव होणार हें विधिलिखित, असें लोकांना वाटलें.

पाऊस पडून पाणी ऊसळूं लागलें म्हणजे मासे पाण्यावर उड्या मारतात. त्याप्रमाणें हे बंड जोरांत आलेलें पाहून, राजाचे दुसरेहि शत्रू उठावणी करण्याला उद्युक्त झालेले दिसले.

त्रिल्लक वगैरे लोक मनांतून बोहिल होते. त्यानीं पृथ्वीहराचा पुत्र लोठण, याच्या हुषारीचा या गडबडींत उपयोग करून घेण्यासाठीं त्यालाहि या खटपटींत सामिल करून घेतलें. त्यानें परभारे गांव व खेडीं यांची जाळपोळ व लुटमार सुरू केली. त्याचा पाठलाग करणाऱ्यांना तो दाद देईना. तो वरचेवर कचाटींत सांपडे. पण तत्पक्षीय लोक त्याची कशी तरी सुटका करीत असत. तो चोहींकडे संचार करीत असे. कोणी आडवा येतांच तो दृष्टीआड होई. ब्रह्मपुत्र नांवाचा धूमकेतू कल्पांतीं उठत असतो. त्याच्या प्रमाणें तो तडपत व ताप देत होता. (या धुमकेतूचा उल्लेख बृहत्संहिता. अध्याय २१ श्लोक १५ यांत आलेला आहे.)

राजाचें मंत्रिमंडळ थकलें भागलेले होतें. त्यानें वेळ टाळण्यासाठीं समेटाचा आग्रह चालविला होता. त्यावरून सारें मडव राज्य हातचें गेलेंच, असें लोकांला वाटूं लागले.

शत्रूच्या प्रतिकाराची एकहि योजना अमलांत येत नसून, तो सारखा बळावत चालला आहे, असें पाहून राजानें पोक्त विचार करून, धंन्याची या मोहीमेवर रवानगी केली. २५००.

त्यावरून द्वारपती उदय याला अपमान झाला असें वाटून, तो उदास व प्रतिकूळ होईल, असें लोकांना वाटलें. 'भिक्षु एकाकी होता. तसाच मल्लार्जुन पण या वेळीं हे तिघे एक झालेले यांचा पाडाव होणें कठिण' असेंच सर्वांना वाटले. पण द्वारपती केव्हांहि अविचार करीत नसे. राजाला कसेहि करून व कोणाहिकडून जय मिळावा, हीच त्याची इच्छा होती, ती पार पाडण्यासाठीं तो मनापासून झटत होता. स्वतःची रूयाती होण्याची त्याला मुळींच इच्छा किंवा पर्वा नव्हती.

राजकार्यांत न गोंधळणारा मंत्री कोणाहि राजाला जबर पूर्वपुण्याईशिवाय क्वचितच प्राप्त होतो. जयसिंहासारखा दुसऱ्याच्या नादानें चालणाऱ्या राजाला तर, असा आपले मन रागानें चंचल होऊं न देतां, सोंपलेलें काम पार पाडण्याला मनापासून झटणारा मंत्री, मिळाला, हें त्याचें मोठें भाग्यच समजावयाचें.

पंचचंद्र मेल्यावर त्याचा धाकटा भाऊ षष्ठचंद्र याला राजानें त्याच्या जागीं कायम केले होते. तो व धंन्याच्या मागून निघालेले द्विबाहु वगैरे लोक व कांहीं गायक आणि बाह्यदरबारी राजसेवकहि या मोहिमेवर निघाले होते. त्यांनीं कृष्णगंगा-सिंधु-तीरावर तिलग्राम येथे तळ दिला. द्वारपतीनें द्रंगावर राहून किल्ल्याच्या मागील मार्ग रोकले. निष्फळ हल्ले व झटापटी टाळून, त्यानें युक्ती युक्तीनें व नेटानें शत्रूला त्रास देणें सुरूं केलें. धंन्य प्रबल व कर्तृत्वान होता. त्यानें लाकूडतोडे व मजूर लावून, मधुमती तीरावर, पुष्कळ झोंपड्या बांधविल्या. त्यांचे जणों गांवचे गांव वसले. त्यानें झाडी कांपविली व त्या जंगलांत वस्तीलायक जागा तयार करविल्या आणि साऱ्या छावणीत सामानसुमानाची सुबत्ता करविली. २५१०. थंडीच्या दिवसांत तेथें भारी हिमवृष्टी होऊन अतिशय त्रास होतो. पण राजाच्या सुदैवानें अशा त्या पहाडी प्रदेशांतील शत्रूच्या त्या किल्ल्याभोंवती यावेळीं स्वच्छ ऊन्ह पडले होतें.

गादीसाठीं चाललेल्या या झगड्यामूळे त्या राजाच्या अधिकाराला उणेपणा आला असतांनाहि, त्याला जयप्राप्तीची बळकट आशा होती. म्हणून त्याला उत्साह वाटत होता. यामुळें त्यानें संकटप्राय प्रसंगांतहि करविलेला सामानसुमानाचा पुरवठा पाहून सर्व लोक चकित झाले. या बंडाचा प्रतिकार लौकरच होईल, असे वाटलें होतें. तरी सामानसूमानाच्या वाहतुकीत जबरीची बेगार पडलेल्या गांववाल्याचे हाल व दुःखाक्रोश हे याबद्दलच्या प्रायश्चित्त होमांत जणों शांतिचरुच अर्पण होत होते. ( मधुमति ही लहानशी नदी दक्षिणेकडून येऊन शारदेच्या मंदिराजवळ किशनगंगेला मिळते. काश्मीरांत पूर्वीपासून सामानाची वाहतुक जबरी बेगारीनें करविण्याचा प्रघात चालू आहे. त्यामुळें रयतेला फार त्रास होतो व त्याचे वित्त व प्राण यांना अतोनात खराबी होते )

फार दिवस घरदार सोडून दूरदेशी कष्टांत राहावें लागल्यामुळें, त्रासून पळून जाणाऱ्या सैनिकांना रागें भरून व नेटानें टिकून राहिलेल्यांना इनामें देऊन त्यांचा उत्साह वाढवीत राजानें त्या सैन्याचे धैर्य व शौर्य तीन चार महिने कायम राखलें. तरी त्या फौजेला किल्ल्यांतील मगरूर लोकांचा पाडाव करतां आला नाहीं. तो करण्याचा मुख्य उपाय त्यांची रसद बंद पाडणें हाच होता. पण तिकडे लक्ष नव्हतें. नवे कोंब फुटण्याला तयार असलेल्या पहाडी भूमीप्रमाणे डामर लोक यावेळीं स्तब्ध होते. तरी बर्फ वितळतांच ते आपला प्रताप गाजविण्याला उत्सुक होते. बंड करण्याला उत्सुक होत्साते राज्यातील शेतकरी व ब्राह्मण, यानीं शेती व वेदाध्ययन सोडून, हातीं शस्त्रे घेतलीं. तसेंच महत्वाकांक्षी दरद लोक आपले स्वार सज्ज ठेवून, पहाडी मार्गांतील बर्फ वितळण्याची वाट पहात होते. त्या दिवसांतली हिमवृष्टी केवल मृत्यूची अवजड कापसाची गोधडीच. ती केव्हां येऊन पडेल कोण जाणें, या भीतीनें राजाचें सैन्य सारखें कांपत होतें. २५२०. शत्रूच्या बलाबलाचा पुरता विचार न करिता रेटीनें हातीं धरलेला हा प्रयत्न सफल होण्याची राजाला शंका वाटूं लागली.

मनाची एकांतिक स्थिति असेल तेथे चंचल दैव विलक्षणच प्रकार करतें. यामुळे माणसांचा आत्मविश्वास कमी होतो. फार दूरवर विचार करीत राहिल्यानें साधनहीन व जेरीस आलेल्या शत्रूपुढेंहि, त्याला क्वचित प्रसंगी हार खावी लागते. शत्रूच्या बलाविषयी ऐकीव भपक्यावर जाऊन, ज्याला भय व काळजी यांच्यामुळें थरकाप सुटतो, तो बुद्धिमंद होतो. त्याला विजयप्राप्ति मिळत नाही. कमले आपल्यावर भ्रमररूपी शिलीमुखांनीं हल्ला करतील त्याच्या पत्राच्या-रथाच्या-वडाक्यांत आपण सांपडूं. ती आपल्या केसररूपी गुणांनीं-रज्जूंनी-आपणाला बांधतील, वगैरे भलत्याच कल्पना मनांत येऊं लागल्या तर, हत्तीचें मोठें प्रचंड धूडहि भीतीनें निःसत्व होऊन, त्याच्या हातून त्या कमलांचें निर्मूलन होणार नाहीं.

लोठण वगैरे लोक मोठ्या मुष्किलीनें कर्णाह येथून निसटून अलंकारचंद्राकडे पोंचले. तेव्हां त्यांनीं काश्मीर मंडळ काबीज केलें, असे लोकांना वाटलें. पण राजाच्या मदतगारांनीं केलेल्या सर्व खटपटी व्यर्थ थोड्याच गेल्या होत्या ? त्या शिवाय त्या द्वारपतीला अलंकारचक्रावर असा तावडतोब जोरानें हल्ला कसा करता आला असता ? त्या हल्ल्याला तोंड देतां न आल्यामुळेंच, अलंकारचक्राने त्या राजपुत्रांना किल्ल्याच्या आश्रयाला पाठविलें व दुसरे दिवशीं तो स्वतः तिकडे गेला.

तो किल्ला असलेली पहाडाची पठार खालीं निरुंद होत, मासे मारणाऱ्या क्रौंचाच्या लांब मानेसारखी, नदीकडे वाढलेली होती. तो किल्ला फारसा मजबूत किंवा मोठा होता असें नाहीं तो एकाद्या मोठ्याशा हत्तीच्या रिकाम्या ठाणासारखा पाहून, लोठण वगैरे निराश व भयभीत झाले. अलंकार त्यांना धीर देत, ' या येथून शत्रूवर शरवृष्टी करून त्रास देतां येईल, त्या तिकडून आपण शिलावृष्टी करूं. इकडून असे नदीच्या पाणवठ्याचे रक्षण करावयाचें व हे येथें उल्हाट यंत्रासाठीं दगड पडले आहेत ' असें सांगत होता. हें सां

स्वतःच्या बचावासाठीं असल्यानें आपल्यासाठीं तो नेटानें लढेल, अशी त्यांना खात्री वाटेना. २५३०.

तिलग्राम येथील राजाच्या सैन्याकडून वरचेवर हल्ले होऊं लागले. तसा अलंकार जेरीस आला. त्याला त्याचा प्रतिकार करतां येईना. तेव्हां ते राजपुत्र काळजीनें कृश झाले. तो स्वतःच्याच बचावात निमग्न होता, म्हणून कोपन व तीक्ष्ण स्वभावाचा लोठण, त्याला उघडपणें दोष देऊं लागलेला पाहून, भोजानें त्याची समजूत करीत म्हटलें, ' आपण यावेळी अडचणीत आहांत तो आपल्याशी दगा करील, सबब असें बोलणें बरें नव्हे. ' तो अलंकाराची स्तुतीच करी. त्याच्या तुसडेपणावरून अलंकार लोठणाशीं कपटानें वागे. पण भोजाचें भाषण सौम्य व गोड असल्यानें तो त्याच्याशीं मित्रत्वानें वागून, त्याची सल्ला मसलत खात्रीची व उपयोगी जाणून वरचेवर घेत असे.

लोठणाच्या मनांत आपणाला किल्ला सोडून जाऊं द्या, असे अलंकाराला विचारण्याचें होतें. पण भोजान त्याला मना केलें. आपणाला जाऊं दिलें तर राजा आपला प्राण घेईल, अशी त्याला भीति असल्यानें त्याला विचारण्यात अर्थ नाही, असें भोजानें त्याला समजाविलें. पुढें भोजानें स्वतः त्या अलंकार डामराला म्हटलें, ' तुम्ही आम्ही सारेच येथे वेढून पडलो तर, शत्रूला मागून हल्ला होण्याची भीति नसल्यानें, तो निश्चितपणें व नेटाने हल्ला करील व यश मिळेतों वेढा कायम ठेवील. मला बाहेर जाऊं दिलें तर मी दुसरे दरद व लवन्य आणून लौकरच वेढा उठवूं शकेन. ' अशा योग्य भाषणांनीं त्यानें त्याची कांहीशीं संमती मिळाविली. अलंकार त्याला वरून स्नेह दाखवीत. ' रोज, आज रात्री, उद्यां, आपली रवानगी करतों, ' अशा थापा देत होता. २५४०

वेढा घालणारांनीं किल्ल्यांतल्या लोकांचें बाहेरच्यांशीं दळणवळण पूर्तेपणी बंद केलेले नव्हतें ते किल्ल्यापासून दूर राहात होते. यामुळें आतील लोकांना जवळपासच्या खेडयापाडयांतून धान्य व इतर सामुग्री आणतां येत होती.

पुढें लौकरच धंन्य वगैरेनीं ही मोहीम यशस्वी होणार नाही अशी भीति पडून. 'शत्रूंशी समेट करावा' असे राजाला सुचविलें. पण तसें करणें राजाला अनेक कारणांमुळें अनिष्ट वाटले.

त्याने त्यांना किल्ल्याशी भिडून वेढा घालण्याची आज्ञा केली. शिवाय खुलासा करीत असेंहि कळविलें कीं, ' हा लबाड डामर तुम्हांकडून लांच घेईल व तिकडे त्या आमच्या आप्तांना निसटून जाऊं देईल आणि मग ते, आपण जय मिळवून परत आलों, अशी बढाई मारतील. तेव्हां या बिकट प्रसंगीहि आपण स्थैर्य व शौर्य न दाखविलें तर, ते भारी खेदकारक होईल. शिवाय अशी उत्तम संधी हातची दवडल्याबद्दल सर्व लोक नांवे ठेवतील. 'हर्ष राजा सात दिवस अधिक धीर धरता तर त्याला जणों दुग्धधाराच प्राप्त होती.' असें म्हणण्यांत येतें. तें ऐकून आणखी एका राजालाहि लाज वाटते आहे. पूर्वार्जित पुण्य-पापानुरूप दैवीं असेल तेच प्राप्त होतें. क्रियातिपत्ती-किंवा आलेला संधी दवडणें-हें तीन्हीं

लोकांचा नाश करून घेण्यासारखें आहे पंख असलेल्या मुंगीला पाय असूनहि स्वतःच्या अंधेऱ्या बिळाशिवाय दुसरीकडे त्यांची चालतां किंवा त्या पंखांनीं उडतां येत नाहीं. ती अंधळ्या पांगळ्यासारखी वावरते. अनिर्वाह पक्षानें आखलेल्या मार्गानेच जावें लागेल तेथें अंगच्या गुणांचा उपयोग काय ? अरुण अनूरू असूनहि सहस्रपाद सूर्याचें सारथ्य करतो. त्यालाहि दोन पाय असते तर, त्यानें याहून अधिक काम केलें असते. तेव्हां नुसतें तमाशा पहात न राहतां, साऱ्या किल्ल्याला घेरा घाला. या कामीं त्यांची व आमचीं सारीं आयुष्ये खर्ची पडलीं तरी हरकत नाहीं. २५५०. वायू अग्नीशीं संयोग करणें सोडीत नाहीं. उंच पहाड व नीच भागांतील पाणी या दोहोंनाहि तो सारखा हलवीत असतो. हातांतील कामाविषयीं सारखा निदिध्यास व सतत प्रयत्न करूनहि, यश न आलें तरी, त्यामुळे अतर्क्य व महत्त्वाचे परिणाम घडत असतात.'

राजाची अशी सक्त ताकीद आल्यावर धंन्य व इतर मंत्री नदीतीर सोडून किल्ल्याच्या मुख्य रस्त्यावर आले. त्यांच्यावर किल्ल्यांतील लोक शरवृष्टी करीत व कौतुकानें त्यांची हाल-चाल पहात होते. धंन्यानें खालीं राहूनच पूर्ती नाकेबंदी केली व वरच्या लोकांना किल्ल्यांत हांकून लावलें. नंतर त्यानें आपल्या फौजेसाठीं बचावाच्या जागा बांधवून, तेथें जणों नवें गांव वसविलें. वरचेवर झटापटी सुरू होऊन दोहींकडील अगणित लोक पडले. दुसरे दिवशीं षष्ठचंद्र, वाटेत शारदेचें दर्शन घेऊन, येऊन पोहोंचला व त्यानें मारलेल्या योद्ध्यांच्या द्वारें इंद्रपुरीची वस्ती वाढविली. बाह्य राजस्थानीय मंत्री अलंकार यानें अतिमानुष पराक्रम करून शत्रूचे पुष्कळच लोक मारले. पहाडी लोकांशीं मैदानवाले कशी बरोबरी करणार ? तरी त्यांनीं कल्पनेबाहेर काम देणारीं युद्धाची यंत्रें आणलीं होतीं. तीहि हिशेबांत घेतलीं पाहिजेत. किल्ल्यांतील थोड्याशा लोकांच्या मानानें वेढा घालणारे अगणित होते. यामुळें आंतील लोकांनीं त्यांच्यापैकीं पुष्कळांना ठार मारलें तरी, त्यांचें अधिक प्रमाणांत नुकसान होत होतें.

किल्ल्यावर दोन तीन हल्ले होऊन आंतील लोकांना भारी त्रास पोंचल्यावर, त्यांनीं भिऊन किल्ल्याचे जोड दरवाजे-जणों त्या किल्ल्याच्या डोळ्याच्या पापण्याच-बंद केले. तेव्हां तो डोळे मिटल्यासारखा दिसूं लागला. २५६०.

धंन्य व दुसरे मंत्री रक्षकांना फितविणें, अंतस्थ गडबड उठविणे आणि तटातील कच्च्या जागांचा फायदा घेणें, अशा खटपटी करूं लागले. हें पाहून आंतील लोकांचें धैर्य खचलें. त्यांना रात्रभर झोंप येईना. रात्रभर जागण्यासाठीं ते एकमेकांना सारखें मोठ्यानें हाका मारीत. ते दिवसां निजलेले असतांना तो किल्ला सुना वाटे. मेघगर्जनेनें झाडांच्या ढोलींतलि चिमण्यांची गाळण होते, त्याप्रमाणें सैनिकांचे पहारे बदलतांना ढोल वाजविले जात, त्या आवाजानें सुद्धां त्यांचा भिऊन थरकांप होत असे. राजाचे सैनिक त्यांना नाना तऱ्हेनें त्रास देत होते. नदीमध्यें नावा फिरत्या ठेवून, त्यांनीं आंतील लोकांचा पाण्याचा मार्ग बंद केला. ते दुःख त्यांनीं कसेंबसें सोसलें, पण बाहेरची धान्यसामग्री मिळणें बंद

पडलें तेव्हां त्यांची त्रेधा उडाली. राजवंशीयांना रोज राजभोग अन्न खाण्याची संवय व आवड होती. पण आतां त्यांना कदान्नहि मिळाले तर भाग्य, असें वाटे त्यांच्या साऱ्या उमेदी खचल्या. भुकेनें प्राण व्याकुळ झाले. राजाच्या सैनिकांना रोज मिळत असलेल्या साध्या व पोटभर अन्नाची त्याना स्पर्धा वाटूं लागली.

' आपण सारे असे येथें कोंडून राहिल्यानें कांहींच करतां येणार नाहीं, ' असें भोजानें म्हटलें. त्यावर अलंकारचक्रानें त्याला बाले किल्ल्यांत वेगळें ठेवले. त्याच्या मते, राजाचा खरा प्रतिस्पर्धी भोजच होता. लोठणवृद्ध व विग्रहराज दासीपुत्र, सबब त्यांचें भोजाइतकें महत्व नव्हतें. शत्रू इतकें नेटानें काम चालवितात ते वास्तविकपणें भोजासाठीच, असें मनांत आणून त्यानें भोज पळून गेला, अशी खोटीच अफवा उठविली. २५७०

भोज रोजची बातमी काढीत असे. पद्मचंद्र सुखरूप होता. त्याच्यावर अलंकारचक्राची पत्नी आषक्त झाली होती. ती जारिणी होती. ती त्याचे सर्व बेत गुप्तपणें प्रत्यहीं शत्रूला कळवितें, असें त्याला कळलें तें त्यानें अलंकारचक्राला कळविलें व विश्वासघात होण्यापूर्वी आपणाला निघून जाऊं देण्याला म्हटलें. पण तो डामर यावेळीं जणों पापी माणसावरहि न रागावणाऱ्या बोधिसत्वासारखा क्षमाशील बनला होता. त्यानें त्या जारिणीच्या वर्तनाकडे डोळेझाक केली. तो प्रेमांध बनलेला. त्याला तिच्यामध्यें कांहींच दोष दिसत नव्हता. शरभाला पाठीवरील हत्तींचें स्मरण राहात नाहीं, तसें प्रेमांधाला प्रियतमेचा आत्यंतिक व प्राणघातक तिरस्कार लक्षांत येत नाहीं.

पुढें भोज तेथून निघाला. त्यावेळीं शत्रू निजलेले होते. त्यांच्या गोटांतून तो बहुतेक बाहेर सुद्धां पडला होता. पण त्याच्या बरोबर अलंकारचक्राचा मुलगा होता. त्यानें भिऊन किंवा दयानें, त्याला परत किल्ल्यात आपल्या बापाकडे आणलें. अलंकारचक्र या बद्दल मुलावर नाराज झाला व त्यानें भोजाला पुनः दुसऱ्या रात्रीं निघण्याला सांगून, दिवसभर त्याला लपवून ठेविलें.

भोज निघून गेला व लोठण आणि विग्रहराज दुसरे दिवशीं जाणार, अशी बातमी लागून, धन्य वगैरेनीं दुसऱ्या रात्रीं सारखी जाग ठेविली. भोजानें निघण्याची तयारी केली. पण बुरुजावरून तो पाहूं लागला तेव्हा शत्रूच्या सर्व छावणीत पाहारे चौक्यांवर जाग असून. आगट्या पेटलेल्या होत्या. त्यांनीं सर्वत्र लखलखाट होऊन, मुख्य मार्गानें मुंगीला सुद्धां न दिसतां बाहेर पडणें शक्य नव्हतें. त्या चंचल प्रकाशांत शत्रूच्या झोपड्या सारख्या हललेल्या दिसत होत्या. त्या द्वारें त्या जणों भोजाला, असला अनर्थावह प्रयत्न करूं नको, असें माना हलवून सुचवीत होत्या. त्याला निघतां आलें नाहीं. पुढें उजाडल्यावर त्याला त्या डामरानें, डामर सरदार क्षेमराज याच्यासह दोरी बांधून एका बाजूच्या कड्यावरून खालीं एका पुढे आलेल्या लहानशा खडकाच्या कपारीवर—वितर्दिकेवर—उतरविलें. तेथें दोघांना नुसती बसण्यापुरती जागा होती. खालीं पडण्याच्या भीतीमुळे त्यांनीं तेथें पांच दिवस व रात्री जागत

बसून काढल्या. तेथें ते बरोबर नेलेल्या लहान लहान जवाच्या रोटया खात व पक्ष्याप्रमाणें बसल्या जागीं मलमूत्रविसर्जन करीत, चित्रासारखे राहिले होते. खालीं शत्रूच्या छावणींत मनमुराद सुबत्ता होती. ती तें प्रत्यक्ष पहात होते. त्यांना जणों जयसिंहाच्या प्रतापाग्नीचा उष्म्याच्या प्रत्यक्ष अनुभवामुळें, थंडीची बाधा होत नव्हती. साहावे दिवशीं चपात्या संपल्या आणि कडाक्याची हिमवृष्टी होऊन, त्यांना क्षतावर क्षार पडल्यासारखें झालें. त्यांचे दांत थंडीनें शिवाशिवून सारखे वाजूं लागले त्यांनीं मेहनत करून अंगांत ऊब आणून ती कायम ठेवली पाहिजे होती. पण त्यांचे हात पाय गारठून त्यांना झांपड पडूं लागली, ' आज आपण जाळ्यांत फसलेल्या पक्षाच्या जोडीप्रमाणे क्षुधेनें व शीतानें व्याकुळ होऊन, खाली शत्रूच्या छावणींत खास पडणार, हाका तरी कोणाला माराव्या, गाळांत फसणाऱ्या करिकरभकांना गंध गज वर ओढून काढतो. तसें आम्हाला करण्याला, आम्ही येथें आहों, हें तरी कोणाला ठाऊक आहे, असें ते अपसांत विचार करीत होते. पुढें त्यांच्या विनवण्यांवरून अलंकारचक्रानें त्यांना पुनः दोर सोडून वर ओढून घेतलें आणि गुप्तपणें एका रिकाम्या घरांत नेऊन ठेविलें. तेथें गवत पेटवून त्यांनीं थंडीचें निवारण केलें व त्यांना दुःखाचा विसर पाडणारी झोंप आली.

लोठण व विग्रहराज यांची स्थिति अधिक कष्टाची होती. त्यांच्याशी कोणीहि धड एक शब्द गोड बोलत नसे. सर्व लोक त्यांचा तिरस्कार करीत. भुसासकट भरडलेल्या जवाची व कोद्रूंची जाडीभरडी भाकरी त्यांना मिळे. त्यांची वस्त्रें घामट झालीं होतीं. अलंकारचक्राची धान्यसामग्री अगदीच संपुष्टांत आली होती. तितक्यांत धंन्यानें त्याच्या होलावयशस्कर नांवाच्या सेवकांना अन्नदानाच्या द्वारें फितविलें व पुढें त्याचीच उपासमार होऊं लागली तेव्हां दग्याच्या भीतीनें त्याची चलबिचल झाली व त्यानें राजाचे शत्रू लोठण व विग्रहराज, यांना राजाला विकण्याचें कबूल केलें. तो मूळचाच दुष्ट असून, दुस्सह दुःख व संकटें यांच्या अतिरेकामुळे त्याचें धैर्य गळालें होतें. त्यानें पाप व मानहानी यांचा विचार सोडून दिला. राजाच्या शत्रूंपैकीं कोणाला तरी हातीं राखून, स्वतःचा बचाव करणें व अभिमान राखणें, यांसाठीं काडीमाडीचाहि आश्रय घेण्याचें त्यानें ठरविलें होतें. २६००. म्हणून त्यानें उदयनाच्या विचारानें 'भोजाला मागें ठेवून, दुसऱ्या दोघांना स्वाधीन करावें, यांत सर्वांचें हित आहे. कारण भोज हातीं आला नसतांना राजा त्या दोघांनाच उग्र दंड करणार नाहीं. व आपलेंहि नुकसान करणार नाहीं' असें त्याला वाटलें.

ही वाटाघाट चालली असतांना अन्नसामग्रीच्या अभावीं अलंकारचक्राची अतिशय हलाकी झाली आहे, याची धंन्य व इतर मंत्री यांना अटकळ नव्हती. ते तेथून कसा तरी पाय काढण्याला उत्सुक झालेले होते. ' डामर दोघां राजबीजांना स्वाधीन करीत असल्यानें, आतां येथें जास्त कर्तव्य उरलें नाहीं, ' असें समजून धंन्यानें, ठरल्याप्रमाणें त्या दोघांना धाडावें व फौज निघून जावी, या गोष्टीच्या जामीनादाखल आपला पुतण्या पाठविला.

एखाद्या ग्रंथाची रचना करणे, राग मनांत ठेवणाऱ्या शत्रूची मनधरणी करणें, महा भुजंग हातीं धरणें, किंवा कुटिल नीतीचा प्रयोग करणें, या कामांत जो योग्य उत्साह धरून व शेवटीं नेटानें त्वरा करूं जाणतो त्यालाच यश मिळतें.

बरेच दिवस दूर देशीं अडचणी सोशीत राहिले असल्यानें, त्या मंत्र्यांमध्यें जोम व उत्साह उरलेला नव्हता. त्यांचा उद्योगहि मंदावला होता. एखाद्या सुंदर व गुंतागुंतीच्या कथेतील कथानकाची अखेर, नीट लक्षांत येणें कठिण पडतें; त्याचप्रमाणें घोटाळ्याच्या राजकारणाचा योग्य व समजुतीनें शेवट लावणारा मंत्रीहि क्वचितच आढळतो.

तह ठरतो आहे, हें प्रगट होतांच राजाच्या फौजेंतील लोक राजकृपा विसरून तात्काल परत निघाले आणि त्यांनीं धान्यसामग्री व सामानसुमान लवन्यांना विकलें. तें हातीं येतांच तो डामर ठरावाप्रमाणे वागण्यांत उशीर करूं लागला. इकडे फौज कमी झालेली पाहून धन्य व इतर मंत्री घाबरले. २६१०. लोठण व विग्रहराज केव्हां हातीं येतात म्हणून ते किल्ल्याच्या मुख्य मार्गाकडे सारखे पहात राहिले. पण त्या डामराने त्यांना त्या दिवशीं धाडले नाहीं यामुळे त्यांची काळजी वाढली. चक्रवाक सारखे ओरडत असलेली ती रात्र त्यांनी मोठ्या उत्कंठित स्थितीत घालविली. ते राजबीजी हातां न आले तर, त्या मंत्र्यांना आत्महत्त्येशिवाय मार्ग दिसेना. 'इतके परिश्रम करून जमविलेला घाट आपल्या वेडेपणानें फसत असलेला पाहून, इतर मंत्री हंसतील व वरवर कींव करीत, राजाचें मन कलुषित करतील, महाराज गोड शब्दानें स्वागत करणार नाहीत. या मोहिमेंतील अडचणी व जयापजयाचा संभव लक्षांत न घेतां, ते लोक एकदम आम्हाला लाजवून थट्टा करतील,' असे त्यांतून कांहींना वाटलें. दुसऱ्या कोणाला वाटलें की, 'त्या नीच व लबाड डामरानें लोठण वगैरेंच्या सल्लेनेंच ही फसवेगिरी चालविली असेल. आपला हेतू साधलेला पाहून, ते आतां स्वस्थपणें आम्हाला हंसत असतील.' असले कष्टकारक विचार करतां करतां त्यांची ती रात्र एकदांची संपली. सकाळीं राजस्थानीय अलंकार मंत्र्यानें दांडगाईचें कारस्थान चालविलें व किल्ल्यापाशी पोंचून, त्याने खूप धमकी देऊन, त्या डामराला वळणावर आणलें. त्याला त्यानें एका दिवसाचा अवकाशहि दिला.

नंतर अलंकारचक्रानें लोठणाकडे जाऊन त्याला 'तुम्हाला गेलेच पाहिजे,' असें निक्षून सांगितलें. त्यावर लोठणाजवळच्या कांहीं मानी मंडळींनें त्याला येणारे अपयश टाळण्यासाठीं व आपले महत्व कायम राखण्यासाठीं, काय करावें तें सुचवीत म्हटलें, २६२०. 'हा निर्वाणीचा काळ आहे. त्याच्यामुळें सर्वांच्याच डोळ्याला अंधेरी यावयाची. तो नेहमीं ध्यानांत असूनहि सर्वांना साध्य असतो असें नाहीं. खऱ्या क्षत्रियांना तो आपल्या हातांतील अभ्रनील असिलतेनें मिळवावा लागतो. त्याच्यायोगानें स्वर्वधूशीं संगत होतां येतें व एकदम सूर्यमंडळाचा भेद करतां येतो. रणांगणीं लढत जय मिळवीत, देह सोडून राजे लोक एकदम चंद्रांशुमंडळ प्राप्त करून घेतात व त्यांना प्रिय व प्रेमार्द्र दिव्यांगनांचें आलिंगन प्राप्त होतें. अनेक अस्तरणांनीं उलवण व मृदु शय्येवर दुःख भोगीत तळमळत निपचित पडणें

च त्यांतहि थोडेसे हलतांच गांठी रुतून प्राणांतिक व्यथा होणें, बंधुजनाच्या आर्त शोकानें चकित होणें व खितपत पडणें, या गोष्टी त्या मार्गाचें अवलंबन करणाऱ्यांना अनुभवाला लागत नाहींत. असें तें वीरोचित मरण म्हणजे सुखाची सुभग संप्राप्तिभूमी होय. आपले वडील खड्गलता छत्रांनीं गहन झालेल्या मार्गानें स्वर्गास गेले. बंधूंनीं असिधेनूकंटकित वनांत भ्रमण करून सद्‌गती मिळविली.

असा हा आपल्या पूर्वजांनी रुळलेला मार्ग, आपणहि धैर्यानें व उत्साहानें स्वीकारावा व त्या द्वारें अर्कमंडळ आणि तेजस्वी लोकांचीं अंतःकरणें, यांच्यांत एकदमच प्रवेश करावा. विधीनें आपणाला एकवेळ अधिराज्य मिळवून दिलें, तें आपण दौर्बल्यानें घालविलें. त्या वेळीं आपण पोक्त व प्रशमोचित असूनहि पोराप्रमाणें वागला. त्याचें प्रायश्चित्त करण्याचा हा प्रसंग त्याच विधीनें आयता आणला आहे. तो तरी, कर्तव्यमूढ होऊन, राज्याप्रमाणेंच गमावूं नका. प्रभविष्णु भिक्षाचर राजानें प्राप्त झालेलें राज्य गमाविलें, अयोग्य रीतीनें व जणों उच्छिष्ट भोजी होऊन काल काढला. त्याची सर्व स्थिति व कृती लोकक्षयाला कारण झाली. तरी त्याची कोणची एक गोष्ट उचित झाली म्हणतां येईल तर, ती त्याचा वीरोचित अंतकाळच होय. त्याच्यामुळें त्याला सर्वातिशयी श्रेष्ठपणा प्राप्त झाला.'

असा बोध करून त्यांनीं त्याला उत्तेजन दिलें. पण तो मुळींच तेजोहीन झालेला, त्याच्यावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. निस्सत्व वानरेंधन अर्मांत पडून सुद्धां पेटत नाहीं, तो स्वाभिमानशून्य झालेला होता. ही धोक्याची स्थिती पाहून तो घाबरला आणि अवचित जागविलेल्या पोराप्रमाणें अधरोष्ठ पुढें करून तो बहुतेक रडूं लागला!

शेवटीं अलंकारचक्रानें त्याला राजाच्या मंत्र्याच्या स्वाधीन केलें. त्याला नेण्याला आलेल्या अमलदारांना त्याची स्थिती पाहून दया आली. त्याचें समाधान करीत व त्याला उत्तेजन देत त्यांनीं म्हटलें, 'आपण असे हताश होऊं नका. महाराजाचें मन दयारूपी चंद्रकलांनीं प्रकाशित असतें. त्याच्यांत, शत्रुत्व व द्वेषरूपी तम, क्वचितच पैदा होतें. २६३०. ते प्रेमामृताचे सागर, धैर्याचे अचल मेरू व शरणागत होऊन आश्रय मागणारांचा दाह शांत करणारे शीतल चंदनतरु आहेत. त्यांचा देह स्वर्गंगेच्या ओघासारखा निर्मल व पावन आहे. त्यांच्या दर्शनानें आपल्या संतप्त मनाला समाधान वाटेल. इतर निरपराधी वडील मंडळीप्रमाणेंच ते आपला मान ठेवतील व आपल्या मनांतील अवमान व लाज, यांची जाणीव दूर करतील. ते फार दयाळू आहेत. 'आपल्याला दुःख देणार व नुकसान पोचविणारे लोकच आपल्या दयेची खरी कसोटी असतात म्हणून तें आपल्यावर ते उपकारच करनात' असें ते समजतात.'

हें ऐकून लोठणाला समाधान वाटले. तो बाहेर पडला. त्या वेळीं त्याची लांब, दाट व कुरळी दाढी, हलत होती. त्याच्या अंगांतील पायघोळ झुब्बा कांपत होता. यामुळें तो गोठ्यांतून बाहेर पडत असलेल्या वृद्ध वृषभासारखा दिसत होता. तो डोलींत बसून आला

तेव्हां, त्याच्या अंगावर अलंकार नव्हते. त्याचे कपडे जीर्ण व मलिन आणि शस्त्रें निस्तेज होतीं. त्याला पाहून धन्याला वाईट वाटले व त्याचे मन बुचकळ्यांत पडलें. लोठण फार वेळ स्तब्धदृष्टि होता. त्याचा तो दाट पण रुक्ष दाढी व त्याचे झुकलेले खांदे आणि शरीर, यामुळें तो त्याला नुकत्याच घरट्यांतून उठविलेल्या वृद्ध घुबडासारखा वाटला.

राजाच्या सैनिकांनीं निघतांना छावणीला आग लावली. तिच्या योगानें जवळपासच्या पहाडांवर राजाच्या प्रतापरूपी सुवर्णाची दीर्घ कसोटी ओढली आहे असें वाटे. छावणी उठते तोंच घनदाट हिमवृष्टी झाली. तिच्यामुळें राजाच्या अंगीं दैवीशक्ती असल्याविषयींचा लोकांचा भ्रम दूर झाला. ती थोडे दिवस अर्धी होती तर सारें सैन्य औषधि द्रव्याच्या पिठाच्या राशींत पडून मरणाऱ्या कीटकांच्या सारखें, त्याच्याखालीं दबून मरतें. २६४०. याप्रमाणें लौकिक वर्ष ४२१९, ई. स. ११४४ च्या फाल्गुन शुद्ध दशमीला, लोठण पुनः प्रतिबंधांत पडला. तेव्हां तो साठीला पोहोचला होता.

फार दिवस दूर देशीं राहून, विजयी होऊन परत येत असलेल्या फौजेचें अभिनंदन करण्यासाठीं राजा तिला सामोरा गेला. त्याला स्वतःचा अभिमान नव्हता.

तो एका उंच जागीं उभा होता. त्यानें यथायोग्य देणग्या, मिष्ट भाषण व प्रेमळ दृष्टिपात, यांच्या द्वारें सैनिकांना आनंदवून, त्यांना निरोप दिला. नंतर तो धन्न्य व इतर मंत्री व अंमलदार यांच्याकडे वळला. राजद्वारांत द्वारपालांनीं लोठणाचें नांव घेऊन, तो आल्याची राजाला खबर दिली. भोंवतालच्या गर्दीमुळें लोठण स्पष्ट दिसत नव्हता. तिकडे राजाची दृष्टी गेली. लोठणाच्या बगलेंत हात घालून कांहीं शिपायांनीं त्याला सांवरलें होतें. त्यानें झुब्यानें तोंड झांकून, त्याचें टोंक नाकावर घेतलें होतें. त्याने त्याची पांढरी व विसकळित झालेली दाढी त्याच्या भूषणहीन कानांच्या पाळ्यांपर्यंत पोंचली होती व गाल बसलेले, डोळे निश्चल व दृष्टी खिन्न होती. लोक त्याच्याविषयीं बरीच चर्चा करीत होते. त्यांच्याकडे तो मधून मधून हळूंच पहात होता. यावेळीं दुर्दैवाच्या वक्र कटाक्षामुळे त्याला दुःख, दैन्य, खेद भय, निःसत्वपणा व क्षुधा, यांची भारी बाधा होत होती. त्याला निद्रा मुळीच मिळाली नव्हती. थंडीनें त्रासून काकडणाऱ्या गायीच्या प्रमाणें त्याचें सर्वांग कांपत होतें. त्याला भूमी हादरल्यासारखी व पहाड खडबडून पडत असल्यासारखे वाटत होते. त्याचे ओंठ सुकलेले व थरथरत होते. तो पावलों पावलीं थबकत होता. 'परमेश्वर मजसाठीं कांहीं अद्‌भुत चमत्कार घडवील, गडद अंधकार पसरेल, हा राजवाडा झंझावातानें नाहींसा होईल, तर बरें. ज्याला मी हरतऱ्हेनें व सर्व प्रकारचें दुःख दिलें व नुकसान पोंचविलें, त्या या राजापुढें मी आतां जाऊन उभा तरी कसा राहूं?' असें त्याच्या मनांत विचाराचे काहूर उठत होते. २६५१.

राजाच्या भ्रूसंकेताअन्वयें तो दरबारात चढून गेला. तेथील, त्याला पाहण्याला उत्सुक झालेल्या दरबारी लोकांचे चंचल नेत्र, हलणाऱ्या नीलकमलाप्रमाणें वाटत होते. राजाच्या दृष्टिपाताअन्वयें त्यानें पुढें जाऊन, गुडघे टेकून, त्याच्या चरणकमलांवर मस्तक ठेवलें.

तोच राजानें आपल्या रत्नविभूषित आणि तेजस्वी औषधींनीं रक्षाबंधन झालेल्या करकमलांनीं त्याच्या कपाळाला स्पर्श करीत, त्याला उठविलें. त्यावेळीं लोठण गांगरून गेला होता. पण त्या चंद्रशीतल करकमलाच्या स्पर्शानें, त्याच्या मनांतील दारुण दुःख व शरीराचा सारा दाह, एकदमच नाहींसा झाला. राजाच्या पूर्व पुण्याईचें फलरूपी दयाळूपणाविषयीं त्याला तात्काळ खात्री पटली.

'मी याला भिऊं नका म्हणणें, उद्दामपणाचें होईल. तुम्हाला पुनः सुखाचे दिवस प्राप्त होतील, हे शब्द निरर्थक होत, माझा तुमच्यावर राग नाहीं, असें म्हणणें, त्याच्यापूर्वीच्या शत्रुत्वाच्या कृत्यांचा विसर पडला असें दाखवील. तुम्ही आमचे आप्त आहां, हे म्हणणे यावेळीं अवमानाचें होणार. तुम्ही यावेळीं दुःखाकष्टांत आहां असें म्हणण्यांत दिमाख दिसेल. हे सर्व लक्षांत आणून राजा कांहींच बोलला नाहीं.

नंतर विग्रहराजानें राजाच्या पायांवर डोकें ठेवून अभय मागितलें. तेव्हां राजानें त्याच्या मस्तकाला पादस्पर्श केला. २६६०. लोठणाला राजानें स्वतः आग्रहानें, तो 'छेः छेः मी या बहुमानाला कोठें पात्र आहे ?' असें म्हणाला तरी तांबूल दिला.

द्वारपती उदय यानें राजाला लवून नमस्कार केला. तेव्हां राजानें त्याला, 'तुम्हाला फार परिश्रम पडले, असें म्हटलें धन्य व षष्ठचंद्र जवळच उभे होते. त्यांना त्यानें डाव्या हातानें शाबासकी देत स्पर्श केला. राजाची हुषारी, विवेक, सभ्यपणा, आदर वगैरे राजोचित सद्गुण पाहून लोठणाला स्वतःविषयीं भारी धिक्कार वाटला. धन्याच्या मार्फत त्याला उत्तेजन देत, राजाने हात जोडून सभ्यपणानें निरोप दिला व त्याला एका प्रशस्त महालांत राहण्यास पाठविलें. त्यावेळीं लोठण भारी खजील व लज्जित झाला होता.

राजा नेहमीं हुषारीनें व कारस्थानानें वागे. कोठें हल्ला करतांना आपला हेतू सफल किंवा निष्फल झाला तरी तो चर्येत फरक पडूं देत नसे. सागर और्वानालामुळें उष्ण किंवा हिमालयाचे पाणी येऊन मिळाल्यामुळें थंडहि होत नाहीं. खोल मनाचे लोक आनंदाच्या व संकटाच्या दोन्ही वेळीं सारखेच वर्तन व चर्या ठेवतात. राजानें आपलें प्रेम, योग्य कळकळ व मोकळेपणा, यांनीं युक्त अशा वर्तनानें, त्या दोघां खालावलेल्या राजपुरुषांची लाज व अवमान यांची जाणींव नाहींशी केली.

मांत्रिक गारुड्याप्रमाणें त्याच्या मनांत बंडावारूपी विषदंताची भीति होती, ती त्यानें कमी केली होती. त्या दोघां आप्तरूपी विषारी सर्पांच्या दाढांमधून त्यानें आपलें राज्य नुकतेंच सोडविलें होतें. तरी भोजरूपी सविष सर्पाचा दांत कायमच होता.

फार दिवस घर सोडून बाहेर राहिलेल्या मंत्र्यांनीं कंटाळून, राजाच्या इच्छेविरुद्ध, शत्रू कायम असतांना, जास्त परिश्रमाला भिऊन व उद्योग थांबवून राजाला चकविलें होतें.

भोज त्या कड्यावरून सोडवून आणला गेल्यावर त्या रिकाम्या घरांतच गुप्तपणें राहात होता. त्याला आपल्या दोघां आप्तांविषयीं कांहींच वर्तमान कळलें नव्हतें. २६७०.

राजस्थानीय मंत्री अलंकार, त्या डामराकडे येतां जातांना पाहून, त्याला दगा

होण्याचें भय पडलें. थोड्या दिवसांनीं राजाचें सैन्य तळ उठवून नगराकडे परत निघालेलें व त्याच्या बरोबर धंन्य व षष्ठचंद्र यांच्या मेण्यांशिवाय मध्यें आणखीहि एक मेणा चाललेला त्याला दिसला. पण दूर अंतरामुळें त्याला त्याच्यांत कोण होतें, तें कळेना. म्हणून त्यानें चौकशी करतां, सेवकानें कळविलें कीं ' आपसांत समेट होऊन लोठण व विग्रहराज याना ते लोक नगराला नेत आहेत. ' हें ऐकून त्याची स्वतःसंबंधीं भीति नाहीशीं झाली. पण त्या दोघांबद्दल त्याला कांहीं वेळ फारच तळमळ लागली.

फौज गेल्यावर त्या निर्जन जागीं जमलेले पक्षी मोठ्यानें शब्द करूं लागले व नदीच्याहि पाण्याचा आवाज होत होता, तो त्याला जणो दोघांच्यासाठीं चाललेला शोकशब्दच वाटला. पुढें, न जाणो हा डामर आपणालाहि राजाच्या स्वाधीन करील किंवा मी येथें आहे हे कळतांच धंन्य वगैरे परत येतील, असे भोजाला वाटलें पर्वतांतील निर्झराचा शब्द त्याला, आपल्याला धरून नेण्यासाठीं आलेल्या राजाच्या सैनिकांचाच शब्द भासूं लागला. कांही दिवसांनीं भर दुपारीं दाट अभ्रे आली व गडद अंधेर पडून मध्यान्हीला कृष्ण पक्षांतील मध्य रात्रींचे स्वरूप आले. पुढें वैशाखापर्यंत भूमीला पावन करीत, मेघमंडळ, यज्ञांत बर्फखंडरूपी अवदानें देत होतें. २६८१. नंतर एकदां तो डामर भोजाकडे आला आणि स्वतःला दोष देत म्हणाला. ' मजवर विश्वास ठेवून राहिलेल्याचा घात करून जणो मी स्वतःला अधम व निर्घृण बनविलें आहे. ' यावर, त्या वेळची परिस्थिती लक्षांत आणून, भोजानें आलेला राग गिळला व त्याची समजूत करीत संथपणानें त्याला म्हटले, 'आपली आप्त मंडळी व मुलें माणसे संकटांत पडलेली. त्यांच्या बचावासाठीं आपणाला निरुपायानें असे वागावें लागलें, याबद्दल आपणाला नांवें कोण ठेवील ? आपणाला दगाच द्यावयाचा असता तर, आपण मजवर दया कां करतां ? यावरूनच आपल्याला निरुपाय होता, हे उघड आहे. खऱ्या राजनीतीचा अवलंब करायचा तर, राजानें हर्षाच्या वंशजाप्रमाणेंच आम्हाला उच्छेद न करितां जवळचे व ताबेदार, केले पाहिजे. मी त्यांच्यापैकीं शेवटचा. मला मागे राखून ठेवण्यांत आपण मोठा शहाणपणा केला आहे. त्या योगानें आपला अवमान व नाश, त्या दोघांना क्रूरपणानें वागविण्यांत राजाकडून घडलें असतें तें पाप, वगैरेंचा आपण पूर्ता बंदोबस्त केला आहे.' हें त्याचें बोलणें ऐकून त्या डामराला, आपल्या शिरावरील एक मोठें व तापद ओझें उतरलेसे वाटलें व त्यानें भोजाची तारीफ करीत म्हटलें. 'वाः, आपण या संबंधांत माझे सर्वत्र व कायमचे साक्षि बनला.'

भोजानें त्याला ताबडतोब निघून जाण्याला परवानगी मागितली. तेव्हां ' हिमवृष्टि थांबतांच पाहूं.' असें सांगून, तो निघून गेला. पुढें भोजानें अन्न घेणें सोडलें. तेव्हां त्याला कोणीसें म्हटलें, ' हें त्या डामराला कळलें तर, आपण त्याच्यावर रागावला असें समजून, न जाणों तो आपल्याशीं पूर्ववत वागणार नाहीं. त्यावर त्यानें पुनः अन्नग्रहण सुरू केलें. २६९०. पण त्याला तें लोठण व विग्रहराज यांना विकून मोबदल्यांत आलेल्या-नर-मासांचे ग्रहण केल्यासारखें वाटून त्याची खंत आली.

त्या डामराने त्याला, आज, उद्यां, परवा, हिमवृष्टि थांबतांच, आपणाला रवाना करतों, अशा थापा देऊन दोन महिने चाळवाचाळवी केली. 'बर्फ वितळतांच मी येथे आहे असें ऐकून, राजा सैन्य पाठवील व हा डामर मला त्याला विकील,' असें वाटून भोजानें निघण्याची घाई केली. तो लौकर निघण्याची जीं जीं कारणें सांगे, तीं तो डामर खोडून काढून, त्याला राहविण्याचे कायम करी.

ओजस्वी-प्रतापी-अशा बलहराचा पुत्र राजवदन याची आई थोर व घराणदार होती. तरुणपणापासून तो काबळ्याचा पायघोळ झुब्बा घालीत असे. सुस्सल सिंहासनासाठीं लढत होता, त्या दिवसांत तो शूरवीराची खरी कसोटी लागण्याचें उत्तम साधन होतें. राजवदनानें त्याच्या फौजेच्या एका तुकडीबरोबर काम करून चांगला लौकिक कमविला. त्याचा बाप एक मंत्री होता. त्यामुळें पुढे त्याच्यावर राजाची कृपा झाली व त्यानें त्याला एवेनक वगैरे प्रदेशावर कामगार नेमलें. खुय्याश्रम येथील नाग याच्या खटपटीमुळें राजाची त्याच्यावर गैरमर्जी झाली. ( खुय्याश्रम=हल्लींचा खुय्योम परगणा, वोलूर-वूलर सरोवराच्या उत्तर तीरावरील खोऱ्याचा भाग. एवनक हा त्याच्या ईशान्येकडील एक लहानसा टापू होता.) याचा सूड उगविण्यासाठीं त्यानें भोजाचा पक्ष धरण्याचें ठरविलें. पूर्व सेवेच्या स्मरणामुळे त्याच्या हातून राजाचें तितकें उत्कट वैर होणार नाहीं, अशी लोकांची समजूत होती. तसेच तो स्वतः लवन्य डामर नसल्यानें, त्याला राजाची कसून विरोध करता यावयाचा नाहीं, असेंहि वाटत होतें. बंडाची उभारणी करीत असतांना त्यानें अलंकारचक्राला, भोजाला पाठविण्याबद्दल आग्रहानें सांगून पाठविलें. पण तें त्या डामरानें ऐकिलें नाहीं. २७००

तो लबाड व विश्वासघातकी डामर भोजाला जाऊं देईना. त्याला लाच देऊन भोजाला पकडण्याची व्यवस्था करविण्यासाठीं, राजानें राजस्थानिक मंत्री अलंकार याला धाडलें होतें. तो याच सुमारास येऊन पोहोंचला होता. त्याच्याकडे तो डामर जाऊं लागला. तेव्हां भोजानें त्याला निक्षून म्हटलें, कीं तुम्ही मला सोडून जाल तर मी प्राण देईन, पण त्यानें मी उद्या आपणाला भेटेन, असे ओझरतें उत्तर दिलें व तो निघून गेला.

त्याच रात्रीं पहाटच्या प्रहरीं भोज न कळत किल्ल्याबाहेर पडला, त्यावेळीं जोराचा पाऊस पडत होता. त्याच्यांतून तो कसा तरी मार्ग काढीत चालला होता. उजाडल्यानंतर तो गेल्याचें त्या डामराला कळलें. तसें त्यानें सेवकांसह निघून शारदामंदिरापर्यंत शोध केला, पण व्यर्थ. भोज मोठा स्वाभिमानी होता. त्याला दुरांद येथें, किंवा त्याच्याकडून सुद्धां जाणें योग्य वाटलें नाहीं. कारण लोठण व विग्रहराज यांची मुलें माणसें तेथें होतीं त्या दोघांबरोबरच कांहीं विचार योजून तो निघाला होता, तो विचार फसला. व उलट ते प्रतिबंधांत पडले, लोठणानें वृद्ध असूनहि पांच सहावेळ निदान प्रयत्न तरी केले होते. आणि आपण तरुण असून कांहींच केलें नाहीं. तेव्हां आपण निरुपयोगी आहों, असें लोक म्हणतील. अशा स्थितींत तिकडे जाऊन तोंड दाखविणें त्याला लाजिरवाणें वाटलें. त्यानें

दरदांचे सहाय्य घेऊन लढण्याचे ठरविलें व तो मधुमतीच्या काठाकाठानें त्याच्या देशाकडे निघाला. वाटेंत जागजागीं बर्फानें घट्ट जमलेल्या दगडांची-जणों यमदंष्ट्राच अशी-टोकें त्याच्या पायाला बोंचत होतीं. घनदाट अभ्रामुळे सूर्यप्रकाश लोपून, कालपाशासारखें गाढ तम पसरत असे कोठें कोठें वाहून येणारे बर्फाचें कडपे व पठार, हत्तीच्या कळपासारखे भासत होते. कांहीं ठिकाणीं धबधब्यावरून जोरानें फांफावात उडणाऱ्या झऱ्यांच्या पाण्याचे फवारे, शरशल्यांसारखें बोंचत होते. कोठें जोराच्या गार वाऱ्यानें त्याची त्वचा फाटत होती. तर कोठें बर्फावरून परावृत्त झालेलें रविकिरण, त्याच्या नेत्रांमध्यें रुतत व भेदीत होते. सपाटीवर एखादी खोल गर्ता न लागतां व उंचसखल भागांत, खात्रीचा मार्ग कसा मिळेल हीच, काळजी होती. कांहीं स्थळीं तो खालीं घसरत असतांना त्याला आपण वर चढतों आहों, असें वाटे.

याप्रमाणें त्या कडक व कष्टप्रद थंडीच्या दिवसांत, सहा सात दिवस सतत त्रास सोशीत, तो एकदांचा दरद देशाच्या हद्दीवरील एका खेड्याला पोंचला. (बर्फाच्छादित पर्वतावर चढून जातांना येणाऱ्या अडचणींचें यथार्थ वर्णन, या नात्यानें हे २७१० ते २७१५ श्लोक लक्षांत ठेवण्याजोगें आहेत.)

दुग्धघात येथील दुर्गपतीनें त्याची ती विपन्न स्थिती पाहून, त्याला गुप्तपणे स्वतःचे कपडे पाठविले व सामानसुमान दिलें आणि त्याचें चांगले आदरातिथ्य केलें. तसेच त्यानें विद्दसीह दूर होता त्याच्याकडे, दूताहातीं भोज आल्याचें सांगून पाठविलें त्यावर, विद्दसीहानें छत्रचामर, नोबती वगैरे राजकीय लवाजमा पाठवून, भोजाला द्रव्याची मदत केली, आणि किल्लेदाराकरवा त्याचे अभिनंदन केलें. नंतर भोज राजवाड्यात पोचून राजकीय थाटानें राहूं लागला.

पुढे राजवदनाकडून त्याचा पुत्र भोजाकडे आला व त्यानें त्याला आपल्या पित्याच्या पक्षाला मिळविण्याचा प्रयत्न केला. राजवदन व जयसिंह यांचा पूर्ता विरोध झाला होता व तो आपल्या शत्रूवर-राजावर-चांगलेच जाळे पसरीत आहे, असें भोजाला वाटलें तरी त्यानें हातीं धरलेल्या कार्याचें महत्व व आपल्या मनांतील तद्विषयक आशंका व्यक्त करीत, त्याचें म्हणणें मान्य किंवा अमान्य केलें, असें न दिसे, या तऱ्हेचें त्यानें त्याला उत्तर पाठविलें त्यावर राजवदनाने निरोप पाठविला कीं, 'मी अद्यापि राजाच्या पक्षाचा व मंत्री आहे, किंवा त्याचा माझा बिघाड झाला आहे, तें योग्यवेळीं आपणाला कळेल तेव्हां आपली मजबद्दल खात्री होईल.' पुढें आपला दृढ निश्चय भोजाला कळून येण्यासाठीं त्याने कांहीं गृहकलहावरून नाग वगैरेंशीं युद्ध सुरू केलें. त्या गृहकलहांत नागाचा कांहीं दोष नाहीं, असें राजाने ठरविलें होतें. पण राजवदनानें त्याची पर्वा केली नाही. तो धीर व शूर होता. प्रारंभीं साधनसंपत्ती नसतांनाहि तो हळूं हळूं प्रबल व नागाच्या तोडीचा झाला व पुढें त्याच्याहून वरचढ झाला. तेव्हां खुद्द नागाच्या आप्तांनाहि त्या विलक्षण साहसी पुरुषांची लौकरच नोकरी पतकरण्यांत दिक्कत वाटेनाशी झाली. औदार्य, क्षांति, साधेपणा, निगर्वीपणा, निर्लोभता, वगैरे अनेक सद्गुणामुळें लौकरच त्याची भारी ख्याती झाली. तो नुकतांच पुढें

येत असूनहि, एखाद्या पुराण्या व प्रबल प्रभूप्रमाणें पुष्कळसे लोक त्याला अनुकूल झाले. पृथ्वीहरादिकांजवळ विपुल साधनसंपत्ती असल्यामुळे त्यांना धैर्य प्रगट करतां आलें यांत नवल नाही. पण सहायसंपदाहीन अशा राजवदनानें, इतका उत्साह व कर्तबगारी दाखविली याबद्दल त्याची तारीफ करावी तितकी थोडी आहे.

नंतर राजवदनानें पुष्कळसे दस्यू जंगली व घोषिक ( काश्मीरच्या उंच पहाडावर राहणारे गुजर लोक. ) वगैरे जमवून कांहीं गांव कबजांत घेतले व तो भोज आपल्या लोकांसह येण्याची वाट पहात राहिला. मंत्र्यामधील परस्पर चुरस व लुटीची लालूच, यांच्यामुळें दुसरी डामर मंडळीहि उद्दाम झाली. लोठण पकडला गेल्यावर त्याची बंड करण्याची इच्छा निर्मूल झाली होती. तिला आतां नवी टवटवी आली व शेकडोशें शाखा फुटल्या.

त्रिल्लक व जयराज हे राजाच्या कृपेंतले होते. तरी त्याना या गडबडी व कट यांच्यातून वेगळे राहतां येईना. २७३०. बुबडांना गर्ता, सर्व रोगांना क्षय, असुरांना नरक आणि नक्रतिमिंगलादिकांना सागर, हें एकेक ठरीव सम्मीलनाचें स्थान असतें. तसा धूर्त व कपटी त्रिल्लक हा सर्व डामर-दस्यू एकत्र मिळण्याचें केंद्रस्थान होता त्यानें युक्तीनें द्वेवसरस प्रांतांच्या अंमलदाराला मिळवून घेऊन बंडाला प्रारंभ केला. तसे तिकडील ब्राह्मणांनीं आपल्या जमीनी कायम राहाव्या म्हणून प्रायोपवेशन चालविलें. पण राजानें आपल्याला यावेळीं सर्वच डामरांचा उच्छेद करतां येणें शक्य नाही, असे त्यांना म्हणून पाहिलें. ते त्यांनी मानलें नाही म्हणून त्यानें त्या ब्राह्मण संघाचें म्हणणें कबूल करून डामरांवर स्वारी करण्याचें ठरविलें त्याप्रमाणें तो निघणार, इतक्यांत बंडवाल्यांतील प्रमुख जयराज हा काळपुळीनें मरण पावला. याप्रमाणें प्रबळ राज्यातील एक शत्रू कमी झाला. नंतर राजानें ब्राह्मणांना खुष करण्यासाठीं तिकडेच स्वारी केली. तसेंच, दुसऱ्या मंत्र्यांनीं तिकडील ब्राह्मणांना चिथविल्यावरून, त्यांनीं आग्रहानें विनंति केल्याप्रमाणें, राजानें, मंत्री अलंकार याला कामावरून दूर करून, त्या ब्राह्मणांना खुष केलें. ते ब्राह्मण भारी दुराग्रही व अविश्वासू होते. डामर लोक संकटें पैदा करीत तेव्हां अलंकार त्यांच्याशीं तडजोडीनें समेट करीत असे. पण त्याच्या प्रतिस्पर्धी मंत्र्यांना, यामुळे त्या दुष्ट डामरांना दांडगाई करण्यास उत्तेजन मिळतें, असे वाटे. 'तोतयाचा उच्छेद केल्यानंतर त्रिल्लकचें उन्मूलन करतो,' असे आश्वासन देऊन, राजानें त्या ब्राह्मणांचें प्रायोपवेशन उठविलें, तेव्हां त्रिल्लक भ्याला. गुप्तरोग प्रगट न होतां इतर रोगांना उत्तेजक होतो, तद्वत त्यानें अनेक अपकृत्यांच्या द्वारें राजाला त्रास देण्याला प्रारंभ केला. २७४०.

राजानें जयराजाची जागा त्याचा धाकटा भाऊ यशोराज याला दिली. त्याच्यावर त्रिल्लकाच्या सूचनेवरून राजकानें हल्ला करून, त्याला वेढा घातला. त्याच्या मदतीला संजपाल आपल्या थोड्याशा लोकांनिशीं गेला. पण ते सैनिक कमी असल्यानें त्याला यश

मिळण्याची शंकाच होती. हें ऐकून रिल्हणानें नेटानें लढून विजयश्रीचे कटाक्ष स्वतःकडे ओढून घेतले. मंदराचलानें सागराचा क्षोभ केला, त्याप्रमाणें त्यानें शत्रुसैन्यरूपी समुद्राचें मंथन केलें. नंतर संजपालरूपी मेघानें विकिर शत्रुरूपी जललव सहज टिपून घेतलें.

राजकाचा पराभव होऊनहि, लहान मुलाला एकांत स्थळीं राहावत नाहीं, त्याप्रमाणे यशोराजाला एकट्याला त्या देवसरस प्रांतांत, टिकून राहतां येईना. राजाचा भोजाशीं चाललेला झगडा लौकर आटपूं नये, म्हणून त्रिल्लकानें लबाडानें व हरप्रयत्नानें राजाकडून उशीर होईल अशी तजवीज चालविली व साळू आपलीं कांटेदार पिसें एकदम उभारते, त्याप्रमाणें चोहोंकडून, पूर्वीच गुप्तपणें तयार करून ठेवलेल्या शत्रूंची एकदम उठावणी करविली. याच सुमारास राजानें प्रतिबंधांत ठेवलेला पृथ्वीहराचा पुत्र चतुष्क आणि कोष्ठकाचा धाकटा भाऊ, हे कैदेतून निसटून त्रिल्लकाकडे गेले. तो त्यांचा मासरा होता त्यानें त्यांच्याबरोबर बरेचसे डामर देऊन त्यांच्याकडून शमाला प्रदेशावर स्वारी करविली. कुरर पक्ष्याच्या आवाजासरशीं मासे पाण्यावर येतात, तसे त्याची इशारत मिळताच दडलेले डामर एकदम उठले. २७५०. उचंबळणाऱ्या सागराला किनाऱ्यावरील पहाड रोकून धरतात, तसें षष्ठचंद्रानें त्या उद्दाम राजवदनाला अटकाविलें होतें. बर्फाच्छादित पर्वतशिखरावर उन्हाळ्यांत कधी गाळ व कधी बर्फ दिसतें, तसें त्या उभयतांची सैन्यें कमी जास्ती होत होती.

षष्ठचंद्राचे धाकटे बंधू जयचंद्र व श्रीचंद्र राजाच्या पदरीं वेतन पावत होते राजानें त्याचा अनादर केला होता. त्याची पुनः कृपा होण्याची किंवा षष्ठचंद्राकडूनहि कांहीं उपयोग होण्याची त्यांना उमेद नव्हती. षष्ठचंद्रावर त्याच्या उत्तम कामगिरीवरून राजा चांगली कृपा करीत होता तरी ते दोघे पळून जाऊन राजवदनाला मिळाले.

पूर्वीच्या राजांनीं भूतेश्वराला बहुमोल भेटी चढविल्या होत्या व तेथें पुष्कळ संपत्ती सांठलेली होती तिच्या लालचीनें राजवदनानें पुष्कळसे खाशक लोक, पहाडी आड मार्गानें, पाठवून तें मंदिर लुटविलें त्यावेळीं त्या राज्याची भारी दुर्दशा झाली होती. सर्वत्र अराजकता होऊन, चोरापासून प्रजेचें रक्षण करणारा कोणी त्राता नव्हता. दुर्बलांना प्रबल लोक नाडीत व मारीत होते. सेनापती उदय व रिल्हण यांना चतुष्कावर जाण्यास सांगून राजा उदास होत्साता नगराला परत गेला. त्या दोघांनीं चतुष्काला दाबांत ठेवलें. पण दुसाध्य रोग चांगल्या औषधानें दबला तरी, निस्तोष होत नाहीं, तसें त्यांना त्याचा पूर्ता नाश करतां येईना. शिवाय रिल्हणाच्या सैनिकांनीं टाळाटाळी चालविली. तिच्याकडे त्यानें काना डोळा केला. यामुळें त्याच्या नावाला बराच बट्टा लागला. २७६०.

भोज आल्याचें कळतांच विद्दसीहानें उत्तरेकडील पुष्कळशा सरदारांना बोलावणें पाठविलें. त्या अन्वयें कुबेर पत्न्यांच्या क्रीडा पाहणारे व किन्नर नगरांतील गीतध्वनीच्या प्रतिध्वनींनें दुमदुमणाऱ्या गिरिकंदरांत राहाणारे आणि वालुका सागराच्या अलीकडील आत्यंतिक शीताचा अनुभव येत असलेल्या भागांत राहणारे व पहाडी शीतल वायूनें

उत्तर कुरूंना आनंद देणाऱ्या हिमालय पर्वताच्या अनेक खोऱ्यांत राहणारे म्लेंच्छ सरदार, आपापल्या स्वारांसह सारा देश व्यापीत, त्या दरद राजाला येऊन मिळाले. तोंवर दुसरे मांडलिकहि चोहींकडून भोजाजवळ हजर झाले होते. त्यांतील कांहींची भाषासुद्धां इकडे कोणाला समजत नव्हती. ते पर्वतावरून उतरून आलेले लोक ममतेनें वागविल्यानें माकडाप्रमाणे माणसाळून जात. त्यांना पाहून भोजाला भारी आनंद झाला. तसेंच राजवदनानें पाठविलेले जयचंद्र व इतर काश्मीरी वकील लोकहि येऊन पोंचले. (कीर लोकांचा उल्लेख बृहत्संहितेंत काश्मीरी आभिसारख व दरद या लोकांबरोबर आलेला आहे.) भोजाजवळ खजीना पुष्कळ होता. त्याच्यांतून तो स्वतःच्या व बलहरासारख्या दूरच्या लोकांनाहि मदत करीत होता.

याप्रमाणे स्वतःच्या हिमतीवर उभारलेलें हें बंड चांगले फैलावून रूपाला आलें. तेव्हां राजवदन मोकळेपणीं भोजाच्या भेटीला आला. त्याभेटींत परस्परांच्या बेतांचा खुलासा होऊन अविश्वास नाहींसा झाला. २७७०.

शत्रूशीं तात्काल सामना करण्याजोगी आपली तयारी आहे असें भोजाला वाटत नव्हतें. पण दरद राजाची वाट न पाहतां, त्याच्या पुढें आलेल्या थोड्याशा स्वारानिशींच ऐटीनें लढाई मारण्याचा राजवदनाचा विचार होता. त्याला भोजानें म्हटलें, शत्रूनें आपल्या या पहिल्याच तडाक्यांत न कच खाल्ली, तर दोन्हीं सैन्यांची बरोबरी होईल, पण तसें न झालें तर आपला पराभव होऊन आपली जमलेली घडी विसकटेल. तेव्हां सर्व दरद सैन्य आल्यावर मिळूनच एकदम व निकराचा हल्ला करूं. म्हणजे जयापजयाचा तेव्हांच निकाल लागेल. पण राजवदनानें ही त्याची सल्ला फेटाळली आणि सर्व दरद सैन्य येऊन पोहोंचण्याची वाट न पाहातांच लढाई केली. त्याच्या मागोमाग भोजहि निघाला. तो घाटी पलीकडे पोहोंचला तोंवर त्याला दरद राजा आल्याचें कळलें. तसा तो त्याला भेटण्यासाठीं परतला व दुग्धघात किल्याकडे गेला. राजवदनानें आपली फौज मातृग्रामाला नेली. ( मातृग्राम=हल्लीचें ' मातृगोम, हे ब्रंदपोर खोऱ्यांत आहे व तिकडूनच गिलगनचा मार्ग आहे.)

षष्ठचंद्र जात्याच मोठा करारी व दृढनिश्चयी होता. काळबिटाच्या कळपांनीं चारी-दिशा व्याप्त कराव्या त्या प्रमाणें शत्रूचे स्वार चोहीकडे पसरले होते. तरी त्याचें धैर्य खचलें नाहीं. नीलाश्वाचे सारे डामर आणि सैनिक, शत्रूला मिळून त्याच्याचवर हल्ला करूं लागले. अशा बिकट संकटांत त्याच्या लोकांनीं त्याला मागें परतण्याविषयीं विनंति केली. तेव्हां तो म्हणाला, 'मला तोंड काळें करून अधोमुख होऊन महाराजांसमोर जावयाचें नाहीं. मल्लाच्या वंशजाची योग्यती नोकरी न बजावणारा या सूर्यवर्मचंद्राच्या कुलांत कोणीहि झालेला नाहीं. २७८०.

विद्सींह व त्याचे सरदार यांनीं भोजाचें बहूमानाचे स्वागत करून, त्याला सरदारांसह विजय मिळविण्यासाठीं रवाना केलें. तो स्वतः त्याच्या मागें एक मुक्कामावर राहून,

वाटेंत आणखीहि सैनिक भरती करित होता. त्यांच्यांतच पुष्कळशा म्लेंच्छ-मुसलमान-लोकांच्याहि टोळ्या होत्या. साऱ्या धरित्रीला कांपाविणारें तें भलें मोठें सैन्य पाहून भोजाला सारें राज्य जणों आपल्या हातीं आलें असें वाटलें. त्या सर्व सैन्यासह त्यानें समुद्रधारा येथें छावणी केली. तेथें लोकांना त्याची फार भीती वाटूं लागली. अशा प्रचंड व अजिंक्य फौजेचें आपल्याकडे आधिपत्य आहे, तेव्हां षष्ठचंद्र खास मृत्युमुखी पडणार, असें राजपद नालाहि वाटलें

पुढें जोराचा पाऊस पडून सर्वत्र जलमय झालें सारी भूमी, मद्याऐवजी पाण्यानें भरलेल्या प्याल्यासारखी दिसूं लागली. तिच्यावरील वृक्षाचे शेंडे तेव्हढे नीलकमलासारखे पाण्यावर दिसत होते. षष्ठचंद्र असा महत्संकटांत सांपडल्याचें ऐकून, राजानें उरलेल्या फौजेसह, द्वारपती उदय व धंन्य यांना त्याच्या मदतीला पाठविलें. त्यांना वाटेंत नदी आडवी आली. तेव्हां शैनेय-सात्यकी-आणि वायुपुत्र भीम, यांनी धनंजयाच्या मदतीला जातांना धरलेल्या मार्गाचा त्यांनी स्वीकार केला व ते एका पायवाटेनें निघाले. त्यावेळीं साऱख्या विजा चमकत होत्या. भयंकर गडगडाट होत होता. वरती ओथंबलेले मेघमंडळ, व खालतीं भूमी, दोन्हीं त्या विजांच्या योगानें जणों शिवून टाकली जात होती. दृष्टी पोहोंचे तेथवर सर्व जलमय झालें होतें. २७९०.

त्यावेळीं राजाजवळ नुसता पोषाखी लवाजमा होता. सैन्याची व त्याची ताटातूट झाली होती.

राजवदनाचा खरेपणा आणि धैर्य यांचा त्रिल्लकाला विश्वास नव्हता. म्हणून त्यानें भोजाला त्याच्या ताब्यांत न देण्याविषयीं दूरदांना सांगून पाठविलें आणि त्यानें स्वतः पृथ्वीहराचा पुत्र चतुष्क याची मदत केली. त्याच्या किंवा राजवदनाच्या सैन्यामार्फत तो भोजाला हातीं आणूं इच्छीत होता. यावेळीं भिंतीच्या आधारावाचून चित्रकर्म रचना करण्याप्रमाणें बलहर-राजवदन-याची प्रचंड शक्ती झालेली होती.

तसेंच चोहींकडून शत्रूचा दबाव पडल्यामुळें राजाच्या सैन्याची चोहींकडे फांकाफांक झालेली असून तो चांगलाच अडचणींत आहे, हें त्यांच्या लक्षांत आलेलें होतें. त्यांच्या नीचपणाला सीमा नव्हती. एखाद्या मोठ्या थोरल्या व एकदम सर्व पिसें उभारणाऱ्या साळूप्रमाणें, त्यानें यावेळीं राजाला भयप्रद असा आणखीहि एक स्वतःजवळ फार दिवस बाळगलेला बगलबच्चा कंटक बाहेर काढला. पृथ्वीहराचा पुत्र लोठक याला त्यानें सैनिक व समरसामग्रीचा चांगला पुरवठा करून दिला. सायंकाळीं घनदाट मेघमंडळामुळें आलेल्या गर्द आंधेरांतच धुळीचा प्रचंड लोळ उठावा, त्याप्रमाणें तो लोठक, पुष्कळशा डामरांसह शूरपूर येथें एकदम राजाच्या सैन्याच्या दोन्ही विभागांच यादरम्यान येऊन दाखल झाला त्याची चिकाटी जबर होती व तो पुराणा व मुरलेला कारस्थानी होता. राजानें त्याचा कुटुंबघात केलेला असल्यामुळें, तो त्याचा बद्ध वैरी झालेला होता. राजा

अडचणींत फसलेला पाहतांच, तो होईल तितकी विरुद्ध खळबळ उठविण्याला तयार असे. पूराच्या पाण्याच्या लोंढ्यानें तलावाचा बांध फुटतो, त्याप्रमाणें त्याचें फार दिवसांपासून तुंबलेलें कारस्थान व वैर, यावेळीं बाहेर पडलीं. २८००. क्षीराब्धिशायी श्री विष्णूच्या उदरांतून हें दृश्य जगत बाहेर येतें, त्याप्रमाणें त्या वर्षाकाळीं जमा झालेलें त्याचें सैन्य जणों एकाएकीं बाहेर पडलें.

या सुमारास पिंचदेव हा शूरपूरच्या दुर्गावर अधिकारी होता. त्याच्याजवळ शत्रूच्या फौजेची गणती करण्याला सुद्धां न पुरण्याइतके थोडेसे सैनिक व इतर लोक होते. युद्धाचा सरंजामहि बेताचाच होता तरी त्यानें लढाई केली व लोठणाचे पुष्कळ लोक मृत्युमुखीं व नदींत पाडले. नदीतीरावर चिता पेटविल्या होत्या. त्यांच्या प्रतिबिंबाच्या रांगांच्या रांगा पाण्यांत दिसत होत्या. त्यांच्या द्वारें जणों बुडून गेलेल्यांना अग्नि दिला जात होता. लोठण, दिवसभर, मरणाची पर्वा न करितां लढला. पण व्यर्थ. दुसरें दिवशीं त्याच्या मित्रांनीं मोठ्या मिनतवारीनें त्याला परतवून वीराण अशा शूरपुराला नेलें. तेथें तो पुनः सैन्याची जमवाजमव करीत असतांना, आपण दोन चार दिवसांत सहज जाऊन नगर घेऊं असें त्याला वाटत होतें. त्याचा विचार पद्मपुरावरहि हल्ला करण्याचा होता. पण यशोराज व सेनापती हे त्याच्या पाठीवर होते म्हणून त्रिल्लकानें तो विचार रहित करविला. सारे लवन्य लोठनाच्या आज्ञेत होते. तरी तो होलदावाला डामर, त्रिल्लकाविरुद्ध एकटा असल्यामुळें त्याला हल्ला करतां येईना.

सुस्सल राज्याकरितां लढत असताना सुद्धां या राज्यावर अशी आपत्ती आली नव्हती.

यःकश्चित पादरोगाप्रमाणें चतुष्काची तूर्त उपेक्षा करून, गलरोगाप्रमाणें घातक, अशा लोठणाचा प्रतिकार करण्यासाठीं, राजाने रिल्हणाची रवानगी केली. २८१०. प्राग्ज्योतिषाच्या राजाला मारण्यासाठीं निघालेल्या पार्थाला संशप्तकांनीं मार्गांत अडविलें होतें. त्याप्रमाणें शत्रूनें रिल्हणाचा पिच्छा पुरविला. पण कमलयुक्त सरोवराकडे चाललेला गज, मागें लागलेल्या मधुपांना उडवून टाकतो, त्याप्रमाणें तो मागें उलटून त्या शत्रूंना धुडकावून देत, लोठणावर चालून गेला. वाटेंतील झगडयामुळें थकून तो रामशा येथें विश्रांतीसाठीं राहिला. जवळच एक ओढा होता. त्याचें पाणी जोरानें वहात होतें. त्याचा आवाज जणों युद्धाला सज्ज होणाऱ्या शत्रूच्या रणवाद्यांचा प्रचंड ध्वनीच भासत होता. सकाळीं तो कल्याणपुराकडे चालला असतांना, लोठण त्याच्यावर हल्ला करण्यासाठीं येत होता. त्याची फौज थेट क्षितिजापर्यंत पसरलेली दिसत होती. त्याचे पायदळ माऱ्यांत पोचतांच लोठणानें, पुढें आलेलीं बकरीं गिळून टाकणाऱ्या अजगराप्रमाणें एकदम जणो दृष्टिपातानें त्याचा फडशा चालविला. वावटळींतलि झंझावातानें झाडांचीं पानें गळतात व उडून जातात, तशीं त्या हल्ल्यापुढें रिल्हणाच्या पायदळाची दशा झाली व त्याला सोडून, त्याच्या डोळ्यादेखत पळून जाण्याला सुद्धां त्याला लाज वाटली नाहीं. स्वजीवित निरपेक्ष कर्तव्यपरता क्वचितच कोठें आढळते.

मागें परतलेल्या मित्रांनीं रिल्हणाला यावेळीं माघार घेण्याविषयी म्हटलें. त्यांना आपली उत्कट स्वामिभक्ति व्यक्त करीत त्यानें उत्तर दिलें, ' नोकर असून कर्तव्यांत चुकेल त्याला धिक्कार असो. पुष्करिणीमध्यें प्रथम नील व नंतर श्वेत कमलें यावीं त्याप्रमाणें राजाच्या चरणसेवेंत माझी काळी दाढी पांढरी झाली आहे. तें चरण म्लान झाले तर लक्ष्मीचे विलास व कटाक्षरूपीं मधुपांचें चंचल भ्रमण हास्यास्पद होणार नाहीं काय? २८२०. दैव विमुख झालें असतांना थोड्याशा परिश्रमाला भिऊन मागें फिरणें नामर्दाचें काम आहे, शूरवीराचें नव्हें. वस्त्रें काढतांच शरीराला शीताचें भय वाटतें, पण तीर्थस्नानानंतर अद्वितीय ब्रम्हानंद तुल्य सुख प्राप्त होतें. लढाईंत मरणाऱ्यांना प्रारंभींच काय ती खिन्नता वाटते, पण पुढें कैवल्यसुख-प्राप्तीसारखें समाधान होतें.' नंतर त्यानें एकट्यानेंच शत्रूवर चाल केली. सिंहाच्या नाक-पुड्यांतून निघणाऱ्या फूत्काराप्रमाणें फूं फूं करीत येणारे बाण त्याला लागूं लागले. त्याची तरवार त्या समरभूमीवर प्रचंड लाटेसारखी तळपली. तिच्या सोनेरी मुठीच्या चमकीमुळें तो हरताळानें रंगविल्यासारखा शोभत होता. तृणमणि तृणाचें आकर्षण करितो ( तृणमणि बहुधा अंबर असावें, तें घासल्यावर काडीचें आकर्षण करितें.) तेव्हां ती येऊन त्याला चिक-टतात. तसें त्याच्या तरवाररूपी जाळ्यांत शत्रूचे प्राण येऊन फसत असत. त्याचें सैनिक शत्रूला पशूसारखें वाटून ते त्यांचें प्राणरूपी गवत भराभर खाऊन टाकीत होते. असा तो वीर जणो मृत्यूच्या मुखांत शिरलेला, तेथून एकाद्या मोठ्या मासानें तोंडांत पाणी घेऊन तोंड मिटल्यावर तें कल्ल्यांतून बाहेर टाकतो, तद्वत तो कोठूनसा व कसा तरी बाहेर पडला. पुष्कळ वेळ सारखे हल्ले केल्यानंतर, तो थोडा वेळ विश्रांतीसाठीं एकीकडे झाला व तेथूनहि, बहुतेक सैनिक पडले असतांना शत्रूवर उद्दाम व तिरस्काराची दृष्टी टाकीत होता.

पुढें दुसरी एक मोठी फौज घेऊन चतुष्क तेथें आला व त्यानें त्याच्या पिछाडीवर हल्ला केला. ते लोक आपल्याच मदतीला येत आहेत असें त्याला वाटलें होतें. २८३०. असा दोन्हीकडून मारा झाला तरी न कचरतां, मोराला दुतोंड्या सांप पाहून आनंद होतो, तशी त्याला अधिकच वीरश्री चढली. तो शत्रूंना केव्हां पाठ तर केव्हां तोंड दाख-वींत लढत राहिला. समुद्रमंथनसमयीं मंदराचलानें समुद्राच्या कुक्षीचा क्षोभ केला होता, तशी त्यानें त्या दोन्ही सैन्यांची त्रेधा उडविली. तो घोड्यावर स्वार होता. तो त्या दोन्ही सैन्यांमध्यें साळ्याच्या भिंगरी-शरल-प्रमाणें सारखा मागें पुढे फिरत राहिल्यामुळें, तीं सैन्यें खिळल्यासारखीं स्तब्ध राहिलीं होतीं एखाद्या बेटावरील गुहेचें तोंड, एकीकडून येणाऱ्या पाण्याचा लोंढा खेंचून घेतें, त्याप्रमाणें एका फौजेचा मारा भास यानें संभाळला होता. त्याच्या उत्कट शौर्यापुढें स्त्रियांच्या कर्णभूषणभूत कुंडलांप्रमाणें शत्रूचीं शस्त्रें कांपत होतीं. व त्यांना पुरुषार्थ दाखविणें अशक्य झालें होतें.

त्यावेळीं शत्रूचीं पांढरी पडलेली व घर्मजलानें डवडवलेलीं मुखें रूपी जलपूर्ण पात्रांनीं, तो जणों राजावर पुनरपि अभिषेकजलाचा वर्षावच करीत होता. रात्रभर रिल्हण व लोठक, हे मांत्रिक व वेताळ, यांच्याप्रमाणें एकमेकांच्या मर्मासाठीं सारखे टपलेले होते.

दुसरे दिवशी रिल्हणाने शत्रूची फौज जवळच्या जंगलांत पळवून लावली व मदतीला आलेली राजाची फौज केवळ तमासगीर बनली. तिसरे दिवशीं संजपाल त्याला येऊन मिळाला. त्याला त्रिल्लक वगैरेंचा नीचपणा माहित होता. राजाच्या प्रतापाग्नीमुळें पूर्वी धुणलेला लोठकरूपी वृक्ष त्या दोघांच्या तावडींत सांपडून, ज्येष्ठ आषाढांत पार शुष्क होतो, तद्वत त्याची अवस्था झाली. २८४०.

उदयानेंहि वरचेवर झटापटी करून पावसानें चिताग्नी दबतो, पार विझत नाहीं, तसेंच त्या तुरुष्कांना दाबांत ठेवलें होतें. पण त्यांचा पूर्ता पाडाव झाला नाहीं. नंतर पुष्कळ चसे दरद स्वार दर्पानें पहाडाच्या खिंडींतून लढाईसाठीं उतरूं लागले त्यांच्या घोड्यांवर सोनेरी साज होते. तुरुष्कांनी स्वारी केलेल्या साऱ्या प्रदेशावर अंमल बसविल्यावरून, सर्वत्र देश म्लेंच्छांनीं घेरून घेतला, असे लोकांना वाटूं लागलें. धंन्य व उदय हे एका मजली-वर मागे होते तेव्हांच, एकट्या षष्ठचंद्रानें शत्रूचा पहिला तरवारीचा तडाका अंगावर घेतला. पहाडी नाला दावानलाला पुढें वाढूं देत नाहीं, त्याप्रमाणें त्यानें त्या स्वारांना थोंपलें. आपली संख्या भारी आहे अशी शत्रूला घमेंड होती. पुढें वाढणें ठीक नाहीं अशी जयचंद्रादिकांची सल्ला होती, ती न ऐकतां ते रणांगणावर घसरले. षष्ठचंद्राजवळ पंचवसि तीसच स्वार होते. त्यांच्यासह त्यानें शत्रूहर नेटानें हल्ला केला व त्या हजारों स्वारांना धुडकावून लावलें. त्याप्रसंगीं त्याने गाजविलेलें शौर्य अतिमानुष कोटींतलें होतें. तो प्रत्ये-काला विश्वरूपधारण केलेल्या श्रीविष्णूप्रमाणें, समोर उभा दिसूं लागला. त्यांनीं भिऊन मस्तकें खोगिरापावेतो खालीं वांकविलीं व क्षणार्धांत पलायन करून ते किन्नराप्रमाणें जव-ळच्या पहाडांत लपले. रात्रीं जयचंद्र व राजवदन वगैरेंनीं त्या दरदांना म्हटलें कीं, 'तुम्ही इकडे अपरिचित असल्यानें व लबाडी झाल्यानें पराभव पावला, उद्यां आम्ही तुमचे म्होरके बनतों व विजय मिळवून देतों. २८५०. हे त्यांनीं वरवर कबूल केले पण आंतून ते पळून जाण्याची तयारी करीत होते.

राजवदनानें धंन्य व उदय याना दूरच रोंकून ठेवलें होतें. त्यांचा परत जाण्याचा मार्ग बंद करून, दरदांना जातां येऊं नये म्हणूनहि, त्यानें खटपट चालविली होती. पुढें त्यानें भोज व दरद यांची छावणी तारमूलक येथें ठेवण्याचें ठरविलें. तो या व्यवस्थेंत असतांना डामर लोक अंधळयासारखे चैनींत व खुषींत होते. हें पाहून भोजाला विश्वास वाटला व आपण सर्व राज्य कबजांत खास आणणार असें त्याला वाटलें. अद्यापि जयप्राप्ती व्हावयाचीच होती. आपणाभोंवतीं इतके सारे सरदार जमलेले आहेत, तेव्हां आपण खास जय मिळविणार, आपणावर दैवाची कृपा आहे, असें तो समजूं लागला.

सूर्यकमलांचें उन्मूलन करुन सूर्याचें शत्रुत्व करणाऱ्या हत्तीच्या दांतांशीं श्वेतपणामध्यें चंद्र स्पर्धा करतो. त्याचा उदय होतांच ते दांत आपोआप फुटतात. सूर्यप्रकाशाने तेजस्वी होणारे सूर्यकांत मणी स्वतः तापत नाहींत. पण दुसऱ्याला ताप देतात. आणी-बाणीच्या प्रसंगीं भाग्य किंवा आपत्ती दोन्ही अयाचित प्राप्त होऊं पावत असतात.

नाग हा डामर होता. त्याची भिक्षूच्या वेळच्या झगड्यांत उपेक्षा झाली होती. तो टिक्क वगैरेंचा आप्त म्हणून राजाच्या मतें तो राजद्रोही मंडळीचा शिरोमणी होता. राजवदन हा एक सामान्य गृहस्थ, अश्रुतपूर्व उत्कर्ष पावलेला होता. तो संकटसमयीं सतत स्वामीनें उपयोगीं पडत गेल्यामुळें, राजा त्याला विश्वासांतल्या मंडळींमध्यें प्रमुख मानीत होता. या बिकट प्रसंगीं या दोघांनींहि स्वार्थावर लक्ष देऊन, चमत्कारिक स्नेहभाव व वर्तन प्रदर्शित केलें. हें बंड आपण उभारावयाचें तें दुसऱ्यानें चालविलेलें पाहून, नागाला लाज वाटली. कोणी कवीला सुचलेल्या मनोहर काव्यविषयाचा, भलत्यानेंच उपयोग केलेला पाहून, त्या कवीला कसेसेंच वाटतें. तशी त्याची स्थिति झाली. २८६०. म्हणून त्यानें राजाचा शत्रु भोज, याला हातीं आणण्यासाठीं मोठी कळकळ दाखवीत, त्याला म्हटलें 'राजवदनाला सोडून आपण मजकडे यावें. त्याचा पुत्र पालखींत बसून आपणाकडे येई तों आपण तिष्ठत बसणें म्हणजे आपणाकडे येऊं लागलेल्या स्त्रीची वाट पहात रात्रिच्या गस्तीची अपेक्षा करीत राहण्यासारखेंच होय.' या त्याच्या बोलण्याचें अर्थातच हसूं झालें. कारण कामधेनू सोडून शेळीच्या गळ्याला कोण कवटाळील ? शत्रू किंवा मित्र बनतात ते स्वार्थापायीं. त्यांना दुसऱ्याचें प्रेम किंवा द्वेष यांची मुळींच पर्वा नसते.

हत्तींच्या दातांचें सौंदर्य आपणाला लाजवील या भीतीमुळेंच चंद्र त्या दातांना नुकसान पोंचवितो. मधुप हत्तींच्या गंडस्थळाला चिकटून राहतात ते तेथील मदस्रावाच्या लालचीनें. चंद्र हत्तीचा शत्रू आहे हें माहित असूनहि सूर्यकमलांना चंद्रापासून समाधान वाटत नाहीं. आपल्याला पोषक असा मधु देणाऱ्या कमलांचा हत्ती नाश करतो म्हणून मधुप हत्तींचें वैर करीत नाहींत.

पुढें राजवदनाला हाणून पाडण्यासाठीं नागानें राजाचा पक्ष धरला व त्याच्याशीं आमरण वैर चालविलें. त्यानें त्या पराभूत डामरांना सांगून पाठविलें कीं, ' राजवदन हा राजाचा खरा व उघड शत्रू नसून भोजाबरोबरच तुमचाहि नाश करण्याची त्याची इच्छा आहे.

प्रख्यात कंपनेश क्षेमवदन व विद्दसीह हे दरद राजाच्या सैन्याचे नायक होते. ते व किल्लेदार ओजस यांनीं मिळून गुप्तपणें हें नागाचें म्हणणें भोजाला कळविलें. भोज चतुर होता. त्याला याचें हसूं आलें.

नंतर त्या प्रभावशाली राजाचें तेजरूपी सैन्य, सूर्यकांतांतून पडणाऱ्या केंद्रीभूत किरणांप्रमाणें त्या विद्दसीहावर पडलें व त्याला इंधनाप्रमाणें जाळूं लागलें. राजाचें अहित चिंतण्याचें पापच जणों फळास येऊन, विद्दसीहाला क्षयरोग जडला व तो वद्य पक्षांतलि चंद्राप्रमाणें प्रत्यहीं क्षीण होत चालला. तो नेहमीं लढण्यांत अघाडीस असे व सैन्याच्या पिछाडीचा बंदोबस्तहि उत्तम ठेवी. तो असा आजारी पडलेला व छावणीवर हल्ला होण्याची भीति, त्यामुळें त्यांनीं दुसरे दिवशींच घोड्यावर स्वार होऊन पळ काढला आणि जव-

ळच्या पहाडी प्रदेशाचा आश्रय केला. ते पळाले त्यावेळी राजवदन जेवीत होता. त्याची सुद्धा त्यांनीं वाट पाहिली नाहीं.

त्यांनीं भोजाविषयींचा लोकांचा आदर पाहिलेला होता. सबब त्यांनीं त्याला 'आपण सकाळीं परत येऊं, आतां बरोबर चला' असें म्हटले व आग्रहानें बरोबर नेलें. त्यानें पूर्वी तीर्थजलावर शपत केली होती म्हणून, मर्जीविरुद्धच त्याला त्यांच्या मागें जावें लागलें होतें. पण सर्व बेत फसलेले पाहून तो कडयावरून पडलेल्या माणसासारखा सुन्न व वैतागलेला झाला होता. त्याला फार लाज वाटत होती. त्याचे डोळे मिटलेले असून, त्याच्या मस्तकाकडे मधून मधून जोरानें रक्त चढे, तेव्हां त्याचा चेहरा लालगुंज दिसे. तो पुनः घाण पाणी वहात असलेल्या जिन्याच्या पायऱ्याप्रमाणे दिसे. केव्हां तर त्याचा तो चेहरा आकाश कोसळतें कीं काय म्हणून भीतीनें भुइसपाटसा दिसे. त्याने विचार केला कीं, 'या राजाच्या अंगीं इतका थोरपणा असलेला, अनेकवार पाहण्यांत आला असूनहि, आम्ही मूर्खाप्रमाणें त्याला सामान्य माणसाप्रमाणें लेखतों. त्या आम्हां मूढांना धिक्कार असो. या महात्म्याच श्रेष्ठ वैभव व उज्वल प्रताप, यांचें यथार्थ वर्णन, कोणी प्रज्ञावान, प्रतिभासंपन्न, स्पष्ट व सत्यवक्ता, अशा महा कवीच्या डोक्यांतूनच कदाचित निघेल. त्याच्या प्रतापाग्नीचे प्रज्वलित स्फुलिंग या भूमीवर पडलें नसतें तर, आम्हीं तिच्यावर पाय ठेवतांच आमचें धैर्य असें एकदम कां नष्ट होतें? २८८०. त्याच्या प्रखर प्रतापाशिवाय युद्धाच्या धामधुमींत तरवारींच्या धाराबूचे पान होत असतांना, इतक्या शूरवीरांचे देह कसे शुष्क होते? त्याच्या प्रतापानलाच्या दाट धूमामुळे आलेल्या अंधकारावाचून उघडया डोळ्यांनींहि आम्हाला योग्य मार्ग कां दिसूं नये?'

पुढें तेथे पोहोचल्यावर दरदांनीं छावणी मधुमतीच्या पलीकडे करवून, तो तिच्या अलीकडे तिच्या तरंगरूपी पडद्याआड राहिला. थोडया दिवसांनी त्याचा उदासपणा कमी झाल्यावर दरदांनीं त्याला आपल्या छावणीत नेलें. त्यांचा द्रोह वाढतच चालला होता. त्यांतच भोजाला दगा देण्याच्या इच्छेची भर पडली. त्यांनीं अनेक थापा देऊन त्याचा विश्वास बसण्याची खटपट केली. राजानें त्याला आपल्या ताब्यांत बंदोबस्तानें राहूं द्यावें व या साठी त्या उदार राजाकडून चागलीशी नेमणूक मिळवावी, असा त्यांचा हेतू होता. त्याला आपल्याच हद्दींत ठेवण्याच्या नीच हेतूनें ते अधम त्याला म्हणाले, 'आतां लढाईचा मोसम नाहीं. हिंवाळा नजीक आला. चैत्रांत पुनः मोठ्या प्रमाणावर खूप सैन्याची तयारी करून येऊं. तुम्हाला स्वस्थ बसण्याचा कंटाळा आला असला तर आम्ही तुम्हाला भुट्ट देशाच्या मार्गानें प्रबल अशा त्रिल्लकाकडे पोंचवितों. कारण राजवदन राजाला मिळालेला आहे.'

ग्रीष्मांतील प्रखर तापद दिवसाहूनहि विरहाचे दिवस दीर्घ व कंटाळवाणे वाटतात. त्याचप्रमाणें लबाडी व विश्वासघात याच्यांत राजपुरीवाल्यावरहि या दरदांची ताण होती.

तो निघून गेलेला पाहून बलहर-राजवदनानें त्याला आपली अवस्था दोर तुटून

विहिरींत पडलेल्या माणसासारखी झाली असल्याचें दूताहातीं सांगून पाठवीत त्याला उन्हाणा दिला व नांवें ठेविलीं. २८९०.

त्यानें षष्ठचंद्राशीं खूप शर्थीनें लढाई चालविली होती. राजाची फौज येत असल्याचें व दरद राजा आणि भोज एकाएकीं पळून गेल्याचें ऐकूनहि तो घाबरला नाहीं. हेच त्याच्या अप्रतिम धैर्याचें उत्तम निदर्शन होय प्रबळ व खात्रीच्या सहाय्यकर्त्यांनीं अस ऐनवेळीं दगा दिल्यावर, या आतिमानुष वीराशिवाय दुसरा कोण असा धैर्यानें लढत राहिल असतां?

उदय व धंन्य यांनी त्याच्याशी समेट करण्याचा विचार चालविला होता भोज परत येऊन मिळेल, व काहीं अवधीहि सांपडेल, या आशेवर त्यानें त्यांना उमेदीवर ठेवलें होतें. पुढें अलंकारचंद्रानें दरदाकडे जाऊन आपल्या आप्तपणाच्या सबबीवर त्याच्याजवळ भोजाबद्दल भारी आग्रहानें मागणी केली. पण तिच्याकडे दरदांच्या पंचांनी दुर्लक्ष केलें इतकेंच नव्हे तर ते त्याच्या विरुद्ध झाले. हें पाहून तो व त्याचे बहुतेक तरुण अनुयायी यानीं त्यांच्या मार्गांतील बलहारी नांवाच्या नाल्याच्या पुलावर प्रायोपवेशन केलें. त्यावरून दरदांना भय वाटलें व त्याची कींव व दया आली. विरोधी पक्षांच्या छावण्यांमध्यें, त्य नाल्याच्या दोन शाखा पडल्या होत्या. त्यांतील पाण्याच्या लाटांच्या शब्दाच्या द्वारें तो नाला जणो त्या दरद सैन्याला धमकावीत होता. विड्डसिंहाच्या स्त्रिया व त्याचा मत्सर करणारे म्लेच्छ सरदार, तसेंच स्वतःच्या नाशाला भीणारे त्याचे सैनिक, यांनीं अवमान केल्यामुळे, विड्डसिंहानें भोजाला परत जाऊं दिलें. तेव्हा पुलावरील पाहारेवाल्यांस पळवून लावून व आपल्या रणभेरींच्या घोर व भीषण ध्वनीनें सारी छावणी दणाणवून अलंकारचंद्र पैलतीरावर गेला. २९००.

आपली फौज हलकी पडलेली पाहून विड्डसिंहानें तह करण्याच्या इराद्यानें राजाकडील एका वकीलाला बोलावून घेऊन त्याला म्हटलें, 'आपल्या महाराजाचा प्रताप अतिमानुष व दैवी आहे. तो कळण्यापूर्वी त्यांना कोणी सरहद्दीवरील सामंत समजून एखादा कोळीहि त्यांची स्पर्धा करील. त्याच्या कल्पनांतीत थोरवीच्या अनुभवावरून मी व जयराज ते पुढें प्रकट करण्यासाठीं मृत्यूच्या दारीं चालले आहों. अशा दैवी प्रभावशाली राजाच्य हातून पराभव पावणें सुद्धां विजयप्राप्तीच्या तोडीचें होय. एखाद्या तीर्थाचा तीर कोसळून प्रवाहांत पडून बुडालेला यात्रेकरू उच्च पदाला पोहोंचतो, तशीच माझी स्थिती झाली आहे.' पुढें तो लौकरच आपल्या गांवीं परत गेला व कांहीं दिवसांनी अवमानरूपी स्वागताच्या हारानें मंडित होत्साता यमपुरीला पोंचला.

त्याच दिवशीं राजवदनानें, भोज परत येत असल्याचें कळण्यापूर्वीच, धंन्य व उदय यांच्याशीं तह केला. तो त्यांच्याकडे घोडयावर बसून आला होता. त्याला निरोप देऊन ते दोघे थोर व विवेकी अशा षष्ठचंद्राच्या बरोबर राजाकडे पोंचले. त्यावेळीं विस्मरणानें किंवा स्वयंमन्यतेमुळें, भोज अद्यापि पराभूत व हस्तगत झाला नाहीं, हें त्याच्या लक्षांत राहिलें नाहीं.

रिल्हणाचें केव्हां अभिनंदन करीन, असें राजाला झाले होतें. त्याला त्यानें अनेकवार बोलावणें पाठविलें असूनहि, शत्रूचें निर्मूलन झालेलें नसल्यानें तो गेला नव्हता. एखाद्या आचाऱ्याला, त्यानें केलेला स्वयंपाक यजमानाला पसंत पडला असें कळेपर्यंत, अन्न घेणें प्रशस्त वाटत नाही. भीमाने जरासंधाचें शरीर चिरून टाकले, त्याप्रमाणे रिल्हणानें लोठक व चतुष्क याच्या सैन्यांना दुभागलें होते; यामुळें त्यांना काही करतां येत नव्हतें. खांडव वन-दाहांत अर्जुनानें तक्षकाला जखमी केलें, तेव्हां तो जाऊन आपल्या आईच्या उदरांत लपला. त्याप्रमाणें पराभव पावलेला लोठक आपल्या राज्यांत निघून गेला आणि कासव आपले हातपाय व डोके, आंखडून पोटांत घेतें त्याप्रमाणे चतुष्कहि दीन होत्साता प्रबल अशा त्रिल्लकाच्या आश्रयाला गेला. स्वत:च्याच पराक्रमाने त्या दोघांची अशी वाट लावून रिल्हण, राजाच्या चरणांगुलींचें नख किरणजालाचें शिरोभूषण मिळविण्यासाठीं त्याच्या-कडे गेला.

याप्रमाणे राजाच्या प्रतापाग्नीच्या प्रखर तापानें हा बंडाव्याचा वृक्ष सुकला असताना, मंत्र्याच्या नजरचुकीमुळें त्याला पुनः अंकुर फुटले. कारण राजवदनाला शासना-ऐवजीं इनाम व उत्तेजन मिळाले. त्याने भोज सुखरूप निघून येत असल्याचें कळताच, राजाकडून खंड-द्रव्य काढण्याच्या हेतूनें त्याला खाशक लोकांचें ठाणें—दिन्नाग्राम येथे ठेऊन, निरोप पाठविला कीं, 'आपण कालपर्यंत येता तरी उदय व त्याचे लोक माझ्या पाठलागांतून सुटतेना.' यावेळीं राजवदनाची स्थिति प्रवाहात पडलेल्या नावे-सारखी झाली होती. पण त्याला त्रिल्लकाची सल्लारूपी दोरी हातीं लागून स्थैर्य आलें. त्रिल्लक पहिल्या प्रतीचा नीच व कुटिल होता. राजाला यावेळीं पूर्तें खड्ड्यांत टाकतां येईल, असें वाटून, त्याने पुनः पुंडावा उठाविण्यांत पुढाकार घेतला. २९२०. अलंकार वगैरे मंत्री राजा जयसिंह याची समजूत करून, त्याला समाधानांत ठेवूं पहात होते, तरी त्यांचीं कारस्थानें बंद नव्हतीं. मन ताब्यांत नसेल त्याला आपला मूर्खपणा सोडतां येत नाहीं. रोग पिकेपर्यंत वैद्य त्याची उपेक्षा करीत असतात. त्याप्रमाणं राजानें यावेळीं त्याच्याकडे लक्ष न देता, इतर पिकलेल्या फोडाप्रमाणें बनलेल्या महत्वाच्या शत्रूंचा नायनाट करण्याची तजवीज चालविली होती.

आम्ही अडचणीत असलों तर मागून सहाय्याला यावें, असें भोजाला सांगून पाठ-वून अलंकारचंद्र बंडाच्या तयारीनें आनंदवाडाचा पुत्र जयानंदवाड वगैरे क्रमराज्यांतील प्रबल व शूर डामरांना घेऊन निघाला. त्याच्या सामन्याला राजगृह्य मंत्री अलंकार हा होता. त्याच्यापाशीं थोडेकेच सैनिक होते. तो त्या डामरांना, नदीच्या पूरापुढें सिकता सेतूसारखा विकिर वाटला. पण त्यानें त्यांच्याशीं युद्ध करून जणों रामचंद्र किंवा बलराम यांच्या पराक्रमाची आठवण करून दिली. बलरामाला मधुपान प्रिय होतें. त्याचा आपान मंडप रणभूमी होती. तेथें त्यानें असुरांसारखेच मधुपानरत व प्रमत्त अशा शत्रूंचा पाडाव करण्यांत आपलें कौशल्य प्रगट केलें. पानोत्सवाच्या उल्हासानें त्याला जसा कंप सुटे. तीच स्थिति यावेळीं अलंकाराची झाली होती. फार काय सांगावें, वायू कापसाची रास सहज

उडवून नेतो तशी त्यानें शत्रूंची भयंकर दिसणारी फौज तेव्हांच उधळून लावली. त्यानें एका बाणासरशीं आनंदवाडाच्या पुत्राला काक, गृध्र, कंकादिकांच्या भक्षस्थानी पाठविलें. दलदलींत दबणा फिरणारे तित्तरपक्षी व त्यांच्या मागें लागलेला पारधी यांच्याप्रमाणें उत्थानोन्मुख असा भोज व त्याला पकडूं पाहणारें राजाचें सैन्य, याचा प्रकार चालला होता. २९३०. तो पक्षी उडता पळतां थकतो, तीच अवस्था पारध्याचीहि होते. तो प्रत्यही शिकारींत त्याच्या मागें धावत असताना दलदलींत फसतो. अशा त्या पळण्याच्या व पाठलागाच्या दगदगीनें भोज फार थकला व त्रासला. तसेच त्याला हातीं आणण्याला उद्युक्त व उत्सुक झालेल्या राजाला नित्य नव्या अडचणी येत येत होत्या. भोज दिन्नाग्राम येथें होता.

इकडे राजवदनानेहि राजाला, 'काय हे चोर चाडाल पुनः डोकें वर काढणार की काय, असे म्हणावयास लावलें होते. डामर संघ तोडलेला पुनः जमून त्याने बऱ्याच नव्या नव्या व महत्त्वाच्या खटपटी चालविल्या होत्या. द्वारपतीनें नेटाने व जोराने हल्ले केले. त्याच्या पुढें त्याचा टिकाव लागत नव्हता, तरी त्याच्यामुळे राजपक्ष हळूं हळूं थकत चालला होता. त्या संघाच्या सहाय्यासाठीं व दुसरे डामर उठविण्यासाठीं भोज तिकडे पोंचला. अलंकारचक्रानें त्याच्याकडे जामिनीसाठीं बुद्धया माणसे पाठवून त्याला बोलाविलें होतें. तो आपल्या थकल्या भागल्या लोकांनिशीं दुसरे दिवशीं हायाश्रम ( हल्लींचे हायहोम. शारदा मंदिराच्या मार्गावरील द्रंगाजवळ आहे. त्याचा उल्लेख आईन ई अकबरीच्या दुसऱ्या भागांत ३६५ व्या पानावर आलेला आहे. ) येथें जाऊन त्याना मिळत असल्याची खबर उदयाला कळली. तसा त्यानें अलंकारचक्राशीं लटकाच समेट केला व भोज येत असल्याचें जणो माहितच नाही, असे दाखवीत, तो सहज भोजाच्या वाटेवर तारमूलक येथें तळ देऊन राहिला. भोजाला त्या सुमारास काही गडबड आहेसें वाटलें. तिचा नक्की ठिकाण लागेना. तरी त्यानें घाबरून घोडे कसविले. ही त्याची व्यर्थ भीति पाहून त्याचे अनुयायी हसूं लागले. पण तिकडे त्यानें लक्ष दिले नाहीं. २९४०. अलंकारचक्रहि त्याच्याच शोधांत फिरत होता. तोहि घाबरून दशग्रामी सोडून पळून गेला. ( दशग्रामी गोरा मूलकाजवळच एक गाव असावा. ) रात्र पडतांच प्रथम रणवाद्यें व नंतर सैनिकांचा गलबला ऐकूं आला. त्यावरून हल्ला येत असल्याचें दिसलें. भोज कोणाच्या लक्षांत न येतां अंधेरांत निसटला आणि अलंकार चक्र दुसरे दिवशीं निघण्याची तयारी करूं लागला. उदयानें त्या गांवाला आग लावली. तिच्यामुळे पहाडांतील वाटा स्वच्छ दिसूं लागल्या आणि भोज व त्याचे लोक यांना अंधेरांत वाट चुकावी लागली नाही. त्यांना आयतीच मदत झाली. इकडे डामर लोक समेट पाळीत राहिले होते. पण त्यांना हा प्रकार कळतांच, त्यांनीं तो समेट मोडला. भोज स्वस्थ राहिला होता. त्याने अलंकारचक्राशीं चाललेलें लढाईचें संधान कायम ठेवलें होतें. तिकडेहि त्याला खाण्यापिण्याची व आरामाची अडचणच होती आणि तृषेची भारी बाधा होऊं लागली होती.

नागराज वासुकी मंदराचलाशीं संलग्न होता तों पर्यंत, त्याला स्वस्थता कशी ती ठाऊक नव्हती. पुढें त्रिपुरदाहाच्या प्रसंगीं त्याला श्रीशिवाच्या धनुष्याची रज्जू बनावें लागलें व त्याच्या बाणांची आंच सोसावी लागली आणि सागरमंथनाच्या वेळीं और्वानलाचा दाह भोगावा लागला.

आपली खाण्यापीण्याची अडचण दूर करण्यासाठीं भोज, अलंकारचक्राच्या अंमलदारांच्या हद्दींत शिरला. तेथें, न जाणों पित्याच्या शिकवणीवरून, किंवा स्वतःच्याच बुद्धीनें, त्याच्या पुत्रांनी भोजाला पुनः पकडण्याचा प्रयत्न केला. तो निष्फळ करून भोज दुसऱ्या हद्दींत गेला. २९५०. त्याचा कोणाहि लवन्यावर आतां विश्वास मुळीच राहिला नव्हता. त्यानें शहाणपणानें, आपलें काम राजवदनाच्या हातानेंच पार पडले तर पडेल, असें जाणलें व तो दिन्नाग्रामाला परत गेला.

इकडे उदयानें सर्व शत्रू नाहींसे करण्याचा निश्चय केला होता. पण त्याला एकाएकीं नेत्ररोग झाल्यामुळें हल्ला करण्याच्या कामीं त्याचा निरुपाय झाला व त्याने शत्रूशीं समेटाचें बोलणें लावलें.

अलंकारचक्र आपल्या दोन्ही मुली भोजाला देणार होता. पण त्याचा पराभव झाल्यावर त्यानें त्या जयसिंहाचे पुत्र परमांडी व सुल्हण यांना दिल्या. द्वारपती उदय दुस्तर रोगानें ग्रस्त झाला होता. या मुळें त्याला शत्रूचें पारिपत्य करता येत नव्हतें, म्हणून त्यानें तहाचें बोलणें सुरू केलें.

अशा या महत्वाच्या वेळी प्रबल व शूर असा षष्ठचंद्र मूळव्याधीने अजारी झाला व निरुपाय होऊन पडला असतांना, त्याचे धाकटे बंधू जयचंद्र व श्रीचंद्र यांनीं उद्दामपणानें धुंडावा व लूटमार करून राज्याची खराबी मांडली.

त्रिल्लकानें लढाईच्या इरायानें इतर प्रबल लोकांशीं स्नेह वाढविण्याची खटपट चालविली आणि खुद्द राजाचें समेटाचें बोलणें ऐकिलें नाहीं. षष्ठचंद्र मेलेला व उदय रोगग्रस्त पाहून, राजानें या मोहिमेवर धन्याची योजना केली. तो तारमूलकावर चढाई करून गेला.

भोज पूर्वींच्या सहाय्यकर्त्यांपासून अलग झाल्यावर, दुसऱ्या कोणा प्रबल गृहस्थाच्या आश्रयाला जाऊन तेथें दृढमूल होईल, किंवा कोण्या दुर्गम स्थळीं जाईल, या भीतीनें राजानें त्याला हर प्रयत्नानें हातीं आणण्याचा प्रयत्न करण्याविषयीं धन्याला ताकीद केली. २९६०. पण या कुटिल नीतीचा परिणाम राजाच्या ध्यांनात न येतां, शेपटी तोडलेल्या सर्पाला बिळांतून बाहेर काढण्याच्या प्रयत्नाप्रमाणें, ती उलट त्याच्याच गळ्यांत आली.

सारी सत्ता राजवदनाकडे असून राजाच्या हातीं कांहीं नाहीं, हें पाहून, आंतर व बाह्य दरबारी नाराज झाले. राज्यकारभार आणि नरक, यांच्या मार्गांतील बिकट घाटयांमध्यें नेहमीं नानातऱ्हेचे पुष्कळसे खाच खड्डे असतात. त्या मार्गानें जाणाऱ्यांना अकल्पित भाग्यानेंच बाहेर पडण्याला सवड सांपडते. नाहीं तर ते त्याच्यांतच बुडून मरतात.

भोजाला स्वाधीन करण्याबद्दल राजानें बल्हराला म्हणतां, त्यानें उत्तर दिलें कीं, 'हल्लीं त्याचे खाण्यापिण्याचे हाल होत असून, त्याची स्थिति फार विपन्न आहे. तेव्हां न जाणों तो दुसरीकडे कोठें निघून जाईल.' त्यावर राजानें त्याच्याच मार्फत त्याच्या खर्चाची तरतूद करून दिली. हा कावा साधल्यावर बल्हरानें आपलें पाय पसरण्याला दुसऱ्याहि कांहीं युक्त्या काढल्या.

धंन्य सारखा ये जा करीत बल्हर वगैरेंशी समेटाची खटपट करीत होता. त्याचा लोकांना वीट आला. राज्यकारभाराचें पाऊल सारखें मागेंच पडत चाललें होता. त्याचा कांहींच ठाव ठिकाण व शेवट दिसेना. रहाटाच्या माळेसारखे धंन्याचें चक्कर चाललें होतें. त्याचें राज्यकारणपटुत्व तीक्ष्ण असूनहि उद्दिष्ट हेतू साधत नसे. फिरत्या चक्रावर नेम मारणाऱ्या सारखी त्याची स्थिती झाली होती. राजा जणों बुद्धिबळाचा डाव खेळत होता. त्यानें लोठण व विग्रहराज हे दोन मोहरे मारले असूनहि, त्याला तिसरा मोहरा-भोज-घेणें साधेना. तो गोंधळून गेला होता. पुढील डाव त्याच्या ध्यानांत येईना. २९७०.

डामर मंडळी आपसांतील भांडणे कशी तरी मिटवून, हिंवाळा संपण्याची वाट पहात होती. इकडे नाग आपल्या पक्षाचा फडशा पाडील अशी राजवदनाला भीति होती. म्हणून तो त्या प्रबल व शूर शत्रूचें नुकसान करण्याची तयारी करीत होता. शिवाय धंन्यहि सारखा जागरूकपणें वावरत होता. यामुळें राजवदनाला भिऊन व गडबडींतच राहावें लागे. त्याने त्या भोजाच्या संमतीनें धंन्याकडे सांगून पाठविलें कीं, 'तुम्ही नागाला स्वाधीन कराल तर मी भोजाला आपणाकडे पाठवितों.' त्यावेळीं धंन्य मोठ्या अडचणींत होता. त्याच्यावर, हा आणखी बोजा टाकून परभारें आपला शत्रू नाग याला कैद करविण्याचा हा त्याचा बेत धंन्याच्या लक्षात आला नाहीं. इष्टार्थ सिद्धीच्या गडबडीत राजे लोक योग्य मार्गाचा त्याग करतात, म्हणून त्यांच्या हातून अन्याय घडतात, हें कांहीं नवे नाहीं. सीताशुद्धीसाठीं, काकुत्स्थ रामचंद्रानें स्वार्थांध होऊन, सुग्रीवाशीं सख्य करून वालीचा अन्यायानें वध केला, तसेंच, सत्यसंध पांडव युधिष्ठिरानें राज्यलोभांध होऊन सत्यनिष्ठेचें व्रत सोडलें व तो स्वतःच्या गुरूच्या-द्रोणाचार्यांच्या-वधाला कारण झाला.

या प्रसंगी नाग तटस्थ होता, तरी राजानें स्वार्थाच्या पायीं त्याच्यावर हल्ला करविला. याबद्दल विवेकी लोकांनी राजाला फारशीं नांवे ठेवली नाहींत. कारण भिक्षूशीं चाललेल्या युद्धाच्या वेळेपासून, तो राजाच्या विरुद्धच वागत आला होता. पण भोजाला स्वाधीन करण्याची खात्रीची व्यवस्था होण्यापूर्वीच राजाने ही गोष्ट करविली, याबद्दल मात्र लोक नाराज झाले. कांहीं विशेष भावी फायद्याच्या दृष्टीनें राजाने बुध्ध्यां असें केलें असतें तर मात्र त्याची बुद्धि अतिमानुष होती, असें मानलें जातें. २९८०.

पुढें नागाला अद्यापि कैद करविलें नसेल अशा समजुतीवर भोजानें राजवदनाशीं आपलें बिनसलें आहे, असें दाखवीत नागाकडे निरोप पाठविला कीं, 'राजा आपणाला

राजवदनाच्या स्वाधीन करीत असला तरी त्याच्या ऐवजी तो मला राजाला सोंपणार आहे हें ऐकून नाग तटस्थ राहील, असें भोजाला वाटलें होतें.

षष्ठचंद्र मेल्यावर राजानें जयचंद्राला मिळवून घेऊन, त्याच्या मार्फत नागाला पकडून आणविलें.

राजानें नागाशीं मेळ केला तर तो आपल्या मंडळीचा घात करील या भितीनेंच भोजानें वरील निरोप धाडला होता. तो नाग मार्गांत असतांना त्याला पोंचला. तेव्हां त्यानें उत्तर दिलें, ' तुम्ही म्हणतां तें खरें. पण मला हे पकडून नेताहेत. तेव्हां माझा निरुपाय आहे. ' दुर्दैवाच्या प्रवाहात बुडत असलेल्याला तीरावरील माणसाचें बोलणें थोडेंच ऐकूं येत असतें ?

नाग प्रतिबंधात पडल्यावर त्याचे आप्त घाबरून त्या दुष्ट बलहराकडे गेले. त्यावेळीं तो फारच उद्दाम झालेला होता. त्यांना त्याच्याकडे नुसते पाहवेना. पुढें धंन्य व रिल्हण हे नागाला घेऊन त्याच्याकडे गेले. तेव्हां त्यांनें मनांतच हंसत म्हटलें, 'प्रथम नागाला स्वाधीन केलें कीं, भोजाला सोंपून देतों. तसे ते बुचकळ्यांत पडले. बलहर त्यावेळीं निर्धास्त व दुर्भेद्य स्थळीं होता. त्यांनी वेळेवर लढण्याचें साधन असावें म्हणून कांहीं सैन्य बरोबर आणलें होतें. त्याचा उलट बलहरालाच उपयोग झाला. २९९०. पर्जन्यवृष्टी, सारख्या लढाया, शिवाय नीच कामगार, वगैरेमुळें, ते दोघेहि मंत्री थकले व त्रासले होते. बलहरानें त्याना पुनः सांगून पाठविलें कीं, 'तुम्ही येथून थोडे दूर गेल्यावर मी तुमच्या इच्छेप्रमाणें करतों. तसें ते एका दिवसाच्या वाटेवर जावून राहिलें. तरी त्यानें टाळाटाळी चालविली. त्यामुळे मंत्र्याचा हेतु फसला. बलहर स्थिरबुद्धी व पक्का होता. हे गुण आजकालच्या शूरवीरांमध्यें क्वचितच आढळतात. ते मंत्री पूर्ता विचार न करतां लांबच्या प्रवासाचा त्रास सोसून, त्या बलहराकडे आलेले होते. म्हणजे धंन्याकडे लक्ष देऊन किंवा लोभाला बळी पडून, भोजाचाहि घात न करतां, बलहारानें मनांत विचार ठरविला कीं, या मंत्र्यांनी पूर्ता विचार न करतां नागाला माझ्या स्वाधीन करण्याला आणले असलें तरी, मी त्याला–भोजाला–त्याच्या जागीं कायम करणें अवश्य आहे.

नागाचा पुतण्या लोष्टक हा नागाशीं आंतून द्वेष करीत होता. नाग नसतांना हातीं आलेलीं संपत्ती कायम राहावी म्हणून, त्यानें धंन्य वगैरे मंत्र्यांना, नागाला मारण्याची सल्ला दिली. बलहराने आपणाला फसविलें या रागावर त्यांनीं मूर्खपणानें व्यर्थ नागाचा प्राण घेतला, याबद्दल राजाला त्याचे मित्र व शत्रू दोघांनीहि नांवें ठेवली आणि या वधामुळें सारे डामर भारी संतापले. ते डामर तसेंच नागाचे आप्त येऊन मिळाल्यानें बलहर अधिकच प्रबल झाला.

कोणी अकल्पित अडचणीमध्यें अनुचित कृत्य करीत असतांनाहि प्रबल विधी त्याचें तें कृत्य सिद्धीस नेत असतो. कोणी दरिद्री सारख्या व वाढत्या दारिद्र्याविषयी दीनवाण्या विचारात निमग्न व निराश होऊन मार्ग चुकुन जातां जातां अवचित एखाद्या कड्यावरून कोसळला तर, त्याचा प्राण जावा. पण त्याऐवजी, तो, कोणी तरी तेथें सांठवून ठेवलेल्या

गुप्त निधीवर जाऊन नेमकाच पडतो. त्याला इजा होते, पण त्याबरोबरच अनुकूल दैवाकडून त्याचें दारिद्र्य दूर होतें. ३०००.

मंत्र्यांनीं अविचाराने नागाला ठार मारविल्याचें कळण्यापूर्वी, भोज मोठ्या काळजीत होता. 'असा थोर व विद्वान राजा स्वार्थासाठी व ठरल्याप्रमाणें सर्व गोष्टी अमलांत येण्यापूर्वीच, असलें नीच कृत्य करील, हे संभवत नाहीं तरी त्यानेच ही गोष्ट करविली, तेव्हां न जाणो राजवदनहि लोभामुळें भिक्षूच्या बंडापासून चालू असलेल्या सर्व विश्वासघातांमध्यें व राजद्रोहामध्ये सामिल नसेल कशावरून ' असे भोजाला वाटलें.

पुढें त्याचें भय घालविण्यासाठीं खशांनीं रक्त शिंपडलेल्या कच्च्या चामड्यावर उभे राहून, तीर्थजलावर शपता घेतल्या व त्यानें आक्षेप घेतल्यावरून त्याच्यावरील पाहरे काढून टाकले. बलहर त्याच्याकडे पुढें एकटाच जाऊं येऊं लागला.

मंत्र्यांच्या अदूरदृष्टीमुळे सारा बेत फसला, तेव्हां राजा स्वतः पुन. त्याची जुळवा जुळव करूं लागला व त्यानें त्याकामीं संथपणानें परिश्रम चालविले.

वृक्षांची राई चैत्रमासात सांवरते, पावसाळ्यांत पूर येतो, आदरयुक्त वर्तनाने सभ्यपणा जास्त खुलतो परिचय व सहवास यानीं प्रथम दर्शनीं उत्पन्न झालेलें प्रेम पक्के होतें. ओजस्वीपणानें राजसत्ता दृढ व गुणकारी होतें निर्भय व सतत परिश्रम, यांनीच सर्वातिशायी पराक्रम कायम राहतो. त्याचप्रमाणे निष्फळ होत असलेले कृत्य जयसिंह देवाच्या हातूनच पुनः सुधारले जातें, हे खोटें कोण म्हणेल ? दुरवगाह व सर्व कांहीं वाहवून टाकणाऱ्या नदीच्या प्रवाहात उलटे पोहून पैलतीर गांठतां येत नाही. तसे दैव उलटें असतांना कार्यसिद्धी होत नाहीं. ३०१०. त्याचे शत्रू राजाला व्यर्थ लबाड व मूर्ख म्हणून नांवें ठेवीत होते. पण तो आपल्या सरळ वागणुकीने त्यांची खात्री करण्याचा यत्न करीत होता. भोजाजवळचे लोक, जें मागतील ते त्यांना पुरविले जाण्याची त्याने व्यवस्था केली होती. यामुळें सहजच भोजाच्या मनांत त्यांच्या विषयीं अविश्वास उत्पन्न होणार होता. सपाट नदीतीरावर सिंहाचा गंध येत असला तर, हत्तीला त्या नद्या जणो पेटलेल्या दिसूं लागतात. या वेळीं भोजाची स्थिति घरट्याभोंवतीं जाळे पसरलेल्या पक्ष्यासारखी झाली होती. त्या घरट्याला अनेक दारें असून कोणीकडून बाहेर पडलें तरी, जाळ्यांत सांपडावयाचें, म्हणून त्या पक्ष्यांची त्रेधा उडत असते. भोजाचा कोणावरच विश्वास नव्हता. राजाने सर्व मार्ग रोकले असल्यामुळें त्याला तेथून निघण्याची भीति वाटत होती व त्याला ऐहिक किंवा आमुष्मिक हिताचा कोणताच मार्ग सुचत नव्हता.

अधींच. अनेक आपत्तींनीं अंतःकरण व्रणित झालेल्याला पुनः होणारे दुर्दैवाचे आघात तीव्र दुःख देतात. कमल कोशगत मधुपांना चक्रवाकांचा विरहालाप अधिकच तापद होत असतो.

या सुमारास एक ब्राह्मण सहज भोजाला भेटला. त्याला जखमा झालेल्या होत्या

त्याच्यांत गोठलेलें रक्त तसेंच होतें. त्याचे केस विखुरलेले व तोंडाला फेस आलेला असून, तो मोठ्यानें शोक करीत होता. भोजानें विचारल्यावरून त्यानें कळविलें कीं, त्याची ती अवस्था बंडखोर डामरांनीं केली व त्याचें सर्वस्व लुटून नेलें होतें. भोजाकडून कांहीं सहाय्य होणें शक्य नाहीं. असें पाहून त्यानें त्याला पुष्कळसें दूषण दिलें. भोज अधींच दुःखी व त्रस्त झालेला, त्याला त्याची दुर्दशा पाहून क्षतावर क्षार पडल्यासारखें झालें. त्याचें समाधान करीत तो म्हणाला, 'हे ब्राह्मणा, यावेळीं मी इतका विपन्न व कष्टी आहे कीं, तुझ्या या निंदेपेक्षां मला तुझ्या सहानुभूतीचीच अधिक गरज आहे.' त्यावर ब्राह्मणानें म्हटलें, 'तर मग हा आपला दुराग्रह व व्यर्थ प्रयत्न कशासाठीं चालला आहे? आपण विचारी, विवेकी, कुलीन असून स्वतःचा प्राण धोक्यांत घालून, नीचापुढें मान वांकवून व प्रजेला असल्या घोर संकटांत पाडून, आपणाला लाभ काय होणार? आपण ज्याला जिंकतां येण्याजोगा समजतां तो अग्निशौच मृगाप्रमाणें शत्रुरूपी अग्नींत वरचे-वर धैर्यानें उडया टाकून स्वतःची शुद्धी करून घेत असतो, हें आपण जाणतांना? स्फटिका-पुढें तरवारींचें तीक्ष्ण टॉक टिकत नाहीं. त्याचा कोमल व पोकळ कमलाच्या पाकळीने कां भेद होणार? ज्याच्यापुढें पृथ्वीवर,-अवतारी-भिक्षाचर वगैरे शत्रूंचा पाड लागला नाहीं, त्याच्याशीं हे विकिर शत्रू कसे टीकणार? ते केव्हांच विरडले जातील. राज्याचा लोभ धरून राजाशीं स्पर्धा करण्याचे मार्ग आपण जाणत नाहीं, असें थोडेंच आहे? तेव्हां आपण अभिमान तरी कशाचा व कोणाचा धरतां आहां? पृथ्वीचा भार धारण करण्यास समर्थ-अशा अनंत-शेष, नागाच्या वंशांत पैदा झालेल्या व गारोडी तोंड वासून घालील तेवढें घास गिळणाऱ्या उदरंभर क्षुद्र सर्पासारख्या नीच लोकांना धिक्कार असो. गारोडी त्यांना पेटाऱ्यांतून काढून उडया मारण्याला लावून, लोकांना भिववितात व पुनः पेटाऱ्यांत कोंबतात, तेव्हां त्या गारोडयाची इच्छा त्यांच्यावर पोट भरण्याची असते. त्या सर्पाचे यश वाढविणें किंवा प्रशंसा करण्याची नव्हे.'

हें त्याचें भाषण ऐकल्यावर भोजानें त्या ब्राह्मणाला प्रेमळ शब्दांनीं निरोप दिला. तेव्हांपासून त्याच्या मनांतील विचाराचा लौकरच विकास होत गेला.

मनाच्या मोठेपणानेंच शांतीचें खरें महत्व कळतें. त्याच्या अभावीं मनाचें नुसतें मार्दव किंवा काठिण्य व्यक्त होत असतें. अमृतमय चंद्रकिरणाच्या स्पर्शाने इतर सारे पदार्थ पूर्ववत् टणक राहतात, पण चंद्रकांत मण्याला पाझर फुटून तो मृदु होतो, हें आश्चर्य होय. ३०३०.

भोज क्षत्रिय कुलोत्पन्न असूनहि त्याच्या अंगीं शाठ्य नव्हतें. स्वतः व राजा यांच्यामधील अंतराविषयीं तो विचार करूं लागला. राजाचें बल, ओज, तेज, शहाणपण, औदार्य, सत्य, प्रेम, वगैरे सत्गुणाच्या मानानें, प्राचीन थोर थोर राजे सुद्धां तुच्छ असतांना, आपणासारख्या क्षुद्र माणसांनीं त्याची स्पर्धा काय करावी असें त्याला वाटूं लागलें.

विषारी सर्प व अग्नी यांचा नित्य व निकट संबंध असूनहि, थोर असा चंदनवृक्ष शीतलच असतो. वनांत दावाग्नि पेटवून स्वस्थ बसलेल्या दुष्टाला, होणाऱ्या दावानलाचा ताप शमन होण्यासाठीं, तो त्या वनांतील चंदन वृक्षाखालीं पोंचल्यावर, तो वृक्ष त्याला आरामच देत असतो. कडक हिंवाळ्यांत देखील नीच कूप कुहरामध्यें भारी उष्मा असतो.

भोज पुढें राजाला प्रसन्न करून घेण्याच्या उद्योगाला लागला. एके दिवशीं बलहराकडे चाललेला एक राजाचा दूत त्याला आढळला. पूर्वी भोज दरद देशांत जात असतांना त्या दूतानें त्याला पाहिलें होतें. तो त्याला चांगला ओळखत होता. त्या दूतानें भोजाला प्रणाम केला. भोजानें त्याला जवळ बोलावून हंसतसें म्हटलें, ' मजबद्दल दुसऱ्याशीं वाटाघाट करण्यापेक्षां महाराजांनीं मजशींच ठरावाचें बोलणें केलेलें काय वाईट ? वैद्यानें रोग्यासाठीं पथ्याचें देण्याचें, तें दुसऱ्या शहाण्याच्या हातीं कशाला ?'

तो दूत चतुर होता. त्याला भोजाचा विश्वास आला नाहीं. त्यानें ते बोलणे थट्टेवारी नेले. भोजानें त्याला पुनः बोलून त्याची बरीच खात्री केली. त्याचें बोलणें खरेंसें वाटल्यावर दूतानें जवळ जाऊन राजाची प्रशंसा करीत म्हटले 'राजपुत्रा, आमचे महाराज मोठे थोर, भाग्यशाली व सुशील आहेत. त्यांच्या चरणतलाची छाया सुमेरूच्या सारखी-ती पुण्यवंतांनाच प्राप्त होते. ग्रीष्मांतील सूर्यतापानें आलेली पाण्याची कडकी चंद्रातपानें दूर होते. तसे त्याच्या थोडेसेंहि मर्जीनुरूप वागण्यानें त्यांचा रोष घालवितां येतो. आपण दरद देशांत जात असतांना मी राजाचा हेर म्हणून मागें आपल्यापुढें आलों होतों. तिकडून परत आल्यावर मी महाराजांना आपल्याविषयीं कांहीं माहिती दिली. तेव्हां त्यांनीं पुनः चौकशी केल्यावरून, मीं ती त्यांना तपशीलवार कळवीत. म्हटले, ' महाराज, त्यांचें अनुयायी, क्षुधा, तृषा, परिश्रम, वगैरेंनीं भारी त्रस्त व श्रांत होत्साते आपल्याविषयीं पुष्कळच दुर्वचनें बोलूं लागले होते, अशा स्थितीत मी राजपुत्र भोज यांना पाहिलें, तेव्हां ते त्या लोकांना खूप धमकावीत म्हणाले, 'महाराज आमचे कुलस्वामी व आमच्या वंशाचे शिरोभूषण होत. आम्ही पापी म्हणूनच त्यांच्या चरणसेवेला अंतरलों आहों. ३०५०. आम्ही स्वतः यःकश्चित. आम्हाला मान आहे तो, त्यांच्या आप्तपणामुळें, चंदनाच्या थोडयाशा संपर्कामुळें सुवासित झालेलें काष्ठहि चुकून चंदन समजलें जातें, हें ऐकून महाराजांना आपल्या विषयीं करुणा आल्याचें दिसलें व त्यानीं जणो आपल्या वडिलांप्रमाणे कळकळ दाखवीत विचारलें, 'मग त्या बाबाचे म्हणणें तरी काय आहे ?'

हें ऐकून भोजाला गहिंवर आला व त्याचे डोळे भरून आले. त्या द्वारें तो जणों त्या दूताचें आश्वासनच करीत होता. पुढे त्या दूताने भोजाची ही हकीकत धन्याला कळविली. पण त्या वेळीं भोज कांहीं विशेष संकटांत नसल्यामुळें त्याला ती खरी वाटली नाहीं.

बलहर नाराज होण्याची भोजाला भीति होती. त्याचें समाधान करीत व बाह्यतः

मोकळेपणा दाखवीत, भोजानें त्याला कळविलें कीं, 'मी हा सारा प्रकार नागाच्या सारखाच राजाला फसविण्यासाठीं चालविला आहे'.

पुढें त्यानें एका तरुण परक्या गृहस्था मार्फत गुप्तपणें राजाकडे स्वतःविषयीं, लौकर निकाल होण्याची तजवीज चालविली. तो अशा कामांत चतुर होता. ब्रल्हणाला या विषयीं भोजाची कांहीं शंका आली नाहीं. 'तो देशिक केवळ, पोरवयाचा व परकी. त्याचा कोणाशीं संबंध नाहीं. तो स्वतःविषयींच कांहीं खटपट करीत असेल,' असें त्याला वाटलें. त्या तरुणानें परत येऊन भोजाला कळविलें कीं, 'या विषयीं बोलणें चालणें करण्याला कोणी खात्रीचा मध्यस्थ आला पाहिजे, असें राजाचें म्हणणें आहे.' ३०६०. तेव्हां दुसऱ्या कोणाच्या अभावीं भोजानें आपली पोक्त व साधीभोळी दायी नोना इला पाठविलें. त्याचे वडील मातोश्री निवर्तल्यावर तिनेंच त्याचें संगोपन केलें होतें.

भोजाच्या मनांतून राणी कल्हणिका हिनें मध्यस्थी करावी, असें होतें. ती निर्मत्सर व मोकळ्या मनाची होती. राजाला बरें वाटावें म्हणून ती आपल्या सवतींशीं प्रेमानें वागून, त्यांना चांगलीं चांगलीं अलंकारभूषणें लेववीत असे. ती नेहमीं पोक्त माणसांच्या सल्लेनें वागे. यामुळें राजा बऱ्या वाईट, कशाहि स्थितींत असला तरी, ती त्याला गोंधळलेली आढळत नसे. राजाला प्रथम राज्याभिषेक झाल्यावेळीं तिचा सासरा सुस्सल व सारे मंत्री यांच्या इच्छेनुरूप ती महादेवी–महाराणी–झाली होती. अपत्यस्नेहानें किंवा राजाच्या मर्जी-खातर तिची प्रवृत्ती दुष्कर्माकडे कधींहि वळत नसे आप्तइष्टांशीं स्नेहसंबंध ठेवण्यांत, तिचें व राजाचें मत एक असे. तिला आपल्या वैभवाचा गर्व मुळींच शिवला नाहीं, किंवा तिच्या सद्वर्तनाला कधीं डाग लागला नाहीं. पतीच्या प्रथम समागमापासून तिला त्याच्या स्वभा-वाची उत्तम जाणीव झालेली होती. ती आपला कुलीनपणा व मान, यांचें फार काळजी-पूर्वक रक्षण करी. कुमार्ग व अहितकारी दुर्वर्तन तिच्या हातून कधींच घडलें नाहीं.

अशा त्या थोर राणीनें भोजाच्या इच्छेनुरूप, तो आपल्या राज्याच्या हद्दीवर पोंचेपर्यंत, सर्व मुक्कामांवर त्याच्यासाठीं सर्व तऱ्हेचा बंदोबस्त करविला. पुढें अपसांत ठरल्याप्रमाणें राणीनें मध्यस्थ व जामीन यांच्याहि येण्याची व राहण्याची व्यवस्था करविली. वाटखर्ची-साठीं तिनें स्वतःच्या शिलकेंतून भोजाकडे पुष्कळसा पैसा व रक्षणासाठीं आठ चांगले कुलीन राजपुत्र पाठविले. ३०७१.

पुढें धन्य राजाकडे गेला व त्यानें भोजाच्या इच्छेप्रमाणें सर्व कांही करविण्याचें, त्या दाईला राजाकडून आश्वासन देवविलें. राजानें तिचें म्हणणें तत्काल मान्य केलें होतें. तरी या सर्व कारस्थानाचा शेवट कसा काय होतो, याची त्याला शंकाच होती. त्याला वाटलें कीं, 'या वेळीं भोज त्रस्त व थकलेला असल्यानें, तो धूर्तपणानें शत्रुत्व दाखवीत नसेल. तरी त्याला हल्लींच्या संकटांतून मोकळें केलेंच पाहिजे. पुढें तो कदाचित पुनः शत्रुत्व करील तर करो.'

'सूर्य उगवलेला असूनहि मेघजाल पूर्ते उडाल्याशिवाय फार वेळ प्रकाश देत नाहीं. तसेंच संकटकालीं आलेला विवेक फार वेळ टिकेल किंवा नाहीं कोण जाणे?'

'आपल्याकडून नागाचा निस्संशय अविचारानें वध झाला. त्यावरून आम्हाला मूढ समजून, स्वार्थासाठींहि त्यानें हा व्यूह रचिला असेल. तो तरुण, समर्थ, कर्ता व क्षत्रिय असून, त्यानें नांव कमविलेलें आहे. तसेंच त्याला पुष्कळांचे सहाय्यहि आहे. त्याच्या-इतका विवेक इतर तरुणांच्या अंगीं क्वचितच आढळतो.'

कुंकुम किंवा केशर याच्या फुलाला देठ नसतें. क्षीरिवृक्षाला फुलाशिवाय फल येते. थोर लोकांना ऐहिक महत्वाकांक्षेविषयीं औदासिन्य येण्याला, विवक्षित वयोमान अवश्य असतेंच असें नाहीं. तो कितीहि धूर्त व सोंगाड्या असला तरी, आतां त्याला हातचा सोडणें ठीक नाहीं. त्याच्यावर योग्य नजर ठेवतां आली नाही तर, आमच्या नेत्रांचा उपयोग काय?' ३०७९.

याप्रमाणें शरण आल्यानें भोजाला मानहानी वाटेल म्हणून, त्याच्याशीं सरळपणानें तरी नेटसपणानेंच वागलें पाहिजे, असें राजा व राणी दोघांचेंहि मत होतें. ३०८०.

वळणावळणानें वाहणाऱ्या नाल्याचें पात्र सर्वांना सारखें व स्पष्ट दिसत नाहीं. पण प्रियेच्या केशकलापापासून टपकणारे जलबिंदू स्पष्ट व मोहक दिसतात.

याप्रमाणें पूर्ण विचार करून, ठरविलेला शहाणपणाचा मार्ग, त्यानें फक्त धंन्य व रिल्हण यांनाच कळविला. पुढें, भोजाला आपल्या भेटीची इच्छा आहे, असें दूताकडून कळल्यावरून व त्याची खात्री करण्यासाठीं धंन्य त्याच्या भेटीला गेला. भोज समेटाची इच्छा करीत होता. त्याच्यावर दबाव पडून तो भिऊं नये म्हणून, त्यानें बरोबर थोडेसेच सैनिक घेतले व तो त्या नदींतलि एका बेटावर जाऊन उतरला व तेथें त्याची वाट पहात राहिला. त्यावेळीं प्रारंभीं नदींत गुडघाभर पाणी होतें. तें बर्फ वितळल्यानें लौकरच फार वाढलें व त्याच्या लाटा भयंकर व जोरानें उंच उसळूं लागल्या. त्या नदीला जणों मत्सर वाटला व ती हत्तीला देखील पार उतरतां न येण्याइतकी फुगली. यामुळें अडवणूक होऊन धंन्य शत्रूच्या तावडींत सांपडला. शत्रूहि त्याचा समाचार घेण्याची योग्य संधि पहात होते. शुभ्र वस्त्रें परिधान केलेले धंन्याचे सेवक त्या नदीच्या कांठावर उभे होते. ते त्या उसळणाऱ्या लाटांमुळें आलेल्या सफेत फेंसासारखें दिसत होते. तो पूर्ता तावडींत आला आहे असें समजून हजारों खाशक लोक त्या धंन्याला ठार मारण्याला तयार झाले. त्या वेळीं भोज कर्णांतापर्यंत डोळे फाडफाडून मोठ्या आतुरतेनें त्याच्याकडे पहात उभा होता. तो समेटाची इच्छा करीत होता. त्याचा स्वभाव फार सरळ होता व तो काळजीमुळें कावराबावरा झालेला होता. त्यानें ती आपत्ती टाळण्यासाठीं त्या खशांना दरडावीत म्हटलें, 'हे विश्वासानें व सरळ हेतू मनांत धरून आलेले आहेत. ते मारले जातील तर आपण सारे खचित नरकाला जाऊं. ३०९०. त्या एकाला मारल्यानें राजाचें बल कमी होईल असें

असले अनेक सेवक आहेत. एखादे पंख उखडल्यानें गरुडाचा वेग व शक्ती कमी थोडीच होणार ? विश्वासघातानें दुसऱ्याचा नाश करून राजे लोक दोषी होतात. हें त्यांच्या बरोबरीच्यांना कदाचित साजेल. पण आपलें तें काम नव्हे. धंन्य आपल्या धन्याची सेवा एकनिष्ठेनें व मनोभावानें करीत आहे, तशीच मीहि करणार. यावरहि ते लोक ऐकत नाहींत, असें पाहून भोजानें त्यांना आपण जीव देऊं, अशी भीति घातली व शेवटीं एकदांचे त्यांना परतविलें. धंन्य सुरक्षित राहावा म्हणून त्यानें त्याच्याकडून शपता करविल्या. ही सर्व हकीकत धंन्याला कळली व त्यानें ती राजाला कळविली व भोजाच्या सरळ वर्तनाची प्रशंसा केली. पण राजाला यांत आपणाला यश येईलच अशी खात्री पटेना. तरी त्यानें आपले विचार मनांतच ठेवले व ठरलेली व्यवस्था अमलांत आणण्यासाठीं कल्हणिका राणी व कांहीं मंत्री यांना तारमूलक येथें पाठविलें. राणी तिकडे जाण्याला कबूल झाली. पण या राजकारणात न जाणों निरुपायानं कांहीं कडक उपाय योजणं भाग पडलें तर, परवानगी असावी म्हणून तिनें म्हटलें, ' महाराज, मोठमोठ्या मंत्र्यांच्या हातून लबाडी घडलेली आपण जाणतां. शत्रूवर विश्वास ठेवण्यापूर्वी पूर्ता विचार केलेला बरा. मनुष्यमात्र जड पार्थिवांश घटित असल्यानें, त्याला दुसऱ्याच्या मनांतील खोल विचारतरंगाचा शोध काढता येण्याची शक्ती कोठून असणार ? ३१००. स्वत:चा प्राण देऊनहि मी महाराजांचें रक्षण करीन, पण पतिव्रता धर्मानुरूप मला राजकारणाला अवश्य अशा सर्वच गोष्टी कांहीं करतां येणार नाहींत. वादांत सभ्यपणा व सात्विक वर्तन, केवळ शाब्दिक राहतें आपण शत्रू असतांना भोजाचें हल्लींचें वर्तन हिमगिरीवर बर्फ विकायला नेण्यासारखें आहे.हल्लीं लोकांमध्यें नीचपणा बोकाळला आहे. लोक स्वयंमन्य व गर्विष्ठ झालेले असल्यानें तें शांतता व स्वस्थता कायम राहूं देत नाहींत, किंवा स्वपर भेद पहात नाहींत. लोकांनीं थोर व सज्जन मानलेला पण पुत्र, मंत्री, स्त्रिया, यांनीं मत कलुषित केल्यामुळें रागावलेला राजासुद्धां, विश्वासाचें नुकसान केल्याशिवाय रहात नाहीं. महाराज, आपण विश्वसनीय व सत्यसंध असल्यानें आपणाला व आपल्याबरोबर मलाहि, या त्रिभुवनामध्यें प्रताप व वैभव प्राप्त झालेलें आहे. तेव्हा या भोजाचे रक्षण करण्यात मला प्राण देण्याघेण्याचा प्रसंग आला तर, त्याचें यश मला मिळावें व त्या बद्दल मला नांवें ठेवू नयेत'. हें तिचें म्हणणें त्या विचारी राजानें मान्य केलें व तिला निरोप दिला.

हें पाहून सर्व लोकांनां मनांत म्हटलें कीं, 'हे महाराज किती तरी अविचारी आहेत; ज्यानें त्यांच्यावर आजवर सारखी आपत्ति आणली व जो इतक्या नाशाला कारण झाला, त्याला ते आश्रय देऊन नेमणूक करून देताहेत ! या कामावर महाराणीला धाडलें जात आहे, यावरून त्यांचे सारे मंत्री व उपाय हरले असें वाटतें.

डामर मंडळींतील मतभेद आणि या कामीं राजाच्या नेटाच्या किंवा नेमळेपणाच्या वर्तनाविषयीं संशय, या मुळें ते लोक आजवर तटस्थ होते. ३११०. पण आतां ते सारे राजाविरुद्ध झाले. त्यांनीं भोजाच्या खासगी नोकरांशीं गुप्त कट चालविले. आपल्या

तटस्थपणामुळेंच भोजानें राज्यप्राप्त्यर्थ केलेल्या सर्व खटपटी व्यर्थ गेल्या, अशी त्यांची खात्री झाली व त्यांनीं तो त्रयस्थपणा एकदम सोडून दिला.

त्रिल्लकाने तावडतोब आपल्या पुत्राला भोजाकडे धाडलें. तसेंच तुक्काकडून मोठ्या सैन्यासह शमालावर स्वारी करविली. भिक्षूच्या पुंडाव्याच्या वेळीं सुद्धा राजाशीं निष्ठेनें वागलेले नीलाश्व डामर या वेळीं शत्रूला मिळाले. लोहर, देवसरस व होलडा, यांतून तीघे डामर आणि नीलाश्वापैकीं एक डामरपत्नी एव्हडेच राजनिष्ठ राहिले.

भोजाचे सैनिक बहुतेक लवन्य होते. त्याच्यावर या वेळी होत असलेली हिमवृष्टी थांबेना. जोराच्या पर्जन्यवृष्टीमुळें तुडुंब भरून फोफावत जाणाऱ्या नद्यांचा घोर आवाज, त्या समुद्राला पोहोचतात तेव्हांच बंद होतो

राणी येत असल्याचें ऐकून भोजानें बलहराला स्पष्ट सांगितले कीं, 'मी राजाशीं मेळ करण्याचा निश्चय केला आहे इतके दिवस व्यर्थ परस्पर फसवाफसवी चालू होती. आप्त स्त्रीजन, मध्यस्थ व जामीन होऊं लागल्यावर आप्तस्वकीयापासून कोण कसा अलग राहूं शकणार ? आमच्या कुलाचे चूडामणी जयसिंह महाराज, असे प्रेम दाखवीत असतांना, मजसारख्या यःकश्चित पुरुषाला कसें कठोर वागतां येईल ? आपल्या मतें हा त्यांचा एक लबाडीचा डाव आहे. तसें कां असेना. मी यांत फसत असलों तरी पतकरलें. मी विश्वास ठेवला एव्हढ्यावरूनच कांहीं माझी अपकीर्ति होणार नाहीं. ३१२०. यावेळीं आपण सारेच एकच झालेले, तेव्हां अपणाला खचित यश मिळेल ही आशा व्यर्थ होय अशीच सैन्याची जमवाजमव व तयारी पूर्वीहि झाली असून अपणाला खाली घसरावें लागलें होतें.

त्याचें अशा तऱ्हेचें शहापणाचें व निश्चयाचें भाषण ऐकून बलहर व इतर डामर सरदार त्याला म्हणाले, 'आपलें प्रयत्न यशस्वी होऊन शत्रूचा दोनतीन दिवसांत पूर्ता नाश होईल, अशा स्थितींत आपण आपलें मन असें कां पालटलें कळत नाहीं, ' पण त्यांना असल्या भाषणानीं भोजाचें मन पालटतां येईना.

राणी तारमूलक येथें असतांना रिल्हण व धंन्य आपले शिपायी व राजपुत्र यांच्यासह पंचग्राम येथें गेलें. ( पंचीग्राम हल्लींच उत्तरेकडील प्रांतांतील पञ्चगोम नांवाचें खेडें. हें कहमिल नदीच्या कांठीं कर्णावच्या वाटेवर आहे. ते लोक नदीपलीकडे येऊन राहिल्याचे कळतांच भोज नदीच्या दुसऱ्या कांठावरील झाडीच्या आश्रयाला येऊन राहिला. भोजाकडे चोंहीकडून सशस्त्र व सज्ज सैनिक येत होते. ते पाहून राजपक्षीय लोकांना झालेल्या ठरावाबद्दल विश्वास वाटेना, धंन्य वगैरे मंत्री बुद्धयां थोडयाच लोकांनीशीं गेलें होते. त्यांना तेथून परतण्याची आतां सवड नव्हती. त्यांच्यावर हल्ला करून त्यांना ठार मारावे, असें बलहारानें पुष्कळदां मनांत आणलें. त्यासाठीं उत्सुक असलेले लोक महापद्म सरोवरांत नावांमध्यें दडून राहिलेले होते व त्यानीं सुय्यपुराजवळचा पूल तोडला होता. दुसरे बरेचसे राजाचे शत्रू बलहर कसें काय धाडस करतो, तें कळतांच उठावणी करण्याच्या बेतानें मार्गांत मारक्याच्या जागीं टपून बसलेले होते. भांगील व आसपासचा प्रांत. येथील डामरांनीं

शंकरवर्मपुरावर ( हल्लींचें बांगील परगण्यांतलि पटण ) हल्ला करण्याचें ठरविलें होतें आणि शमाला येथील डामर क्षितिकेला पोंचण्याच्या तजवीजींत होते. ३१३०. त्रिल्लक वगैरे महासारितेच्या कांठावर पोंचण्याच्या व नलिाश्व डामर नगराच्या मध्यभागावर हल्ला करण्याच्या उमेदींत होते. फार काय सांगावें पाण्यांत घेरून घेतलेल्या बदकाप्रमाणें राजपक्षीयांना एकदम वेढून ठार करण्याचा या सर्व मंडळींचा बेत होता.

अवर्षणाच्या प्रसंगीं दुष्ट ग्रहाचा कुयोग आल्यानें पर्जन्यवृष्टी नष्ट होत असते, त्याप्रमाणें राजाच्या पक्षाच्या लोकांचे बेत चोंहींकडून धोक्याचे व संशयग्रस्त झालेले होते

यावेळीं बलहर वरचेवर राजाच्या सैन्याचा फडशा पाहूं पहात होता. त्याला थोपून धरण्यांत भोजाची त्रेधा उडत होती. तहाची वाटाघाट हाणून पाडण्यासाठीं बलहर घटकोघटकीं कांहीं तरी खुसपट काढांत होता. तसाच वेळोवेळीं उभय दळांमध्यें पैदा होणारा गैरसमज तात्काल नाहींसा करण्याच्या दृढ निश्चयानें भोजाची सारखी धडपड चालली होती.

राजाकडील कांहीं खुशामती लोक वकील म्हणून आलेले होते. स्थिरस्थावर असतांना त्यांची पुष्कळच बडबड व गडबड चालत असे. पण या आणीबाणीच्या प्रसंगीं ते फारच खिन्न व उद्विग्न झाले होते. असे हे धूर्त लोक साऱ्या राज्यांत डंका वाजलेल्या गोष्टी, राजाच्या कानात गुप्त गोष्टी म्हणून सांगतात. अगदी लवून हिरमुसले तोंड झांकून घेऊन ते त्याला लाजिरवाण्या गोष्टी, किंवा प्रतिष्ठितपणें मनाला लागणाऱ्या कठोर व शत्रू सुद्धां सहसा उच्चारणार नाहीं, अशा गोष्टी बोलतात. मूर्खपणा व कौटिल्य यांचे प्रत्यक्ष अवतार कोठें असतील तर ते खरोखर हे राजाचे खुषामती लोक होत. रंगभूमीवरील विदूषक, रस्त्यांत टवाळ गोष्टी सांगणारे कंथाकवी, पहाडांत बिळामध्यें राहणारे खताकू नांवाचे प्राणी, गो शाळेंतील रक्षक श्वान व राजवाड्यांतील बांडगुळासारखे हे परान्नपुष्ट खुषामती लोक, हे सारे पोळ्यावर तांव मारण्यांत शूर वीर पण इतरत्र ते आणि नुकतीच तळ्याच्या पाण्यांतून बाहेर काढलेलीं कांसवे, सारखींच निरुपयोगी व कुचकामाची असतात.

पुढें लौकरच सूर्यकिरण उन्नत पर्वतशिखरावर विश्रांति घेऊं लागले. प्रखर रविप्रतापाबरोबरच त्याचा तापहि मंदावला. ३१४०. सूर्यनारायणाचें आरक्त बिंब, त्याचा बंधू अरुण याच्या मंद किरणांत स्वतःचें किरण मिसळून, पर्वत शिखरांवर थबकत असलेलें दिसूं लागलें. संध्यादेवीनें दिवस व रात्र यांच्यामध्यें मध्यस्थपणा पतकरला. सर्व लोक हात जोडून उभे राहून तिचें पूजन करूं लागले. निशानाथ चंद्राचा उदय होत असतांना गजदंतावर फोड उठले चंद्रकांत मणी द्रवूं लागले. सागराला भरती येऊं लागली. रात्रीमुळें खिन्न होऊन कमलें मिटलीं. असतांना मदवारी व कमलमकु दोन्ही न मिळाल्यानें मधुप गजस्थळालाच चिकटून राहिले

या कारस्थानाचा शेंवट कसा होतो, तें धंन्य व उदय यांच्या ध्यानांत येईना. या आणीबाणीच्या स्थितींत ते आपल्या लोकांसह नदीतीरावर उभे होते. त्यांना कोठें पाय

टेंकण्याला सुद्धां आधार मिळेना. वाहणीला लागलेल्या माणसांच्या प्रमाणें त्यांना सर्व कांहीं चंचल दिसत होतें.

बलहर पलीकडे राहात होता. त्याच्या मनांत हल्ला करण्याची भारी उत्कट इच्छा होती. ती भोज सारखी दावीत होता. त्या मंत्र्यांबरोबरच्या सैनिकांचा बलहरानें केव्हांच फडशा पाडला असता. नगरांत वितस्ता व सिंधू यांच्या संगमावर भरणाऱ्या यात्रेंत गेलेले लोक अहोरात्र नदीतीरावर सारखें फिरत राहतात. त्यांना थकवा मुळींच भासत नाहीं. तशी या नदीतीरावर या वेळीं स्थिति झाली होती.

राजाचे आंतर व बाह्य दरबारी कामगार, कोणी कांही सांगेल त्याप्रमाणें डामरांचे संघ मोडण्यासाठीं नाना उपाय लिहून पाठवीत होते. त्यावरून भोजाकडील राजपुत्रांची गडबड उडत होती. ३१५०. तसेंच त्याचे कांहीं लबाड व मतलबी सेवकहि, त्यानें आपला निश्चय व धैर्य सोडावें म्हणून, अनेक झगडे उपस्थित करीत होते. पण ते सर्व व्यर्थ गेले. तेथें जमलेल्या सरदारांवर भोजाचा मुळीं विश्वास नव्हता. यावेळीं बलहराचा अविश्वास किंवा तिरस्कार केला तर तो रागावून एकदम हल्ला करील व मोठीच आपत्ति ओढवेल. एकदां मारामारी सुरू झाली कीं, प्रायोपवेशनासाठीं जमा होणाऱ्या द्विजांप्रमाणें, हे दस्यु डामर—चोहींकडून धांवतील. असा पोक्त विचार करून, भोजानें दगा देत नसल्याचें दाखवून, बलहराला म्हटलें. ' ही रात्र उजाडतांच आपण हल्ल्याचा बेत पार पाडूं. '

आपल्यासाठीं जमलेले सारे सरदार त्यादिवशीं उपाशी होते म्हणून त्या कुलीन भोज राजपुत्रानें त्या रात्रीं अन्नग्रहण केलें नाहीं.

मंत्र्यांना भोजाचा विश्वास येईना. त्याचे व आपले विचार एकच आहेत, हें त्यांना माहित नव्हतें. तो दगा देणार असें त्यांना वाटे. बगळ्यांनीं पंख पसरलेले पाहून मासे गडबडून वेगानें पोहत व उडत. ते पाहून सुद्धां, त्यांना भीतीमुळें शत्रू एकदम हल्ला करण्याला येतो आहे असे वाटे. पलीकडच्या कांठीं चक्रवाकावाचून कोणीहि दुःखी नाहीं, असेंच जणों ते समजत होते. श्रीरामदूत हनुमानाचा पिता वायु, मारुत यानें त्याला सागरलंघनाच्या कामीं सहाय्य केलें होतें. तसेंच त्यानें त्या मंत्र्याच्या दूताना पैलतीरीं पोहोंचण्याला मदत केली. ते दूत सारी रात्र जागत शत्रूच्या आसपास वावरत होते. तीरावरील वृक्ष वाऱ्यानें हलत होते, त्यांच्या शब्दामुळें शत्रूचे कान बहिरे झाले होते. ३१६०.

उजाडतांच निस्तेज सूर्यबिंब, पर्वतशिखरावर ठेवलेल्या सुवर्णकमलासारखें भासूं लागलें. थोड्या वेळानें किरणजाल पसरत जाऊन, तें दृश्य, हळूं हळूं नष्ट होण्यापूर्वीं, तसेंच एकाकी चक्रवाकांना पाहून शोकाकुल झालेल्या नेत्रांसारख्या झालेल्या पुष्पकालिका व तृणांकुर याच्यावर रात्रीं पडलेलें देवबिंदुरूपी अश्रु सुकण्यापूर्वी, एक तरुण, शिबिकेंत बसून, त्या वनभूमींतून बाहेर पडून नदीतीरावर नुकतांच पोंचलेला, आपल्याकडेच येत असल्याचें, त्या मंत्र्यांनीं पाहिलें. त्याचा पोशाख भव्य व उज्वल होता. त्यानें हातांत एक परशु घेतला होता. त्याच्याबरोबर कांहीं प्यादे होते. तो आपल्या पादस्पर्शानें भोयांना जलदी करीत

होता. कांहीं डामर शिपायी त्याला अडवूं पहात होते. पण त्यांना त्यानें आपल्या भ्रूभंगानेंच लाजवून मागें सारलें. मंत्र्यांनीं त्याला पूर्वी पाहिलेलें नव्हतें. तरी त्याच्या कपाळावरील चंदन व केशर, यांवरून त्यांनीं तो भोजच असें जाणलें.

तो रात्रभर राजवदनाशीं बोलत बसला होता. पहांटे एकदम त्याचा निरोप घेऊन तो तडक इकडे निघून आला होता. ती शिबिका पाण्यांत उतरली तेव्हां, धंन्य व इतर मंडळीनें आनंदानें घोडे दौडत सामोरे जाऊन, त्याला घेरलें. त्यावर एका छावणींत मोठमोठ्यानें शोक व आरडाओरड व दुसरींत आनंद व जयघोष यांची गडबड उडाली. ती ऐकून लढाई जुंपली असें समजून चोहींकडून डामर धांवुन आले. पण भोज प्रतिपक्षांत मिळालेला पाहून ते कपाळ पिटूं लागले. ३१७०.

धन्य वगैरे मंत्र्यांनीं भोजाचे सादर स्वागत केलें व मानपत्रें अर्पण केलीं त्यांच्यांत कोणाचेंहि मन दुखण्यासारखें कांही नव्हतें. जोगानें व्यक्त होऊं इच्छिणारा मनांतील अत्यानंद आंवरून त्याची नानाप्रकारें स्तुती करीत धंन्यानें म्हटलें, 'राजपुत्रा, आपण सुमेरुप्रमाणें स्थिरचरित व धीर, तसेंच सुमनसांचे-देवांचे-आधार असल्यानें त्यांच्याप्रमाणेंच आपल्यामुळें ही पृथ्वी पावन होत आहे. आपली गौ-वाणी-सर्व शब्दमात्रांहून अचल व क्षीराब्धीच्या क्षीराहूनहि श्रेष्ठ आहे. कारण निर्यात त्या क्षीराप्रमाणें फरक होत नाहीं, एखाद्या पुंस्कोकिलाप्रमाणें नीचाचा समागम सोडून स्वतःच्या कुलांतलि मंडळीकडे परत येणारे आपण अद्वितीय आहां. आपण सदाचार व सद्वर्तन यांचा मार्ग मोकळा करून दिल्यानतर, आमच्या सारख्यानां त्याचे अवलबन केलें तर मोठेसें आश्चर्य नाहीं.'

अशा अनेक प्रशंसापत्रांना व भाषणांना भोजानें यथायोग्य उत्तरें दिलीं. नंतर त्याला एका ऐटीनें नाचत असलेल्या उमद्या अश्वावर बसवून, ते त्याची वडेजाव करीत, मोठ्या समारंभानें निघाले. एखाद्या कोकिळाला कावळ्यांतून काढून कोकिळ मडळी नेत असतांना, ते कावळे कावकाव करीत मागे लागतात, त्याप्रमाण, बरेच लवन्य, काहीं कोस पर्यंत त्यांच्या मागून गलबला करीत गेले लौकिक वर्ष ४२२१ ई. स. ११४५ च्या ज्येष्ठ शुद्ध दशमीला, राजानें अशा रीतीन भोजाला आपल्याकडे वळवून घेतलें तेव्हा भोजाला ३३ वे वर्ष होतें.

भोजानें राणाकडे जाऊन तिला प्रणिपात केला तिनें त्याचें पुत्राप्रमाण अभिनंदन केलें. तो व त्याचे अनुयायी थकलेले असल्यामुळें, तिने त्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करविली. ३१८०. तिन त्याला पूर्वी कधी पाहिलें नव्हतें. तो सोमवंशा राजपुत्रांना योग्य व अवश्य अशा गुणगणाने मंडित असलेला पाहून, तिला, आपल्या नेत्राची फसगत तर होत नाहीं! असें वाटलें.

राणीची सत्यवादिता, प्रेमळपणा, शोभा व थाट वगैरे अनेक उपजत सद्गुण पाहून भोजाला राजाहि शुद्धाचरणी व थोर असल्याची खात्री वाटली. चेहऱ्याच्या वर्णा वरून

स्वभाव, महाद्वाराच्या शोभेवरून घरांतील संपत्ती आणि पत्नीचें शील व आचरण, यांवरून पतीचें चारित्र्य, यांच्या विषयीं अनुमान होतें.

थकवा उतरल्यावर भोज सायंकाळीं निघण्याची तयारी करूं लागला. तोंवर त्याला राजाकडे चलण्याचें कोणी सुचविलें नाहीं पण या पुढें मध्यस्थाची अवश्यकता नसल्यानें मंत्र्यांनीं त्याला म्हटलें, 'महाराजांचा मत्सर व आशंका अद्यापि पूर्ती गेलेली नाहीं. त्यांना आपणाला कांहीं आज्ञा करावयाची आहे,' 'पुढील,'महाराजाकडे चलावें,' या आज्ञेच्या प्रस्तावनेदाखल, हे शब्द भोजाच्या कानांत भाल्याच्या टोंकासारखे टोंचले. बराच वेळ त्यांनीं त्याच्या मनाला शल्याप्रमाणें दुःख दिलें. तो कांहीं वेळानें भानावर आला. तेव्हां, आतांपर्यंत मध्यस्थ केवळ आपल्या आदराखातर स्वस्थ होते, असें त्याच्या लक्षांत आलें त्याला जीवापाड त्रास झाला व तो जणों जीवाला कंटाळून, कटुभाषण करूं लागला. तेव्हां त्या मंत्र्यांनीं माना वाकवीत, सौम्य शब्दांनीं, त्याचा क्षोभ कांहींसा कमी केला. त्याला योग्य व वक्तृत्वपूर्ण उत्तरें देऊन, भोजाचें उलट, तरा योग्य व स्वाभिमानयुक्त बोलणें रद्द करणें, त्यांना शक्य वाटलें नाहीं नंतर आपल्या दंतपंक्तीच्या तेजाच्या रूपानें जणों मनांतील उत्कृष्ट स्वामिभक्ति व्यक्त करीत, धंन्यानें भोजाला प्रेमानें म्हटलें, ३१९०. 'ठरावाच्या पूर्ततेसाठीं आपण महाराजाची भेट घेणें अवश्य आहे. तसेच त्यानें राजाच्या अनेक गुणांची प्रशंसा केली व त्याच्या दरबारांत महद्भाग्यानें राहणें लाभते असं सांगितल आणि आपल्या अशा थोर आप्ताकडे राहून सुख मिळत असतांना दुसऱ्या कोणाच्या आश्रयाला जाण्याची जरूर काय ?' असेंही म्हटलें. ३२००.

यावर भोजाला उलट कांहींच म्हणतां येईना. त्यानें सारा लपंडाव पार सोडला होता तरी त्याला राजाकडे जाण्यांत अपमान वाटत होता पण मार्गांत सर्वत्र लोकांच्या तोंडून आपली प्रशंसाच होत असलेली ऐकून, आपण करतो आहों तेच योग्य, अशी त्याची खात्री झाली

त्याच्या बरोबरच्या प्याद्याच्या पायांनीं उडविलेल्या धुळीनें पृथ्वी आकाशाशी मिळालेली दिसत होती मी राजापर्यंत पोंचूं शकेन का ? धूर्त लोक माझ्या व त्याच्या भेटीच्या आड तर येणार नाहींत,' अशी त्याला शंका आली होती

बांडगुळासारख्या खुशामती लोकांकडून अडथळे आल्याशिवाय, स्वतःचें थोर गुण राजलोकांपुढें प्रगट करणाऱ्याला, क्वचितच अवसर सांपडतो. और्वानलापासून सागराला होत असलेला दाह, आपल्या थंड पाण्यानें शमावण्याच्या हेतूनें हिमालयांतून निघालेला गार गंगाप्रवाह, सागरांत पोंचतो न पोंचतो तोंच, त्याला तेथील नक्र तिमिंगलादि गडप करतात या मुळे त्याचा हेतु साध्य होत नाहीं. अशा विचारांनी तो कांहींसा सुन्न झाला होता, म्हणून रस्त्यावर व नगरांत त्याच्या येण्यानें उडालेल्या खळबळीकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं स्वारांनी थोडे धावविले, तेव्हां कोठें त्याला राजवाड्याजवळ पोहोंचल्याचें ध्यानांत आलें

राजा राजवाड्यांत उंच जागीं उभा होता. मंत्रिमंडळ त्याच्या भोंवतीं जमलेले होते. तेथून त्यानें भोज घोड्यावरून उतरून येत असलेला पाहिला. तो फार उंच किंवा ठेंगणाहि नव्हता. त्याचा चेहरा उन्हानें किंचित काळवंडला होता. त्याचा वर्ण कमलगर्भा-प्रमाणें पिंवळट होता. त्याची चर्या कांहीं मलूल होती. तो व्यूढोरस्क व वृषस्कंध होता. त्याची दाढी मध्यमशी होती. तिच्यामुळें त्याची मान व गाल प्रशस्त दिसत होते. नाक उंच, सरळ आणि ओठ पक्व बिंब फलाप्रमाणें लालगुंज होते. भाल विशाल तरी पुढें आलेलें नव्हतें. चाल गंभीर व ठसकेदार होती अंगावरील वस्त्र व उष्णीष चांगलीं व तंग होतीं. कपाळावरची चंद्रधवल चंदन रेखा केसांच्या भांगापर्यंत पोंचली होती. ३११२.

राजाची पूर्ण विकसित व प्रेमळ दृष्टी पाहून तो राजसभामंडपांत चढून गेला. तेथें त्याच्याकडे उंच माना करून पाहणाऱ्या लोकांची गर्दी होती. त्याने राजापुढें लवून त्याच्या पायाला हात लावला व आपला जंबिया घेऊन सिंहासनापुढें ठेवला. तांबूलीदल चिन्हां-कित हाताच्या दोन बोटांनीं त्याच्या हनुवटीला स्पर्श करीत राजानें म्हटलें, 'तुम्ही लढाईंत धरलेलें किंवा पराजितहि नाहीं, तेव्हां हें शस्त्र आम्ही कसें घ्यावें !' भोजानें उत्तर दिलें, 'महा-राज, शस्त्रधारण स्वामिसंरक्षणासाठीं किंवा स्वतःच्या बचावासाठीं असते. महाराजांचा प्रताप व वैभव सप्तसागरांचें संरक्षण करीत असतांना, स्वतः मला या शस्त्राचा उपयोग करण्याचा प्रसंग क्वचितच येणार. महाराजांची चरणसेवारूपी कवच परलोकीं सुद्धां परित्राण समर्थ आहे तेव्हां या जगांत इतर बचावाच्या साधनांची अवश्यकताच कोठें उरली !' त्यावर राजा म्हणाला, ' या सत्याच्या व आवडत्या चढाओढींत तुम्ही जिंकले तेव्हां आम्ही काय म्हणणार ! ' ३२२०. भोजानें विनंति केला, ' मी यावेळीं बोलतो आहे तें महा-राजांची खुशामत करून कृपा व प्रेम संपादण्यासाठीं किंवा स्तुति करण्यासाठीं नव्हे. मी जें प्रत्यक्ष पाहतों आहे त्याचेंच हें यथार्थ वर्णन आहे. मी आपलें कोणतें म्हणून अनिष्ट चिंतलें नाहीं व आपणाला कोणचा म्हणून त्रास देण बाकी ठेवलें ? त्यापैकीं जें घडून आलें नाहीं तें अज्ञात. मनांतच ठेवलें पाहिजे. आम्ही आपल्या चर्मचक्षूंनीं आपणाला इतरां-प्रमाणें सामान्य कारणापासून पैदा झालेले समजत होतो, पण आपण वास्तविक मूळ आदि-कारण असलेले, कशातरी हेतूनें या मल्लवंशांत अवतरलेले आहां. हें खरें नव्हे काय ? महाराज, जेव्हां जेव्हां आम्ही आपणाला नुकसान पोंचविण्याचा उपक्रम केला, त्या त्या वेळीं भूमातेनें त्वेषानें आमचे बेत हाणून पाडले महाकवींनीं आपल्या कल्पनेच्या भरांत उज्वल प्रतापाच्या केलेल्या सर्व कल्पना, आम्ही आपल्याठायीं खऱ्या झालेल्या पाहतों आहों. आपला प्रताप व तेज यांच्या दाहानें पर्वत, शिखरें, घांट्या, खिंडी, हिमवृष्टी किंवा जंगल झाडी, यांपैकीं कोठेंहि माझी पाठ सोडली नाहीं तेव्हांपासून मी या आधाराचा, परभारेंच तपास करीत होतो पण ठरावाच्या अभावीं आजवर महाराजांकडे हजर होऊन कृपा संपा-दन केली नाहीं. मी जें जें कांहीं केलें तें समेटाच्या इच्छेनें व मी जिवंत आहे एवढी जाणीव महाराजांना कायम असावी म्हणूनच, निव्वळ हट्टामुळें किंवा भांडणाच्या इच्छेनें नव्हे.

आपल्या आप्तपणामुळेंच इतर सर्व राजेरजवाडे आमचा मान करीत होते. गंगेच्या कांचेच्या कुप्यांचा मान गंगाजलाच्या संबंधामुळेंच होत असतो. शाही हें उपपद त्या राजकुलाशीं संबंध जोडीत असलेल्या व बाहेर गेलेल्या अगणित क्षत्रियांवर आपल्या प्रतापाच्या श्रेष्ठ प्रभाव सारखा झळकवितें आहे. ३२३०. पहाडी राजांचा संघ आपणा विरुद्ध उठविण्यांत आला होता. त्याचा पाडावहि आपल्याच प्रतापानें झाला. इतक्यावर जशी महाराजांची आज्ञा.' असें म्हणून त्यानें पुन: राजाच्या पायांवर मस्तक ठेवलें. तसें करतांना त्याचें शिरावरील उष्णीष खालीं पडलें. तो उठतांना राजानें स्वतःचें शिरोभूषण त्याच्या मस्तकावर ठेवलें आणि प्रेमळपणानें स्वतःचें व भोजानें खालीं ठेवलेलें, दोन्ही शस्त्रें त्यानें भोजाच्या ओटयांत घातलीं. भोज कांकूं करूं लागला. तेव्हां राजानें शांतपणें व विचारपूर्वक म्हटलें. 'हीं दोन्ही आम्ही तुम्हाला देतों आहों ती जवळ ठेवा व त्यांचें सन्मान-पूर्वक रक्षण करा. नाहीं म्हणू नका. माझी इच्छा पुरी करा.'

ही राजाची आज्ञा मान्य करणें भोजाला अवश्यच होतें. प्रसंगीं कसे वागावें हें त्याला कळतच होतें. त्यानें सादर प्रणाम करीत, तीं शस्त्रें कंबरेला खोंचलीं. नंतर राजानें सर्व डौल व आढ्यता सोडून फार वेळ त्याच्याशीं प्रेमाचीं व सलगीचीं भाषणें केलीं व त्याला त्यानें फार दिवसांपासून परिचित असल्याप्रमाणें वागविलें.

नंतर धंन्य राजाकडे आला व त्यानें नम्रपणें विनंति केली, 'महाराज, आपले सद्गुण व प्रभाव यांचें वर्णन ऐकण्यापासून होणाऱ्या आनंदापुढें जीवित व संपदा यांची आम्हाला कांहींच किंमत वाटत नाहीं. महाराजांच्या स्थिर प्रसादाचेच आम्ही भुकेले आहोंत, हें महाराजांच्या लक्षांत असावें.' त्यावर राजानें म्हटलें, 'याच्या विषयींचे आमच्या मनांतलें विचार व्यक्त झाले तरी त्यांची पूर्तता होणें अशक्य आहे. ३२४०.'

नंतर थोडा वेळ बोलत राहून राजा भोजासह रङ्गादेवीकडे गेला. तिला भोजानें नम्रपणें प्रणाम केला. ती फार प्रेमळ व सद्गुणी म्हणून प्रसिद्ध होती. पारिजाताला कल्पलता, तशी राजाला ती उत्तम जोडीदार शोभते, असें भोजाला प्रथम दर्शनींच वाटलें. राजानें म्हटलें, 'देवि, हे आपला आप्तपणा लक्षात आणून स्वतःच प्रेमानें आलेले सन्माननीय आहेत.' राणीनें उत्तर दिले, 'ते आम्हाला आमच्या मुलापेक्षांहि अधिक प्रिय आहेत.'

कल्हणिका राणीनें याकामीं सर्व भार घेतला होता. तिचा सन्मान करण्यासाठीं राजा त्याला घेऊन तिच्याकडे गेला. त्यांना पाहून त्या चतुर राणीनें भोजाला म्हटलें, 'आतां तुम्ही एकदम महाराजांचे-इकडचे-विश्वासू व मित्र झाला.' राजानें तिचें सन्मानपूर्वक अभिनंदन केलें. तें पाहून ती थोडीशी गोंधळली व तिने भोजा-कडे पहात उत्तर दिलें. 'यांनीं केवळ मानधनावर दृष्टी देऊन, आपल्या दोस्तांची सल्ला सोडली व आप्तांवरील प्रेम कायमचे धरलें, हें विसरतां कामा नये. कमलाप्रमाणें स्वकुलाला अलंकारभूत माणसांनीं, त्या कमलापेक्षां श्रेष्ठपणाचें वर्तन ठेवणें इष्ट व अवश्य आहे. कमलें वाढत जातात तशीं तीं आपल्या पूर्वीच्या उपकारक जलाचा स्पर्श सोडून देतात. हे सत्य.

निष्ठ राहून निघून न येते तर, या कामाच्या दगदगींत व अडचणींत गर्क झालेली आम्ही सारी मंडळी, जिवंत राहणें व सुखरूप परत येणें अशक्यच होतें. नदी तीररक्षक वृक्ष पुरानें उन्मळून पडल्यावर, त्याच्यावरची लताहि पडतेच. ३२५०. पतिप्रीत्यर्थ पत्नीनें स्वतः-विषयींचे सर्व विचार इतके दाबले पाहिजेत कीं, तिला त्याच्यापुढें स्वसंरक्षणाचा विचार सुद्धां मनांत येऊं नये.' राजानें उत्तर दिलें, 'देवि, माझ्या सर्व कृत्यांची तूंहि साक्षि आहेस. तूं म्हणतेस तसाच माझाहि सर्वथैव निश्चय आहे, हें तूंहि जाणतेस. सुज्जी व मल्लार्जुन अपराधी असूनहि त्यांना शासन केल्याबद्दल सुद्धां माझ्या मनाला खातें आहे.'

भोजाला सपरिवार राहण्याला राजानें एक भव्य वाडा दाखविला. पण राजवाड्या-बाहेर कोठेंहि राजापासून दूर व त्याला नेहमीं भेटतां नये अशा जागीं राहण्यांत त्याची मर्जी संपादन व कायम करण्याला अडचण पडेल, असें त्याला वाटलें. तें राजालाहि पसंत पडलें व त्यानें त्याला राजवाड्यांतच चांगली सजविलेली व सोईची जागा नेमून दिली. तेथेंहि त्यानें राजाकडूनच पाहारे मागवून घेतले.

राजाजवळ स्वार्थसाधू सेवक कितीतरी हजर असत. या सर्वांपेक्षां त्याला भोज पूर्व-परिचितांप्रमाणें विशेष आवडूं लागला. खानपान व अपूर्व वस्तुदर्शन, अशा प्रसंगीं राजा त्याला प्रियपुत्राप्रमाणें स्मरणपूर्वक बोलावून घेई. त्याचा आप्तपणा लक्षांत ठेवून भोजनाच्या वेळीं तो त्याला उजवीकडे बसवी व स्वतः खाऊन पाहिलेले व चाखलेले असे पदार्थ प्रेमानें त्याच्याकडे धाडी. ३२६०. भोजाचें अकृत्रिम प्रेम पाहून राजाचे अल्पवयी पुत्र त्याच्याशीं निकट आप्ताप्रमाणें खेळत. त्याच्या मोकळ्या वर्तनामुळें राजा व दरबारचे लोकहि त्याच्यावर अकृत्रिम विश्वास ठेवूं लागले. तो विरुद्ध असतांना राजाच्या अंतरंगा-गांतलि कांहीं मंडळी राजाशीं कपटानें वागली होती. त्यांच्या विषयीं राजाला सूचना करून त्यांना व बऱ्याच इतर शत्रूंना दूर करविण्यांत त्यानें राजाला मदत केली. दरबारांत चाललेल्या कामांकडे तो काळजीपूर्वक लक्ष देत असे. आपण मंद, उतावळे किंवा ढोंगी नाहीं, हें त्यानें तेव्हांच सर्वांच्या निदर्शनास आणून दिलें. कांहीं राजकार्य चुकलें, फसलें, अपूरें राहिलें किंवा योग्य परिणामकारक न झालें तर तो तिकडे दुर्लक्ष करी कुकवि महा-कवींच्या काव्यांतील दोष काढण्यांत गढतो तसा तो त्यांतील दोष काढण्यात गुंतत नसे. तो आढ्यतेनें स्वतःच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगत बसत नसे. कोणी कधीं पूर्ववृत्त विचार-लेंच तर तो फारसा तपशीलांत शिरत नसे. त्याची खुषामत करांत कोणी त्याला 'कुल व वंश यांच्या संबंधांत आपण जयसिंह महाराजांऱ्या बरोबरीचे आहांत,' असें म्हटलें तर तो त्याला तत्काल रागानें दटावीत असे त्याचा स्वभाव फार खोल होता. त्याच्याशीं निकट संबंध असलेले खटपटी, खुषमस्करे, चहाडखोर, अशा लोकांना त्याचा कधीं ठाव लागत नसे. उत्पात व राजकीय चळवळी वगैरेंनीं लोकामध्यें तारांबळ उडे. पण त्याला त्याचें त्याला कांहींच वाटत नसे.

राजाचा विश्वास वाढला तशी त्यानें त्याच्यावरील नजरकैद कमी केली. तरी तो

उत्तम शिकविलेल्या अश्वाप्रमाणें कधीं उधळला नाहीं. ३२७०. इतर सर्वत्र तो राजापुढें असे, पण राजा राणीवशांत किंवा दरबारांत चालला कीं तो आपोआप मागें राही. त्याची वृत्ती साशंक असे. मिळण्याजोग्या वस्तूंविषयीं तो स्वतःच विनंति करी व यांत दुसऱ्याचा उपयोग करणें टाळीत असे. स्वप्नांतल्या गोष्टीसुद्धां तो राजापासून चोरून ठेवीत नसे, मंत्रिमंडळ, अंतःपुर व राजपत्न्या यांच्या चहाडयाचपाटया तो दुस्वप्नाप्रमाणें विसरून जाऊन त्यांचा कधीं कोठें अनुवाद करीत नसे. निर्ढावलेल्या थट्टेखोर मंडळीचे थट्टाविनोद पूर्ते ओळखून, त्यांचे तो रोखठोक जबाब देत असे. असल्या विटांचा त्याला भारी तिरस्कार व वीट वाटे. अशा वर्तनानें त्या शुद्धांचरणी व सात्विक राजपुत्रामुळें हळूं हळूं त्या न्यायी व प्रेमळ राजाला पुत्रापेक्षांहि आधिक सुख व समाधान होऊं लागलें. जयसिंहराजानें आपल्या कुलाच्या कायमीकरतां कलिकालीन राजांना दुर्मिळ व दुर्लंघ्य असा हा एक नवीनच सेतू निर्माण केला. होता.

या प्रमाणें सर्व अडचणी व अरिष्ट दूर केल्यावर राजानें त्रिल्लकाविषयीं विचार चालविला. पुढें बर्फ वितळून सर्व पहाडी मार्ग मोकळा झाल्यावरहि पळून जाणें भित्रेपणाचें व अनुचित समजून भिल्लक परत जाण्याला योग्य संधि पहात होता. त्याच्यावर संजपालानें वेडेपणानें हल्ला करण्याचें ठरविलें. ३२८०. तेव्हां त्याच्यापाशीं नगरांतील खात्रीचे लढवय्ये शिपायी बेताचेच असून मुख्य भरणा देवसरसाकडील लोकांचाच होता. तो मार्तांडाजवळ दबा धरून राहिला. तो मोठा स्वयंमन्य होता. तें स्थळ शत्रूला अवघड व अटकावाचें नाहीं हे त्याच्या लक्षांत आलें नाहीं.

त्रिल्लकाच्या सैन्याला बाणाचा तुटवडा पडला होता तरी तें खूप धैर्यानें लढलें संजपालाचे लोक हल्ला करीत असताना त्रिल्लक पुष्कळशा लोकांसह त्याच्यावर तुटून पडला. त्याबरोबर लुटांनें आधीच भारावलेले देवसरसचे लोक एकदम संजपालाला सोडून पळाले. त्याची बाकीची फौज त्या त्या शत्रुरूपी महा प्रलयपूरामध्यें गर्क झाली. नगरांतील शिपायीच काय ते महापर्वताप्रमाणे त्या प्रबलपूरांत उभे असलेले दिसत होते. शत्रूच्या जोराच्या हल्ल्यापुढें त्यानीं फार वेळ भर उन्हांत नेटानें टिकाव धरल्यावर पुष्कळसे शत्रूचे लोक मारून ते सारे जागजागी गारत झाले आणि अहमहमिकया सूर्यलोकीं वास्तव्य करण्याला मोठ्या उत्सुकतेन रवाना झाले. त्याच्या त्या गडबडीमुळें मार्तांडाच्या बिंबाला सुद्धां पुष्कळसे व्रण झाले. ( येथे सूर्यावरील काळया डागाचा संदर्भ घ्यावयाचा आहे किंवा कसें याचा विचार आहे. )

त्या लढाईंत संजपालाचा पुत्र गयापाल यानें मोठें शौर्य गाजविलें, त्याच्याखालीं तीन घोडे मारले गेले. तरी आद्वितीय चापल्य व चतुराईमुळें तो केव्हांच पदाति दृष्टी पडला नाहीं त्याचा धाकटा भाऊ जर्ज, लहानच होता. व त्याची ही पहिलीच लढाई होती तरी त्यानं आपलें धैर्य व कर्तृत्व यांनीं पुष्कळशा लढवय्या व वृद्ध वीरांनाहि चकित केलें ३२९० सेनापती संजपालाच्या डाव्या हातानें उजव्या हाताइतकें काम दिलें नाहीं-महाराजांना सूर्य तापद होतो. पण शीतल चंद्रमात्याचे दांत भग्न करतो. संजपाल थोड्या

वर स्वार होऊन डाव्या हातांतील तरवार चमकावीत एखाद्या सपक्ष पर्वतावरील धूम-शिखायुक्त दावानलासारखा शोभत होता. लढाईच्या गर्दीत त्याच्या घोड्यापुढील मार्ग अडला व त्या घोड्याला बाण लागले. तसे त्यानें संजपालाला खाली पाडलें. संजपालाच्या अंगांत अवजड चिलखत होते. त्याच्यासह तो टणक जमीनीवर पडल्यामुळे बेशुद्ध झाला. त्याला त्याच्या दोघां पुत्रांनीं उचलून नेऊन मार्तांडाच्या मंदिराच्या अंगणात शत्रूला नकळत ठेवलें आणि तेहि पराभूत होऊन, उधळलेल्या फौजेबरोबर पळून गेले.

त्रिल्लक डामराचा फडशा पाडण्याचा निश्चय करून राजा मोठी फौज घेऊन निघाला व त्यानें त्याला कोंडून टाकलें. तो विजयक्षेत्राला पोहचला. त्यापूर्वीच संजपालानें त्रिल्लकानें घातलेला वेढा उधळून, त्याची छावणी जाळून टाकली. राजाच्या या रागामुळें त्रिल्लकाची दुर्दशा झाली होती. तरी त्याला जवळ-पासच्या अनेक पहाडांतील खोऱ्यातील जमीनींतून सामानसुमान मिळवितां येत होतें. त्याला कशाची वाण पडली नाही. तो आपले कुटुंब व विश्वासू माणसें, यांच्यापासून दूर पडला होता. त्याचे लोक त्याला नांवें ठेवूं लागले. संकटसमयीं सहज सुलभ सुविचार सर्वच व्यक्त करीत असतात. कोठूनहि सहाय्य मिळत नाहीं असें पाहून, त्यानें आपली अंगुली कापून, ती–ताबेदारी द्योतक–राजाकडे पाठविली आणि त्याच्याकडून–माकडाला कांही देऊन. त्याच्या हातचें फल मागून घेतात तसें–स्वतःचे शिर वाचाविलें. ३३००.

त्या थोर राजानें रड्डा देवीच्या पोटीं झालेले वडील पुत्र गुल्हण याला, लोहर येथें-राज्याभिषेक केला. तेव्हां तो सहा सात वर्षांचा होता. नवे आंब्याचें रोप जुन्या आम्रवृक्षाच्या खोडांना मागें टाकतें तसा तो नैसर्गिक गुणांनीं मोठ मोठ्या राजांना मागें टाकण्यासारखा होता राज्याभिषेकाला रड्डा राणी स्वतः गेली होती. चरणावर मस्तक ठेवणाऱ्या सामंतांच्या किरीटांतील माणकांच्या किरणांनीं तिचे चरण जणों आलक्तांकित झाले होते. या अभिषेकानें प्रसन्न होऊनच जणों फार दिवसांच्या अवर्षणानें सुकलेल्या भूदेवीला मेघ राजानेंहि पर्जन्य वृष्टीच्या द्वारें अभिषेकच केला.

राजवदनानें पुनः बंडाळ्याचा प्रयत्न चालविला व जयचंद्रावर हल्ला केला. पण जयचंद्रानें ताबडतोब त्याचा मोड करून त्याचा पाठलाग केला. नागाचा पुतण्या लोष्ठक, याच्या मदतीनें राजवदनानें त्याला एका खिंडींत गाठून त्याच्या फौजेचा पराभव केला. जयचंद्र मागून येत होता. या अपजयामुळें जयचंद्राचा पाणउतारा झाला. त्यान पुढे एका लढाईंत लोष्ठकाला पकडलें आणि ताबडतोब धांवा करून दिन्नाग्रामावर हल्ला केला तें बिकट जागीं असल्यामुळें आजवर त्याच्यावर कोणी चढाई केली नव्हती. तें गांव त्यानें जाळून टाकलें. असा सहजपणें जय मिळवून जयचंद परत आला तरी, राजवदनानें धैर्य सोडलें नाहीं. किंवा तो नाउमेदही झाला नाहीं. त्याचें सैन्य मारखें संपुष्टांत यत होतें तरी, तो राजाच्या सैन्यावर हल्ले करीतच होता. जयचंद्र त्याचा वरचेवर मोड करी. ३३१० राजाचे दीर्घ बाहू व तीक्ष्ण नखें, यांची पोंच दूरवर असते. तिचा अंत लागत नाहीं. पुढें राजानें

त्याला एका लढाईंत मारेकऱ्याच्या हातीं ठार मारविलें. त्याच्या छिन्न मस्तकाच्या चंचल ओठांवरून, त्याच्या पुष्पोद्गमाला आलेल्या भाग्यरूपी वृक्षाचा छेद झालेला दिसत होता.

पृथ्वीहराच्या वंशजांचा उच्छेद करण्यासाठीं राजानें लोष्ठकाचाहि वध करविला. पूर्वी त्याला वेढा पडला असतांना त्रिल्लकानें एकदां सोडविलें होतें. पण यावेळीं तो राजाच्या कारस्थानाच्या जाळ्यांत फसला. मल्लकोष्ठ, क्षुर, जग्य, सज्जचंद्र, वगैरे मंडळीहि मृतप्राय झालेली होती. त्यांचा पुढें मोठ्या दुर्दशेंत व गरीबींत अंत झाला.

उच्चल राजानें राज्यमदाच्या धुंदींत जीविताच्या नश्वरपणाचा विचार मनांत न आणतां, आपल्या मठाच्या खर्चाचा कायमचा बंदोबस्त केला नव्हता. तो खर्च पुढच्या राजांनीं कसाबसा चालविला होता. त्या उच्चलाच्या वंशाचा आधारस्तंभ अशा जयसिंह राजानें त्याला कायमची नेमणूक करून दिली. त्याच्या चुलत्यानें स्थापन केलेल्या सुल्ला विहाराचें काम, तसेंच त्याच्या पित्यानें सुरूं केलेल्या तीन मंदिराचीं अपूरीं कामेंहि त्यानें पूरीं करविलीं. त्यानें आपण होऊन मंदिरांतील सामानसुमान व साज तयार करविलें, ते आणि मोठमोठें पक्के बाजार व कांहीं गाव, त्यानें मर्जीतले पुजारी, पुरोहित व इतर मंडळी, यांना इनाम दिलें.

त्याच्या अंतःपुरांतील चंदला नांवाची चंद्रमुखी पत्नी मरण पावली. तिच्या नांवानें त्यानें एक सुंदर व सुसंपन्न मठ बांधविला. तेथून कोणीहि विमुख परत जात नसे. ३३२०. सूर्यमतीचा मठ नगरांतील भयंकर आगींत जळून भस्म झाला होता. तोहि त्या निगर्वी राजानें पुनः पूर्वीपेक्षांहि चांगला व मोठा बांधविला.

संजपाल मरण पावल्यावर राजानें त्याचा पुत्र गयापाल याला त्याच्या जागीं सेनापति नेमलें. संजपाल कडक व कठोर असल्यानें त्याच्याशीं वागणें कठिण पडे. शेवटीं शेवटीं तो थोडासा मृदु झाला होता. शीतल चंद्रप्रकाशानें ग्रीष्मांतील प्रखर सूर्यतापाचा विसर पडतो. तसा गयापालानें त्याचा विसर पाडला. ग्रीष्मांतील दुस्सह दाहानें सुकलेल्या नाल्याला, अभ्रें येऊं लागतांच पाऊस पडून आपली वृद्धी व्हावी, अशी इच्छा झाली तरी, ती त्याला पसंत पडत नाहीं. कारण त्यावेळच्या वृष्टीबरोबरच अकस्मात विद्युत्पात होऊन, आपल्या बरोबरच ताप व क्लेश सहन करीत असलेल्या, तीरावरील वृक्षांचा नाश होईल अशी त्याला भीति असते.

या प्रमाणें त्या श्रेष्ठ नृपरत्नाच्या सर्व शत्रूंचा समूळ उच्छेद झाल्यानंतर त्याचें उत्कृष्ट व अद्वितीय प्रेम संपादन करून तें सतत कायम करून घेतलेला आणि भिक्षूच्या मृत्यूपासून भोजाच्या आक्रमणापर्यंतच्या सर्व संकटांत राज्यकारभाराची धुरा एकटाच वहात आलेला धंन्य मंत्री मरण पावला. पदोपदीं संकटांत फसलेल्या प्रजेचें सहाय्य करण्यांत मन कायमचें गढलेल्या राजाचेंच प्रत्येकानें प्राणव्ययानेंहि रक्षण करणें, कर्तव्यकर्म असतें. राजा जयसिंह कृतज्ञ होता. धंन्य आजारी पडून आसन्न मरण असतांना, राजा त्याच्या जवळून हलला नाहीं. धंन्याला आराम पडावा म्हणून प्रार्थना करणाऱ्यांमध्यें तो सारखा

हजर व जागत बसे. त्याच्या मरणानें त्या प्रजावत्सल राजाच्या चर्येंत फरक पडला. त्याच्यावरून प्रजाजनांच्या ऐहिक जीवनाचें जणों पुनरुज्जविन झालें. ३३३०. आणि मांधात्यासारखें महीपाळ मरण पावल्यामुळें दुर्दैवग्रस्त झालेल्या प्रजेला सुख मिळालें. प्रधान मंत्री धंन्य हा अप्रतिहत सत्ता चालवीत असतांना, त्यानें त्या तरुण राजाच्या प्रतिस्पर्ध्यांनीं केलेल्या सर्व उठावण्या पार हाणून पाडल्या होत्या.

सर्वांच्या वर्तनाचा मुख्य अधिष्ठाता काल. त्याच्या इच्छे बाहेर वागण्याची कोणाची प्राज्ञा आहे? सुररिपूनें शेषावतार घेऊन सर्व पृथ्वीचा भार सहन केला. त्यालाच पुढें वराह आवतार घेऊन आपल्या सामर्थ्यानें तीच पृथ्वी खणून·काढावी लागली. ३३३३.

सुज्जीचा कांटा काढून टाकल्यावर राजानें कुलराजाला नगराधिकारी केलें होतें. त्यानें प्रारंभीं प्रारंभीं राज्यांत पुष्कळ दिवसांपासून चालत आलेले बरेच दुष्ट प्रघात बंद केले. दिनारांच्या व्यवहारांत फार लबाडी चालत असे म्हणून त्यांचें चलन बंद पडलें होतें. त्या लबाडया नाहींशा करून त्याने ते पुनः चालू केलें. विवाहित स्त्रीशीं जारकर्म करणाऱ्याकडून जबर दंड घेतला जात असे. त्याबद्दल योग्य विचार करून त्यानें तो काढून टाकला. त्यानें नेमणूक झाल्यावर प्रथम लोकांच्या हिताकडे अधें लक्ष दिलें होतें. पण पुढें तो जुलूम करूं लागला. त्यानें, घरांत घेतलेल्या वेश्यांशी संबंध ठेवल्यावरून पुष्कळशा लोकांना शिक्षा केली. पण असल्या तुषतुल्य दोषांचा विचारच कशाला करावा? त्याच्या इतपत सत्यनिष्ठ व निरपेक्ष वर्तन करणाराहि दुसरा कोणी नव्हता.

तोहि इतरांप्रमाणें पूर्वी भिक्षू व मल्लार्जुन यांचा पक्षपाति होता. पण पुढें त्यानें आपल्या नव्या मालकाची-राजाची-सेवा करण्यांत कधीं कुचराई केली नाहीं, किंवा त्या दोघांचाहि त्यानें कोणें प्रकारें घात केला नाहीं. ३३४०. कामावर असताना त्याचा फारसा खर्च नव्हता. तरी तो मेल्यावर त्याच्या क्रियेपुरतीहि शिल्लक निघाली नाही.

राजाच्या औदार्याचें कोठवर वर्णन करावें? त्यानें पूर्वीच्या राजांच्या आश्रितांना आपले यजमान गेले, असे कांही वाटूं दिलें नाहीं.

धंन्याची पत्नी विज्जा ही त्याच्या पूर्वींच वारली होती. तिच्या नांवानें एका विहाराचें काम सुरू केलें होतें. तें राजाने पूर्ते करवून, त्याच्या खर्चाचा कायमचा बंदोबस्त केला. केवळ युद्धोपजीवी-शिपायी-वगैरेंना सुद्धां, राजाचें पाहून, चांगलीं कामें करण्याची बुद्धि झाली व त्यांनीं तशा कामांच्या द्वारें पुण्य संपादन केलें.

कमलियाचा कनिष्ठ बंधू राजकुमार संगीय यानें आपल्या नावानें एक लिंग स्थापन केलें. त्याचें क्षत्रिय कुल तुरुष्क देशात एका गावीं राहात होते. त्यामुळें ते क्रूर बनले होते, कारण, त्यांना नेहमीं शत्रूंच्या समूहांत टिकाव धरून रहावें लागे. सुस्सल राजाच्या वैऱ्यांशीं चाललेल्या लढायात त्यांनी काश्मीरात येऊन नोकरी मिळविली होती. त्यानें वितस्तातीरावर स्थापलेल्या बाणलिंगाकडे आकाशगंगेच्या कांठच्या अविमुक्त तीर्थाचें स्मरण येई, ( अविमुक्त-हें तीर्थ काशीजव

आहे, ) त्याचा मठ, तापसांनीं शोभिवंत केला होता. त्याच्या दर्शनानें रुद्रलोक दर्शनाची इच्छा तृप्त होत असे. ३३५०. तो अलीकडच्या कालांतील असूनहि, मोठा निष्पाप होता. त्यानें दुसरीं देवस्थानें व मठ, यांच्या नेमणुका वगैरे दाबल्या नाहींत किंवा गरीबांची मालमत्ता अपहार करून ती स्वतःच्या देवस्थानाकडे लावली नाहीं.

सेनापती उदयाची पत्नी चिंता इनें वितस्तातीरावर एक विहार बांधवून त्याला शोभा आणली. तिच्या विहारांतील पांच इमारती जणों न्यायदेवतेनें उभारलेल्या पंजाची पांच बोटेंच होतीं.

संधिविग्रहक मंत्री अलंकार याचा भाऊ मंखक, यानें श्रीकंठेश्वराचें मंदिर व एक मठ बांधवून, आपलें नांव चिरस्थायी केलें. मठस्थापना, अग्रहारदान, मठ व मंदिरें यांचें जीर्णोद्धार वगैरे पुण्यकर्मे करून सिल्हणाचा कनिष्ठ बंधू सुमनस, हाहि त्याच्याच तोडीचा झाला. त्यानें भूतेश्वर व त्रिग्रामी येथें एकेक मठ बांधवून तेथें अनुक्रमें कडकवाहिनी ( हल्लींची कांकनाई नदी. ही भूतेश्वराजवळ आहे. ) आणि वितस्ता, यांचें जल पितरांना अर्पण केलें. नलिनागापासून निघालेली वितस्ता जणों गंगेशीं स्पर्धा करीत काश्यपागारापाशीं पूर्ववाहिनी झाली आहे. तेथें त्यानें गुरें पार उतरण्याजोगा एक पूल बांधवून, या संसारसागरांतून तरणोपाय असा पुण्यसोपानच निर्माण केला. नगरांतहि त्यानें आपल्या नांवानें एक मठ व एक शिवालय बांधविलें. तेथें पुष्कळचशीं शिवलिंगें आहेत. त्यानें मम्मेश्वराच्या मंदिरावर एक सोनेरी कळस—आमलक—वसविला व पाण्याचा पाट आणवून सोमतीर्थाभोवती एक सुरेख उपवन तयार करविलें. ३३६०. या कुलांतील कांहीं राजांनी आपल्या मंत्र्यांची श्रेष्ठता, कुल, संपत्ती, वगैरेच्या मत्सरानें त्यांचें वित्त, वैभव, जीवित व मानमरातब, वगैरे हरण केलें. स्वतःच्या स्वर्गीय सिंहासनाचें आक्रमण केल्याबद्दल सुरपती इंद्रानें सुद्धां मांधाता राजाला मत्सरानें व रागानें स्वर्गांतून खालीं ढकललें पण हा निष्पाप व प्रज्ञावान राजा पुण्यकर्मांच्या द्वारें आपले सेवक उन्नत होण्यातच स्वतःचा उत्कर्ष व आनंद मानीत असतो.

सिल्हणानें कलशराजाच्या वेळच्या नव्या शोधानुरूप, सुवर्णाचा मुलामा केलेलीं भव्य छत्रें उभारलेलीं पाहून, राजाला भारी संतोष झाला. सुरेश्वरीं येथील शिव पार्वतीच्या मंदिरावर त्यानें तसें एक छत्र उभें करविलें. त्याला घंटा व दीपावलीहि लागलेल्या होत्या. त्या छत्राच्या रूपानें, आपला आप्त हिमगिरी, याच्या प्रेमामुळें त्याची कन्या व जामाता पार्वती व शंकर—यांच्या मस्तकांचें अवघ्राण करण्यास्तव आदरानें प्रत्यक्ष सुमेरूच प्राप्त झालेला, किंवा पार्वतीप्रणयी शंकराच्या ज्या आपल्या शरीरसमागमासाठीं प्रयत्न करण्यांत मदनदग्ध झाला तो समागम उमेनें घडवून आणला, हें भाषण ऐकून, श्री महारुद्राच्या भालस्थ तृतीय नेत्रांतील अग्नीनेंच त्या सुवर्णछत्राच्या रूपानें तेथें ठाणें दिल्यासारखें वाटत होतें.

तसेंच त्यानें रुक्मिणीरमणाच्या मंदिराच्या शिखरावर लावलेलें प्रचंड सुवर्णछत्र,

